

॥ श्री ॥

नारायणराव पेशवे यांचा

# खून कीं आत्महत्या ?

भाग १ ला.

लेखकः—पांडुरंग गोपाळ रानडे

सन १९४४ इ.

---

किंमत सात र

प्रकाशक :
पांडुरंग गोपाळ रानडे
मालक-महाराष्ट्र औषधी कारखाना,
१२२७ कोनवाळगल्ली-बेळगांव.





मुद्रक :
ए. पी. चौगुले,
वीर-भारत प्रेस, बेळगांव.

# अर्पणपत्रिका.

॥ गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिंग न च वयः ॥

## वैद्यालंकृति श्री. सौ० रंगुबाईसाहेब यांसी,

(१) आपला व माझा सन १९१४ सालीं नागपूर मुक्कामीं श्रीमंत कै० वा० धर्मवीर धर्मविभूषण राजे लक्ष्मणराव भोंसले यांच्या राजवाड्यांत मी गुरु व आपण शिष्या या नात्यानें परिचय झाला. माझ्या बुद्धिमत्तेप्रमाणें व योग्यतेप्रमाणें मी आपणांस कांहीं वर्षें शिक्षण दिलें. त्या शिक्षणाच्या पायावर आपण सांप्रत समाजांत जो उच्च दर्जा प्राप्त करून घेतला आहे त्याबद्दल मला अतीशय अभिमान व आनंद वाटत आहे.

(२) मला व आपणाला नागपुरीं एकाच राजवैद्याच्या शिक्षणाखालीं जी आयुर्वेद–विद्या लाभली, तिचा लोककल्याणार्थ उपयोग व्हावा म्हणून येथें आपण पहिल्यानें 'महाराष्ट्र दवाखाना' सुरू केला व नंतर त्याला 'महाराष्ट्र औषधी कारखान्याचें' स्वरूप दिलें. आपल्याच सर्वस्वी परिश्रमानें आपल्या कारखान्यास 'आयुर्वेद संमेलना'कडून शिफारसपत्रें व सुवर्ण पदकें मिळून त्याचा उत्कर्ष झाला. आपण अनेक रोगग्रस्त गरिबांना मोफत औषधें देऊन लोकसेवा केली. आपली ही लोकसेवा थोर थोर माणसांच्या दृष्टिपथातून लपण्यासारखी नसल्यामुळें आपला गौरव करण्याकरतां श्रीमत् जगद्गुरु श्रीशंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी) यांनीं आपणांला 'वैद्यालंकृति' ही सार्थ पदवी दिली. त्याचप्रमाणें हुबळीचे श्रीमत् सद्गुरु आरूढस्वामी महाराज यांनीं आपणांला 'देवी धन्वंतरी' ही पदवी देऊन आपला सन्मान केला. वे. शा. सं. भट्ट विद्याभूषण तांबेशास्त्री यांनीं 'आयुर्वेद-विशारदा' व महिलागणभूषणा' अशा दोन पदव्या आपल्या लोकसेवेचें व कर्तबगारीचें कौतुक करण्याकरतां मोठ्या समारंभानें आपणांला दिल्या. हा आपला अभ्युदय पाहून मला फारच समाधान वाटलें.

( ३ ) बेळगांवीं श्रीमत् जगद्गुरु श्रीशंकराचार्य ( डॉ. कुर्तकोटी ) यांच्या अध्यक्षतेखालीं जी 'बेळगांव हिंदुसभा' स्थापन झाली, तिच्या कार्यवाहकाचें काम आपण सुमारें पंधरा वर्षे मोठ्या आपुलकीच्या भावनेनें केलें. त्या अवधींत कित्येक आपद्ग्रस्त हिंदु लोकांना आपण सढळ हातानें मदत केली, याचें 'बेळगांव हिंदुसभेला' केव्हांही विस्मरण होण्यासारखें नाहीं. आपण कित्येक संस्थांना सढळ हातानें मदत केलेली आहे. आपल्या अंगीं थोर माणसांना ललामभूत असणारा गुण पाहून मला अतिशय संतोष वाटत आहे.

( ४ ) आपली परमेश्वराच्या ठिकाणीं अविरत निष्ठा आहे. आपण पूर्ववयांतच, त्यामुळें, श्री बदरीकेदारादि चारी धामांची अवघड यात्रा व त्याचप्रमाणें श्रीकाशीरामेश्वरादि इतर सर्व यात्रा करून आपला पारमार्थिक अभ्युदय करून घेतला आहे. आपल्याकडून कांही देवालयांचा जीर्णोद्धारही झाला आहे. नवीन देवालय बांधण्याचाही आपल्याला लाभ घडलेला आहे. आपणांला भजनाची विशेष गोडी म्हणून आपण कीर्तनें बसवूनही लोकसेवेचें व आत्मोद्धाराचें कार्य केलेलें आहे. आपल्या हातून मोठमोठ्या सत्पुरुषांचीही सेवा घडलेली आहे. आपल्या या पारमार्थिक अभ्युदयाबद्दल मला फारच समाधान होत आहे.

( ५ ) आपणांला नागपुरीं राजवाड्यांत जडजवाहीराच्या परीक्षेचें जें शिक्षण मिळालें त्याच्या बळावर आपण लाखों रुपयांचा मुंबई वगैरे ठिकाणीं व्यापार केला. त्यामुळें या विद्येंतही आपण फार मोठें प्राविण्य मिळविलें. आपण बेळगांवीं 'रंगुबाई पॅलेस' ही इमारत लाखों रुपये खर्च करून व अत्यंत परिश्रम घेऊन बांधली. या गोष्टीही एका स्त्रीकडून घडल्या जाव्या ही गोष्ट खात्रीनें कौतुकाची वाटण्यासारखी आहे. आपला सांपत्तिक दर्जा चांगला असूनही आपला निगर्वी व निरालस स्वभाव, कलाकौशल्याची आपणांला असलेली आवड व विद्याव्यासंगाची आपली मनोवृत्ति या गोष्टीकडे पाहिलें असतांही मनाला संतोष वाटल्याशिवाय रहात नाहीं.

( ६ ) फक्त परमेश्वर एकटाच सर्वगुणसंपन्न आहे. मनुष्यप्राणी गुणावगुणांचा कमजास्त प्रमाणांत घटक बनलेला असतो. सर्वगुणसंपन्न असा मनुष्य दुर्मिळ असतो. कोणते ना कोणते अवगुण मनुष्यमात्राच्या ठिकाणीं हे स्वभावतः असतातच. लोककल्याणाच्या मापानें मनुष्यमात्राचे गुण कसाला ज्या प्रमाणांत लागतील, त्या प्रमाणांत त्याची थोरवी मानावयाची असते. लोककल्याणाच्या कसोटीवर वरील दृष्टीनें आपल्या गुणांचा कस लाविल्यास तो फारच वरच्या दर्जाचा लागतो यांत संशय नाहीं. आपण बेळगांव नगरपालिका व बेळगांव जिल्हा स्कूल बोर्ड या लोकनियुक्त संस्थांमध्यें काम केल्यानंतर सन १९३७ मध्यें होणाऱ्या मुंबई असेंब्लीच्या निवडणुकीस स्वतंत्र पक्षाचे उमेदवार म्हणून निवडणुकीच्या जंगी आखाड्यांत उतरलात. खास स्त्रियांकरतां राखून ठेवलेल्या जागेसाठीं उमेदवार म्हणून उभ्या न राहतां किंवा कोणत्याही संस्थेचें पाठबळ न घेतां सर्वसाधारण जागेकरतां पुरुषांबरोबर निवडणुकीस उभें राहण्याचें व तेंही केवळ आपल्या वैयक्तिक सामर्थ्यावर राहण्याचें आपण धैर्य दाखविलें. बेळगांव दक्षिण विभागांतील मतदारांच्या यादीकडे पहातां केवळ मराठा मतदारांच्या बळावर एक मराठा उमेदवार यशस्वी होऊं शकतो अशी परिस्थिति होती. आपण व आपले सहकारी यांनीं सुमारें सात आठ महिने निवडणुकीपूर्वी आपला प्रचार बेळगांव जिल्हा दक्षिणविभागांत सुरू केला. आपला प्रचार दुसऱ्या कोणत्याही पक्षावर हल्ला न चढवितां, केवळ सरळ मार्गाचा होता. पण असें आपलें प्रचारकार्य चालू असतां व आपणांला बऱ्याच मराठा मतदारांचें व इतर मतदारांचेंही पाठबळ लाभलें असतां, निवडणुकीच्या थोडेच दिवस अगोदर येथील 'मराठा सुधारणा मंडळानें' एम्. एम्. लाड वकील यांना आपल्यातर्फे मराठा उमेदवार म्हणून पुढें आणलें. महाशय लाड यांच्या पक्षांतील कांहीं मराठे लोक 'प्रचारकार्याकरतां हिरीरीनें पुढें आले व त्यांनीं आपल्याविरुद्ध प्रचाराला सुरवात केली. आपण आपली उमेदवारी काढून घ्यावी याबद्दल जेवढे मार्ग होते तेवढे त्यांनीं केले. जितका जितका गैरसमज

फैलावतां येईल तितके तितके सर्व प्रकारचे प्रयत्न त्यांचेकडून झाले. या प्रचाराचा परिणाम इतक्या थराला गेला कीं बेळगांव जिल्ह्यांतील मराठा समाजाची संघटना न होतां त्याची अलग अलग दोन शकलें कायमचीं पडतात किंवा काय अशी परिस्थिति पदोपदीं अनुभवाला येऊ लागली. परंतु अशा आणीबाणीच्या व स्वकीय ज्ञातीच्या लोकांकडून प्रसंग ओढवला असतांही आपण आपलें धैर्य खचूं दिलें नाहीं. आपण आपलीं तत्वें सोडलीं नाहींत व दुसऱ्या पक्षाच्या सहाय्याचीही अपेक्षा केली नाहीं. आपली उमेदवारीची जागा आपण शेवटपर्यंत मोठया चिकाटीनें व धैर्यानें लढविली. महाशय लाड यांच्या पक्षानेंही मोठया जोमानें व निश्चयानें आपली जागा लढविली. मराठयांतील हे युयुत्सव एका जागेकरतां हिरीरीनें लढल्याचा परिणाम असा झाला कीं, मुंबई असेंब्लीच्या निवडणुकींत उभय वीर आपसांतींत लढल्यामुळें पराजित झाले. या अपयशामुळें दोन्ही पक्षांतील अनुयायांची निवडणुकीनंतर कांहीं महिने अनुकंपनीय स्थिति राहिली.

( ७ ) वरील परिस्थितीचा आपण कांहीं दिवस पूर्ण विचार केला व बेळगांव जिल्ह्यांतील मराठा समाजाचीं अशा प्रकारचीं दोन शकलें जास्त दिवस अलग अलग राहणें म्हणजे मराठा समाजाचा नाश आहे असें ठाम ठरविलें. त्या नंतर पुनः पूर्ववत् मराठा समाज कसा सुसंघटित होईल याचा आपण विचार चालविला व त्याला आपण एक सुंदर तोड काढिली. बेळगांव जिल्ह्यांतील मराठा विद्यार्थ्यांच्या शिक्षणाला मदत करण्याच्या हेतूने आपण आपला लाख, दोन लाख रुपये किंमतीचा ' रंगुबाई पॅलेस ' मराठा समाजाला बहाल करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें मराठा समाजांतील नवीन बनलेल्या दोन्हीं पक्षांच्या पुढाऱ्यांना आपण आपला हेतु कळवून पॅलेसमध्यें बोलाविलें. उभय पक्षांतील पुढाऱ्यांची व त्यांच्या त्यांच्या अनुयायांची दिलसफाई आपण करून देऊन ' रंगुबाई पॅलेस ' चें रीतसर ट्रस्टहि करून दिलें. त्यामुळें बेळगांवच्या मराठा समाजाची पूर्ववत संघटना झाली व आपल्या अंगच्या थोर थोर गुणांची त्यांना साक्ष पटली. त्या दिवसापासून

मराठा समाज आपणांला 'त्यागमूर्ति' या नांवानें संबोधूं लागला. आपल्या या असामान्य गुणाबद्दल अनेक ज्ञातीच्या लोकांकडून व संस्थांकडून आपला सन्मान झाला. महाशय लाड यांना 'रावबहादूर' व आपणांला 'केसर-इ-हिंद'चें बहुमानाचें पदक देऊन सरकारानेंही आपली गुणग्राहकता दाखवून आपला सन्मान केला. हा आपला अती उच्च असा अभ्युदय पाहून मला अतीशय आनंद वाटला.

( ८ ) आपसांतील कलह अगर मतभेद आपसांत मिटवून घेणें हें एक दिव्य असें राजकारण आहे. ही दिव्य दृष्टि सांप्रत जशी कमी प्रमाणांत दिसते तशीच ती इतिहास कालींही होती. तात्विक दृष्टीनें पहातां सर्व काळांतील समाजाचे मनोधर्म जवळ जवळ एकाच स्वरूपाचे असतात. करवीर संस्थानच्या संस्थापिका राणी ताराबाई यांना मराठयांची जूट कायम ठेवण्याकरतां शाहूमहाराजांबरोबर मिटतें घेतां आलें नाहीं. नानासाहेब पेशव्यांना छत्रपती रामराजे यांच्याबरोबर व आंग्र्यांबरोबर सलोखा अनुक्रमें ठेवतां आला नाहीं आणि घडवून आणतां आला नाहीं. माधवराव पेशव्यांना राघोबादादांबरोबर सहकार्य करतां आलें नाहीं. शहाणे शहाणे म्हणविणारे नाना फडनविस, पण त्यांनाही राघोबादादा, सखारामबापू, महादजी शिंदे, परशुरामभाऊ वगैरे वगैरे थोर थोर पुरुषांशीं सलोखा करून राज्य रक्षण करतां आलें नाहीं. या सर्वांच्या बुडाशीं त्यांचा त्यांचा स्वार्थ आडवा आला व तो सोडण्यास ते कोणीही तयार झाले नाहींत. त्यामुळें अनेक रणें माजून राज्यनाश झाला—सर्व नाश झाला. याकरतां 'त्याग' या एकाच थोर गुणाची आवश्यकता असते; व तो दिव्य गुण असामान्य व्यक्तीच्याच ठिकाणीं वसत असतो. आपल्या ठिकाणीं तो गुण वसत आहे व त्या गुणाची राष्ट्राच्या अभ्युदयाला अत्यंत जरूरी आहे असें माझें ठाम मत असल्यानें मला आपल्या या गुणाबद्दल अतीशय अभिमान व समाधान वाटत आहे.

( ९ ) 'नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या' या पुस्तकांतील प्रतिपाद्य विषय जरी दिसावयाला भिन्न दिसला तरी सर्व पुस्त-

कांतील विचारसरणीचा ओघ लोकहिताच्या व राष्ट्रहिताच्या दृष्टीनें **योग्य ठिकाणीं त्याग करणें हें थोर मनोवृत्तीचें लक्षण आहे,** व त्याच गुणावर राष्ट्राचा अभ्युदय असतो या तत्त्वाला पोषक आहे असेंच दिसून येईल. या दिव्य गुणाची बरेच दिवसांपासून महाराष्ट्रीयांना विस्मृति पडल्यामुळें भावी पिढीला त्याचें कायमचें स्मरण रहावें म्हणून हा ऐतिहासिक ग्रंथ **'त्यागमूर्ति'** वैद्यालंकृति, देवी धन्वंतरी, महिलागण-भूषणा, आयुर्वेदविशारदा, केसर-इ-हिंदचें पदक धारण करणाऱ्या श्री. सौ. रंगुबाईसाहेब यांना याच त्यांच्या असामान्य गुणाबद्दल अर्पण केला आहे.

( १० ) या ग्रंथार्पणास वैद्यालंकृति श्री. सौ. रंगुबाईसाहेब यांनीं मोठ्या आनंदानें संमति दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

**बेळगांव.**
ता. १९-८-१९४४.

पांडुरंग गोपाळ रानडे



# आत्मनिवेदन व आभार प्रदर्शन.

'नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या' या विषयावर एक लहानसें पुस्तक लिहावें असें सन १९२० मार्चीं आमचे मनांत आलें. त्याची सर्वसाधारण आंखणीही झाली. परंतु त्याच वेळीं चित्ताकर्षक नाटक मंडळीनें आमचें 'समाजमंदीर' हें संगीत नाटक रंगभूमीवर आणल्यामुळें दुसरें नवीन नाटक आमचेकडून लिहून घेण्याचा कंपनीच्या चालकांनीं निश्चय केला व तें नाटक 'नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या' या विषयावरच लिहिण्याचा त्यांनीं आग्रह धरला. आम्ही सदर विषयावर नाटक लिहिण्यास सुरवात करण्यापूर्वींच त्यांनीं तसें प्रसिद्धही करून टाकलें. आम्हीं सदर विषयावर अर्धेअधिक नाटक लिहिलें होतें, परंतु त्या वेळीं त्यासंबंधीं चर्चा सुरू झाली. तेव्हां नाटक रूपानें ऐतिहासिक सत्य पुराव्यासह बाहेर काढणें अशक्य वाटल्यामुळें सदर विषयाचा गंभीरपणा न जावा म्हणून तेवढेंच लिहिलेलें तें नाटक बाजूला ठेवणें भाग पडलें. पहिल्यानें पुराव्यासह ऐतिहासिक पुस्तक व नंतर त्या विषयावरील नाटक अशीच संगती योग्य आहे असें वाटून तसें पुस्तक लिहिण्याचा प्रयत्न सुरू झाला. त्याप्रमाणें सुमारें चार पांचशे पृष्ठें होतील एवढें पुस्तक लिहून तयार झालें. परंतु तेवढ्यानें मनाचें समाधान न झाल्यामुळें विस्तारपूर्वक इतिहास देण्याचें आम्हीं ठरविलें. आमचा लेखनाचा व्यवसाय नसल्यामुळें बाकीचे नानाविध व्याप संभाळून हें काम करावें लागलें. मध्यंतरीं नागपूरचे धर्मवीर राजे लक्ष्मणराव भोंसले हे कालवश झाल्यामुळें त्याचें चरित्र लिहून तें प्रसिद्ध करावे लागलें. त्यामुळें सदर विषयाकडे बरेंच दुर्लक्ष झालें. सन १९३८ पासून सदर विषयाकडे पुनः लक्ष वेधलें व त्याप्रमाणें फुरसत काढून लिहिण्यास सुरवात झाली. सन १९४० अखेर पुस्तक लिहून तयार झालें. तरी लढाई थांबून कागद वगैरे स्वस्त झाल्यावर तें छापवावें अशी आमची इच्छा होती. परंतु सन १९४२ च्या अखेर आमचा रक्ताचा दाब बराच वाढल्यामुळें आपल्या हयातींत हें पुस्तक छापून वाचकांच्या हातीं पडावें अशी मनानें पलट खाल्ली व त्याकरितां अत्यंत बिकट अशा महर्गतेंतही हें पुस्तक छापण्याचें काम सुरू केलें. सुमारें दीड वर्ष छपाईला लागून तें आतां वाचकांच्या हातीं पडत आहे.

या पुस्तकांत प्रतिपादन केलेलीं मतें कित्येकांना आवडणार नाहींत ही गोष्ट खरी आहे. परंतु तेवढयाकरतां ऐतिहासिक सत्याचा कोंडमारा करून अप्रामाणिकपणाचा दोष पदरीं बांधून घेण्याला मन तयार न झाल्यामुळें ऐतिहासिक कागदपत्रांना चाळण लावून व ऐतिहासिक व्यक्तींच्या स्वभावधर्माचा कस पाहून जें आपल्या मनाला पूर्ण पटलें तें आम्ही **आमची कैफियत** म्हणून सर्वांपुढें मांडलें आहे. आपल्या बृहन्महाराष्ट्राची ऐतिहासिक परंपरा कशी असावी हें या समग्र ग्रंथाचें परिशीलन करून ज्यानें त्यानें आपापल्या मनाशीं ठरवावयाचें आहे. हिंदुपदपादशाही स्थापन करणाऱ्या श्रीछत्रपती शिवाजी महाराजांपासून तों अटकेवर स्वराज्याचा झेंडा फडकविणाऱ्या राघोबादादांपर्यंतची शौर्यशाली ऐतिहासिक परंपरा ज्यांना आवडेल त्यांनीं त्याचा अंगिकार करावा. ज्यांना अफाट बुद्धिमत्तेचें कौतुक करीत बसावयाचें असेल त्यांनीं नाना फडनविसांच्या कपटकारस्थानी, विश्वासघातकी, अनीतिमय व पाताळयंत्री अशा घातुक परंपरेला चिकटून राहावें. कपटजालांत सिंह सांपडला म्हणून त्याचा सिंहपणा नष्ट होत नाहीं. शौर्याला मुत्सद्देगिरीची जोड पाहिजे ही गोष्ट खरी, परंतु त्यामुळें तरवारीच्या पराक्रमाला कलंक लागेल इतकी ती हलक्या दर्जाची व अनीतीची नसली पाहिजे. तरवारीचा श्रेष्ठपणा लेखणीनें काढून घेतला म्हणजे कसा सर्वनाश होतो हें या ग्रंथांत बहुतेक आमूलाग्र वाचावयाला सांपडेल. त्याचप्रमाणें पराक्रमी पुरुषाचे अंगीं कपट कारस्थान करण्याची जरी प्रवृत्ति नसली तरी कपटकारस्थानी लोकाचीं कपटें समजण्याचें ज्ञान त्यांना अवश्य असलें पाहिजे. कारण पराक्रमी पुरुषांचे कपटी लोक हेच शत्रू असतात. सिंहाप्रमाणें पराक्रमी असून स्वजनांचें कपट न ओळखतां येणाऱ्या भोळ्या राघोबादादांची कशी केविलवाणी स्थिति झाली याचेंही दृश्य या ग्रंथांत तुलनात्मक दृष्टीनें पहावयाला मिळणार आहे. इतिहास हा केवळ वाचण्याकरतां नसून पूर्वी झालेल्या चुका पुनः न घडूं देण्याबद्दलच्या खबरदारीकरतां आहे. आपला प्रभावशाली इतिहास घडवून आणणाऱ्या भावी पिढीवर त्याची जबाबदारी असल्यानें त्यांनीं ह्या दृष्टीनें या ग्रंथाचें परिशीलन करावें अशी आमची त्यांना नम्रपणें आग्रहाची विनंति आहे.

या ग्रंथलेखनाला पूर्वीच्या ग्रंथकारांनीं छापून प्रसिद्ध केलेल्या बऱ्याच माहितीचा उपयोग झाला. परंतु त्यांतल्या त्यात महर्षिस्थानाला जाऊन पोंचलेल्या रियासतकार सरदेसायांच्या व कै० वा० वासुदेवशास्त्री खरे यांच्या

बहुमोल तपश्चर्येचा आम्हांला फार फायदा झाला. त्यांनीं निरनिराळीं दप्तरें तपासून जीं अनंत अस्सल पत्रें छापून प्रसिद्ध केलीं तीं जर प्रसिद्ध झाली नसतीं तर हा ग्रंथ लिहिणें अशक्यच झालें असतें. याकरतां पहिल्यानें या सर्वांचे आभार मानणें अवश्य आहे. ग्रंथ तयार झाला तरी त्याचें महत्व वाचकांना पटवून देण्याचें कार्य प्रस्तावना लिहिणाराचें असतें. येथील 'वर्णाश्रम स्वराज्य संघाचे अध्यक्ष' श्रीयुत श्रीधर बळवंत नगरकर वकील, यांनीं मोठ्या परिश्रमानें व ऐतिहासिक सत्यान्वेषणाच्या कळकळीनें सविस्तर प्रस्तावना लिहिण्याचें कार्य केलें याबद्दल आम्ही त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों. त्याचप्रमाणें सदर ग्रंथाचें पूर्णपणें परिशीलन करून त्यावर अभिप्राय देण्याचें काम केल्याबद्दल श्री. गो. स. सरदेसाई कोल्हापूर, दिवाणबहादूर आ. बा. लठ्ठे एम्. ए. एल एल् बी. बेळगाव, राजवैद्य शंकरराव आनंदराव जगताप कोल्हापूर, श्री. गोपाळ विष्णु जोशी सुभेदार माजी चालक व शिक्षक व्यायामशाळा जमखंडी, 'गोसेवक पंचांगकर्ते' भास्कराचार्य जोशी ज्योतिषी बेळगाव, बी. टी. कॉलेजचे प्राध्यापक श्री. जी. एस्. देशपांडे बी. ए. बी टी. कोल्हापूर, श्री. श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब देशपांडे, बी. ए. एस्. टी. सी. कोल्हापूर, यांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. पुण्याचे सुप्रसिद्ध ज्योतिषी होराभूषण दीक्षित यांनीं नानाच्या कुंडलीचें वर्णन करण्यांत फारच परिश्रम घेतले आहेत. हा ग्रंथ ज्या छापखान्यांत छापला त्या 'वीरभारत प्रेसचे' मालक श्री. चौगुले यानीं आपला प्रेस बाल्यावस्थेत असूनही एवढा मोठा ग्रंथ छापून देण्याचें धाडस करून तो अनंत अडचणी सोसून पुरा केला आहे. येथील 'कर्नाटक फोटो झिंको' प्रेसचे मालक श्री. पवार यांनीं या ग्रंथातील सर्व ब्लॉक मोठ्या परिश्रमानें तयार केले आहेत. येथील 'महावीर प्रेसच्या' मालकानींही आयत्या वेळी बरीच मदत केलेली आहे. 'राजाराम संगीत मंडळीचे' मालक, श्री. लोंढे यानी आपल्या कंपनींतील श्री. वैशंपायन, श्री. श्रीजोगळेकर, श्री. शिंदे, श्री. राम जोगळेकर, श्री. बाळकृष्ण उमरावतीकर वगैरे नटांना परवानगी देऊन प्रकरण ४२ मधील पहिल्या पांच प्रसंगांचीं छायाचित्रें, काढून देण्यास मदत केली आहे. येथील फोटोग्राफर श्री. कट्टी यानींही मोठ्या परिश्रमाने फोटो घेतले आहेत. येथील माजी 'परीक्षक' पत्राचे संपादक श्री. सदाशिव वामन कानविंदे यांनीं प्रुफें तपासण्याचें काम निरालसपणें व कळकळीनें केलें आहे. येथील

श्री. महादेव अनंत घारे, व कोल्हापूरचे श्री. श्रीनिवासराव उर्फ बाळासाहेब देशपांडे बी. ए. यांनीं आमचे बरोबर वेळोंवेळीं ऐतिहासिक चर्चा करून आपला बहुमोल वेळ खर्च केला आहे. या ग्रंथाच्या बाबतींत वरील-प्रमाणें ज्यांची ज्यांची आह्मांला मदत झाली आहे, त्या सर्वांचे आह्मी आभारी आहोंत. याशिवाय कांही थोर व विद्वान मंडळींचेंही सहाय्य या ग्रंथांतील कांहीं विषयावर चर्चा करण्याच्या बाबतींत झालें आहे. परंतु त्यांनीं आपला नामनिर्देश न करण्याबद्दल सूचना दिल्यामुळें त्यांचे जाहीर आभार मानण्याचें भाग्य आह्मांला लाभलें नाहीं. तसेंच चित्र नं. ६ मध्यें तेगा व हातचा निमचा याचीं जीं चित्रें देण्यांत आलीं आहेत तीं आम्हांला आमच्या संस्थानी स्वराज्यांतील जुन्या शस्त्रागारांत पहावयास मिळाल्यामुळें त्याचीं चित्रें काढून तीं देण्यात आलीं आहेत. नाना फडनविसांचें जें चित्र दिलें आहे तें पुण्याच्या विविध चित्रकला मंदिरानें इ. स. १८८४ सालीं छापलेल्या चित्रा-वरून घेतलें आहे. त्याबद्दल त्याचेही आम्ही आभारी आहोंत.

या ग्रंथांत नजरचुकीनें बरेच मुद्रण दोष राहिले आहेत. परंतु ते सहज समजण्यासारखे असल्यामुळें शुद्धीपत्र दिलें नाहीं. या ग्रंथांत ऐतिहासिक सत्य बाहेर काढण्याकरतां ज्या व्यक्ति आजपर्यंत थोर व पूज्य मानल्या जात होत्या त्यांना त्यांच्या उच्च स्थानावरून खालीं ओढून न्यायाच्या कांट्यावर बसविल्यामुळें त्यांच्या चाहत्यांना त्यामुळें वाईट वाटेल; परतु त्याबद्दल आमचा नाइलाज झाल्यामुळें आह्मीं त्यांची क्षमा मागतों. वाचकांनीं 'हंसक्षीर' न्यायानें या ग्रंथाचें वाचन करावें अशी त्यांना आमची नम्र विनंति आहे. ह्या ग्रंथाचें भाद्रपद शुद्ध १३ दिवशीं प्रकाशन करण्याचा मुख्य हेतु म्हणजे याच दिवशीं नारायणराव पेशवे हे काल-वश झाले तेव्हां त्यांचें हें १७१ वें सांवत्सरिक वाङ्मय श्राद्ध ह्मणून समजण्यास हरकत नाहीं. शेवटीं हा समग्र ग्रंथ लिहिण्याला व तो छापून वाचकांच्या हातीं पडण्याला परमेश्वरानें सर्व बाजूंनीं सहाय्य दिल्यामुळें त्याचें अनन्य भावानें स्मरण करून हा लेख पुरा करतों.

बेळगांव.
ता. १५-८-१९४४.

पांडुरंग गोपाळ रानडे.

# आधार-ग्रंथ.

१ ऐतिहासिक लेखसंग्रह, खरेशास्त्रीकृत, भाग ४ ते ११
२ इचलकरंजी संस्थानचा इतिहास, खरेकृत.
३ अधिकारयोग, खरेकृत.
४ नाना फडनविस यांचें चरित्र, खरेकृत, आवृत्ति २ री.
५ हरिवंशाची बखर. खरेकृत.
६ पेशव्यांची बखर. सानेकृत. आवृत्ति ५ वी.
७ नागपूरकर भोंसल्यांची बखर.
८ मराठ्यांची बखर, डफकृत, आवृत्ति ६ वी.
९ चित्रगुप्ताची बखर.
१० मराठा साम्राज्याची छोटी बखर.
११ भाऊसाहेबांची बखर.
१२ नाना फडणीस यांची बखर, म्याकडोनाल्डकृत.
१३ मराठे व इंग्रज, केळकरकृत.
१४ नानासाहेब पेशव्यांचें चरित्र, सरदेसाईकृत.
१५ जिवबादादा बक्षी याचें चरित्र.
१६ नाना फडनविस याचें चरित्र, देवकृत.
१७ महादजी शिंदे यांचें चरित्र, नातुकृत.
१८ प्रौढ प्रतापनिधी माधवराव.
१९ परशुरामभाऊ पटवर्धन यांचें चरित्र.
२० सखारामबापू यांचें चरित्र, कानेटकरकृत.
२१ राजे लक्ष्मणराव भोंसले याचें चरित्र. रानडेकृत.
२२ महादजी व नाना.
२३ काव्येतिहास संग्रह, पत्रें व याद्या.
२४ मराठा कुळांचा इतिहास, दळवीकृत.
२५ बावडा दप्तर.
२६ भारत इतिहास संशोधन मंडळ वर्ष ५ वें अंक १।२।३।४.
२७ पुरंदरे दप्तर, अप्रकाशित.
२८ पेशवे दप्तर, भाग ५ वा.

२९ चंद्रचूड दप्तर.
३० अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें, वाकसकरकृत.
३१ पारसनीस संग्रह.
३२ पर्शियन कॅलेंडर.
३३ ऐतिहासिक टिपणें.
३४ भारत इतिहास संशोधन मंडळ, सप्तम संमेलनवृत्त.
३५ होळकर यांची कैफियत.
३६ तारीख-इ-मुझफरी.
३७ मराठ्यांचा पत्रपद्धति इतिहास.
३८ आनंदीबाईची दिनचर्या
३९ नागपूरके भोंसले. शुक्लकृत.
४० भारतवर्ष.
41 Selections from State Papers, Bombay.
42 Elliot Vol VIII.
43 Pope's History of Maharattas.
44 Madhava Rao Sindhia, by H. G. Keene.
45 History of India by C. F. DeLa Fosse.
46 Outline of English History by S. R Gardiner
४७ यवन जातक संग्रह.
४८ मनुस्मृति, प्राकृत भाषांतरासहित.
४९ शारीर व आरोग्यविज्ञान, भाटकृत.
५० श्रीचरक संहिता.
५१ चिकित्सा प्रभाकर.
५२ वाग्भट.
५३ निघंटरत्नाकर.
५४ भावप्रकाश.
५५ सुश्रुत.

वगैरे वगैरे.

---

# अनुक्रमणिका

प्रस्तावना लेखक श्री. श्रीधर बळवंत नगरकर वकील.



श्री.

# प्रस्तावना.

**ज्यांच्या हत्कासारीं, होय गुणस्नेहबिंदुही फार ।**
**सारज्ञ, असूयोज्झित त्यांला माझा असो नमस्कार ॥** मोरोपंत
**नास्ति सत्यात्परो धर्मः ॥** महाभारत.

रा० पांडुरंग गोपाळ रानडे यांनीं " नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या ? " या आपल्या ग्रंथाला प्रस्तावना लिहून देण्याबद्दल प्रेमपूर्वक आग्रह केल्यामुळें हें काम करण्याचें मी मोठ्या संतोषानें पण एका अर्थी धाडसानेंच मान्य केले. प्रस्तावनेचा उद्देश मुख्यतः ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयाचें महत्व वाचकाचे मनास पटविण्याजोगी त्याची रूपरेषा, ग्रंथकाराची साहित्याच्या दृष्टीनें योग्यता व ग्रंथांतील विषयासंबंधीं साधार व सविस्तर माहिती गोळा करण्याकरितां त्यांनीं केलेले परिश्रम, यांचा वाचकाना थोडाबहुत आगाऊच परिचय करून देण्याचा असतो. या दृष्टीनेंच पुढील चार शब्द मी वाचकाना सादर करीत आहे.

ग्रथकार रा० पांडुरंग गोपाळ रानडे हे व्यवसायानें अनुभविक, कुशल व चिकित्सक वैद्य असून त्यानीं आपल्या ' महाराष्ट्र औषधी कारखान्यांत ' शास्त्रोक्त पद्धतीनें आर्यौषधि तयार करण्याचे कामीं कर्नाटक आयुर्वेदिक संमेलनाकडून शिफारसपत्रें व सुवर्णपदक मिळविण्यापर्यंत मजल गाठलेली आहे. एवढेंच नव्हे तर ' साहित्यिक ' या दृष्टीनेंही त्यांचा दर्जा बराच वर लागेल इतके साहित्याचे कामीं त्यांनीं परिश्रम केलेले आहेत. विद्यार्थीदशेपासूनच त्यांना लेखनाची आवड असल्याचें दिसून येतें. त्या दशेंत त्यांची कवित्व करण्याकडे प्रवृत्ति होती. त्यांच्या काहीं कविता ' प्रसन्नतेचें साम्राज्य, ' ' सतारतरंगांतील एकतानता ', ' कवि हा वेडाहुनि गेला, ' वगैरे शीर्षकाखालीं ' पांडुरंग ' नांवावर ' करमणूक ' पत्रांतून सन १९११–१२ सालीं वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्यांनीं कांहीं नाटकेंही लिहिलेलीं

आहेत. त्यांचें पहिलें गद्य नाटक ' इंद्रमुकुट ' हें सन १९१७ मध्ये प्रसिद्ध झालें. जमखंडी संस्थानचे अधिपती श्री. सर परशुरामभाऊसाहेब पटवर्धन, के. सी. आय्. ई., यांस तें अर्पण करण्यांत आलेलें होतें. हें नाटक ' चित्ताकर्षक नाटक मंडळी ' व ' लोकमान्य नाटक मंडळी ' करीत असत. दुसरें नाटक ' संगीत समाजमंदीर ' हें होय; याचे प्रयोग ' चित्ताकर्षक संगीत नाटक मंडळी ' व ' नूतन संगीत मंडळी ' या कंपन्या करीत असत. त्यांनीं धार्मिक विधिविधानाची परिश्रमपूर्वक माहिती मिळवून ' क्षत्रियांचें आन्हिक कर्मविधि ' हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. नागपूरकर भोंसले राजघराण्यांतील बाजीराव महाराजांचे मोक्षगुरु जे सोनेगांवचे ' आबाजीमहाराज ' त्या सत्पुरुषाचा गुणवर्णनात्मक पोवाडा यानीं रचला असून तो छापून प्रसिद्ध झालेला आहे. सत्पुरुषाची चरित्रें व त्यांचें महत्व पोवाड्याच्या रूपानें लोकदृष्टीला आणण्याची प्रथा यानींच प्रथम पाडली असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा पोवाडा सोनेगांवचे उत्सवाचे वेळीं कै. वा. राजे लक्ष्मणराव भोंसले आबाजी महाराजांचे मंदिरांत म्हणत असत. त्यानीं नागपूरकर भोंसले घराण्यासंबंधींचे बरेच ऐतिहासिक लेख नागपूर येथील ' महाराष्ट्र ' वर्तमानपत्रांतून सन १९२६ सालीं प्रसिद्ध केलेले आहेत. सन १९३३ सालीं त्यांनीं कै. वा. श्रीमंत धर्मवीर, धर्मविभूषण, राजे लक्ष्मणराव भोंसले, नागपूरकर यांचें सविस्तर जीवनचरित्र सुमारें ५००।६०० पृष्ठांचें लिहून प्रसिद्ध केलेलें आहे. त्यांतील पहिलीं शंभर पृष्ठें नागपूरकर भोंसल्यांच्या संशोधन केलेल्या ऐतिहासिक माहितीनें भरलेली आहेत. या चरित्रग्रंथासंबंधीं बेळगांवच्या ' परीक्षक ' वर्तमानपत्रानें बारा लेखांक प्रसिद्ध करून ग्रंथाचें बहुमोल परीक्षण केलेलें आहे. त्याचप्रमाणें केसरी, मराठा, चित्रमयजगत्, महाराष्ट्र, ज्ञानप्रकाश, सकाळ, लोकसत्ता, वैनतेय, कुलाबा—समाचार, उदय वगैरे बृहन्महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व प्रसिद्ध वर्तमानपत्रांनीं व नियतकालिकांनीं त्या ग्रंथासंबंधीं आपापले उत्कृष्ट अभिप्राय प्रसिद्ध केलेले आहेत. या ग्रंथास पुण्याच्या ' दक्षिणा प्राइझ कमिटीनें ' बक्षीसही दिलेलें आहे. या

वरील माहितीवरून ललित-वाङ्मय व ऐतिहासिक वाङ्मय या दोन्हीं वाङ्मय-प्रांतांत प्रस्तुत ग्रंथकारास आपली लेखणी कौशल्यानें व सफाईदारपणानें चालविण्याची कला प्राप्त झालेली आहे हें सहज दिसून येणार आहे. ग्रंथकाराच्या साहित्यिक दर्जाचा व वाङ्मय प्रांतांतील त्याच्या अधिकाराचा जरूर तो परिचय वाचकांना करून देण्यास यापेक्षा जास्त विवेचनाची जरूरी आहे असें मला वाटत नाहीं.

आतां आपण प्रस्तुत ग्रंथाच्या प्रतिपाद्य विषयाकडे वळूं. या ग्रंथाचें 'नारायणराव पेशवे याचा खून कीं आत्महत्या ?' हें नामाभिधान नाविन्यपूर्ण, आश्चर्ययुक्त व चमत्कारिक असेंच प्रथमतः वाटतें. जी गोष्ट आजवर होऊन गेलेल्या मोठमोठ्या विद्वान इतिहासकाराच्या स्वप्नांतही आलेली नाहीं, किंवा त्यांना सुचलेली नाहीं, त्या गोष्टीचें गंभीरपणानें प्रतिपादन करणारा हा ग्रंथकार वेडा तर नसावा अशी शंका क्षणभर वाचकाच्या मनांत डोकावल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु या शंकेचें निराकरण हा ग्रंथ संपूर्ण वाचल्यानें व त्यावर सयुक्तिकपणें विचार केल्यानेंच होणार आहे. ग्रंथाच्या नुसत्या नावावरून अथवा आपणास वाटणाऱ्या त्यांतील चमत्कारिक नवीन कल्पनेवरून ग्रंथकाराला दूषण देणें कधींही योग्य होणार नाहीं. " पूर्ण ग्रंथ पाहिल्याविण। उगाच ठेवी जो दूषण । तो दुरात्मा दुरभिमान । मत्सरें करी ॥ " (दासबोध) अशीच श्रीसमर्थांची शिकवण आहे. आजवर जरी कोणत्याही इतिहासकाराला ही नारायणराव पेशव्याच्या आत्महत्येची कल्पना सुचली नसली तरी ती खरी असूं नये असें थोडेंच आहे ! इतिहासाचें संशोधनात्मक विवेचन करतांना व प्रत्यक्ष घडलेल्या ऐतिहासिक गोष्टींची संगती लावतांना यदृच्छेनें अशा गोष्टींचें स्फुरण होणें अशक्य नाहीं. ग्रंथकाराचा नारायणरावांच्या आत्महत्येचा हा सिद्धांत त्यांना अलिकडेच सुचलेला नाहीं. त्यांनीं सन १९३३ सालीं राजे लक्ष्मणराव भोंसले यांचें जें चरित्र लिहून प्रसिद्ध केलें आहे, त्यांतील चवथ्या प्रकरणांत पान ८८ वर त्यांनीं या गोष्टीचा स्पष्टपणें पुढील प्रमाणें निर्देश केलेला आहे. 'आपणाला तुरुंगात खितपत टाकण्याचा सर्वांचा

डाव आहे. तुरुंगांत राहून मेलेलें जीवित कंठण्यापेक्षां स्वतंत्र स्थितींतील मरण बरें, असें मनांत आणून त्यांनीं आपलेजवळील खंजीर पोटांत मारून घेऊन आत्महत्या केली.' त्या ग्रंथांतील या ऐतिहासिक नवीन विधानासंबंधीं आजपर्यंत कोणीही टीका केल्याचें दिसून आलें नाहीं. त्याचप्रमाणें ग्रंथकारांनीं याच विषयावर बेळगांव येथील वसंत व्याख्यानमालेंत दोन तीन वर्षांपूर्वी एक व्याख्यानही दिलेलें होतें. त्यावरून असें दिसून येतें कीं, ग्रंथकारांचा हा सिद्धांत कित्येक वर्षांपासून त्यांच्या मनांत जो ठाण मांडून बसलेला आहे तोच त्यांनीं त्यावर अभ्यासपूर्वक पूर्ण विचार करून आतां या ग्रंथांत शक्य तितक्या पुराव्याची जोडणी करून आणि ऐतिहासिक घटनेच्या संगतीनें तो सिद्ध करून, इतिहासज्ञांच्या मान्यतेसाठीं पुढें मांडला आहे. आतां ही आत्महत्येची गोष्ट खरोखरच घडली आहे किंवा कसें, याचा उलगडा ग्रंथकारांनीं ग्रंथांत दाखविलेल्या ऐतिहासिक पुराव्यावरूनच विचारपूर्वक करावा लागेल. ही गोष्ट ज्याच्या त्याच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून असल्यानें येथें मतभेदाला बरीचशी जागा राहणें साहजिक आहे. ग्रंथकारांनींही ही आपली कल्पना सिद्धांतरूपानें सर्व उपलब्ध पुराव्यासहित पुढें मांडून कोणताही दुराग्रह न धरतां प्रत्यक्ष कसा प्रसंग घडून आला असेल याविषयीं सयुक्तिक अनुमान काढण्याविषयीं वाचकांना विनंति केली आहे. आतां नारायणरावांचा खून कीं आत्महत्या याच निव्वळ विषयाकडे लक्ष दिल्यास असें दिसून येतें कीं ग्रंथकारांनीं ग्रंथाच्या थोडक्याशा भागांतच, सुरवातीस व अखेरीस, चिकित्सापूर्वक या विषयाचा परामर्ष घेतला आहे. ग्रंथाचा बाकीचा भाग इ. स. १७४० ते १८०० पर्यंतच्या बृहन्महाराष्ट्राच्या इतिहासानेंच भरलेला आहे. तरी हें गौडबंगाल काय आहे हें वाचकांना कळणें जरूर आहे. तथापि या बाबतींत वाचकांना बुचकळ्यांत पडण्याचें कारण ग्रंथकारांनीं ठेवलेलें नाहीं. त्यांनीं ग्रंथाच्या पहिल्याच प्रकरणांत याचा खुलासा केलेला आहे. नारायणरावांच्या मृत्यूच्या कारणाला वृक्षाची उपमा देऊन ग्रंथकार म्हणतात: "जमिनीवर वृक्ष उभा दिसावयाला जमिनीच्या आंत पसरलेलीं त्याचीं अदृश्य असणारीं मुळेंच खरीं कारणीभूत अस-

तात. तेव्हां नारायणराव पेशव्यांच्या खुनाच्या अगर आत्महत्येच्या बाबतींत त्याचा पूर्वेतिहासही पहाणें जरूर आहे. नारायणरावांच्या मृत्यूपूर्वीचा त्याच्याशीं संलग्न असलेला इतिहास हीं या वृक्षाचीं मुळें, त्यांचा मृत्यु हा त्याचा बुंधा व त्यांच्या मृत्यूनंतरचा घडवून आणलेला इतिहास हा त्याचा विस्तार. या दृष्टीनें या आमूलाग्र इतिहासाची या ठिकाणीं मांडणी करणें अवश्य आहे."

याशिवाय प्रचलित इतिहासाच्या माहितीप्रमाणें व परंपरागत लोकांत चालत आलेल्या आणि रूढ होऊन बसलेल्या समजुतीप्रमाणें नारायणरावांच्या मृत्यूबद्दल कांहीं विवक्षित कारणें घडली असें मानण्यांत येतें. या कामीं राघोबादादा व त्यांची बायको आनंदीबाई हेच नारायणराव पेशव्यांच्या मृत्यूस जबाबदार आहेत व राघोबादादांनीं नारायणरावांना धरण्याबद्दल सुमेरसिंगाला दिलेल्या हुकुमांत '**ध चा मा**' करून हा खून घडवून आणला अशी बहुजन समाजाची समजूत झालेली आहे. या समजुतीचें निराकरण करूनच नव्हे, तर ती समजूत मूलतःच कशी खोटी आहे व आनंदीबाई आणि राघोबादादा हे नारायणरावांच्या वधाच्या कामीं कसे पूर्ण निर्दोषी आहेत हेंच दाखविण्याच्या उदात्त हेतूनें ग्रंथकारांनीं सन १७४० ते १८०० पर्यंतचा बृहन्महाराष्ट्राचा आमूलाग्र सर्व इतिहास संगतवार दिलेला आहे असें दिसून येतें. ग्रंथकारांनीं पहिल्याच प्रकरणांत ऐतिहासिक विवेचन सुरू करण्यापूर्वी नारायणराव पेशव्यांच्या मृत्यूशीं निगडित असलेले व इतिहासापासून निष्पन्न होणारे जे महत्वाचे बारा मुद्दे पुढें मांडले आहेत त्यावरूनही ग्रंथकारांनीं पुढील इतिहास सविस्तरपणें देण्याचें प्रयोजन काय असावें हें दिसून येतें. ग्रंथकारांनीं हा नुसता इतिहासच दिलेला नसून त्यातील ऐतिहासिक गोष्टींचे धागेदोरे जुळवून, त्याची पूर्ण छाननी करून व संगती लावून त्यावरून निघणारीं अनुमानेंही पुढें मांडलीं आहेत. त्यामुळें त्या गोष्टींच्या सत्यासत्यतेवर बराच प्रकाश पडतो आणि त्यावरून त्यांत सत्य काय असावें व त्यासंबंधीं असलेल्या प्रचलित समजुती व लोकापवाद कसे. चुकीचे एवढेंच नव्हे तर कांहीं प्रसंगीं अगदींच खोटे कसे आहेत हें ठरविण्यास पुष्कळच मदत होते, यांत शंका

नाहीं. तसेंच महाराष्ट्राच्या त्या काळच्या इतिहासांत होऊन गेलेले राजे, महाराजे, पेशवे, पेशव्यांचे कारभारी, सरदार, मुत्सद्दी व इतर राजकारणी व्यक्ति वगैरेंच्या गुणावगुणांचे, कर्तबगारीचें व त्यांच्या स्वभाववैशिष्ट्याचें ग्रंथकारांनीं ठिकठिकाणी प्रसंगानुसार फारच मार्मिकपणानें वर्णन केलें आहे. त्यापैकीं मुख्य मुख्य कांहीं प्रसंगाचा व प्रसिद्ध व्यक्तिवैशिष्ट्याचा येथें उल्लेख करणें हें या प्रसंगीं युक्तच होणार आहे.

## नानासाहेब पेशवे.

श्री छत्रपती शिवाजीमहाराजांपासून तों पहिल्या बाजीराव पेशव्यांच्या देहावसानापर्यंतच्या महाराष्ट्राच्या इतिहासाचें थोडक्यांत दिग्दर्शन करून नानासाहेबांनाच पेशवेपदावर कसें व कां नेमण्यांत आलें हें ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे ( पान ७ क. १० ). रघोजी भोंसले नागपूरकर यांच्या विरोधाला न जुमानतां छत्रपती शाहुमहाराजांनीं नानासाहेबांना पेशव्याचीं वस्त्रें दिलीं. याला चिमाजीआपाचें छत्रपती शाहुमहाराजांवर असलेलें वजन सर्वस्वी कारणीभूत झालें. असें असतां छत्रपतीकडून दुय्यम पेशव्याचा अधिकार मिळालेल्या सदाशिवरावभाऊकडे,--प्रत्यक्ष चिमाजीआपांच्या मुलाकडे,—नानासाहेबांनीं कसें दुर्लक्ष केलें व त्यामुळेंच पुढें त्यांना पुण्यास आणल्यावर पेशव्यांच्या घरांत गृहकलहाचें बीज कसें उत्पन्न झालें व या कामीं नानासाहेबांची कर्तव्यपराङ्मुखता कशी झाली हें या ग्रंथांत ( पान ९. ते १२ ) स्पष्टपणें दाखविण्यांत आलें आहे. त्याचप्रमाणें छत्रपती शाहुमहाराजांना कोणता मुलगा दत्तक घ्यावा याबद्दलचीं निरनिराळ्या पक्षाचीं कारस्थानें चांगलीं रंगविण्यांत आलेलीं आहेत. राणी सकवारबाई यांच्या तर्फेचा दत्तक होऊं नये व आपण योजिलेलाच वारस छत्रपती शाहुमहाराजांनंतर गादीवर यावा असें नानासाहेबांनीं कारस्थान केलें व तें त्यांनीं नाना तऱ्हेच्या कारवाया करून तडीस नेलें. नानासाहेबांनीं छत्रपतींची सत्ता आपल्या स्वाधीन करून घेण्याकरतां त्यांचेकडून दोन सनदाही मिळविल्या. छत्रपती शाहुमहाराजांचा नानासाहेबांवर अगर त्यांच्या चिटणीसांवर विश्वास नव्हता. या दोन्ही सनदा नानासाहेबांनीं

छत्रपतीकडून सर्वस्वी आपला स्वार्थ साधण्याच्या हेतूनें छत्रपतींच्या भ्रमिष्ट स्थितींत त्यांची फसवणूक करूनच घेतल्या होत्या असें त्या वेळेच्या एकंदर परिस्थितीवरून व खुद्द नानासाहेबांच्या कटांतील व त्यांच्या विश्वासांतील इसम जो महादोबा पुरंदरे यांना लिहिलेल्या पत्रावरून आणि सदर सनदांतील अंतर्गत पुराव्यावरून ग्रंथकारांनी स्पष्टपणें दाखवून दिलें आहे. ( पान २९ ते ३२ ). राणी सकवारबाई यांना सती जाण्यास भाग पाडून रामराजे यांना छत्रपतीचे अधिकार देण्याचें कारस्थान यशस्वी केल्यानंतर त्याच्यावरील राणी ताराबाई यांचें वर्चस्व काढून टाकण्याची कारवाई नानासाहेबांनीं केली. ताराबाई पुण्यास आल्यावेळी नानासाहेबांनीं त्यांना " तुम्हांला राज्यकारभारांतील बहुत कामें मिळतील " असें सांगून रामराजे यांना आपल्या मसलतीप्रमाणें वागविण्याविषयीं त्यांची कबुली घेतली; परंतु त्याप्रमाणें ताराबाईंना राज्यकारभारांतील कोणतेही अधिकार दिले नाहींत. जेव्हां नानासाहेबांनीं छत्रपतीच्या गादीवर रामराजे यांना आणिलें, तेव्हां त्यांनीं रामराजांना ' राजतेजसंपन्न, प्राक्तनवान् ' वगैरे विशेषणांनीं गौरविलें होतें. परंतु पुढें अल्पावधींतच जेव्हां छत्रपतीची सत्ता रामराजे यांच्याकडून काढून घेण्याची मसलत नानासाहेबांनीं सुरू केली, तेव्हां तेच रामराजे ' कर्तृत्वहीन व मिळमिळीत ' असल्याचे त्यांनीं ठरविलें. प्रतिनिधीचे मुतालिक यमाजी शिवदेव यांनीं आपल्या मालकाच्या हितसंरक्षणार्थ सांगोल्यास बंड केल्यावेळीं तें मोडण्याकरतां नानासाहेबांनीं रामराजे याना सदाशिवरावभाऊ व रामचंद्रबाबा शेणवी यांना बरोबर देऊन पाठविलें. यमाजीचें बंड मोडल्यानंतर नानासाहेबांच्या मसलतीप्रमाणें सदाशिवरावभाऊंनी रामराजे यांचेकडून छत्रपतीपदाच्या अधिकाराचा न्यास करवून तो अधिकार पेशव्यांना दिल्याबद्दल राजीनामा घेतला; व त्यांना त्याबद्दल पोटगीदाखल कांहीं मुलुख देण्यांत आला. ग्रंथकारांनी यासंबंधीं पुष्कळ चर्चा करून व उलटसुलट कारणांचा विचार करून " तात्विक दृष्टीनें दोष कोणामध्यें आहे तो निःपक्षपातानें पाहणें असेल तर छत्रपतींची सर्व सत्ता लुबाडण्याच्या आरोपांतून नानासाहेब पेशवे कधींच शिर-

सलामत बाहेर पडूं शकत नाहींत, " ( पान ४५।४६ ) असा निष्कर्ष काढला आहे. त्या वेळेची सर्व परिस्थिति व नानासाहेबांचें धूर्त राजकारस्थान हें लक्षांत घेऊन याची छानणी केल्यास वाचकांना या कामीं सत्य काय असावें हें सहज दिसून येणार आहे. या प्रसंगावर कांहीं इतिहासकारांनीं केलेल्या टीकेप्रमाणें नुसती टीका करून स्वस्थ न बसता नानासाहेबांनीं सदर प्रसंगीं कसें वागणें योग्य होतें हें ग्रंथकारांनीं पुढीलप्रमाणें स्पष्टपणें दाखवून दिलें आहे, यांतच ग्रंथकाराचें वैशिष्ट्य दिसून येतें. " पेशवे आपल्या कर्तव्याला जागले असें इतिहासकारांनीं एकमतानें म्हणावें अशी जर नानासाहेब पेशव्यांनीं इच्छा धरली असती तर त्यांना कोणत्याही प्रसंगांतून योग्य मार्ग काढतां आला असता. सांगोल्याला रामराजांना नेऊन त्यांच्याकडून राजीनामा लिहून न घेतां त्यांना त्यांनीं पुण्यास ताराबाईंचा उपसर्ग न पोंचेल अशा बंदोबस्तानें ठेवावयाचें होतें. मराठी राज्याचें कल्याण छत्रपतीपद कायम ठेवण्यांत होतें. तें लाथाडून देण्यांत नव्हतें खास ! " ( पान ४६ ) छत्रपतीकडून राजीनामा घेण्याच्या नानासाहेबांच्या कारस्थानामुळे मराठी राज्यावर पुढील घोर परिणाम झाल्याचें ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत नमूद केलें आहे, तेंही विचारणीय आहे. " हिंदुपदपादशाहीचें तत्वच उपटून टाकल्यानंतर पुढें सर्वस्वाचा नाश झाला यांत कोणतें नवल ! इतिहासकार मराठीराज्य सन १८१८ मध्यें बुडालें असें समजतात, परंतु जे राज्य छत्रपती शिवाजीमहाराजांनीं इ. स. १६७४ मध्यें स्थापिलें तें तात्विक दृष्टीनें इ. स. १७५० मध्यें सांगोलें मुक्कामीं बुडालें असेंच म्हणणे जास्त खरें आहे. " ( पान ४६ ).

छत्रपती रामराजे यांच्या राजिनाम्यानंतर ताराबाईंनीं आपला सावत्र मुलगा कोल्हापूरचे संभाजीमहाराज यांना छत्रपतीच्या गादीवर आणण्याचा शेवटचा प्रयत्न केला; परंतु तोही नानासाहेबांनीं सिद्धीस जाऊं दिला नाहीं. नानासाहेबांना पेशवेपद दिल्यावेळीं त्यांनीं व 'चिमाजीआपांनीं कोल्हापूरच्या संभाजीमहाराजांना साताराच्या गादीवर त्यांचा हक्क असल्याबद्दल कबुलीकरार लिहून दिला होता. तसेंच छत्रपती शाहुमहाराजांच्या मृत्यूनंतरही सदर

करार ताजा करून दिला होता. या करारांना न जुमानतां संभाजीमहाराजां-बद्दलचें ताराबाईचें कारस्थान त्यांच्यातर्फे असलेल्या सदाशिवरावभाऊंना वश करून घेऊन नानासाहेबांनीं हाणून पाडलें. ग्रंथकारांनीं ताराबाईच्या या कार-स्थानाचें वर्णन करून त्यांचा हेतु फक्त छत्रपतींचें पद व अधिकार छत्रपती शिवाजीमहाराज यांच्या कुळातच चालावा असा होता असें दाखवून त्यांच्या स्वभावाचें वर्णन पुढील शब्दांत केलें आहे:—" ताराबाई या पाण्याची बायको होती कीं, राज्यकारभार करीन तर प्रजाजनांच्या मस्तकीं विराजमान होऊन बसेन नाही तर आजन्म कारागृहवासांत सुकून मरून जाईन ! तेजस्वी व अस्सल क्षात्रवृत्तीच्या माणसांची अशीच रीत असते. " ( पान ५६ ). ताराबाईचें चरित्र लक्षांत घेतां त्यांचें हें स्वभाववर्णन कोणासही सहज पटणारें आहे.

शिंद्यांचे दिवाण रामचंद्रबाबा शेणवी यांना दिवाणगिरीच्या कामावरून काढून टाकण्याचें कारस्थान नानासाहेबांनीं केलें. जयपूरच्या गादीसंबंधी ईश्वरसिंग व माधवसिंग यांमध्यें लढा सुरू झाला होता. ईश्वरसिंगाचा सत्पक्ष असल्यामुळें प्रथम शिंदे व होळकर यांनीं नानासाहेबांच्या सल्लयानेंच त्याला मदत केली. परंतु पुढें माधवसिंगानें पासष्ट लक्ष रुपये देण्याचें कबूल केल्या-मुळें होळकरानीं सत्पक्षाची पर्वा न करता माधवसिंगाचा पक्ष स्वीकारून ईश्वरसिंगावर चढाई केली. रामचंद्रबाबांनीं मूळपासून ईश्वरसिंगाचा सत्पक्ष धरिल्यामुळें त्यांना हें होळकरांचें अन्यायाचे वर्तन खपलें नाहीं. त्यांनीं नाना-साहेबांना पत्र लिहून स्पष्टपणें त्याचा निषेध केला. नानासाहेबांनीं त्यांना जें उत्तर पाठविलें त्यांत त्यांनीं द्रव्यलोभामुळे मल्हारराव होळकरांच्या दुराग्रहालाच उत्तेजन दिल्याचें स्पष्टपणें दिसून येतें. नानासाहेबाना माधवसिंगाकडून दहा लक्ष रुपयांचा नजराणा देण्यांत आल्यामुळें त्यांनीं प्रथम धरलेला ईश्वरसिंगाचा सत्पक्ष सोडून पैशाच्या लोभानें आपलीही पगडी फिरविली व माधवसिंगाला मदत करण्याकरतां प्रसिद्ध नेवाईची स्वारी जातीनिशीं केली. त्यामुळें रज-पुतांचा मराठ्यांच्या दानतीवरचा विश्वास कसा उडाला हें दिसून येतें. नाना-

साहेबांच्या या अन्यायी वर्तनामुळें रामचंद्रबाबा हे शिंद्यांच्या दिवाणगिरीला मुकले व यामुळेंच सन १७६१ च्या पानिपतच्या लढाईंत सर्व महाराष्ट्राला त्याचें प्रायश्चित भोगावें लागलें असें ग्रंथकारांनीं दाखविले आहे. (पान ६२). रामचंद्रबाबा पूर्ण निरपराधी असतांही त्याना दिवाणगिरीवरून काढून टाकलें हा अन्याय झाला असें वाटून सदाशिवरावभाऊंनीं त्यांचे-विषयीं नानासाहेबांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या कामीं त्यांना यश आलें नाहीं. नानासाहेबाच्या या अशा वर्तनामुळेच पेशव्यांच्या गृहकलहाला उत्तेजन मिळालें. नानासाहेबांना या कामीं खरें राजकारण साधतां आले नाहीं. यासंबंधीं ग्रंथकाराचे पुढील उद्गार महत्वाचे आहेत. " केवळ तेवढी वेळ साधून नेणें हें खरें व भरींव राजकारण नाही. त्याला धोरण असेंही कोणी म्हणणार नाही. ज्या राजकारणामुळें पुढील संकटें टळलीं जातील तेंच खरे राजकारण. पण तेवढें धोरण नानासाहेबाना ठेवतां आलें नाहीं. ईश्वरसिंगाच्या बाबतींत ज्याप्रमाणे केवळ तात्पुरत्या फायद्याकडे त्यांनीं लक्ष दिलें, पण कीर्ति व राजकारणाचें वजन त्यांनीं घालवून घेतलें, तोच प्रकार शिंदे व होळकर यांना तात्पुरतें संतुष्ट करण्याकरतां त्यांनीं केला. यामुळे त्यांनीं दूरचा कलह घरात आणून ठेविला. या वेळेपासून पेशव्यांच्या गृहकलहाला तोंड फुटलें " (पान ६२). या कामीं सदा-शिवरावभाऊंनीं रामचंद्रबाबाकडून लाच खाऊन त्यांचा पक्ष धरल्याबद्दल कांहीं इतिहासकारांनीं भाऊंवर केलल्या आरोपांचें ग्रंथकारांनीं निरसन केलें आहे. सदाशिवरावभाऊंना रामचंद्रबाबाकडून नजराणा देण्यांत आला होता ही गोष्ट खरी. परंतु असा नजराणा देण्याचा त्या काळीं दरबारचा रीतिरिवाजच होता. असा नजराणा घेऊन सत्पक्षाची कामगिरी करून त्याला न्याय देवविणें हें सन्मान्यतेचें लक्षण समजत असत. याला लांच खाऊन अन्याय करण्याचे निंद्य स्वरूप येऊं शकत नाहीं, हें नज-राणे दिल्याची कांहीं ऐतिहासिक उदाहरणें देऊन ग्रंथकारांनीं विशद केलें आहे. नानासाहेबांनीं रामचंद्रबाबाना न्याय न दिल्यामुळें सदाशिवराव-

भाऊंनीं त्यांना आपला दिवाण नेमलें. यामुळें दरबारांत पक्षभेद उत्पन्न होऊन घरांतील भाऊबंदकीस उत्तेजन मिळालें व त्यामुळें जे दुष्परिणाम झाले, ते नानासाहेबांनीं या कामीं न्यायबुद्धि जागृत ठेऊन वर्तन केलें असतें, तर त्यांना ते सहज टाळता आले असते असें दाखविण्यांत आलें आहे. ( पा. ६४ क. १९ ).

त्याचप्रमाणें पेशवे व आंग्रे यांचे संबंध कसे आले व आंग्र्यांशीं पेशव्यांनीं विरोध केल्यामुळें राजकारण कसें बिघडत गेलें हें ग्रंथकारांनीं स्पष्टपणें दाखविलें आहे. ( पान ७० क. ११ ) प्रथम छत्रपती शिवाजी महाराजांच्या आरमाराची व त्यावरील अधिकाऱ्यांची माहिती देऊन आंग्र्यांचें घराणें कसें उदयाला आलें याचा त्यांनीं खुलासा केला आहे. आंग्र्यांच्या घराण्यांत कलहानें पेट घेतल्यामुळें त्यांना बाजूला सारून पेशव्यांना आपलें स्वतंत्र आरमार ठेवणें भाग पडलें. पुढें आंग्र्यांचे शत्रू जे इंग्रज त्यांची मदत घेऊन नानासाहेबांनीं तुळाजी आंग्रेसारख्या शूर, पराक्रमी सरदाराचा पराभव करून त्याला सहकुटुंब कैदेत टाकलें. अशा पुरुषाचा समूळ नाश न करता योग्य प्रसंगीं म्हणजे तो संकटात सांपडलेल्या वेळीं त्याला हस्तक्षेनें आपलासा करून घेण्याचे प्रयत्न नानासाहेबांना करतां आले नाहींत. ईशकृपेने तशी संधि प्राप्त झाली असतांही तिचा फायदा नानासाहेबांना घेता आला नाहीं. नानासाहेबांच्या या गैरमुत्सद्दगिरीच्या वर्तनाबद्दल ग्रंथकारांनी पुढील उद्गार काढले आहेत. “ तुळाजी आंग्रे यांचें नांव मराठ्यांच्या इतिहासांत चिरस्मरणीय झालें आहे. त्याच्या सारखे धाडसी व करारी पुरुष विरळा निपजतात. त्यांनी आपल्या हयातींत इंग्रजांना सारखें थरकापात ठेविलें. त्याचा कांटा काढून टाकणें एकट्या इंग्रजांस शक्य नव्हतें. तुळाजीसारखा पराक्रमी मोहरा नानासाहेबांसारख्या मनुष्यस्वभाव जाणणाऱ्या पुरुषानें फुकट घालविला आणि राष्ट्रकार्यांत त्याचा उपयोग करून घेतला नाहीं, ही गोष्ट पेशव्यांच्या कीर्तीस कालिमा लावते.” ( पान ८१ ). “ पेशव्यांना तुळाजीचा कांटा काढावयाचा होता व तो काढण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, यांत कोणतीच वावगी गोष्ट नाहीं. तो

मनुष्यस्वभाव आहे. परंतु एक कांटा काढण्याच्या प्रयत्नांत दुसरा मोठा इंग्रजांचा खिळा पेशव्यांनीं कायमचा ठोकून घेतला हें पेशव्यांच्या मुत्सद्दे-गिरीचें किंवा शहाणपणाचें कृत्य नव्हतें खास!" (पान ८२). इंग्र-जांशीं मैत्री करून व त्यांची मदत घेऊन तुळाजीचा नाश केल्यानें मराठेशाहीचें कधींही न भरून येण्याजोगें नुकसान झालें. नानासाहेबांनीं मराठे-शाही बुडविण्याचें बींजारोपणच केलें यापमाणें नानासाहेबानीं स्वार्थी राजकारणाला उत्तेजन देऊन वेळोंवेळीं गैरमुत्सद्देगिरीचीं जीं कृत्यें केलीं, त्यामुळें मराठेशाहीचेंच नुकसान झालें असें नसून हिंदुपदपादशाहीच्या नाशाचीं मुळें सर्व मराठी राज्यांत पसरविलीं गेलीं असें ग्रंथकारांनीं स्पष्ट-पणें दाखवून दिले आहे. तसेंच नानासाहेबांनीं करवीरचें राज्य स्वतंत्र असल्याबद्दल करवीराधिपती संभाजीमहाराज यांच्याजवळ कबूल करून त्यांच्या मरणानंतर त्यांनींच तें राज्य पेशवाईस जोडण्याच्या उद्देशानें जप्त करण्याकरतां आपले सरदार पाठवून आश्लाघ्य वर्तन केलें. त्यावरूनही नानासाहेबांचें राज्यकारभारांतील धोरण कसें आप्पलपोटेपणाचें होते हें दिसून येतें. नानासाहेबांनीं राजकारणांत वेळोंवेळीं जी आपली मनोवृत्ति दाखविली तिचे वर्णन ग्रंथकारांनीं पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे. "नाना-साहेबांच्या कारकीर्दीचें सूक्ष्म रीतीनें निरीक्षण केलें असता असें दिसून येईल कीं, आपल्यावर आलेलें संकट तेवढ्यापुरतें कसें टळेल व तेवढया-पुरती कशी शांतता होईल, एवढेंच ते पहात असत. भावी कालाचा विचार करून भरींव राजकारण साधण्याची त्यांची मनोवृत्ति नव्हती." (पान ९० क ६). वाचकांनीं नानासाहेबांच्या कारकीर्दींत घडलेल्या राजका-रणाचा समग्र इतिहास डोळ्यांपुढें ठेऊन नानासाहेबांचें वर्तन वेळोंवेळीं कसें कसें घडत आलें हें पाहिल्यास ग्रंथकारांच्या या विधानाचा पडताळा त्यांना सहज घेतां येईल.

## माधवराव पेशवे.

ग्रंथकारांनीं माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीवर ६–७–८–९ ही चार प्रकरणें लिहून चांगलाच प्रकाश पाडला आहे. नानासाहेबांच्या मृत्यू-

नंतर माधवरावांच्या नांवें पेशवाईचीं वस्त्रें सातारच्या छत्रपतींकडून मिळ-विण्यास तीन चार महिने लागले. हीं वस्त्रें छत्रपतींकडून आणावीं कीं नाहीं, याबद्दल राघोबादादा यांचा पक्ष व नाना फडनविस यांचा पक्ष यांच्यामध्यें विरोध उत्पन्न झाला होता. छत्रपतीपदाचें श्रेष्ठत्व मानून त्यांच्याकडून पेशवाईचीं वस्त्रें घेण्याची परंपरा मान्य करावी व त्याप्रमाणें वस्त्रें आणावीं असें राघोबादादांच्या पक्षाचें म्हणणें होतें. नाना फडनविसाचा पक्ष छत्रपतीचें श्रेष्ठत्व व वस्त्रें आणण्याची परंपरा मानण्याच्या विरुद्ध होता. नाना-फडनविसाचे म्हणणें 'आपण पेशव्यांचे नोकर, सातार्‍याच्या महाराजाशीं आपला अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं.' असें होतें. यावरून त्यांच्या पक्षाचें धोरण काय होतें हें स्पष्टपणे दिसून येते. राघोबादादांचा पक्ष त्या वेळीं जोरावर असल्यामुळें नाना फडनविसांच्या पक्षाला पड घ्यावी लागली. यामुळें माधवराव याना वस्त्रें आणण्याचे कामीं तीन चार महि-न्यांचा दिनावधि झाला. माधवराव गादीवर आल्यानंतर आपली आई गोपिकाबाई यांच्या तंत्रानें ते वागूं लागले. गोपिकाबाईचे सूत्रधार नाना हे त्या वेळीं प्रत्यक्ष पुढाकार न घेतां गोपिकाबाईमार्फत माधवरावाकडून कोणतीही कारवाई घडवून आणीत असत. दादासाहेब व सखारामबापू या उभयतांचा परभारें गोपिकाबाईकडून पाणउतारा करवून त्यानीं त्याना कारभारीपणाचे राजीनामे देण्याची पाळी आणली. त्यानीं राजीनामे दिल्यावर गोपिका-बाईनीं माधवरावांकडून आपल्या पक्षाच्या लोकांना कारभारांत घेतलें. माधवराव स्वतः बुद्धिवान होते तरी ते वयानें लहान व राजकारणांत अननु-भवी व नवशिके असल्यानें दुसर्‍याच्या व विशेषतः आपल्या आईच्या कारस्थानाला ते सहज बळी पडत होते. गोपिकाबाईच्या पक्षाचें हें कार-स्थान हाणून पाडण्याकरता दादासाहेबांनीं कंबर बांधली. त्यांनीं औरंगा-बादेस जाऊन मोंगलांची मदत मिळविली व पेशवाईतील कित्येक सरदारांना अनुकूल करून घेऊन पुण्याच्या रोखानें ते लढाईच्या तयारीनें निघाले. माधवराव पेशव्यांच्या सैन्यानेंही त्यांच्याशीं टक्कर देण्याचा प्रयत्न केला.

दादासाहेबांची तयारी व त्यांना मिळालेली मदत पाहून माधवराव घाबरून गेले. उभयतामध्यें घोडनदीची प्रसिद्ध निकराची लढाई झाली. त्यांत पेशव्याचा पूर्ण मोड झाल्यानें माधवरावांना दादासाहेबांस शरण जाणें कसें भाग पडलें याचें ग्रंथकारांनीं सविस्तर वर्णन केलें आहे ( पान १२० क १४ ). याप्रमाणें राघोबादादाकडे पुन्हा पेशवाईचा कारभार आला व माधवरावांनींही दादासाहेब व सखारामबापू याच्याच मताप्रमाणें वागण्याचे कबूल केलें. दादासाहेबांनीं माधवरावाना नजरकैदेंत ठेविलें होतें तें कारस्थानी लोकांच्या कारवाईपासून त्यांचा बचाव करण्याच्या उद्देशानेंच ठेविलें होते, असा ग्रंथकारांनी खुलासा करून पेशवाईचें पद गिळंकृत करण्याचा राघोबादादाचा मुळींच विचार नव्हता हें त्यांनीं या विषयाची मार्मिक व सविस्तर चर्चा करून दाखवून दिलें आहे, तें कोणासही पटण्याजोगेंच आहे. ( पान १२।२३ ).

माधवरावाना जेव्हा पेशव्यांचा अधिकार मिळाला तेव्हा त्यांचा स्वभाव अतिशय तापट व अविचारी होता. त्यांची वागण्याची तऱ्हा केव्हां केव्हां शुद्ध पोरकटपणाची दिसून येई. गंगोबातात्या चंद्रचूड हे सन्मान्य गृहस्थ मल्हारराव होळकराचे दिवाण होते. एका प्रसंगीं पेशवे दरबारात गंगोबातात्यांनीं केलेलें स्पष्ट भाषण माधवरावाना सहन न होऊन भर दरबारात त्यांनीं कांहीं एक विचार न करता आपल्या जागेवरून उठून त्यांच्या तोंडांत मारिली. तसेंच दिनकर महादेव जोशी या नावाचा एक इसम एकदां पेशव्यांच्या पंक्तीस भोजन करीत असतां, त्यानें माधवरावांच्या पोरकटपणासंबंधीं कांहीं उद्गार काढले. ते त्याना सहन न होऊन त्यानीं जेवतांनाच उठून त्याच हातांनीं जोश्याच्या तोंडात मारिल्या. हे प्रसंग देऊन ग्रंथकारांनीं माधवरावाच्या त्या वेळेच्या स्वभावाचें चित्र पुढें मांडिलें आहे. ( पान १२४ क १७ ). माधवरावाच्या अखेरच्या आयुष्यांत या त्यांच्या अविचारी व तापट स्वभावाचें रूपांतर विचारीपणांत व करारीपणांत झाल्याचें आढळून येतें. आपल्या पूर्व कारकीर्दीच्या वेळीं कांही कांहीं प्रसंगीं मानापमानाची इतकी

अविचारी चाड व कदर दाखवणाऱ्या माधवरावांवर वोडनदांच्या लढाई-नंतर केवळ नाइलाजच झाल्यामुळें दादासाहेबाना शरण जाण्याचा प्रसंग ओढवला; परंतु दादासाहेबांनीं मात्र या गोष्टीचा अवास्तव फायदा न घेतां माधवरावाना मोठ्या सन्मानानें व प्रतिष्ठेनेंच वागविलें. याबद्दल डफसाहेबां-सारख्या इतिहासकारांनीं काढलेले उद्गार मुळातूनच वाचावे म्हणजे त्याबद्दल वाचकांची सहज खात्री पटेल. ( पान १३४ कलम ३३ ).

पुढें राघोबादादाच्या व निजामाच्या झटापटी चालल्या. निजाम-अल्लीनें पुण्यावर व पेशव्यांच्या राज्यातील इतर महत्त्वाच्या ठिकाणीं स्वारी करून भयंकर जाळपोळ व लुटालूट केली. दादासाहेबानींही निजामाच्या खुद्द हैदराबाद, बेदर वगैरे महत्वाच्या ठिकाणीं हल्ला चढवून जाळपोळ वगैरे करून त्याचें बरेंच नुकसान केलें. अखेरीस निजामाच्या फौजेला राक्षसभुवन येथे गाठून दादासाहेबानीं जंगी लढाई दिली. या प्रसंगीं दादा-साहेबानीं माधवरावाना आपल्याबरोबर मोहिमेंत घेतलें होतें. परंतु त्यांनीं सोनपतपानपतच्या वेळेचा पूर्वानुभव लक्षात घेऊन माधवरावाना लढाईच्या तोंडाशीं आपल्या बरोबर न घेता दोन कोस मागे छावणीत पंधराशें निव-डक घोडेस्वाराच्या रक्षणाखालीं ठेविलें होते. प्रत्यक्ष लढाई चालू असलेल्या ठिकाणीं दादासाहेबाना शत्रूनें चोहोंबाजूंनी घेरलें आहे ही बातमी समजताच माधवरावानीं आपले संरक्षण करणाऱ्या पंधराशें स्वारास ‘ आमच्याबरोबर तुम्हीं मरावयास तयार आहात काय ? ’ असा सवाल केला. त्यानींही ‘ जिकडे खाविंद तिकडे आम्हीं, ’ असे छातीठोक उत्तर दिलें. तेव्हां त्या स्वारासह माधवराव तातडीनें रणांगणाकडे निघाले. वाटेंत मल्हारराव होळकर परतून जात असलेले त्याना भेटले. त्यांनीं माधवरावांना ‘ माघारें चला, पुण्याचे राज्य करूं ’ असें सांगून परतविण्याचा प्रयत्न केला. तेव्हां माधवरावानीं “ काका, भाऊसाहेबांना पूर्वीं ( पानिपतच्या लढाईत ) तुम्हीं बुडविलें असें मी ऐकत होतों तें आज खरें झालें. ” असें त्यांना मर्मभेदक उत्तर दिलें. त्यामुळें मल्हारराव पुन्हां लढाईस प्रवृत्त झाले. नंतर

प्रत्यक्ष रणांगणावर ज्या ठिकाणीं शत्रूनें दादासाहेबांना घेरलें होतें तेथें जाऊन मोठ्या शौर्यानें माधवरावांनीं शत्रूशीं सामना दिला. त्या प्रसंगीं निजामाचा मुख्य दिवाण विठ्ठल सुंदर हा गोळी लागून मरण पावल्यानें निजामाच्या सैन्याची दाणादाण होऊन त्याचा पूर्ण पराभव झाला. माधवरावांनीं या प्रसंगीं दाखविलेली आपुलकीची वागणूक, धैर्य व शौर्य हीं पाहून दादासाहेबांना अतिशय आनंद झाला व त्यांचे हे गुण पाहून पेशवाईचीं सर्व अधिकारसूत्रें पूर्ववत् त्यांनीं माधवरावांच्या हातीं दिलीं. या प्रसंगावरून माधवरावांनीं जरी प्रसंगोपात्त अविचारी तापटपणा दाखविला असला तरी ते जात्या प्रेमळ स्वभावाचे व शूर असून दीर्घद्वेषी नव्हते आणि पेशवे कुळाचा अभिमान त्यांच्या रोमरोमांत भिनलेला होता असेंच दिसून येतें. या प्रसंगाचें वर्णन ग्रंथकारांनीं यथोचित सविस्तर केलें आहे. ( पान १२९।३० कलम २६।२७ ).

याप्रमाणें पेशवाईचे अधिकार पुनः हातीं आल्यानंतर माधवरावांनीं दादासाहेबांच्या पक्षाच्या नोकर लोकांना काढून टाकून त्या ठिकाणीं आपल्या पक्षाचे लोक नेमिले. त्यांनीं दादासाहेबांच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां चिंतो विठ्ठल रायरीकर फडनविस याना काढून टाकून त्यांचे जागीं नानांची नेमणूक केली. नानांस नेमणें झाल्यास त्यानी त्यांस दरसाल फडनविशीचे कामाबद्दल फक्त एक लक्ष रुपये द्यावे, जास्त देऊं नये असें दादासाहेबांनीं सुचविलें होतें. परतु हीही सूचना माधवरावांनीं मान्य केली नाहीं. यावरून माधवरावांना अद्यापि राज्याचें हितानहित समजण्याची पात्रता आली नव्हती किंवा दुराग्रहामुळें त्यांनीं त्याकडे मुद्दाम लक्ष दिलें नाहीं अगर ते नानांच्या पक्षाच्या तावडींत पूर्णपणें सांपडले होते त्यामुळें त्यांनीं दादासाहेबांच्या म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं अशीं तीन अनुमानें निघनात. यांतील तिसरें अनुमानच खरें असल्याचें मागें व पुढें घडलेल्या सर्व हकीकतीवरून दिसून येतें.

पुढें माधवराव पेशवे हे कर्नाटकच्या स्वारीवर गेले असतां आजारी पडले. त्यामुळें ही हैदरवरील महत्वाची मोहीम कोणाकडे सोंपवावी याची

त्यांना काळजी पडली. अशा स्थितींत त्यांची धर्मनिष्ठ साध्वी स्त्री रमाबाई यांनीं दिलेल्या पोक्त सल्ल्याप्रमाणें माधवरावांनीं दादासाहेबास नाशकाला पत्र पाठवून सविस्तर कळविलें. या वेळीं दादासाहेब माधवरावांच्या असमंजस वर्तनामुळें रागावून नाशकाला गेले होते. तरी माधवरावांचें पत्र पहातांच त्यांचें अंतःकरण कळवळून ते अत्यंत तांतडीनें निघून माधवरावांना येऊन भेटले. पुढील मोहिमेची सर्व जबाबदारी त्यांनीं आपल्या अंगावर घेतली व ती यशस्वी रीतीनें त्यांनीं पार पाडली. यावरून प्रसंगविशेषीं जरी या चुलत्यापुतण्यामध्यें कांहीं कारणानीं वेबनाव होत असे तरी उभयतांमध्ये परस्पर अंतःकरणाचा जिव्हाळा व थोर मनोवृत्ति कायम असल्याचें दिसून येतें. याबद्दलची सर्व तपशीलवार हकीकत ग्रंथकारांनीं सविस्तरपणें पुढे मांडलेली आहे. ( पान १३९।४० ).

या लढाईंत हैदरचा पराभव होऊन तो दादासाहेबांना शरण आल्यामुळें उभयतात तह झाला. दादासाहेबानी या तहांत थोर मनानें हैदरवर त्यांनीं केलेल्या आगळिकींना अनुसरूनच सौम्य अटी घातल्या. डोईजड अशा अटी घातल्या नाहीत. ही संधि साधून विघ्नसंतोषी लोकांनीं पुनः माधवरावांचें मन दादासाहेबाविषयीं दूषित केलें. या मोहिमेंत पहिल्यापासून माधवरावाबरोबर पेशव्यांच्या पदरचे विठ्ठल शिवदेव विंचुरकर हे वृद्ध सरदार होते. राघोबादादा मोहिमेवर येण्यापूर्वीं एके दिवशीं विशेष कारण नसतां त्यांच्या फौजेतील कांहीं शिपायांची मारामारी झाली. त्यात विठ्ठल शिवदेव यांचा कांहीं संबंध नव्हता. असें असतां विठ्ठल शिवदेव हे दादासाहेबांच्या पक्षाचे सरदार आहेत म्हणून त्यांचें पारिपत्य करण्याकरतां त्यांचा खास गोट लुटण्याचा आपल्या फौजेला माधवरावांनीं हुकूम दिला. विठ्ठल शिवदेव हाही शूर व खानदानी सरदार असल्यानें ही बातमी समजतांच त्याला हा अन्याय सहन न होऊन तो पेशव्यांच्या फौजेबरोबर लढाई देण्यास तयार झाला. या कामीं मल्हारराव होळकर यांनीं मध्यस्थी करून माधवरावांचा व त्यांचा समेट केला. विठ्ठल शिवदेव यांनीं

ही हकीकत दादासाहेब यांस नाशकाला पत्र पाठवून कळविली. त्या वेळीं दादासाहेबांनीं आपला इसम म्हणून विठ्ठल शिवदेव यास माधवरावां-विरुद्ध चिथावणी अगर उठावणी दिली नाहीं, एवढेंच नव्हे तर त्यांनीं त्याला " असे कजियासाठीं दुतर्फा सांड असावी " वगैरे उपदेशपर मज-कुराचें उत्तर पाठवून त्याची समजूत केली. या प्रसंगावरून दादासाहे-बांच्या व माधवरावांच्या मनोधर्मांत जात्याच कसा फरक होता हें स्पष्टपणें दिसून येतें. ( पान १४१।४२।४३ ).

माधवरावांच्या कारकीर्दीत एकदां पुरंदरच्या किल्ल्यासंबंधीं वाद उत्पन्न झाला. पुरंदरचा किल्ला दादासाहेबांनीं आबा पुरंदरे यांना इ. स. १७६२ मध्यें जहागीर म्हणून दिला होता. नंतर माधवरावांकडे अधिकार आल्या-नंतर आबा पुरंदरे हे कारभारांतून जाऊन त्यांच्या जागीं त्रिंबकरावमामा हे कारभारी झाले. तेव्हां गोपिकाबाईंना पुरंदर किल्ल्याची आवड असल्यामुळें तो किल्ला आबा पुरंदरे याचेकडे न राहतां त्रिंबकरावमामांना तो मिळावा अशी त्यांची धडपड सुरू झाली. या किल्ल्यावर कोळ्यांनीं बंड केलें. त्याचा न्याय करण्याचें काम माधवरावांनीं दादासाहेबांकडे सोंपविलें. कोळ्यांच्या तक्रारी ऐकून घेऊन दादासाहेबांनीं तो किल्ला आबा पुरंदरे यांस न देतां तो सरकारांत रहावा असा न्याय दिला. तो गोपिकाबाई व त्रिंबकरावमामा यांच्या मनाविरुद्ध झाल्यानें त्यांनीं त्यावर हुजुरांत माधवरावांकडे दाद मागि-तली. माधवरावांनीं या प्रसंगीं न्यायनिष्ठुरपणानें कोणाचीही पर्वा न करतां प्रत्यक्ष आपल्या आईच्या इच्छेविरुद्ध दादासाहेबांनींच दिलेल्या न्यायाला मान्यता दिली. माधवरावांची न्यायबुद्धि या कामीं कसोटीला लागून ते त्या कसोटीला उतरले असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्यक्ष आपल्या मुलाकडून असा अनपेक्षित अखेरचा न्याय मिळाल्यामुळें आपला अपमान झाला असें गोपिकाबाईंना वाटून त्यांनीं कायमचा गंगापुरीचा वास पत्करला व त्यामुळेंच त्यांनीं पुनः कधींही पुण्याचें दर्शन घेतलें नाहीं असें

ग्रंथकारांनीं अनुमान काढलें आहे. त्याची सयुक्तिकता यासंबंधींची सर्व हकीकत मुळांतच वाचल्यानें वाचकांना पटणार आहे. (पान १४५ ते १५७).

माधवराव न्यायाचे कामीं पक्षभेदाला बळी पडत असत हें शिंद्यांच्या गादीच्या वारसा हक्काचा प्रश्न उपस्थित झाला तेव्हां दिसून आलें. पानिपतच्या लढाईनंतर शिंद्यांचा औरस वारस नसल्यानें त्या गादीचा वारसा कोणाकडे द्यावा याची वाटाघाट पेशवे दरबारांत सुरूं झाली. शिंद्यांचे नजीकचे भाऊबंद मानाजीराव शिंदे हे आपला हक्क दाखवूं लागले. तसेंच राणोजी शिंद्यांचे दासीपुत्र महादजी शिंदे यांनींही आपल्याला वारसा मिळावा म्हणून खटपट चालविली. न्यायतः अस्सल घराण्यांतील वंशजांकडे सदर गादी चालणें इष्ट असतां व स्वतः माधवरावांच्या मनाला हीही गोष्ट पसंत असतां नाना फडनविसांनीं महादजींची बाजू पत्करल्यामुळें नानांच्या राजकारणी डावाला माधवराव बळी पडले व त्यांनीं नानांच्या सांगीप्रमाणें महादजी शिंदे यांनाच शिंद्यांच्या गादीचे वारस म्हणून कबूल केलें. दादासाहेबाचा ओढा अस्सल वंशजांकडे--मानाजीरावांकडे होता. दादासाहेबाकडे पेशवाईच्या कारभाराचा जेव्हा अधिकार होता तेव्हां त्यांनीं मानाजीचाच हक्क कबूल करून शिंद्यांच्या गादीचे त्यांना वारसदार केलें होतें. पुढें माधवरावांकडे पेशव्याचे अधिकार येतांच त्यांनीं नानांचे मसलतीप्रमाणें महादजीचा हक्क कबूल करून त्याची शिंद्यांचे गादीवर योजना केली. हा नानांच्या पक्षानें दादासाहेबांच्या पक्षावर न्यायान्यायाचा अगर युक्तायुक्ततेचा विचार बाजूला ठेऊन मिळविलेला विजयच होय ! नानांना आपल्या कारस्थानी कारवाईनें माधवरावांना आपल्या पक्षाकडे ओढतां आलें म्हणूनच त्यांना शिंद्यांच्या वारसा हक्काची अशी उलथापालथ करतां आली. तसेंच पुढें होळकरांच्या गादीला अहिल्याबाईनीं कोणाला दत्तक घ्यावा याचा विचार चालला असतां नानांच्या पक्षानें विशेषतः महादजींच्या कारस्थानावरून अहिल्याबाईची दादासाहेबांविषयीं दिशाभूल होण्याजोगी भलतीच समजूत करून देऊन, त्यांच्याकडून दादासाहेबांच्या व गंगोबातात्यांच्या

सल्ल्याविरुद्ध आपल्या घराण्यांतील मुलाला दत्तक न घेतां, आप्त नसलेल्या तुकोजीरावांनाच दत्तक घेवविलें. माधवरावांनींही नानांच्या मसलतीप्रमाणें या दत्तकाला आपली मान्यता दिली. याप्रमाणें न्याय कोणता व अन्याय कोणता याचा विचार न करतां व लौकिकदृष्ट्या योग्य कोणतें व अयोग्य कोणतें याचीही पर्वा न करतां माधवरावांनीं नानांच्या पक्षाला स्वतःस वाहून घेऊन कांहीं प्रसंगीं कसें आचरण केलें हें ग्रंथकारांनीं आठव्या प्रकरणांत सविस्तरपणें दाखविलें आहे.

माधवरावांकडे पेशवाईचे सर्व अधिकार आले तरी त्यांचे व राघोबा-दादांचे संबंध चांगले राहिल्याचें दिसून येत नाहीं. मुंबईच्या गव्हर्नरातर्फे पेशव्यांची भेट घेऊन मॉस्टिनसाहेबांनीं सन १७६७ च्या डिसेंबर महिन्यांत गव्हर्नरसाहेबांना लिहिलेल्या पत्रांत " गोपिकाबाईच्या चिथावणीवरून राघो-बाला समक्ष भेटींत कैद करण्याचा माधवरावांचा विचार होता. पण सखाराम-बापूंच्या मध्यस्थीनें चुलतापुतण्याचा तूर्तातूर्त तह ठरला " असा उल्लेख आहे. या तहानंतरच दादासाहेब आनंदवल्लीस गेले. यावरून आपल्या आईच्या चिथावणीनें दादासाहेबाविषयीं माधवरावांची बुद्धि चळली होती असें दिसून येतें. त्याचप्रमाणें मॉस्टिनसाहेबाचा मदतगार ब्रोमसाहेब हा नाशका-जवळ इंद्रगड येथें राघोबादादाचे भेटीस गेलेवेळीं राघोबादादांनीं त्याच्याजवळ पुढील उद्गार काढले; " नानासाहेब पेशव्याच्या मरणोत्तर माधवरावाला सर्वस्वी मी मदत केली, त्याचा मानमरातब राखला, मुलुखगिऱ्या व स्वाऱ्या केल्या, माधवरावास पोटच्या मुलाप्रमाणें संभाळलें, असें असतां माधवराव कृतघ्न बनला. माझा अपमान करूं लागला व अखेर मला कैद करण्यापर्यंत पाळी आली " (पान १८२ क ५). माधवरावासंबंधीं काढलेल्या या दादासाहेबांच्या उद्गारांवरून नानांच्या स्वार्थी कारस्थानाला माधवराव कसे बळी पडले होते व ते दादासाहेबासंबंधीं कसें अन्यायाचें आचरण करीत होते हें दिसून येतें. नानांकडून व त्यांच्या पक्षाकडून माधवरावांच्या मदतीनें दादासाहेबांची कशी दुःखदायक केविलवाणी स्थिती करून टाकण्यांत आली होती याचें ग्रंथकारांनीं हृदयद्रावक सविस्तर वर्णन केलें आहे. (पान १८३).

पुढें पुण्यास तुकोजीराव होळकर यांना वस्त्रें देण्याच्या समारंभास दादासाहेब आल्यावेळीं पुनः गोपिकाबाईच्या व नानांच्या बदसल्ल्याप्रमाणें व कपटकारस्थानाप्रमाणें माधवराव राघोबादादांना कैद करण्यास तयार झाले. हें समजतांच दादासाहेब रातोरात नाशकास निघून गेले. वाटेंत त्यांना तुकोजी-राव होळकर इंदुराला परत जातांना भेटले. त्यांच्याबरोबर दादासाहेब जात होते. माधवरावांना फितुरीचा संशय येऊन त्यांनीं तुकोजीला पत्र लिहिलें. तुकोजीनें आपण फितुर झालों नाहीं अशी उत्तरीं माधवरावांची खातरजमा करून "आमच्यावर स्वामींनीं चाल करून यावें. आपण आलांत असें कळ-तांच राघोबास लुटून घेतों" असें कळविलें. त्याप्रमाणें माधवराव सैन्यासह त्यांच्या मागोमाग नाशिकाला गेले. तेथें तुकोजीनें विश्वासघातानें दादासाहे-बांच्या सैन्यावर तुटून पडून त्यांचा नाश केला व त्यांना लुटलें. त्या प्रसंगीं दादासाहेब घोड्यावरून पळून जाऊन धोडपच्या किल्ल्यांत गेले. तेथील किल्ले-दारानें त्यांना माधवरावांच्या स्वाधीन केलें. माधवरावांनीं त्यांना कैद करून पुण्यास आणून शनिवारवाड्यांत कैदेंत ठेविलें. हें तुकोजीच्या विश्वासघाताचें कृत्य होळकराचे दिवाण गंगोबातात्या यांना आवडलें नाहीं. त्यांनीं आपली दिवाणगिरीची नोकरी सोडली व संन्यास—आश्रम घेऊन ते फिरूं लागले. माधवरावांनीं त्यांचेंही पारिपत्य करण्याकरतां त्यांना हुजऱ्यांकडून कपटानें पकडून आणिलें व त्यांनाही मरेपर्यंत तुरुंगांत डांबून टाकलें. यावरून माधवराव पक्षांधतेनें नैतिक दृष्ट्या कसे घसरत चालले होते हें दिसून येतें. ( पान १८४ ते १८६ ).

माधवरावांच्या कैदेंत दादासाहेब चार वर्षें होते. ते कैदेंत असतांना त्यांना नानांनीं व माधवरावांनीं फार हीनदीन स्थितींत ठेविलें. दादासाहेबांनीं माधवरावांना कैदेंत ठेविलें होतें त्या वेळेची माधवरावांची स्थिति व या वेळीं माधवरावांनीं दादासाहेबांना कैदेंत ठेविलें त्या वेळेची दादासाहेबांची स्थिति याची तुलना ग्रंथकारांनीं करून त्या उभयतांच्या मनोवृत्ति व राजकारण कसें भिन्न होतें हें दाखविलें आहे. ( पान १८८ कलम ११ ). कैदेंत असतांना

दादासाहेबांवरील बंदोबस्त फार कडक असे. त्यामुळें त्यांचें वर्तमान त्यांच्या हितचिंतकांना अगदींच समजत नसे. अशा स्थितींत एकदां त्यांचें वर्तमान समजून घेण्याच्या उद्देशानें सखारामबापूंनीं त्यांना एक चिठ्ठी आपल्या कुणबिणीकडून दादासाहेबांच्या कुणबिणीला देण्याकरतां पाठविल्याचें उघडकीस आलें. माधवरावांनीं त्याबद्दल सखारामबापूंना बोलावून " आजचा अपराध क्षमा केला आहे, फिरून कांही आढळलें असतां क्षमा होणार नाहीं, फिरून असे ढंग करूं नका, '' अशी खरमरीत ताकीद दिली. यावरून दादासाहेबांच्या कैदखान्याभोंवतीं नानांच्या हेराचें जाळें कसें पसरलेलें होतें हें दिसून येईल. ( पान १९१ ). राघोबादादाबरोबर आनंदीबाई याही अशाच सक्त कैदेंत होत्या. त्याचप्रमाणें सदाशिवरावभाऊ यांनाही तोतया ठरवून अशाच सक्त कैदेंत त्यांना डोंगरी किल्ल्यावर माधवरावांनीं नेऊन ठेविलें होतें. त्यांचें दर्शनही पार्वतीबाईंना त्यांनीं होऊं दिलें नाहीं. याची सर्व जबाबदारी माधवराव पेशव्यांवरच येते.

दादासाहेबांना कैदेंत ठेवल्यावर माधवरावांनीं हैदरवर स्वारी करून त्याचा पराभव केला व आपल्या इच्छेप्रमाणें त्याच्याशीं तह केला. तसेंच उत्तर हिंदुस्थानांतही त्यानीं ठिकठिकाणीं आपला अंमल बसवून पानिपतच्या लढाईंत गेलेली पेशव्यांची इभ्रत पुनः प्रस्थापित केली. यावरून माधवरावांच्या अंगीं जात्याच असलेलें शौर्य व पाणीदारपणा प्रत्ययाला येतो. माधवरावांच्या कारकीर्दीतच रामशास्त्री प्रभुणे जे पेशव्यांकडे शागीर्द होते ते शागिर्दीच्या पेशावरून पेशवाईंतील मुख्य न्यायासनावर कसे विराजमान झाले, याचीही हकीकत ग्रंथकारांनीं सविस्तर दिली आहे. ( पान १९१।९२ ). यावरून माधवरावांच्या अंगीं असलेलें गुणग्राहकत्व दिसून येतें.

पुढें माधवरावांनीं पुनः हैदरवर स्वारी करण्याकरतां कर्नाटकांत दौरा काढल्यावेळीं त्यांची प्रकृति बिघडली व त्यांना पुण्यास परत यावें लागलें. त्यांना राजयक्ष्म्याचा ( क्षयाचा ) विकार जडल्याचें वैद्यांनीं निदान ठरविलें. त्यानंतर ते थेऊरास जाऊन आपल्या इष्टदैवताच्या—श्रीगणपतीच्या- संनिध

आराधना करीत राहिले. औषधोपचाराचा अगर दैवी उपचारांचा गुण न येतां त्यांचें प्रकृतिमान जास्त जास्तच खालावत चाललें. याबद्दलची साद्यंत हकीकत ग्रंथकारांनीं दिली आहे. ती मुळांतच वाचल्यानें समाधान होईल. ( पान १९४।९५ ). माधवरावांना या वेळीं दादासाहेबांस कैदेंत ठेऊन आपण अन्याय केला याची तीव्र जाणीव झाल्यामुळें त्यानीं त्यांची सुटका करून त्यांना थेऊरास आणण्याची आज्ञा केली. तसेंच त्यांनीं सर्व कारभारी व सरदार वगैरे लोकांना बोलावून आणिलें व नानांनीं व हरिपंत फडके यांनीं विनंति केल्यावरून त्यांनीं आपल्या पुढील तीन अतृप्त इच्छा बोलून दाखविल्या. १ गिलचे व हैदर यांचें पारिपत्य मनाप्रमाणे झालें नाहीं तें करणें. २ नारायणराव 'बाळ' आहेत त्यांचे संगोपनाची हमी देणें. व ३ आपल्याला झालेल्या कर्जाची फेड करणें. नानांनीं ह्या तीनही इच्छा पूर्ण करण्याची माधवरावांना हमी दिली. तथापि माधवरावांनीं त्यांच्याकडे फक्त तिसरी इच्छा पूर्ण करण्याची म्हणजे आपलें कर्ज फेडण्याचीच जोखीम सोंपविली. नानांनीं रामचंद्रपंत नाईक परांजपे याना सावकार लोकाना त्याच्या नांवचीं खतें लिहून द्यावयास लावून श्रीमंतांचीं खतें सोडवून आणून त्यांना दिलीं व त्यांना ऋणमुक्त केलें. एकाचें लोढणें परस्पर दुसऱ्याच्या गळयांत अडकविण्याचा नानांचा हा डाव माधवरावांनीं ओळखला. त्यांनी रामचंद्रपंत नाईकांचा या कामगिरीबद्दल पालखीचीं वस्त्रें देऊन सन्मान केला. पुढें दादासाहेब कैदेंतून मुक्त होऊन माधवराव यांना थेऊरास येऊन भेटले. त्यांना माधवरावांची स्थिति पाहून फार फार दुःख झालें. माधवरावांनीं त्यांना वरील पहिल्या दोन आपल्या इच्छा तृप्त करण्याची विनंति केली. दादासाहेबांनी त्या पूर्ण करण्याचें कबूल केलें. " नारायणाला बिलकुल अंतर देणार नाहीं, तें मूल माझें आहे. तुझ्या अतृप्त इच्छा मी तृप्त करीन " असें म्हणून दादासाहेबांनीं देवांच्या पंचायतनांतील बाण उचलून माधवरावांच्या हातीं दिला. दादासाहेबांनीं दिलेल्या या वचनामुळें माधवरावाचें कसें समाधान झालें, ही सर्व हकीकत देऊन माधवरावांनीं दादासाहेबांना पुढील शब्दांत विनंति केल्याचें ग्रंथकारांनीं वर्णन केलें आहे.

" तुम्ही माझे पश्चात् नारायणराव यास गादीवर बसवावें व तुमच्या मनाला येईल त्याप्रमाणें राज्यकारभार करावा. मनात कोणत्याच प्रकारें अढी ठेऊं नये. सर्व तुमचें आहे असे समजून नारायणरावावर दृष्टि ठेऊन राज्य चालवावें. तुम्ही आता नानासाहेबाच्या जागीं आहांत. नारायणराव बाळ आहेत. त्याना रक्षावें. " ( पान १९८।९९ ). दादासाहेबांच्या वचनाची माधवरावांना किंमत ठाऊक असल्याने त्याना त्यापासून समाधान वाटणें साहजिक आहे. माधवरावाचें स्वभाववर्णन ग्रंथकारांनीं पुढीलप्रमाणें केले आहे. " माधवराव पेशवे हे शहाणे व मुत्सद्दी होते असा त्यांचा नावलौकिक होता. त्याचप्रमाणें ते तापट व उतावळे होते असेंही त्याचें स्वभाववर्णन आहे. आपणाला लोकानीं शूर म्हणावें, आपली कीर्ति वाढावी, आपणाला मुत्सद्दी समजून लोकावर आपली छाप बसावी असें त्याना वाटत असे. " ( पान २०० ). पण स्वार्थाकरतां त्यांना आपणाला पुढें आणून घ्यावें लागले. ग्रंथकारानीं माधवरावांच्या करारी स्वभावाबद्दल शिंद्याच्या बाखरींतील एक प्रसंग देऊन बराच प्रकाश पाडला आहे. माधवरावांनी नारायणरावांची लक्षणे ओळखून त्यांच्या संबंधी एका प्रसंगीं " याचे कपाळी राज्य नाहीं " असे उद्गार काढले. याबद्दल ग्रंथकारानीं पुढील अनुमान काढले आहे. " नारायणरावाच्या अंगी राजाला जे गुण पाहिजेत ते नाहींत, राज्य सांभाळण्याची अक्कल, दूरदर्शीपणा व समंजसपणा अंगीं नाहीं. सतरा वर्षे झालीं तरी नारायणराव असाच ढ राहिला, अगदीं हलक्या लोकाबरोबर स्नेह, हुजरे लोकांत खेळणे बागडणे, अविचारानें वाटेल तें करणें, दरबारात येण्याचा कंटाळा करणे, वगैरे सर्व लक्षणें राज्यपदाला पात्र नसलेली नारायणराव यांच्या अंगी आहेत, हें पाहून व अनुभव घेऊनच माधवरावांनी हे उद्गार काढले होते. ' ( पान २०९।१० ).

माधवरावांनीं दादासाहेबांसंबंधीं जे अन्याय केले होते त्यांचें त्यांना अखेरीस स्मरण होऊन त्याचें परिमार्जन त्यानीं यथायोग्य केलें. त्यांना नानांच्या पक्षाचा अनुभव होता. व दादासाहेबांच्या आपुलकीचाही अनुभव होता. त्यांनीं नानांकडून कधींही पेशव्यांच्या राज्याचें हित होणार नाहीं हें पूर्ण

ओळखून दादासाहेबांकडेच अखेरीस राज्याचा कारभार व बाळ नारायण यांचा सांभाळ सोंपविला. कोणाची भीडमुर्वत न धरतां ज्या योगानें आपल्या घराण्याचें हित होईल असें त्यांना वाटलें ती ही अखेरची गोष्ट त्यांनीं केली—त्यांना करण्याची सुबुद्धि झाली. अंतकाळीं जरूर त्या गोष्टींची निरवानिरव मनुष्यस्वभावाची योग्यता पूर्णपणें ओळखूनच करावी लागते. माधवरावांनीं अखेरीस कां होईना तो योग साधला त्यामुळें त्यांनी पूर्वी कांहीं अविचाराची कृत्यें केली असती तरी त्यानीं **अखेरी** चागलीच साधली असेंच कोणीही ह्मणेल.

## नारायणराव पेशवे.

माधवरावांनंतर पेशव्यांच्या गादीवर नारायणराव आले. ग्रंथकारांनीं याच्या कारकीर्दीचें सविस्तर वर्णन करणें साहजिक आहे. नारायणरावांचा मृत्यु खरोखर कसा घडून आला हा ग्रंथाचा मुख्य प्रतिपाद्य विषय असल्यानें त्यासंबंधींची सर्व हकीकत निरनिराळ्या ऐतिहासिक ग्रंथांच्या आधारासह देण्यात आली आहे. नारायणरावाच्या मृत्यूची हकीकत सविस्तर दिल्यावर ग्रंथाचें प्रयोजनच संपलें व ग्रंथकारानी तेथेंच ग्रंथ पुरा कां केला नाहीं असें कोणासही वाटेल. या नारायणरावाच्या मृत्यूच्या पूर्वीचा व नंतरचा समग्र इतिहास देण्याचें कारण पूर्वी दिलेच आहे. पूर्वीचा व नंतरचा सर्व साद्यंत इतिहास लक्षात घेऊनच या मृत्यूच्या घटनेची चिकित्सा केल्यास सत्य प्रकार दिसून येणार आहे असें ग्रंथकाराचें म्हणणें आहे व पुढील पेशवाईचा इतिहासही ग्रंथकारानी या ग्रंथात त्याच उद्देशानें दिलेला आहे.

माधवरावानी नारायणरावाना दादासाहेबाच्या हातीं सोंपविले होते. त्याप्रमाणें नारायणरावाना दादासाहेबानी माधवरावाच्या मृत्यूनंतर पुण्यास आणल्यावर ते दोघे प्रेमानें वागूं लागले. पुढें दादासाहेब, नारायणराव व इतर कांहीं मंडळी याना बरोबर घेऊन, छत्रपतीकडून नारायणरावांच्या नांवें पेशवाईचीं वस्त्रें मिळविण्याकरतां सातार्‍याला गेले. त्या वेळीं छत्रपती राजाराम महाराज यांना नारायणरावांची वागणूक उद्धटपणाची असल्याचें दिसून आल्यावरून त्यांनीं राघोबादादांना तुह्मीच पेशवाईचीं वस्त्रें घ्यावीं असें सुचविलें.

त्यावर दादासाहेबांनीं नारायणरावांनाच वस्त्रें देण्याबद्दल विनंति केल्यावरून छत्रपतींनीं नारायणरावांना तीं वस्त्रें दिलीं.

नारायणरावांच्या वागणुकीविषयीं व स्वभावाविषयीं माधवरावांनीं स्वतःच्या अनुभवावरून कांहीं आडाखे बसविले होते. ते ग्रंथकारांनीं योग्य ठिकाणीं दिलेच आहेत. नारायणरावाचा स्वभाव भित्राही होता. एकदां हत्तीची टक्कर पाहण्यास माधवराव व नारायणराव गेले होते. टक्कर चालू असतां एक हत्ती लढत सोडून मागें फिरून पळूं लागला. तेव्हां नारायणराव घाबरले व उठून पळूं लागले असतां माधवरावांनीं त्यांना धरून बसविलें. पळूं दिलें नाहीं. माधवराव तेव्हां त्यांना म्हणाले " तुह्मी असे पळाला तर भावी इतिहासकार तुमच्याबद्दल काय लिहून ठेवतील ! " ग्रथकारांनीं ही हकीकत देऊन या गोष्टीवरून आपलीं नारायणरावांविषयींचीं अनुमानें दिलीं आहेत. ( पान २१० ). शिवाय त्यांनीं नारायणरावांच्या स्वभावाचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे: " नारायणरावांचा स्वभाव संशयी, उतावळा व उद्धट असून, वृत्ति क्षणभंगुर होती. त्यांचे कान हलके होते त्यांच्या नेहमींच्या वागणुकींत सुद्धां उग्रपणा फार होता. भारदस्तपणा बिलकुल नव्हता. " ( पान २१५ कलम ५ ). नारायणरावांच्या या स्वभाववर्णनावरून त्यांच्या एकंदर चरित्रावर चांगलाच प्रकाश पडतो. नारायणरावांच्या अंगीं माधवरावांच्या अंगचे कांहीं दुर्गुण —नोकरांसंबंधीं अनवश्यक कडकपणा वगैरे—आणल्याचें दिसतें. त्यांना माधवरावाचे सद्गुण मात्र आपल्या अंगीं आणता आले नाहींत असें दिसून येतें.

नारायणराव व दादासाहेब एकोप्यानें व प्रेमानें वागत असतां दादासाहेबांची मुलगी दुर्गाताई हिचा विवाह नारायणरावांनीं पुढाकार घेऊन पुण्यास मोठ्या थाटानें केला. नारायणरावांना सख्खी बहीण नसल्यानें दुर्गाताईलाच सख्खी बहीण मानून या कामीं त्यांनीं स्वतः जातीनें बरेच परिश्रम केले. यामुळें दादासाहेब व नारायणराव यांमधील प्रेमसंबंध दुणावणें साहजिक होतें. परंतु ही परिस्थिति नाना फडनविस यांना व त्यांच्या पक्षांतील कांहीं कारस्थानी लोकांना असह्य झाली. त्यांनीं कारस्थान करून नारायणरावांचें प्रेम-

पात्र बाबा बर्वे यांजकडून नारायणरावांचें मन दादासाहेबांविषयीं कलुषित केलें व दादासाहेबांच्या हैदरवरील मोहिमेच्या योजनेस नारायणरावांकडून भर दरबारांत नकार देवविला. याच संधीस गोपिकाबाईनींही नारायणराव गंगापुरास त्यांच्या भेटीस गेल्या वेळीं पर्यायानें त्यांना " कांहीं कीर्त वडिलांपाठिमागें कराल कीं, चुलत्यामागें पोट भरून रहाल ! " असा टोमणा मारून दादासाहेबांविरुद्ध स्वतंत्रपणें वागण्याचा सल्ला दिला. याप्रमाणें वेळोंवेळीं मिळालेल्या बदसल्ल्यांनीं नारायणरावांचें अविचारी व हलकें मन बिथरलें व त्यांनीं दादासाहेबांना " आपण स्नान संध्या करून स्वस्थ असावें. आम्हीं कारभाऱ्यांचे विचारें राज्य करतो, " असें सांगून राज्यकारभारांतून त्यांना दूर केलें. एवढेंच नव्हे तर नारायणरावांनीं दुसऱ्याचें ऐकून दादासाहेबानीं आपल्याविरुद्ध मसलत चालविली आहे या सबबीवर त्यांना व त्यांच्या मंडळींना कैदेंत टाकिलें. याबद्दल नारायणरावांनीं कोणत्याही प्रकारें चौकशी सुद्धां केली नाहीं. त्यानंतर दादासाहेब हैदरवर स्वारी करण्याची मसलत करीत असतां नारायणरावाची गैरसमजूत करून त्यांजकडून दादासाहेबांची कैद सक्त करण्यांत आली. या प्रमाणें चुलत्यापुतण्यामधील प्रेमभाव नाहींसा होऊन या थराला गोष्टी कशा व कां आल्या, याला खरोखर कारणीभूत कोण व कसे झाले, यासंबंधीं मुद्दे काढून त्याची सविस्तर चर्चा व छानणी ग्रंथकारांनीं केली आहे व हें कृत्य नाना फडनविसांच्या व त्याच्या पक्षांतील लोकांच्या कृष्णकारस्थानाचेंच फळ आहे असें दाखवून दिलें आहे. ( पान २२१ ते २३१ ). यामुळें वाचकांच्या मनावर सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें चांगलाच प्रकाश पडण्याजोगा आहे यांत शंका नाहीं.

चांद्रसेनीय कायस्थ प्रभू यांच्यासंबंधीं वेदोक्त प्रकरण चाललें त्या कामीं पक्षाभिमानाला बळी पडून नाना फडनविसांनीं दिलेल्या सल्ल्याप्रमाणें " परभू क्षत्रिय नाहींत. त्यांस वेदोक्त कर्माचा अधिकार नाहीं. शूद्राप्रमाणें त्यांनीं वागावें. " असा निर्णय नारायणरावांनीं दिला. परभू पुढाऱ्यांचा त्या कामीं अनन्वित छळ करण्यांत आला; तेव्हां त्या गोष्टीकडे नारायणरावांनीं

मुळींच लक्ष दिलें नाहीं. यावरून नारायणराव हे स्वतंत्र बुद्धीचे व वृत्तीचे राहिलेले नसून नाना फडनविसांच्या कारस्थानाला ते सहज बळी पडत असत असें दिसून येतें. ( पान २३६।३७ ) तसेंच नारायणरावांनीं खुद राजवाड्यांतही कसकशा बालिश लीला केल्या व दुसऱ्यांच्या चिथावणीवरून दादासाहेबांचा व आनंदीबाईचा, ते कैदेंत असतांना कसा भयंकर व अनन्वित छळ केला, याचें वर्णन ग्रंथकारांनी दिलें आहे. ( पान २४० ). यावरूनही नारायणरावांच्या नैतिक दृष्टीनें खालावलेल्या मनोवृत्तीचें स्वरूप दिसून येतें.

एकदां नारायणरावांनी पर्वतीवर मर्दानी खेळ खेळण्याच्या प्रसंगीं बोथाटीनें नाना फडनविसांचें पागोटें उडविलें व हंसत ' नाना तुमचें पागोटें खालीं पडलें ' असें म्हटलें. त्यामुळें नारायणरावांनीं आपला अपमान केला असें नानांना वाटून त्यांनीं " मी कारकुनच आहे. माझें पागोटें पडलें हें कांहीं आश्चर्य नाहीं. स्वामींनीं आपलें पागोटें संभाळावें ! " असें त्यांना उत्तर दिलें. हें नानांचें उत्तर इतर दुसऱ्या कोणत्याही धोक्याचा इशारा नसून नारायणरावांना तें आपल्या तावडींतून त्यांचें स्वतःचें पागोटें संभाळण्याचें आव्हानच होतें असें ग्रंथकारांनीं आपलें ठाम अनुमान सप्रमाण पुढे मांडलें आहे. ( पान २४० ते २४७ ). याविषयीं ग्रंथकारांनीं दिलेली कारणपरंपरा पुढें घडलेल्या भयंकर परिणामावरून निःसंशय विचार करण्याजोगी आहे. तसेंच ग्रंथकारांचें हें अनुमान आजपर्यंतच्या या बाबतींत इतिहासकारांनीं काढलेल्या अनुमानापेक्षां जास्त व्यवहार्य, सयुक्तिक व ऐतिहासिक संगतीला पूर्ण अनुकूल आहे असेंच दिसून येतें. माधवराव पेशव्यांनीं एकदां नारायणरावांना एकांतीं असा उपदेश केला होता कीं, ' जें काय करणें तें हरीपंत ( फडके ) यांचे विचारें करीत जा, तर कांहीं दिवस वांचशील, नाहींपेक्षां तुझ्या जिवास कठीण आहे. ' परंतु हरीपंतांच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याचा हा उपदेश नारायणरावांनीं अंमलांत आणला नाहीं. उलट त्यांनीं कांहीं प्रसंगीं त्यांचा अपमान केला होता व त्यांना दुखविलें होतें. त्याचा परिणाम किती भयंकर झाला हें ग्रंथकारांनीं

सविस्तर दाखविलें आहे. ( पान २५५ ते २५७ ). नारायणरावांना गारद्यांच्या दंग्याची कुणकुण समजली होती; एवढेंच नव्हे तर त्यांनीं ती आपलें शरीरसंरक्षक हरीपंत फडके यांच्या कानांवर ही घातली होती. तथापि "जेऊन आल्यावर याचा विचार करूं" असें निमित्त सांगून त्यांनीं त्याबद्दल कांहींच खबरदारी घेतली नाहीं. यावरून धरण्याच्या कटांत निःसंशय त्यांचें अंग होतें व हा धरण्याचा कट पेशवाईंतील मोठमोठ्या मुत्सद्दी मंडळींचा **सार्वजनिक कट** म्हणून होता व त्याच्या पोटशीं **मारण्याचा गुप्त कट** नानाचा होता असें ग्रंथकारांनीं त्या वेळीं घडलेल्या गोष्टींची सविस्तर चर्चा करून दाखवून दिलें आहे. नारायणरावाच्या मृत्यूपूर्वी, मृत्यूच्या वेळीं व मृत्यूनंतर काय काय व कसकशा गोष्टी घडल्या यासंबंधीं निरनिराळ्या बखरींतून यावर दिलेल्या हकीकतींत एकवाक्यता कशी नाहीं हें त्या त्या बखरींतील उतारे देऊन ग्रंथकारांनीं दाखविलें आहे. ( पान २६९ ते २७५ ). पेशव्यांची बखर, नागपूरकर भोंसल्यांची बखर, हरीवंशाची बखर, मराठी साम्राज्याची छोटी बखर या बखरीतून जी हकीकत दिली आहे ती विसंगत असल्यानें विश्वसनीय नाहीं; कारण ती प्रत्यक्ष माहितीवरून दिलेली नसून नंतर गोळा केलेल्या व सांगोवांगीच्या माहितीवरून दिलेली आहे असा निष्कर्ष ग्रंथकारांनीं काढला आहे. तसेंच त्यांनीं यासंबंधीं सत्य प्रकार कोणता असावा हें त्या वेळेचा पत्रव्यवहार देऊन व त्याची चिकित्सा करून शोधून काढण्याचा प्रयत्न कसोशीनें केला आहे. ( पान २७६ ते २८८ ).

गारदी वाड्यांत शिरल्याची बातमी लागतांच अविचारानें दादासाहेबांचाच खून करावा या उद्देशानें नारायणराव आपल्या डाव्या हातात **हातचा निमचा** व उजव्या हातांत तरवार घेऊन दादासाहेबांकडे गेले व "तुमचे गारदी वाड्यांत शिरले, तुम्हीं आपला जीव संभाळणें;" असें आव्हानपूर्वक म्हणून त्यांनीं दादासाहेबांवर आपली तरवार उपसली व त्यांच्या डोक्यावर वार केला. त्यामुळें त्यांच्या डोक्यावर जखम झाली. त्या झटापटींत त्यांच्या डाव्या हातालाही जखम झाली. दादासाहेबांनीं या

प्रसंगीं मोठ्या शिताफीनें नारायणरावांच्या पाठीवर जाऊन त्यांना मिठी मारून धरलें आणि त्यांची चढाईची धडपड बंद पाडली. यापुढें नारायणरावांच्या मृत्यूसंबंधीं कसा प्रकार घडून आला यासंबंधीं ग्रंथकारांनीं गौप्य-गोपन केलें असून त्याचा सविस्तर खुलासा त्यांनीं बेचाळीसाव्या प्रकरणांत केला आहे. त्याबद्दलचें स्पष्टीकरण या प्रस्तावनेंत पुढें योग्य ठिकाणीं करण्यांत येईल. नारायणरावाचा मृत्यु आकस्मिक घडून आल्यानें त्यांच्या कारकीर्दीवर अवेळींच अखेरचा पडदा पडला.

## राघोबादादा व आनंदीबाई.

राघोबादादा हे पहिल्या बाजीराव पेशव्यांचे तृतीय चिरंजीव होत. त्याचा जन्म इ. स. १७३४ मध्यें झाला व इ. स. १७८३ अखेर ते कालवश झाले. आनंदीबाई या त्यांच्या द्वितीय पत्नी होत. त्यांचें लग्न इ. स १७५५ मध्यें झालें. पेशवाईच्या काळांतील राघोबादादांचा भाग फारच महत्वाचा आहे. तसेंच पेशव्यांच्या कारकीर्दींत भारतवर्षांतील ज्या स्त्रिया पावित्र्यानें, बुद्धिमत्तेनें व मुत्सद्देगिरीने नावलौकिकाला येऊन चमकल्या, त्यांत आनंदीबाईंचा दर्जा बराच वर लागेल यात शंका नाहीं. पेशवे घराण्यांतील इतर स्त्रिया सौ. रमाबाई, पार्वतीबाई व सगुणाबाई यांचें आनंदीबाईशीं सख्य होतें. आनंदीबाईंचा अंत इ. स. १७९४ मध्यें झाला. ग्रंथकारांनीं राघोबादादांचें तसेंच आनंदीबाईचें स्वभाववर्णन प्रसंगानुसार ठिकठिकाणीं वैशिष्ठ्यपूर्ण रीतीनें केलेलें आहे. राघोबादादा हे खरे शूर शिपाई असल्याचें वेळोवेळीं अनुभवास आल्यामुळें नानासाहेब पेशव्यांनीं त्यांची योजना मुलुखगिरींवरच केली होती. ते आपल्या सैन्याच्या हालचाली वाहतुकीचीं योग्य व जलद साधनें नसलेल्या काळांतही रोजीं चाळीस चाळीस पन्नास पन्नास कोसांच्या मजला मारून इतक्या जलदीनें व सफाईनें करीत कीं, त्यामुळें त्यांच्या शत्रूंना टेकीस येऊन त्यांच्यापुढें हार खाणें भाग पडत असे. यामुळेंच त्यांना "राघोभरारी" असें लोक म्हणूं लागले. त्यांनीं मोठमोठ्या लढायांत शौर्य गाजवून शत्रूंना खडे चारले

होते. त्यांनीं केलेल्या मोहिमेच्या कामीं त्यांना बराच खर्च येत असे. मोहिमेवरून परत येतांना मोहिमेच्या यशाबरोबर पुष्कळ वेळां ते कर्जाचा भयंकर बोजाही घेऊन येत असत. शत्रू शरण आल्यावर त्याच्याकडून डोईजड व जबर खंडणी वसूल करणें किंवा त्याचा अपमान करून त्याचें राज्य किंवा त्याचा मुलुख घशाखालीं घालणें यासारखीं निंद्य कृत्यें त्यांच्या हातून कधींही घडलीं नाहींत. शत्रूवर स्वाऱ्या करण्यापासून होणाऱ्या नफानुकसानीचें हिशेबी धोरण त्यांना नसे. त्यांनीं सन १७५८ मध्यें उत्तर हिंदुस्थानांत गिलच्यांवर मोहिम करून त्यांचा पूर्ण पराभव केला व त्यांना अटकेपार हांकलून घालून अटकेवर मराठी राज्याचा झेंडा रोविला. त्यामुळें त्याचा नावलौकिक बराच गाजला, परंतु या मोहिमेंत त्यांना ऐंशीं लक्ष रुपयांच्या कर्जाच्या बोजाची ठोकर बसली. या प्रसंगासंबंधीं ग्रंथकारांनीं पुढील समर्पक उद्गार काढले आहेत. " लढाईंत जय मिळाल्यानंतर शत्रुपक्षाकडून भरमसाट खंडण्या वसूल करणें, जबरदस्तीनें सावकारांना लुबाडणें वगैरे कृत्यांना जरूर असणारी मनोवृत्ति राघोबादादाच्या अंगीं मुळांतच नसल्यानें लढाईचा खर्च परभारें भागविण्याची हिशेबी राजकारणकुशलता त्यांना झेपत नसे. बहुतेक लढायावरून परत येतांना ते कर्जच घेऊन परत येत. या वेळीं तर मोहिमेच्या प्रचंड यशाएवढेंच प्रचंड कर्जही ते घेऊन आले. " ( पान ८९ ).

सदाशिवरावभाऊ पेशवाईचा कारभार पहात असत. त्यांचें धोरण काटकसरीचें असल्यामुळें त्यांना राघोबादादांचा हा कर्जखोरपणा मुळींच खपत नसे. त्यामुळें प्रसंगोपात्त त्यांच्यामध्यें यासंबंधीं तंटे उद्भवत. एकदां दादासाहेबांच्या मोहिमेच्या जमाखर्चाचा हिशेब पाहून त्यांनीं केलेल्या कर्जाच्या बोजासंबंधीं त्यांची भाऊंनीं कानउघाडणी केली. तेव्हां भाऊंनीं आपला अपमान केला असें वाटून दादासाहेब त्यांना " एवढें चातुर्य तुम्हांजवळ असेल तर दुसरे स्वारीस तुम्हींच जा. " असें उत्तरले. याप्रमाणें या बंधूमधील होत असलेल्या कलहाचें निवारण करण्याची नानासाहेबांनीं

एक युक्ति योजिली. भाऊंनीं मुलुखगिरी करावी व दादासाहेबांनीं कारभार पहावा असें त्यांनीं ठरविलें. दादासाहेब व भाऊसाहेब यांच्या कामाची अशी अदलाबदल करण्यांत नानासाहेबांचा दुसराही हेतु घरगुती तंटे नाहींसे करण्याचा होता असें ग्रंथकारानीं दाखवून दिले आहे. ( पान ८९।९० ). इ. स. १७६० च्या फेब्रुवारीमध्यें निजामअलीबरोबर झालेल्या उदगीरच्या लढाईंत पेशव्याना अपूर्व यश मिळाल्याचें कारण राघोबादादा व सदाशिवरावभाऊ यांचा त्या वेळीं झालेला एकोपा व त्या उभयतांचें शौर्य हेंच होय असें दिसून येतें. ही शौर्यशाली व यशस्वी जुकल फुटल्याचा विपरीत परिणाम पुढील पानिपतच्या लढाईंत दिसून आला.

नानासाहेब कालवश झाल्यानंतर माधवरावाच्या नांवें साताऱ्याच्या छत्रपतींकडून वस्त्रें आणविण्याचे कामीं दादासाहेबानीं नाना फडनविसांच्या पक्षाविरुद्ध कसा जोर केला व त्या कामीं ते सत्पक्षाभिमानी कसे होते हे चांगलेंच दिसून येतें. ही सर्व हकीकत मागें आलीच आहे. माधवराव गादीवर बसून दादासाहेब कारभार पाहूं लागल्यानंतर करवीरच्या राणी जिजाबाईसाहेब या करवीरच्या गादीसंबंधीं निश्चित योजना व्हावी म्हणून पुण्यास आल्या व त्यानी त्याबद्दल पेशवे दरबारांत खटपट चालविली. दादासाहेबांना त्या राणीसाहेबांचे दत्तक घेण्याबद्दलचे न्यायनिष्ठूर म्हणणें पटलें व त्यांनीं करवीरच्या राज्यावरील नानासाहेब पेशव्यानीं केलेली जप्ती अन्यायाची ठरवून रद्द केली आणि राणी जिजाबाईसाहेबांना दत्तक घेऊन तें राज्य स्वतंत्रपणें चालविण्याची त्यांनीं त्यांना संमती दिली. या प्रकरणीं दादासाहेबांची न्यायप्रियता व निस्पृहता चांगलीच कसोटीस उतरली हें उघड आहे. ( पान ११४ ). परंतु असा कारभार जरी तो पूर्ण न्यायाचा असला तरी तो नुकसानकारक व धरबुडवेगिरीचा आहे असें नानांच्या स्वार्थी पक्षाला वाटून त्यांनीं गोपिकाबाईकडून कशी ओरड करविली; त्यामुळें राघोबादादा व सखारामबापू हे कारभारांतून कसे दूर झाले; नानांनी पेशवाईचा कारभार कसा आटोपून घेतला व नंतर त्या विरुद्ध राघोबादादांनीं

घोडनदीची लढाई देऊन माधवरावांना कसें शरण येण्यास भाग पाडलें हा इतिहास पूर्वी आलाच आहे. ग्रंथकारांनीं या लढाईस दादासाहेब कां उद्युक्त झाले, त्यात त्यांचा खरा हेतु काय होता, हे दाखविले आहे. (पान ११८ ते १२३ ). माधवराव शरण आल्यावर दादासाहेबांना पेशवाईचें राज्य सहज गिळकृत करतां आलें असतें. परंतु तसें करण्याचें मनांतही न आणता माधवरावाना फक्त नजरकैदेत ठेऊन त्यानीं पेशवाईचा कारभार चालविला. यावरून दादासाहेबाविरुद्ध करण्यांत आलेले स्वार्थीपणाचे आरोप कसे निव्वळ खोटे होते हें दिसून येतें. यासंबंधीं ग्रंथकारांनीं काढलेले उद्गार मनन करण्याजोगे आहेत. ( पान १२३ कलम १६ ).

घोडनदीच्या लढाईच्या वेळीं दादासाहेबाविरुद्ध लढणारे गोपाळराव वगैरे मिरजकर पटवर्धन सरदार पराभव झाल्यामुळे पळ काढून ते थेट मिरजेस गेले. आपल्याशीं कोणत्याही प्रकारे समट करून घेण्याचें त्यांचे चिन्ह दादासाहेबांना दिसून न आल्यामुळे त्यानीं मिरजेच्या गोविंद हरी पटवर्धनाना मिरजेचा किल्ला व सरंजामाचा मुलुख वगैरे सोडून देण्याबद्दल खरमरीत आज्ञापत्र पाठवून तंबी दिली. परंतु या उपायानीं पटवर्धनसरदार मडळी जास्तच बिथरली आणि त्यानीं मिरजेचा किल्ला न सोडतां तो गोविंद हरीनें लढवावा असें ठरविलें. दादासाहेब माधवराव पेशव्यांना बरोबर घेऊन मोठया फौजेसह पटवर्धनावर चालून गेले. तेव्हा दादासाहेबांसारख्या मुरब्बी सेनानीशीं टक्कर देऊन पटवर्धन सरदाराना मिरजेचा किल्ला लढवितां आला नाही. आपला काहीं इलाज चालत नाहीं असें पाहून गोविंद हरीनें तो किल्ला दादासाहेबाच्या स्वाधीन करण्याचें कबूल केलें. किल्लयांतील सामान वगैरे काढून तो रिकामा करून देण्याबद्दलही तीन दिवसांची मुदत द्यावी अशी विनंति गोविंद हरीनें केल्यामुळे तीही गोष्ट दादासाहेबांनीं उदार अंतःकरणानें मान्य केली. त्याप्रमाणें पटवर्धनांनीं तो किल्ला रिकामा करून दादासाहेबांच्या स्वाधीन केला. यासंबंधींची सर्व हकीकत देऊन ग्रंथकारांनीं समर्पक शब्दांत दादासाहेबांच्या शुद्ध अंतःकरणाचें स्वरूपाविष्करण

केलें आहे. ( पान १२६ कलम २० ). पुढें मिरजेचा किल्ला हातचा गेल्यामुळें गोपाळराव पटवर्धन आपल्या पक्षांतील दुसऱ्या कांहीं सरदारांसह निजाम अल्लीकडे गेले व त्यांनीं त्याची नोकरी पत्करिली. पेशव्यांच्या पदरच्या या फुटून आलेल्या सरदारांचा फायदा घेऊन निजामानें पेशव्यांवर स्वारी करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें निजामअल्लीचा मुख्य दिवाण विठ्ठल सुंदर यानें या सरदाराच्या मदतीनें पेशव्यांच्या राजधानीचें पुणें शहर लुटलें व पेशव्याच्या मुलुखांत जाळपोळ करून बखेडा माजविला. गोपाळराव पटवर्धन वगैरे पेशव्यांच्या सरदारांच्या सहाय्यामुळें निजामअल्ली प्रबळ झाला असें पाहून सखाराम बापूंनीं या सरदारांना फितुर करून घेण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें गोपाळराव पटवर्धन हे निजामअल्लीस आयत्यावेळीं सोडून पेशव्यांना येऊन मिळाले. पुढें राक्षसभुवनची लढाई होऊन त्यात विठ्ठल सुंदर मारला जाऊन निजामाचा कसा पराभव झाला ही हकीकत मागें आलीच आहे. या लढाईनंतर गोपाळराव पटवर्धन हे आपल्या बोलावण्याप्रमाणें निजामाचा पक्ष सोडून आपल्याकडे आले हें पाहून दादासाहेबाना आनंद झाला व त्यांनीं गोपाळरावांना मिरज किल्ल्याची नवीन सनद करून देऊन तो किल्ला त्यांच्या हवाली केला. यासंबंधीं ग्रंथकारांनीं दादासाहेबांच्या थोर मनोधर्माबद्दल पुढीलप्रमाणें प्रशंसोद्गार काढले आहेत: “ यावरून राघोबादादांच्या थोर मनाची पारिपत्य करण्याची पद्धत लक्षांत येईल. ते कारणापुरतेंच व अपराधी लोकाना सुबुद्धि यावी या दृष्टीनें त्यांचें पारिपत्य करीत, परंतु त्यांचा जन्माचा नाश होऊं देत नसत. त्यांच्या पारिपत्याच्या पद्धतीत द्वेषबुद्धि बिलकुल नसे. ” ( पान १३३ कलम ३२ ). राक्षसभुवनच्या लढाईतील माधवरावांचें शौर्य व पेशवे घराण्याचा अभिमान पाहून दादासाहेबांनीं त्यांना ज्याप्रमाणें पेशवाईचा कारभार परत दिला त्याचप्रमाणें गोपाळराव पटवर्धनांनाही मिरज किल्ला परत दिला. या दादासाहेबांच्या उत्कृष्ट मनोधर्माबद्दल त्यांची सर्वच प्रशंसा करतील यांत मुळींच संशय नाहीं.

राक्षसभुवनच्या लढाईनंतर दादासाहेबांनीं सर्व राज्यसूत्रें माधवरावांच्या स्वाधीन केलीं. नंतर थोड्याच दिवसांनीं हैदरनें पेशव्यांच्या राज्यांत पुंडाई सुरू केली. तेव्हां त्याच्यावर स्वारी करण्याचा विचार ठरवून माधवरावांनीं त्या स्वारीवर जाण्याची दादासाहेबांना विनंति केली. दादासाहेबांनीं " एवढें मोठें सैन्य घेऊन हैदरवर जाण्याचे हे दिवस नाहींत; सध्या पावसाळा डोक्यावर आला आहे, म्हणून तो संपतांच आम्हीं मोहिमेवर जातों, " असें उत्तर दिलें. यामुळें माधवरावांना दादासाहेबांचा राग आला व रागाच्या भरांत त्यांनीं दादासाहेबांना " आपण पुण्यास राहून कारभारावर लक्ष ठेवावें, आम्हींच हैदरावर चालून जातों " असें सांगून त्यांनीं स्वतः सन १७६४ च्या मे महिन्यांत हैदरवर स्वारी करण्याकरतां कूच केलें. आपल्या अनुभवशीर व योग्य सल्ल्याची दरकार न करतां माधवराव स्वारीवर गेल्यामुळें दादासाहेबांनाही माधवरावांचा राग आला व ते पुणें सोडून नाशकास गेले. दादासाहेब जात्याच धार्मिकवृत्तीचे असल्यामुळें तेथें त्यांनीं धार्मिक अनुष्ठानें सुरू केलीं. " ही अनुष्ठानें माधवराव व नारायणराव यांना मारण्याकरितांच आहेत " असा मतलबी गवगवा कांहीं दुष्ट व कारस्थानी मंडळींनें सुरू केला. दादासाहेबांचें न ऐकतां भलत्याच वेळीं माधवरावांनीं हैदरवरील स्वारीला कूच केलें याचा पडताळा त्यांना लगोलग आला. त्यांची व हैदरची एक चकमक उडते न उडते तोंच पावसाळा कसा सुरू झाला, पावसाळी हवेमुळें माधवरावांची प्रकृति कशी बिघडली व रमाबाईच्या सल्ल्याप्रमाणें त्यांना राघोबादादांना मोहिमेवर येण्याबद्दल नाशकास कसें पत्र पाठविणें भाग पडलें, हा इतिहास मागें आलाच आहे. हें पत्र घेऊन सांडणीस्वार ज्या वेळीं नाशकाला गेला, त्यावेळीं दादासाहेब स्नानाकरतां नदींत उतरले होते. त्यांनीं त्या स्थितींत तें माधवरावांचें पत्र वाचलें आणि स्नानही न करतां तसेंच टाकोटाक कूच करून ते निघाले व माधवरावांना येऊन मिळाले. ग्रंथकारांनीं दादासाहेबांची या प्रसंगीं दिसून आलेली कळकळ व प्रेम आणि त्यामुळें

त्यांची उडालेली धांदल याचें वर्णन केलें आहे. (पान १३९ क. ६ ). दादासाहेबांनीं पुढें हैदरचा पराभव करून त्याला दातीं तृण धरून शरण यावयास कसें भाग पाडलें, पुरंदरगडच्या कोळ्यांचें बंड त्यांनीं कसें मोडलें व माधवराव आणि विंचुरकरांचे कसें समाधान केलें वगैरे हकीकतही आलीच आहे. त्यावरून दादासाहेबांच्या न्यायबुद्धीवर चागलाच प्रकाश पडतो. त्याचप्रमाणें शिंद्यांच्या गादीचा वारसाहक्क महादजी शिंद्यांना न देतां तो मानाजीराव शिंदे या अस्सल शिंदेघराण्यांतील पुरुषास देण्याविषयीं व तसेंच होळकरांच्या गादीला तुकोजीरावांना वारस न करता मल्हाररावांच्या जवळच्या आप्तापैकीं कोणाला तरी अहिल्याबाईनीं दत्तक घेऊन गादीला वारस करण्याविषयीं, दादासाहेबांनी दाखविलेलें धोरण पेशवाईच्या अकल्याणाचें होतें असें कोणालाच म्हणतां येणार नाही. माधवरावांनीं स्वतःच्या बडेजावीकरता दादासाहेबांना कैदेंत कसें टाकलें व नानांच्या स्वार्थी पक्षाला कसें फोंफावूं दिलें हा इतिहास मागें आलाच आहे. तरीपण शेवटीं ज्याअर्थी माधवरावांनीं आपल्या मरणकालीं राघोबादादांना बंधमुक्त करून त्यांच्या स्वाधीन नारायणरावांना केलें व पेशवाईचा सर्व राज्यकारभार त्यांच्यावर सोंपविला, त्याअर्थी माधवरावांनीं दादासाहेबांच्या बाबतींत केलेल्या सर्व अन्यायाचें परिमार्जन होण्याकरताच त्यांना हा नाना फडनविसांविरुद्ध अखेरचा निर्णय घ्यावा लागला हें उघड आहे. यावरून अखेरच्या वेळीं तरी माधवरावांना दादासाहेबांच्या निष्कपटी व थोर मनाची ओळख पटली हें स्पष्ट होतें. दादासाहेब जर खरोखर राज्यलोभी, अन्यायी आणि स्वार्थी असते, तर माधवरावांनीं नानाविरुद्ध नारायणरावांना त्यांच्या स्वाधीन कधींच केलें नसतें.

दादासाहेबांनीं साताऱ्याच्या महाराजांकडून नारायणरावांच्याच नांवानें पेशवाईचीं वस्त्रें देवविलीं, आपल्या स्वतःच्या नांवानें पेशवाईचीं वस्त्रें महाराज देण्यास तयार असतां तीं त्यांनीं न घेतां नारायणरावांनाच तीं देण्याबद्दल त्यांनीं विनंति केली ही गोष्ट दादासाहेबांचें स्वभावपरीक्षण करतांना लक्षांत

ठेवण्यासारखी आहे. छत्रपती रामराजे हे साताराच्या किल्ल्यावर ताराबाईच्या वेळेपासून बंदिवासांत होते. त्यांच्या या बंदिवासाकडे आजवर कोणी लक्ष दिलें नव्हतें. दादासाहेबांनीं त्यांची बंदिवासांतून मुक्तता करून त्या अन्यायाचें परिमार्जन केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. यावरून दादासाहेबांची न्यायबुद्धि व उदार मनोवृत्ति चांगलीच दिसून येते. नारायणरावांना गादीवर बसवून दादासाहेब राज्यकारभार पाहूं लागल्यानंतर परस्परांमध्यें दुर्गाताईचें लग्न होईतोंपर्यंत एकोपा व प्रेम कसें नांदत होतें हा इतिहास ग्रंथकारांनीं दिलेला आहे. त्याचप्रमाणें कारस्थानी लोकांनीं नारायणरावांचे कान फुंकून त्यांच्याकरवीं दादासाहेबांना कैदेंत टाकवून व त्यांचा अनन्वित छळ कसा करविला हाही इतिहास मागें आलेलाच आहे. "मृगमीनसज्जनानां निष्कारिणो वैरिणो जगति" या उक्तिप्रमाणें त्यांना गोत्यांत आणण्याच्या हेतूनें त्यांच्याविरुद्ध कांहीं विघ्नसंतोषी व दुष्ट लोकांनीं प्रयत्न केले. दादासाहेबांचा कांहीं अपराध नसतांना त्यांना एकदम नारायणरावांच्या आज्ञेखालीं कैद करण्यांत आलें या महत्वाच्या विषयाचा इतिहासकारांनीं व बखरीकारांनी विचार करणें जरूर असतांही त्यांनीं तसें केलें नाहीं असें नमूद करून ग्रंथकारांनीं या विषयाची सविस्तर मुद्देसूद चर्चा करून या कृतीच्या बुडाशीं कोणकोण लोक होते, व हें घडवून आणण्यांत त्यांचा काय हेतु होता, हें स्पष्टपणें दाखवून दिलें आहे. (पान २२१ ते २२८).

राघोबादादांना कैद करण्याच्या बुडाशीं मुख्य सूत्रधार खुद्द नानाफडनवीसच होते असें त्या वेळेच्या परिस्थितीचें सोपपत्तिक विवेचन करून सिद्ध करण्यात आलें आहे. हैदरवरील मोहिमेचें राजकारण चालू असतां दादासाहेबांनीं हैदरकडे एक चिठ्ठी पाठविली होती. त्यांत नारायणरावांना गादीवरून काढण्यासंबंधीं मजकूर होता. ती चिठ्ठी हैदराकडून नानांनीं हस्तगत केली. नारायणरावांच्या नजरेस ती चिठ्ठी आणतांच दादासाहेबांची कैद सक्तीची करण्यांत आली. या चिठ्ठींतील मजकूर निव्वळ हैदरच्या मोहि-

मेचें राजकारण साधण्याचे हेतूनेंच लिहिला असला पाहिजे. कारण राघोबादादा अगर आनंदीबाई यांना राज्यतृष्णेनें पछाडिलें नव्हतें. त्यांना खरोखर तशी राज्यतृष्णा असती तर निरनिराळ्या प्रसंगीं अधिकारसूत्रें हातीं आल्यावेळीं त्यांनीं आपली तृष्णा पूर्ण करून घेण्याची खटपट सहज साध्य करून घेतली असती वगैरे ग्रंथकारांनीं काढलेलीं अनुमानें सयुक्तिक व विचारार्ह आहेत यांत शंका नाहीं. याप्रमाणें कैद सक्त करूनही समाधान न मानतां नारायणरावानीं नानांच्या पक्षांतील लोकांच्या चिथावणीनें दादासाहेबांचा व आनंदीबाईचा अनन्वित छळ कसकसा केला याचें वर्णन ग्रंथकारांनीं पुढीलप्रमाणें दिलें आहे: " राघोबादादांचें गायत्रीपुरश्चरण चालल्यावेळीं त्यांना सूर्यदर्शन न व्हावें याकरतां त्यांना खोलीत कोंडून घालीत होते. यामुळें दादासाहेबांना चारचार, आठआठ दिवस उपोषण पडत होतें. आनंदीबाईचे तर इतके हाल केले कीं, ते लेखणींतून उतरणेंच शक्य होत नाहीं. फंदाचे कागद लुगड्यांत लपविले आहेत या सबबीवर आनंदीबाईचें लुगडे फेडून त्यांचा छळ होत असे." (पान २४०).

पुढें नारायणरावांना धरण्याचा कट करण्यांत आला. दादासाहेबांच्या संमतीनें सखारामबापूंनीं हा कट घडवून आणिला ही आजवरच्या कित्येक इतिहासकारांची समजूत सर्वस्वी कशी चुकीची आहे हें स्पष्टपणें दाखवून देऊन नाना फडनविसांनींच हा कट घडवून आणिला व त्यांत हरीपंत फडके वगैरे इतर सरदारांना गोंवून घेऊन आणि सखारामबापूंना त्याचा पुढाकार देऊन दादासाहेबांची धरण्याच्या हुकुमावर त्यांनीं कशी सही घेतली व दादासाहेबांनीं त्यावर आपली सही कां केली याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारांनीं दिलेलें आहे. ( पान २४२ ते २४९ ). यावरून या कामीं दादासाहेब कसे निर्दोषी होते हें दिसून येईल. ( पान २५२ कलम २ ). त्याचप्रमाणें या नारायणरावांना धरण्याच्या कटांत त्यांना मारण्याचा जो गुप्त कट करण्यांत आला त्यांतही दादासाहेबांचा कांहींच संबंध नव्हता. तो कट नानांनीं कसा व कां घडवून आणला याचाही चांगलाच खुलासा " नानांच्या कारस्थानाची

जोडगोळी " या बाराव्या प्रकरणांत ग्रंथकारांनीं केला आहे. पुढें नारायणरावांच्या वधासंबंधीं निरनिराळ्या बखरींतील उतारे देऊन व त्यांत दिलेली माहिती कशी विसंगत आहे व ती कां अविश्वसनीय आहे हें दाखवून खरा प्रकार काय असावा याची ग्रंथकारांनीं सविस्तर चर्चा केली आहे. उघडपणें दिसून येणाऱ्या व सहजासहजीं समजून येणाऱ्या गोष्टींत विसंगतता व एकांत स्थानीं घडलेल्या गोष्टींबद्दल सर्व बखरीकारांची एकवाक्यता दिसून येते, यावरून या निरनिराळ्या बखरींतील मजकुराला महत्व देणें सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें कसें धोक्याचें आहे याची चांगलीच कल्पना होईल. ग्रंथकारांनीं या ठिकाणीं नारायणरावांच्या वधासंबंधीं जरी सविस्तर हकीकत दिली असली तरी त्यांनीं नारायणरावाचा 'खून कीं आत्महत्या' याचें गौप्यगोपनच करून त्याचा खुलासा अखेरच्या बेचाळीसाव्या प्रकरणांत केला आहे. या सर्व हकीकतीवरून दादासाहेबांचे व आनंदीबाईचें नारायणरावांना मारण्याच्या कटांत अंग नव्हतें असेंच दिसून येतें.

नारायणरावाच्या मृत्यूनंतर सर्वांच्या संमतीनें दादासाहेबांची पेशवेपदावर स्थापना झाली व त्याच्या नावें द्वाही फिरून ते राज्यकारभारही पाहूं लागले. जरी वरकरणीं दादासाहेबांच्या पेशवेपणाला मान्यता दिली तरी 'जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं,' या न्यायानें नाना फडनविसांनीं दादासाहेबांविरुद्ध कसकशीं कारस्थानें केलीं हें 'चोरास मलिदा व धन्यास धत्तुरा' या चौदाव्या प्रकरणावरून दिसून येतें. नारायणरावाच्या मृत्यूनंतर दादासाहेब गारद्यांच्या कैचींत सांपडले होते. त्यातून, त्यानीं गारद्याची समजूत घालून आपली सुटका करून घेतली. मुत्सद्याचे दादासाहेबा विरुद्ध गुप्तपणें डावपेंच चाललेच होते. नारायणरावांच्या तिळांजळीच्या वेळीं नाना फडनविस, सखारामबापू, त्र्यंबकरावमामा पेठे व हरिपंत फडके या चार मुत्सद्यांनीं एकत्र जमून 'नानासाहेबांचा वंश चालवावयाचा व राघोबाच्या वंशास नमस्कार करावयाचा नाहीं' अशा वाळूच्या लिंगावर हात ठेऊन आणक्रिया केल्या. त्यानंतर नागपूरचे साबाजी भोंसले यानें निजामाच्या आश्रयानें बंडाळी सुरू केल्यानें निजामावर स्वारी

करण्याचें दादासाहेबांनीं ठरविलें. नानांचें सावाजीशीं व निजामाशीं आंतून जरी सूत होतें तरी त्यांच्या पक्षांतील लोकांनीं दादासाहेबांना कसें तरी पुण्याबाहेर काढण्याच्या हेतूनें त्यांच्या या मोहिमेच्या विचारास पाठबळ दिलें. त्यामुळें दादासाहेब ताबडतोब आनंदीबाईंना व तसेंच नाना आणि इतर कांहीं मुत्सद्यांना बरोबर घेऊन मोहिमेवर निघाले. साताऱ्याहून आणविलेलीं पेशवाईचीं वस्त्रें त्यांना या मोहिमेवर असतांच तारीख १० आक्टोबर सन १७७३ रोजीं पेडगांव मुक्कामीं धारण करावीं लागलीं. परंतु नाना व इतर मुत्सद्दी यांचीं मात्र त्यांना कसें पदच्युत करतां येईल याविषयीं कारस्थानें गुप्तपणें सुरू झालीं. त्यांनीं दादासाहेबाविरुद्ध ते राज्यकारभारांत घालमेल करतात म्हणून व आनंदीबाईविरुद्ध त्या नारायणरावाची बायको गंगाबाई हिचा गर्भपात करण्याचीं साधनें करतात म्हणून आक्षेप घेण्यास सुरवात केली. यासंबंधीं परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या पत्रव्यवहाराचा उल्लेख करण्यांत आलेला आहे. या पत्रव्यवहारावरून दादासाहेबाविरुद्ध व आनंदीबाईविरुद्ध नारायणरावांचा त्यांनीं खून करविला व आनंदीबाईंनीं 'ध' चा 'मा' केला वगैरे करण्यांत आलेल्या आरोपांचा तारीख ११ आक्टोबर सन १७७३ पर्यंत कसा मागमूसही नव्हता आणि ते आरोप कसे निव्वळ खोटे होते हें ग्रंथकारांनीं सयुक्तिकपणें दाखविलें आहे. (पान ३१५ ते ३१९).

तसेंच आनंदीबाईनें गंगाबाईला दिवस गेल्याचें सांगून सती जाण्यापासून तिला परावृत्त केले असल्यामुळें गंगाबाईचा गर्भपात करविण्यासंबंधीं आनंदीबाईविरुद्ध घेण्यांत आलेले आक्षेपही निव्वळ कुलड होती. तसेंच नारायणरावांना धरण्याच्या हुकुमांत 'ध' चा 'मा' आनंदीबाईनें केला हा आरोप अगदीं खोटा आहे. आनंदीबाईंनीं "यादीचीं अक्षरें 'ध' चा 'मा' कोणी केला याची चौकशी किमर्थ न केली? माझा दस्तऐवज किंवा निरोप कांहीं तरी निवडावयाचे होतें. कांहींच न करतां उगाच पेंचांत ठेवलें" असें नाना फडनविसांना उघड आव्हान केलें असतां ते त्याबद्दल चौकशी न करतां गप्प बसतात, हेंही लक्षांत घेण्यासारखें आहे. 'ध' चा 'मा'

केलेल्या हुकुमाचा कागद नारायणरावांच्या मृत्यूनंतर दीड महिन्यांनीं न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांच्याकडे आला. 'ध' चा 'मा' करण्याचा बनाव नानांच्या गळ्याशींच कसा येतो हेंहीं दाखविण्यांत आलें आहे. न्यायाधीश रामशास्त्री हे जरी निस्पृही होते तरी ते न्यायी होते व त्यांनीं योग्य न्याय केला असें सिद्ध होत नाहीं. नारायणरावांच्या खुनासंबंधीं विशेष पुरावा हातीं नसतांही त्यांनीं दादासाहेबाना नारायणरावांच्या मृत्यूच्या दुसऱ्याच दिवशीं देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा सांगितली. त्यानंतर 'ध' चा 'मा' झालेला हुकुमाचा कागद त्यांच्या हातीं आला; व त्यासंबंधीं त्यांनीं चौकशीही केली नाहीं. यावरून पुरावा हजर होण्याच्यापूर्वीच शिक्षा देणाऱ्यांना न्यायी म्हणतां येत नाहीं.. वगैरे ग्रंथकारानीं सविस्तरपणें मांडलेले मुद्दे चांगलेच विचार करण्यासारखे आहेत. ( पान ३२४ ते ३२८ कलम २५।२६ ). यावरून आजपर्यंत या कामीं इतिहासकारांनीं काढलेल्या अनुमानांना व ठरविलेल्या सिद्धांतांना जोराचा धक्का बसल्याशिवाय राहणार नाहीं खास !

दादासाहेबांनी या मोहिमेंत निजामाचा पुरा मोड केला व त्याला शरण येण्यास भाग पाडलें. परंतु त्याला गुलाम न करता त्याच्याशी योग्य तो तह करून नेहमींच्या पद्धतीप्रमाणें आपल्या मनाचा मोठेपणा त्यांनीं दाखविला. दादासाहेब या मोहिमेंत गुंतले असता सखारामबापू व दुसरे मुत्सद्दी व सरदार कांहीं तरी निमित्त करून पुण्यास परत गेले. या कामीं दादासाहेबांच्या पूर्ण विश्वासपात्र सखारामबापूंनीं नाना व इतर कारस्थानीं सरदार मंडळींना पुण्यास पाठविण्याबद्दल दादासाहेबाविरुद्ध कोणती विश्वासघातक युक्ति योजिली व निष्कपटी आणि सरळ स्वभावाचे दादासाहेब त्याला कसे बळी पडले याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारांनीं केलें आहे. ( पान ३३६ ). दादासाहेबांचा सखारामबापूंवर पूर्ण विश्वास होता. हें दादासाहेबानीं स्वहस्तें बापूंना लिहिलेल्या पत्रावरून दिसून येतें.' ( पान ३४८ ). ही कारस्थानी मंडळी पुण्यास आल्यावर त्यांनीं '**बारभाई**' मंडळ स्थापन केलें व दादासाहेबाना पदच्युत कसें करतां येईल याची मसलत त्यांनीं जोरांत सुरू केली. गंगाबा-

ईंची मनःप्रवृत्ति दादासाहेब व आनंदीबाई यांच्याविरुद्ध कशी करतां येईल या विषयीं युक्त्या योजण्यांत आल्या. नानांच्या पूर्ण विश्वासांतील पुरुषोत्तम दाजी पटवर्धन हे दादासाहेबांच्या मोहिमेंत होते. त्यांनीं आपणांवर आनंदीबाईंनीं विषप्रयोग केल्याचे आरोप करून पत्रें पाठविलीं. यासंबंधीं हरीवंशांतील बखरींत असलेली हकीकत देऊन तीं पत्रें व त्यांनीं आनंदीबाईविरुद्ध केलेले आरोप कसे खोटे आहेत व दादासाहेबांना पदच्युत करण्याचें कारस्थान कसें रंगविलें गेलें, हें ऐतिहासिक पत्रें उद्धृत करून व त्यासंबंधींची चर्चा करून दाखवून देण्यांत आलें आहे. ( ३३९ ते ३४३ ). तसेंच या कारस्थानी मंडळी-कडून राघोबादादांनीं व आनंदीबाईंनीं गंगाबाई व पार्वतीबाई यांचेवर मारेकरी घातल्याचें कपटनाटकही रचण्यांत आलें होतें हें वेणुबाई पेठे यानीं आपल्या आईला लिहिलेल्या पत्रावरून व त्या वेळेच्या परिस्थितीवरून सहज दिसण्या-जोगें आहे. ( पान ३४३।३४४ ). हें सर्व घडवून आणण्यांत बारभाईंचा हेतु आपलें राजकारण सिद्ध करण्याकरतां गंगाबाईंना व पार्वतीबाईंना पुण्यातून बाहेर काढून पुरंदरास न्यावें हा होता. दादासाहेबाची वागण्याची तऱ्हा कशी होती व कारस्थानी मंडळींनी त्याना कसें पेंचांत आणलें याचें समर्पक वर्णनही ग्रंथकारांनीं केलेलें आहे ( पान ३४७।३४८ ).

नाना व बापू या कारभारीद्वयांनीं सातारच्या महाराजाकडून दादासाहेबांना पदच्युत करवून गंगाबाईंचे नावें राज्यकारभार चालविला. या प्रमाणे साताऱ्याचे महाराज या कारभारी लोकांच्या मसलतीस बळी पडले ही गोष्ट महाराजांच्या मंत्रीमंडळास न आवडल्यानें त्यांनीं महाराजाना ते बार-भाईंच्या कक्षेत पुनः येऊं नयेत या हेतूनें साताऱ्याच्या किल्ल्यावर बंदोबस्तात ठेविलें. त्यानीं दादासाहेबांना ही गोष्ट कळवितांच दादासाहेबानीं त्याना त्याबद्दल शाबासकी देऊन अभिनंदनपर पत्र पाठविलें. हें पत्र ग्रंथकारांनीं पेशवे दप्तर भाग ५ वरून उद्धृत केलें आहे. ( पान ३५२ ). यावरून दादासाहेबांच्या स्वभावधर्मावर चांगलाच प्रकाश पडतो.

बारभाईंनीं राज्यसूत्रें हातीं घेऊन कारभार सुरू करतांच त्यांनीं दादा-साहेबांच्या पक्षांतील लोकांवर चांगलेंच हत्यार उपसलें. त्यांनीं त्यांची मिळ-

कत जप्त केली; त्यांच्या दारीं चौक्या बसविल्या; त्यांच्या बायका पोरांना कैद केलें. याप्रमाणें त्यांनीं त्या लोकांचा अनन्वित छळवाद केला. आपल्या-विरुद्ध करण्यांत आलेल्या मुत्सद्यांच्या या कारवाया दादासाहेबांना समजतांच ते मोहिमेवरून परत फिरले. त्यांना पुण्यास येतां येऊं नये म्हणून त्यांच्याशीं सामना करण्याकरतां बारभाईंनीं त्रिंबकरावमामा, साबाजी भोंसले व निजाम यांना पाठविलें. या लोकांनी दादासाहेबांना गांठून त्यांच्यावर चाल केली. या लोकांचें सैन्यबळ पाहून त्यांच्याशीं प्रत्यक्ष सामना देऊं नये म्हणून दादासाहेबांनीं त्यांना चुकविण्याचा प्रयत्न केला. परंतु शेवटीं सांगोल्याजवळ कांसेगांव येथें त्रिंबकरावमामाची फौज आल्याचें समजतांच त्यांच्याशीं सामना देण्याचें दादासाहेबांनीं ठरविलें. या कांसेगांवच्या प्रसिद्ध लढाईचें वर्णन ग्रंथकारांनीं सविस्तर केलें असून त्यात बारभाईंच्या सरदारांची कशी पूर्ण दुर्दशा झाली व त्रिंबकरावमामा पकडले जाऊन त्यांतच त्यांचा कसा अंत झाला हें दाखविलें आहे. ( पान ३५८।३५९ ). या लढाईंतील दादासाहेबांच्या पराक्रमाचें यथार्थ वर्णन ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत केलें आहे. " अशा प्रकारें कांसेगांवच्या लढाईंत राघोबादादा यांच्याजवळ थोडी फौज असताही त्यांनीं त्रिंबकरावमामांच्या फौजेबरोबर लढाई देऊन त्यांचा पूर्ण पराभव केला. दादासाहेबांनीं परशुरामभाऊ आदिकरून पटवर्धन सरदार, रास्ते, विंचुरकर, नारो शंकर वगैरे शूर व लढवय्ये सरदारांना समरांगण सोडून पळावयास लाविलें. यावरून दादासाहेब हे कोणत्या प्रतीचे युद्धकलाकुशल वीरपुरुष होते हें सहज लक्षात येईल " या लढाईंत पूर्ण पराभव झाल्यामुळे साबाजी भोंसल्यांनीं व त्यांना फिरून येऊन मिळालेल्या पटवर्धनादि सरदारांनी दादासाहेबांवर पुनः हल्ला करण्याचें मनांत देखील आणलें नाहीं. तसेंच या लढाईची हकीकत समजतांच नाना फडनविसांनीं कशी हाय खाली व त्यांची मनःस्थिति किती विषण्ण झाली हें दाखविण्याकरतां ग्रंथकारांनीं हरीवंशाच्या बखरीचा उतारा दिला आहे. ( पान ३६० कलम ९ ).

दादासाहेबांची जशी धार्मिक प्रवृत्ति होती तशीच त्यांची साधुसंतांवर पूर्ण श्रद्धा असे. कांसेगांवच्या लढाईच्या वेळीं त्यांना पंढरपुरास राहत अस-

लेल्या ' **बडीबया** ' नांवाच्या संतिणीचा आशीर्वाद मिळाला होता एवढेंच नव्हे तर त्या लढाईंत स्वत: जातीनें हजर राहून हत्तीवरून दादासाहेबांच्या सैन्याला ती उत्तेजन देत होती असें ग्रंथकारांनीं परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या चरित्रांतील दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येतें. ( पान ३६२ ). 'बडीबया' सारख्या भगवद्भक्तिणींचें अधिष्ठान दादासाहेबांना मिळालें यावरून दादासाहेबांचें शील पवित्र व विशुद्ध असलें पाहिजे असेंच सिद्ध होतें असें ग्रंथकारांनीं काढलेलें अनुमान सयुक्तिक आहे.

यानंतर सवाईमाधवरावांचा जन्म होण्यापूर्वी दादासाहेबांनीं पेशव्याच्या गादीस बारभाईसारख्या कारस्थानी मंडळीकडून धक्का पोहोंचूं नये म्हणून त्यांच्याशीं बाबूजी नाईक बारामतीकर यांच्यामार्फत समेट करण्याचा प्रयत्न केला व त्यासंबंधीं कांहीं अटीही पुढें मांडल्या. परंतु बारभाईनीं या कामीं त्यांची डाळ मुळींच शिजूं दिली नाही. यावरून दादासाहेबाविषयीं या बारभाईंची किती द्वेषबुद्धि होती हें दिसून येतें. तसेंच सवाईमाधवरावांच्या जन्मानंतरही लढाईचा प्रसंग टळावा व पेशव्याच्या राज्याचें कोणत्याही प्रकारें नुकसान होऊं नये म्हणून दादासाहेबांनीं पुन: चिंतो विठ्ठल व विसाजी केशव यांच्या मार्फत समेटाचा प्रयत्न केला. त्यालाही बारभाईनीं दादासाहेबावर दानधर्माकरतां फक्त दोन लक्ष रुपये त्यानीं घ्यावे अशी हास्यास्पद व अपमानकारक अट लादण्याचा प्रयत्न करून वाटाण्याच्या अक्षता कशा लाविल्या याचें वर्णन ग्रंथकारानीं सविस्तर केलें आहे. ( पान ३७५ ). नंतर दादासाहेब बऱ्हाणपुराकडे जात असतांना काहीं सरदार मंडळींनी त्याचा पाठलाग केला. तेव्हां दादासाहेबांनीं पुन: मध्यस्थांना फडके व पटवर्धन यांच्याकडे पाठवून समेटाचा तिसरा प्रयत्न केला, पण तोही निष्फळ झाला. पुढें दादासाहेब उत्तरेस नर्मदा पार होऊन गेले. बारभाईंचे सरदार फौजेनिशीं मागोमाग होतेच. अशा स्थितींत शिंद्यांनीं मध्यस्थी करून समेटाची खटपट केली. तेव्हां शिंदे व होळकर यांनीं स्वत: येऊन समेटाची योजना केल्यास ती आपल्यास मान्य होईल असें दादासाहेबांनीं कबूल केलें व ते देशीं जाण्याकरतां परत निघाले. पण वाटेंतच

शिंद्यांच्या स्वार्थी कारस्थानाचा सुगावा त्यांना लागल्यामुळें त्यांनीं दुसरा मार्ग धरला. बारभाईंकडून त्यांचा पाठलाग करण्याचें काम चालूच होतें. बारभाईंच्या सैन्याशीं आपला निभाव लागणार नाहीं, कोणाचातरी आश्रय घेणें जरूर आहे असें वाटून इंग्रजांचा आश्रय घ्यावा व गोविंदराव गायकवाडांचें सहाय्य घ्यावें म्हणून ते गुजराथेकडे गेले. दादासाहेबांचें समेटाचें बोलणें शिंद्यांमार्फत पुनः सुरू झालें. शिंद्यांनी सुचविलेल्या निर्वाणीच्या अटी फडक्यांना न पटल्यामुळें लढा चालूच राहिला. त्यांनीं सन १७७५ च्या फेब्रुवारींत महीनदीचे तीरावर दादासाहेबाशीं लढाई केली व फत्तेसिंग गायकवाडाचे मदतीनें दादासाहेबांचा पराभव केला. या लढाईंत दादासाहेबांजवळ सैन्य फारच कमी होतें. त्यांतून दहा हजार अरबांचें सैन्य फितुर होऊन निघून गेलें होते. त्यामुळें दादासाहेबांना हार खावी लागली असें कागदोपत्रीं नमूद झाल्याचें आढळतें. या प्रसंगांतून पार पडून दादासाहेब खंबायतकडे गेले. त्यांचा पाठलाग चालूच होता. खंबायतच्या नबाबाकडून आश्रय न मिळाल्यामुळें ते भावनगर बंदरावरून सुरतेस इंग्रजाच्या आश्रयाला गेले. इंग्रजांचा आश्रय दादासाहेबांना कां घ्यावा लागला व असा आश्रय घेतल्याबद्दल कांहीं इतिहासकार त्यांना दूषणें देतात, तीं कशी एकतर्फी व निरर्थक आहेत; वास्तविक बारभाईंच्या कारस्थानामुळेंच दादासाहेबांना इंग्रजाचा आश्रय घेणें कसें भाग पडलें हें ग्रंथकारांनी यासंबंधीं सयुक्तिक विवेचन करून दाखवून दिले आहे. ( पान ३९५ ते ३९७ ).

राघोबादादा बंड आहेत, त्यांना कोणीही सामील होऊं नये व मदत देऊं नये अशा अर्थाचें फर्मान बारभाईंनीं काढलें. या फर्मानांत दादासाहेबांवर व आनंदीबाईवर नारायणरावांच्या खुनाचा आरोप केलेला नाहीं, यासंबंधीं सयुक्तिक विवेचन करून ग्रंथकारांनीं पुढील अनुमान ,काढलें आहे, तें कोणासही पटण्यासारखेंच आहे. " परंतु नारायणरावांच्या खुनाचा आरोप जो राघोबादादांवर केला गेला, तो फक्त बारभाईंच्या कारस्थानाला रंग चढण्याकरतां उसना असल्यामुळें, तें

कार्य संपतांच त्याची विस्मृति बारभाईंना पडली. म्हणून या फर्मानांत सहजच तो विषय गाळला गेला हें निर्विवाद ठरतें." (पान ३९९).

परिस्थित्यनुरूप इंग्रजांचा आश्रय केल्याबद्दल दादासाहेबांना जसा दोष देता येत नाहीं, त्याचप्रमाणें दादासाहेबाना आश्रय दिल्याबद्दल इंग्रजांनाही दोष देतां येत नाहीं. इंग्रज न्यायी होते ही गोष्ट बारभाईंना कबूल होती. दादासाहेबांना इंग्रजांनी त्या वेळीं आश्रय दिला यावरून ग्रंथकारानीं पुढील अनुमान काढलें आहे. "इंग्रज हे न्यायी होते व त्यांनीं दादासाहेबांना ज्या अर्थी आश्रय दिला त्याअर्थी दादासाहेबाचा पक्ष हा सत्पक्ष होता हें मात्र उघड पुराव्यानें सिद्ध होतें. दादासाहेब जर अपराधी, गुन्हेगार असते, तर न्यायी इंग्रजानीं त्याना खात्रीनें आश्रय दिला नसता व मदतही केली नसती हें उघड आहे." (पान ४००). ग्रंथकारांचें हें अनुमान तत्कालीन परिस्थितीचा विचार करिता सयुक्तिक आहे यात संशय नाहीं.

बारभाईंचे दादासाहेबांविरुद्ध शिकस्तीचे प्रयत्न होते. पेशवाईच्या निजामासारख्या कट्टया शत्रूची या कामी मदत घेणे बारभाईंचे सेनापती हरिपंत फडके यांना इष्ट वाटून, त्यांनीं निजामाला यथेच्छ मलिदा चारून त्याची कशी मनधरणी केली याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारानीं केलें आहे. (पान ४०१ ते ४०३).

**पुरुषोत्तम दाजींचें नवीन नाटक**—बापू व नाना हे कारभारीद्वय दादासाहेबाशीं मुकाबला करण्याचे हेतूनें ज्या वेळी पुरंदर गडाहून निघाले तेव्हां त्यांनीं त्या गडाची व्यवस्था व सवाईमाधवरावांच्या रक्षणाची व्यवस्था नानांचे विश्वासपात्र पुरुषोत्तम दाजी यांचेकडे सोंपविली होती. पुरुषोत्तम दाजींच्या कपट नाटकाचें वर्णन ग्रंथकारानीं यापूर्वीच केलेलें आहे. या प्रसंगीं हरिवंशाच्या बखरींतील उतारा देऊन राघोबादादा व आनंदीबाई यांचे विरुद्ध त्यांनीं प्रत्यक्ष विष्णूचे अवतार म्हणून प्रसिद्धीस आणिलेल्या सवाईमाधवरावांचा खून करण्याचा प्रयत्न कुणबिणीकडून करविण्याच्या प्रयत्नाचे नाटक कसें रचलें व त्यांत त्यांचा अंतिम काय हेतु होता हें चिकित्सापूर्वक दाखविण्यांत आलें

आहे. ( पान ४०४ ते ४०६ ). हा कपट नाटकाचा प्रयोग मनोरंजक असून कादंबरींत, नाटकांत अगर चित्रपटांत शोभण्यासारखा आहे यांत संशय नाहीं. भले पुरुषोत्तम दाजी !

इंग्रजांच्या आश्रयाला गेल्यानंतर दादासाहेबांना त्याच्याशीं सुरतेचा सोळा कलमी तह करणें भाग पडलें. त्या तहान्वयें इंग्रजानीं दादासाहेबांना मदत दिली. हरिपंत फडके व इतर सरदार दादासाहेबांचा पाठलाग करीतच होते. त्यांची व दादासाहेबांच्या फौजेची गाठ पडून जंगी लढाई झाली. त्यात हरिपंतांचा पूर्ण पराभव झाला. इंग्रजांच्या सैन्याचीही बरीच नासाडी झाली. ही नापारची लढाई म्हणून प्रसिद्ध आहे. या लढाईनंतर हरिपंत फडक्यांच्या मागें दादासाहेबांचें व इंग्रजांचें सैन्य लागलें. पुनः त्याचा मुकाबला होऊन आरासजवळ लढाई जुंपली. त्यातही हरिपंतांचा पराभव झाला. बारभाईनीं राघोबादादांबरोबर समेट न केल्यामुळें व त्यांची सारखी ससेहोळपट चाल-विल्यामुळें, पेशव्यांच्या राज्याची काय दशा झाली याचें वर्णन ग्रंथकारांनीं सविस्तरपणें केलें आहे. ( पान ४१९ कलम १४ ).

ठिकठिकाणीं दंगेधोपे, लुटालूट वगैरे झाल्यानें प्रजेचें जें भयकर नुकसान झालें व राज्याचा सर्वस्वी नाश होण्याचा प्रसंग आला, याला जबा-बदार बारभाई कीं राघोबादादा याची व त्या संबंधींचें योग्य अनुमान याची चिकित्सा ग्रंथकारानीं केलेली आहे. ( पान ४२१ कलम १७ ). राज्याची याप्रमाणें दुर्दशा झाल्यामुळें राज्य चालविण्यासाठीं बारभाईना निरनिराळे कर बसवावे लागले. कित्येकांचीं वार्षिक उत्पन्नेंही घ्यावीं लागलीं. बार-भाईचा हा कारभार सर्व प्रजाजनांना जाचक होऊन सर्व लोक त्या खालीं चिरडले गेले.

इंग्रजांच्या मुंबई सरकारानें दादासाहेबांना मदत केली, त्यामुळें ठिकठिकाणीं बारभाईचा पराभव होऊं लागला. सखारामबापूंनीं याबद्दल मुंबईकरांविरुद्ध कलकत्तेकर इंग्रजांकडे खलिता पाठवून तक्रार केली. तो खलिता पान ४२४ ते ४२६ वर देण्यांत आला आहे. त्यावरून बार-

भाईंचे डावपेंच स्पष्टपणें दिसून येतात. कलकत्तेकरांनीं मुंबईकरांच्या कृत्याचा निषेध केला व त्यांनीं आपला वकील अॅप्टनसाहेब याच्या मार्फत् पुरंदरचा तह घडवून आणला. त्यांतील अटी पान ४२९ वर दिल्या आहेत. या तहामुळें साष्टीबेट इंग्रजांकडेच रहावें; तसेंच त्यांनीं दादासाहेबांस आश्रय देऊं नये; त्यांचा त्यांनीं पक्ष सोडावा व दादासाहेबांनीं दरमहा पंचेवीस हजार रुपये पेन्शन घेऊन कोंपरगांवीं रहावें असें मुख्यतः ठरलें.

राघोबादादाचा पाठलाग चालू असता त्यांनीं आनंदीबाईंना धारचे किल्ल्यांत ठेविलें होतें. हा किल्ला पोवार यांच्याकडे होता. आनंदीबाईंना आश्रय देऊन दादासाहेबांना मदत केल्यामुळें बारभाईंनीं त्यांजवर शस्त्र धरलें. दुसऱ्या बाजीरावांचा जन्म त्याच किल्ल्यात झाला. बारभाईंच्या कारभाऱ्यांनीं लिंबकराव शिवदेव या सरदाराचे दोन हजार स्वाराचें पथक आनंदीबाईंवर पाठविलें. त्यांनी धारचे किल्यास वेढा दिला. जरी आनंदीबाई असहाय्य होत्या तरी त्यांनीं कित्येक महिने तो किल्ला मोठ्या शौर्यानें लढविला. हा लढा चालू असतां आनंदीबाईंनीं बापू व नाना या कारभारीद्वयाना पत्रें लिहिलीं. त्यातील मजकूर एकच असल्यानें तें पत्र ऐतिहासिक लेखसंग्रहांतून ग्रंथकारानें उध्दृत केलें आहे. ( पान ५४८ कलम १८ ). त्यावरून आनंदीबाईंची तक्रार काय होती व त्यानीं कारभाऱ्यांना टोमणे मारून शहाणपणानें वागण्याबद्दल कशा सूचना केल्या आहेत तें दिसून येतें. या पत्राला कारभाऱ्यांकडून केराची टोपलीच दाखविली गेली यांत नवल नाहीं. धारच्या किल्ल्याचा लढा दीड वर्ष चालला. त्यांत आनंदीबाईंचा पराभव झाला. वेढा घालणाऱ्यांनीं त्यांना पकडलें व त्यांच्या मर्जीविरुद्ध त्यांना मंडलेश्वर येथें नेऊन तुरुंगांत ठेवलें. याप्रमाणें बारभाईंनीं मर्दुमकी गाजवून पेशवे घराण्यांतील या शूर स्त्रीची वासलात लाविली.

बारभाईंचा वडीलकीच्या नात्यानें कारभार करीत असतां सखारामबापूंना नानांचीं कुटिल कारस्थानें दिसून आली व त्यांचा हेतु शुद्ध नाहीं,

हें त्यांना समजून आल्यामुळें पदच्युत केलेल्या राघोबादादांना पुनः अधिकारपदावर घ्यावें व नानांना अधिकारावरून दूर करावें याबद्दल त्यांची मसलत सुरू झाली. राघोबादादांना पदच्युत केल्यामुळें पेशव्यांच्या राज्याचें कसकसें नुकसान झालें याचा चित्रपट बापूंच्या डोळ्यांपुढून गेला असेल असें म्हणून ग्रंथकारांनीं तो चित्रपट सात कलमांची यादी देऊन चांगलाच रंगविला आहे. ( पान ५६४ कलम १३ ). यावरून त्या वेळच्या राजकारणाचें यथार्थ आकलन करण्याचें ग्रंथकारांचें बुद्धिसामर्थ्य दिसून येतें.

बारभाईपैकीं नानाचे चुलत बंधु मोरोबादादा फडनविस यांना या राज्यकारभारांत अधिकार नव्हता. राघोबादादांखेरीज योग्यरीतीनें राज्यकारभार चालणार नाहीं असे त्यांचें मत होतें. करितां नानांना पदभ्रष्ट करून त्यांचे अधिकार मोरोबादादांना द्यावे असें बापूंनीं ठरविलें. इ. स. १७७८ सालीं नानांचे गैरहजेरींत सखारामबापूंची व मोरोबादादाची गुप्त बैठक होऊन उभयताचे या बाबतीत कराररमदार व आणाशपथा ठरल्या. त्याचीं चार कलमें देऊन त्यावर ग्रंथकारांनीं सविस्तर चर्चा केली आहे. ( पान ५६७ कलम १६ व १७ ) यातील दुसऱ्या कलमानें, पेशवे वयानें लहान असल्यानें ते प्रौढदशेंत येईपर्यंत दादासाहेबांना पेशव्यांच्या जागीं स्थापन करावें व बापूकडे असलेला वडीलकीचा मान त्यांचेकडे असावा असें ठरविलें होतें. त्यावरून नारायणरावांच्या खुनाच्या कामीं दादासाहेबांवर घातला गेलेला आरोप सपशेल खोटा ठरतो हें ग्रंथकारांचें अनुमान सयुक्तिक आहे यांत शंका नाहीं.

त्यानंतर कांहीं उलाढाली झाल्यावर सन १७७९ सालच्या एप्रिल महिन्यांत मोरोबादादा व नाना यांच्यामध्यें सखारामबापूंनीं तह घडवून आणला. त्या तहांतील चवथ्या कलमानें " दादासाहेबांस तूर्त आणूं नये. पुढें आणलें तर आणावें " असें ठरलें. (पान ५७३ ). दादासाहेब यावेळीं इंग्रजांच्या आश्रयालाच होते. त्यांनीं नाना, बापू, मोरोबा वगैरेना आपण

कोणत्या अटी मान्य करण्यास तयार आहों तें कळविलें. त्यांत त्यांनीं, राज्य सवाईमाधवरावांच्या नांवें चालावें. आपला मुलगा बाजीराव याला दिवाणगिरी द्यावी, मोरोबांनी अखत्यारी करावी व सवाईमाधवराव आणि बाजीराव यांच्या अज्ञान दशेंत आपण वडीलपणें कारभार करावा, असें सुचविलें होतें. यावरून दादासाहेबांना पेशव्याच्या राज्याचा लोभ नव्हता; आपला दिवाणगिरीचा हक्क प्रस्थापित करण्याचीच केवळ त्यांची इच्छा होती असें दिसून येतें. मुंबईकर इंग्रजाच्या मनांत दादासाहेबाना पुण्यास घेऊन जावें व त्यांना सवाईमाधवरावांचे पालक नेमावे असा बेत होता. सखारामबापूंना इंग्रजाचें वावडें असल्यामुळे त्याचें मत दादासाहेबांनीं पुण्यास यावें, परंतु त्या कामीं त्यानीं इंग्रजाची मदत घेऊं नये असें होतें. त्याप्रमाणें सखारामबापूंनीं दादासाहेबांस या कामीं जलदी करण्याविषयीं पत्रद्वारें सूचना केली. दादासाहेबांनीं पोर्तुगीजचे गव्हर्नरास मदत करण्याविषयीं लिहिलें. परंतु त्याचेकडून मदत न आल्यानें इंग्रजांच्या मदतीनेच ते पुण्याच्या मोहिमेवर निघाले. दादासाहेब मोहिमेवर निघाल्याचें समजतांच नानांनीं त्यांच्याशीं टक्कर देण्याकरता सैन्य पाठविलें. तळेगावनजीक इंग्रजी सैन्याच्या मदतीनें दादासाहेबांनीं त्या भारी मोठ्या बारभाईंच्या सैन्याचा पराभव करून तळेगाव हस्तगत केलें. या वेळीं जरी दादासाहेबांजवळ फार थोडें सैन्य होतें, तरी त्यांनीं आपल्या रणकौशल्यानें या लढाईंत यश संपादन केलें. राघोबादादा आपल्या आहारीं येत नाहींत असें पाहून, याला अखेरची तोड म्हणून नानांनीं दग्धभूमीचें राजकारण ( Scorched-earth policy ) अंमलांत आणण्याचें ठरविलें. त्यांनीं कारस्थानी डाव करून पुणें शहर खालीं केलें व त्यांत कडबा भरून ठेवला. दादासाहेबांनीं तळेगांव सोडून पुण्याच्या रोखानें . कूच केलें असा संदेश येतांच त्या कडब्याला आग लावून पुणें शहर भस्मसात् करावें अशी नानांनीं तजवीज केली. शिवाय वाटेवरील पुण्यापर्यंतचीं गांवेंही जाळून टाकावीं अशीही त्यांनीं

योजना केली. नानांनीं नंतर अशी घोषणा केली कीं, " इंग्रजांच्या जोरावर श्रीमंत पुण्यास येणार तर येवोत; पण नांदती राजधानी मी त्यांच्या हातीं लागूं देणार नाहीं. पुण्याची राख रांगोळी करीन. मग राखेच्या पुंजीवर बसून श्रीमंतांनीं खुशाल राज्य करावें. " ही नानांची घोषणा कानीं येतांच दादासाहेबांनीं अधिकारसंन्यास करून आपली मोहीम बंद केली. या प्रसंगीं दादासाहेबांची मनःस्थिति कशी केविलवाणी झाली असली पाहिजे याचें ग्रंथकारांनीं अर्थपूर्ण वर्णन करून दादासाहेब जसे शूर होते तसेच ते त्यागीही होते असें दाखविलें आहे. दादासाहेबांनीं जो विचार केला तो ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत व्यक्त केला आहे. ज्या पेशव्यांच्या राज्याकरतां व ज्या पेशव्यांच्या पुणें राजधानीकरतां आपण इतके दिवस हालअपेष्टा सोसल्या, त्या पुण्याची राखरांगोळी नाना करणार व ती आपण डोळे उघडे ठेऊन पहाणार, त्यापेक्षां बंडखोर कारभाऱ्यांच्याच हातीं ती सुरक्षित राहणें चांगलें, असा दादासाहेबांनीं विचार केला. " ( पान ६०० कलम १२ ). दादासाहेबांनीं असा विचार करून शिंदे होळकरांना पत्रें पाठवून " पुण्यांतील मुत्सद्दी मंडळी बंड करून पेशव्यांचे राज्याचा नाश करीत आहेत, त्यांना तुम्हीं पुरातन सरदारांनीं तरी मदत देणें इष्ट नाहीं. यासाठीं तुम्हां उभयतांबरोबर स्नेह करावा अशी माझी इच्छा आहे. " असें कळविलें. ( पान ६०० कलम १२ ). पेशव्यांच्या राजधानीचा नाश टाळण्याकरतां दादासाहेबांनीं शिंद्यांच्या स्वाधीन होण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें ते तारीख १४ जानेवारी सन १७७९ रोजीं आपल्या लवाजम्यासह शिंद्यांच्या स्वाधीन झाले. नानांनीं दादासाहेबाकडून शिंद्यांमार्फत पेशवाईंत त्यांचा हक्क नसल्याबद्दल ' बेदावापत्र ' लिहून घेतलें. दादासाहेब शिंद्यांच्या स्वाधीन झाल्यामुळें नाइलाजानें इंग्रजांना पेशव्यांच्या मुत्सद्यांशीं तह करावा लागला. दादासाहेबांनीं हें अपूर्व दिव्य करून पेशवाईची व पेशव्यांच्या सरदारांची इभ्रत कायम राखण्याच्या हेतूनें नानांच्या अजस्र कुटिल कारस्थानाग्नींत आत्महिताचा सर्वस्वी होम केला असेंच दिसून येतें. दादासाहेबांबरोबर असलेल्या

त्यांच्या पक्षांतील लोकांना शिक्षा करून द्वेषबुद्धीनें नानांकडून त्यांची कशी वासलात लावण्यांत आली हेंही दाखविण्यांत आलें आहे. ( पान ६०२ कलम १६ ). मुत्सद्यांनीं दादासाहेबांना दरसाल सात लक्ष रुपये देऊन झांशीस शिंद्यांच्या बंदोबस्तांत ठेवण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें शिंद्यांचा सरदार हरी बाबाजी याच्या संरक्षणाखालीं झांशीकडे त्यांची रवानगी झाली.

झांशीस जात असतांना वाटेंत त्यांना आनंदीबाई मंडलेश्वराहून अमृत-राव व बाजीराव या मुलांसह येऊन बऱ्हाणपुरास भेटल्या. या प्रवासांतच दादासाहेबांना नानांचा व शिंद्यांचा आपल्याला झांशीस नेऊन कैदेंत टाकण्याचा डाव आहे असें समजलें. त्यांतच त्या वेळीं शिंद्यांचा सरदार हरी बाबाजी यानें दादासाहेबांचा अपमान केल्याची भर पडून हा समज बळावला. त्यामुळें आपल्या स्वातंत्र्याला पुढें धोका येणार म्हणून त्यांतून सुटका करून घेण्याचा दादासाहेबांनीं प्रयत्न चालविला. त्याच्या फौजेनें हरी बाबाजीच्या फौजेबरोबर चोळीमहेश्वर येथें लढाई दिली. दादासाहेबांजवळ जरी सैन्याचें बळ अगदींच कमी होतें, तरी त्यांनीं मोठ्या शौर्यानें आणि आपल्या रण-कौशल्यानें हरी बाबाजीचा पूर्ण पराभव करून या लढाईंत त्यांनीं यश संपादन केलें. नंतर ते आपल्या सैन्यासह मोठमोठ्या मजलांच्या भराऱ्या मारून सुरतेस इंग्रजांना जाऊन मिळाले. इंग्रजांनीं दादासाहेबांचें शौर्य पाहून त्यांना पुन: आश्रय दिला व त्यांस दरमहा पन्नास हजार रुपये देण्याचें ठरविलें. यामुळें बारभाईचें इंग्रजांशीं पुन: बिनसलें व त्यांची लढाई सुरू झाली. बारभाईंना हैदरची चांगलीच मदत झाली. हैदरनें इंग्रजांवर चाल करून त्यांचें चांगलेंच नुकसान केलें. त्यामुळें बारभाई व हैदर या दोघांबरोबर लढत देण्याचा प्रसंग टाळावा म्हणून इंग्रजांनीं शिंद्यांमार्फत बारभाईशीं तारीख १७ मे सन १७८२ रोजीं सालबाईचा तह केला. ग्रंथकारांनीं या तहाच्या पूर्वी घडलेल्या गोष्टींचें वर्णन करून तहाच्या सर्व अटीही दिलेल्या आहेत. ( पान ६२८ ). त्यांतील पांचवी अट अशी होती कीं, " इंग्रजांनीं राघोबाचा पक्ष कायमचा सोडावा व राघोबादादांनीं दरमहा पंचेवीस हजार रुपयांची नक्त नेमणूक घेऊन गोदा-

तीरीं इच्छेस येईल त्या ठिकाणीं रहावें. " नानांनीं या तहावर सही करण्यास दिरंगाई केली. त्यांचें म्हणणें दादासाहेबांनीं प्रथम आपल्या ताब्यांत यावें व त्यांनीं परभारें इंग्रजांशीं तहाची वाटाघाट करूं नये असें होतें. परंतु जोरावर असलेल्या मध्यस्थ शिंद्यांनाच या तहाच्या सर्व अटी पूर्णपणें मान्य असल्यानें नानांना मुकाट्यानें तो तह मान्य करावा लागला. त्यांनीं सन १७८३ च्या फेब्रुवारी महिन्यांत त्या तहनाम्यावर पेशव्यांची मखलाशी करून दिली.

यानंतर इंग्रजांनीं दादासाहेबांना खर्चाची नेमणूक देण्याचें नाकारलें. तेव्हां दादासाहेबांनीं त्यांचा आश्रय सोडून दिला. शिंद्यांनीं त्यांना आपल्याकडे बोलविलें असतांही ते त्यांच्याकडे गेले नाहींत. परशुरामभाऊ पटवर्धन व हरिपंत फडके वगैरे सरदारांना पत्रें पाठवून त्यांच्या मदतीनें ते सन १७८३ च्या जुलै महिन्यांत सुरतेहून निघून गोदातीरीं कोपरगांवाला जाऊन राहिले. साल्बाईच्या तहाप्रमाणें त्यांना पेशवे सरकारांतून नेमणूक मिळूं लागली. नंतर लवकरच त्यांची प्रकृति ज्वरानें बिघडून त्यांतच त्यांचें तारीख ११ डिसेंबर सन १७८३ रोजीं देहावसान झालें. आनंदीबाईच्या उत्कट इच्छे-प्रमाणें नानांच्या कारभाऱ्यांकडून दादासाहेबांच्या अस्थीसुद्धां गंगेंत विसर्जन करण्यांत आल्या नाहींत ! असो ग्रंथकारांनीं पेशवे कुळांतील या थोर पुरुषाच्या आयुष्क्रमांत घडलेल्या वरील महत्वाच्या गोष्टींचें प्रसंगानुसार सवि-स्तर वर्णन केलें आहे. त्यांनीं दादासाहेबांच्या अंगीं असलेल्या अमोलिक गुणांचें वर्णन सविस्तरपणें केलें आहे. ( पान ६३४ कलम २५ ).

राघोबादादांची विद्याभिरुचि चांगलीच होती. अलिकडेच प्रसिद्ध झालेलें पेशवे दप्तर भाग २२ पृष्ठ ९४ यांत दिलेल्या माहितीवरून राघोबादादांच्या पुस्तकाच्या बद्दलचा खासगत खर्च ८६००० रुपयांचा झाल्याचें दिसून येतें. शास्त्रीय, धार्मिक व भक्तिप्रधान ग्रंथांचा संग्रह त्यांनीं बराच केल्याचें दिसतें. त्यांचें वर्तन पूर्ण धार्मिक होतें. ते भजन, पूजन, व्रतें, अनुष्ठानें करण्यांत आपल्या विश्रांतीचा बराच काल खर्च करीत असत. ते नित्य भजन करीत एवढेंच नव्हे तर त्या भजनांत स्वतः रचलेलीं पदें म्हणत

असत; ते प्रासादिक कवीही होते असें वर्णन करून खुद्द त्यांनीं रचलेलें भक्तिरसपूर्ण एक पद जुन्या बाडांतून उपलब्ध झालेलें ग्रंथकारांनीं दिलें आहे. ( पान ६३६।६३७ ).

या थोर ऐतिहासिक विभूतीवर कांहीं लोकांकडून आजवर घेतल्या गेलेल्या आक्षेपांचें सयुक्तिक निरसन करून त्यांच्या चारित्र्याचें शुद्ध स्वरूप सविस्तरपणें ग्रंथकारांनीं **प्रथमतःच** दिलेलें आहे.

आनंदीबाई राघोबादादांच्या मागें अकरा वर्षें राहिल्या. नानांनीं त्यांच्यावर देखरेख करण्याकरतां आपल्या पूर्ण विश्वासांतील कारभारी नेमून त्यांना नजरकैदेंतच ठेविलें होतें. आनंदीबाई याही धार्मिक वृत्तीच्याच होत्या. त्या सुविद्य असून त्यांचाही धार्मिक ग्रंथसंग्रह चांगलाच होता. त्या आपला बराच काल दानधर्म, व्रतें--वैकल्यें, भागवत--भारत वगैरे धार्मिक ग्रंथांचें वाचन करण्यांत घालवीत असत. त्यांचा सूडबुद्धीनें नानांनीं नाना तऱ्हेचा छळ करून त्यांना आपला जीव नकोसा करून कसा टाकला होता, याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारांनीं केलें आहे. ( पान ७९७ कलम १३ ). नारायणरावांच्या वधासंबंधीं त्यांच्यावर कारस्थानी लोकांकडून करण्यांत आलेल्या आरोपांचें सयुक्तिक निरसन ग्रंथकारांनीं केल्याचें मागें दाखविलेंच आहे. धारच्या किल्ल्यांत असतां राजकारणाची घडी सुधारण्याच्या हेतूनें त्यांनीं नाना व बापू यांना कशीं पत्रें पाठविलीं याचा उल्लेख करून या बाईच्या योग्यतेचें मार्मिक वर्णन ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत केलें आहे: " हें पत्र व आनंदीबाईचीं दुसरीं कित्येक पत्रें चाळलीं असता आनंदीबाई ही एक मोठी राजकारणी स्त्री होती असेंच म्हणावे लागतें. परंतु तिच्या दुर्दैवानें आणि मुत्सद्यांच्या कुटिल कारस्थानानें तिच्या राजकारणाचा प्रभाव दिसावयाला संधि मिळाली नाहीं एवढें मात्र खरें. पेशवे घराण्यांत आनंदीबाईसारखी तेजस्वी, धीरवान, स्वाभिमानी आणि राजकारणकुशल अशी दुसरी स्त्री झाली नाहीं. " ( पान ७९४ ). " आनंदीबाईच्या निधनानें एकंदरींत एका हुशार, चाणाक्ष, राजकारणकुशल, सदाचारी, बाणेदार, आणि वीरवृत्ति असलेल्या स्त्रीरत्नाला अखिल महाराष्ट्र पारखा झाला यांत संशय नाहीं."

# सदाशिवरावभाऊ व तोतयाचें बंड.

सदाशिवरावभाऊ हे चिमाजीआपांचे पुत्र होत. त्यांचा जन्म इ. स. १७३० मध्यें झाला. छत्रपती शाहुमहाराजांनीं पहिल्या बाजीरावांना जेव्हां पेशवाईचीं वस्त्रें दिलीं, तेव्हां चिमाजीआपांना दुय्यम पेशव्याचीं, अर्थात् पेशव्यांच्या कारभारीपणाची, वस्त्रें देण्यांत आलीं होतीं. या योजनेच्या परंपरेला अनुसरून चिमाजीआपांचे पश्चात् सदाशिवरावभाऊंना छत्रपतींकडून पेशव्यांच्या कारभाऱ्याचीं वस्त्रें मिळाली परंतु या वेळीं ते अज्ञान असल्यामुळें नानासाहेबांनीं त्यांचें कारभारीपणाचें काम करण्याकरतां महादजीपंत पुरंदरे यांना नेमलें. सदाशिवरावभाऊ यांची छत्रपतींनीं नेमणूक केल्यानंतर सुमारें एक वर्षपर्यंत त्यांना नानासाहेबांनीं साताऱ्याहून पुण्यास नेलें नाहीं. यासंबंधीं नानासाहेब साताऱ्यास गेल्या वेळीं छत्रपती शाहुमहाराजांनीं त्यांना " सदोबास पुण्यास न्यावयाचें नाहीं कीं काय ? " असें विचारलें. त्यामुळें नानासाहेबांनीं सदाशिवरावभाऊंना आपल्याबरोबर पुण्यास नेलें. ही गोष्ट नानासाहेबांची पत्नी गोपिकाबाई यांना मुळींच आवडली नाहीं. त्यांनीं नानासाहेबाना " असे भाऊबंद जवळ आणून आपले पोरांस ठिकाण नाहीं असें करतील " असा टोमणा मारला. गोपिकाबाई सदाशिवरावभाऊंचा द्वेष करीत असत. नानासाहेबांनाही भाऊंचा प्रत्यक्ष राज्यकारभारांत शिरकाव व्हावा असें वाटत नव्हतें. त्यांनीं भाऊंच्या हातीं प्रत्यक्ष कारभार न देतां त्यांना खतावणीवर घातल्यासारखें करून फक्त खर्डेघाशी करण्यास लाविलें. भाऊंच्या या स्थितीचें वर्णन पेशव्यांच्या बखरींत " भोजन करून पंक्तीस होते. कामकाज कांहीं नाहीं. पंक्तीस जेवावें, दप्तरांत लिहावें. " असें केल्याचें दाखवून नानासाहेबांचा व गोपिकाबाईंचा भाऊसाहेबांच्या हातीं पेशवाईचा खरा कारभार न देण्याबद्दल आणि भाऊसाहेबांचा तो हस्तगत करण्याबद्दल कसकसे प्रयत्न करण्यांत येत होते याचें वर्णन ग्रंथकारांनीं केलें आहे. (पान १२ कलम १५). ' ज्याच्या हातीं ससा तो पारधी ' या न्यायानें नानासाहेब व गोपिकाबाई यांच्या सत्तेपुढें भाऊसाहेबांचें कांहीं चालणें शक्य नव्हतें.

पेशव्यांनीं छत्रपती रामराजे यांचेकडून सांगोलें मुक्कामीं राजीनामा घेतल्यावर कोल्हापूरच्या संभाजीमहाराजांना सातारच्या गादीवर आणण्याचा ताराबाईंनीं प्रयत्न चालविला. त्याला सदाशिवरावभाऊ व इतर कांहीं सरदार यांची मदत होती. नानासाहेब पेशवे संभाजीमहाराजांशीं स्वतःच केलेल्या कराराविरुद्ध वागूं लागल्यानें संभाजी महाराजांनीं सदाशिवरावभाऊंना करवीरच्या राज्याचा पेशवा नेमिला व त्यांना पारगड, कलानिधीगड व चंदगडी असे तीन किल्ले व पांच हजारांची नेमणूक देण्याचें ठरविलें. नानासाहेबांना ही हकीकत समजतांच त्यांची पांचावर धारण बसली. संभाजीमहाराजांचे पेशवे या हक्कदार नात्यानें आपल्या पेशवेपदाला चांगलाच धोका येणार असें त्याना साहाजिकपणें वाटलें. त्यांनीं भाऊसाहेबांना वश करून घेण्याची खटपट चालविली. भाऊसाहेब त्या वेळीं साताऱ्यास असल्यानें नानासाहेबांनीं त्यांना "जर भाऊ असलेस पत्रदर्शनीं येणें " अशा मजकुराचें कळकळीचें पत्र पाठवून पुण्यास बोलाविलें आणि त्यांच्या सर्व मागण्या मान्य करून त्यांची पेशवाईच्या कारभाऱ्याच्या जागीं नेमणूक केली. या नानासाहेबांच्या धोरणी मनसुब्यानें सातारचे पेशवे व करवीरचे पेशवे असे पेशवाईचे हिस्से पडण्याचें टळलें. तथापि त्यामुळें खुद्द पेशव्यांच्या घरांतील भाऊबंदीचें वातावरण कांहीं निवळलें नाहीं. भाऊसाहेबांकडे कारभारीपद आल्याचें पाहून गोपिकाबाईंना फार वाईट वाटलें. त्यांच्या रागाचा पारा चढून भाऊबंदकीस ऊत येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं.

भाऊसाहेबांच्या हातीं पेशवाईचा कारभार आल्यावर त्यांनीं तो किती दक्षतेनें, चाणाक्षपणानें, निस्पृहतेनें व कसोशीनें चालविला व त्यामुळें पेशव्यांच्या राज्यकारभारांत कशी सुधारणा झाली, याचें सविस्तर वर्णन करण्यांत आलें आहे. ( पान ८७ कलम १ ). राज्यकारभारांत भाऊसाहेबांचें धोरण काटकसरीचें होतें. राघोबादादांनीं सन १७५८ सालीं उत्तर हिंदुस्थानांत अटकेपर्यंत मोहीम करून, तेथपर्यंत मराठ्यांचा झेंडा फडकवून परत आल्या वेळीं भल्या मोठ्या यशाबरोबर भला मोठा कर्जाचा बोजाही आणला होता. हें भाऊसाहेबांना न आवडून त्यासंबंधीं हिशोबाची झडती घेतांना त्यांनीं

दादासाहेबांची चांगलीच हजेरी घेतली. त्यामुळें त्या उभयतांत कलहाग्नि पेट-ण्यास सुरवात झाली. त्या नंतर नानासाहेबांनीं त्यावर अशी तोड काढली कीं, यापुढें राघोबादादांनीं कारभार पहावा व भाऊसाहेबांनीं मुलुखगिरी करावी. हें सुचविण्यांत नानासाहेबांचा दुसराही अंतस्थ भाऊबंदीचा हेतु होता हें मागें दाखविलेंच आहे. भाऊसाहेबांनीं मुलुखगिरी करण्याचें काम पत्करिल्यामुळें पुण्यास न राहतां ते वानवडीस छावणी करून राहिले. त्या वेळीं त्यांच्यावर मारेकरी घालण्यांत आले. मुजफरखान पठाण भाऊसाहेबांच्या विरुद्ध होता. त्याच्या सांगण्यावरून मारेकऱ्यांनीं भाऊंवर हल्ला केला होता. परंतु भाऊसाहेबांच्या नोकरांच्या दक्षतेमुळें त्यांतून ते थोडीशीच जखम होऊन निभावले. मुजफरखाम व त्याचे हस्तक यांना पकडून योग्य शिक्षा करण्यांत आल्या. भाऊसाहेबांवर मारेकरी घालण्याच्या या कटाच्या बुडाशीं भाऊबंदकीच्या द्वेषबुद्धीनें प्रेरित झालेल्या गोपिकाबाईचें कारस्थान असावें असें ग्रंथकारांनीं सयुक्तिकपणें दाखवून दिलें आहे. ( पान ९२ कलम ८।९. ).

गोपिकाबाई स्वार्थी असल्यानें आपल्या स्वार्थाआड भाऊसाहेब येतात अशा समजुतीनें त्या भाऊसाहेबांचा द्वेष करीत असत. त्याचप्रमाणें गोपिका-बाईच्या राजपक्षांतील पुरुषोत्तम दाजी पटवर्धन, तसेच इतर पटवर्धन सरदार, सदाशिवरावभाऊंचा द्वेष करीत होते. ही त्यांच्यामधील एकमेकांविषयींची द्वेषभावना ग्रथकारांनीं हरिवंशांतील उतारा दिला आहे, त्यावरून स्पष्टपणें दिसून येते. ( पान ९६ कलम १५ ).

भाऊसाहेबांकडे मुलुखगिरीची कामगिरी सोंपविल्यामुळें पानिपतच्या लढाईवर त्यांचीच प्रामुख्यानें योजना करण्यांत आली. या मोहिमेचें आधिपत्य नानासाहेबांनीं आपला मुलगा विश्वासराव याजकडे दिलें होतें. तरी त्यासंबंधीं भाऊसाहेबांच्या मनांत वैषम्य उत्पन्न झालें नाहीं. विश्वासरावांना पुढारीपणा देण्यांत नानासाहेबांचा डाव उघड दिसण्याजोगा होता तरी भाऊसाहेबांच्या मनोभावना यासंबंधीं कशा शुद्ध होत्या हें दाखवून देण्यांत आलें आहे. ( पान ९८ कलम १७ ) या मोहिमेच्या कामीं विश्वासरावांबरोबर पटवर्धनांपैकीं

निदान गोपाळरावांनीं तरी जावें अशी गोपिकाबाईंची इच्छा होती. परंतु भाऊ-साहेबांनीं तो बेत हाणून पाडला.

भाऊसाहेब हेही जात्या 'पराक्रमीच होते. पानिपतच्या लढाईवर जाण्यापूर्वी भाऊसाहेब, दादासाहेब व विश्वासराव या तिघांनीं निजामअल्ली-वर स्वारी करून उदगीरच्या लढाईंत त्याचा पूर्ण पराभव केला व त्याला तहाची याचना करावयास लाविलें. त्यांनीं त्याच्यावर चांगल्याच फायदेशीर अटी लादून पेशव्यांना विजयश्री मिळवून दिली. यानंतर भाऊसाहेब विश्वास-रावांना घेऊन पानिपतच्या मोहिमेवर गेले. नाना फडनविसही बरोबर गेले होते. भाऊसाहेबांची मोहिमेकरतां कसकशी तयारी होती— त्यांनीं सरदार लोक कसे गोळा केले, फौजफाटा कसा व किती मिळविला, दारूगोळा व लढाईला लागणारें सामान कसें सज्ज केलें याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारांनीं केलें आहे. ( पान ९९।१०० कलम १९ ). या मोहिमेवर जात अस-तांना वाटेंत धोलपुर मुक्कामीं त्यांना शिंदे होळकर यांजकडून पत्रद्वारां "तुम्हीं आतांच पुढें येऊं नये. आम्हीं गनिमी काव्यानें शत्रूस जेरीला आणतों, प्रसंग पडेल त्याप्रमाणें आपण पुढें यावें," असा सल्ला दिला गेला. शिंदे होळकर यांचे विषयीं भाऊसाहेबांचे मन शुद्ध नसल्यामुळें असा सल्ला देण्यांत त्यांचा कांहीं स्वार्थी डावपेंच असावा असें वाटून भाऊसाहेबांनीं तो न मानतां मोहिमेचें काम चालूच ठेविलें. समक्ष गांठ पडले वेळीं होळकरांनीं त्यांच्याकडून हा सल्ला न मानण्यांत झालेली चूक स्पष्टपणे त्यांच्या नजरेस आणिली. पण भाऊसाहेबांनीं त्यावरून बोध घेऊन चूक सुधारण्याचा प्रयत्न केला नाहीं. भाऊसाहेबांनीं दिल्लीस मोर्चे लावून दिल्ली सर केली. दिल्लींत शिरून त्यांनीं बादशाही सिंहासनावरील चांदीचें छत फोडून त्याचें सत्रा लक्ष रुपयांचें नाणें पाडलें. त्यांनीं पन्नास लक्ष रुपये देण्याबद्दल गोविंदपंत बुंदेल्यांना तसदी लाविल्या-मुळें ते चुकवाचुकव करून आपल्या सैन्यासह निघून गेले. मोहिमेवर असतां दादासाहेबांच्या व भाऊसाहेबांच्या वागण्यांत कसा महत्वाचा फरक होता हें ग्रंथकारांनीं स्पष्टपणें दाखवून दिलें आहे. ( पान १०१।१०२ कलम २०।२१ ) विधिनिषेधाची पर्वा न करतां पैसा गोळा करणे हें

ध्येय भाऊसाहेबांनीं ठेविल्याचें दिसतें. जरी पैसा मिळाला नाहीं व कर्ज करण्याचा प्रसंग आला, तरी मागचें पुढचें धोरण संभाळून आपला आब राखून व शक्य तों सर्वांना राजी राखून अंतिम हित साधण्याचें दादासाहेबांचें धोरण होतें. त्यामुळें दादासाहेबांना जिवास जीव देणारे शूर लोक नेहमीं वश असत. त्यांच्या सैन्यांत सहसा फुटीला अवसर मिळत नसे. भाऊसाहेब जरी राज्यकारभारांत कुशल होते तरी त्यांना आपल्या वागणुकीनें या प्रसंगीं हें लष्करी धोरण संभाळतां आलें नाहीं व त्यांची या मोहिमेवर केलेली योजना चुकीची होती असा निष्कर्ष ग्रंथकारांनीं काढला आहे. ( पान १०२ कलम २१ ).

या पानिपतच्या घोर संग्रमांत प्रत्येक पक्षाची तयारी कशी होती, त्यांचें सैन्यबळ किती होतें, उभय पक्षांनीं आपापल्या सैन्याची रचना कसकशी केली होती, त्यांनीं एकमेकांवर हल्ले कसे चढविले, जयापजयाचें पारडें कसें फिरत होतें, त्याचा अखेर परिणाम काय झाला याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारांनीं केलें आहे. ( पान १०२ ते १०६ ). लढाईच्या गर्दींत अंबारींत बसलेल्या विश्वासरावांना गोळी लागून ते जखमी होऊन मरणाच्या द्वारीं पडल्यावेळीं भाऊसाहेबांनीं त्यांना गांठलें. तशा स्थितींतही विश्वासरावांनीं " तुम्ही चला, लढाई बिघडेल " असें भाऊसाहेबांना सांगितलें. विश्वासराव जगण्याची आशा नाहीं असें भाऊसाहेबांना दिसून आल्यामुळें तेही जिवावर उदार होऊन समशेरबहादरासह लढाईचे गर्दींत घुसले. तो रागरंग पाहून सोनाजी भायकर व तुकोजी शिंदे यांनीं " या वेळीं आपण आपला जीव वांचवा नाहीं तर सर्व नाश होईल. " असें भाऊसाहेबांना सांगितलें. त्यास भाऊसाहेबांनीं " विश्वासराव ठार झाले, आतां नानासाहेबांना तोंड दाखविण्यास मार्ग नाहीं " असें उत्तर देऊन मोठ्यानें ओरडून आपल्या सैन्याला उत्तेजन देत त्यांनीं शत्रूवर निकराची चाल केली. ते लढाईचे गर्दींत मिसळले. मराठ्यांचा मोड झाल्यानें कित्येक लोक शत्रूकडून पकडले गेले. कित्येकांची कत्तल केली गेली.

भाऊसाहेबांचा पत्ता लागला नाहीं. काशीरायाचें म्हणणें कीं, "त्यांचें धड सांपडलें. शीरही एका दुराण्यानें नेलेलें आणून दिलें व त्या शरीराचें यथाविधि दहन करण्यांत आलें" असें आहे. 'भाऊसाहेबांची कैफियत' 'भाऊसाहेबांची बखर' 'रघुनाथ यादवकृत पानिपतची बखर' वगैरे ऐतिहासिक ग्रंथांतून भाऊसाहेबांचा पत्ता लागला नाहीं असें वर्णन केलेलें आहे. याप्रमाणें भाऊसाहेब लढाईचे गर्दीत मिसळून दिसेनासे झाले, निघून गेले व बेपत्ता झाले याच गोष्टीवर बहुतेक इतिहासकारांनीं व बखरीकारांनीं विश्वास ठेविला आहे असें दिसून येतें. त्याचप्रमाणें या ग्रंथकारांनींही भाऊसाहेब मारले न जातां गर्दींतून निघून गेले व बेपत्ता झाले असाच निष्कर्ष काढला आहे. (पान १०६।१०७ कलम २९).

## तोतयाचें बंड.

ग्रंथकारांनीं 'तोतयाचें बंड' हें एक स्वतंत्र प्रकरण लिहिलें असून त्यांत या संबंधीं महत्वाच्या गोष्टींची सविस्तर चर्चा केली आहे. पानिपतवरून सरदारमंडळी, इतर सैनिक व बाजारबुणगे वगैरे पळून गेल्यावर पार्वतीबाईही परतल्या व त्यांनीं दिल्लीचा मुक्काम गांठला. त्यांचीही ठाम समजूत 'भाऊसाहेब निघून गेले, ते खास परत येतील' अशी असल्यानें तेथेंच त्यांनीं सदाशिवरावभाऊंची पुष्कळ वाट पाहिली. पुढें शत्रू पाठलाग करीत असल्यानें त्या तेथून कूच करून ग्वाल्हेरीस गेल्या. वाटेंत त्यांना नाना पुरंदरे भेटले. ग्वाल्हेरीहून नाना पुरंदरे यांनीं भाऊसाहेबांच्या शोधार्थ कांहीं बैरागी लोकांना पाठविलें. सर्व माहितगार मंडळींना भाऊसाहेब गर्दींत शिरून बेपत्ता झाले असें समजल्यानें व त्यांच्या मरणासंबंधीं कोणासही माहिती न मिळाल्यामुळें त्यांना शोधून काढण्याकरतां हा उपाय योजण्यांत आला असें उघड दिसून येतें. काशीरायांनीं भाऊसाहेबांच्या मरणासंबंधीं पुढें मांडलेल्या पुराव्याची यथायोग्य व सप्रमाण छाननी करून व त्याबद्दल सविस्तर चर्चा करून तो पुरावा अगदीं लंगडा असून मुळींच विश्वासार्ह नाहीं, एवढेंच नव्हे तर, तें अद्भुतरम्य गोष्टींचें जाळेंच आहे

असें ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे. ( पान ४४० ते ४४७ कलम ५ ते १४ ). भाऊसाहेब मारले गेले नाहींत, ते आज ना उद्यां परत येतील, असें ह्मणणाऱ्या पक्षाजवळ त्या वेळीं अखेर निर्णयाच्या दृष्टीनें विश्वसनीय पुरावा नसून त्यांचें गार्‍हाणेंही लंगडेंच होतें. अशा संशयास्पद परिस्थितींत लबाड लोकांचें चांगलेंच फावतें. पराक्रमी व गुणी मनुष्याच्या महत्वाचा फायदा पदरांत पाडून घ्यावा म्हणून अशा संधीचा फायदा घेऊन तो मनुष्य आपणच खरोखर आहों असें भासवून लोकदृष्टीला भुरळ पाडणारे वेषधारी तोतये जगाच्या रंगभूमीवर प्रकट होत असतात. ही तोतयाची प्रथा फार पुरातन काळापासून चालत आल्याचें दिसून येतें. श्रीकृष्णाच्या वेळीं करूष देशाचा अधिपती पौंड्रक नावाचा होता. तो तोतया वासुदेव बनला. तो शंखचक्रादि आयुधें धारण करूं लागला व त्यानें खऱ्या श्रीकृष्णास ‘ मी खरा वासुदेव आहे, तूं तोतया वासुदेव आहेस ’ असा निरोपही पाठविला. श्रीकृष्णानें त्याला खरमरीत उत्तर पाठविलें व त्याच्यावर स्वारी करून त्याला देहांत प्रायश्चित्त देऊन त्याचें यथायोग्य पारिपत्य केलें व खरा वासुदेव कोण व तोतया कोण हें त्याच्या चांगलेंच प्रत्ययाला आणिलें. ( श्रीभागवत स्कंध १० अध्याय ६६ ).

अलिकडील इतिहासांत वेळोवेळीं घडून आलेलीं तोतयाचीं कांहीं उदाहरणें ग्रंथकारांनीं दाखवून दिलीं आहेत. ( पान ४४८ कलम १५ ) हुबेहुब तोतयाचें सोंग उठविण्यास कोणती सामुग्री व कोणकोणते गुण अंगीं असणें आवश्यक आहे याची यथोचित मीमांसाही ग्रंथकारांनीं केली आहे. ( पान ४४८ कलम १६ ). या प्रसंगीं आपण खरे सदाशिवरावभाऊ आहोंत असें म्हणणारे तीन इसम पुढें आले. नंबर एकचा तोतया पानिपतच्या संग्रामानंतर वर्ष दीड वर्षानें काशी येथें प्रकट झाला. ही हकीकत शिंद्यांना समजतांच, शिंद्यांचे दिवाण जिवबादादा बक्षी हे स्वतः काशीस गेले व त्यांनीं त्याला तोतया ठरवून त्याचा दंगा मोडला. त्याला त्यांनीं कैद केलें व चुनारच्या किल्ल्यांत नेऊन ठेविलें. तेथून त्याला गोरखपूरच्या किल्ल्यांत ठेविलें व तेथेंच

तो मरण पावला. याप्रमाणें नंबर एकच्या तोतयाचें बंड मोडलें गेलें. ( पान ४४९ कलम १७ ). दुसरा इसम, खरे भाऊसाहेब, झांशी प्रांतीं प्रकट झाले. ते गोसाव्याच्या वेषांत होते. त्यांना कांहीं इसमांनीं झांशी प्रांतांतील नरवर मुक्कामीं ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत म्हणून ओळखिलें. ही वार्ता कानीं पडतांच त्या प्रांतांतील अधिकारी नारो शंकर राजेबहादर यांचा पुतण्या विश्वासराव यांनीं कांहीं विश्वासुक लोक पाठवून ते खरे भाऊसाहेब असल्याबद्दल आपली खात्री करून घेतली आणि सामोरें जाऊन त्यांना करेरा किल्ल्यावर नेलें. तेथें त्यांना आजूबाजूचे अधिकारीही येऊन भेटले. ग्वाल्हेरचे शिवाजीपंत मुजुमदार व आबाजीपंत चिटणीस यांनी व दुसऱ्या बऱ्याच लोकांनींही त्यांची भेट घेतली. ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत अशी त्या सर्वांची खात्री झाली. करेऱ्यास असतांना भाऊंच्या जिवाला दगा करण्याचा प्रयत्न विरुद्धपक्षाकडून करण्यांत आला. परंतु सुदैवानें त्यांतून ते शीरसलामत निभावले. त्यानंतर त्यांनीं कांहीं फौजफांट्याचा संग्रह करून डेरे, राहुट्या, हत्ती, पालख्या, नौबती, निशाणें वगैरे पेशव्याच्या इभ्रतीस साजेल अशा लवाजम्यासह दक्षिणेकडे मोर्चा वळविला. पुण्यास पेशव्यांच्या दरबारीं यासंबंधीं वेळोवेळीं सर्व हकीकत त्यांच्या सरदारांकडून व अधिकारी वर्गाकडून व इतर लोकांकडूनही कळविण्यांत आली होती. ग्रंथकारांनीं समशेर बहादरच्या मेहुण्यानें नारायणरावांच्या नावें लिहिलेल्या पत्राचा व इतर लोकांच्या पत्रांचा उल्लेख केला आहे. त्यांतील मजकुरावरून त्या लोकांची हे इसम 'भाऊसाहेब' च असल्याबद्दल खात्री झाल्याचें दिसून येतें. ( पान ४५१ कलम २० )

या पत्रांतील माहितीमुळें व प्रत्यक्ष भाऊसाहेबांना पाहून आलेल्या कांहीं लोकांनीं सांगितलेल्या हकीकतीमुळें पुण्याच्या दरबाराला त्याचा विचार गंभीरपणें करणें भाग पडलें. या वेळीं तो इसम भाऊसाहेब नसून तो तोतयाच आहे असा पुणें दरबारचा सूर वाहत होता. वेदमूर्ती धोंडभट दात्ये हे उत्तरेस गेले होते. ते परत मिरजेस येऊन गोविंद हरी पटवर्धन यांना भेटले. त्यांनीं त्यांना चक्षुर्वै सत्यं असा आपला स्वतःचा अनुभव सांगून त्यांची या गोष्टी-

बद्दल खातरजमा केली व पुणें दरबार या गोष्टीची कशी हेटाळणी करीत आहे हेंही त्यांच्या नजरेस आणिलें. माधवराव पेशवे हे या वेळीं कर्नाटकांत हैदरवर स्वारी करण्याकरतां गेले असतां त्यांना ही हकीकत समजली. त्यानीं गोपिकाबाईच्या कारकुनास यासंबंधीं नाशिकला पत्र पाठविलें. ( पान ४५२ कलम २२ ). त्यांतील मजकुरावरून त्याचा संशययुक्त अभिप्राय व्यक्त होतो. त्यांनीं या पत्रातच " शाहाणा माणूस पाठवून बारीक शोध करवून लिहून पाठविणें " असा सूचनेवजा हुकूम केला आहे.

इकडे मल्हारराव होळकर यानीं या भाऊसाहेबाच्या स्वारीविरुद्ध मोहीम करून त्यांचा त्यांनीं पराभव केला व त्यांना नाशकास आणिलें. पुण्यास परत आल्यावर माधवरावांनी माणसें पाठवून त्यांना तेथें आणविलें व पर्वतीवर गोशाळेंत त्यांना ठेविलें. नंतर माधवराव व मुख्य मुख्य मुत्सद्दी यांनीं भाऊसाहेबाशीं ' करारमदार ' करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें काहीं थोर मुत्सद्दी, शास्त्री वगैरे मंडळी पर्वतीवर जाऊन त्यांना भेटली. परंतु ठरल्याप्रमाणें भाऊ-साहेबांशीं ' करारमदार ' न करता ते खरे भाऊसाहेब नव्हेत, तोतया आहेत असें त्यांनीं ठरविलें. त्यानंतर त्यांना तेथून उचलून धनगडच्या किल्ल्यावर ठेवण्यांत आले. ही गोष्ट थोरल्या बाजीरावांची बहीण अनुबाई, सदाशिवराव-भाऊ यांची पत्नी पार्वतीबाई, वगैरे आप्त मंडळीच्या मनाला पसंत पडली नाहीं. त्यांनीं या गोष्टीची पूर्ण चौकशी होणें जरूर आहे असा आग्रह धरल्यामुळें माधवरावांनीं चौकशीकरतां वेळोंवेळीं काहीं माणसें धनगडास पाठविलीं. परंतु तेवढ्यानें या मंडळींचें समाधान न झाल्यामुळें शेवटीं दीड वर्षानंतर भाऊसाहेबांना पुण्यास आणण्यांत आलें. वरील आप्त मंडळीपैकीं अनुबाईची योग्यता किती होती व त्यांचा राजकारणांत दर्जा कसा होता याचें वर्णन ग्रंथकारांनीं पुढील शद्बांत केलें आहे. " करवीर, सातारा, हैदर किंवा पेशवे या दरबारांतील इचलकरंजी संस्थानचें कोणतेंही राजकारण अनुबाई-च्याच नजरेखालीं होई एकंदरींत अनुबाई या राज्यकारभार जाणणाऱ्या, दरबारांतील मुत्सद्यांचीं धोरणें संभाळणाऱ्या, आपली इभ्रत, मान, प्रतिष्ठा,

त्याचप्रमाणें, आपल्या माहेरच्या पेशवेघराण्याचा नांवलौकिक ओळखणाऱ्या, अशा बुद्धिवान् व व्यवहारकुशल होत्या. '' ( पान ४५५ कलम २५ )

अनुबाई यावेळीं जरी साठ वर्षे वयाच्या होत्या तरी इचलकरंजी जहागिरीचा कारभार त्या स्वतःच पाहात होत्या. हा इसम खरा भाऊसाहेब आहे किंवा तो तोतया आहे हें ठरविण्याकरतां त्याला अनुबाईच्या वाड्यांतच कांहीं दिवस ठेवण्यांत आलें होतें. तो खरा भाऊसाहेब आहे असेंच त्यांच्या मतें ठरलें. इतर कांहीं आप्तइष्ट व बड्या बड्या मंडळींचें मत तो भाऊसाहेब आहे असेंच होतें. परंतु खुद्द माधवराव पेशवे व त्यांचे कारभारी यांनीं त्याला तोतया ठरविलें व त्याचें नांव ' सुखनिधान ' व तो जातीनें कनोजा ब्राह्मण असेंही ठरविण्यांत आलें. या ठरावाविरुद्ध आपल्या मनाची ' हे खरे भाऊसाहेब आहेत, तोतया नव्हेत ' अशी खात्री झाली असतांही कोणी कां उठावणी केली नाहीं हें ग्रंथकारांनीं " पेशवे व त्यांचे कारभारी यांच्या दहशतीमुळें कोणी तसें स्पष्ट बोलून दाखवीत नसत, इतकेंच, " असें खरेशास्त्र्यांच्या इचलकरंजीच्या इतिहासांतील विधान उद्धृत करून सयुक्तिकपणें दाखवून दिलें आहे. ( पान ४५५ कलम २६ )

याप्रमाणें ' तोतया ' असें ठरवून या इसमाला दौलताबादेच्या किल्ल्यावर कैदेंत ठेवण्यांत आलें. पेशव्यांनीं व पेशव्यांच्या कारभाऱ्यांनीं जरी या इसमास तोतया ठरविलें होतें, तरी त्याची वरचेवर चौकशी करण्यांत येत होती व त्याचें स्थलांतरही करण्यांत येत होतें, हें वैशिष्ठ्य लक्षांत घेण्याजोगें आहे.

' मी सदाशिवरावभाऊ आहे ' असें म्हणणारा तिसरा इसम कर्नाटकांत पुढें आला. हैदरअल्लीला चकवून कांहीं दिवस तो त्याचे दरबारींही राहिला होता. नंतर त्यानें महाराष्ट्रांत येऊन सैन्य जमवून बंड केलें. तें बंड मोडण्यांत येऊन त्याला ' देहांता'ची शिक्षा दिली गेली. परंतु नाना फडनविसांनीं त्याला दिलेली देहांताची शिक्षा अंमलांत न आणतां नगरच्या किल्ल्यांत त्याला कैदेंतच ठेविलें.

राघोबादादांची मुलगी दुर्गाबाई हिच्या लग्नाच्या वेळीं पार्वतीबाईंना सोंवळा करावी असें वाटत होतें. जबरीनें सोंवळी करण्याच्या विरुद्ध नारायणराव व खुद्द राघोबादादा हे असल्यानें या कामीं पार्वतीबाईंची संमति विचारण्यांत आली. वरील दुसरा इसम " भाऊसाहेबच " आहे अशी पार्वतीबाईंची खात्री असल्यामुळें त्यांनीं " पर्वतवासी ( किल्ल्यात कैदेंत ठेविलेले सदाशिवरावभाऊ ) आणून फडशा करून टाकणें. मग विधी उरकून टाकावा. " असें उत्तर, नव्हे, एक प्रकार आव्हानच दिलें. तें आव्हान स्वीकारण्याचें धैर्य दाखविण्यांत आलें नाहीं. यावरून पाणी कोठें मुरत होतें हें दिसून येतें. पार्वतीबाई स्वतःची मनोमन खात्री झाल्यामुळे आपल्याला सौभाग्यवती म्हणवीत असत. दुसरेही आप्तइष्ट त्याना सौभाग्यवती म्हणून संबोधित असत. त्या सौभाग्यालंकार धारण करीत होत्या. इतर स्त्रियाही त्यांची सुवासिनीप्रमाणें ओटी भरणें, त्यांना कुंकू लावणें वगैरे व्यवहार पाळीत होत्या. या सर्व व्यवहारावरून तो दुसरा इसम तोतया नसून खरा भाऊसाहेब असला पाहिजे असें सयुक्तिक विवेचन करून ग्रंथकारानीं दाखवून दिलें आहे. ( पान ४५७।४५८ कलम २९ ) मध्यंतरीं पार्वतीबाईंच्या समाधानाकरतां त्याचें टुमणें मागे लागल्यावरून कारभाऱ्यांनी पुरुषोत्तम दाजी पटवर्धन याना दौलताबादच्या किल्ल्यावर जाऊन या इसमाची परीक्षा करण्यास पाठविलें. त्यांनीं सदर इसमाची भेट घेऊन तो खरा भाऊसाहेब नसून तोतया आहे असा आपला अभिप्राय दिला. परंतु त्यांनी केलेली ही परीक्षा कशी चुकीची व अविश्वसनीय होती, एवढेंच नव्हे तर ही चौकशी म्हणजे मागें दाखविण्यांत आलेल्या दाजींच्या ' अद्भुत रम्य-लीला " पैकींच एक लीला होय असें ग्रंथकारांनीं या गोष्टीची सविस्तर चर्चा करून सिद्ध केलें आहे. ( पान ४५९ ते ४६२ कलम ३१ ते ३३).

अजमासें आठ वर्षांनंतर या दुसऱ्या इसमास दौलताबाद किल्ल्यावरून मिरजेच्या किल्ल्यावर आणिलें; कारण तो किल्ला रिकामा करून निजामाला द्यावयाचा होता. या इसमास मिरजेच्या किल्ल्यावर आणलेली संधि साधून अनुबाई यांनीं त्याच्याविषयीं चळवळ सुरू केली. ज्या पटवर्धनांच्या ताब्यांत त्याला दिलें होतें त्यांना मिरजेचा किल्ला केव्हां फितुर होईल याचा नेम नाहीं

अशी साधार भीति वाटून त्याला तेथून काढून दुसरीकडे ठेवण्यांत यावें याबद्दल त्यांनीं पुरंदरच्या कारभाऱ्यांकडे सारखें टुमणें लाविलें होतें. खुद्द पटवर्धन घराण्यांत या इसमाबद्दल मतभेद होता. भास्करपंत पटवर्धन व परशुरामभाऊ यांची आई या दोघाचे सदर इसम खरा भाऊसाहेब आहे असें म्हणणें होतें. अशा स्थितीत मिरजकिल्ल्यावरून त्याला हालविणे सदर किल्ल्याचे अधिकारी पांडुरंगराव पटवर्धन याना इष्ट वाटणें साहजिक होतें, असे ग्रंथकारानीं सयुक्तिकपणें दाखवून दिलें आहे. ( पान ४६२ कलम ३४ ) मिरज किल्ल्यावरून त्यास दुसरीकडे नेणार ही हकीकत पार्वतीबाईंना कळताच त्यांनीं नानाचे हस्तक पुरुषोत्तम दाजी याना निरोप पाठविला. त्यानंतर त्यानीं काहीं पत्रें पांडुरंगराव पटवर्धन याना सदर इसमास मिरजेहून न हालविण्याबद्दल लिहिलीं. तीं पत्रें ऐतिहासिक लेखसंग्रहातून ग्रंथकारानीं उद्धृत करून व त्यासंबंधीं चर्चा करून पार्वतीबाईंना फसविण्याच्या हेतूनें पुरुषोत्तम दाजींनी कशी कारवाई केली होती हें सिद्ध करून दाखविलें आहे. ( पान ४६३ ते ४६९ कलम ३५ ते ३९ ). पार्वतीबाईंनी वरचेवर यासंबंधीं केलेल्या तगाद्यावरून त्याची भाऊसाहेबासंबंधीं अंतःकरणाची तीव्र तळमळ व अनुकंपनीय मनःस्थिति दिसून येते. त्यानीं एका ब्राम्हण बैराग्याला स्वतःच्या खर्चानें मिरजेस पाठवून या गोष्टीची शहानिशा करण्याचें मनात योजिले होते. पण त्याप्रमाणें त्यांना कारभाऱ्यानीं करूं दिलें नाहीं. त्यात त्याचा अंतस्थ हेतु काय असावा हें उघड करून दाखविण्यात आलें आहे. ( पान ४६९ कलम ४० ). या इसमाला मिरज किल्ल्यावरून काढून रत्नागिरीच्या किल्ल्यावर नेऊन ठेवण्यात आलें. तेथील किल्लेदार रामचंद्रपंत नाईक परांजपे हे पेशव्यांचे आप्त होते. हा इसम खरा भाऊसाहेब असल्याबद्दल त्यांची व त्याचें कुटुंब अन्नपूर्णाबाई याची पूर्ण चौकशीअंतीं खात्री झाली. ज्याना ज्यांना यासंबंधीं संशयानें पछाडिलें होतें, त्यांची त्यांची ते खात्री पटवून देत होते. अन्नपूर्णाबाईंनीं पुरुषोत्तम दाजींना त्यांचा संशय दूर करण्याच्या हेतूनें समक्ष येण्याकरतां पत्रें पाठविलीं. तीं पत्रें नाना फडनविस याच्या नजरेसही आणलीं होतीं. असें असतां पुरुषोत्तम दाजी स्वतः होऊन रत्नागिरीस गेले नाहींत किंवा कार-

भाऱ्यांनींही त्यांना पाठविलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर तीं पत्रें नाना फडनविसांचे समक्ष फाडण्यांत आलीं. यावरून कारभाऱ्यांची व तसेंच पुरुषोत्तम दाजींची सत्यान्वेषण--बुद्धि काय दर्जाची होती हें चांगलेंच दिसून येतें. ( पान ४७३ कलम ४४ ).

रामचंद्रपंतांनींही भाऊसाहेबांच्या लगतच्या आप्तइष्टांना पत्रें पाठवून रत्नागिरीला बोलावून घेतलें व तो इसम खरा भाऊसाहेबच असल्याबद्दल सर्वांची खातरजमा केली. सर्वांनी स्वतः पूर्ण परीक्षा करून तो निःसंशय भाऊसाहेबच असल्याचें ठरविलें. नंतर त्याना कैदेतून मुक्त करण्यांत आलें व ते 'सदाशिवरावभाऊ पेशवे' असल्याबद्दल द्वाही फिरविण्यांत आली व त्यांच्या आज्ञेनें पुढील कारभार चालविण्याबद्दल सर्वांनी शपथक्रिया केली. ग्रंथकारांनीं यासंबंधींची ऐतिहासिक दोन पत्रें उद्धृत केलीं आहेत. पहिलें पत्र पांडुरंगराव पटवर्धन यांचें आहे व दुसरें परशुरामभाऊंची आई जानकीबाई यांनीं परशुरामभाऊंना ते कर्नाटकच्या मोहिमेकरतां गेल्यावेळीं पाठविलेलें आहे. ( पान ४७४।४७५ ) या पत्रात त्या म्हणतात "कोंकणांत भाऊसाहेब खेर जाहले. कारभारी होय नव्हे करतील, त्यात तुम्ही सहसा न पडावें. सर्वांचे मतें खरेच जाहले." या पत्रावरून वैदिक भट्ट मंडळींनीं त्यांची परीक्षा केल्याचें दिसून येतें. ग्रंथकारानीं या पत्राची व त्यात उल्लेखिलेल्या परीक्षेची सविस्तर चर्चा करून "एकंदरीत या पत्रावरून सर्वांच्या विचारानें व परीक्षेनें सदाशिवरावभाऊ खरे ठरले होते असें स्पष्ट दिसतें," असा निष्कर्ष काढला आहे तो सयुक्तिकच आहे.

यानंतर मुंबई सरकारांनीं कांहीं माणसें पाठवून यासंबंधी चौकशी करविली. त्यावरून त्यांचीही ते खरे भाऊसाहेब आहेत अशीच खात्री झाली. इंग्रजांनीं मुद्दाम आपला वकील पाठवून त्यांचा मोठा सन्मान केला. ( पान ४७७ कलम ४७ ).

याच्या विरुद्ध खुद्द माधवराव पेशवे यांनी व त्याच्या कारभाऱ्यानीं तो इसम तोतया आहे असे ठरविलें होतें. त्यांत त्याचें राजकारण व स्वार्थ कशा स्वरूपाचा होता हें दाखविण्याकरतां ग्रंथकारांनीं तीन मुद्दे काढून त्यासंबंधींच्या पुराव्याची सविस्तर चर्चा मुद्देसूदपणें केली आहे. ती मुळांतूनच वाचल्यानें वाचकाच्या नजरेसमोर साकल्यानें सर्व गोष्टी येऊन सदर इसम खरे भाऊसा-

बच होते या अंबेर निर्णयाविषयीं त्यांची सहज खात्री पटणारी आहे. ( पान ४७८ ते ४९६ कलम ४८ ते ७३ ).

त्याचप्रमाणें पुढें सन १७८७ च्या जुलै महिन्यांत रजपूत व पठाण यांच्याशी झालेल्या लालसोट येथील लढाईनंतर महादजी शिंद्यांना ग्वाल्हेरपर्यंत पिछेहाट करावी लागली. त्याचें 'परदेशी' लोकाचें सैन्य शत्रूला फितुर झाल्यामुळें व पेशव्याकडून त्याना मदत न होतां उलट विरोधच होत असल्याचें पाहून महादजींनीं नानांस मदतीकरता एक निर्वाणीचें पत्र धाडलें. हें पत्र ग्रंथकारांनीं पान ७१७।७१८ कलम ३ मध्यें उध्दृत केलें आहे. त्यात त्यांनीं नानांना "सदाशिवरावभाऊ याने राज्यावर माझा वारसा आहे असें बोलणें घालून बंड केलें होते, ते कोणी मोडलें ?" असा स्पष्ट सवाल करून टोमणा मारला आहे. यावरून ते खरे भाऊसाहेब आहेत अशी महादजींची खात्री असताही त्यांनीं नानाच्या मिंडेखातर नानाचा असत्पक्ष धरून भाऊसाहेबांचेंच बंड मोडलें होतें असे स्पष्ट दिसतें. हा बंड करणारा इसम तोतया नसून खरा सदाशिवरावभाऊ होता याचा हें पत्र बळकट पुरावाच होय असें मानण्यास हरकत नाही. यामुळे ग्रथकाराचे अनुमानास चागलीच बळकटी येते यात शंका नाहो.

वर दर्शविल्याप्रमाणे 'सदाशिवरावभाऊ पेशवे' या नावाची द्वाही फिरल्यावर ते 'पूर्वीप्रमाणें राज्यकारभार' पाहूं लागले. त्याना अनुबाईंचा नातु व्यंकटराव घोरपडे व इतर सरदार आपापल्या सैन्यासह उघडपणें येऊन मिळाले. पेशव्याच्या आरमारावरील अधिकारी धुळप यांनीं पेशव्याचें आरमारही त्यांच्या स्वाधीन केले. नंतर भाऊसाहेबांनी बरेच किल्लेही हस्तगत केले. नाना फडनविस यांना ही हकीकत समजताच त्यांनी भाऊसाहेबांशीं लढाई देण्याचे ठरवून शिंदे व होळकर याना त्याकरतां सैन्यासह पाचारण केलें. भाऊसाहेबानीं सुवर्णदुर्गचा किल्ला, तसेंच देवरूख, मलकापूर ही ठाणीं हस्तगत करून उत्तर कोकणही आपल्या अंमलाखालीं आणिलें. करवीरकर, हैदर व इंग्रज ( मुंबईकर ) हे त्याना अनुकूल होतेच. राघोबादादांचा दत्तक मुलगा अमृतराव हाही त्याना ससैन्य येऊन मिळाला. बोरघाट चढून त्यांनीं राजमाचीचा किल्ला घेतला व ते पुण्यावर चाल करून जाण्याचा विचार करूं लागले. पुण्याच्या कारभारी मंडळींनीं शिंदे येऊन

त्यांच्यावर चाल करून जाईपर्यंत त्यांना तेथेंच थोपवून धरण्याकरितां त्यांच्याशी तहाचें बोलणें सुरू केलें. ही तहाची कारवाई भुलथापीची होती असें ग्रंथकारांनीं उध्दृत केलेल्या ग्रँट डफच्या मराठयांच्या बखरींतील उद्गारावरून दिसून येतें. सरळवृत्तीच्या भाऊसाहेबांनीं या कारवाईवर विश्वास ठेवला. त्यामुळें त्यांचें ससैन्य गाफील स्थितींत राहिलें. ही स्थिति पाहून शिद्यांनीं त्यांजवर हल्ला केला व त्यांच्या सैन्याचा पुरा मोड केला. भाऊसाहेब त्यांना तेथून चुकवून पळाले व इंग्रजांच्या आश्रयाला जाण्याच्या हेतूनें त्यांनीं समुद्रमार्गें मुंबईची वाट धरली. वाटेत त्यांचें गलबत रघोजी आंग्र्यानीं पकडलें नंतर आंग्र्यांनीं व शिंद्यांनीं त्यांना पुण्यास आणिलें. मुंबईकर इंग्रजांना हें वृत्त समजताच त्यानीं आंग्र्यांना " सदाशिवरावभाऊंना आमच्या स्वाधीन करावें व तसें न केल्यास आम्ही तुमच्यावर स्वारी करूं " असा खलिता पाठवून तंबी दिली. कलकत्तेकर इंग्रज याचे वकील कर्नल अप्टन त्या वेळीं पुण्यास होते. त्यानीं मुंबईकरांना भाऊसाहेबासंबधीं योग्य चौकशी करण्यात येईल असें कळवून त्यांची खातरजमा केली. या कामीं नानांनीं आपलें बुद्धिकौशल्य लढवून कारस्थान कसें केलें व आपल्या धोरणाला अनुकूल होईल अशी आपल्या पसंताप्रमाणें सत्तावीस पंचाची चौकशी कमिटी कशी नेमून घेतली, हें ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे. ( पान ५०३।५०४ कलम ८० ते ८२ ) कामटीच्या चौकशीचें काम तारीख १२ डिसेंबर सन १७७६ रोजी सुरू झालें. तत्पूर्वी नानांनीं अशी एक अद्भुत घटना घडवून आणली कीं, त्यांनीं नगरच्या किल्ल्यावर कैदेंत ठेवलेल्या तिसऱ्या नबरच्या तोतयाला गुप्तपणानें पुण्यास आणविलें व खऱ्या भाऊसाहेबांना गुप्तपणानें सिंहगडावर पाठवून देऊन त्यांच्या जागीं त्याला ठेविलें. ही नानांची अदलाबदल अगदीं गुप्त स्वरूपाची होती. नगरच्या किल्यावरून आणलेल्या नंबर तीनच्या तोतयाला चौकशी कमिटीपुढें हजर करण्यापूर्वी त्याच्याकडून बेलभंडारा उचलवून जबाब देण्याची व तो कनोजा ब्राह्मण असून त्याचे आईबाप अमुक, अमुक आहेत, राहण्याचें ठिकाण अमुक आहे वगैरे पाठांतर करून घेऊन कबुली देण्याची रंगी तालीम कारभारी मंडळीकडून करून घेतली जात होती. त्याचप्रमाणें तो तोतया ठरविण्याबद्दल कागदपत्र तयार करण्याचेंही काम चालूच होतें. कमिटीच्या चौक-

शीचें काम पांच दिवस चालू होतें. त्यांत तोतयाला ( नगरच्या किल्ल्यावरील नंबर तीनच्या इसमाला ) समक्ष हजर करण्यांत येऊन त्याची तयार केलेली बाजू कमिटीपुढें मांडण्यांत आली. परंतु सदर चौकशींत असा चमत्कार घडून आला कीं, सदर तोतया कनोजा ब्राम्हण न ठरतां तो बाजी गोविंद या नांवाचा सोनार आहे असें निष्पन्न झालें. पंचांनीं मतैक्यानें त्याला तोतया ठरविलें व देहांताची शिक्षा दिली. त्याप्रमाणें त्याची धिंड काढून मेखसूनें डोकें फोडून त्याला ठार मारण्यांत आलें. आणि नंबर दोनच्या इसमाला म्हणजे खऱ्या भाऊसाहेबाना उपोषणें घालून सिंहगडावर ठार करण्यांत आलें.

तोतयाच्या जातीविषयीं, नांवाविषयीं, त्याला दिलेल्या शिक्षेविषयीं व ती कोठें व कशी अंमलांत आणिली या मुख्य मुख्य गोष्टींविषयीं, इतिहासकारांची एकवाक्यता नाहीं. वस्तुतः अशा मुख्य गोष्टीविषयीं मतभेदाला जागा नसावी. कोण म्हणतात " तो ब्राम्हण होता. " कोण म्हणतात " तो सोनार होता. " तसेंच शिक्षेच्या प्रकारासंबंधीं कोणी त्याला हत्तीच्या पायाखालीं देऊन मारिलें म्हणतात; कोणी मेखसूखालीं मारिलें म्हणतात; तर कोणी त्याला उपोषणें घालून मारिलें असे म्हणतात. तसेंच त्याला मारलेलीं ठिकाणें पुणें, नगर, सिंहगड अशीं निरनिराळीं देतात. असा मुख्य मुख्य गोष्टींविषयीं मतभेद होण्याचे कारण काय असावें याची चर्चा करून ग्रंथकारांनीं हा सर्व नानाच्या गुप्त कारस्थानाचाच खेळ होय असें दाखविलें आहे. त्यानीं या कारस्थानाचें वर्णन थोडक्यांत पुढील शद्बात दिलें आहे. " तो ( तिसरा तोतया ) भाऊसाहेबाप्रमाणेंच दिसत होता. याचा नानांनीं फायदा घेऊन, खऱ्या भाऊसाहेबाना सिंहगड किल्यावर पाठविलें व नगरच्या किल्ल्यांतील त्या तोतयाला भाऊसाहेबाच्या जागीं उभा केला. तो जातीचा सोनार होता. त्याचें नाव बाजी गोविंद असें होतें. मनुष्याची अदलाबदल करून या चौकशीच्या कामीं नानांनीं सर्वांवर मात केली व आपलें गुप्त कारस्थान यशस्वी केलें. " (पान ५१७ कलम १०६)

## प्रायश्चित्तप्रकरण.

तोतयाला मारल्यावर न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांनीं तोतयाचे संसर्गी व उपसंसर्गी लोकांना निरनिराळीं प्रायश्चित्तें देण्याचें फर्मान काढलें.

त्यासंबंधींचें आज्ञापत्र ऐतिहासिक लेखसंग्रहांतून उध्दृत करून व या प्रायश्चित्त प्रकरणाची सविस्तर चर्चा करून तीं प्रायश्चित्तें किती जबरदस्त व भयंकर होतीं हें ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे. ( पान ५०२ ते ५१६ कलम ९० ते १०४ ) खुद्द पेशव्यांचे आप्त व्यंकटराव घोरपडे यांना तीन चांद्रायण प्रायश्चित्तें दिलीं होती. चांद्रायण प्रायश्चित्ताचें स्वरूप शास्त्रीयदृष्ट्या कसें असतें हें आधारपूर्वक दाखवून देऊन व्यंकटरावांना दिलेलीं तीन चांद्रायणाची शिक्षा कशी घोर व प्राणांतिक होती याचें ग्रंथकारांनीं केलेलें वर्णन अत्यंत हृदयद्रावक आहे. ( पान ५१३ कलम २९ ) त्याचप्रमाणें इतर लोकही या प्रायश्चित्त कुंडांत कसे कसे होरपळून निघाले हेंही दाखविण्यांत आलें आहे. राजद्रोहाच्या दोषानें पतित झाल्यामुळे ही प्रायश्चित्तें दिलीं गेली हें खरेशास्त्र्यांचें म्हणणे खरें नसून तो तोतया 'बाजी गोविंद' नांवाचा सोनार जातीचा ठरला म्हणूनच न्यायाधीश रामशास्त्री यांनीं हीं प्रायश्चित्तें दिलीं हीच गोष्ट खरी असें ग्रंथकारानीं सयुक्तिकपणें दाखविलें आहे. ( पान ५१४ ते ५१६ कलम १०१ ते १०४ ).

खऱ्या भाऊसाहेबाना पुण्यास आणल्यावेळीं माधवरावांनीं व त्यांच्या कारभाऱ्यांनीं त्याला 'सुखनिधान कनोजा ब्राह्मण' ठरविलें होतें. याची उपपत्तीही दाखविण्यांत आली आहे. ( पान ५१७ कलम ११७ ) काशी प्रांतीं प्रकट झालेला तोतया हाच सुखनिधान नांवाचा कनोजा ब्राह्मण होता. त्याची महाराष्ट्रांत माहिती कोणाला नव्हती. त्यामुळें तेंच नांव पुढें करून कारभाऱ्यांनीं खऱ्या भाऊसाहेबांचा अकरा वर्षे छळवाद केला हें ग्रंथकारांचे अनुमान सयुक्तिक दिसतें. पंच कमिटीच्या निकालानंतर नानाकडून भाऊसाहेबांच्या लक्षांत असलेल्या कांहीं लोकांची अमानुषपणें कत्तल करण्यात आली. कांहीं सरदाराच्या जहागिरी जप्त करण्यांत आल्या, काहींचे खजिने लुटले गेले, कित्येकाना डोंगरी किल्ल्यात आजन्म कैदेंत डांबून टाकून हाल हाल करून मारण्यांत आलें. यासंबंधींची सविस्तर हकीकत "मुत्सद्देगिरीचा पाताळयंत्री एक दगड फेंकून नानांनीं फळाचे किती घोंस पाडले" या सदरांत ग्रंथकारांनीं दिलेली आहे. ( पान ५२० ते ५२८ कलम ११० ते १२१ ).

वर दर्शविल्याप्रमाणें नाना फडनविसांनीं मनुष्याची अदलाबदल करून खऱ्या भाऊसाहेबांना बाजूस काढून ऐन चौकशीच्या वेळीं 'बाजी गोविंद' नांवाच्या सोनारास पुढें करून त्याला सर्वांनुमतें कसें तोतया ठरवून घेतलें व खऱ्या भाऊसाहेबांना पूर्णपणें ओळखणाऱ्या अनुबाई, रामचंद्रपंत वगैरे आप्त मंडळींना कसें तोंडघशीं पाडलें हें स्पष्टपणें दाखविण्यांत ग्रंथकारांनीं अपूर्व कामगिरी केली आहे यांत शंका नाहीं. आजवर इतिहासकारांनीं जो इतिहास दिला आहे, तो अपूर्ण व कांहीं बाबतींत विसंगत असून सत्यान्वेषणाच्या दृष्टीनें हा विसंगतपणा कां दिसून येतो, यांत खरोखर घडलेला प्रकार कसा असावा हें परिश्रमपूर्वक ठामपणें व सुसंगतपणें दाखविण्याचें काम ग्रंथकारांनीं प्रथमच केल्याचे दिसून येतें. व याबद्दल ग्रंथकार अभिनंदनास पात्र आहेत यात शंका नाहीं. याप्रमाणें तोतयाच्या बंडाची व त्याबरोबर खऱ्या भाऊसाहेबाचीही इतिश्री झाल्याचें स्पष्ट दिसून येतें. दुर्दैव बिचाऱ्याचें ! दुसरें काय ? ग्रंथकारांनीं या प्रकरणाचाही शेवट कशामुळें झाला याचें वर्णन पुढील शब्दांत केलें आहे. "नानाच्या ठिकाणीं सामान्य मुत्सद्यापेक्षां अधिक कांहीं तरी विशेष होतें. म्हणूनच ते सर्व शहाण्यांचे गुरु बनले. नानाच्या बुद्धिचातुर्याच्या कापट्यपूर्ण लहानशा खेळामुळे तोतयाच्या बंडाच्या चित्तपावन संग्रामांत विजयाची माळ नानांच्या गळ्यांत शेवटीं पडून तोतयाच्या बंडाची परिसमाप्ति झाली."

## सवाईमाधवराव पेशवे.

राघोबादादांना पदच्युत करून बारभाई मंडळींनीं गंगाबाईंच्या नांवानें राज्यकारभार चालविला. गंगाबाई चार पांच महिन्यांच्या गर्भवती असतांनाच त्या गर्भाचें 'गर्भवासी श्री. सवाईमाधवराव' असें नांव ठेऊन शिक्कामोर्तबही तयार करण्यांत आलें. गंगाबाईंच्या नावें छत्रपतींकडून पेशवाईचीं वस्त्रें आणण्यांत आलीं. याप्रमाणें प्रत्यक्ष जन्माच्या अगोदरपासूनच गर्भवासी सवाईमाधवराव पेशव्यांची कारकीर्द सुरू करून बारभाईंनीं आपल्या अंगीं "कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्" अशी शक्ति असल्याचें जगाला दाखवून दिलें. गंगाबाईंच्या बाळंतपणाची पूर्वतयारी नानांनीं कशी केली

होती हें पहाण्याजोगें आहे. सवाईमाधवरावांच्या जन्मासंबंधीं नानांचें कपट कारस्थान कशा दर्जाचें होतें हें या पूर्वतयारीवरून दिसून येतें. पूर्वीच कारभाऱ्यांनीं ठरविल्याप्रमाणें गंगाबाई प्रसूत होऊन तिला पुत्र झाला व त्याचें नांव ' सवाईमाधवराव ' असें जाहीर करण्यांत आलें. यांचा जन्म तारीख १८ एप्रिल सन १७७४ रोजीं झाला. तेव्हां " साक्षात् विष्णूनें अवतार राज्यरक्षणार्थ घेतला " अशी कंडीही कारभाईनीं उठविली. पुढें जेव्हां बापू व नाना पुरंदर सोडून मोहिमेवर गेले तेव्हां त्यांनीं सवाईमाधवरावांच्या संरक्षणाची कामगिरी पुरुषोत्तम दाजी पटवर्धन या त्यांच्या विश्वासू गृहस्थांकडे सोंपविली होती. सवाईमाधवरावांचा खून करण्याचा कट कसा झाला व त्यापासून विष्णूच्या या अवताराचें रक्षण पुरुषोत्तम दाजीनें कसें केलें ही हरिवंशाच्या बखरींतील मनोरंजक हकीकत देऊन ग्रंथकारांनीं पुरुषोत्तम दाजीचें तें शुद्ध एकाकी नाटकच कसें होतें व राघोबादादा आणि आनंदीबाई यांच्याविषयीं द्वेषबुद्धि उत्पन्न करण्याच्या हेतूनेच त्याचा प्रयोग करण्यांत कसा आला होता, हें स्पष्टपणें दाखवून दिलें आहे. ( पान ४०४ ते ४०६ कलम २४ ते २६ ) राघोबादादा वगैरे राक्षसांचा निःपात करण्याकरतांच हा विष्णूचा अवतार 'सवाईमाधवराव' रूपानें झाला आहे. असा प्रचार कारभारीमंडळींतर्फे मुख्यतः पुरुषोत्तम दाजींनींच चालविला होता. श्रीकृष्णाच्या अवताराशीं सवाईमाधवराव याची तुलना करण्यात येऊं लागली. राघोबादादाना कंस ठरविण्यात आलें. यासंबंधीं लोकांच्या भावना कशा चेतविण्यांत येत होत्या हें पहाण्याजोगें आहे. ( पान ६९१ कलम १ ). सवाईमाधवरावांस पुरंदराहून पुण्यास आणिलें. तेव्हां श्रीकृष्णाच्या अवताराशीं साम्य मानलेल्या सवाईमाधवरावांच्या संरक्षणाचा नानांनीं कसा कडेकोट बंदोबस्त केला होता याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारानीं केलें आहे. ( पान ७९२ कलम ३ ). सवाईमाधवरावाचा व्रतबंध व विवाह हे समारंभ मोठ्या थाटानें करण्यात आले. त्या वेळीं त्यांचें वय पुरें नऊ वर्षांचेही नव्हतें. त्याची खेळ खेळण्याची व शिकारखान्याची हौसही नानांनी चांगलीच पुरविल्याचे दिसून येतें. ( पान ६९३ कलम ४ ).

सवाईमाधवरावाची कारकीर्द घाशीराम कोतवालाच्या प्रकरणामुळें बरीच गाजली. घाशीराम हा कोण होता, त्याचा पेशवाईच्या पोलीसखात्यांत कसा

प्रवेश झाला व उत्तरोत्तर त्याच्या अधिकाराचें प्रस्थ कसें वाढत गेलें, याचें वर्णन देण्यांत आलें आहे. (पान ६९५।६९६). पुण्यास बरेच वर्षांपासून पेशवाईत श्रावण महिन्यांत वैदिक विद्वान ब्राह्मण, शास्त्री, पुराणिक, हरिदास वगैरे मंडळींना त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार दक्षिणा देण्यांत येत असे. इ. स. १७९१ सालच्या श्रावण महिन्यांत हा समारंभ मोठ्या प्रमाणांत झाला. एकंदर दक्षिणा नव्याणव हजार वाटण्यात आल्याचें दिसून येतें. (पान ६९७ कलम ११). दक्षिणेकरतां आलेल्या ब्राह्मणांत तीस पस्तीस द्राविडी ब्राह्मणही होते. त्यांना दक्षिणा मिळाल्यावर ते आपल्या देशास जाण्याकरतां निघाले. वाटेंत ते लष्करांतील घाशीराम कोतवालाच्या बागेंत सायंकाळीं उतरले असतां, त्यांस घाशीरामानें लुटून अगदीं लहान अशा एका खोलींत कोंडून घातलें. तेथें अन्नपाण्यावाचून व हवाही न मिळाल्यामुळें त्यांपैकीं बहुतेक ब्राह्मण तडफडून मरण पावले. त्या खोलीच्या झरोक्यांतून मारलेल्या केविलवाण्या हांका ऐकून त्या रस्त्यानें घोड्यावरून जात असलेले मानाजीराव फांकडे तेथें गेले. नंतर त्यांनीं गांवांत येऊन ब्राह्मण-वर्गाला ही हकीकत कळवून "ब्राह्मण असेल त्यानें वाड्यापाशीं यावें" असें बजावलें व खुद्द सवाईमाधवराव यानाही ही हकीकत कळविली. याबद्दल चौकशी करण्याचा श्रीमंतानीं नानांना हुकूम दिला. घाशीराम हे नानांचे विश्वासू, एवढेंच नव्हे तर प्रियपात्र होते. नानांनीं घाशीरामाला बोलावून आणून चौकशीचा फार्स करून त्याला त्या कोंडलेल्या ब्राह्मणांच्या मुडद्यांची व्यवस्था करण्याची परवानगी दिली. मानाजीराव यानीं या गोष्टीला हरकत घेऊन श्रीमंतांकडे या प्रकरणाची चौकशी करावी अशी पुनः दाद मागितली. शनिवारवाड्याकडे पांच सात हजार ब्राह्मण गोळा झाले होते. घाशीराम नानांच्या वाड्यातच त्याचा आश्रय धरून राहिला होता. श्रीमंतांनीं नानांकडे दोनदां शिपाई, चोपदार वगैरे पाठवून घाशीरामाला आणविण्याची खटपट केली. परंतु त्याला त्यानें दाद दिली नाहीं. त्यानंतर श्रीमंतांनीं चार सशस्त्र, लढाईत नानांच्या वाडयाकडे पाठवून घाशीरामाला पकडून आणण्याचा हुकूम केला. नानांनीं हा प्रकार पाहून घाशीरामाला "तुझें कपाळ फुटलें, आतां आमचा इलाज नाहीं." असें सांगितलें. नंतर घाशीरामाला पकडून श्रीमंतांकडे नेण्यांत आलें. त्यांनीं

घाशीरामाच्या मुसक्या बांधवून त्याला छडयांचा चांगला चोप देवविला. त्या वेळेच्या प्रक्षुब्ध वातवरणांत नानांना घाशीरामाला वांचवितां आलें नाहीं. त्यांनीं वे. शा. सं. अय्याशास्त्री यांना बोलावून आणून, त्यावर कांहीं तरी तोड काढण्याची खटपट केली; पण ती निष्फळ ठरली. अय्याशास्त्र्यांनीं त्याला देहांत शिक्षा देणें योग्य आहे असें सांगितलें. रात्रौ घाशीरामाला श्रीमंतांनीं स्वतः शिक्षा केल्यानंतर दुसरे दिवशी सकाळीं त्याची पुणें शहरांतून धिंड काढविल्यावर ब्राम्हणाच्या स्वाधीन करण्यात येईल असें त्यांनीं जमलेल्या सर्व ब्राह्मणांना आश्वासन दिलें आणि 'तुमच्या मर्जीप्रमाणें त्याला शिक्षा करा' असें त्यांना सांगितलें. दुसरे दिवशीं त्याची गावभर धिंड काढून गुलटेकडीजवळ जमलेल्या पंधरा वीस हजार ब्राह्मणाच्या स्वाधीन घाशीरामाला करण्यांत आलें. तेथें त्याला दगडाखालीं ठेंचून जमलेल्या ब्राह्मणानीं ठार मारलें. (पान ६९७ ते ७०१ कलम १२ ते १७) या घाशीराम प्रकरणासंबंधीं ग्रंथकारांनीं सर्व हकीकतीचे साधार व सविस्तर वर्णन केलें आहे. घाशीरामाचा निकाल झाल्यावर त्याच्या कटातील लोकानाहीं शासन करण्यांत आलें. तसेंच मानाजीराव शिंदे हा त्या वेळच्या तीन फाकड्यापैकीं एक असून तो राघोबा-दादाचा विश्वासू सरदार होता. विशेष शौर्यशाली माणसाला व फांकडा ह्मणत असत. हा मानाजीराव फांकडा कसा तेजस्वी, शूर व धर्माभिमानी होता व त्यानें या प्रसंगीं किती बहुमोल कामगिरी केली, याचें यथोचित वर्णनहीं देण्यांत आलेलें आहे. (पान ७०२ कलम १८).

सवाईमाधवराव जन्मल्यापासून नानाच्या देखरेखीखालींच वाढले. त्यांचें राजकीय व व्यावहारिक शिक्षण, करमणूक, आवडनिवड वगैरे सर्व कांहीं नानांच्याच मर्जीप्रमाणें घडून आलें होतें. असें असतांही सवाई माधवरावांनीं या घाशीराम प्रकरणीं नानाविरुद्ध जें न्यायनिष्ठुर वर्तन करून आपलें तेज दाखविलें, त्याबद्दल ग्रंथकारानीं सविस्तर चर्चा करून पुढील सार्थ धन्योद्गार काढले आहेत. "या वेळीं प्रत्यक्ष नाना आडवे आले असता, त्यांनीं आपल्या रक्षणकर्त्या नानांची पर्वा केली नाहीं. आज्ञाभंग व अन्याय सहन न करण्याचे जे धर्म पेशवे घराण्यांत होते, ते या वेळीं सवाईमाधवरावांनीं नानांच्या अगदीं मगरमिठींत असतांनासुद्धां दाखविले. सवाईमाधवरावांची ही असामान्य कर्तबगारी या वेळीं लोकांच्या नजरेला आली." (पान ७०६ कलम २२).

दिल्लीच्या बादशहाचे सरदार इस्माईल बेग व गुलाम कादर वगैरे सरदारांनीं खुद्द बादशहाचे डोळे फोडणें, आगी लावणें, वगैरे अत्याचार केले त्या वेळीं महादजी शिंदे यांनीं बादशहाला जी अमोलिक मदत केली व त्या गुन्हेगार गुलाम कादरला योग्य शासन केलें त्याबद्दल बादशहांनीं प्रसन्न होऊन शिंद्यांना "मदारउलमहाम अलिजाबहादुर" व त्यांचे धनी जे पेशवे त्यांना "वकील-इ-मुतलक" असे बहुमानाचे किताब दिले. उत्तर हिंदुस्थानांतील लढाईच्या प्रसंगी शिंद्याच्या मदतीकरतां त्यांच्या पत्रा-प्रमाणें होळकर, अलीबहादर वगैरे सरदारांना नानांनीं पाठविलें होतें. परंतु ते शिंद्यांना खरी मदत न करतां त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ करूं लागले. असें करण्यांत त्यांना नानांचीच फूस असली पाहिजे अशी शिंद्याची खात्री झाल्यामुळें त्याबद्दल नानांविरुद्ध खुद्द श्रीमंतांकडे फिर्याद करावी म्हणून पुण्यास जाण्याचें शिंद्यांनीं योजिलें. त्याप्रमाणें ते निघाले. त्यांनीं बादशहाकडून पेशव्यांना मिळालेली 'वकील-ई-मुतलक' ही पदवी व त्यासंबंधींचीं वस्त्रें देण्याचा समारंभ करण्याकरतां आपण पुण्यास जात असल्याचें प्रसिद्ध केलें.

महाराष्ट्रांतील शिंद्यांची ही मोहीम नानांचा व पेशव्यांचा खरपूर समाचार घेण्याकरतांच आहे अशी कंडी नानांच्या पक्षानें उठविली होती. पुण्यास आल्यावर दिल्लीश्वराकडून मिळालेल्या पदव्या व वस्त्रे हीं पेशव्यांना देण्याचा समारंभ आपण करणार आहोंत असें शिंद्यांनीं नानांना कळविलें होतें. त्याला नानांनीं हरकत घेतली. बादशहानीं आपल्या फर्मानांत पेश-व्यांना 'महाराजाधिराज' असें संबोधिलें होतें. छत्रपतींचें निमित्त पुढें करून छत्रपतीचे नोकर पेशवे यांना ही पदवी घेतां येणार नाहीं अशी नानांनीं तक्रार केली होती. नानांच्या या तक्रारीचें धोरण लक्षांत घेऊन खुद्द छत्रपतींकडूनच शिंद्यांनीं परभारें परवानगी आणविल्यामुळें आणि खुद्द पेशव्यांनीं या समारंभाला मान्यता दिल्यामुळें नानांची हरकत 'मूले कुठारः' या न्यायानें विलयाला जाणें साहजिकच होतें. ही हरकत घेण्यांत खरोखर नानांचा काय हेतू होता हें स्पष्टपणें दाखविण्यांत आलें आहे. (पान ७३७। ७३८ क. ६।७) शिंद्यांच्या विनंतीवरून पेशव्यांनीं शिंद्यांच्या फौजेची

सलामी घेतली. तोही समारंभ मोठ्या थाटाचा झाला. त्याचें दिलेलें सविस्तर वर्णनही वाचनीय आहे. (पान ७४० क्र. ९।१०)

शिंद्यांनीं सन १७८३ ते १७९१ अखेर नऊ वर्षांचा हिशेब दरबारांत रुजूं करणेचा होता. तो त्यांनीं रुजूं करून त्यावरून सात कोट रुपये पेशव्यांवर बाकी निघते असें दाखविलें. शिंद्याचे ह्मणणे कीं त्यांनीं जिंकलेला पेशव्यांच्या हिश्शाचा मुलूख या बाकीबद्दल आपल्याकडेच ठेवावा. ते रोख रुपये मागत नव्हते. नानांचा याला विरोध होता. त्यांचें ह्मणणें कीं शिंद्यांकडे मुलूख ठेऊं नये. त्याचे हिशेब पोकळ आहेत. जी बाकी निघेल ती सोईनें भागवावी. याचा निर्णय स्वत: सवाईमाधवरावांनींच नानाच्या ह्मणण्याविरुद्ध केला. याप्रमाणें या बाबतींत खुद्द पेशव्याकडून शिंद्यानीं न्याय मिळविला.

नानाना लोक वचकून राहात असत. नाना करतील तोच न्याय अशी स्थिति असे. त्यांनीं केलेले अन्याय श्रीमंतापर्यंत येत नव्हते. कारण नानांचे अन्याय श्रीमंतापुढें माडण्याचें धैर्य व वकूब कोणात नसल्यामुळें हें काम कोणासही करता येत नसे. शिंद्यानीं आपलें बस्तान श्रीमंतांकडे चांगलेंच बसविल्यामुळें ते या कामास सर्वस्वी योग्य आहेत अशी लोकांची समजूत झाली होती. सातारच्या छत्रपतींना किल्ल्यावर अटकेंत ठेविलें होतें. नानांनीं त्यांना बाहेर पडून हिंडण्याचें स्वातंत्र्यही ठेविलें नव्हतें. या अन्यायाची दाद छत्रपतीनीं शिंद्यामार्फत श्रीमंताकडे लावली. शिंद्यानीं हा अन्याय बेडरपणानें श्रीमंतांपुढें माडला व सवाईमाधवरावानीं आपल्या स्वतंत्र बुद्धीनें त्याचा विचार करून नानांच्या इच्छेविरुद्ध त्या अन्यायाचें परिमार्जन केलें.

बाजीराव मोरेश्वर नावाचा नानानीं नेमलेला शंकरराव सचीवांचा कारभारी होता. त्याचे व शंकररावाच्या सावत्र आईचें संगनमत होतें. शंकररावांचें व त्याच्या सावत्र आईचें वांकडें होतें. आचाऱ्याकडून अन्नांत विष कालवून शंकररावांना विषप्रयोग करण्याचा प्रयत्न केल्याचें उघडकीस आल्यावरून, आपले गाव सोडून शंकरराव जेजुरीस जाऊन राहिले. बाजीरावांनी नानाना शंकररावांनीं निघून जाऊन पेशव्याविरुद्ध बंड उभारल्याचें खोटें कळविलें. तें बंड मोडण्यास नानानीं बाजीरावास मदत पाठविली. त्या मदतीचा फायदा घेऊन जेजुरीस जाऊन त्यानें आपल्या मालकावर–

शंकररावांवर—अचानक हल्ला कसा केला व कसकसे भयंकर अत्याचार केले याचें वर्णन करण्यांत आलें आहे. (पान ७४८ फ. १७) बाजीरावांनीं सचीवांस लुटलें व कैद केलें. हें वृत्त शिंद्यांना समजतांच त्यांनीं त्याबद्दल नानांची झडती घेतली व खुद्द श्रीमंतांना चाकरानें धन्याची अब्रू घेऊं नये असा बंदोबस्त करण्याबद्दल विनंति केली. सवाईमाधवरावांनीं माणसें पाठवून सचीवांना पुण्यास आणविलें. त्याना सामोरें जाऊन वस्त्रालंकार वगैरे देऊन फार सन्मानानें वागविलें. तसेंच बाजीराव मोरेश्वर यास व त्यांना सामील असलेल्या लोकांना त्यांच्या गुन्हेगारीबद्दल शासन करण्यांत आलें. शिंद्यांनीं नेट धरल्यामुळें व खुद्द श्रीमंतानीं न्याय करण्याचें मनावर घेतल्यामुळें नानाचें कांहीं चाललें नाहीं. यावरून प्रसंगविशेषीं नानाचा मुलाजा न धरता आपल्या न्यायबुद्धीस पटेल तो न्याय देण्यास सवाईमाधवराव कचरत नसत असें दिसून येतें. ग्रंथकारानीं यासंबंधीं पुढील मननीय उद्गार काढले आहेत. ‘सवाईमाधवराव याचें अंगांत अस्सल पेशव्यांचें रक्त खेळत होतें. पेशवे घराणें सिंहाच्या जातीचें होतें. सिंहाच्या पोराला मांजर म्हणून लहानपणापासून कडक धाकात वाढविलें तरी त्याच्या अंगातील रक्त सिंहाच्या मनोधर्माचें असल्यामुळें तें वयात आल्यावर प्रसंगविशेषीं आपल्या रक्ताच्या धर्माकडेच वळणार हा सृष्टीधर्मच आहे.’ (पान ८२८ क. २४).

पुढें काही कारणानीं शिंदे व होळकर याच्यामध्यें हिंदुस्थानांत लढाई जुंपली. हा लढा नानाच्या प्रेरणेनें व प्रोत्साहनानेंच उत्पन्न झाल्याचें दाखविलें आहे. (पान ७५० क. १९) या लढाईंत शिंद्यांनीं होळकरांचा पूर्ण पाडाव केल्यामुळें नानांच्या मनास ही गोष्ट बरीच झोंबली. नानानीं शिंद्यांविरुद्ध कंड्या उठवून त्यांच्या विरुद्ध पेशव्याचें मन कलुषित करण्याचा प्रयत्न कसा केला याचें सविस्तर वर्णन देण्यात आले आहे. (पान ७५३ क. २२) या खोट्या कंड्यांनीं सवाईमाधवरावाचें मन मात्र दूषित न झाल्यामुळें त्या निष्फळ ठरल्या. खुद्द श्रीमंतानींच मध्यस्थी करून शिंदे व होळकर यांच्यामधील हा तंटा मोडला. श्रीमंतांचे व महादजीचें वेळोंवेळीं एकमत होत असल्यामुळें नानांना कारभारांत आपल्या मनाप्रमाणें डाव साधतां येईना. म्हणून नाना त्या उभयतांना शत्रुस्थानीं लेखूं लागले. पुढें शिंद्यांनीं नानांची खोडकी

मोडण्याच्या हेतूनें श्रीमंतांकडे पेशवाईच्या कारभाराची जागा आपणांस देण्याबद्दल संधि साधून गोष्ट काढली. तेव्हां सवाईमाधवरावांनीं 'माझा उजवा हात नाना फडनविस व डावा हात महादाजी शिंदे' वगैरे मुत्सद्देगिरीचें उत्तर देऊन शिंद्यांना त्यांच्या मागणीपासून परावृत्त केलें. शिंद्यांनी श्रीमंताकडे ही मागणी केल्याचें नानाना समजतांच ते कसे रडकुंडीस आले, त्यांनीं श्रीमंताची गांठ घेऊन त्याच्यापुढें अश्रूपूर्ण नयनांनीं आपली बाजू माडून दयेची कशी याचना केली व हरिपंत फडक्याना शिंद्याकडे पाठवून त्याचा समझोता करण्याचा कसा प्रयत्न केला व पुढें श्रीमंत, नाना व शिंदे यांची आरसे महलात बैठक होऊन दिलसफाई कशी झाली याचें सविस्तर वर्णन पेशव्यांच्या बखरीवरून ग्रंथकारांनीं दिलें आहे. ( पान ७५७ ते ७६० क. २५ ते २८ ) नाना व शिंदे यांचा समेट झाल्यामुळें सवाईमाधवरावांना, शिंद्याना व इतर सरदारांना समाधान वाटलें. राज्यात सर्वत्र "आनंदी आनंद गडे, जिकडे तिकडे चहूंकडे" असें वातावरण निर्माण झालें.

इ. स. १७९३ मध्यें दिवाळीच्या सणानिमित्त दारूकाम करण्याचें ठरलें. त्याची सर्व व्यवस्था शिंदेबाबाकडे देण्यात आली. शिंद्यांनीं हा अभूतपूर्व दारूकाम—समारंभ मोठ्या उत्साहानें पार पाडला. तसेंच त्या वर्षी शिंद्यांनीं रंग खेळण्याचा तसेंच सरकार स्वारी व तन्निमित्त दीपोत्सव हे समारंभ फारच थाटानीं घडवून आणले. या दोन्ही समारंभाचें सविस्तर-वर्णन पेशव्याच्या बखरीवरून ग्रंथकारांनीं दिलें आहे. ( पान ७६४ ते ७६९ क. ३२ ते ३७ ). त्याच प्रमाणे त्या सालीं श्रावण मासाच्या दक्षिणेचा समारंभ बराच गाजला. त्यांतही शिंद्यांनीं स्वतः भाग घेऊन ओंजळींनीं दक्षिणा वांटली. शिंद्यांनीं पुण्यास राहून पेशव्यांकडून आपल्या मध्यस्थीनें कित्येकांच्या तक्रारी कशा दूर करविल्या व कित्येकांना कसे न्याय मिळवून दिले हें तपशीलवार दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७७० क ३९ ). शिंद्यानीं पुण्यास राहून आपल्या वर्तणुकीमुळें पेशव्यांचें अंतःकरण उत्साही व आनंदित केलें होतें.

पुढें महादजी शिंदे कालवश झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं नानांनीं निजामावर स्वारी करण्याचें ठरविलें. त्यास खरोखर कोणतीं कारणें होतीं याची चर्चा करण्यांत आली आहे. ( पान ८०४ क. ८ ). त्या प्रसंगीं

परशुरामभाऊ पटवर्धन यांना मुख्य सेनापतित्व देण्यांत आलें होतें. या मोहिमेवर खुद्दसवाई माधवराव व नाना हे गेले होते. या लढाईकरतां कोणाकोणाचीं कितीकिती सैन्यें जमविण्यांत आली होतीं, त्यांची रचना कशी कशी केली होती, जयापजयाचें पारडें कसें झुकांड्या खात होतें व शेवटीं खर्ड्यास पेशव्यांनीं निजामाचा कसा पूर्ण पराभव करून त्याला कोणत्या अटीवर तह करणें भाग पाडलें वगैरे गोष्टींचे सविस्तर वर्णन ग्रंथकारांनीं केलें आहे. ( पान ८०५ ते ८१२ क ९ ते १५ ). हा विजय संपादून पेशव्यांची स्वारी पुण्यास आली तेव्हां मोठा विजयोत्सव करण्यांत आला. शहर श्रृंगारण्यांत आलें होतें. या उत्सवाचें व नगरप्रवेश समारंभाचें वर्णन देण्यांत आलें आहे. ( पान ८१३ क १८ ). या लढाईंत ज्या ज्या लोकानीं पराक्रम केले, त्या शूर लोकांना पारितोषकें देऊन त्यांची यथायोग्य संभावना करण्यांत आली. ( पान ८१३ क १९ ). खर्ड्याच्या लढाईंतील विजयामुळें सर्वांला व विशेषतः नानांना आनंद झाला होता. परंतु सवाईमाधवराव मात्र उदास व खिन्न झाले होते. निजामानें तहातील अटीप्रमाणें आपला वजीर मशीरउल्मुख यास पेशव्यांच्या स्वाधीन केलें, सवाईमाधवरावानीं तशा स्थितींतही त्याचा सत्कार करून त्याचें स्वागत केलें. परंतु त्याचे भेटीचे वेळीं श्रीमंताचें मन मात्र खिन्न झालें. नानांनीं त्याना त्याचें कारण विचारता सवाईमाधवरावांनीं " मोंगलांनीं मित्रेपणानें आपली एवढी अमर्यादा करून घेतली, आणि आमचे लोक यत्नावांचून जय पावले असतां आपणांस आपणच विजयी असें मानतात, तस्मात् या समयीं उभय पक्षांचे पुरुष अप्रयोजक पाहून माझें मन फार खिन्न झालें, " ( पान ८१२ क १७ ). असें त्यांस उत्तर दिलें. यासंबंधीं झालेल्या विजयोत्सवांतही ते उदासीनच होते. या लढाईमुळें नानांचेंच प्रस्थ वाढलें. आपली किंमत कोणीच मानीत नाहींत असें सवाईमाधवरावांना आढळून आल्यानें त्यांची मनोवृत्ति उदास असणें साहजिकच होतें. अशी स्थिति होण्यास विशेषतः नानांची वागणूकच कारणीभूत झाल्याचें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ८२६ क १८ ते २१ ).

सवाईमाधवरावांना नानांनीं लहानपणापासून रंगणावर धरल्याप्रमाणें कांटेकोर रीतीनें वागविलें असतांही वयांत आल्यावर त्यांची स्थिति कशी बनली होती, प्रसंगविशेषीं स्वतंत्र बुद्धीनें वागण्याची त्यांनीं कशी खटपट केली, त्यांना महादजी प्रिय व नाना अप्रिय कां वाटूं लागले व नानांच्या वाटेंतून महादजीचा कांटा निघून गेल्यावर व खर्ड्याच्या विजयानंतरही त्याचें मन जास्त जास्त कसें उदास झालें, याचें उद्बोधक विवेचन ग्रंथकारांनीं वाचकां-पुढें मांडिलें आहे. (पान ८२९ क २४). नानांनीं आपल्याला नामधारी बनविलें असा अनुभव आल्यामुळें, सवाईमाधवरावांना नानांचा कारभार अप्रिय होत चालला व त्यांनीं दादासाहेबाचे चिरंजीव बाजीराव यांनाच कारभारीपणाचा हक्क मिळावा म्हणून प्रयत्न चालविल्यानें त्यांचें हें करणें म्हणजे सर्वाधिकारी नानांच्याविरुद्ध **'राजाचें बंड'** च होय असें दाखवून आपल्या हातून कधींही कारभार जाऊं नये अशी नानांची **'अदमखोरी व्याघ्रवृत्ति'** होती याचें ग्रंथकारानीं चांगलेंच आविष्करण केलें आहे. (पान ८३२।३३ क २७). नानानीं सवाईमाधवराव याना कडक बंदोबस्तात ठेविलें होतें. त्यांना श्रीमंताची अशी बंडखोर वृत्ति सहन होणें शक्य नव्हतें. बाजीरावाची कीर्ति ऐकून त्यांना भेटण्याची सवाईमाधवरावाना तीव्र इच्छा झाली. त्याबद्दल नानाकडे त्यांनीं गोष्ट काढल्यावेळीं नानानीं त्याना 'तो किती जरी चांगला असला तरी तुमचा शत्रू आहे असें समजा. त्याचा बाप रघुनाथराव व आई आनंदीबाई हें स्मरण धरून असावें' असें उत्तर देऊन गप्प केलें. परंतु सवाईमाधव-रावांच्या मनानें उचल खाल्ल्यामुळें व त्यांची याविषयीं समजूत न पटल्यामुळें, त्यांचा बाजीरावांशीं चोरून पत्रव्यवहार सुरू झाला. नानांच्या नजरेस ही गोष्ट येतांच त्यांनीं सवाई माधवरावांची अत्यंत निर्भर्त्सना केल्याचें व त्यांना चांग-लाच दम दिल्याचें नाना फडनविसाचे बखरीवरून ग्रंथकारानीं दाखवून दिलें आहे. (पान ८३६ क २९) उद्धृत केलेल्या शाहीर प्रभाकराच्या पोवाड्या-वरून 'कमजास्त केल्यास तुमचा प्राण घेण्यांत येईल अशी धमकी नानांनीं

सवाईमाधवरावांना दिल्याचें स्पष्टपणें दिसून येतें असें ग्रंथकारांचें ह्मणणें आहे. सत्यनिर्णयाच्या दृष्टीनें पोवाड्यासारख्या वाङ्मयाला किती किंमत द्यावी हें वाचकांनींच ठरवावें हें बरें. मात्र तत्कालीन एकंदर परिस्थिति लक्षांत घेतां हें शक्यतेच्या मर्यादेंत चांगलेंच बसूं शकतें यांत शंका नाहीं. सवाई माधवराव आपल्या इच्छेविरुद्ध वर्तन करून आपल्या अधिकाराला शह देऊं इच्छितात हें पाहून नानांनीं त्यांना कडक नजरकैदेंत ठेऊन त्यांची स्थिति किती लाचारीची केली हें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ८३७, ८३८ क ३०, ३१ ). नानांनीं याचवेळीं बाजीरावाचा कसा छळ आरंभिला हें समजल्यानें सवाईमाधवरावांच्या दुःखांत भरच पडली. त्यांनीं बाहेर पडण्याचें, तसेंच दरबारला जाण्याचेंही वर्ज्य केलें. लोकापवाद टळावा ह्मणूनच कीं काय ते ज्वरानें आजारी आहेत अशी कंडी उठविण्यांत आल्याचें डफक्त मराठ्यांच्या बखरीच्या उल्लेखावरून दिसून येतें. ( पान ८३९ क ३१). तसेंच त्यावेळीं लोकांत जागृत असलेल्या जादुटोण्यासंबंधींच्या भावनांचा फायदा घेऊन बाजीरावानें सवाईमाधवरावांवर जादुटोणा केला अशीही कंडी उठविण्यांत आल्याचें यासंबधीं पेशव्यांच्या बखरींतील दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येतें. ( पान ८४० क ३२ ).

अशा पारतंत्र्याच्या स्थितींत दिवस कंठीत असतां, दसऱ्याच्या स्वारीला बाहेर पडण्याबद्दल नानांनीं श्रीमंतावर खुषीची सक्ती केली. स्वारी चालल्यावेळीं अंबारींतून उडी टाकून आत्महत्या करण्याचा त्यानीं प्रयत्न केला. त्याचें अप्पा बळवंतांनीं निवारण केलें. दसऱ्याच्या दुसरे दिवशीं ह्मणजे द्वादशी रोजीं, आपल्याजवळ कोणी नाहीं अशी संधि पाहून तीन घटका दिवसास सवाईमाधवराव यांनीं गणपती दिवाणखान्यांतून खालील कारंजावर उडी मारली. त्यांना जबर जखमा होऊन ते बेशुद्ध झाले. २।३ दिवस पुष्कळ उपचार केले गेले. केव्हां बेशुद्ध केव्हां शुद्धीवर अशा स्थितींत ते होते. शुद्धीवर आल्यावेळीं आता आपला भरंवसा नाहीं हें जाणून त्यांनीं "माझें पाठीमागें गादीवर बाजीरावाची स्थापना करा" अशी आपली उत्कट इच्छा प्रकट केली. नंतर आश्विन शु॥

१९ रोजीं (ता. २७।१०।१७९९) सूर्यास्तास श्रीमंतांचें देहावसान झालें. याप्रमाणें प्रत्यक्ष श्रीविष्णुचा अवतार ह्मणून मुद्दाम प्रसिद्धिलेल्या या दुर्दैवी पेशव्याचा आकस्मिक अंत झाला.

## सखारामबापू.

सखारामबापू यांचें आडनांव बोकील. हे पेशव्यांचे प्रमुख मुत्सद्दी होते. त्यावेळीं साडेतीन शहाणे ह्मणून समजल्या जाणाऱ्या इसमांपैकीं ते एक शहाणे होते. ते प्रथमपासुन राघोबादादांचा पक्षाचे ह्मणून प्रसिद्ध होते. नानासाहेब दिवंगत झाल्यावर राघोबादादांनीं व यांनीं छत्रपतीकडून माधवरावांचे नांवें पेशवाईचीं वस्त्रें मिळविण्याची खटपट केली. वर दाखविल्याप्रमाणें नाना या गोष्टीच्या विरुद्ध होते. तरी रावोबादादांचा व बापूंचा पक्ष वरचढ असल्यानें नानांस पडतें घ्यावें लागलें. छत्रपतीकडून माधवरावांच्या नांवें पेशवाईचीं वस्त्रें घेण्यांत आलीं. इ. स. १७६१ सालीं माधवराव पेशवे पदारूढ झाल्यावर राघोबादादा मुख्य कारभारी झाले, व सखारामबापूस त्यांचे दिवाण नेमण्यांत आलें. रावोबादादांनीं कोल्हापूरच्या जिजाबाई राणीसाहेबांना दत्तक घेण्याची परवानगी देऊन तें राज्य स्वतंत्रपणें चालविण्याचीही परवानगी दिली. ही गोष्ट सखारामबापूंनाही पसंत होती. माधवरावांची आई गोपिकाबाई यांना छत्रपती रामराजे यांचे श्रेष्ठत्व मान्य करून त्यांजकडून पेशवाईचीं वस्त्रें घेणें, तसेंच राणी जिजाबाईंना दत्तक घेण्याची परवानगी देऊन राज्याची स्वतंत्रता देणें या गोष्टी मान्य नसल्यानें व या बाबतींत नानासारख्यांनीं त्यांचे कान फुंकल्यानें त्या राघोबादादांवर व बापूवर वाटेल तसें तोंडसुख घेऊं लागल्या. गोपिकाबाईंचें ह्मणणें "हे दोघे राज्याचा कारभार आटोपून माझ्या मुलांना भिकेला लावतील" असें होतें. त्यांच्या त्रासामुळें दादासाहेबांनीं व बापूंनीं आपापल्या कामाचे राजिनामे देऊन ते घरीं बसले. "हीं पोरें काय करणार ? आपल्याशिवाय त्यांना सत ना गत" असें त्यांना वाटत होतें. पण लगेच त्रिंबकरावमामा पेठे, बाबुराव फडनविस वगैरेंचे नवीन कारभारी मंडळ नेम-

ल्यांत आल्यावर त्यांचे डोळे उघडले. त्यानंतर दादासाहेब नाशिकास जाऊन राहिले. सखारामबापू त्यांच्या बाजूलाच होते. बापूंच्या सांगण्यावरून कांहीं सरदारांनीं दादासाहेबाकरतां सैन्याची जमवाजमव केली. गोपिकाबाईचे कारभारीही सरदार मंडळी जमवून लढाईची तयारी करूं लागले. दादासाहेबांना मोंगलांची व कांहीं सरदारांची मदत मिळाल्यानें ते पुण्याकडे चाल करून येऊं लागले. वाटेंत घोडनदी मुक्कामीं पेशव्यांच्या सैन्याचा व यांचा मुकाबला होऊन पेशव्यांच्या सैन्याचा कसा पराभव झाला व माधवरावांना दादासाहेबांना कसें शरण जाणें भाग पडलें याचें वर्णन मागें आलेंच आहे.

यामुळें पुन्हां दादासाहेब व सखारामबापू यांजकडे पेशवाईचा कारभार आला. दादासाहेबांकडे कारभार होता तेव्हां कित्येक पेशव्याचे सरदार फितूर होऊन निजामाकडे जाऊन नोकरीस राहिले. निजामअल्लीचें व पेशव्याचें वासत होते. त्याच्याशीं लढण्याचा प्रसंग आला तेव्हां एक युक्ति केली गेली. निजामाकडे गेलेल्या सरदारांना फितूर करून पुन्हां त्यांना पेशव्याकडे आणण्याची ही युक्ति होती. सखारामबापूकडे दादासाहेबांनीं निजामाकडे फितूर होऊन गेलेल्या सरदारांच्या नांवानें पत्रें दिलीं व सखारामबापूनीं रागारागानें दादासाहेबांचा पक्ष सोडून गेल्याचा बहाणा केला व ते निजामाकडे गेले आणि त्यानीं ठरल्याप्रमाणें निजामाकडे गेलेले सरदार वगैरे लोकांना फितूर करून निजामाच्या सैन्यांत बखेडा माजविला. त्यामुळें पेशव्याना निजामाशीं उघड लढाई देणें सोपें गेलें. अशा रीतीनें फितुरीमुळें निजामाचा पक्ष कमजोर झाल्यानंतर निजामाची व पेशव्यांची राक्षसभुवन येथें लढाई होऊन निजामाचा पराभव कसा झाला हें मागें दाखविलेंच आहे. या लढाईत माधवरावांनीं दाखविलेलें धैर्य, शौर्य व कायखी पाहून दादासाहेबांनीं पुनश्च पेशवेराज्याचा कारभार त्यांचे स्वाधीन केला.

आपले हातीं कारभार आल्यावर माधवरावांनीं आपली आई गोपिकाबाई हिच्या बदसल्ल्याप्रमाणें राघोबादादांना भेटीस बोलावून कैद करण्याचा

विचार चालविला. सरळ वृत्तीच्या सखारामबापूस हा होणारा अन्याय सहन झाला नाहीं. त्यांचे पेशवाईच्या कारभारांत जरी मुळींच अंग नव्हतें, तरी त्यांनीं दादासाहेबांतर्फे माधवरावांकडे याबद्दल मध्यस्थी केली. पेशवे दरबारीं श्रेष्ठ दर्जाचे मुत्सद्दी ह्मणून बापूंचें चांगलेंच वजन असल्यामुळें बापूंच्या भिडे-खातर माधवरावांनीं त्यांनीं सुचविलेल्या आपसातीच्या अटी मान्य केल्या. या अटीप्रमाणें तेरा लक्ष रुपयांची जहागीर व पंचवीस लाख रुपये दादासाहेबांच्या सैन्याच्या पगारबाकीचे माधवरावांनीं दादासाहेबांना देण्याचें कबूल केलें होतें. दादासाहेब आनंदवल्लीस राहण्यास गेले. माधवरावांनीं कबूल केलेल्या वरील अटी पाळल्या नाहींत, एवढेंच नव्हे तर त्यांनीं मागें दाखविल्याप्रमाणें कपट-कारस्थान करून पुनः दादासाहेबांना पकडून कैदेंत टाकिलें. नाना फडनविसां-कडून होत असलेली दादासाहेबांच्या कैदेची सक्ती व त्यांची करण्यांत आलेली दुरवस्था पाहून बापूंना अत्यंत वाईट वाटणें साहाजिक होतें. त्यांनीं आपल्या कुणाबिणीकडे एक चिठ्ठी लिहून देऊन ती दादासाहेबांच्या कुणाबिणीस देण्यास सांगितलें. ती चिठ्ठी नानांच्या गुप्त हेराकडून हस्तगत करण्यांत येऊन माधवरावांकडे पोहोंचविण्यांत आली. माधवरावांनीं बापूस बोलावून ‘ सरकार-अपराधी आहे, त्याचें पारिपत्य काय करावें ’ असा त्यांना प्रश्न केला. त्यांस बापू ‘ पायांत बेडी घालून किल्ल्यावर टाकावें ’ असें उत्तरले. तेव्हां माधव-रावांनीं त्यांच्यापुढें ती चिठ्ठी टाकली व ‘ तुमचे कुचेष्टा करावयाचे ढंग अद्यापी जात नाहींत ’ असें ते बापूंना ह्मणाले. बापूंनीं हतबुद्ध होऊन आतां फिरून आह्मांपासून अशी वांकडी गोष्ट व्हावयाची नाहीं असें कबूल करून माधवरावांकडे क्षमेची याचना केली. श्रीमंतांनीं त्यांना ‘ आजचा अपराध तुह्मांस क्षमा केला. फिरून कांहीं आढळलें असतां क्षमा होणार नाहीं. फिरून असे ढंग करूं नका ’ असें बजाविलें. या प्रसंगावरून बापूंचा स्वभाव-दाखविणारे असे पुढील उद्गार ग्रंथकारांनीं काढले आहेत. “ माधवरावांनीं आप-णांस घरीं बसविलें हें त्यांना बरें वाटत नव्हतें. कारभार करण्याची त्यांना संवय.

शिवाय आपल्याखेरीज राज्यकारभार सुरळीत चालतेला त्यांना बघवत नव्हता. काहीं कुचेष्टा केल्याशिवाय प्रतिष्ठा राहत नाहीं हाही त्यांचा स्वभाव होताच.कोणतीही नवीन गोष्ट घडली कीं, ती सखारामबापूंच्या डोक्यांतील ह्मणून लोक समजत. अशा कुचेष्टा करण्याचे ढंग त्यांच्या अंगीं खिळले होते. त्यांनीं सदर प्रसंगाला इतःपर असे ढंग करणार नाहीं ह्मणून कबूल केले, पण जित्याची खोड मेल्याशिवाय थोडीच जाते? ती प्रसंगाला बाहेर येणारच." (पान १९० क १४). तसेंच बापू जरी शहाणे होते तरी त्यांच्या ठिकाणीं जें महत्वाचें व्यंग होते त्याचें ग्रंथकारानीं पुढील शब्दांत वर्णन केलें आहे. 'दादासाहेबां-मध्यें जसे भोळेपणाचें (कपटी लोकांच्या दृष्टीनें) व्यंग होतें, तसेंच सखाराम-बापूमध्यें एक व्यंग होतें. ते नवीन कारस्थान करीत; पण तें गुप्त रीतीनें पार पाडण्याकरतां त्या कामावर योग्य माणसाची निवड त्याचेकडून होत नसे. अशी गुप्त तऱ्हेनें कामें पार पाडून नेणारी मंडळी त्याच्या संग्रहाला नव्हती. (पान १९० क १९)

घाशीराम कोतवालासारख्या नीच व क्रूर मनोवृत्तीच्या माणसांचे नानांनीं पाठबळ तयार केलें होतें. त्यामुळें नानाना आपलीं कपटकारस्थानें आपण स्वतः नामानिराळे राहून बिनबोभाट पार पाडतां आलीं. सखाराम-बापूंना अशी मदत मिळवता न आल्यामुळें त्याची नानाना सोडून केलेली कारस्थानें उघडकीस येऊन ढासळून पडत होतीं. या गोष्टीची चर्चा करून हें कसें घडून येत होतें तें ग्रंथकारानीं वरील चिठ्ठीच्या उदाहरणानें स्पष्टपणें दाखवून दिलें आहे. (पान १९०।१९१ क १९).

सखारामबापू हे दादासाहेबाच्या पक्षाचे असल्यानें त्यांच्या बुद्धिमत्तेचा फायदा माधवरावांनीं करून घेतला नाहीं. यांत त्यांचा स्वार्थ कसा होता हें मागें दाखविलेंच आहे. माधवरावांनीं दादासाहेबांना प्रत्यक्ष कैदेंत ठेविलें होते, तर बापू यांना त्यांनीं फक्त नजरकैदेंत ठेविलें होतें. पुढें माधवराव क्षयाच्या आजारानें आजारी पडल्यावर त्यांना आपल्या हयातींतच सर्व निरवानिरव करून

ठेवणें जरूर वाटल्यावरून त्यांनीं असें दादासाहेबांना बंधमुक्त करून भेटीस बोलाविलें व त्याजकडे सर्व व्यवस्था सोंपविली, त्याप्रमाणेंच त्यांनीं सखाराम-बापूंनाही भेटीस बोलाविले होते व 'आतां पुढें राज्य चालविणें तुम्हांकडे आहे. आजपर्यंत ज्या गोष्टी झाल्या त्या मनांत न आणतां निःसंशय राज्य कारभार चालवावा,' असें सांगून नारायणरावास त्यांचे हातीं दिलें. नारायण-राव लहान लेंकरूं आहे, त्याचा संभाळ करून न्यायानें राज्यकारभार चालवावा असेंही माधवरावांनीं बापूंना सांगितलें. बापूंनीं श्रीमंतांच्या पायांस हात लावून त्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें व त्याबद्दल श्रीमंतांची खातरजमा केली.

माधवराव निवर्तल्यावर दादासाहेबांचें व नारायणरावांचें वर्तन कांहीं दिवस सलोख्याचें कसें होतें व त्यानंतर नारायणरावांनीं दादासाहेबांना कैदेंत कसें घातलें ही हकीकत मागें आलीच आहे. दादासाहेब कैदेंत असतां नाना फडनविस, हरीपंत फडके वगैरे मंडळीच कारभार पहात असत. त्यांचे व सखारामबापूंचें बरें नव्हतें. तरी ते वरकरणीं बापूंना मोठेपणा देत व लोकही बापूंनाच मुख्य कारभारी समजत. बापूंचा स्वभावधर्म कसा होता याचें वर्णन ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत केलें आहे. 'सखारामबापूंना मानाची व मोठे-पणाची हांव असे. वरवर तेवढा त्यांचा मान संभाळला, ह्मणजे ते खूष असत. सखारामबापूच मुख्य कारभारी असे अद्यापी लोक समजत होते. ते आपला आब ठेऊन कांटेतोलपणानें वागत होते.' ( पान २३३ क १ ).

नारायणरावांना धरण्याचा कट कसा केला गेला हें मागें दाखविलेंच आहे. या कटाचे कामीं नाना व बापू यांचें एकमत झालें. जरी या कटाचे मुख्य सूत्रधार नाना हेच होते तरी त्यांनीं सखारामबापूंनाच सदर कटाचें प्रमुखत्व दिलें होतें. धरण्याचे कामीं सुमेरसिंगाची नानांनीं केलेली योजना बापूंना पसंत होती. त्याला देऊं केलेल्या इनामाबद्दल त्यानें जामिनकी मागि-तली. तेव्हां ती जामिनकी त्याला पटावी ह्मणून सुमेरसिंगाच्या नांवें लिहून दिलेल्या कागदावर राघोबादादांची सही घेण्याचें काम त्यांचें मन वळवून

बापूंनाच करावें लागलें. नारायणरावांना धरण्याच्या कटांत जो त्यांना मारण्याचा दुसरा गुप्त कट नानांनीं केला होता त्याचा गंधही बापूंना लागला नव्हता.

त्यानंतर नारायणरावांचा वध कसा झाला हें मागें दाखविलेंच आहे. त्या वधानंतर सर्व सरदार, नाना, बापू वगैरे मुत्सद्दी मंडळी पुण्याच्या कोतवाल चावडीवर जमा झाली. सखारामबापूंनीं काय प्रकार झाला हें समजून घेण्याकरतां फडक्याकडून दादासाहेबांना चिठ्ठी पाठविली. त्याचें दादासाहेबाकडून 'चिरंजीव राव गारदी यांचे कटकटींत मारले गेले' असें उत्तर आलें. यावरून बापूंचा नारायणरावांच्या मरणाशीं कांहीं संबंध नव्हता असेंच दिसून येतें. नंतर राघोबादादांनीं जे कारभारी मंडळ नेमिलें त्यांत त्यांनीं बापूंनाच मुख्य कारभारी नेमून त्यांच्या सल्लामसलतीनेंच काम चालावें असें ठरविलें. पुढें नारायणरावांच्या वधासंबंधीं जबाबदार कोण हा प्रश्न उद्भवला, तेव्हां नानांनीं डाव उलटवून ती जबाबदारी बापूंवर टाकून ते मोकळे झाले. त्यामुळें बापूंचें डोकें बिथरून ते नारायणराव मेल्याचे तिसरे दिवशीं घर सोडून पुण्याहून पळून गेले. चार कोस गेल्यावर पुनः विचार करून ते पुण्यास घरीं परत आले. त्यावेळीं त्यांची वृत्ति किती अस्थिर झाली होती हें यावरून दिसून येतें.

नारायणराव मेल्यानंतर दहावे दिवशीं तिळांजली देण्याकरितां नदीवर मुत्सद्दी व इतर नोकर मंडळी जमली. या प्रसंगीं नाना, बापू, त्रिंबकरावमामा व हरिपंत फडके या चौघांनीं नानासाहेब यांचा वंश चालवावयाचा व राघोबादादा यांचे वंशास नमस्कार करावयाचा नाहीं अशा क्रिया वाळूच्या लिंगावर हात ठेऊन केल्या. यासंबंधीं ग्रंथकारांनीं पुढील समर्पक व सार्थ उद्गार काढले आहेत. 'याप्रमाणें नानांनीं सखाराम बापूंचीं बोटें त्यांच्याच डोळ्यांत घालून त्यांना आपल्या पक्षांत त्यांची आणक्रिया घेऊन जखडून टाकलें. नानांनीं आपल्या पुढील कारस्थानाची मुहूर्तमेढ नारायणरावांच्या तिळांजुळीच्या वेळीं नदीवर रोविली व राघोबादादाविरुद्ध बंडाची तयारी चालविली.' (पान ३१० क ८).

आपल्यावर नानांनीं काढलेली नारायणरावांच्या वधाची तोहमत टाळण्याकरतां व आत्मसंरक्षणकरण्याच्या हेतूनेंच बापूंनीं नानांच्या पक्षाशीं सहकार्य करून राघोबादादाविरुद्ध प्रथमच नाइलाजानें आणक्रिया करणें बापूंना भाग पडलें, असें दिसून येतें. त्यानंतर नाना व बापू यांनीं राघोबादादांना पदभ्रष्ट करण्याचा प्रयत्न चालविला. जेजुरीहून परशुरामभाऊनीं मिरजेस वामनराव पटवर्धन यांना लिहिलेलें पत्र ग्रंथकारांनीं ऐ. लेखसंग्रहांतून उद्धृत केलेलें आहे. त्यावरून हें स्पष्टपणें दिसून येतें. (पान ३१४ क १४). राज्यकारभारांत करण्यांत आलेल्या कांहीं उलाढालींशिवाय दुसरा कोणताही दोष याप्रसंगीं बापूंना व नानांना दादासाहेबांच्या अंगीं चिकटवितां आलेला नाहीं हें पाहण्याजोगें आहे. दादासाहेबांविरुद्ध बापूंकडून घेण्यात आलेला हा आरोप खरा नसून लोकांचीं मनें दादासाहेबांविरुद्ध बिथरविण्याकरतां ही निव्वळ खोटी हुलुडच उठविण्यांत आली होती, असें दाखवून देण्यांत आलें आहे. (पान ३१६ क १७). शिवाय दादासाहेबांचा पक्ष हलका करावा या उद्देशानें गंगाबाईस पुण्याहून घराबाहेर काढून आपल्या स्वाधीन करून घेण्याच्या कसकशा युक्त्या नाना व बापू करीत होते हें शिवाजी बाबाजीनें मंगळवेढ्याहून मिरजेस वामनराव पटवर्धन यांना पाठविलेलें साविस्तर पत्र ग्रंथकारांनीं उद्धृत केलें आहे त्यावरून दिसून येतें. (पान ३२० क २१). या पत्रावरून "नानांचा पक्ष गंगाबाईच्या कबजामुळें बळकट होणार होता व त्याच्या सिद्धीकरतां विषप्रयोग, गर्भपात वगैरे हुलुडी त्यांजकडून उठविण्यांत येत होत्या." असा ग्रंथकारांनीं निष्कर्ष काढला आहे तो सयुक्तिक आहे. (पान ३२२ क २२). गंगाबाईला बाहेर काढण्याकरतां बापूंनीं गंगाबाईच्या माहेरीं—साठ्यांच्या घरीं जाण्याचा त्यांचा राबता पाडला; परंतु त्यानें काम भागलें नाहीं. म्हणून नानांनीं निराळीच राजकारणीयुक्ति काढून ही गोष्ट अमलांत आणल्याचें दाखविण्यांत आलें आहे. (पान ३४१ ते ३४६ क ४२, ४३)

इ. स. १७७९ च्या जुलैमध्यें गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग याला पाठविलेल्या पत्रावरून नारायणरावाला रघुनाथरावानीं ठार मारिलें असा आरोप दादासाहेबांवर बारभाई करूं लागल्याचें दिसून येतें. ( पान ३३१ क २९ ). नाना, बापू वगैरे मुत्सद्दी व कांहीं सरदार मंडळीही दादासाहेबांबरोबर मोहिमेकरतां बाहेर पडली होती. बापू हे स्वारी मुक्कामावरून पुण्यास येत जात असत. दादासाहेबांचा मुक्काम पेडगांवास असतां सखारामबापू आजारी असल्याचें ढोंग करून पुण्यास येऊन राहिले. त्यांत आपलें राजकारण साधण्याचा त्यांचा हेतु होता. तसेंच नाना, हरीपंत फडके वगैरे लोकांना पुण्यास परत नेण्याची विश्वासघाताची अजब युक्ति योजून दादासाहेबांकडून त्याबद्दल बापूंनीं कशी परवानगी मिळविली याचीही सविस्तर हकीकत देण्यांत आली आहे. ( पान ३३६ क ३६ ). दादासाहेबांचा बापूंवर पूर्ण विश्वास होता. ते अशी दगलबाजी व विश्वासघात करतील अशी शंकाही दादासाहेबांना न येणें साहजिक होतें. दादासाहेबांविरुद्ध असलेल्या सर्व कारभारी मंडळींना पुण्यास परत नेण्याचें हें विश्वासघातकी कृत्य बापूंना आपल्या कारस्थानाच्या सिद्धीकरतां करावें लागलें. सखारामबापूंच्या स्वाधीन या कारस्थानी मंडळींना करण्यांत राघोबादादांनीं चोराच्या हातांत जामदारखान्याच्या किल्ल्या दिल्याप्रमाणेंच झालें असे उद्गार ग्रंथकारांनीं काढले आहेत.

पुण्यास परत आल्यावर बापू, नाना व इतर कारस्थानी मंडळींनीं ' बारभाई 'ची रीतसर स्थापना केली, व इतिहासांत प्रसिद्ध असलेलें 'बारभाईंचें कारस्थान ' करण्यास सुरवात केली. या बारभाईंच्या कारस्थानाचे आरंभापासूनचे खरे सूत्रधार जरी नानाच होते तरी वरकरणी सखारामबापूंना त्यांत प्राधान्य देण्यांत आलें होतें. दादासाहेबांना स्वप्नांतही या कारस्थानाची कल्पना आली नाहीं. याचें कारण एकच होतें. तें हें कीं त्यांचा सखारामबापूंवर दृढ विश्वास होता. दादासाहेबांनीं आपल्या हातांनीं सखारामबापूला ता. ९ फेब्रुवारी १७७४ रोजीं पाठविलेलें पत्र पेशवे दप्तरांतून उद्धृत करून ग्रंथकारांनीं हें दाखवून दिलें आहे.

(पान ३४८ क ४८). या विश्वासघातकी कारस्थानांचा मोबदला सखाराम-बापूंना नानाकडून पुढें सच्याम मिळाल्याचें दिसून येतें. बारभाईनीं राघोबा-दादांच्या पक्षातील सरदारांवर व लोकांवर चांगलाच सूड उगविला हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ३५३ क ३). ग्रंथकारांनीं 'प्रकरण १९ वें, बारभाईच्या कारस्थानाचा उदय' यांत बारभाईनीं राघोबादादाविरुद्ध जीं कारस्थानें केलीं त्यांचें वर्णन केलें आहे. या कारस्थानांत बापूकडे व नानाकडे कोणकोणतीं कामें होतीं याचें वर्णन पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे. 'सखाराम-बापूंनीं खर्चाला लागणारें कर्ज उभारावें, सरदारांत फूट पाडावी, परराज्याशीं मसलती कराव्या, लढाईचे डावपेंच लढवावे वगैरे कामें त्यांना करावीं लागत. नानांची कामगिरी दिसावयाला दुय्यम पण असावयाला अव्वल अशीच होती.' (पान ३६९ क २०). ह्मणूनच पुरंदरचा बंदोबस्त त्यांच्या ताब्यांत होता. नाना व बापू या दोघांच्या स्वभावानुसार त्यांच्या कारस्थानाच्या दिशाही भिन्न होत्या. यासंबंधीं चिकित्सा करून ग्रंथकारांनीं 'नानांचें कारस्थान कमी खर्चाचे व विशेष स्वावलंबी असे; ह्मणूनच ते लोकदृष्टीनें यशस्वी होत गेल्याप्रमाणें दिसलें असा निष्कर्ष काढला आहे. (पान ३६९ ते ३७१ क २० व २१).

सवाईमाधवरावांच्या जन्मापूर्वी व नंतरही दादासाहेबांनीं आपल्या भटी नाना व बापू याना कळवून समेटाचा तीनदां प्रयत्न केला. परंतु नानाप्रमाणें बापूंनीही त्या फेटाळून लावल्या व दादासाहेबांची डाळ शिजूं दिली नाहीं. नानाप्रमाणें बापूही राघोबादादाच्या विरुद्ध रचण्यात आलेल्या दुष्ट कारस्थानाच्या दोषास 'संगती संग दोषेण सतीच मति विभ्रमः' या न्यायानें पात्र झाले यात नवल नाहीं.

ग्रंथकारांनीं प्रकरण १६ वें, 'पेशव्यांचें राज्य पोखरणारे बारा भुंगे' यांत बारभाईनीं नाना प्रकारचीं कारस्थानें करून पेशवाईच्या हिताकडे लक्ष न देतां पेशवाईचें कायमचें नुकसान कसें केलें हें दाखविलें आहे. बापू व नाना हे दोघे राज्याचा कारभार चालवीत होते, ही गोष्ट मोरोबादादा फडनविस

यांना सहन झाली नाहीं. मोरोबादादांनीं दादासाहेबांचा पक्ष धरल्यामुळें त्यांचा व कारभारी यांचा बेबनाव झाला. कारभाऱ्यांनीं त्यानंतर भारत फोज-फांटा जमवून दादासाहेबांचा त्यांच्या समेटाच्या इच्छेला न जुमानतां कसा पिच्छा पुरविला व शेवटीं त्यांनीं दादासाहेब बंडखोर आहेत असें फर्मान कसें काढलें व सर्वांना तें पाठविलें याचें सविस्तर वर्णन देण्यांत आलें आहे. (पान ३८९ ते ३८८ व ३९७ क ११, १२ व १८). बारभाईनीं काढलेलें फर्मान बिसंगत असून ते बारभाईंच्या गळशांशीं कसें आलें याची चर्चा करण्यांत आली आहे. (पान ३९७ ते ३९९ क १८ व १९). बारभाईनीं राघोबादादांचें समेटाचें बोलणें झिडकारल्यामुळें पेशव्यांच्या राज्याची कशी धूळधाण झाली, प्रजेच्या कशा हालअपेष्टा झाल्या, इतर राज्यकर्त्यांना कशी फूस मिळाली व पुढें त्यांच्या त्यांच्यातही झगडे होऊन राज्याचा नाश होण्याची कशी पाळी आली याचें सविस्तर वर्णन करून, (पान ४१९ ते ४२१ क १४ ते १७) ग्रंथकारानीं हें सर्व कसें टाळतां आलें असतें हें पुढील शब्दांत स्पष्टपणें दाखवून दिलें आहे. 'परंतु येथें एवढें मात्र पुन्हां नमूद करून ठेवावेंसें वाटतें कीं, दादासाहेबांना माधवराव पेशव्यानीं पूर्वी कबूल केलेली छोटीशी जहागीर जर बारभाईनीं त्याचवेळीं कबूल केली असती तर हे पुढील सर्व अनर्थ खात्रीनें टळले गेले असते व पेशव्यांचे, पेशवाईचे व बारभाईंचे निघालेले धिंडवडे खात्रीनें टळले असते.' (पान ४२१ क १७).

सदाशिवरावभाऊ म्हणून पुढें आलेला दुसरा इसम खराच सदाशिवराव-भाऊ आहे अशी खात्री झाली असतांही बापूंनीही नानाच्या कारस्थानाविरुद्ध वागण्याचें धैर्य इतराप्रमाणें दाखविलें नाहीं असें स्पष्ट दिसून येतें. बारभाईंचें कारस्थान उभारण्यांत आल्यावर 'सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः' या न्यायानें बार-भाईना त्या कारस्थानाच्या सिद्धीकरतां सावकार लोकांकडून कर्ज काढून पैसे मिळविण्याची तजवीज करणें भाग पडलें. पुण्यांतील सावकारांना बोलावून आणून त्याबद्दल विचारणा करतां त्यानीं सखारामबापूंच्या नांवचीं खतें करून

दिल्यास आपण वाटेल तेवढें कर्ज देऊं असें कबूल केलें. यावरून सावकार-लोकांचा बापूंवरच विश्वास होता नानावर नव्हता असें दिसून येतें. बारभाई-चाही बापूंवरच विश्वास असल्यामुळें त्यांनाच मुख्य कारभाऱ्याचा अधिकार देण्यांत आला होता. वडीलकीचा कुलअधिकार हातीं असल्यामुळें पेशव्यांचे राज्य सुरळीतपणें चालविण्याची सर्व जबाबदारी त्यांच्यावरच असे. सरकारांतून कोणास कांहीं देणें असल्यास देणें यादीवर बापूंचा 'द्यावें' असा शेरा होत असे व नानांचा त्याखालीं 'देवावें' असा शेरा होत असे. हे दोन शेरे झाल्यावर त्या यादीची अंमल बजावणी होत असे. कित्येक वेळां नानांच्या मनांत असलें तरी राज्याचें हिताहित लक्षांत घेऊन बापू द्यावें हा शेरा मारीत नसत. त्यामुळें नाना नाखुष होत. ज्यावेळीं बापूंचा द्यावें शेरा मिळणार नाहीं असें नानांस वाटे तेव्हां फक्त देवावें या आपल्या शेऱ्यावरच अंमल बजावणी व्हावी म्हणून नाना पेशव्याची आई गंगाबाई यांना पुढें करून देणें यादीची अंमल बजावणी करीत. याप्रमाणें बापूंच्या अधिकाराचें अतिक्रमण करता यावें म्हणून नानांनीं गंगाबाईचे साधन हस्तगत केलें होतें. नाना व बापू यांच्यांत मतभेद झाल्यास मध्यस्थी करण्याचें काम गंगाबाईकडेच होतें. त्यामुळें आपल्याला अनुकूल असा त्यांचा फांसा पडावा म्हणून गंगाबाईंना वश करून घेणें नानाला अवश्य. वाटणें साहजिक होतें. आपल्या शेऱ्याशिवाय गंगाबाईमार्फत कामें पार पाडून नानांनीं चालविलेल्या अतिक्रमणामुळें बापूंना फार वैषम्य वाटे. परंतु त्याचा प्रतिकार करण्याचें त्यांना सामर्थ्य नव्हतें. बापूंच्या अधिकाराचें नानांनीं चालविलेलें अतिक्रमण सावकार मंडळींच्या नजरेस आल्यानें त्यांचे धाबें दणाणलें. त्यांना आपले पैसे परत कसे येतील याची काळजी वाटूं लागली. हें आक्रमण दूर करण्याचा त्यांनाही मुळींच अधिकार नव्हता म्हणून हा नानांचा कांटा दूर करावा या हेतूनें गारद्यांकडून त्यांना जीवें मारून टाक-ण्याचा गुप्त कट केला गेला. नानांना ही हकीकत समजतांच त्यांनीं त्या गारद्यांना शिक्षा करून आत्मसंरक्षणाची तयारी केली. या पलीकडे जाऊन नानांनीं या

कटाचे बुडाशीं कोण आहेत याची चौकशीसुद्धां केली नाहीं. हा कट पुण्यांतील 'दामोदर मंडळीनीं' म्हणजे सावकार लोकांनीं केला होता असें पटवर्धनांच्या पुण्यांतील कारकुनाच्या लेखावरून दिसून येतें. या सावकार लोकांना बापूंचें पाठबळ असल्यानें तेही या कटांत सामील होते असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ९३६ क. ७).

पुढें धारचे किल्ल्यांत आनंदीबाई होत्या. त्यांचें पारिपत्य करण्याकरितां कारभाऱ्यांनीं सैन्य पाठवून त्या किल्ल्यास वेढा देऊन लढाई सुरू केली होती. अशा प्रसंगीं आनंदीबाईनीं बापूंना पत्र पाठविलें होतें. तें ग्रंथकारानीं ऐ. ले. संग्रहांतुन उद्धृत केलें आहे. (पान ९४८ क १८). बापूंच्या सरळ व धार्मिक स्वभावधर्माकडे पाहतां त्यानीं आनंदीबाईच्या सदर पत्रांतील न्याय्य मागण्या खात्रीनें मान्य केल्या असल्या असें दिसतें. परंतु नानांच्या शिरजोर-पणामुळें बापूंचें कांहीं चालण्याजोगें नव्हतें, म्हणून त्यांना या कामीं 'मूग गिळून' स्वस्थ बसणेंच भाग पडलें असें दिसून येतें. बापूंचे व नानांचे स्वभावधर्म कसे भिन्न स्वरूपाचे होते, याचें वर्णन ग्रंथांत आलें आहे. (पान ९९४। ९९९ क १). नानांचें धोरण सत्ता व लष्करी सामर्थ्य हीं हातीं ठेऊनच लोकमत अनुकूल करून घेण्याचें होतें. या धोरणानेंच ते कोणतेंही कारस्थान पार पाडीत असत. बापूंचें धोरण जसास तसें या स्वरूपाचें असे. त्या धोर-णानेंच त्यांचीं कारस्थानें उभारलीं जात. नानांच्या कारस्थानाच्या बुडाशीं चढा-ईचें धोरण असे तर बापूंच्या कारस्थानाच्या बुडाशीं संरक्षक धोरण असे, असें ग्रंथकारांनीं दाखवून देऊन आपल्या धोरणास अनुसरून त्या उभयतांची वाग-णूकही अशी भिन्न होती याचें समर्पक वर्णन केलें आहे. (पान ९९९ क १).

दादासाहेबांविरुद्ध आपणांस मदत केल्याबद्दल निजामाला नानांनीं तीस लक्ष रुपयांची जहागीर दिली होती. पेशवे आपली नेहमीं मदत घेतात करतां आपल्यालाही त्याबद्दल इनाम मिळणें जरूर आहे असें शिंदे-होळकरांनाही वाटूं लागलें. यासंबंधीं होळकरांनीं आपली एक लांबलचक मागणीची याद

कारभाऱ्यांकडे दिली. सरदारांना जहागिरी, इनामें वगैरे देणें हें राज्याच्या हिताचें नाहीं असें बापूस वाटत असे. त्यामुळें त्यांनीं होळकरांस पुढील सडेतोड उत्तर पाठविलें. 'सरदारांनीं श्रीमंताकडे पहून निखालसपणें यांच्या पायाशीं वर्तावें. श्रीमंतांनीं कोणासही उणें केलें नाहीं समजोन म्हणेल त्याशीं समजोन उत्तर करूं. न समजोन म्हणेल त्याशीं उत्तर तसेंच केल्याखेरीज परिणाम नाहीं.' (पान ९९७ क ३) या उत्तरानें बापूंच्या कारभारी धोरणावर चांगलाच प्रकाश पडतो. या उत्तरात अशी मागणी करणें कां गैर आहे हें कळवून आपण जशास तसे वागण्यास तयार आहों, आपणांस कारभारीपणाचा लोभ नाहीं असें त्यांनीं स्पष्ट कळविलें आहे. हें उत्तर दूरदृष्टीचें असून राज्याच्या हिताचें कसें आहे याची चर्चा करून ग्रंथकारांनीं विशद केलें आहे. (पान ९९७, ९९८ क ४ ते ७) या उत्तरामुळें शिंदे व होळकर यांनीं नवीन इनामाची अगर जहागिरीची अपेक्षा न करतां ते पेशव्यांची नोकरी करण्यास कबूल झाले. शिंदे–होळकर हे बापूला अनुकूल झाल्याचें पाहून नानांना बरें वाटेना. बापूंची सत्ता नष्ट करण्याची त्यांची इच्छा होती म्हणून त्यांनीं शिंद्यांना अनुकूल करून घेतलें. पूर्वीपासून शिंदे नानांच्या पक्षाचेच होते. त्यामुळें नानाना याप्रसंगीं त्यांना सहज वळवितां आलें. पटवर्धन सरदारही बापूंचा द्वेष करीत. ते आपल्या पत्रांतून बापूंना कशा शेलक्या शिव्या देत होते याचा मासला ग्रंथकारांनीं दिला आहे. (पान ९९९ क ८), बापूंच्याविरुद्ध नानाकडे जाण्याबद्दल मोबदला म्हणून आपणांस दहालक्षांची जहागीर व असीरगड किल्ला नानांनीं द्यावा अशी शिंद्यांनीं मागणी केली. बापू या शिंद्यांच्या मागणीविरुद्ध असतांही गंगाबाईमार्फत नानांनीं ती कबूल केली, याप्रमाणें शिंद्यांना 'येन केन प्रकारेण' आपल्या पक्षांत ओढून नानांनीं त्यांजकडून लेखी इमानप्रमाणपत्र घेतलें. सदर इमानप्रमाणपत्र नानांच्या चरित्रावरून ग्रंथकारांनीं उद्धृत केलें आहे. (पान ९६० क ९), शिंद्यांचें उदाहरण पाहून होळकरही जहागिरीबद्दल हट्ट धरून बसले. बापू या सर्व कारवाईच्या विरुद्ध

होते. अशा देणग्या देण्यांत राज्याचा धडधडीत नाश आहे हें त्यांना दिसत होतें. या राजहितविरोधी नानांच्या वागणुकीचा त्यांना चांगलाच अनुभव आला. आपला वडीलकीचा कारभार काढून घेण्याकरतांच हें नानांचें कारस्थान आहे, अशी त्यांची खात्री पटली. अशीच कपट कारस्थानें नानांनीं दादासाहेबांचा हक्क बुडविण्याकरतां केलीं होतीं; असें त्यांना आतां दिसून आलें.

राघोबादादांचा पिच्छा पुरवून त्यांचा हक्क बुडविल्यामुळें पेशवाईचें कसकसें नुकसान झालें याचा चित्रपट यावेळीं त्यांच्या डोळ्यासमोरून गेला असावा असें म्हणून ग्रंथकारांनीं नुकसानीच्या सात बाबी वर्णन केल्या आहेत. त्या विचारणीय आहेत यांत शंका नाहीं. बापूंना आतां कृतकर्माचा पश्चात्ताप झा.त्यामुळें नानांना अधिकारभ्रष्ट करून दादांना आणून पुनश्च त्यांना त्यांच्या हक्काचा अधिकार देणें राज्याच्या हिताचें वाटलें व मोरोबादादाना हातीं धरून या कामाची तड लावण्याचें त्यांनीं ठरविलें. नाना व बापू यांच्या उलट मोरोबादादा होते. त्यांना बारभाईचा कारभार पसंत नव्हता. नाना व बापू या दोघांचेंही उच्चाटन व्हावें अशी त्यांची इच्छा होती. दादासाहेबांना पुनश्च गादीवर आणण्याचा त्यांचा पूर्ण मानस होता. हें जाणून बापूंनीं आपल्या इच्छित कार्यसिद्धीकरितां त्यांची गुप्त भेट घेतली. त्यावेळीं वाटाघाट होऊन त्या उभयतांमध्यें जो करार झाला, त्याचें स्वरूप ग्रंथकारांनीं चार कलमात दाखवून दिलें आहे. (पान १६७ क १६). त्यांत सवाईमाधवरावाचे अज्ञान-दशेंत दादासाहेबांना पेशव्यांच्या गादीवर बसवावें व त्यांना वडीलकीचा मान द्यावा; तसेंच नानांचें पूर्ण उच्चाटन करून राज्याचा कारभार बापू व मोरोबा-दादा यांजकडे सोंपवावा हीं मुख्य कलमें होतीं. पुढें मोरोबादादांनीं होळकरांना व इतर कांहीं सरदारांना वश करून बराच फौजफांटा जमविला व बापूकडून 'मंत्र फुटला, त्वरा करा' असा इशारा मिळतांच त्यांनीं पुण्यावर चाल करून येऊन तें आपल्या ताब्यांत घेतलें. त्यांनीं पार्वतीबाईकडून दिवाण-गिरीचीं वस्त्रें, शिक्केकट्यार, जरीपटका वगैरे अधिकारचिन्हें संपादन करून

ते पुरंदरगडावर चालून करून गेले. नानांनीं यावेळीं 'शीर सलामत तो पगडी पचास' या न्यायानें पुण्याहून पळून जाऊन पुरंदरगड गांठला. पुरंदरच्या किल्लेदारानें त्यांना आंत न घेतल्यामुळें त्यांना बाहेरच रहावें लागलें. या स्थितींत नानांनीं बापूंचा धांवा केला व त्यांची गांठ घेऊन त्यांचा सल्ला विचारला. बापूंनीं मोरोबाशीं समेट करावा असें सांगितलें. नानांनीं त्यांनाच मध्यस्थी करण्यास व समेट घडवून आणण्यास विनंति केली. त्याप्रमाणें त्यांनीं समेट कसा घडवून आणला याचें सविस्तर वर्णन करून ग्रंथकारांनीं समेटाची चार कलमें दिलीं आहेत. ( पान १७३ क २२ ). हा समेट घडवून आणल्याबद्दल बापूंना चहूंकडून धन्यवाद मिळाले. बापूंचें लक्ष व्यक्तीकडे नसून राज्याच्या हिताकडेच होतें. ह्मणून हा समेट करण्यांतच राज्याचें हित आहे अशी त्यांची खात्री झाल्यामुळें त्यांनीं तो घडवून आणण्याचा अट्टाहास केला. त्या समेटाप्रमाणें बापूंचा व मोरोबादादांचा कारभार सुरू झाला. तो नानांना खपणें शक्य नव्हतें. ह्मणून त्यांनीं समेटाच्या अटी बाजूस ठेऊन मोरोबाविरुद्ध पुनः कारस्थान सुरू केलें. गुप्तपणें फौजेची तयारी चालविली. शिंदे नानांना मदत करण्याकरतां फौजेनिशीं पुण्यावर चालून येणार हें समजतांच मोरोबादादांना यावेळीं राघोबादादांना व इंग्रजांना आणणें जरूर आहे असें वाटलें. त्यांनीं त्याकरतां मुंबईस आपला मनुष्यही पाठविला. इंग्रजांनीं कांहीं अटीवर दादासाहेबांना घेऊन येण्याचें कबूल केलें. त्या अटी 'अधिकारयोग' ग्रंथांतून ग्रंथकारांनीं उद्धृत केल्या आहेत. ( पान १८० क ३० ). इंग्रजांचें ह्मणणें या अटी खुद्द सखारामबापूंनीं मुख्य कारभारी नात्यानें मान्य करून दादासाहेबांना घेऊन येण्याचें आमंत्रण आपल्या सहीशिक्क्यानिशीं दिलें पाहिजे असें होतें. बापूंनीं तसें करण्याचें नाकारलें. मोरोबादादांना आपली मसलत फिसकटल्यामुळें राग येऊन त्यांनीं बापूंना कैद करण्याचा विचार चालविला; बापूंना हें समजतांच त्यांनीं पुनः नानांशीं युति केली. मोरोबादादांविरुद्ध नाना, बापू एक झाले. बापूंनीं शिंद्यांचीही गांठ घेऊन त्यांचीही पाबद्दल समजाविशी केली. बापूंना दादासाहे-

बांचें येणें इष्ट होतें तरी त्यांना इंग्रजांचें वावडें असे. असें मत बनल्यामुळें कोणत्याही निमित्तानें राज्यांत इंग्रजांचा शिरकाव होऊं नये असें बापूस वाटे. ह्मणूनच त्यांनीं या प्रसंगीं इंग्रजांस स्वदस्तुरनें निमंत्रण देण्यास नकार दिला. या बाबतींत बापूंच्या भावना कशा होत्या व त्यांनीं सर्वस्वी पड खाऊन नानांशीं व त्यांच्या पक्षाशीं एकी कां केली याचें वर्णन ग्रंथकारांनीं उत्तम प्रकारें केलें आहे. (पान ९८२ क ३२). पुढें होळकरही नानांस येऊन मिळाले. त्यामुळें मोरोबादादांचा पक्ष अगदींच लंगडा पडला. नानांच्या पक्षाची फौज वीस हजार तर मोरोबादादांची चार हजार होती. अशा स्थितींतही होळकरांच्या मनांत मोरोबांशीं समेट करावा असें होतें. त्यांनीं समेटाचे तीन मार्ग सुचविलें होते. (पान ९८६ क ३८). होळकरांप्रमाणें बापूंचेंही ह्मणणें मोरोबांशीं मिटतें घ्यावें, परंतु त्यांना कारभारांत मात्र घेऊं नये असें होतें. खुद्द मोरोबांनींही अशी लाचारीची स्थिति प्राप्त झाल्यामुळें नानांची पुष्कळ आर्जवें केलीं. परंतु नानांच्या निर्ढावलेल्या मनावर या सर्वांचा 'उपड्या घागरीवर पाणी ओतल्याप्रमाणें' लवलेशही परिणाम झाला नाहीं. ते कोणत्याही प्रकारें मोरोबाशीं मिटतें घेण्यास तयार नव्हते. त्यामुळें नाईलाजानें मोरोबादादांनीं जरीपटका, शिक्कयाकट्यार वगैरे नानांच्या स्वाधीन करून फौजफाटांही घालविला व ते नानांच्या स्वाधीन झाले. नानांनीं मोरोबादादांना जन्मठेपेची शिक्षा देऊन किल्ल्यावर कैद करून ठेवलें. ते पुढें आमरण २२ वर्षें नानाच्या कैदेंत होते. नानांनीं मोरोबांच्या पक्षाच्या लोकांचेंही मनसोक्त पारिपत्य केलें. त्याचें सविस्तर वर्णन देण्यांत आलें आहे. (पान ९८९ क ३७). या पारिपत्यसत्रांतून यावेळीं बापूच काय ते पार पडले. यावेळीं बापूंवर हत्यार उपसणें नानांना महाग पडलें असतें. हें लक्षांत घेऊन नाना त्यांच्याविषयीं स्वस्थ राहिले. परंतु योग्य संधि येतांच याचा वचपा त्यांनीं कसा काढला हें पुढें दिसून येईल.

जरी मोरोबादादांचा निकाल लागला तरी बापूंच्या डोक्यांत घोळत असलेल्या 'राघोबादादांना पेशवेराज्याच्या कारभारांत आणावें' या कल्पनेचा

निकाल लागला नव्हता. बापूंनीं त्याबद्दल पुनः कारवाई सुरू केली. त्यांनीं शिंदे, होळकर यांना वळवून आपल्या बाजूस आणिलें व त्यांच्या सहाय्यानें नानाविरुद्ध राघोबादादांना पुण्यास आणविण्याचें कारस्थान उभें केलें. त्याप्रमाणें दादासाहेब येण्यासही निघाले. नानांनींही युद्धाची तयारी करून दादासाहेबांवर सैन्य रवाना केलें. दादासाहेबांनीं तळेगांव नजीक वडगांव व कारलें येथें नानांच्या सैन्याचा मोड केला. तळेगांवच्या लढाईकरतां नानांनीं किती सैन्य जमविलें होतें व त्याची रचना कशी केली होती, याचें वर्णन देण्यांत आलें आहे. (पान ९९८ क ११). दादासाहेबांकडे फार थोडें सैन्य असतांही त्यांनीं नानांच्या सैन्याची पिछेहाट करून तळेगांव सर केलें. हें पाहून नाना हवालदिल झाले. त्यानंतर नानांनीं रामबाण उपाय म्हणून 'दग्धभूमीच्या कारस्थानाची' कशी उभारणी केली व दादासाहेबांना हस्तगत करून त्यांचेकडून राज्याचें बेदावा पत्र कसें लिहून घेतलें ही हकीकत मागें दिलीच आहे.

आतां पूर्ण सत्ताधिकारी बनण्याच्या मार्गांत नानांना सखारामबापूंचा एकच कांटा राहिलेला होता. तो काढून टाकणें अवश्य होतें. नाना, बापू, शिंदे वगैरे सर्व मंडळी पुरंदरगडावर आल्यावर शिंद्यांनीं बापूंची एकांतांत गांठ घेतली व 'ज्या इसमांनीं फितूर केला असेल त्यास काय शिक्षा करावी' असें त्यांना विचारलें. बापू अशा इसमांस किल्ल्यावर पोंचवावें असें उद्गारले. यावर शिंद्यांनीं त्यांना त्यांच्या फितुरीच्या चिठ्या दाखवून राजद्रोही गुन्हेगार म्हणून त्यांना कैद करून सिंहगडावर पाठविलें.

ग्रंथकारांनीं सखारामबापू, मोरोबादादा, चिंतो विठ्ठल वगैरे मंडळींवर राजद्रोहाचे केलेले आरोप, राजद्रोहाचे कसे होऊं शकत नाहींत हें सयुक्तिकपणें दाखविलें आहे. (पान ६०९ क १९). नानांना अधिकारच्युत करण्याची खटपट करणें म्हणजेच राजद्रोह मानल्यास ते राजद्रोही होते. याच अत्यंत विपर्यस्त व अन्यायी दृष्टीनें त्यांना राजद्रोही ठरवून भयंकर शिक्षा ठोठावण्यांत आल्या होत्या. बापूंना कैद केल्यानंतर नानांनीं त्यांचें सर्व उत्पन्न, सरंजाम

वगैरे जप्त करून त्यांच्या अलोट संपत्तीची कशी धुळदाण केली हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ६०६ क २०). बापूंना नंतर अहमदनगरच्या किल्ल्यावर नेण्यांत आलें. जेव्हां नानांनाही पुढें कैदी ह्मणून या गडावर आणलें जाईल तेव्हां त्यांना देण्याकरतां एक भविष्यदर्शक चिठ्ठी बापूंनीं किल्लेदाराकडे दिली. त्यांतील मजकूर 'शिंद्याकरवीं तुह्मीं माझा जसा शेवट केलात तसा शिंदे तुमचा शेवट करतील' असा होता. ही चिठ्ठी पुढें खरोखरच शिंदे यांच्याकडून नाना कैद केले जाऊन कैदी ह्मणून त्याच किल्ल्यावर आल्यावर त्याना देण्यांत आली, तेव्हां त्यांना रडूं कोसळलें, अशी आख्यायिका पावगी याच्या ग्रंथावरून देण्यांत आली आहे. (पान ६०७ क २१). बापूंना पुढें रायगड किल्ल्यावर नेण्यांत आलें. त्यांचा तेथें अतिसारानें ता. २ आगष्ट सन १७८१ रोजीं अंत झाला. या थोर मुत्सद्यासंबंधीं ग्रंथकारांनीं 'डफसाहेबाचें मत दिलें आहे.' (पान ६०८ क २२). तें वाचनीय आहे. तसेंच बापूंची खासगी घरगुती हकीकतही सविस्तरपणें देण्यात आली आहे. (पान ६०८ क २३). बापूंचे आचारविचार कसे धार्मिक स्वरूपाचे होते व ते दानधर्मही कसा सढळ हातानें करीत हेंही दाखविण्यांत आलें आहे. (पान ६१० क २४). तसेंच बापूंचें परराज्यांत कसें वजन होतें याचें वर्णन पुढील शब्दात करण्यात आलें आहे. "निजाम, हैदर, भोंसले व कोल्हापूरकर छत्रपती यांच्या दरबारात बापूंचें चागलें वजन होतें." व त्याच्याकडून पुष्कळ नजराणे बापूंस येत. निजामाकडून बापूस 'मदारुल महाम' हा किताब मिळाला होता. (पान ६११ क २५). बापूंच्या स्वभावाचें यथार्थ वर्णन ग्रंथकारानीं उत्तम प्रकारें केलें आहे. (पान ६११ क २६). अशा या बुद्धिवान शहाण्या व थोर मुत्सद्याच्या बुद्धीचें चीज व्हावें तसें झालें नाहीं व त्याचा अंत अशा हृदयद्रावक स्थितींत झाला हा काळाचाच महिमा होय. 'कालाय तस्मै नमः'।

## महादजी शिंदे तथा पाटीलबुवा.

महादजी शिंदे हे पेशव्यांचे मोठे मातबर व शूर सरदार होते. महादजी हे राणोजी शिंद्यांचे दासीपुत्र. राणोजी शिंद्याच्या घराण्याचा पानपतचे कढाईत

नाश झाल्यामुळें शिंद्यांची गादी चालविण्यास औरस संतति राहिली नाहीं. त्या गादीचे हक्कदार वारस म्हणून महादजी पुढें आले. राणोजी शिंद्यांच्या भाऊबंदांपैकीं मानाजीराव शिंदे फांकडे हे सदर गादीवर आपलाच हक्क आहे असें म्हणूं लागले. राघोबादादाच्या मनात ही गादी महादजीसारख्या दासी-पुत्राकडे न चालविता ती शिंदे घराण्यांतील अस्सल वंशज मानाजीराव फांकडे याजकडे चालवावी असें होतें. असें असता नानानीं माधवरावांची निराळीच समजूत करून देऊन त्याजकडून महादजीला शिंद्यांची सरदारी देवविली. यांत नानाचें राजकारण काय होतें व माधवरावांच्या मनाचा ओढा शिंद्यांच्या अस्सल वंशजाकडे होता तरी ते नानांच्या या राजकारणास कां बळी पडले, याची चर्चा करण्यात आली आहे. (पान १६१ क २). या कामीं राघोबादादा महादजीच्या विरुद्ध गेल्यानें महादजी शिंदे त्यांचे आजन्म वैरी बनले. दादा-साहेब माधवरावाच्या विनंतीवरून उत्तर हिंदुस्थानांत गेले, तेव्हां त्यांच्या बरोबर महादजी शिंदे, होळकर वगैरे सरदार होते. उत्तर हिंदुस्थानांत गोहदचा जाट मराठ्यांच्या मुलुखांत पुंडगिरी करून लुटालूट करीत असे. दादासाहेबांनीं त्याच्यावर स्वारी करून गोहदच्या किल्ल्यास वेढा दिला. महादजीचें व त्या जाटाचें चांगलें असल्यामुळें व दादासाहेबाविरुद्ध त्यांचें मन दूषित झालें अस-ल्यमुळें ते जाटाला आतून फितूर झाले. दादासाहेबाना ही हकीकत समजतांच ते महादजीवर संतापले व महादजीला मेखसूखालीं डोकें फोडून ठार करावें असें बोलूं लागले. तेव्हा मल्हारराव होळकरानीं त्याच्याकडे महादजीबद्दल मध्यस्थी केली. तेव्हा दादासाहेब 'सुभेदार, आपण या कामांत पडूं नये. अखेर गुलामाची जात (दासीपुत्र) आपल्या जातीवर गेली' असें उत्तरले. तरी शेवटीं मल्हाररावानीं महादजीला दादासाहेबाच्या पायावर घालून, विनवण्या करून, त्यांच्याकडून महादजीला क्षमा करविली.

दादासाहेब मल्हाररावांच्या वडीलकीचा मान राखीत व त्यांना 'काका' म्हणत. म्हणूनच मल्हाररावांना आपल्या वजनानें दादासाहेबांचा राग शांत

करतां आला. मल्हाररावांच्या या मध्यस्थीसंबंधीं प्रचलीत असलेली आख्यायिकाही देण्यांत आली आहे. (पान १६३ क ४). ही महादजीच्या फितुरीची व दादासाहेबांनीं दिलेल्या धमकीची हकीकत पुणें दरबारास समजतांच, नानांनीं माधवरावांकडून महादजींचें रक्षण करण्याबद्दल मल्हारराव होळकर व विठ्ठल शिवदेव यांना मुद्दाम पत्रें लिहविलीं. या संबंधीं चर्चा करून महादजीच्या फितुरीच्या बुडाशीं नानांचें कारस्थानच असलें पाहिजे असें ग्रंथकारांनीं अनुमान काढलें आहे. (पान १६५ क ५).

होळकरांच्या गादीला दत्तक करून वारस करण्याचा प्रश्न उद्भवला तेव्हांही महादजींनीं दादासाहेबांविरुद्ध जाऊन तुकोजीलाच वारसदार करण्याचें कारस्थान केलें ही हकीकत मागें आलीच आहे. महादजींनीं त्या प्रसंगीं अहिल्याबाईची कशी गैरसमजूत केली व तिला आपल्या बाजूस कसें वळवून घेतलें हें पाहण्याजोगें आहे. (पान १६९, १७० क १२). महादजीचा कानमंत्र प्रभावी ठरल्यामुळेंच अहिल्याबाईंना सारासार विचार राहिला नाहीं असें दाखविण्यांत आलें आहे. (पान १७१, १७२ क १५) महादजींनीं तुकोजीच्या दत्तक प्रकरणीं इतकी बाजू घेतली कीं त्यांच्यावर लोकांनीं लांच घेतल्याचा आरोप करण्यासही कमी केलें नाहीं. (पान १७५ क २०). सन १७६९ सालीं महादजींनीं आज्ञाभंग करून पुण्याहून आपली छावणी न हालविल्याबद्दल माधवरावांनीं त्यांना कशी तंबी दिली याची हकीकत मागें आलीच आहे.

बारभाईकडून दादासाहेबांचा पाठलाग चालू असतां दादासाहेब इंदुरास गेले. तेथें त्यांना महादजीही येऊन भेटले. शिंदे व होळकर यांना दोन्ही डगरीवर हात ठेवण्याचें धोरण पत्करून पुणें दरबार व दादासाहेब या दोघांनाहि खुष ठेवावें असें कां वाटत होतें याचें मार्मिक विवेचन ग्रंथकारांनीं केलें आहे. (पान ३८१, ३८२ क ८). दादासाहेबांच्या मागोमाग हरिपंत पाठलाग करीत येत होते. दादासाहेब नर्मदा पार झाल्यावर हरिपंतांनींहि नर्मदा

उतरून दादासाहेबांना गांठण्याची तयारी चालविली असतां महादजी शिंद्यांनीं त्यांना व वामनराव पटवर्धनांना नर्मदा उतरून येऊं नये अशी पत्रें पाठविलीं. शिंदे, होळकरांनीं समेटाच्या वाटाघाटी करून खर्चाचे पांच लाख रुपये दादासाहेबांना देवविले. त्यामुळें दादासाहेबांनीं त्याच्या बरोबर देशीं जाण्याचें कबूल केलें. शिंद्यांनीं दादासाहेबाना वेळोंवेळीं फौजेच्या खर्चाबद्दल पंधरा लक्ष रुपये देवविले होते व मध्यस्थीच्या दलालीदाखल त्यांनींहि बरीच रक्कम स्वतः घेतली होती. वाटेंत दादासाहेबांना शिंदे, होळकर हे आपला स्वार्थ साधण्याच्या विचारांत आहेत व त्यांनीं पुणें दरबारीं आपल्याला कबजांत ठेवण्याविषयीं करार केल्याचें समजलें. तो त्याना मान्य झाला नाहीं व ते उज्जनीकडे निघून गेले. बारभाईंच्या फौजेनें त्याची ससेहोलपट चालविलीच होती. दादासाहेबाचें समेटाचें व शिंदे, होळकर याचे मध्यस्थीचें गाणें सुरूंच होतें. शिंद्यांनीं पुनः कांहीं अटी हरिपंत फडक्यांना कळविल्या. त्यांनीं त्या नाकारून पुनः दादासाहेबाशीं लढाई सुरू केली. यापुढें दादासाहेबानीं कोणता मार्ग स्वीकारला याची हकीकत मागें आलीच आहे.

सदाशिवराव भाऊंना तोतया ठरविण्याचे कामींही नानांना शिंद्यांनीं मदत केल्याचें मागें दाखविलेंच आहे. शिंद्यांना ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत असें माहीत असतांही निव्वळ नानांच्या भिडेखातर त्यांचा पक्ष मजबूत करण्याकरताच महादजींनीं नानांना ही मदत केलेली होती हें ग्रंथकारानीं उद्धृत केलेल्या त्यांच्या पत्रावरूनच दिसून येतें.

बारभाईंनीं इंग्रजांशीं पुरंदरचा तह केल्यावर बारभाईंचे बोलावण्यावरून शिंदे व होळकर पुण्यास आले. होळकर इनामादाखल जहागिरीची मागणी करीत असतां बापूंनीं न्याय निष्ठूर व स्पष्ट उत्तर देऊन त्यांना व शिंद्यांना कसें अनुकूल करून घेतलें, हें मागें दाखविलेंच आहे. त्यानंतर नानांनीं बापूंविरुद्ध स्वतंत्र पक्ष निर्माण करून शिंद्यांना पुनः त्यांच्या मागणीप्रमाणें इनाम देण्याचें कबूल करून आपल्या पक्षांत ओढलें व त्याजकडून इमानप्रमाण

लिहून घेतलें. ही हकीकतही मागें आलीच आहे. पुढें मोरोबादादाचें कारस्थान उपस्थित झालें तेव्हां शिंद्यांना फौजेसह येण्याबद्दल नानांनीं कळविलें होतें व त्यांनीं येण्याचें कबूल केलें होतें, हें पुरंदराहून शिवाजीपंतानें गंगाधरराव पटवर्धन यांस मिरजेस लिहिलेल्या सांकेतिक पत्रावरून दिसून येतें. (पान ६७८ क २९). त्याप्रमाणें महादजी शिंदे आलेही. मोरोबांच्या कारस्थानाच्या कामीं नानांनीं सर्व भार शिंद्यावर टाकला होता. याचें कारण नाना व महादजी यांच्यामध्यें 'फडणिशी शिंद्याची व सरदारी नानाची' अशा इमानप्रमाणानें आणक्रिया झाल्या होत्या. नानांनीं महादजी शिंद्याकडून कानमंत्र देववून होळकरानाही वश करून घेतलें. मोरोबादादाच्या प्रकरणाचा निकाल केल्यावर शिंद्याकडून नानांनीं त्यांच्या पक्षातील लोकांचा नाश करविला. होळकरानीं मोरोबाला वाचविण्याचे कांहीं मार्ग सुचविले होते त्याचा विचार न करतां त्यांच्याच गोटांत शिरून त्याच्या समक्ष मोरोबाच्या लोकांना शिक्षा देऊन होळकराची शिंद्यानीं मानखंडणा केली असें दाखवून देण्यांत आलें आहे. (पान ९८६ क ३८).

दादासाहेबांना पुण्यास आणविण्याची मसलत झाल्यावेळीं इंग्रजांविरुद्ध मोहीम करणें भाग होतें. तेव्हांही नानांनीं शिंद्यांना बऱ्हाणपूर शहर व अशीरगड किल्ला हीं दोन ठिकाणें इनाम देऊं करून सज्ज करून ठेविलें. शिंद्यांना नवीन इनामाशिवाय नवीन कामगिरी करण्याचा हुरूप येत नव्हता असें दिसतें. इकडे या कामीं बापूंनींही शिंदे, होळकर व इतर कांहीं सरदार यांना फितूर करून घेण्याची कारवाई चालविली होती. पुढें दादासाहेब पुण्याकडे चाल करून येत असतां नानांनीं आपल्या 'दग्धभूमि कारस्थानाच्या' निर्वाणीच्या अस्त्राचा प्रयोग केल्यामुळें, दादासाहेबांना शिंद्याच्या स्वाधीन कसें व्हावें लागलें व शिंद्यांनीं त्यांचेकडून नानांच्या इच्छेप्रमाणें राज्याचें बेदावापत्र कसें लिहून घेतलें हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. शेवटीं दादासाहेबांना दरसाल पांच सात लक्ष रुपये देऊन शिंद्याच्या देखरेखीखालीं झांशीस ठेवण्याचें ठरलें. या

मोखमीच्या कामगिरीबद्दल शिंद्यांना झांशी प्रांतीं पांच लक्ष रुपये उत्पन्नाच्या मुलुखाची जहागिरी देण्याचें ठरलें.

दादासाहेबांची व सखारामबापूंची वासलात लावल्यावर नाना फडनविस हे दक्षिणचे राजे व महादजी शिंदे त्यांचे सेनापती असा त्यांचा बोलबाला झाला, असें ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे. (पान ६०६ क १९) शिंद्यांनीं आपला सरदार हरी बाबाजी याच्याबरोबर दादासाहेबांना झांशीकडे रवाना केलें होतें. वाटेंत दादासाहेबांनीं हरी बाबाजीशीं लढाईचा प्रसंग आणून त्यांत दादासाहेबांनीं हरी बाबाजीस ठार केलें व तेथून सुरतेस जाऊन ते इंग्रजांस मिळाले. ही हकीकत मागें आलीच आहे. या प्रसंगीं शिंदे दादासाहेबांस फितूर झाले असा आरोप करण्यांत येऊं लागला. तो टाळण्याकरतां शिंद्यानीं इंग्रजांशीं लढाई देण्याचें ठरविलें. दादासाहेब शिंद्याच्या ताब्यांतून निघून गेल्यामुळें ठरल्याप्रमाणें शिंद्यांना जहागीर देण्यांत आली नव्हती. त्याबद्दल महादजी व नाना यांच्यामध्यें वाद चालू होता नानांनीं अखेर ती जहागीर शिंद्यांना देण्याचें कबूल केल्यामुळें शिंदे इंग्रजांशीं सामना देण्याकरतां सैन्यासह गुजराथकडे रवाना झाले. याप्रमाणें इंग्रजाची व शिंद्यांची लढाई चालू असतां मराठ्यांना सहाय्य करण्याकरतां हैदरनेंही मद्रास प्रांतावर स्वारी करून तो मुलुख बेचिराख केला. शिंदे व हैदर या दोघांशीं एकदम सामना करणें फायद्याचें होन नाहीं असें पाहून इंग्रजांनीं शिंद्यांच्या मार्फत पेशव्यांशीं ता. १७ मे सन १७८२ रोजीं सालबाई येथें तह केला. त्याच्या अटी देण्यांत आल्या आहेत. (पान ६२९ क २० ). या तहांतील अटी कशा स्वरूपाच्या होत्या, त्या पेशव्यांच्या राज्याला सर्वस्वी हानिकारक कशा होत्या, हें कलमवार दाखवून ग्रंथकारांनीं या विषयाची मार्मिक व उद्बोधक चर्चा केली आहे. ( पान ६२९ ते ६३३ क २१ ते २३ ). या तहावर पेशव्यांची मखलाशी करून देण्याची वाटाघाट नाना व शिंदे यांच्यामध्यें नऊ महिने चालल्याचें दिसून येतें. या तहामुळें पेशव्यांचें राज्य डबघाईला येऊन त्याचा नाश खात्रीनें होईल हें नानांना

समजत नव्हतें असें थोडेंच होतें. परंतु तो तह त्यांच्याच कृतकर्माचें फळ असल्यामुळें त्यांना तो तह करणें भाग पडलें. असें दाखविण्यांत आलें आहे. 'हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंचि परिणामीं' हा न्याय नानांच्या बाबतींत तरी खोटा कसा ठरणार? हा तह वडवून आणण्याची कारवाई मुख्यतः शिंद्यांची होती हें जरी खरें तरी त्यांतील दोषांचें बीज नानांच्याच अंगीं असल्याचें कसें दृगोचर होतें हें ग्रंथकारांनीं (पान ६३३ क २३) वर उत्तम प्रकारें दाखवून दिलें आहे.

राजकारणांतील शिंद्यांचे गुरु नानाच होते असें दिसून येतें. यामुळें 'शिष्यापराधे गुरोर्दंडः' या न्यायानें मुख्यतः नानांच्याच डोक्यावर या तहाच्या दोषाचें खापर फुटणें साहजिक आहे. या तहानें दादासाहेबांची बोळवण केल्यानंतर त्यांच्या पक्षांतील लोकांचे कसे हालहाल करण्यांत आले हें मागें दाखविलेंच आहे. दादासाहेबांचा सखाराम हरी गुप्ते नांवाचा एक अत्यंत शूर व इमानी परभू सरदार होता. याला शिंद्यांनीं पुरंदरावर कैद केलें व त्यास नानांनीं नगरच्या किल्ल्यावर सक्त कैदेंत ठेविलें. त्याच्या भावाला व पुतण्यालाही सक्त कैदेंत निरनिराळ्या किल्ल्यावर ठेवण्यांत आलें. या सखाराम हरीसंबंधीं हकीकत ग्रंथकारांनीं 'सखाराम हरी शूर व नाना क्रूर' या २३ व्या प्रकरणांत सविस्तर दिली आहे. ती सर्व उद्बोधक व वाचनीय आहे. त्यावरून या थोर, शूर व इमानी पुरुषाचा राजकारणांतील दर्जा किती उच्च व स्पृहणीय होता हें दिसून येतें.

दिवसेंदिवस महादजी शिंद्यांचें प्रस्थ पुणें दरबारीं वाढत चाललें, नव्हे डोईजड होत चाललें; याची जाणीव नानांना होऊं लागली. इ. स. १७८१ सालीं शिंद्यांची व इंग्रजांची लढाई माळव्यांत चालू असतां, कर्नल मूर यानें शिंद्यांशीं तहाची वाटाघाट केल्यामुळें इंग्रजांचा व शिंद्यांचा स्वतंत्र तह झाला. त्याचीं कलमें देण्यांत आलीं आहेत. (पान ६६२ क. २). इंग्रजांनीं हा स्वतंत्र तह शिंद्यांशीं केल्यामुळें त्यांनीं शिंद्यांच्या स्वतंत्र अस्तित्वाला मान्यता दिल्याप्रमाणें

झालें. तसेंच कलकत्याच्या गव्हर्नर जनरलनेंही कलकत्त्याहून मि. अंडरसन यांस सर्व अधिकार देऊन पुणें दरबारांशीं तह करण्याकरितां पाठविला, तोही शिंद्याकडेच पाठविला गेला. याचवेळीं मुंबईहून वेदरस्टनसाहेब पुण्यास तहाची वाटाघाट करण्यास नानाकडे आला असतां त्यांनीं त्यास शिंद्यांच्या मध्यस्थीनें वाटाघाट चालू असल्यामुळें शिंद्यांकडेच पाठविला. याप्रमाणें शिंद्यांचा पेशवे दरबारांशीं असलेला सेव्यसेवकभाव कमी होत जाऊन त्यांना तयस्थ मध्यस्थाची भूमिका प्राप्त झाली होती. पेशवे दरबारीं साल्बाईचा तह घडवून आणण्याबद्दल त्यांनीं स्वतंत्रपणें इंग्रजांकडून दलाली अगर बक्षीस म्हणून भडोच शहर मिळविलें होतें. यापुढें शिंद्यांना पुणें दरबारीं भारी असा लष्करी सत्ताधिकारी दुसरा कोणी राहिला नव्हता. त्यामुळें नानांनाही आतां शिंद्यांचा डोईजडपणा भासूं लागला होता. शिंदे आपणांला स्वतंत्र समजूं लागले. इतर राज्यांशीं स्वतंत्रपणें तह करण्यापर्यंत त्यांनीं मजल गांठली. या गोष्टी नानांच्या सूक्ष्म-दृष्टींतून निसटणें शक्य नव्हतें. साल्बाईचा तह कायम करून घेण्यास इंग्रजांचा वकील मि. अंडरसन पुण्यास आल्यावेळीं शिंद्यांनीं त्यांजकडे पुढील उद्गार काढल्याचें ग्रंथकारांनीं दाखविलें आहे. ' इंग्रजांनीं इतउत्तर मराठ्यांचे संबंधानें जें कांहीं बोलणें चालणें करणें, तें आपल्यामार्फत करावें; आपण इंग्रजांचा खरा दोस्त. साल्बाईचा तह करण्यांत निजाम व भोसले आडकांठी घालीत होते; पुण्याचे मुत्सद्दी परस्परांत भांडत असून त्यांपैकीं हरीपंत व होळकर आपला द्वेष करतात; आणि पेशवे तर अल्पवयी असल्यामुळें पुण्यास सर्व घोंटाळेच होणार ' ( पान ६६४ क. ३ ). यावरून शिंदे इंग्रजावरील आपलें वजन कसें वाढवीत होते हें स्पष्ट दिसतें.

गोहदचा जाट, इंग्रज व महादजी यांच्यामध्यें लढाई चालू असतां इंग्रजातर्फे महादजीशीं लढाई करण्यास आला होता. इंग्रजांनीं जाटाला या कामगिरीबद्दल तहांत ग्वाल्हेर बहाल केली होती. ह्या गोष्टीचें उट्टें काढण्याच्या हेतूनें महादजीनें या जाटाबरोबर लढाई करून त्याचा पुरा मोड केला व त्याची ग्वाल्हेर, गोहद वगैरे कांहीं मुख्य मुख्य ठाणीं काबीज केलीं.

त्यानंतर महादजीनें आपलें लक्ष दिल्लीच्या बादशहाकडे वळविलें. यावेळीं दिल्लीस शहाअलम बादशहा होता. त्याचे कांहीं सरदार बंडखोर बनले. कांहींनीं बादशहाला कैद करून त्याची गादी बळकावण्याचाही मनसुबा केला. हें पाहून बादशहानें महादजीला आपल्याला मदत करून हें सरदारांचें बंड मोडण्याची विनंती केल्यावरून इ. स. १७८४ सालीं महादजीनें ससैन्य दिल्लीवर चाल करून ही बंडाळी मोडून टाकली. यामुळें बादशहानें खूष होऊन शिंद्यांना आपले मुख्य सेनापती नेमिले व दिल्ली, आग्रा ही शहरें त्यांच्या स्वाधीन करून आपल्या राज्याचा सर्व कारभारही त्यांच्या हातीं दिला. ही हकीकत पुणें दरबारीं समजतां व त्यांनाही विस्मयानंद झाल्याचें नमूद करण्यांत आलें आहे. (पान ६६६ क ९).

ग्रंथकारांनीं 'शिंद्यांना घरचे दुष्मन नाना' व 'नानांच्या स्वार्थकुंडांत शिंद्यांची आहुती' या २६ व २७ व्या प्रकरणांत महादजींच्या अंतापर्यंतच्या त्यांच्या पुढील कामगिरीचें वर्णन केलें आहे. दिल्लीच्या बादशहानें आपल्या राज्याचा सर्व कारभार शिंद्याकडे सोपविल्यानंतर मोठा दरबार भरवून त्यानें पेशव्यांना 'वकील मुतलखीचे' पद व महादजीला त्यांच्या नायबगिरीचीं वस्त्रें देण्याचा समारंभ केला. तेव्हां तेथील कांहीं पठाण सरदारांना व रजपूत राजांना या गोष्टीचें वैषम्य वाटलें. त्यामुळें सदर पठाण व रजपूत सरदार आणि शिंदे यांमध्यें लढाई उपस्थित झाली. शिंद्यांनीं त्यांचा मोड केला. परंतु अखेरीस आपलें सैन्य शत्रूला फितूर झाल्याचें दिसून आल्यावर व दुसऱ्या कोणाचीही मदत न मिळाल्यामुळें त्यांच्यावर यशस्वी माघार घेण्याचा प्रसंग ओढवला. तेव्हां शिंद्यांनीं नानांकडे मदत मागितली असतांही व त्यावेळीं तिकडे पेशव्यांचे सरदार शिवाजी विठ्ठल यांजकडे कांहीं फौज असूनही त्यांनीं शिंद्यांना मदत केली नाहीं. यावरून नानांनीं महादजीला याप्रसंगीं तोंडघशीं पाडण्याचा डाव चालविल्याचें दिसून येतें, असें अनुमान नानाफडनविसाचे बखरींतील

उतारा देऊन ग्रंथकारांनीं काढलें आहे, तें सयुक्तिक दिसतें. ( पान ७१७ क २ ). या प्रसंगीं महादजीनें मदतीबद्दल नानांना बरींच पत्रें पाठविलीं तरी त्यांचेकडून मदत न मिळाल्यानें त्यानें नानाला एक निर्वाणीचें पत्र पाठविलें. तें पत्र खरे कृत नाना फडनविस यांचे चरित्रावरून ग्रंथकारांनीं उद्धृत केलें आहे. ( पान ७१७ क ३ ). हें पत्र फार मार्मिक असून त्यांत महादजीनें नानांना जे चिमटे घेतले आहेत त्याची सविस्तर व समर्पक चर्चा ग्रंथकारांनीं केली आहे. ( पान ७१८ ते ७२० क ४ ते ७ ). या पत्राप्रमाणें नानांनीं अलीबहाद्दर व तुकोजी होळकर यांना मदत करण्याकरतां पाठविलें. यापैकीं होळकर शिंद्यांकडे गेलेच नाहींत. अलीबहाद्दर गेले पण त्यांची शिंद्यांना मदत झाली नाहीं. यावरून शिंद्यांना मदत पाठविली असें नानांनीं वरकरणीं दाखविलें परंतु त्यांच्या मनांत शिंद्यांना मदत करण्याचें नसून त्यांना खालींच पाडण्याचें होतें असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ७२०|७२१ क ९ ते ११). शिंदे राजपुतान्यांत लढाईत गुंतले असतां इस्माईलबेग व गुलामकादर या दोघां सरदारांनीं बादशहाचा व त्याच्या मुलांमाणसांचा अत्यंत छळ केला. गुलामकादरनें निर्दयपणें बादशहाचे डोळे फोडले व जनान्यांतील त्याच्या स्त्रियांची विटंबना केली. याप्रमाणें दिल्लींत या लोकांच्या कमालीच्या दुष्ट कृत्यांनीं कसा हाहाःकार उडाला याचें वर्णन देण्यांत आलें आहे. ( पान ७२२|७२३ क ११, १२ व १३ ). शिंद्यांनीं गुलाम कादरला हालहाल करून ठार मारून व इस्माईलबेगला कैद करून त्यांच्या त्या कृत्याचा सूड कसा उगविला याचेंहि वर्णन देण्यांत आलें आहे. ( पान ७२४ क १४ व ७२७ क २० ). यानंतर शिंदे बादशहाला भेटल्यावर त्यांनीं महादजीला आपला मुलगा मानून त्यांचा अत्यंत गौरव केला. त्यानें पाटीलबुवांना 'मदार उल्मुलुख आलिजा बहादुर' व शिंद्यांचे मालक सवाई माधवराव पेशवे यांना 'वकील-इ-मुतलक' असे सन्मानाचे किताब दिले. नंतर शिंद्यांनीं दिल्ली व आग्रा प्रांत आपल्या राज्यांत घेतले व बादशहाकडून सर्व राज्यांत गोवध बंदीची सनद मिळविली.

बाबांनीं मदतीकरतां पाठविलेले सरदार अलीबहादर व होळकर यांच्या फितुरी वागणुकीला नानांचा बदसल्लाच कारण असला पाहिजे अशी महादजींची समजूत झाली होती असें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७२९ क १७ ). शिंदे पुण्यास येण्यास कां निघाले यासंबंधीं लोकांत कशा कंड्या उठल्या होत्या याचें वर्णन मागें आलेंच आहे. ‘ खुद्द महाराष्ट्रांत असा तर्क पसरला होता कीं पेशवे व नाना यांची गठडी वळण्याकरतांच शिंदे येत आहेत ’ असें वर्णन खरे कृत नाना फडणिसांच्या चरित्रावरून दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७३३ क १ ). नानांना व पेशव्यांना कैद करून पेशवाई बळकाविण्याच्या हेतूनें शिंदे पुण्याकडे चाल करून येत आहेत अशी त्यावेळीं मुद्दाम हूल उठवून महाराष्ट्रांतील लोकांचीं मनें शिंद्याबद्दल दूषित करण्यांत आलीं होतीं, असें ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे. ( पान ७३४ क १ ). शिंद्याचा आतां पुण्यास येण्याचा खरा हेतु त्यांच्या पुढील वागणुकीवरून व कृत्यांवरून दिसून येणार आहे. शिंदे फौजेसह पुण्यास येत आहेत असें समजतांच नानांनीं ‘ चोराच्या मनांत चांदणें ’ या न्यायानें आपल्या फौजेची तयारी करून ठेवली. शिंदे पुण्यास आल्यावर पेशव्यांच्या पदवीदान समारंभाबद्दल कसें रण माजलें व शेवटीं शिंद्यांनीं तो समारंभ थाटांत कसा पार पाडला ही हकीकत मागें देण्यांत आलीच आहे. त्याचप्रमाणें शिंद्यांनीं आपल्या फौजेकडून श्रीमंतांना सलामी देण्याचा टोलेजंग समारंभ केला याचाही उल्लेख मागें आलाच आहे. यानंतर ‘ जशास तसें ’ या न्यायानें ज्याप्रमाणें नानानीं महादजींच्या कारभारांत हात घालून त्यांना रंजीस आणलें, त्याप्रमाणें नानांच्या कारभारांत हात घालून त्यांचें खरें स्वरूप श्रीमंतांस व सर्व प्रजाजनांस दाखवून देण्याचा उपक्रम महादजींनीं केला. नानांनीं गोविंदराव गायकवाड याचा सरळ वारसा हक्क बुडवून गायकवाडांची सरदारी सयाजीराव यांच्या नावें केली होती. गोविंदरावानें यावेळीं आपल्या हक्काची मागणी शिंद्यामार्फत केली. शिंद्यांनीं त्यांत स्वतः लक्ष घालून नानांच्या मर्जीविरुद्ध श्रीमंताकडून गोविंदरावांना ती सरदारी

देवविली. तसेंच एकट्या नानालाच फडनविसीच्या जागेचा उपभोग करूं न देतां मोरोबादादाही फडनविसीच्या जागेचे हक्कदार असल्यानें त्यांना मुक्त करून त्यांचा हक्क त्यांना श्रीमंतांनीं द्यावा अशीही खटपट त्यांनीं चालविली. परंतु श्रीमंतांनीं, खुद्द नानाच्याच विरुद्ध ही बाब असल्यामुळें तींत लक्ष घातलें नाहीं. नानांना काढून मोरोबादादांचा हक्क त्यांना देण्यांत पेशवाईचेंही आर्थिक दृष्ट्या हितच होणारें होतें, असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ७४९ क १४). परंतु 'देवो दुर्बलघातकः' हा न्याय जगांत रूढ असल्यानें नाना या संकटांतून शीरसलामत पार पडले.

शिंद्यांनीं यावेळीं नऊ वर्षांचे हिशोब दरबारांत दाखल करण्याचे होते. ते रुजू करून त्यांनीं पेशव्यांवर आपलीच बाकी सात कोटी रुपये निघत असल्याचें दाखविलें. या कामीं श्रीमंतांनीं नानाविरुद्ध शिंद्याना कसा न्याय दिला हें मागें दाखविलेंच आहे. नानाविरुद्ध श्रीमंतांकडे तक्रारीची दाद लावण्याचें शिंदे हे एक प्रमुख साधन बनले होते. या गोष्टीचा फायदा घेऊन साताऱ्च्या किल्ल्यावर बंदिवासांत असलेल्या छत्रपतींनीं शिंद्यामार्फत श्रीमंतांकडे आपली दाद लावून नानांविरुद्ध स्वतंत्रतेची सनद कशी मिळविली ही हकीकत मागें देण्यांत आली आहे. त्याचप्रमाणें शंकरराव सचीवाचे कामांत शिंद्यांनीं श्रीमंतांकडून नानांचा डाव हाणून पाडून बाजीराव मोरेश्वर यांचें बंड मोडून सचीवांना कसा न्याय देवविला, हेंही मागें दाखविण्यांत आलें आहे. याप्रमाणें नानांच्या कारभारांत हात घालून शिंद्यांनीं त्यांच्या कित्येक कारवाया श्रीमंतांच्या नजरेस आणिल्या. यामुळें शिंद्यांनीं परत आपल्या देशीं निघून जावें ह्मणून नाना कारस्थान करूं लागले. शिंद्यांची व होळकरांची लढाई होण्याचा प्रसंग आल्यास शिंदे परत जातील ह्मणून त्या दृष्टीनें नानांनीं कारवाई सुरू केली. पुढें होळकर व शिंदे यांच्यामध्यें लढाईचा प्रसंग उद्भवून शिंद्यांच्या सरदारांनीं होळकरांचा मोड केला. अखेरीस लाखेरीचा मोठा संग्राम होऊन त्यांतही होळकरांचा पूर्ण पराजय होऊन त्याला पळ काढावा लागला. या लढाईची

साविस्तर हकीकत देऊन ग्रंथकारांनीं शिंद्यांच्या जिवबादादा वगैरे सरदारांच्या पराक्रमाचें वर्णन केलें आहे. ( पान ७५२ क २१ ). यापुढें नानांनीं शिंद्याविरुद्ध कसकशा वंड्या उठविल्या व श्रीमंतांकडे नाना शिंद्याविरुद्ध कशा तक्रारी करीत होते हे दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७५३ क २२ ). हा शिंदे होळकरांमधील कलह श्रीमंतांनीं स्वतः मध्यस्थी करून मिटविला. व नानांनीं शिंद्यांविरुद्ध टाकलेला डाव त्यांच्या चांगलाच अंगलट आला, असें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७५५ क २३ ). यानंतर शिंद्यांनीं संधि साधून पेशवाईचा कारभार आपणांस द्यावा अशी श्रीमंतांकडे मागणी केली, व त्याला श्रीमंतांनीं त्यांचे मन न दुखावितां खुबीदार उत्तर देऊन नकार कसा दिला व नानांना शिंद्यांच्या मागणीची हकीकत समजतांच ते श्रीमंतांकडे जाऊन कसे रडले, वगैरे हकीकत मागें देण्यांत आलीच आहे. नानांनीं हरिपंत फडक्यांना मध्यस्थी करण्याकरतां शिंद्यांकडे पाठविलें. शिंद्यानीं त्यांचे ह्मणणें ऐकून घेऊन आपला आग्रह सोडल्याचें सांगून 'तुह्मी ह्मणतां तसें चालूं' असें कबूल केलें. त्यानंतर तात्या, नाना व शिंदे हे सरकारवाड्यांत जमून त्यांच्यामध्यें वाटाघाट होऊन त्या त्रिवर्गांची दिलसफाई झाल्याचें मागें दाखविलेंच आहे. शिंदे आपला आग्रह बाजूस ठेऊन दिलसफाईस सहजासहजीं कबूल झाले यावरून त्यांनीं केलेली पेशवाईच्या कारभाराची मागणी फक्त नानांना शह देऊन वठणीवर आणण्यापुरतीच होती. खरोखरच नानांना काढून टाकून पेशवाईचा कारभार स्वतः करण्याचा त्यांचा इरादा नव्हता, असें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७६१ क २९ ). पाटीलबुवांना हा उद्योग कां करावा लागला याचाही खुलासा करण्यांत आला आहे. (पान ७६३ क ३० ). इतिहासांतील सर्व संगतीचा साकल्यानें विचार करतां ग्रंथकारांनीं काढलेलें हें अनुमान खरें ठरतें असें दिसून येईल.

नानांचा व पाटीलबुवांचा समेट झाल्यामुळें पेशव्यांचे दरबारीं आनंदाचें वातावरण निर्माण झालें. पुढें दिवाळीच्या उत्सवानिमित्त दारूकामाचा अपूर्व

समारंभ पाटीलबुवांनीं कसा घडवून आणला, तसेंच रंग खेळण्याचाही 'न भूतो न भविष्यति ' असा जंगी समारंभ व दीपोत्सव कसे करविले यांचे उल्लेख मागें आलेच आहेत. पाटीलबुवांनीं त्या वर्षाच्या श्रावण मासांत विद्वान ब्राह्मणांना दक्षिणा वांटण्याचेंही काम हातीं घेऊन आपल्या हातानें त्यांना दक्षिणा वांटली. हे सर्व उत्सव घडवून आणण्यानें पाटीलबुवांच्या मनांत कोणत्याही प्रकारचा किंतू राहिलेला नव्हता, खरोखरच त्याची दिलसफाई झाली होती असेंच दिसून येतें. त्यांच्या मनांत पेशवाईचा कारभार बळकावण्याचें असतें तर त्यांची अशी दिलसफाई व उत्सवपूर्ण वृत्ति होणें शक्य नव्हतें. शिंद्यांनीं पुण्यास आल्यावर कोणकोणतीं महत्वाचीं कामें हातीं घेऊन पार पाडलीं व लोकांना श्रीमंतांकडून खरा न्याय कसा मिळवून दिला, याचें सविस्तर वर्णन ग्रंथकारानीं कलमवार दिलें आहे. ( पान ७७० क ३९ ), शिंद्याचा व श्रीमंतांचा बराच सहवास घडून आल्यानें श्रीमंतांचें मन कसें आनंदित झालें व शिंद्यावर त्यांची कशी मर्जी बसली हेंही दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७७२ क ४० ).

पुढें ता. १२ फेब्रुवारी सन १७९४ रोजीं शिंद्यांचा एकाएकीं अंत झाला. त्यांच्या मरणाच्या कारणासंबंधींचीं निरनिराळीं मतें देऊन त्यांचा नव-ज्वरानें अंत होणें मुळींच संभवनीय नाहीं हें वैद्यशास्त्राच्या दृष्टीनें चिकित्सा करून दाखविण्यांत आलें आहे. ( पान ७७३ क ४१ ). तसेंच कांहीं इतिहासकार नानांकडून शिंद्यांना विषप्रयोग करण्यांत आला असें ह्मणतात तर कांहीं त्यांच्यावर नानांनीं मारेकरी घातले व त्यांना ठार मारलें असें ह्मणतात. या गोष्टीचीही समर्पक चर्चा करण्यांत आली आहे. ( पान ७७७ क ४२, ४३ ). पेशवाईत शिंद्यांचा दर्जा काय होता, तसेंच नानांच्या व त्यांच्या स्वभावांत काय फरक होता, हें ग्रंथकारांनीं काढलेल्या उद्गारावरून चांगलें दिसून येतें. (पान ७८७ क ४). महादजी शिंदे शूर, धर्मनिष्ठ व साधे होते. त्यांच्या धार्मिकवृत्ति व भावना कशा होत्या हें दाखवून देऊन त्यांच्या स्वभावांत वैशिष्ठ्य काय होतें हें ग्रंथकारांनीं उत्तमप्रकारें विशद करून दाखविलें आहे.

( पान ७८१ क २). पेशवाईंतील अशा या थोर, शूर, व धर्मनिष्ठ सरदाराचा आमांकडून शेवट झाल्याचें दिसुन येतें.

## परशुरामभाऊ पटवर्धन.

परशुरामभाऊ पटवर्धनांची पेशव्यांच्या प्रमुख सरदारांत गणना होत असे. यांच्या पूर्वजांकडे इचलकरंजीकरांच्या घराण्याची उपाध्येगिरी होती व त्यांच्याच आश्रयानें ते पुढें आले होते. परशुमभाऊ हे पटवर्धन घराण्यांत महापराक्रमी पुरुष होऊन गेले. ते वाजवाच शूर व अत्यंत धाडसी असत. आपल्या वयाच्या चौदाव्या वर्षापासुन त्यांनीं लढाईच्या मोहिमेवर जाण्यास सुरवात केली. पेशवाईचे आधारस्तंभच असे जे शूर, वीर, धाडसी व पराक्रमी योद्धे होते, त्यांत यांचा दर्जा बराच वरचा होता. आरंभापासून यांनीं आपल्या पूर्वजांचा किता गिरवून आपणांस सर्वस्वी नानाफडनविसांच्या राजपक्षाला वाहून घेतलें होतें. त्याचें अखेरीस कसें चीज झालें हें या ग्रंथावरून चांगलेंच दिसुन येतें.

परशुरामभाऊंचा पेशवे-दरबारशीं प्रत्यक्ष संबंध नारायणरावांच्या मृत्युनंतरच आला. नारायणरावांच्या मृत्यूनंतर राघोबादादांच्या हातीं राज्याचा कारभार आला तेव्हां त्यांनीं आपल्या सरदारांना मोहिमेवर जाण्याबद्दल सैन्यासह येण्यास पत्रें धाडलीं होतीं. त्यांत पटवर्धनांनाही बोलावण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें परशुरामभाऊ पुण्यास आपल्या शिबंदीसह आले व तेथून जेजुरीस जाऊन नाना व बापू या कारभारीद्वयाला भेटले. त्या दोघांनीं आपल्यापरी पुण्यांत घडून आलेली सर्व कची हकीकत त्यांना सांगितली. नंतर भाऊंनीं त्यासंबंधीं जेजुरीहून मिरजेस वामनराव पटवर्धन यांना ता. ११ आक्टोबर सन १७७३ रोजीं दोन पत्रें लिहिलीं. या दोन्हीं पत्रांतील महत्वाचा भाग ग्रंथकारांनीं ऐ. ले. संग्रहांतुन उद्धृत केला आहे. ( पान ३१४ क. १४ व पान ३१५ क. १६ ). त्यांत पुण्यास काय राजकारण चाललें होतें याचा उल्लेख भाऊंनीं त्यांना मिळालेल्या माहितीप्रमाणें केला आहे. त्यावरून दादासाहेबांना अधिकारभ्रष्ट करण्याबद्दल नाना व बापू या मुत्सद्यांच्या मनांत काय विचार घोळत

होते, त्यांच्याकडून त्यासंबंधीं कसकशी कारणें पुढें आणण्यांत येत होतीं हें दिसून येतें. त्या कारणांत नारायणरावांना ठार करण्याची गुन्हेगारी राघोबा-दादांची असल्याबद्दल मुळींच उल्लेख नाहीं ही गोष्ट महत्त्वपूर्ण आहे. दादासाहेब या कामीं खरोखर गुन्हेगार असते तर त्यासंबंधीं नाना व बापू यांच्याकडूनच भाऊंना माहिती खात्रीनें मिळाली असती व त्याचा उल्लेख वरील दोन्हीं पत्रांत अवश्य केला गेला असता. या पत्रांत दिलेलीं कारणेंही खरीं नव्हती. लोकांच्या डोळयांत धूळ टाकण्याच्या हेतूनें धूर्त मुत्सद्यांनीं उठविलेल्या या निव्वळ 'शेअर बाजारांतील' हुलुडीच होत असें ग्रंथकारांनीं दाखविलें आहे. (पान ११६ ते ११८ क १६, १७). वरील पत्रावरून गंगाबाईचा गर्भपात करण्याची साधनें वगैरे करतात अशी खोटीच माहिती नानांकडून भाऊंना मिळाल्याचें दिसतें. यामुळें भाऊंची साधी व सरळ मनोवृत्ति प्रक्षुब्ध झाली. पराक्रमी पुरुषाच्या भावना सहज उद्दीप्त होतात. त्याप्रमाणें भाऊही ही हकीकत ऐकून भावनावश झाले. परमेश्वराची आराधना करून हे गर्भपाताचे संकट टाळावें असें त्यांना वाटूं लागलें होतें. त्यांनीं वरील पत्रांत गर्भाचें संरक्षणार्थ कांहीं पांच सात ब्राह्मण जप्कर (अनुष्ठानास) घालावे. श्री कृपा करील. असें वामनरावांना लिहिलें आहे. यावरून ही गोष्ट स्पष्ट होते.

दादासाहेबांनीं सरदारांना घेऊन निजामाविरुद्ध मोहिम काढली होती. नानांची निजामाला आंतून फूस होती. नानांनीं कपट कारस्थान करून दादासाहेबांचे कांहीं सरदार फितुर केले होते. त्यांत परशुरामभाऊही असल्याचें दिसतें. भवानराव प्रतिनिधि फितुर झाल्याचा संशय आल्यावरून त्याचा गोट लुटावा असा दादासाहेबांनीं हुकूम केला. परंतु प्रतिनिधि कांहीं केल्या शरण येत नाहींत अशी दादासाहेबांची खात्री झाल्यामुळें त्यांनीं त्यांच्याशीं समेट केला. प्रतिनिधींच्या गोटावर दादासाहेबांचा हल्ला होणार ही बातमी समजतांच परशुरामभाऊ आपल्या स्वारांसह भवानरावांच्या मदतीला आले. तेव्हां भवानरावांचा दादासाहेबांशीं समेट झाल्याचें समजून त्यांची 'अतो भ्रष्टस्ततोभ्रष्टः'

अशी स्थिति झाली. त्यावेळीं त्यांची वर्तणूक कशी संशयास्पद होती, दादासाहेबांनीं त्यांना कित्तूरची खंडणी वसूल करण्यास जाण्याबद्दल हुकूम दिला असतांही ते तिकडे न जातां पुण्यास कसे निघून आले, हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ३९९, ३९६ क्र. ९). यावरून भाऊंची वागणूक सर्वस्वीं दादासाहेबांविरुद्धच व बारभाईंच्या तसेंच नानांच्या कारस्थानाला अनुसरूनच होती असें उघड दिसून येतें.

त्यानंतर दादासाहेब परत फिरून पंढरपुराकडे आले असतां सांगोल्याजवळ कासेगांव येथें त्रिंबकरावमामांची व दादासाहेब यांची लढाई झुंपली, त्यावेळीं परशुरामभाऊ वगैरे पटवर्धन सरदार त्रिंबकरावमामांना मदत करीत होते. परंतु दादासाहेबांच्या माऱ्यापुढें त्यांचा टिकाव न लागून त्यांना पळ काढणें भाग पडलें. त्यांना दुसरें दिवशीं साबाजीच्या सैन्याची मदत मिळाली तरी त्यांना दादासाहेबांवर पुनः चाल करण्याची छाती झाली नाहीं. नंतर पुनः दादासाहेब उत्तरेच्या दिशेनें जाऊं लागले. तेव्हांही बारभाईंच्या आदेशाप्रमाणें त्यांचा पाठलाग करणाऱ्यांमध्यें पटवर्धन होतेच. तसेंच तोतयाच्या बंडाचेवेळीं कारभारी ज्याला तोतया ह्मणत होते तो इसम खरा सदाशिवरावभाऊ आहे अशी परशुरामभाऊंची आई जानकीबाई इची खात्री झाली होती. तिनें परशुरामभाऊंस ता. ३।६।१७७६ चें पत्र पाठवून 'कोंकणांत भाऊसाहेब खरे जाहले. कारभारी होय नव्हे करतील, त्यांत तुह्मी सहसा न पडावें, सर्वांचें मतें खरेच जाहले' अशी त्यांची खातरजमा केली. या पत्राचा उल्लेख मागें आलाच आहे. असें असतांही परशुरामभाऊंनीं छातीठोकपणें पुढें येऊन सदाशिवरावभाऊंचा पाठपुरावा न करतां ते स्तब्ध राहिले, यावरूनही नानांच्या कारस्थानाशीं ते कसे एकजीव झाले होते हें दिसून येते.

परशुरामभाऊंकडे नानांनीं दक्षिणेकडील बंदोबस्त सोंपविला होता. त्यांनीं हैदरवर स्वारी करून चांगलाच पराक्रम गाजविला व कर्नाटकांतील मराठी राज्यांतील भाग त्यांचे ताब्यांतून काढून घेतला. पुढें नानांनीं सन

१७८० त हैदरशीं तह करून तो सर्व चालविला, हा भाग वेगळा. तसेंच त्यांनीं करवीरकरावरही स्वारी करून मर्दुमकीनें लढून शिरोळ व इतर ठाणीं घेतल्याचें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ६२० क ७ ). पुढें टिपूनें नरगुंद संस्थानावर हल्ला करण्यास आपल्या सरदारांस पाठविलें. नरगुंदकरांच्या विनंती-वरून नानांनीं त्यांना मदत करण्याचें कबूल केलें व त्यांनीं परशुरामभाऊ व बेहरे यांची त्या कामावर योजना केली व तुकोजीराव होळकरांनाही ससैन्य भाऊंचे मदतीस पाठविलें. ही सर्व तयारी पाहून टिपूनें निजामामार्फत पेशव्याशीं तह केला. त्यामुळें नानांनीं भाऊंना व बेहऱ्यांना परत बोलाविलें. नानांचें ह्मणणें 'टिपूचें सामर्थ्य मोठें आहे. त्याच्याशीं युद्ध सुरू करावयाचें तें बहुत तदबीरीनें व मोठ्या तयारीनें केलें पाहिजे' असें होतें. भाऊंचें ह्मणणें 'टिपूला भिण्याचें कारण नव्हतें; शत्रूशीं बेजरब लढाई द्यावी. शत्रूचा रेच मोडल्याशिवाय त्यांची गुर्मी जिरावयाची नाहीं.' असा त्यांचा आग्रह होता. ही सर्व हकीकत देऊन टिपूनें देऊं केलेल्या दोन वर्षांच्या नरगुंदकरांच्या खंडणीच्या आमिषाचा नानांनीं लोभ धरल्यामुळें व आपल्या शहाणपणाच्या घमेंडींत भाऊंचा सल्ला झिडकारल्यामुळेंच हा तह घडून आला व लढाईचा प्रसंग तात्पुरता पाळला गेला असें स्पष्ट दिसून येतें. ( पान ६७२, ६७३ क. १२ ). ही लढाई नानांनीं आकस्मिक रीतीनें थांबविल्यामुळें टिपूनें नरगुंदांत कसा हैदोस घातला, नरगुंदकरांना व त्यांच्या कुटुंबीय माणसांना टिपूनें कैद करून श्रीरंगपट्टणास नेऊन त्याची कशी अब्रू घेतली व नरगुंदकरांचा सर्वस्वीं नाश कसा केला, तसेंच पेशव्यांच्या इतर मुलुखातील हिंदू स्त्रीपुरुषांचा कसा अनन्वित छळ केला याचें सविस्तर वर्णन परशुरामभाऊंच्या चरित्रावरून ग्रंथकारांनीं दिलें आहे. ( पान ६७३, ६७४ क १४ ). वरील प्रसंगाचा दोष सर्वस्वीं नानांकडेच येतो हें ग्रंथकाराचें ह्मणणें सयुक्तिक दिसतें. हा दंगा थांबविण्याकरितां पुनः टिपूवर स्वारी करण्याबद्दल पटवर्धन व रास्ते यांना नानांनीं हुकूम केला व स्वतः आपण दुसरे सरदार व सैन्य घेऊन ते मोहिमेवर निघाले. त्यांनीं वेढा

देऊन बदामीचा किल्ला घेतला. परंतु त्यांत मराठ्यांची अतोनात हानि झाल्याचें दाखविलें आहे. ( पान ६७५ क १७ ). तसेंच या मोहिमेवर गेल्यावेळीं प्रथमपासुन भाऊंची वृत्ति उदासीन कां होती हेंही दाखविण्यांत आलें आहे. (पान ६७५ क १८). सन १७९० सालीं पुनः परशुरामभाऊंनीं इंग्रजांच्या दोन पलटणींची मदत घेऊन टिपूवर चढाई केली. या मोहिमेंत भाऊंनीं मोठ्या पराक्रमानें धारवाडचा किल्ला सर करून तुंगभद्रेच्या अलीकडील व पलीकडील शत्रूचीं ठाणीं काबीज केल्याचें वर्णन करण्यांत आलें आहे. ( पान ६७९ क २२ ). या मोहिमेंत एक अत्यंत निंद्य गोष्ट घडून आली. श्रृंगेरी येथील आद्य शंकराचार्यांचा मठ कुरुंदवाडकरांच्या फौजेंतील लमाण व पेंढारी लोकांनीं लुटला व अनन्वित निंद्य कृत्यें कशीं केलीं या सर्व प्रकाराचें वर्णन देण्यांत आलें आहे. तसेंच यासंबंधीं परशुरामभाऊंनीं स्वतः योग्य चौकशी केली नाहीं. कुरुंदवाडकरांनींही ती केली नाहीं. गुन्हेगारांना शिक्षा झाल्या नाहींत. शेवटीं श्रीशंकराचार्य स्वामींनीं स्वतः पुणें दरबारांत जावून या बाबतींत न्याय मागितला तरी तो त्यांना देण्यांत आला नाहीं, असेंही दाखवून देण्यांत आलें आहे. (पान ६७९, ६८० क २३). या प्रकरणीं पटवर्धनांकडे दोष कसा येतो हें दाखविण्यास ग्रंथकारांनीं ऐ. ले. संग्रहांतुन पटवर्धनांच्या दप्तरांतील दोन पत्रें उद्धृत केलीं आहेत. (पान ६८२ क २६,२७ ). त्यावरून खरा प्रकार कसा घडून आला व त्यांत खरोखर दोषी कोण होते हें दिसून येतें. ( पान ६८३ क २८ ).

नानांच्या हातीं राज्याचा कारभार आल्यावर पटवर्धन वगैरे ब्राह्मण सेनापतींनीं कांहीं प्रसंगीं वे. शा. सं. ब्राह्मण, शास्त्री वगैरे विद्वानांवर व हिंदु-धर्मपीठाच्या आचार्यांवर कसकसे जुलुम केले व त्यांचा नाश केला याचीं कांहीं उदाहरणें ग्रंथकारांनीं दिलीं आहेत तीं अत्यंत हृदयद्रावक आहेत. श्रृंगेरी-मठ लुटला तेव्हां परशुरामभाऊंनीं कुडलगी मठही लुटून त्याचा नाश केला. ही असलीं अन्यायाचीं कृत्यें करण्यास पटवर्धनांची धर्माचार्यासंबंधीची सुबुद्धीच

कारणीभूत होती असें दाखविण्यांत आलें आहे. परशुरामभाऊंच्या ठिकाणीं सूड-बुद्धि असण्याचें कारण पुढें दिल्याप्रमाणें देण्यांत आलें आहे. भाऊंची बयाबाई नांवाची मुलगी ८ वर्षांची असतां विधवा झाली. तेव्हां त्यांनीं विद्वान ब्राह्मणां-कडून व धर्मपीठाकडून तिचा पुनर्विवाह करण्यासंबंधीं शास्त्रार्थ मागितला. याबद्दल त्यांचेकडून नकार देण्यांत आला असावा असें दिसतें. कारण नंतर काशीहून याबद्दलचा रामशास्त्र्यांकडून शास्त्रार्थ आणवून घ्यावा लागला व हें करण्यांत लग्नानंतर बावीस वर्षें लोटल्यामुळें तिच्या जन्माचें वाटोळें झालें; या तीव्र भाव-नेनें भाऊंच्या ठिकाणीं सूडबुद्धि उत्पन्न झाली असावी असें ग्रंथकारांनीं अनु-मान काढलें आहे. (पान ६८९ क ३४).

पेशव्यांना पदवीदान करण्यानिमित्त शिंदे जेव्हां पुण्यास आले, तेव्हां नानांनीं सैन्याची जमवाजमव केली होती. तेव्हा परशुरामभाऊ नानांच्या विश्वासांतील सरदार असल्यामुळें त्यांनाही पुण्यास सैन्यासह बोलाविण्यांत आलें होतें. पटवर्धनांच्या मागील हिशोबाच्या रुजुवातीसाठीं त्यांना बोलावण्यांत आलें असें निमित्त बरकरणीं प्रसिद्ध करण्यांत आलें होतें. पुढें सन १७९९ सालीं खर्ड्याचे लढाईचेवेळीं निजामावर स्वारी करण्यांत आली, तेव्हां परशुरामभाऊंना मुख्य सेनापती नेमण्यात आलें होतें. त्यामुळें पुष्कळ सरदारांना वैषम्य वाटून त्यांच्यांत दुफळी होण्याचा प्रसंग उद्भवला. शेवटीं नानांना त्यांची समजूत घालून त्यांना कार्यप्रवृत्त करावें लागलें. या लढाईंत परशुरामभाऊ आघाडीस होते. श्रीमंत सवाईमाधवराव व सूत्रधार नाना हेही या मोहिमे बरोबर गेले होते. पण ते पिछाडीस होते. मुख्य सेनापतीला आघाडी दाखविण्यांत नानांचा हेतू स्पष्ट दिसून येण्याजोगा होता. लढाईचेवेळीं निजामाकडील सरदार काल-खान यानें भाऊंच्या कपाळावर जोरानें दोन वार केले. भाऊ घोड्याखालीं आले, त्यानें त्यांच्यावर तिसरा वार केला असतां तर प्रसंग कठीण होता. त्यावेळीं भाऊंचा मुलगा हरिपंततात्या यांनीं त्या पठाण सरदारावर हल्ला करून त्याचें शीर उडविलें. म्हणूनच भाऊ या प्रसंगांतून शीर सलामत पार पडले. शेवटीं

खड्र्यास लढाईचा शेवट होऊन निजामाचा मराठ्यांनीं पुरा मोड केला. ही सर्व हकीकत मागें आलीच आहे. पुण्यांत नानाकडून मुद्दाम दरबार भरवून या लढाईत दाखविलेल्या शौर्याबद्दल सरदारांचा योग्य सत्कार करण्यांत आला व त्यांना बक्षिसें देण्यांत आलीं. परशुरामभाऊंच्या शौर्य, धैर्य, पराक्रम वगैरे गुणांचें वर्णन करून नानांनीं या लढाईतील यशाचें सर्व श्रेय त्यांचे पदरीं बांधलें व त्यांना आणि त्यांच्या मुलांना, पुतण्याना बक्षिसें वगैरे देऊन त्यांचा अपूर्व सन्मान कसा करण्यांत आला याचें वर्णन करण्यांत आलें आहे. ( पान ८१४ क १९ ).

पुढें सवाईमाधवरावांचे मरणानंतर नानांनीं कारस्थान करून चिमाजी-आप्पाला यशोदाबाईनीं दत्तक घ्यावें असें ठरविलें. या कारस्थानाचें स्वरूप किती भानगडीचें व खोल होतें हें सविस्तरपणें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ८६० ते ८६९ क १६ ते १९ ). या आपल्या कारस्थानाला नानांनीं परशुरामभाऊंनाही पूर्णपणें अनुकूल करून घेतलें. हें दत्तविधान सर्वस्वीं हिंदु-धर्मशास्त्राविरुद्ध कसें होतें हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ८९९ क १४). या दत्तकाचें कारस्थान करून नानांनीं व भाऊंनीं हिंदुधर्मशास्त्र आपल्या अधि-काराच्या धुंदींत पायाखालीं तुडविलें असे सार्थ उद्गार ग्रंथकारांनीं काढिले आहेत. ( पान ८९९ क १३ ).

दुसऱ्या बाजीरावासंबंधीं दौलतराव शिंदे व नाना यांच्यामधील वाद बराच विकोपास गेला होता. परशुरामभाऊंच्या मध्यस्थीनें नाना व शिंदे यांच्या-मध्यें समेट कसा करण्यांत आला याचें सविस्तर विवेचन करण्यांत आलें आहे. या समेटाची कलमवार यादीही देण्यांत आली आहे. ( पान ८६४ व ८६९ क १९, २० ). यानंतर नानांनीं परशुरामभाऊंस 'आधीं बाजीरावांस आपल्या ताब्यांत घेऊन पक्का बंदोबस्त ठेवावा आणि मग चिमाजीआप्पास गादीवर बसवावा' असा निरोप पाठविला. परंतु भाऊंच्या मनाला बाजीरावांस कैद करणें प्रशस्त वाटेना. कारण भाऊ जेव्हां जुन्नराहून पुण्यास बाजीरावांना

व चिमाजीआप्पांना घेऊन येत होते तेव्हां बाजीरावानें त्यांच्या पायांवर डोकें ठेऊन आपल्या हक्काचें संरक्षण करून गादीवर बसविण्याबद्दल त्यांजकडून शपथ घेवविली होती. यामुळें भाऊंनीं नानांच्या निरोपाची अंमलबजावणी न करतां बाजीरावांना कैद करण्याची कामगिरी त्यांनीं बाळोबातात्यांवर सोंपविली व चिमाजीआप्पास दत्तक करण्याची कामगिरी स्वतः आपल्याकडे घेतली. त्या-प्रमाणें चिमाजीआप्पांस जबरीनें त्याचे मनाविरुद्ध आणून त्याचें दत्तविधान कसें उरकण्यांत आलें हें दाखविण्यांत आलें आहे. आपल्या निरोपाप्रमाणें बाजीरावांस स्वतः कैद न करतां भाऊंनीं ती कामगिरी बाळोबाकडे दिल्यामुळें भाऊ व बाळोबा आपल्याविरुद्ध कारस्थान करण्याच्या भानगडींत असावेत असा नानांना संशय आला. चिमाजीअप्पाच्या दत्तविधानाच्या दुसऱ्या दिवशीं भाऊंनीं नानांस ‘ नानांनीं पुण्यास येऊन कारभार करावा, बाळोबाचें व नानाचें पुनः सख्य व्हावें व आपणांस फौजेसंबंधीं काम द्यावें ’ असें पत्र पाठविलें होतें, व नानांच्या निरोपाप्रमाणें त्यांनीं हरीपंताला एकटा न पाठवितां त्याचे-बरोबर चार हजार फौज पाठविली. त्यामुळें आपल्याला कैद करण्याचा भाऊंचा व बाळोबाचा मनसुबा असावा असें नानांना वाटलें. व ते वाईहून मेणवलीस जाऊन राहिले. चिमाजीआप्पाकरतां घेतलेलीं पेशवाईचीं वस्त्रें त्यांनीं वाईहून पुण्यास पाठविलीं. परशुरामभाऊंनीं तीं चिमाजीअप्पास देऊन ते राज्याचा कार-भार पाहूं लागले. बाजीरावाला भाऊंनीं आपल्या स्वतःच्या कैदेंत न ठेवल्या-मुळें नानांनीं भाऊंना कारभारी पदावरून काढून टाकण्याचें कारस्थान सुरू केलें. पेशव्यांचा भाऊबंदापैकीं एक हक्कदार आपल्या कैदेंत तर दुसरा गादीवर असावा असा नानांचा दंडक होता. परशुरामभाऊंनीं हा दंडक बिघडविल्यानें त्यांच्याविरुद्ध नानांनीं कारस्थान आरंभिलें असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ८७२, ८७३ क २). या कारस्थानाच्या सिध्यर्थ कोणत्या गोष्टी नानांना करणें भाग होतें याची चर्चा करण्यांत आली आहे. (पान ८७४ क ३). चिमा-जीच्याजागीं बाजीरावाला गादीवर आणण्याबद्दल नानांनीं निजाम व भोंसले

यांच्यांशी संधान आरंभिलें. याचा सुगावा लागतांच नानांनीं तुर्त टोकास जाऊन रहावें व चातुर्मासानंतर त्यांनीं काशीस जावें हें इष्ट आहे असें भाऊंनीं ठरवून त्यांनीं आपला मुलगा महादाजीबरोबर सहाहजार फौज देऊन त्यांस त्यांच्याकडे पाठविलें, व त्यांना तसें कळविलें. नानांना ही बातमी लागतांच ते रायगडाकडे गेले व तेथून महाडला गेले; आणि तेथूनच त्यांनीं आपल्या महाडच्या कुप्रसिद्ध कारस्थानाला आरंभ केला.

परशुरामभाऊंस वठणीवर आणण्याची नानांनीं एक युक्ति योजिली. त्यांनीं करवीरकरांना दोन लक्ष रुपये उसनवार ह्मणून देऊन त्यांना परशुरामभाऊंच्या जहागिरीच्या मुलुखावर स्वारी करून तो ताब्यांत घेण्यास सांगितलें. तसेंच त्यांनीं पटवर्धन घराण्यांत फूट पाडून मिरजकर व कुरुंदवाडकर पटवर्धन ह्यांना परशुरामभाऊविरुद्ध उठविलें. तसेंच नानांनीं भाऊंच्या कारभारांत असलेल्या लोकांना फितूर करण्याचें आरंभिलें. याप्रमाणें नानांच्या कारस्थानाचा प्रत्यक्ष प्रत्यय भाऊंना व बाळोबांना आल्यावर त्यांनीं नानाविरुद्ध शस्त्र उगारलें. नानांच्या खास पथकाचा सरंजामी मुलुख तसेंच निजामाकडून नानांना मिळालेली जहागीर, इनामगांव व पुण्यांतील वाडा या मिळकती जप्त करण्यांत आल्या. नानांच्या वाड्यात मिळालेलें चाळीस लाखांचे कापड भाऊंनीं दसऱ्याच्या सणानिमित्त आपल्या लष्करी लोकांना बक्षिसादाखल देऊन टाकलें.

निजामाचा दिवाण मशीर उल्मुलुख हा पेशव्यांच्या कैदेंत आल्याबद्दल मागें दाखविलेंच आहे. त्यानें "मी नानाविरुद्ध आहे, माझी सुटका केल्यास मी निजामाकडून तहासंबंधीं येणें असलेली खंडणी व मुलुख देववितों, मी स्वतःच्या खर्चानें सैन्य ठेवतों व नानांस झोडपून काढूंया" वगैरे खोट्या थापा मारून भाऊंकडून आपली सुटका करून घेतली, व सुटल्यानंतर नानांच्या पैशानेंच सैन्य उभारलें. तसेंच नानांनीं पैसे पेरून हुजुरातींतील कांहीं लोक व होळकर यांना कसें फितूर केलें व ही हकीकत भाऊंच्या नजरेस येतांच त्यांनीं फितुरी इसमांना कशा शिक्षा केल्या हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ८८९ क १६)

भाऊंना व बाळोबांना या फितुरीच्या कारवाया बाजीराव पुण्यास असल्यामुळें घडून येतात असें वाटून, तेथून बाजीरावांस उत्तर हिंदुस्थानांत दूर नेऊन ठेवावें असें त्यांनीं ठरविलें. बाळोबांनीं सखाराम घाटगे या आपल्या विश्वासांतील सरदाराबरोबर फौजफांटा देऊन बाजीरावांस पाठवून दिलें. हा सखाराम घाटगे पूर्वीपासून आंतून नानांच्या पुठ्यांतीलच होता. तो नानांच्या कटांत कसा व कां शिरला होता याची हकीकत देऊन, हिंदुस्थानांत घेऊन जाण्याकरतां त्याच्याच ताब्यांत बाजीरावाला देण्यानें 'चोराचे हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या' दिल्याप्रमाणें स्थिति झाली, असे उद्गार ग्रंथकारांनीं काढले आहेत. (पान ८८६ क १७). नानांच्या पठडींतील दुसरा सरदार, मानाजीराव फांकडे यानें चांभारगोंद्यास जाऊन सैन्याची जमवाजमव करण्यास सुरू केल्याचें समजतांच, त्याच्या बंदोबस्ताकरतां भाऊंनीं व बाळोबांनीं मशीरची योजना केली व त्याला तिकडे पाठविलें. मशीर नानांना फितूर असल्याची त्यांना मुळींच दखलगिरी नव्हती. असा फितुरीचा जिकडे तिकडे सुळसुळाट झाला होता. बाळोबाची व भाऊंची स्थिति कींव करण्यासारखी होती. त्यांचे हातीं राज्य-कारभार आला होता, परंतु त्याचा खजिना रिता होता. सर्व सोंगें आणतां येतात पण पैशाचें सोंग आणता येत नाहीं. त्यामुळें राज्यकारभाराचा बोजा सांभाळतां सांभाळतां, त्यांना पुरेवाट झाली. फौजेचा पगार वेळेवर न पोंच-ल्यानें ती बिथरली होती. शिवाय सरदार लोकांत गुप्त फंदफितुरीनें उच्छाद मांडला होता. 'सळों कां पळो' अशी त्यांची अवस्था झाली. या उलट नानांना पैशाचा आधार बळकट. यामुळें 'खोल पैसा, देख तमाशा' असे त्यांचे बसल्या बसल्या खेळ चालत. त्यांनीं इंग्रज, निजाम, भोंसले, होळकर, मानाजी फाकडे, मशीर, हुजुरातीचे व इतर सरदार या सर्वांना आपल्या दावणींत ओढून त्यांच्याकडून निरनिराळ्या दिशेनें भाऊ व बाळोबा या कारभाऱ्यांना शह देऊन त्यांच्यावर मात करण्याचा उद्योग चांगलाच आरंभला. नानांचें कारस्थान शिजून पक्कं झाल्यावर नानांनीं ठरविल्याप्रमाणें शिंद्यांनीं बाळोबा-

तांत्यास व त्यांच्या सहकारी कारभाऱ्यांस कैद केलें. हें वृत्त भाऊंना समजलें. शिवाय भाऊंना कैद करण्याकरतां अप्पा बळवंत यांच्या नांवची एक व परशुरामभाऊ वैद्य यांच्या नांवची एक अशा दोन चिठ्या बासुदानें आणिल्या होत्या. त्यांपैकीं वैद्याचे नांवची चिठ्ठी नामसादृश्यामुळें गफलतीनें अचानक परशुरामभाऊ यांच्याच हातांत आली. भाऊंनीं तावडतोब श्रीमंतांचा व आपला बचाव करावा ह्मणून श्री. चिमाजीअप्पांना घोड्यावर घालून बरोबर पांचशें घोडेस्वार घेऊन ते दौडत निघाले. त्यांच्यामागें निजामाची फौज व अप्पा बळवंत, नारोपंत चक्रदेव. हुजुरात वगैरेंच्या संयुक्त फौजा लागल्या. दौडत दौडत भाऊंनी शिवनेरी किल्ला गांठला. श्री. चिमाजीअप्पास किल्लेदारानें किल्ल्यावर येऊं दिलें. भाऊ व इतर मंडळी खालींच राहिली. त्यांच्यामागें लागलेल्या फौजेनें भाऊंना गांठून कैद केलें व मांडवगणांस नेऊन ठेविलें. ही सर्व हकीकत सांगत देण्यांत आली आहे. (पान ८८८, ८८९ क २०, २१). नंतर भाऊंच्या लोकांच्या पायांत बेड्या ठोकून त्यांना कैद करण्यांत आलें, व नानांच्या हुकुमाप्रमाणें त्यांना निरनिराळ्या किल्ल्यावर कैदेंत ठेवण्यांत आलें. भाऊंचें याप्रमाणें पारिपत्य करण्यांत, चित्पावन सरदारांकडून चित्पावन सरदारांची अब्रू घेववून पटवर्धन सरदारांनीं जो चित्पावन सरदारांचा गट तयार केला होता त्याला नाना या चित्पावनानेंच शेवटची मूठमाती दिली असे सत्यपूर्ण खेदोद्गार ग्रंथकारांनीं काढले आहेत. (पान ८८९ क २२).

पुढें पटवर्धन सरदार व माधवराव रास्ते यांनीं भाऊंच्या सुटकेविषयीं नानांकडे खटपट चालविली होती. त्याबद्दल पटवर्धन सरदार दहा लाख रुपये दंडादाखल भरण्यास सिद्ध झाले. या कामीं खरोखर बाजीराव विरुद्ध आहे असें दर्शवून आपण प्रत्यक्ष विरोध न दाखवितां गोड शब्दांनीं नाना वेळ मारून नेत होते. असें असतां शिंद्यांना, घाटगे यांच्या मुलीला करवीरकारांनीं दडवून ठेवली असल्यानें त्यांची खोड मोडण्यास भाऊंची मुक्तता होणें जरूर आहे असें वाटूं लागलें. तेव्हां त्यांनीं प्रसंग साधून श्रीमंत बाजीराव यांना, भाऊंची

सुटका करण्याबद्दल विनंति केली. त्यांस श्रीमंतांनीं 'राज्याचा ढवणा (तंटा) वारला (मिटला) म्हणजे त्यांची सुटका होईल' असें उत्तर दिलें. वास्तविक बाजीराव यांचे मनांत भाऊंचा नाश व्हावा असें नव्हतें. परंतु नानांच्या भानगडीच्या विविध कारस्थानामुळें त्यांची स्थिति काचारीची झाली होती. उलट नानांच्या मनांत भाऊंचा पुरा नाश करण्याचें होतें हें भाऊंचा व त्यांच्या पक्षांतील लोकांचा अनन्वित छळ कसा करण्यांत आला व भाऊंची सर्व मालमत्ता जप्त करून त्यांची जहागीरही त्यांनीं करवीरकर व शिंदे यांना कशी मोकळी सोडली होती यावरून दिसून येतें. बाजीराव यांचा विरोध असल्यामुळेंच भाऊंची जहागीर शिंद्यांना मिळूं शकली नाहीं. ही सर्व हकीकत देऊन नाना परशुरामभाऊंचा केसानें गळा कांपण्याचा आंतून प्रयत्न करीत होते असें ग्रंथकारांनीं दाखविलें आहे. (पान १०३९ क १३). श्री. दुसरे बाजीराव यांचें व सातारच्या महाराजांचें घांसत होतें. सातारचे महाराज पेशव्यांचे विनंतीस मान देत नव्हते. अशांतच शिंद्यांनींही त्यांना भर देऊन चांगलेंच चिथविलें असें दिसून येतें. (पान १०४६ क २०). याचा बंदोबस्त करण्याचा श्रीमंत विचार करूं लागले. नाना यावेळीं शिंद्यांच्या कैदेंत होते. सातारच्या महाराजांचा व करवीरच्या महाराजांचा बंदोबस्त करण्यास परशुरामभाऊ शिवाय दुसरा लायख सरदार नव्हता. यामुळें माधवराव रास्ते यांच्या जामीनकीनें कांहीं अटीवर श्रीमंतांनीं भाऊंना मुक्त करण्याचें ठरविलें. मुक्त झाल्यावर भाऊंनीं सैन्याची जमवाजमव करून ता. ९ आगष्ट सन १७९८ रोजीं सातान्यावर हल्ला करून त्यांच्या सैन्याचा पुरा मोड केला. महाराजांना किल्ल्यावर पळून जाण्याचा प्रसंग ओढवला. शेवटीं त्यांना भाऊंच्या स्वाधीन व्हावें लागलें. भाऊंनीं याप्रमाणें सातारच्या बंडाची यशस्वी कड लावली. भाऊंनीं या प्रसंगीं केलेल्या पराक्रमाबद्दल ग्रंथकारांनीं यथार्थपणें पुढील धन्योद्गार काढले आहेत: "सातारचे महाराज, करवीरकर महाराज व शिंदे हे एक झाले असतां थोड्याशा अवधींत परशुरामभाऊंनीं आपली फौज गोळा करून सातारच्या महाराजांचें बंड मोडलें,

यावरून परशुरामभाऊंचें शौर्य, त्यांची कर्तबगारी, त्यांचा नांवलौकिक व त्यांची युद्धकलाविशारदता सहज दिसून येईल. परशुरामभाऊ हे पेशव्यांच्या सरदारांचें व पेशवाईचें एक सुंदर भूषण होतें, असेंच कोणीही त्यांच्याबद्दल सहज उद्गार काढील यांत संशय नाहीं." (पान १०४९ क २१ ). नंतर श्री. बाजीरावांनीं दहा लाख रुपये गुन्हेगारीदाखल घेऊन भाऊंना त्यांच्या पहिल्या अन्यायाची क्षमा केल्याचें दिसून येतें.

नाना कैदेंतून सुटून आल्यानंतर, भाऊंनीं सातारचें बंड मोडणें हें कृत्य त्यांच्या स्वार्थाआड कसें आलें व भाऊंची खोड मोडण्याकरतां नाना कशी खटपट करीत होते हें दाखविण्यांत आलें आहे. नाना परशुरामभाऊंस शत्रूप्रमाणें मानूं लागले होते. परशुरामभाऊ सातारच्या महाराजांचें बंड मोडण्याच्या उद्योगांत असतां, त्यांचेवर मारेकरी घालण्यांत आले होते. पटवर्धनांच्या त्यावेळच्या पत्रावरून करवीरकरांनीं हे मारेकरी पाठविले होते असें दिसतें. जेव्हां नानांनीं शिंदे बायांना छूः सोडून घाटगे यांना कैद करविलें, त्याचवेळीं नानांच्या प्रेरणेनें व पाताळयंत्री कारस्थानानें हे मारेकरी भाऊंवर घातले गेले असावे असें ग्रंथकारांनीं अनुमान काढिलें आहे. (पान १०६९ ते १०६७ क ३० ). जेव्हां नाना नगरच्या किल्ल्यावर कैदेंत होते तेव्हांदेखील त्यांचें भाऊविरुद्ध कारस्थान चालूंच असे. कैदेंतून मुक्त झाल्यावरही भाऊंचा नाश कसा करतां येईल या विवंचनेंत ते असत त्याच उद्देशानें नानांच्या मनांत प्रथम भाऊंशीं सलोखा घडवून आणावा असें होतें. त्यांनीं मिरजकर गंगाधरराव पटवर्धन यांच्या मध्यस्थीनें सलोख्याचा प्रयत्न केला. नानांच्या इच्छेप्रमाणें मिरजकरांनीं भाऊंची नानाविषयीं दिलसफाई घडवून आणली. यासंबंधीं भाऊकडून एक लेखी करार करून घ्यावा असें नानांनीं ठरविलें. त्यांनीं पाठविलेल्या मसुद्याप्रमाणें भाऊंनीं त्यांना दोन पत्रें पाठवून त्यांच्या इच्छेप्रमाणें आपणांस लेखांत गुंतवून घेतलें. ऐ.ले. संग्रहांतून ग्रंथकारांनीं हीं दोन्हीं पत्रें उद्धृत केलीं आहेत. ( पान १०९८ क ७ ). अशा तऱ्हेचीं करारवजा पत्रें भाऊंकडून आणवून

घेण्यांत नानांचा हेतू काय होता व आपल्या पुढील कारस्थानाचे कामीं ते त्यांचा कसा उपयोग करणार होते, तसेंच भाऊंनींही इतकें नमतें घेतलें याचीं कारणें काय होतीं, याची विशद चर्चा ग्रंथकारांनीं केली आहे. (पान १०९२ ते ९६ क ८, ९). हीं पत्रें भाऊनीं पाठविल्यावरही नानांचे भाऊंविरुद्ध कारस्थानी डाव कसे चालू होते हें त्यापुढें घडलेल्या गोष्टींवरून स्पष्ट दिसून येतें. (पान १०९६ ते ११०० क १० ते १५) त्यांचा पहिला डाव भाऊंना पुनः तुरुंगांत डांबून टाकण्याचा होता. तो फसल्यावर भाऊंना जीवें मारून टाकण्याचें कारस्थान करणें हा त्यांचा दुसरा डाव असल्याचें दाखविलें आहे हा डाव चक्रव्यूह पद्धतीचा असून त्याचीं निरनिराळीं द्वारें कशी रचण्यांत आलीं होती, याचेंही सविस्तर वर्णन मार्मिकपणें करण्यांत आलें आहे.(पान ११०१ क १३) भाऊंच्याविरुद्ध करवीरकरांना उत्तेजन देऊन त्यांच्यामध्यें नानांनीं चांगलेंच वैर माजवून ठेविलें होतें, हें मागें आलेंच आहे. त्या करवीरकरांचीच योजना भाऊंचा वध घडवून आणण्यांत नानांनीं केल्याचें दाखविलें आहे. (पान ११०२ क १४). हें परशुरामभाऊंच्या वधाचें नानांनीं केलेलें कारस्थान ह्मणजे त्यांच्या महाडच्या कारस्थानाची पुनरावृत्तीच होती यांत संशय नाहीं. करवीरकर व भाऊ यांच्यांत वैर माजूं नये ह्मणून बाजीरावांनीं आपले विश्वासू कारभारी रा. शिवरामपंत थत्ते यांच्यामार्फत करवीरकर, भाऊ व पेशवे याच्या दरम्यान कांहीं अटीवर तह घडवून आणला. तो नानांना पसंत न पडल्यामुळें मंजूर करण्यांत आला नाहीं. वास्तविक त्यांतील अटी पेशव्यांना अनुकूल होत्या असें धोंडोपंत जोशी यांनीं मिरजेच्या पटवर्धनांस पाठविलेल्या पत्रावरून ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे. हा समेटाचा प्रयत्न केल्याबद्दल नानांनीं मध्यस्थांना कैद करून डोंगरी किल्ला दाखविला. असा तह झाला असता, तर भाऊंना बरीचशी शांती व सुख लाभलें असतें. परंतु नानांना त्याचें वावडें होतें. ह्मणूनच हा तह फिसकटून टाकण्यांत आला, असें दिसतें. करवीरकरांकडील लक्ष काढून टिपूवरील मोहिमेस जाण्याबद्दल नानांनीं भाऊंना निरनिराळीं आमिषें दाखवून त्यांचें मन

कसें कळविलें हें पाहण्याजोगें आहे. (पान १११९ क २६). त्याचवेळीं भाऊंचा नाश करण्याच्या उद्देशानें त्यांचें सैन्यबळ कमी करविण्याची कारवाईही नानांनीं चालूच ठेवल्याचें दिसून येतें. (पान ११२० ते ११२३ क २७). नानांनीं भाऊंचा शत्रू मशीर याला वरवरणी वरातबाकी सक्तीनें वसूल करण्याकरतां, पण खरोखर भाऊविरुद्ध करवीरकरांना मदत मिळावी ह्मणून, भाऊंचे बहागिरीवर सैन्यासह पाठवून भाऊंना जास्त संकटांत घातलें. भाऊंची आर्थिक स्थिति या वेळीं किती हलाखीची होती हें ग्रंथकारांनीं ऐ. ले. संग्रहांतून दोन पत्रें उद्धृत केलीं आहेत त्यावरून चांगलेंच दिसून येतें. नानांच्या या कृत्यावरून भाऊंच्यामागें ते कसे हात धुवून लागले होते, व नानांच्या मनोवृत्ति किती कपटकारस्थानी व खुनशीपणाच्या होत्या यांवर चांगलाच प्रकाश पडतो. भाऊंच्या नाशाकरतां नानांनीं कसें खोल व गुंतागुंतीचें कारस्थान चालविलें होतें याचें सविस्तर वर्णन करण्यांत आलें आहे. (पान ११३६ ते ११४० क ३७ ते ३९). याचवेळीं पटवर्धन घराण्यांतील बाळासाहेब मिरजकर व त्यांचे पुतणे चिंतामणराव यांचेमध्यें भाऊबंदी तंटा उत्पन्न झाला. भाऊ हे पटवर्धन घराण्यांत वडील असल्यानें त्यांच्याकडे तो तंटा तोडण्याचें काम आलें. भाऊंनीं बाळासाहेबांना तंटा मिटविण्याबद्दल बरेच वेळा कळविलें. बाळासाहेब नानांच्या पक्षाचे होते. भाऊसाहेबांविरुद्ध नानांनीं बाळासाहेबाचे कान फुंकून त्या भाऊबंदीस उत्तेजनच दिलें. हें बाळासाहेबांचे पुण्यांतील वकील परांजपे यांच्या पत्रावरून दिसून येतें. (पान ११४९ क ४५). याप्रमाणें बाळासाहेबाचें मन भाऊविरुद्ध दूषित करून त्यांच्याकडून भाऊंना ऐनवेळीं मदत मिळूं नये असा नानांनीं बंदोबस्त केला. भाऊंना आतां फक्त बाळोबातात्याकडून मदत मिळण्याची आशा राहिली होती. बाळोबातात्यांचें व नानांचें बरें नव्हतेंच. परंतु नानांनीं कारवाई करून बाळोबातात्यांशीं समेट केला. भाऊंनींच बाळोबातात्याविषयीं नानांची खातरजमा केल्यानें हा समेट घडून आला. त्याचवेळीं बाळोबातात्यांनीं करवीरकराविरुद्ध भाऊंना मदत करण्याचें नाकारलें याचा उल्लेख वरील पत्रांतच आहे. ही

गोष्टही नानांच्या प्रेरणेनेंच झाली असावी असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ११९३ क ४४ ). भाऊंनीं मिरजकर व कुरुंदवाडकर यांच्याकडेही मदत मागितली. भाऊजवळ सैन्यबळ अगदीं कमी होतें व जें होतें त्यांतही फितुरीनें उच्छाद मांडला होता. अशा स्थितींत नानांनीं त्यांना कोठूनही मदत मिळूं नये असा बंदोबस्त करून ठेवल्यामुळें भाऊंना करवीरकरांच्या सैन्याला हटवून तासगावकडे जातां आलें नाहीं. तशांत भाऊंची प्रकृतीही या वेळीं नादुरुस्त झाली होती. करवीरकरांची फौज हमीदवाड्यास होती, व भाऊंचा तळ तेथून दोन कोसांवर पट्टणकुडी येथें होता. नानांच्या आज्ञेप्रमाणेंच भाऊंच्या सैन्याची हालचाल होत असे. तसेंच करवीरकराकडीलही सैन्याचें सूत्र नानाच हालवीत असत असें दिसून येतें. (पान ११४९ क ४९ ). एकाच मनुष्यानें बुद्धी-बळाच्या दोन्ही बाजू खेळवाव्या, त्यांतीलच हा प्रकार होता. नाना, शिंदे व बाळोबा यांची करवीरकरांशीं भाऊंचा समेट करून देण्याची खटपट चालू असल्याचें भाऊंना समजल्यामुळें ते पुण्याकडून येणाऱ्या आज्ञेची वाट पहात निर्धास्त राहिले होते. शिवाय पुणें-दरबारच्या सल्ल्याखेरीज करवीरकर चढाई करणार नाहींत असेंही त्यांना वाटत होतें. असें असतां एकाएकीं एके दिवशीं करवीरकर चाल करून येऊं लागले असें समजल्यावरून भाऊंनींही त्यांना तोंड देण्याची तयारी केली. परंतु त्यावेळीं लढाई झाली नाहीं. असेंच दोनदां घडलें. ‘ कांडगा आला रे आला ’ या गोष्टीप्रमाणेंच हा प्रकार घडला. हा खरा प्रकार नसून ही निव्वळ हुलकावणी असावी असें वाटून भाऊ बेसावध राहिले. भाऊंनीं नानांवर विश्वास ठेऊन स्वतः चढाई न करण्याचें ठरविलें. नानांच्या हुकुमाखेरीज करवीरकर लढाई करणार नाहींत, अशी ठाम समजूत झाल्यामुळें भाऊ त्यावेळीं स्वस्थपणें बुद्धिबळें खेळत बसल्याचें वर्णन करण्यांत आलें आहे. (पान ११९९ क ९३). त्यांची या कामीं नानाकडूनच तशी समजूत करण्यांत आली असली पाहिजे. तसें नसतें तर भाऊसारखा वीर इतक्या गाफीलपणें खास वागतां ना, असें अनुमान काढलें आहे. [illegible] परिस्थिती-

वरून सयुक्तिक दिसतें. करवीरकरांनीं भाऊंवर चाल करून पट्टणकुडी येथें ता. १७ सप्टेंबर सन १७९९ रोजीं लढाई कशी केली, व शेवटीं त्या लढाईत भाऊसारख्या पराक्रमी पुरुषाचा कसा अंत झाला याचें वर्णन देण्यांत आलें आहे. (पान ११६० क ९४). या लढाईत भाऊंचा एकट्याचाच बळी पडला, इतर भाऊंबरोबर असलेले लोक लढाई न करतां पळून गेले. या लढाईच्या स्वरूपावरून फितुरीच्या मार्गानीं भाऊंची कशी दुर्दशा झाली होती हें दिसून येतें. भाऊसारख्या महापराक्रमी योध्याला या लढाईत अपयश घेऊन प्राणांसही कां मुकावें लागलें याबद्दल ग्रंथकारांनीं पुढील उद्गार काढले आहेत. "परशुरामभाऊसारखा वयोवृद्ध, तपोवृद्ध व युद्धविषयक अनुभववृद्ध सेनापती, एक हजार फौज घेऊन करवीरकरांना तोंड देण्याकरतां उभा असतां ते तेवढेच एकटे त्या लढाईत जखमी होऊन मृत्युमुखीं पडावे हा दोष भाऊंच्या युद्धकलेचा नसुन नानांच्या अफाट कपटकारस्थानाच्या प्रभावाचा आहे. परशुरामभाऊंचा वध हा नानांच्या बुद्धिकौशल्याचा शेवटचा विजय या दृष्टीनें तो महाराष्ट्राच्या इतिहासांत विशेष महत्वाचा आहे यांत संशय नाहीं." (पान ११६१ क ९५).

भाऊंच्या मरणसमयीं त्यांच्याजवळ त्यांचे पुत्र अगर आप्त वगैरे कोणी नव्हते. मिरजकरांचे करवीर दरबारांतील वकील नारो हरी करंदीकर यानीं हमीदवाडा येथें त्यांच्या प्रेताचा दहनविधि केला. त्या ठिकाणीं करवीरच्या महाराजाकडून समाधि बांधविण्यांत आली असुन तिच्या पूजेअर्चेचीही त्यांनीं व्यवस्था केली असल्याचें दिसुन येतें. (पान ११६२ क ९६). ग्रंथकारांनीं या थोर पुरुषाचें स्वभाववैशिष्ट्य पुढील शब्दांत वर्णन केलें आहे.

"परशुरामभाऊ हे जसे पराक्रमी तसेच ते अंतःकरणाचे शुद्ध होते. त्यांच्याजवळ डावपेच नव्हते. एकाची इमानें इतबारें नोकरी करणें हा त्यांचा शिपाईगिरीचा धोपट मार्ग होता. मुत्सद्याचें कुटिल अंतःकरण त्यांना नव्हतें." (पान २१८ क १८).

" महाराष्ट्र देशांत आज पावेतो जे कोणी महापराक्रमी पुरुष होऊन गेले त्यांतील श्रेष्ठांमध्यें भाऊंची गणना केली पाहिजे. शौर्य आणि साहस हे त्यांचे उपजत गुण होते. भीतीनें त्यांच्या मनास कधींही स्पर्श केला नाहीं. केवढाही प्रबळ शत्रू असो, त्याच्याबरोबर दंड थोपटून समर करण्यास भाऊ सिद्ध असत. ( पान ११६२ क ५७ ). "

" भूतदया हा ईश्वरी गुण मानिला आहे. तो भाऊंच्या अंगीं फार वसत होता. कोणीही याचना करण्यास त्यांजकडे आला आणि विन्मुख गेला असें कधीं होत नसे. ( पान ११६२ क ५८ ). "

" पदरचे मानकरी, आश्रित आदिकरून परिजनांवर भाऊंचा फारच लोभ असे. ज्यांना एकदां आपला असें म्हटलें, त्याला त्यांनीं कधींही अंतर दिलें नाहीं. ( पान ११३३ क ५९ ). "

" भाऊंच्या उत्तम गुणांमध्यें त्यांच्या एकपत्नी व्रताची योग्यता फारच मोठी मानली पाहिजे. ( पान ११६४ क ६० ). "

" भाऊ मनाचे फार मोकळे व निष्कपटी होते. आंत एक आणि बाहेर एक हें त्यांच्या स्वप्नींही नव्हतें. ( पान ११६४ क ६१ ). "

" सेनानायक या संबंधानें पाहतां, भाऊंची गणना अर्वाचीन वीरांत अग्रस्थानीं केली पाहिजे. सेनानायकाचे सर्व गुण त्यांच्यामध्यें पूर्ण वसत होते. अंगिकारलेल्या कार्याची दृढनिश्चयपूर्वक पाठ पुरविणें हा एक भाऊंच्या अंगीं विशेष गुण होता. ( पान ११६४ क ६२ ). "

ग्रंथकारांनीं भाऊंच्या स्वधर्मनिष्ठेचें वर्णन करून त्यांनीं जीं महत्वाचीं व परोपकाराचीं कृत्यें केलीं त्यांचें कलमवार वर्णन दिलें आहे. (पान ११६५ क ६३).

एकंदरींत भाऊंच्या आयुष्यांतील राजकीय कामगिरीवर व नानांनीं आपल्या कारस्थानांनीं त्यांना वेळोवेळीं पेंचांत आणून त्यांच्याशीं कसें अन्यायाचें आचरण केलें यावर नाविण्यपूर्ण दृष्टीनें चर्चा करून ग्रंथकारांनीं चांगला प्रकाश पाडला आहे यांत शंका नाहीं. अशा या थोर महापराक्रमी पुरुषाला दुर्दैवानें

नानासारख्या मुत्सद्याच्या कुटिलकारस्थानाला शेवटीं बळी पडावें लागल्याचें दिसून येतें.

## श्री. दुसरे बाजीरावसाहेब.

दुसरे बाजीराव हे राघोबादादांचे ज्येष्ठ चिरंजीव. दादासाहेब गुजराथेकडे गेले तेव्हां आनंदीबाई गरोदर होत्या. प्रवासाचे श्रम सहन करितां येण्याजोगी त्यांची स्थिति नसल्यानें त्यांना धारच्या किल्ल्यांत ठेऊन दादासाहेब पुढें गेले. तेथें ता. १० जानेवारी १७७५ रोजीं बाजीरावाचा जन्म झाला. धारच्या किल्ल्यावर त्यावेळीं पवारांचा अंमल होता. दादासाहेब बारभाईंच्या कचाट्यांत सांपडले होते. त्यामुळें त्यांना आनंदीबाईच्या व बाजीरावाच्या संरक्षणाकडे लक्ष देतां आलें नाहीं. धारच्या पवारांना त्यांच्या संरक्षणाचा बोजा अंगावर घेणें भाग पडलें. ह्या घोर अपराधाकरतां त्यांचा सरंजाम बारभाईंकडून जप्त करण्यांत आला. त्यानंतर आनंदीबाईंना स्वतः रयतांकडून पैसे वसूल करून आपलें व आपल्या मुलाचें संरक्षण करावें लागलें. पुढें बारभाईंच्या सैन्यानें धारच्या किल्ल्यास वेढा देऊन तिचा पराभव केला व तिला कैद करून मंडलेश्वरीं कसें ठेवण्यांत आलें ही हकीकत मागें आलीच आहे. पुढें राघोबादादास कोपरगांवीं ठेवण्यांत आल्यावर आनंदीबाई बाजीरावासह तेथेंच होत्या. दादासाहेबांना त्यांच्यावर वेळोवेळीं ओढविलेल्या आपत्तीमुळें बाजीरावाच्या शिक्षणाकडे लक्ष देतां आलें नाहीं. दादासाहेबांच्यामागें आनंदीबाई या नानाफडनविसांच्या नजर कैदेंतच होत्या. त्यामुळें त्यांनाही बाजीरावाला स्वतंत्रपणें आपल्या मनाजोगें शिक्षण देतां आलें नाहीं. तरी शक्य तेवढें शिक्षण देण्याची त्यांनीं खटपट केलीच. त्यांनीं बाजीरावाला घोड्यावर बसणें, तरवार धरणें, तिरंदाजी करणें, भाला फिरविणें या बाबतींत चांगलेंच तरबेज केलें होतें. भाल्याचें काम बाजीराव इतक्या सफाईनें करीत कीं, सान्या गंगाथडींत त्यांच्या जोडीचा कोणी नव्हता असें ह्मणतात. (पान ८३९ क २९) नानांनीं बाजीरावाच्या शिक्षणाकडे लक्ष दिल्याचें दिसत नाहीं. यासंबंधीं " बाजीरावाच्या शिक्षणाबद्दल

नानांनीं जाणून बुजून दुर्लक्ष केलें, एवढेंच नव्हे तर तो बाळपणापासून दुर्गुणी, अशिक्षित कसा बनेल याबद्दलच त्यांनीं विशेष काळजी घेतल्याप्रमाणें दिसतें." (पान ७९५ क १२). असा नानांच्या वागणुकीवरून ग्रंथकारांनीं निष्कर्ष काढला आहे.

बाजीरावाला शिक्षण देण्याकरतां राघोपंत ठोसर या मनुष्याची नेमणूक झाली होती. तो थोडे दिवस या कामावर होता. तो रजा घेऊन एकदां पुण्यास गेला तो कायमचा. परत त्याला अगर दुसऱ्या शिक्षकाला पाठविण्याची तजवीज नानांनीं केली नाहीं. योग्य शिक्षणाच्या अभावीं बाजीराव कुसंगतीनें दुराचारी बनले होते असे खुद्द नानांच्या बातमीदाराच्या पत्रावरून दिसून येतें. (पान ७९६ क १२). याबद्दल आनंदीबाईनीं 'मूल शाहाणें होऊं नये असेंच साऱ्यांना वाटतें' असा अर्थपूर्ण टोमणा नानांना मारिला आहे.

पुढें आनंदीबाई या आनंदवल्लीस मरण पावल्यावेळीं बाजीराव बंधूसह तेथेंच होते. नानांचा सवाईमाधवरावांना घेऊन निजामावर स्वारीस निघण्याचा विचार चालला होता; तेव्हां नानांनीं बाजीरावाला व त्याच्या भावाला शिवनेरी किल्ल्यावर पाठवून त्यांना कडक बंदोबस्तांत ठेवलें. त्यावेळीं बाजीराव वयांत आले होते. पूर्वीं ठरल्याप्रमाणें पेशवाईच्या कारभाराचा म्हणजे दुय्यम पेशव्याचा हक्क पेशव्यांचे कनिष्ठ शाखेंतील पुरुषाचाच असल्यानें नानांस बाजीरावामुळें आपल्या अधिकारांस धोका येण्याचा संभव आहे असें वाटत असल्यामुळेंच नानांनीं बाजीरावास कारभारीपणाचा हक्क घेण्याची संधीच मिळूं नये या हेतूनें कडक बंदोबस्तांत ठेवलें होतें असें ग्रंथकारांनीं सयुक्तिक अनुमान काढलें आहे. (पान ८३१, ८३२ क २६). बाजीराव हक्कदार असल्यामुळें त्यांच्याकडे नानांनीं राज्यकारभार सोंपविणें योग्य व न्यायाचें आहे असें सवाई माधवरावांच्या राजपक्षाचें म्हणणें होतें. नानांचा नोकरशाहीपक्ष या गोष्टीला विरोध करीत होता. बाजीराव या कामास कसे लायख झाले आहेत यासंबंधीं

राजपक्षाच्या ह्मणण्याचा भावार्थ काय होता हें दाखवून देण्यांत आलें आहे. (पान ८३३ क २७).

परंतु, हक्कदार व लायख इसम असला तरी त्याला आपल्या हातीं असलेला कारभारीपणाचा अधिकार न देण्याची नानांची 'आदमखोर' वृत्ती कशी बनली होती याचें वर्णन करून त्यांतच नानांच्या स्वभावधर्माचें रहस्य आहे असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ८३४ क २७). यानंतर नानांनीं यावर जो डाव केला त्याचें वर्णन ग्रंथकारानीं पुढील शब्दांत केलें आहे. "नानांनीं आपल्या नोकरशाही पक्षाला निराळें वळण दिलें व सवाईमाधवराव आणि बाजीराव यांची मुस्कटदाबी जास्त कडक रीतीनें करण्याचें त्यांनीं ठरविलें व तसे प्रयत्न सुरू केले. यामुळें पेशवाईच्या राज्यक्षितिजावर सवाईमाधवराव व बाजीराव यांच्यासारखे उदय पावणारे तेजःपुंज दोन तारे नानांनीं अनुक्रमें नष्ट व तेजोहीन करून टाकले. नानांची ही दुष्ट व सर्वनाश करणारी कृति महाराष्ट्र युगांतरींही विसरणार नाहीं." (पान ८३४ क २८).

एकदां सवाईमाधवरावांना बाजीरावास भेटण्याची इच्छा झाली. त्यांनीं ती नानाकडे प्रदर्शित केली तेव्हां नानांनीं त्यांच्याजवळ बाजीरावाविषयीं काय उद्गार काढले व त्यांच्याशीं कशी वागणूक केली हें सर्व मागें दाखविलेंच आहे. आपल्याविषयीं सवाईमाधवरावांची भावना समजतांच बाजीरावांनीं त्यांजकडे कसा मार्मिक पुढील निरोप पाठविला हें पाहण्याजोगें आहे. "सांप्रत मी शिवनेरी किल्ल्यांत नानांचे बंदींत आहे, आणि आपण आपल्या गादीवर असून त्यांच्या (नानांच्या) बंदोबस्तामुळें हल्लीं मजसारखेच आहांत. नानांचा बंदोबस्त आपल्या देहापुरताच आहे, आपल्या मनावर बंदोबस्त ठेवणें त्यांच्या हातीं नाहीं. तेव्हां तुमचा व आमचा स्नेह मात्र असावा. उभयतांचे वडील पूर्वीं जसे नामांकित झाले तसेंच आपणही याही परिस्थितींतून निघून समयविशेषीं होऊं." (पान ८३६ क २९). यानंतर बाजीरावांशीं गुप्तपणें पत्रव्यवहार केल्याबद्दल नानांनीं सवाईमाधवरावांची खरडपट्टी काढून त्यांना धमकी देऊन

त्यांची स्थिति कशी केविलवाणी केली याचेंही वर्णन मागें आलेंच आहे. जशी सवाईमाधवराव आजारी आहेत अशी कंडी उठविण्यांत आली होती त्याप्रमाणें सवाईमाधवरावांचे मृत्युकरतां बाजीरावांनीं जादूटोणा केला अशीही नानांनीं कंडी उठविली होती. बाजीराव शिवनेरी किल्ल्यांत कैदेंत असल्यामुळें त्यांजवर प्रत्यक्ष सवाईमाधवरावांच्या खुनाचा आरोप घालणें शक्य नव्हतें ह्मणूनच त्यांना ही अशी युक्ति योजावी लागली, असें दिसतें.

पुढें ज्यावेळीं सवाईमाधवराव कारंजावर उडी टाकून जखमी होऊन निस्त्राण झाल्यावेळीं आपण आतां जगत नाहीं असें त्यांना वाटलें, तेव्हां त्यांनीं आपले स्नेही बाबुराव फडके यांच्याकडे 'माझे पाठीमागें गादीवर बाजीरावाची स्थापना करा' अशी आपली शेवटची उत्कट इच्छा प्रदर्शित केली होती.

राघोबादादांच्या वंशाला पेशव्याची गादी मिळूं देऊं नये ह्मणून नानांनीं पूर्वीच क्रियापूर्वक ठरविल्यामुळें बाजीरावाला पेशव्यांचे गादीवर न बसवितां यशोदाबाईचे मांडीवर दत्तक मुलगा बसवून त्याला त्या गादीवर बसवावे व आपलें कारभारीपण कायम ठेवावें असा नानाचा प्रयत्न सुरू झाला. त्याकरतां नानांनीं सर्व सरदारांची सभा बोलाविली व बाजीरावाला गादीवर बसविणें योग्य होणार नाहीं अशी त्यांची समजूत करून त्याबद्दल त्याचे मन वळविण्याचा त्यांनीं कसा खटाटोप केला व बाजीरावाला गादीवर बसविल्यानें नोकरशाहीचेंच नव्हे तर सर्वांचेच कसें अहित होणार आहे या संबंधीं कसकसा युक्तिवाद केला व हें करण्यांत नानांचा आपलाच स्वार्थ साधण्याचा खरा हेतू कसा होता हें विशद करून दाखविण्यांत आलें आहे. (पान ८९०, ८९१ क २, ३, ४). दत्तक करून पेशव्याचे गादीस धनी करण्याबद्दल नानांना लोकमत अनुकूल नव्हतें. शिंद्यांचे कारभारी बाळोबातात्या व मुख्य कारभारी जिवबादादा बक्षी यांची बाजीरावाला गादीवर बसविण्याविषयीं पूर्ण अनुकूलता होती. पुढें जिवबा-दादा आजारी पडले. त्यांनीं आपल्या मृत्युसमयीं आपण दत्तकाला खरोखर अनुकूल नाहीं, सवाईमाधवरावांच्या इच्छेप्रमाणें बाजीरावालाच पेशवाईचे गादी-

वर बसविण्याची तजवीज करा असें दौलतरावांना आग्रहपूर्वक सांगितलें. त्यानंतर शिंद्यांनीं पुण्यास येऊन नानाकडे दत्तकाबद्दल आपली नापसंती दर्शविली व 'तुह्मी अर्णात असला तर उत्तम, नाहीं तर आह्मी फौज पाठवून त्यांस ( बाजीरावांस ) घेऊन येतो ' असें त्यांनीं नानांस स्पष्टपणें बजाविलें. तथापि नानांनीं रास्ते व पटवर्धन सरदाराच्या सल्ल्यानीं चिमाजीअप्पास दत्तक देऊन पेशव्यांच्या गादीवर बसविण्याचें कारस्थान उभारलें. नानांना या कारस्थानांनीं कोणकोणत्या गोष्टी साधावयाच्या होत्या याची कलमवार चर्चा करण्यात आली आहे. (पान ८९८ क ११ ).

चिमाजीअप्पांचें दत्तविधान हें हिंदुधर्मशास्त्राच्या सर्वथैव विरुद्ध कसें होतें हें आधारपूर्वक दाखवून त्यांना दत्तक करण्याचें ठरविण्यांत नानांनी व परशुरामभाऊंनीं हिंदुधर्मशास्त्र कसें पायाखालीं तुडविलें हें ग्रंथकारानीं दाखवून दिलें आहे. (पान ८९९, ८६० क १३, १४). या दत्तकासंबंधीं नानांनीं शिंद्याना सुगावा लागूं दिला नव्हता. त्यानीं जुन्नराहून बाजीराव व चिमाजीअप्पा यांना खडकीस आणविलें. तेथें बऱ्याच मंडळींनीं बाजीरावाला भेटून आपापले विचार कळविले. शिंद्यांनीं व नानांनीं त्यांचीं निरनिराळी गांठ घेतली. शिंद्यांनीं नानांना कारभारांतून काढून टाकावें असा आपला स्पष्ट अभिप्राय बाजीरावांना कळविला. नानांनीं आपला ठाव न लागूं देतां बाजीरावांशीं वरोपचारी गोड गोड बोलून त्यांनाच गादीवर बसविण्याचें ठरविल्याप्रमाणें दाखविलें. व त्यांच्याकडून "पूर्वीच्या सर्व गोष्टी विसरून नानांनीं इमानानें कारभार करावा व श्रीमंतानीं नानाशीं यथापूर्व चालवावें असा लेखी करारही करून घेतला. त्यानंतर नाना बाजीरावाला पेशवाईचीं वस्त्रें आणण्याकरतां ह्मणून सातान्यास गेले. तेथें त्यानीं महाराजांशीं आपले कारस्थान सुरू केलें. नाना सातान्यास गेल्यावर शिंद्यांनीं बाजीरावास पुण्यास आणून गादीवर बसविलें. त्यांच्या नावें द्वाहीही फिरविण्यांत आली. नंतर शिंद्यांना नानांच्या कारस्थानाची हकीकत समजली. नानांनीं छत्रपतींना एक कोट रुपये देऊं केले आहेत, व सातारचे

महाराज फौजफांटा जमवून सर्व राज्यांत आपला अंमल बसविण्याकरतां येणार असें समजतांच, शिंदे बाजीरावाला घेऊन त्यांच्या नांवचीवस्त्रें आणण्याकरतां साताऱ्याकडे निघाले. महाराजांनीं आपण मराठी राज्याचे वारसदार असल्याचा हक्क पुढें आणल्यास आपलें राजकारण साधणार नाहीं असें पाहून, शिंद्यांनीं नानांशीं समेटाची वाटाघाट सुरू केली. नानातर्फे बोलणीं परशुरामभाऊंनीं केलीं. त्यांत शेवटीं बाजीरावांना कैदेंत ठेऊन चिमाजीअप्पास दत्तक देऊन पेशवेपदावर बसवावें व परशुरामभाऊंनीं राज्यकारभार करावा असें ठरलें. या समेटांत खुद्द नानासंबंधीं कांहीं गोष्टी ठरविण्यांत आल्या होत्या. त्याही कलमवार देण्यांत आल्या आहेत. (पान ८६९ क २०). या योजनेप्रमाणें बाजीरावांस कैद करण्याची कामगिरी शिंद्याकडे कशी व कां सोंपविण्यांत आली हें मागें दाखविलेंच आहे.

चिमाजीअप्पांचें दत्तविधान करून त्यांना पेशवेपदावर बसविण्याची कामगिरी परशुरामभाऊंनीं आपलेकडे घेतली होती. त्याप्रमाणें या दोन्ही कामगिऱ्या पार पाडण्यांत आल्या. बाजीरावांना शिंद्यांनीं कैद करून आपल्या ताब्यांत घेतल्यामुळें नानांना पुन्हां संशय-पिशाच्चानें पछाडलें, व त्यांनीं बाजीरावाला गादीवर आणण्याची पुनः खटपट सुरू केली. हें नानांचें कारस्थान क्रांतिकारक व फार गुंतागुंतीचें होतें. हेंच महाडचें कारस्थान या नांवानें प्रसिद्ध आहे. नानांनीं या कामीं शिंद्यांना इंग्रजांचा शह दिला व आपल्या अटी कबूल करून आपल्याशीं समेट करण्यास त्यांना भाग पाडलें. या समेटाच्या शर्ती नाना फडनविसाच्या चरित्रावरून देण्यांत आल्या आहेत. ( पान ८८० क ९ ). शिंद्याशिवाय नानांनीं निजाम, भोंसले, इंग्रज वगैरे इतर पक्षांनाही त्यांच्या त्यांच्या मागण्या मान्य करून अनुकूल करून घेतलें. आपल्याला नाना गादीवर बसविणार असल्याचें समजतांच बाजीरावांनीं आनंदानें नानांच्या अटी मान्य करून त्यांच्या सांगण्याप्रमाणें त्यांच्या नांवें करारपत्र लिहून दिलें. त्या करारपत्रांतील अटी काय होत्या हें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ८८१ क

१० ). हें सर्व कारस्थान गुप्तपणें बरेच दिवस चाललें होतें. याची माहिती बाळोबातात्या व परशुरामभाऊ यांना अखेरपर्यंत लागली नाहीं. परशुरामभाऊ नानांच्या विश्वासावर व बाळोबा शिंद्यांच्या विश्वासावर स्वस्थपणें कारभार करीत होते. शेवटीं नानांचें कारस्थान उघडकीस येतांच भाऊंनीं व बाळोबांनीं नानाविरुद्ध हत्यार कसें उचलिलें व नानांच्या मिळकतीची जप्ती कशी केली हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. नानांनीं गुप्तपणें बाजीरावाकडे पैसे पाठवून फौजफांटा जमविण्याचें ठरविलें व ही कामगिरी मानाजीराव फांकडे यांजकडे सोंपविण्यांत आली. नानांनीं या आपल्या कारस्थानाकरतां पेशव्यांच्या सैन्यांत व सरदारांत फंदफितुरीचा हैदोस कसा घातला व बाळोबातात्यांना व परशुरामभाऊंना कसें कैद करण्यांत आलें, ही हकीकत मागें आलीच आहे. नंतर नानांनीं पुण्यास येऊन ता. ४ डिसेंबर १७९६ रोजीं बाजीरावांस गादीवर बसविलें, व पेशवाईचा कारभार आपल्या हातीं घेतला. याप्रमाणें नानांनीं हें आपलें कुप्रसिद्ध महाडचें कारस्थान यशस्वीपणें शेवटास नेलें.

बाजीरावाला लहानपणापासून कारागृहांत अडकवून ठेवलेलें होतें. त्यामुळें त्यांना राज्यकारभाराचें ज्ञान नव्हतें, व एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन राज्याचें ज्यायोगें हित होईल असें वागण्याचेंही ज्ञान नव्हतें. ही गोष्ट, वर घडून आलेल्या सर्व गोष्टींची चर्चा करून विशद करण्यांत आली आहे. ( पान ८९९ क ४ ). बाजीरावाच्या हातीं पेशव्याचा अधिकार आला तेव्हां त्यांच्या अंगीं लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येण्याजोगे कोणते गुण होते याचें वर्णन ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत केलें आहे. “ बाजीराव गादीवर येण्यापूर्वीं त्यांची व्यक्तिविषयक कीर्ति सवाईमाधवरावांच्या वेळीं जी जगापुढें थोडीबहुत आली, त्यावरून ते देखणे आहेत, त्यांच्या चेहऱ्यावर तारुण्याचें तेज आहे; भाल्याच्या उत्तम फेंकी ते करतात, शास्त्र पढलेले आहेत, वेद म्हणणारे आहेत, मिष्टभाषणी आहेत, असें दिसून येतें. याशिवाय त्यांची दुसरी कोणतीच कीर्ति बाहेर आलेली नव्हती. ” ( पान ९०१ क ९ ). बाजीराव, राघोबादादा व आनंदी-

बाई यांच्यासंबंधीं लोकांत कसकशा निंदाव्यंजक बातम्या प्रसिद्ध करण्यांत आल्या होत्या व त्यामुळें लोकांमध्यें बाजीरावांची कशी दुष्कीर्ति झाली होती व त्यांच्या संबंधीं सर्वत्र कशी गेरसमजूत करून देण्यांत आली होती याचें वर्णन देण्यांत आलें आहे. (पान ९०१ क ९). त्याचप्रमाणें यावेळीं नानांची स्थिति कशी होती, याचें वर्णन करून ' करीन ती पूर्व ' असें सामर्थ्य नानांचें त्यावेळीं होतें असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ९०२ क १०). अशा परिस्थितींत सांपडल्यामुळें बाजीराव हे केवळ नांवाचे धनी व नाना एकमेव सर्वाधिकारी बनणें साहजिक होतें. महाडच्या कारस्थानप्रसंगीं कबूल केलेली बिदागी शिंद्यांचे पदरीं न पडल्यानें नानांवर त्यांची मर्जी खप्पा झाली होती. त्या दोघांमध्यें चकमक झडण्याचा प्रसंग ओढवला होता. याप्रसंगीं बाजीरावांच्या मध्यस्थीनें त्यांचा समेट झाला. या मध्यस्थीची भूमिका बाजीरावाकडे होती हें खरें, पण आंतली ह्यांची खरी स्थिति ' बोलविता धनी वेगळाची ' अशी होती. नानांच्या प्रेरणेप्रमाणेंच या भूमिकेचें कार्य त्यांनीं पार पाडल्याचें दिसून येतें.

तसेंच महाडच्या कारस्थानांत ठरल्याप्रमाणें निजाम, भोंसले वगैरेंच्या मागण्यांचा प्रश्न उद्‌भवला, तेव्हां नानांनीं आपला व बाजीरावांचा सोनारभांडणाचा मजेदार प्रसंग घडवून आणल्याचें दाखविलें आहे. त्याचें श्रेय अर्थात नानांच्या कपटपटु कुशाग्र बुद्धीसच दिलें पाहिजे. मागणी करणाऱ्या निजाम, भोंसले वगैरेंच्या समजुतीसाठीं नानांनीं आणखी एक कपटप्रयोग केल्याचें दाखविलें आहे. (पान ८११ क १५). निजाम व भोंसले यांच्या पक्षाला आपण आहों, हें दाखविण्याच्या हेतूनें नानांनीं बाजीराव आपलें ऐकत नाहींत म्हणून आपण सर्व प्रापंचिक व्याप सोडून काशीस जाणार असें प्रसिद्ध केलें, व त्याकरतां इकडची सर्व निरवानिरव करीत आहों असेंही त्यांनीं दाखविलें. चालू राजकारणाच्या बाबींची योग्य व्यवस्था लावण्याच्या हेतूनें त्यांनीं एक अकरा कलमांची यादी श्रीमंत बाजीराव यांच्या मखलाशीकरतां पाठविली.

ग्रंथकारांनीं नाना फडनाविसांच्या चरित्रावरून सदर अकरा कलमांची यादी उद्धृत केली आहे. (पान ९११ क १६). हीं कलमें राज्याच्या हिताला कितपत साधक अगर बाधक होतीं, याबद्दल कलमवार योग्य चर्चाही करण्यांत आली आहे. (पान ९१२ क १७). या यादीवर नानांनीं बाजीरावांची मखलाशी करवून ती मंजूर करून घेतली. राज्याचा कारभार नानांकडेच होता. बाजीरावांनीं आपल्या रक्षणाची जबाबदारी मात्र शिंद्यांकडे सोंपविली होती. अशी व्यवस्था झाल्यानें बाजीरावांची अवस्था तराजूच्या कांट्यासारखी झाली होती. त्या कांट्याला नानांचे आणि शिंदे या दोन पारड्यांपैकीं जें पारडें ज्या वेळीं जड होईल, तिकडे झुकणें भाग होतें, असें वर्णन करून पेशव्यांनीं छत्रपती रामराजाकडून छत्रपतीपदाचा राजीनामा घेतल्यापासून छत्रपतीची जशी पराधीन व असहाय स्थिति झाली होती तशीच बाजीरावांचीही या वेळीं झाली होती, असें सयुक्तिकपणें दाखविण्यांत आलें आहे. (पान ९२९ क ४).

बाजीरावांना नानांचा विश्वास मुळींच वाटत नव्हता. नानांकडून आपल्या जिवाला दगाफटका होईल कीं काय याबद्दल ते फार भीत असत. याकरतांच आपल्या संरक्षणाचा भार त्यांनीं शिंद्यांवर सोंपविला होता. या बाबतींत शिंद्यांवर त्यांचा विश्वास होता. नानांना हें खपलें नाहीं. त्यांनीं बाजीरावांना 'इतर पेशव्यांप्रमाणें तुम्ही (बाजीरावांनीं)ही आपल्या हुजुरातीच्या फौजेंत येऊन रहावें आणि सर्व राज्यकारभार स्वतः करावा' असा निरोप पाठविला. या नानांच्या आग्रहामुळें बाजीरावांना जास्तच भीति वाटली व त्यांनीं संरक्षणाकरतां असलेले नानांचे लोक काढून टाकून शिंद्यांकडून संरक्षणार्थ आपल्या इच्छेप्रमाणें पाहिजे त्या लोकांची नेमणूक करून घेतली.

खरे शास्त्र्यांनीं लिहिलेल्या नाना फडनविसांच्या चरित्रांत बाजीरावांवर पुढील दोन तऱ्हेचे आरोप केले आहेत. (१) बाजीरावांनीं मोठमोठीं अनुष्ठानें करून लक्ष भोजनें घातलीं, व (२) श्रावण मासांत मोहरा, पुतळ्या, मोतीं, पांच व माणकें यांची पंचमेळ खिचडी ओंजळ भरून ब्राह्मणांस खैरातीबाबत

वांटली. खरे शास्त्री यांचें ह्मणणें बाजीरावांनीं या गोष्टी करून सरकारी खजिना ओस पाडला व त्यामुळें त्यांनीं लोकांवर पट्टया बसवून त्यांच्याकडून पैसे वसूल करण्याचा कहर केला, असें आहे. ग्रंथकारांनीं या गोष्टींची सप्रमाण व सविस्तर चर्चा करून खरे शास्त्र्यांनीं बाजीरावांवर केलेले आरोप खोटे आहेत व बाजी-रावांनीं स्वतः लोकांवर पट्टया बसवून पैसे उकळले नाहींत; पट्टया लोकांवर काढण्याची ही कारवाई सर्वस्वीं नानांचीच होती व त्याबद्दल तेच कसे जबाबदार आहेत हें विशद रीतीनें दाखवून दिलें आहे. (पान १२९ ते १४० क ८ ते १८ ). यावरून बाजीराव हे पेशवाईचे केवळ नामधारी अधिपती होते. खरी सत्ता नानांच्याच हातीं होती हें सिद्ध होतें. नानाइतकाच मोरोबादादांचा फड-नविशीवर हक्क असतां फडनविशीचें उत्पन्न एकट्या नानांनींच अन्यायानें बळका-विलें होतें. नानांनीं मोरोबादादांस कैद करवून त्यांना नगरचा किल्ला दाखविला. त्यांची सर्व मालमत्ता लुटली. हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. नानांनीं मोरोबादादांवर केलेला हा अन्याय बाजीरावांना सहन झाला नाहीं. त्यांनीं शिंद्यांना सांगून मोरोबादादांना सोडविण्याची खटपट केली पण त्यांना त्यांत यश मिळालें नाहीं. ही सर्व हकीकत देऊन या बाबतींत नानांनीं आपलेंच ह्मणणें खरें करून मोरोबादादांस मरेतों कसें कैदेंत डाबून ठेवलें; याचें सविस्तर वर्णन करण्यांत आलें आहे. ( पान १७७ ते १८० क ५ ते ७ ).

नानांनीं शिंद्यांना नगरचा किल्ला व पंधरा लक्षाची जहागीर देऊं केली तेव्हां शिंद्यांनीं बाजीरावांकडे पेशव्यांच्या वाड्याभोंवती त्यांच्या संरक्षणाकरतां ठेवलेल्या पलटणी काढून नेण्याची परवानगी मागितली. पण बाजीरावांनीं त्यांना 'तुह्मी पलटणी न्याल तर आह्मीच वाडा सोडून तुमच्या लष्करांत राहावयास येतो. कारण तुह्मी गेल्यावर नाना आमची काय दशा करील याचा भरंवसा आह्मांस मुळींच लागत नाहीं, ' असें उत्तर पाठविलें. यावरून बाजीरावांची नानाविषयीं काय भावना होती हें स्पष्ट दिसून येतें. तसेंच बाजीराव यानीं शिंद्यांना ' नानांस अधिकारभ्रष्ट करून माझें भय दूर करावें ह्मणजे मी तुह्मांस दोन

कोट रुपये मिळवून देतो असें कळविण्याचें व तें शिंद्यांनीं मान्य केल्याचें दाखविलें आहे. ( पान ९८३ क ८ ). यासंबंधीं घाटग्यामार्फत बाजीरावांनीं शिंद्यांशीं दोन कोट रुपये देण्याचा गुप्त करार केला होता असा उल्लेख आला आहे. परंतु असा गुप्त करार मुळींच झालेला नसावा असें अनुमान कारणां-सहीत पुढें मांडण्यांत आलें आहे. ( पान ९८५ ते ९८८ क १० ते १२ ).

शिंद्यांनीं परशुरामभाऊंना कैदेंतून मुक्त करण्याविषयीं विनंति केल्या-वेळीं बाजीरावांनीं तसें करण्यास त्या वेळीं विरोध दर्शविला ही हकीकत मागें आलीच आहे.

ग्रंथकारांनीं बाजीरावांच्या व छत्रपती रामराजाच्या वागणुकीची त्यांच्या अधिकारसंन्यास करण्याच्या दृष्टीनें चर्चा केली आहे. ( पान ९९८ ते १००० क ३ व ४ ). रामराजांनीं अधिकारसंन्यास केला तसा बाजीरावांनीं आपला पेशव्यांचा अधिकार नानांच्या स्वाधीन केला नाहीं. यामुळें नानांनीं त्यांची दुरवस्था केली. बाजीरावांनीं काशीराव होळकर यांना सरदारीचीं वस्त्रें दिलीं होतीं. त्या हुकुमाविरुद्ध वर्तन करून नानांनीं मल्हारराव होळकर यांना काशी-रावांशीं व शिंद्यांशीं सामना देण्यास उठविलें. हें नानांचें वर्तन पेशव्यांविरुद्ध निव्वळ बंडखोरपणाचें व राजद्रोहाचेंच होतें, असें ग्रंथकारांनीं दाखविलें आहे. नानांनीं नाना तऱ्हेच्या पट्टया प्रजेवर काढून आपला खजिना भरला, परंतु पेशव्यांचा खजिना मात्र रिताच राहूं दिला. पेशाच्या टंचाईचें निमित्त करून खुद्द बाजीराव पेशव्यांच्या खासगी खर्चाची नानांनीं कशी तारांबळ उडवून दिली होती, याचें वर्णन ऐ. ले. संग्रहावरून पुढीलप्रमाणें देण्यांत आलें आहे. "बाजीरावसाहेबांची आतां खर्चाची जी हलाखी चालली होती ती पुसूंच नये. त्यांच्या वाड्यांत दिव्यास तेल मिळेना, विड्यांचीं पानें दुर्मिळ झालीं आणि खाशांच्या स्वयंपाकाचे बारीक तांदूळ बंद झाले." ( पान १००२ क ५ ). यानंतर बाजीराव व शिंदे यांच्यावर मात करून त्यांना अधिकारभ्रष्ट करण्याच्या हेतूनें नानांनीं बाजीरावांस काढून अमृतराव यांना पेशव्यांच्या गादीवर बस-

विण्याचें व महादजी शिंद्यांच्या बायकोच्या मांडीवर दत्तक मुलगा बसवून, दौलतरावाची सरदारी काढून घेण्याचें कारस्थान सुरू केलें. नानांनीं आपल्या कपट-कारस्थानी स्वभावानें बऱ्याच लोकांना दुखविलें होतें. त्यामुळें नानांचा मंत्र नानांवर उलटवून त्यांना कैद करण्याचा विचार बाजीराव, शिंदे, घाटगे, बाळोजी कुंजर वगैरे मंडळींनीं चालविला होता. शिंद्यांनीं नानांशीं मुकीरसाहेबा-मार्फत समेट केल्याचें दाखवून परतभेटीनंतर नानांना कसें आकस्मिक रीतीनें कैद करण्यांत आलें हें त्यासंबंधीं दिलेली पेशव्याचे बखरींतील माहिती उद्धृत करून दाखविण्यांत आलें आहे. (पान १०१३ ते १०८९ क १९ व १६).

कांहीं इतिहासकारांनीं, नानांस शिंद्यांनीं विश्वासघातानें कैद केलें, असें म्हटलें आहे. प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीवरून या कृत्यास विश्वासघाताचें कृत्य असें म्हणतां येण्याजोगें असलें तरी नानांच्या कपट-कारस्थानी स्वभावाकडे व त्यावेळच्या राजकारणाकडे लक्ष देतां, 'शठं प्रति शाठ्यं' या न्यायानें हा विश्वासघात होऊं शकत नाहीं, असें जें ग्रंथकारांचें म्हणणें आहे तेंही विचारणीय आहे. ग्रंथकारांनीं याबद्दल सविस्तर चर्चा करून आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ कारणेंही दिलीं आहेत. त्यावेळच्या एकंदर परिस्थितीकडे व नानांच्या मायावी कारस्थानाकडे पाहतां, "व्रजंति ते मूढधियः पराभवं, भवंति मायाविषु ये न मायिनः" या उक्तीप्रमाणें राजकारणाच्या दृष्टीनें शिंद्यांचें हें कृत्य समर्थनीय ठरविलें जावें यांत वावगें तें काय ?

शिंद्यांनीं नानांना कैद केल्यावर कारभारीपणा हक्कदार नात्यानें अमृत-रावाकडे गेला. अमृतराव नानांच्या तत्वाला बळी पडल्यामुळें आपल्याच मनाप्रमाणें कारभार करूं लागले. अशा स्थितींत बाजीरावांना शिंद्यांच्या व अमृतरावांच्या मर्जीप्रमाणेंच राज्यकारभार चालूं देणें भाग होतें. बाजीरावांनीं मोरोबादादांना सोडवून नानांच्या जागीं कारभारी नेमण्याची खटपट चालविली, परंतु त्यांना प्रत्यक्ष शिंद्यांचा विरोध असल्यामुळें, ती गोष्ट होऊं शकली नाहीं. बाजीरावांची स्थिति या वेळीं पिंजऱ्यांत कोंडलेल्या सिंहाप्रमाणें सर्वस्वीं परतंत्र

झाली होती, असें ग्रंथकारांनीं वर्णन केलें आहे. ( पान १०३० क १० ). असें असतांही बाजीरावांनीं मोरोबादादांना व त्यांच्या कुटुंबियांना उदारबुद्धीनें शक्य तेवढी मदत केली. मोरोबादादा यावेळीं त्र्यंबकेश्वरच्या किल्ल्यावर कैदेंत होते. बाजीरावांनीं मोरोबादादांच्या कैदेची सक्ती ढिली करून त्यांना त्र्यंबकेश्वर गांवांत फिरण्याची सवलत दिली व त्यांच्या बायकोला व मुलांना निर्वाहापुरतें द्रव्य दिलें, आणि त्यांना थोडा सरंजामही नेमून दिला. बाजीरावांच्या मनांत फडनविशीची तेरीख मोरोबादादांचा धाकटा मुलगा नाना यांनीं घालावी असें होतें, तें त्यांनीं कां नाकारलें व तें काम अमृतरावांसच कसें करावें लागलें याचें वर्णन करण्यांत आलें आहे. ( पान १०३२ क १० ).

राज्यांत कोठें दंगाधोपा झाल्यास त्याचा बंदोबस्त करण्यास योग्य पराक्रमी सरदाराची जरूरी होती. शिंद्यांचा विरोध असल्यामुळें परशुरामभाऊंची मुक्तता करणें बाजीरावांना शक्य नव्हतें. ह्मणून त्यांनीं धोंडोपंत गोखले यांना फौजफांटा देऊन एक लाख रुपयांची वरात देऊन चाकरीस ठेविलें. याप्रमाणें या गोखल्यांचें घराणें बाजीरावांनीं उदयास आणलें. या धोंडोपंताचांच पुतण्या प्रसिद्ध जवानमर्द बापू गोखले.या गोखल्यानीं बाजीराव पेशव्यांची नोकरी मोठ्या शौर्यानें व इमानें इतबारें बजाविल्याचें दिसून येतें.नानांना कैद करण्यांत आल्यामुळें बाजीरावांनीं राज्यांत बंदोबस्त करण्याच्या दृष्टीनें नानांना कारभाऱ्याच्या हुद्यावरून काढून टाकल्याचीं जाहीर पत्रकें काढून तीं ठिकठिकाणीं पाठविलीं. त्यांनीं सातारच्या महाराजांनाही याबद्दल कळवून सातारच्या किल्ल्यावर असलेल्या नानांच्या नोकरांना कैद करून किल्ला आपल्या ताब्यांत ठेवणेंबद्दल कळविलें. त्याप्रमाणें छत्रपतींनीं वागून तो किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. नानांनीं आपला खजिना भरण्याची वेळोंवेळीं काळजी घेतल्यामुळें त्यांना पैशाची कधीं वाण पडत नसे. पेशव्यांच्या खजिन्याची स्थिति याच्या उलट अत्यंत हलाखीची असल्यानें नानाशिवाय इतर कोणत्याही पेशवाईच्या कारभाऱ्यांना राज्याचा कारभार चालवितांना त्यांचा जीव मेटाकुटीस येत असे. पैशाच्या अभावीं राज्यकारभार योग्य रीतीनें चालणेंच

दुरापास्त. त्यांतून बाजीरावांच्या मागें शिंद्यांचा पैशाबद्दल लकडा सारखा लागलेला असे. त्यामुळें नानांच्या पक्षांतील गुन्हेगार असलेल्या लोकांकडून पैसे वसूल करण्याची परवानगी बाजीरावांनीं शिंद्यांना दिली होती. तिच्या अंमलबजावणीचें काम सर्जेराव घाटगे अत्यंत जुलुमानें व क्रूरपणानें करूं लागले. बाजीरावांना आपल्या प्रजाजनांचे घाटगे करीत असलेले हाल पहावेनात. त्यांनीं शिंद्यांना बोलावून त्याबद्दल जाब विचारला व पुण्याहून जांबगांवास निघून जाण्यास सांगितलें. पण शिंद्यांवर फौजेचें देणें झाल्यामुळें पैसे मिळाल्याखेरीज आपणास जातां येत नाहीं असें शिंदे उत्तरले. ही सर्व हकीकत देऊन त्यांच्यामध्यें झालेलीं प्रश्नोत्तरेंही डफकृत मराठ्यांच्या बखरीवरून देण्यांत आलीं आहेत. (पान १०४०, १०४१ क १७).

ही पैसे मागणाऱ्यांची भुतावळ नानांच्या कारस्थानामुळेंच निर्माण झाली होती वास्तविक नानाच त्याबद्दल जबाबदार होते. त्यांच्या मागें ही भुतावळ होतीच. परंतु ते जबरदस्त मांत्रिक असल्यानें त्यांना ती फारशी बाधक होत नव्हती. ते कैद होऊन गेल्यामुळें ही भुतावळ बाजीरावांच्या मागें लागली व त्यामुळें बाजीरावांची स्थिति लाचारीची बनली हें विशद करून दाखविण्यांत आलें आहे. इतर कोणताही पुरुष बाजीरावांच्या जागीं असतां, तर तोही या संकटाच्या परिस्थितीस बाजीरावासारखाच बळी पडता. कांहीं इतिहासकारांनीं या कामीं बाजीरावांना दिलेलीं दूषणें व त्यांचें केलेलें विडंबन ‘अप्रबुद्धपणाचें’ व ‘विपर्यस्त’ आहे असे खेदोद्गार ग्रंथकारांनीं काढले आहेत. (पान १०४१ क १७).

दौलतराव शिंद्यांचा व शिंदेबायांचा वाद बरेच दिवस चालला होता. शिंदेबायांना सर्जेराव यांनीं मारहाण करून त्यांची अप्रतिष्ठा केली. तें सहन न होऊन अमृतरावांनीं व बाजीरावांनीं त्यांना आपला आश्रय दिला. यामुळें बाजीरावांवर शिंद्यांचा रोष होऊन ते बाजीरावांना संकटांत लोटण्याचा प्रयत्न करूं लागल्याचें दाखविलें आहे. (पान १०४५, १०४६ क १९, २०).

सातारचा किल्ला छत्रपतींनीं आपल्या स्वाधीन करून घेतल्यावर तो त्यांचेकडून आपले ताब्यांत घेण्याकरतां बाजीरावांनीं शिवरामपंत थत्ते यांस तिकडे पाठविलें व छत्रपतींना थत्ते यांच्या स्वाधीन किल्ला करण्याबद्दल पत्र पाठवून विनंति केली. शिंद्यांनीं महाराजांशीं सर्जेरावांमार्फत राजकारण सुरू केल्यामुळें महाराजांनीं थत्ते यांना किल्ल्यावरदेखील घेतलें नाहीं. त्यामुळें बाजीरावांचे मन महाराजांविषयीं साशंक झालें. त्यांनीं पुनः माधवराव रास्ते यांना फौजेसह किल्ल्याचा ताबा घेण्याकरतां साताऱ्यास पाठविलें. शिंद्यांनीं कारस्थान करून साताऱ्च्या महाराजांची व करवीरच्या महाराजांची पेशव्यांविरुद्ध उठावणी केल्यामुळें साताऱ्च्या महाराजांनीं साताऱ्यावर आपला अंमल बसवून थत्त्यांना त्यांनीं 'तुम्ही येथून बऱ्या बोलानें निघून जावें, न जाल तर बळजबरीनें घालवून देऊं' असें स्पष्टपणें कळविलें. बाजीराव व थत्ते हे दोघेही यामुळें गोत्यांत आले. यावर उपाययोजना करण्याचा विचार बाजीरावांनीं चालविला. या वेळीं परशुरामभाऊ कैदेंत होते. त्यांची मुक्तता रास्त्यांची जामीनकी घेऊन बाजीरावांनीं कशी केली व परशुरामभाऊंनीं सैन्य जमवून साताऱ्च्या महाराजांचें बंड कसें मोडलें, हें त्यासंबंधीं सविस्तर हकीकत देऊन दाखविण्यांत आलें आहे. (पान १०४८, १०४९ क २१ ). यानंतर बाजीरावानीं शिंदे व शिंदेबाया यांच्यामध्यें समेट करण्याची खटपट केली. त्यांनीं याबद्दल खुद्द शिंद्यांशींच बोलणें चालविलें. शिंदे कबूल झाल्यामुळें त्यांनीं बायांना पुण्यास येण्याबद्दल कळविलें. शेवटीं बाजीरावांच्या मध्यस्थीनें हा समेट तात्पुरता घडून आला.

शिंद्यांच्या जिवावर सर्जेराव घाटगे याच्या दुष्ट व कळकाळ्या लीला चालूच होत्या. त्यानें एकदां अमृतराव यांच्या छावणीवर अकस्मितपणें हल्ला करून त्यांच्या फौजेचा नाश केला. या अत्याचाराबद्दल शिंद्यांनीं वकिलामार्फत बाजीरावांकडे क्षमेची कशी याचना केली व बाजीरावांनीं त्यांना थोर मनानें कशी क्षमा केली याचें सविस्तर वर्णन देण्यांत आलें आहे. ( पान १०५१, १०५२ क २२ ).बाजीराव यांना हें कृत्य वाटल्यानें शिंद्यांच्या चिथावणीनेंच

केलें असें वाटून शिंद्यांशीं युद्धप्रसंग सुरू झाल्यास निजामअल्ली व भोसले यांची मदत मिळावी ह्मणून त्यांच्याशीं त्यांनीं राजकारण सुरू केलें होतें. परंतु पूर्ण विचाराअंतीं त्यांनीं त्यांच्याकडून मदत मागविली नाहीं. आपल्या करण्यांत आलेल्या अपमानाचें सूडबुद्धीनें उट्टें काढून राज्याचें नुकसान त्यांनीं केलें नाहीं. या त्यांच्या वागणुकीवरून त्यांच्या मनाचा मोठेपणा कसा दिसून येतो हें दाखवून नानांचा स्वभावधर्म याच्या उलट कसा होता हें दाखवून देण्यांत आलें आहे. ( पान १०९४ क २३ ). बाजीरावांची मनःप्रवृत्ति आपसांतील तंटे मिटविण्याकडे होती, नानाप्रमाणें ती वाढविण्याकडे नव्हती. वेळोवेळीं बाजीरावांची क्षमावृत्ति कां व कशी दिसून येत होती हें ऐ. के. संग्रहांतून पुढील उतारा उद्धृत करून दाखवून देण्यांत आलें आहे. “ गरीब बिचारा बाजीराव ! एका दुर्बलपणामुळें त्यांचें पेशवाईचें पद हलक्या लोकांच्या कुचेष्टेस पात्र झालें होतें. सर्जेरावासारख्यांनीं आधीं लाथ मारावी, आणि मागून लगेंच पायांवर डोकें ठेवावें, असें वर्तन बाजीराव रघुनाथ पेशवे यांशीं आजपर्यंत अनेक वेळां केलें, तरी त्यांची क्षमावृत्ति जी ढळली नाहीं, ती यावेळीं तरी कशी ढळणार ? त्यांनीं शिंद्यांचा अपराध माफ करून बायांशीं समेट घडवून आणण्याचा पुनः यत्न केला.” (पान १०९४ क २३ ).

बाजीरावांनीं घाटग्याच्या या अत्याचाराबद्दल क्षमा करावी ह्मणून अमृतरावांकडे व शिंदेबायांकडे खटपट चालविली. परंतु त्यांची समजूत पटली नाहीं. शिंदे व शिंदेबाया यांच्यामधील समेटाचें गाडें पुनः फिसकटल्याचें दाखविण्यांत आलें आहे. (पान १०९६ क २४). याप्रमाणें या कामीं बाजीरावांची मध्यस्थी निष्फळ ठरली. शिंदे बायांचीसमजूत न पटून समेटास खो बसल्यामुळें शिंद्यांना बाजीरावांची खटपट वरकरणी असावी, त्यांची शिंदेबायांना आंतून फूस असावी, असा संशय आला. शिंद्यांची बाजीरावांविरुद्ध पुनः कारवाई सुरू झाली. त्यांनीं बाजीरावांची खोड मोडावी ह्मणून नानांना कैदेतून मुक्त करण्याचें ठरविलें. नानांची मुक्तता करण्यांत शिंद्यांचे कोणकोणते हेतु होते, याची

कळमवार चर्चा करून नानांची सुटका कोणत्या शर्तीवर करण्यांत आली हें दाखविण्यांत आलें आहे. ( पान १०९७ क २९ ).

नाना सुटून शिंद्यांच्या छावणींत आल्यावर बाजीरावांनीं त्यांच्यांशीं सलोखा करण्याचे कसोशीनें प्रयत्न केले. ते त्यांचे प्रयत्न कां विफल झाले हें नानांच्या मूळ स्वभावाचें वर्णनावरून सहज दिसून येण्याजोगें आहे. ( पान १०६४ क २९ ). नानांनीं बाजीरावांच्या निरोपाप्रमाणें त्यांची भेट घेण्याचें जरी ठरविलें होतें, तरी त्यांत राग नव्हता. नानांचा अंतस्थ हेतु निराळाच होता. या प्रसंगीं दुर्जनसाहेबानें आपल्या वर्तनानें बाजीरावांचा जो अपमान केला तो नानांच्या प्रेरणेनेंच केला असला पाहिजे असें सयुक्तिकपणें दाखवून, असें करविण्यांत नानांचे हेतू काय असावेत, हें विशद करण्यांत आलें आहे. ( पान १०६८ क ३१ ). नानांची सुटका केल्यानंतर नानांशीं ठरविल्याप्रमाणें शिंद्यांनीं नानांना कारभारी नेमण्याबद्दल बाजीरावांच्यामागें सारखें टुमणें लावलें. त्यांच्या हातीं कारभार देण्यावांचून गत्यंतर नाहीं, असें वाटून बाजीरावांनीं नानांना राज्याचा कारभार हातीं घेण्याविषयीं प्रार्थना केली. त्याला नानांनीं "तुमच्या कारभारांत पडल्यानें माझ्या अब्रूस आणि जीवितास धक्का बसणार नाहीं याबद्दल इंग्रज व निजाम अली जर हमीदार होत असतील, तरच आपण कारभार पतकरूं" ( पान १०६९ क ३२ ), असें रोखठोक उत्तर दिलें. याप्रमाणें बाजीरावांकडून इंग्रजांची व निजामाची हमी मागण्यांत नानांचे हेतू काय असावे याबद्दलचे सयुक्तिक अनुमान ग्रंथकारांनीं काढलें आहे. या वर्तनानें नानांनीं पेशव्यांविषयींच्या विशेषतः बाजीरावांविषयींच्या सेव्यसेवकभावाला तिलांजलीच दिल्याचें दिसून येतें. वरील नानांनीं घातलेल्या हमी देण्याच्या अटीसंबंधीं ग्रंथकारांनीं पुढील उद्गार काढले आहेत. "त्यांनीं ज्याअर्थी ही अट बाजीराव यांना घातली, त्याअर्थी स्वतःच्या स्वार्थापुढें नानांना पेशवाईच्या इभ्रतीची किंवा बाजीरावांच्या दर्जाची पर्वा वाटत नव्हती हें सिद्ध होतें. यावरून नाना स्वतःच्या स्वार्थाकरतां व स्वतःच्या एकमुखी सर्वाधिकाराकरतां कसे आंधळे

बनले होते हें आतां निराळें सांगणेंची जरूरी नाहीं" (पान १०७४ क ३९). बाजीरावांनीं ही हमी देण्याची अट मान्य केली नाहीं. बाजीराव आपले ऐकत नाहींत त्याअर्थी त्यांना जगांतूनच नाहींसें करावें ह्मणून नानांनीं बाजीरावांवर मारेकरी घातल्याचें दिसून येतें. हें कृत्य नानांच्या स्वभावधर्माला अनुसरूनच होतें असें ग्रंथकारांचें ह्मणणें आहे. (पान १०७५ क ३६).

नानांच्या हातीं कारभार आल्यामुळें ठरल्याप्रमाणें शिंदे हिंदुस्थानांत जाणार व ते गेल्यावर आपणाला नानाशिवाय सत ना गत असें वाटून बाजी-रावांस नानांना शरण जाणें भाग पडलें. नानांना शरण जाण्यांत व राज्य त्यांचेवर सोंपविण्यांत किती उदात्त हेतू होता हें दाखविण्यांत आलें आहे. (पान १११३ क २१). ऐ. लें. संग्रहावरून त्या प्रसंगाचें वर्णनही देण्यांत आलें आहे. बाजीरावांच्या या शरणागतींत नानांनीं बाजीरावांना करारानें बांधून टाकून व आपला फडनविशीचा अधिकार त्यांनी आपला दोस्त नारोपंत चक्रदेव यांजकडे सोंपवून ते स्वतः पेशवाईचे सर्वाधिकारी व पूर्ण मालक बनल्याचें दिसून येतें. (पान १०७६, १०७७ क ३७).

त्यानंतर नानांनीं बाजीरावांना पुणें येथें शनिवारवाड्यांतच नजरकैदेंत ठेविलें होतें. त्याप्रमाणेंच अमृतरावांस बाजीरावाकडून शह देऊन त्यांनीं शनि-वारवाडा सोडून जाऊं नये अशी व्यवस्था करण्यांत आली होती. चिमाजी-अप्पांही बाजीरावांकडेच होते. याप्रमाणें या तिघां खाशांचा बंदोबस्त करण्यांत आला होता. तसेंच नानानीं बाजीरावांच्या पठडी लोकांचा चांगलाच समाचार घेतला. कित्येकांना कैद केलें. कित्येकांना कैद करून डोंगरी किल्ले दाख-विण्यांत आलें.

परशुरामभाऊ व करवीरकर यांच्यामध्यें असलेला वैरभाव नाहींसा व्हावा व त्यांनीं एकमेकांची खराबी करूं नये, या सद्हेतूनें बाजीरावानीं त्यांचा समेट करण्याची खटपट केली. त्याप्रमाणें रा. शिवरामपंत थत्ते यांच्यामार्फत पेशवे, करवीरकर व पटवर्धन सरदार यांचेमध्यें समेट करण्याचें ठरून त्याच्या अटीही

ठरल्या. परंतु हें प्रकरण नानाकडे गेल्यावर त्यांनीं हा तह मंजूर केला नाहीं, एवढेंच नव्हे तर, नानांनीं या कामीं खटपट करणारे थत्ते व काळे यांना कैद करून डोंगरी किल्ला दाखविला.

इंग्रजांशीं बोलणीं करण्याच्यावेळीं आपण पूर्णपणें इंग्रजांतर्फे आहों असें नाना दाखवीत. इंग्रजांशीं ठरविलेल्या अटी आपला भलेपणा राखून घाच्यावर बसविण्यास बाजीराव त्यांच्या चांगळेच उपयोगी पडत. कांहीं चांगलें घडून आल्यास त्याबद्दलचें श्रेय नाना आपल्याकडे घेत, व कांहीं वावगें दिसण्याजोगें घडल्यास त्याचा दोष बाजीरावांवर लोटून ते नामानिराळे राहात. अशी त्यांची हातोटी होती, असें दिसुन येतें. यामुळें पेशवाईचे खरे अधिकारी मागें वर्णन केल्याप्रमाणें नाना हेच जरी होते तरी दोषाचें खापर फुटण्याचा प्रसंग आल्यास बाजीरावांचें डोकें त्यांनीं तयार करून ठेविलें होतें. शिंदेबायांच्या फौजेंतील पठाणांनीं नाशिकास जाऊन तेथील लोकांना सहा लक्ष रुपये खंडणी देण्याची तसदी लावली. त्या लोकांकडून ही खंडणी देणें न झाल्यामुळें पठाणांनीं त्यांच्यावर अतोनात जुलूम केले व त्याचा दोष बाजीरावांवरच लादण्यांत आला असें उद्धृत केलेल्या ऐ. ले. संग्रहांतील पत्रावरून दिसून येतें. (पान ११३४ क ३९).

प्रसंगविशेषीं आपलें व बाजीरावांचें पटत नाहीं, ते आपलें ऐकत नाहींत, करतां आपण कारभार सोडून काशीस जातों असें नाना भासवीत. याच्या बुडाशींही त्यांचें कारस्थानच असे. असेंच कारस्थान करून त्यांनीं बाळोबातात्यांविषयीं बाजीरावांचें मन कसें दूषित केलें व बाजीरावांकडून शिंद्यांना भीड घालवून घाटग्यांना कसें कैदेंतून मुक्त करण्यांत आलें, हें दाखविण्यांत आलें आहे. (पान १२०६ ते १२०९ क २८ ते ३०). याप्रमाणें बाजीरावांना नानांच्या हयातीपर्यंत त्यांच्या हातचें खेळणें बनविण्यांत आलें होतें. पुढें नाना कालवश झाल्यावर, बाजीरावांना कोणाचा आधार नसल्यानें त्यांना सर्वस्वीं शिंद्यांच्या तंत्राप्रमाणें वागणें भाग पडलें. बाजीरावांविषयीं नानांच्या भावना कशा स्वरूपाच्या होत्या याचें वर्णन ग्रंथकारांनीं खालील शब्दांत केलें

आहे. "बाजीरावांबद्दल त्यांचे मनांत अरराही सहानुभूति वसत नव्हती. अशा स्थितींत आपल्या पश्चात् पेशवाईचे खरे धनी बाजीराव होणार ही कल्पनाही नानांना असह्य वाटणारी होती. ह्मणून आपल्या पश्चात् नांदती पेशवाई बाजीरावांच्या हातीं जाऊं नये ह्मणून पूर्वसंकल्पानुसार पेशव्यांच्या राज्याच्या राखेच्या पुंजीवर बाजीरावांनीं खुशाल राज्य करावें अशी खबरदारी नानांनीं शेवटीं घेतली असें ह्मणण्यास हरकत नाहीं." (पान १२३१ क १०).

बाजीरावांच्या अंगीं असलेल्या गुणाचें वर्णन प्रसंगोपात्त मागें देण्यांत आलेंच आहे. विशिष्ट परिस्थितीमुळें त्या गुणाचें चीज झाल्याचें दिसून येत नाहीं. कांहीं इतिहासकारांनीं बाजीरावांच्या पदरीं दोष बांधुन नानाचा भलेपणा वर्णन केला आहे. परंतु ही दृष्टि सर्वस्वीं चुकीची आहे असें ग्रंथकारानीं ठिकठिकाणीं दाखविलें आहे. पेशव्यांच्या राज्याचा नाश नानांनीं आपल्या हयातींतच करून त्याच्या राखेच्या पुंजीवरच बाजीरावांना बसविल्यानें राज्याच्या नाशास बाजीराव मुळींच जबाबदार नाहींत असाच ग्रंथकारांनीं निष्कर्ष काढल्याचें दिसून येतें. याप्रमाणें राज्यनाशाला तसेंच या दुर्दैवी पेशव्याच्या अधःपाताला बाजीरावांच्या गुणावगुणापेक्षा नानाची कपटकारस्थानेंच कशीं कारणभूत झालीं यांचें विवेचनही ग्रंथकारांनीं ठिकठिकाणीं मार्मिकपणें केलें आहे. दोषदृष्टि बाजूला ठेऊन सत्याची चाड असणारांनीं या इतिहास-सागरांत खोल बुडी मारून सत्य शोधून काढणें भाग आहे. 'नास्ति सत्यात्परोधर्मः।'

## नानाफडनविस.

नाना फडनविसांच्या घराण्याचें उपनांव भानू असें होतें. यांचे वडील जनार्दनपंत हे नानासाहेब पेशव्यांचे फडनविस होते. नानांचे चुलत चुलत बंधू मोरोबादादा यांच्याविषयीं हकीकत देतांना ग्रंथकारांनीं भानू घराण्याचा इतिहास थोडक्यांत देऊन नानांच्या पूर्वजानीं पेशव्याची फडनविशी कशी संपादन केली हेंही दाखविलें आहे. (पान ९७७ क ९). नानांचा जन्म शके १६६३ मध्यें (ता. ४ मे सन १७४१) दुर्मतीनाम संवत्सरांत

सातान्यांत झाला. नानांचे वडील दिवंगत झाल्यावर नानासाहेबांनीं नानांना फडनविसाचें कामावर घेतलें. त्यावेळीं त्यांचें वय अवघें १९ वर्षांचें होतें. ते पेशव्यांचा राज्यकारभार सन १७६४ सालापासून पाहूं लागले. पेशवाईच्या राजकारणांत ते पक्के मुरके होते. त्यांचा दीर्घकाळ पेशवाईतील राजकारणाच्या उलाढाली करण्यांत गेला. पेशवाईत जे थोर थोर व प्रमुख मुत्सद्दी होऊन गेले, त्यांमध्यें नानांची प्रामुख्यानें गणना करणें भाग आहे. नानांनीं आपलें आत्मचरित्र लिहून ठेविलें आहे. त्यांतील वर्णनावरून नानांची बालपणापासून मनोवृत्ति कशी होती व त्यांचा स्वभाव पुढें कसा कसा बनत गेला हें दिसून येतें. "बालपणीं त्यांचें विद्याभ्यासाकडे फारसें लक्ष नव्हतें. त्यांच्या मनोवृत्ति फार उच्छृंखल होत्या. त्यांच्या स्वभावांत एककल्लीपणा व हेकेखोरपणा फार असे. थोडे मोठे झाल्यावर दुर्विचाराचें प्राबल्य त्यांच्या मनावर अतिशय होत असे. प्रसंगविशेषीं तें इतकें अनावर होई कीं त्यापासून त्यांचा वर्तनक्रमही दूषित होत असे." (पान ९४ क १३).

नानांचा पेशवे घराण्याशीं दूरचा आप्तसंबंधही होता. शिवाय नानासाहेबांचे चिरंजीव विश्वासराव व माधवराव यांची व नानांची बालपणापासून मैत्री होती. नानांचा विद्याभ्यास, मर्दानी शिक्षण, वगैरे सर्व त्यांचेबरोबरच झालें. खुद्द नानासाहेब पेशवे जरी वयानें वडील होते, तरी नानांशीं ते मित्रत्वाच्या नात्यानेंच वागत. ग्रंथकारांनीं देवकृत नाना फडनविसांच्या चरित्रावरून नानासाहेब पेशव्यांचे व नानांचे गुणावगुण कसे सारखे होते हें पुढील शब्दांत दाखविलें आहे. "या दोघांत नांवाप्रमाणें गुणावगुणांचें मात्र फार साम्य होतें, हें चाणाक्ष मनुष्याच्या लक्षांत आल्यावांचून रहात नसे. कपट, विषयासक्ति, अंशतः भित्रेपणा, तसेंच भारदस्तपणा, धोरण, दूरदर्शीपणा, इत्यादि गुणावगुण दोघांतही सारखे वसत होते. यामुळें उभयतांमधील सेव्यसेवकभाव नष्ट होऊन त्याचें पर्यवसान मित्रत्वाच्या संबंधांत झालें." (पान ९९ क १४).

सदाशिवरावभाऊबरोबर नाना पानिपतच्या प्रसिद्ध लढाईवर गेले होते. या लढाईचें वर्णन मागें आलेंच आहे. या लढाईत मराठ्यांची प्राणहानि पुष्कळ झाली. तथापि नाना स्वतः आपल्या सुदैवानें त्या संकटांतून निभावून परत पुण्यास आले. परंतु त्यांच्या मातोश्री मात्र या लढाईचे धादलींत बेपत्ता झाल्या, त्या अखेरपर्यंत पुण्यास आल्या नाहींत. नानांचा पेशवे घराण्याशीं आप्तपणा असल्यामुळें पेशव्यांच्या घरच्या बायकांशींही त्यांचा घरोबा होता. नानासाहेबांचें कुटुंब गोपिकाबाई यांचे सल्लामसलतगार नानाच होते. माधवराव गादीवर बसल्यावेळीं त्यांचे नांवें साताऱ्च्या छत्रपतीकडून वस्त्रें आणविण्याचे कामीं त्यांनीं आपला पक्ष निर्माण करून दादासाहेबांना कसा विरोध केला ही हकीकत मागें आलीच आहे. माधवरावाच्यावेळीं राघोबादादा व सखारामबापू कारभार करीत असतां, गोपिकाबाईंना नानांनीं चिथवून त्याना कारभारीपणाचा राजीनामा देण्यास लावलें व नवीन कारभारी-मंडळ निर्माण करविलें. माधवराव हे बहुधा गोपिकाबाईंच्या व नानांच्या सल्ल्यानेंच महत्वाची कोणतीही गोष्ट करीत असत. राक्षसभुवनच्या लढाईनंतर राघोबादादानीं माधवरावाच्या हातीं पेशवाईचीं अधिकारसूत्रें दिलीं तेव्हां त्यानीं दादासाहेबाचें कारभारी-मंडळ काढून टाकून आपलें कारभारी-मंडळ नेमिलें. त्यांत नानाचीच फडनविस ह्मणून त्यांनीं नेमणूक केली. त्यांना फडनविस नेमण्याचे कामीं दादासाहेबानीं मुळींच विरोध केला नाहीं. कारण फडनविशी ही नानांची वंशपरंपरेची बाब होती. दादासाहेबाचें ह्मणणें एवढेंच होतें कीं, त्यानीं तें काम दरसाल एक लक्ष रुपये घेऊन करावें, व फडनविशीच्या दरकाचें जें जास्त उत्पन्न येईल तें त्यांनीं सरकारांत जमा करावें. नानाच्या प्रत्यक्ष स्वार्थाच्या आड ही गोष्ट येत असल्यामुळें त्यांनीं ती मान्य केली नाहीं. माधवरावांनीं कोणतीही अट न घालतां पक्षांधतेनें नानांनाच फडनविस नेमिलें. याचा परिणाम किती घोर झाला, हें ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत दाखविलें आहे. "तेव्हां माधवरावांनीं आपल्या कळकळीच्या पक्षाकडे लक्ष देऊन दादासाहेबांच्या ह्मणण्याकडे लक्ष

न देतां, नाना व मोरोबा यांना फडनविशीचीं वस्त्रें इ. स. १७६३ च्या आक्टोबर महिन्यांत दिलीं. नानांच्या खासगी स्वार्थावर दादासाहेबांनीं हल्ला केल्यामुळें नानांनीं त्यांच्यावर पुढें कायमचा दावा धरला. नानांचा दावा काळ-सर्पाप्रमाणें होता. त्यांना कोणी दुखविलें कीं, ते त्याचा पूर्ण नाश करीत असत." ( पान ११३ क ३१ ).

नानांच्या हातीं पेशवाईचा राज्यकारभार येतांच, त्यांनीं तो विशिष्ट धोरणावर हांकण्यास सुरवात केली. त्या धोरणाचें सार काढून ग्रंथकारांनीं तें कलमवार पुढील शब्दांत मांडिलें आहे. "त्यांनीं राज्यकारभारांत आपलें अस्तित्व कायम ठेवण्याकरतां जीं धोरणें राखिलीं, त्यांत त्यांचीं खालील धोरणें मुख्य होतीं. १ पेशव्यांच्या घरांतील कलह अबाधित चालू ठेवणें. २ पेशव्यांच्या राज्यांतील लढाईच्या प्रसंगीं रक्षणक्षम अशीं महत्त्वाचीं स्थळें आपल्या स्वाधीन ठेवणें. ३ राघोबादादांचें वजन जेणेंकरून कमी होईल, असे इलाज करणें व त्यांचा पक्ष हलका होण्याकरतां त्यांच्या सरदारांत फूट पाडणें. ४ पेशव्यांच्या राज्यांतील मोठमोठ्या सरदारांत नेहमींच फूट राहील अशीं धोरणें संभाळणें. ५कोणतीही मसलत आपल्या मनाप्रमाणें पार पाडण्याकरतां पैशाची फार जरूरी असते; याकरतां हरप्रयत्नानें पैसा मिळवून त्याचा संचय करून ठेवणें. हीं धोरणें संभाळण्याकरतां न्यायान्यायाचा विचार केला नाहीं तरी त्यांना चालण्यासारखें होतें." ( पान १५५ क २३ ).

मागें दाखविल्याप्रमाणें पुरंदरगडाचें प्रकरण उपस्थित झाल्यावेळीं नानांनीं हींच धोरणें नजरेसमोर ठेऊन कारवाई केल्याचें दिसून येतें. ( पान १४५ ते १५० क १२ ते १८ ). नानांनीं आपला फडनविशीचा अधिकार गाजवून माधवराव स्वारीवर गेल्यावेळीं सौ. रमाबाईसाहेबांचा पाणउतारा केल्याचें दाखविलें आहे. ( पान १५९ क १ ) त्यांच्यासंबंधीं खर्चाची यादी घेऊन कारकून गेल्यावेळीं नानांनीं विड्याच्या पानाच्या कलमास कांट मारला, त्यावेळीं त्यांनीं "श्रीमंत घरीं परत येईपर्यंत बाईसाहेबांस विड्याच्या पानाचें प्रयोजन नाहीं. हा

खर्च गैरवाजवी आहे सबब बंद केला आहे" असें कारण सांगितलें. यावर योग्य चर्चा करून नानांनीं बुद्धिपूर्वक, क्षुद्र बुद्धीनें या कामीं आपल्या अधिकाराचें अतिक्रमण केलें असा निष्कर्ष ग्रंथकारांनीं काढला आहे. राजकारणांत व्यतीत झालेलें नानांचें सर्व आयुष्य निरनिराळ्या प्रकारचीं कारस्थानें करून, न्यायान्यायाचा विचार न करतां, तीं पार पाडण्यांत खर्चीं पडलें आहे. राघोबादादांच्याविरुद्ध नानांनीं स्वतंत्र पक्षाची उभारणी करून कोणकोणत्या कारवाया केल्या हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. तसेंच माधवराव, नारायणराव, सवाईमाधवराव व दुसरे बाजीराव यांच्या कारकीर्दींत नानांनीं कसकशीं कारस्थानें केलीं व कोणकोणत्या कारवाया केल्या व त्या कोणत्या हेतूनें केल्या हें प्रसंगोपात्त मागें वर्णन केल्याप्रमाणें ग्रंथकारांनीं विशदपणें दाखवून दिलें आहे.

आपल्या कारस्थानी व वाममार्गी राजकारणांत नानांनीं वेळोवेळीं पुढील महत्वाचीं कारस्थानें केल्याचें, ग्रंथकारांनीं त्यावर योग्य चर्चा करून व त्यासंबंधीं आपली सयुक्तिक अनुमानें देऊन, सविस्तर वर्णन केलें आहे.

१ नानांनीं शिंद्यांचा जवळचा भाऊबंद मानाजीराव फांकडे यांस शिंद्यांची सरदारी न देववितां ती राणोजी शिंद्याचा दासीपुत्र महादजी यांस राघोबादादांच्या पक्षाविरुद्ध कारस्थान करून देवविली. (पान १६१ क २).

२ दादासाहेबांनीं गोहदच्या किल्ल्याला वेढा दिला तेव्हां महादजी शिंदे जाटाला आंतून फितूर झाले. त्याला दादासाहेब मेखसूंखालीं मारण्याची शिक्षा करणार असें समजताच, माधवरावांकडून होळकर व विंचूरकर यांना चिठ्या पाठवून त्याला वाचविण्याचें नानांनीं कारस्थान केलें. (पान १६५ क ५).

३ मल्हेराव होळकराच्या मरणानंतर होळकराच्या गादीला अहिल्याबाईचे मांडीवर त्यांच्या भाऊबंदांपैकीं मुलगा दत्तक न देतां होळकराच्या घराण्याशीं संबंध नसलेल्या तुकोजीराव होळकराला, दादासाहेब व गंगोबातात्या यांच्या मताविरुद्ध, दत्तक करवून वारसदार करण्याचें कारस्थान. (पान १६८, १६९ क १० व ११).

४ तुकोजीराव होळकर यांना वस्त्रें देण्याच्या समारंभाकरतां राघोबादादा पुण्यास आल्यावेळीं त्यांना माधवरावांकडून कैद करण्याचें कारस्थान. ( पान १८४ क ८ ).

५ दादासाहेबांचा हैदरवर स्वारी करण्याचा विचार असतां, नानांनीं कारस्थान करून, नारायणरावांकडून त्यांना खो घातला व नारायणरावांकडून दादासाहेबांना कैद करविलें. ( पान २१८ ते २२८ क ९ ते १८ ).

६ मुधोजीचा मुलगा रघोजी याला जानोजीनें दत्तक घेण्याची परवानगी प्रथम माधवरावांनीं दिली असतांही, नंतर कारस्थान करून साबाजीची आज्ञा-विरुद्ध उठावणी केली व त्याला माधवरावांकडूनच सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें नानांनीं द्यावयास लावलीं, (पान २३४, २३५ क ४) व मुधोजी आणि साबाजी यांच्यामध्यें लढा लावून देऊन भोंसले घराण्याचें नुकसान केलें. ( पान २३४ क ४ ).

७ परभू प्रकरण:—ब्राह्मणांनीं परभूंच्या घरीं वेदोक्त पद्धतीनें कर्में कर-ण्याचें नाकारलें. ब्राह्मणाविरुद्ध परभूंनीं पेशवे सरकाराकडे तक्रार केली. परभू-मंडळी दादासाहेबांच्या पक्षाची आहेत अशी प्रसिद्धी होती. या वेळीं दादासाहेब अटकेंत असल्यामुळें संपूर्ण कारभार नानाकडेच होता. परभूंच्या तक्रारप्रकरणीं नानांनीं कारस्थान करून नारायणरावांकडून "परभू क्षत्रिय नाहींत व त्यांना वेदोक्ताचा अधिकार नाहीं," असा ठराव देवविला. एवढेंच नव्हे तर नानांनीं त्यांच्यापैकीं थोरल्यांना पकडून त्यांचा अतोनात छळ केला व त्यांना कैदेंत टाकून जबरदस्तीनें त्यांजकडून कबुलीची पादी लिहून घेतली. ( पान २३७ क ५ ).

८ एकदां नारायणरावांनीं बोथाटी खेळत असतां नानांचें पागोटें पाडलें. नारायणरावांनीं आपला अपमान केला असें मानून नानांनीं नारायणरावांस धर-ण्याचा कट केला. या कटांतच त्यांना जिवें मारण्याचा गुप्त कट केला. नानांच्या या कपटकारस्थानाचा उद्देश नारायणरावांना ठार करावें व दादासाहे-

बांनीं पेशवेपदावर येऊं नये असा होता. (पान २४७ क १६ व १७ पान २५८ क ७) पुढें सुमेरसिंगास दिलेल्या हुकुमांत 'ध' चा 'मा' करून नाना आपल्या कारस्थानास बळकटी आणतात. (पान ३२१ क २४).

९ नारायणराव मेल्यावर दहावे दिवशीं त्यांना तिळांजळी देण्याचेवेळीं नानांनीं सखारामबापूंना व इतर कांहीं सरदारांना आपल्या बाजूस वळवून राघोबा-दादांच्या व त्यांच्या वंशाच्याविरुद्ध कारस्थान केलें व पुढें दादासाहेबाविरुद्ध वागण्याबद्दल लिंगावर हात ठेऊन आणक्रिया केल्या. (पान ३१० क ८).

१० भोंसले-प्रकरणीं जरी निजामाचा व नानांचा मनसुबा एक होता तरी साबाजीला मदत करणाऱ्या निजामाविरुद्ध मोहीम काढण्यास राघोबादादांना लावण्याचा नानांनीं डाव करून कारस्थान आरंभिलें. नाना आंतून निजामाला दादासाहेबांविरुद्ध फितूर झाले व ते दादासाहेबाविरुद्ध गुप्तपणें कारवाई करूं लागले.

११ बारभाईंचें राघोबादादाविरुद्ध कारस्थान. बारभाईंचे अग्रणी नाना फडनविसच होते. मात्र सखारामबापूंना पुढें करून नाना आंतून बत्ती देत असत. हें बारभाईंचें कारस्थान या नावानें प्रसिद्ध आहे.

१२ नानाचे हस्तक पुरुषोत्तमदाजी पटवर्धन याच्यामार्फत गंगाबाईंचें मन दादासाहेब व आनंदीबाई यांच्याविषयीं दूषित करण्याचें कारस्थान. (पान ३३१ क ३० व पान ३३९ ते ३४२ क ३९ ते ४२).

१३ गंगाबाईंचें मन दादासाहेब व आनंदीबाई यांचे विरुद्ध दूषित व्हावें ह्मणून एकदां गंगाबाईवर आणि एकदां गंगाबाई व पार्वतीबाई याच्यावर मारेकरी घातले असें दाखविणारें कारस्थान. (पान ३४२, ३४३ क ४२).

१४ गंगाबाईंना मुलगाच झाला पाहिजे याबद्दलचें नानांचें कारस्थान.

१५ शिंदे, होळकर यांच्या बोलावण्यावरून नाना व सखारामबापू पुरंदराहून समेट करण्याबद्दल येत असल्याचें दाखवूनससैन्य मोहीम काढतात.

त्यांचे आपल्याला पकडण्याचें हें कारस्थान आहे असें समजून आल्यामुळें, राघोबादादा शिंद्यांच्या तावडींतून निसटून जातात. (पान ३८६ क १२ ).

१६ तोतया ह्मणून रत्नागिरीस ठेवलेले सदाशिवरावभाऊ पुण्याकडे सैन्यासह येत असतां, त्यांना राजमाची येथें, शिंदे तेथें ससैन्य जाऊन पोहोंचेपर्यंत तहासंबंधीं थापेबाजी करून थोपवून धरण्याचें नानांचें गुप्त कारस्थान. (पान ५७१ क ७८ ).

१७ तोतयाच्या चौकशीच्या वेळीं चौकशी कमिटीच्या सभासदांची निवड करण्यापासुन खऱ्या सदाशिवरावभाऊंना बाजूस ठेऊन त्यांचेबद्दल बाजी गोविंद नांवाच्या सोनारास पुढें करून, सदाशिवरावांना तोतया ठरवून घेईपर्यंतचें गुप्त कारस्थान. ( पान ५०४ ते ५०७ क ८२ ते ८७ व ५१८ ते ५२० क १०८ व १०९ ).

१८ राघोबादादांविरुद्ध जसें नानांनीं कारस्थान केलें, तसेंच आपण एकटेच सर्वाधिकारी होण्याच्या हेतूनें गंगाबाईंना वश करून बारभाईंतील इतर लोकांविषयीं नानांनीं कारस्थान केलें. (पान ५३२ ते ५३४ क ४ व ५).

१९ तहांतील अटीप्रमाणें मोरोबादादांचा कारभार सुरळीत चालू असतां त्यांना पदच्युत करून तुरुंगांत डांबून टाकण्याचें कृष्णकारस्थान. ( पान ५७६ ते ५८४ क २७ ते ३६ ).

२० सखारामबापूंविरुद्ध राजद्रोहाचा आरोप आणून त्यांना कैद करून डोंगरी किल्ला दाखवण्याचें कारस्थान. ( पान ६०४ क १८ ).

२१ प्रेतें जाळण्याच्या हुकुमानें पुरावा नष्ट करून घाशीरामास वांचविण्याचें कारस्थान. ( पान ६९८ क १३ ).

२२ युद्धाचे कामीं महादजी शिंद्यांनीं मदत मागितल्या वेळीं त्यांना उघड मदत करतों असें दाखवून, आंतून त्यांचे पाय ओढण्याचें नानांचें कारस्थान. ( पान ७२३ क ८७ ).

२३ नानांनीं महादजी शिंद्यांविरुद्ध कारस्थानें करून त्यांचा बळी घेतला. ( प्रकरण २७ वें ).

२४ बाजीरावांस पेशवेपद न देतां चिमाजीअप्पास दत्तक करून पेशवेपदावर बसविण्याचें कारस्थान. (पान ८५० ते ८६२ क २ ते १७).

२५ नानांनीं प्रसिद्ध महाडचें कारस्थान करून, चिमाजीअप्पाचें दत्त-विधान अशास्त्र ठरवून, त्यांना पदच्युत करून बाजीरावांस पेशवेपदावर बसविलें व आपल्या हातीं पेशवेराज्याचा कारभार घेतला. (पान ८९० क २४ ).

२६ नानांनीं दौलतराव शिंद्यांविरुद्ध, त्याना पुण्याहून घालवून देण्या-करतां कालियामर्दनाच्या स्थापनेच्या निमित्तानें केलेलें जादूटोण्याचें कारस्थान. ( पान ९५५ क १ ).

२७ शिंद्यांच्या दौलतींत असलेल्या शेणवी अधिकारी मंडळीविरुद्ध कारस्थान करून त्यांना शिंद्यांकडून कैद करविलें. (पान ९६३ क ७).

२८ तुकोजी होळकर मेल्यावर बाजीरावानें काशीरावाला होळकराची सरदारी दिली असतां, त्याच्याविरुद्ध कारस्थान करून नाना मल्हाररावाला काशीरावाविरुद्ध उठवितात. ( पान ९९७ क १ ).

२९ दुसरे बाजीरावांस पदच्युत करून अमृतरावांस पेशवेपदावर बस-विण्याचें व दौलतराव शिंद्यांची सरदारी काढून महादजी शिंद्यांच्या बायकोच्या मांडीवर दत्तक बसवून त्या दत्तकास ती सरदारी देण्याचें नानांचें कारस्थान.

३० बाळोबातात्यांची कैदेतुन सुटका होऊं नये म्हणून कारस्थान करून नानांनीं घाटग्यांना व त्यांच्या लोकांना कैद केलें. ( पान १०६५,६६ क ३० ).

३१ परशुरामभाऊंना गोत्यांत आणण्याकरतां नानांनीं केलेलें दुरंगी कारस्थान. ( पान १०८९ क ५ पान १०९७ क ११ ).

३२ परशुरामभाऊंची इतिश्री करण्याचें कारस्थान करून नानांनीं महाडच्या कारस्थानाची पुनरावृत्ति केली. ( पान १११० क १९ ).

३३ परशुरामभाऊंच्या मृत्युनंतर करवीरकरांनीं अत्यंत नीचपणाचें व क्रूरपणाचें वर्तन करून भाऊंच्या मृत्युस ते कारणीभूत झाले याबद्दलचा बनावट पुरावा अस्तित्वांत आणवून व पटवर्धन सरदारांना चिथावणी देऊन आणि मदत करून नानांनीं त्यांना करवीरांविरुद्ध उठविण्याचें कारस्थान केलें. (पान १२०२ व १२०४ क २४ व २६).

३४ इंग्रजांना मदत केल्याचें दाखवून नाना टिपूकडून लांच खाऊन त्याच्यांशीं कारस्थान करतात. (पान ११२१ क २८).

३५ इंग्रजांना फसविण्याकरतां शिंद्यांना पुण्याहून घालविण्याचे नानांनीं केलेलें नाटकी कारस्थान. (पान ११२९ क ३३).

३६ बाळोबातात्यांचा नाश करण्याकरतां बाजीरावांकडून शिंद्यांना भीड घालून व शिंद्यांकडून व त्यांच्या बायकोकडून अन्न-सत्याग्रह करवून बाळोबातात्यांचे संमतीनेंच घाटग्यांच्या मुक्ततेचें कारस्थान नानांनीं केलें. (पान १२०९ क ३०).

३७ शिंदेबायांवर मारेकरी घालण्याचें गुप्त कारस्थान करून तें घाटग्यांवर लादण्यांत आलें. (पान १२११ क ३२).

ग्रंथकारांनीं दिलेल्या नानांच्या कारस्थनापैकीं कांहीं कारस्थानें वर दिलीं आहेत. यावर ग्रंथकारांनीं जी उद्‌बोधक व सविस्तर चर्चा केली आहे ती वाचनीय आहे. याशिवाय नानांनीं कित्येक कारस्थानें केलीं. नानांचा आयुष्यक्रम कारस्थानांनीं इतका एकजीव झाला होता कीं, त्यांना तुरुंगांतही स्वस्थ बसवलें नाहीं. ते नगरच्या तुरुंगांत कैदेंत होते, तरी तशा स्थितींतही त्यांची कारस्थानें रंगाविण्याचें काम चालूच होतें. नाना दुसऱ्याच्या मागें दडूनच कोणतेंही कारस्थान करीत असत असें दिसतें. आपलीं कारस्थानें पार पाडण्यास नानांनीं गुप्त पोलीसखातें तयार केलें होतें. राघोबादादांना कैदेंत ठेविल्यावेळीं त्यांचा अत्यंत छळ करण्यांत येत होता. त्यांची माहिती मिळवावी म्हणून सखारामबापूंनीं कुणबिणीकडे दिलेली चिठ्ठी नानांच्या गुप्त हेरांनीं कशी

पकडली व त्यामुळें बापू कसे तोंडघशीं पडले व त्यांना पुढें क्षमस्व ह्मणण्याची कशी पाळी आली हें मागें दाखविलेंच आहे.

नानांनीं सर्व पेशव्यांना आपल्या लगामीं ठेऊनच पेशवाईचा कारभार केल्याचें दिसून येतें. कोणी त्यांच्या मर्जीविरुद्ध वर्तन केल्यास अगर त्यांचा उपमर्द केल्यास ते त्याचा सूड घेतल्याशिवाय रहात नसत आपल्या अपमानाचा सूड त्यांनीं नारायणरावांवर कसा उगविला हें वर दाखविलेंच आहे. या बाबतींत त्यांचा स्वभावधर्म नागसर्पाप्रमाणें होता, हें ग्रंथकाराचें विधान सयुक्तिक दिसतें. (पान २४० क ८।९). पेशव्याच्या दरबारीं सखारामबापूसारखे मुरब्बी मुत्सद्दी होते. परंतु त्याचें व नानांचें क्वचितच पटत असे. त्याचे दोघाचे राजकारण साधण्याचे मार्ग कसे भिन्न होते हें मागें दाखविलेंच आहे. सखारामबापू हे प्रथम राघोबादादांच्या पक्षाचे असल्यामुळें, राघोबादादाबरोबर त्यानाही नानांनीं कैदेंत ठेविलें होतें. दादासाहेबाना व बापूंना कैदेंत ठेविल्यामुळेंच नानांचें तेज पडूं लागल्याचें व त्यांचा पक्ष बळावल्याचें दिसून येतें. नाना आपलें व आपल्या पक्षाचें बळ नेहमीं राघोबादादाच्या पक्षाचा नाश करण्याकडेच खर्ची घालीत असल्यामुळें त्यांच्या कृत्यास सखारामबापूंची सहानुभूति नसे.

माधवराव जरी नानांच्या सल्ल्यानें वागत तरी अनुभवानें अंतर्यामी त्यांना नानाच्या खऱ्या स्वरूपाची व योग्यतेची ओळख पटली असली पाहिजे असें दिसतें. कारण, आपल्या अखेरच्या वेळच्या निरवानिरव करण्याच्या प्रसंगीं त्यांनीं नानाकडे राज्याचा सर्व कारभार सोंपविला नाहीं. त्यानीं दादासाहेबांनाच राज्याचे कुलमुखत्यार नेमिलें. जरी नानांनीं माधवरावांच्या तीनही इच्छित गोष्टी करण्याचें छातीठोकपणें कबूल केलें होतें, तरी माधवरावांनीं स्वतःला कर्जातून मुक्त करण्याची एकच बाब नानाकडे सोंपविली. बाकी दोन इच्छा पुऱ्या करण्याची कामगिरी त्यांनीं दादासाहेबांवरच सोंपविली. नानांनीं माधवरावाला कर्जमुक्त करण्याची युक्ति योजिली तीही पहाण्यासारखी आहे. त्यांनीं पेशव्यांचे आप्त व सावकार रामचंद्र नाईक परांजपे यांजकडून दुसऱ्या सावकारांस खतें लिहवून दिलीं व

त्या सावकारांचीं खतें आणून श्रीमंतांकडे दिलीं. नानांनीं या कामीं आपल्या पदराला यत्किंचितही खार लागूं दिला नाहीं. ग्रंथकारांनीं म्हटल्याप्रमाणें परस्पर हकवायाच्या घरावर ब्रह्मार्पण करून नाना मोकळे झाले.

नाना हे नारायणरावांच्या धरण्याच्या व मारण्याच्याही कटाचे सूत्रधार होते, असें दाखविण्यांत आलें आहे. ( पान २६२ क ११ ). नारायणरावांच्या मृत्युनंतर जीं पत्रें (पत्र नं. १ व २) वामनराव पटवर्धनांना लिहिलीं गेलीं आहेत, तीं नानांच्या माहितीप्रमाणेंच लिहिलीं गेलीं आहेत हें दाखवून देऊन ग्रंथकारांनीं या प्रसंगीं नानांची वागणूक कशी होती व त्यांची माहिती कशी निराधार होती, याचें पुढील शब्दांत वर्णन केलें आहे: "नाना फडनविस हे वाड्यांत नारायणराव मेल्याच्या दुसरे दिवशीं गेले. त्यांनीं नारायणरावांचें प्रेत पाहिलें नाहीं किंवा ते दहनालाही ओंकारेश्वरावर गेले नाहींत. ते वाड्यांत गंगाबाई, आनंदीबाई, पार्वतीबाई अगर सगुणाबाई यांनाही जाऊन भेटले नाहींत. त्यांनीं जी माहिती पटवर्धन यांना कळविली ती सांगासांगीची होती." (पान २८९ क २०). तिसरें पत्र अत्यंत महत्वाचें असून तें तिऱ्हाईत मनुष्यानें नारायणरावांच्या मृत्युनंतर तिसऱ्या दिवशींच लिहिलें असल्यामुळें पूर्णपणें विश्वसनीय आहे व त्यावरून या मृत्यूशीं नानांचा संबंध कसा दिसून येतो हें स्पष्ट करण्यांत आलें आहे. ( पान २९० ते २९२ क २१ व २२ ).

पुढें बारभाई स्थापन करण्यांत आली. त्यांतदेखील नाना हे अग्रगण्य होते, असें दिसून येतें. राज्याचा कारभार कोणाच्या नांवानें चालवावा हा प्रश्न बारभाईपुढें उपस्थित झाला तेव्हां तीन नांवें त्यांच्यापुढें आलीं. सातारचे महाराज ( छत्रपती ), नगरच्या किल्ल्यावरील कैदी सदोबा ( सदाशिवरावभाऊ ) व सवाईमाधवरावांच्या मातोश्री गंगाबाई. या तीन नांवाबद्दल विचार करून गंगाबाईचेच नावें राज्यकारभार चालविण्याचें निश्चित ठरलें. बारभाईकडून नगरच्या किल्ल्यावरील सदोबाचें नांव जरी मान्य करण्यांत आलें नाहीं, तरी या सूचनेंतच सदाशिवरावभाऊसंबंधीं सत्य कसें बाहेर पडतें, हें ग्रंथकारांनीं पुढील शब्दांत दाखविलें

आहे. "परंतु या गोष्टीचा पुढें जरी बारभाईनीं पुरस्कार केला नाहीं, तरी यांतून एक गोष्ट मात्र सत्य ती बाहेर येते. ती ह्मणजे नगरच्या किल्ल्यावरील सदोबास पेशव्यांच्या गादीवर बसवावें ही होय. खरें पाहिलें तर ते खरे सदाशिवरावभाऊ नसते, व तो जर कनोजा ब्राह्मण असता तर त्याला गादीवर बसविण्याचा प्रश्नच उपस्थित झाला नसता. ते खरे सदाशिवरावभाऊ होते ह्मणूनच ह्या प्रश्नाची चर्चा झाली." ( पान ४९६ क ७१ ).

या बारभाईनीं राज्यकारभार चालविला तो राज्याच्या हिताचा नसून त्यांत पेशव्यांचें राज्य गिळंकृत करण्याचाच हेतू असल्याचें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ३४५ क ४३ ). तसेंच बारभाईचा कारभार कसा बेबंदशाहीचा होता हेंही दाखविण्यांत आलें आहे. ( पान ४२१ क १७ ). बारभाईचें कोणतेंही कारस्थान सखारामबापूंच्या नांवाखालीं नानाच साधीत असत असें दिसतें. ( पान ३४७ क ४६ ). वारंवार समेटाच्या सूचना पुढें आल्या असतांही, राघोबादादांशीं समेट न करतां त्यांच्या हक्काकडे अगर योग्य मागणी-कडे लक्ष न देतां, त्यांचा छळ करून बारभाईनीं पेशव्यांच्या राज्याचें हित न साधतां नाशच केला असें दिसून येतें. सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्यांत खुद्द नाना व इतर मुत्सद्दी यांचा स्वार्थ कसा होता हें विशद करण्यांत आलें आहे. ( पान ४८९ क ६५ ). तोतयाची चौकशी करण्याकरतां कमिटी नेम-ण्यांत व चौकशीची 'तो इसम तोतया होय' अशी कड काढून घेण्यात नानानीं ज्या विविध कारवाया केल्या त्याचें वर्णन 'तोतयाचें बंड' या प्रक-रणांत सादर करण्यांत आलें आहे. चौकशी-कमिटीचा 'तोतया' असा ठराव झाल्यावर रामशास्त्र्याकडून व नानांकडून प्रायश्चित्ताचीं पत्रकें काढून सर्वत्र पाठविण्यांत आलीं. तीं मोघम व जुलमी स्वरूपाचीं असल्यामुळें कसकसे अनर्थ घडून आले याची कल्पना चांगलीच करून देण्यांत आली आहे. ( पान ५१४ क १०० ).

सदाशिवरावभाऊंना बाजूस ठेऊन त्यांच्या जागीं बाजी गोविंद सोनाराचा तोतया उभा करून नानांनीं कोणकोणत्या गोष्टी साधल्या याचें कलमवार वर्णन करण्यांत आलें आहे. ( पान ९२० ते ९२८ क ११० ते १२१ ). या सर्व हकीकतीवरून नानांच्या कपटपटू कारस्थानी-स्वभावावर चांगलाच प्रकाश पाडण्यांत आला आहे. नानांच्या दानतीविषयीं लोकांमध्यें मुळींच आदर अगर विश्वास नव्हता असें दिसून येतें. राज्यकारभाराकरतां कर्ज काढण्याचा प्रसंग आल्यावेळीं सावकार लोकांनीं सखारामबापूंनीं आपल्या नावें खतें लिहून दिल्यास कर्ज देण्याचें कबूल केलें होतें ही हकीकत मागें आलीच आहे. यावरून सावकारांचा नानांवर विश्वास नव्हता असेंच दिसून येतें.

नानांचा खून करण्याचा कट दामोदर मंडळींनीं ( सावकार लोकांनीं ) केल्याचें मागें आलेंच आहे. नानानीं या कटासंबंधीं चौकशी कधींही केली नाहीं व हें प्रकरण दाबून टाकलें ही गोष्ट नजरेआड करता येत नाहीं. हा कट कां केला गेला या गोष्टीची सविस्तर चर्चा करून नानाचें अनैतिक आचरण व याला कारण असावें असें आपलें अनुमान ग्रंथकारांनीं पुढील शब्दात दिलें आहे. "पेशव्यांच्या राज्याची धनीण, मराठ्याच्या राज्याची माता जी गंगाबाई, तिच्याबरोबर नानानीं व्यभिचार करणें हें ब्रह्महत्येच्या पातकापेक्षां सहस्रपटीनें अधिक आहे, असें भावनाप्रधान प्रजेला वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. ह्मणूनच नानांचा खून करण्याचा प्रयत्न 'दामोदर' मंडळींनीं केला असें ठाम अनुमान निघतें." ( पान ९२९ क ९ ). हा कट झाल्यावर अदमासें एक महिन्यानंतर गंगाबाई मरण पावल्या. त्याच्या मृत्युचें कारण काय असावें याबद्दल ऐतिहासिक कागदपत्रांवरून सविस्तर चर्चा करण्यात आली आहे. गंगाबाई नवज्वरानें मेल्या हें ह्मणणें खोटें असून ती गोष्ट मागाहून उठविलेली आहे. कांहीं इतिहासकारानीं ह्मटल्याप्रमाणें गंगाबाईचा मृत्यु विष घेऊन आत्महत्या केल्यामुळेंच झाला असावा असें ग्रंथकारांनीं अनुमान काढलें आहे. यासंबंधीं इंग्रजी इतिहासकार पोप, डफ, म्याकडोनल्ड यांचीं मतेंही

संक्षेपानें देण्यांत आलीं आहेत. या प्रसंगीं झालेली नानांची वागणूकही लक्षांत घेण्याजोगी आहे, गंगाबाई पुरंदरगडावर निवर्तल्यानंतर चार दिवसांनीं नाना पुण्याहून तिकडे गेले. त्यांना गंगाबाईच्या मृत्युची बातमी लागली नव्हती असें ह्मणतां येत नाहीं. एकांतांत नवराबायकोचें बोलणेंदेखील ज्या नानांपासून चोरून राहात नसे, त्या नानांना ही बातमी लागली नाहीं हें ह्मणणें निव्वळ अशक्य कोटींत पडतें. नाना सदाचारी होते हें खरे शास्त्र्यांचें मत फोल आहे असें ग्रंथकारानीं सयुक्तिकपणें दाखविलें आहे. (पान ९४९ क १९).

गंगाबाई, पार्वतीबाई, गोपिकाबाई, व आनंदीबाई या पेशवे घराण्यांतील बायकांची नानानीं कसकशी वाट लावली हें ग्रंथकारानीं दाखवून नानाच्या खऱ्या स्वरूपाचें आविष्करण केलें आहे. (पान ९४६ क १६ व पान ९५१ क २०). नानांच्या स्वभावाची सर्पाच्या स्वभावाशीं तुलना केल्याचें मागें दाखविलेंच आहे. सर्पाचा स्वभाव दंश करण्याचा असतो. त्याप्रमाणें नानांनीं कुटिल कारस्थानरूपी दंश करून तीन बळी घेतल्याचें ग्रंथकारानीं वर्णन केलें आहे. हे तीन बळी ह्मणजे महादजी शिंदे, सखारामबापू व परशुरामभाऊ हे होत.

नानांनीं सखारामबापूविरुद्ध आपल्या पक्षाची उभारणी केली. सखारामबापूंचा व नानांचा स्वभाव कसा भिन्न भिन्न स्वरूपाचा होता याचें वर्णन मागें आलेंच आहे. (पान ९९९ क १). आपापल्या स्वभावानुसार त्यांचीं कारस्थानेंही भिन्न भिन्न स्वरूपाचीं असत. नानांनीं आपल्या पक्षात शिंद्याना ओढून त्यांजकडून प्रमाणपत्र घेतल्याची हकीकत मागें आलीच आहे. सखारामबापूंनीं मोरोबादादाला हातीं धरून आपलें कारस्थान उभारण्यास आरंभ केला. मोरोबांनीं सैन्य गोळा केलें. त्याच्याविरुद्ध नानानींही सैन्य जमवून त्यांच्याशीं टक्कर देण्याचा संकल्प केला. मोरोबादादानीं पुणें शहरचा कबजा घेताच नाना पुरंदरास पळून गेले. पुढें सखारामबापूमार्फत नाना व मोरोबादादा यांच्यामध्यें तह झाला. तहाच्या अटीस अनुसरून मोरोबादादांचा राज्यकारभार सुरळीत चालू झाला. तो पेशव्यांच्या राज्याच्या हिताच्या दृष्टीनेंच चालविण्यांत आला

होता. 'भीकबी मंगना और जरबबी रखना' असे मोरोबादादांशीं वागून आपला निभाव लागणार नाहीं अशी खात्री पटल्यामुळें नानांनीं आपण मोरोबांशीं अत्यंत लीनतेनें व आर्जवानें वागत असल्याचें भासविलें. मोरोबा इंग्रजांना पुण्यास बोलावतील अशी भीति नानांना वाटत होती. पावसाळा संपेपर्यंत तरी इंग्रजांना आणण्यांत येऊं नये, ह्मणून नानांनीं हे लीनतेचें ढोंग करून मोरोबादादांची शुद्ध फसवणूक केली, असें दाखवून देण्यांत आलें आहे. (पान ९७६ व ९७७ क २८). मोरोबादादांशीं केलेला तह पाळण्याचें नानांच्या मनांत नव्हतें. त्यांच्या मनांत मोरोबांना पदच्युत करून पुनः कारभारीपणा मिळवावा असें होतें. या कामीं नानांनीं शिंद्यांची मदत मिळविली. मोरोबादादांच्या मनांत इंग्रजांना बोलावून नानांचा पक्का बंदोबस्त करावा असें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं इंग्रजांना बोलावलेंही. परंतु सखारामबापूंनीं सहीशिक्यानिशीं लेख देऊन निमंत्रण केल्याखेरीज, आपण येत नाहीं असें इंग्रजानीं कळविलें. सखारामबापूंनीं इंग्रजांना बोलावण्याचें नाकारलें. नंतर नाना व बापू यांचा सलोखा होऊन नानांनीं शिंद्यांकडून मोरोबादादास कसें कैद करविलें व नगरच्या किल्ल्यावर त्यांना ठेवलें हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. होळकरांनीं व सखारामबापूंनीं सांगितलें असतांही व खुद्द मोरोबादादांनींही अतिशय विनवण्या केल्या असताही नानांनीं मोरोबांशीं समेट केला नाहीं. (पान ९८४ ते ९८६ क ३६ ते ३८). नानांनीं मोरोबादादांवर व त्यांच्या लोकांवर द्वेषबुद्धीनें सूड उगवून उपकाराची फेड अपकारानीं करण्याचा आपला स्वभाव सर्व जगास दाखविला. मोरोबादादांच्या व नानांच्या स्वभावाचें तुलनात्मक दृष्टीनें ग्रंथकारांनीं यथोचित वर्णन केलें आहे. (पान ५८७ क ३९ ).

पुढें सखारामबापूंची गरज संपल्यामुळें 'गरज सरो वैद्य मरो' या न्यायानें नानांनीं राजद्रोहाचें कारस्थान उभारून त्यांत त्यांना कसें गोंवलें आणिलें व शिंद्यांकडून त्यांना कैद करवून त्यांच्याही सर्वस्वाचा कसा नाश केला व त्यांच्या लोकांचाही अतोनात छळ कसा केला, ही सर्व हकीकत मागें आलीच आहे. याप्रमाणें सखारामबापूंचा बळी घेण्यांत आला.

पुढें नानांनीं इंग्रजांशीं साळबाईचा तह करून मराठी राज्याची चिरफाड करून राज्याचें कसें अत्यंत नुकसान केलें हें दाखविण्यांत आलें आहे. ( पान ६६७ क ७ ). या चिरफाडीच्या घटनेला नानाच जबाबदार असल्याबद्दल ग्रंथकारांनीं पुढील उद्गार काढले आहेत. "नानांच्या मनांत राघोबादादा यांच्याविषयीं द्वेष कां होता याचें एकच कारण होतें. तें ह्मणजे दादासाहेब नानांचे कायमचे बंदिवान झाल्याशिवाय पेशवाईवरील निष्कंटक सत्ता नानांना उपभोगतां येत नव्हती हें होय. या एकाच महत्वाकांक्षेमुळें नानांनी साळबाईचा तह करून पेशवाईला कायमचा क्षयरोग जडवून घेतला. या तहामुळेंच इंग्रजाचें हिंदुस्थानांतील आसन स्थिरावलें व पेशव्यांच्या राज्याची चिरफाड झाली. या चिरफाडीबद्दल नाना एकटेच जबाबदार आहेत." ( पान ६६८ क ७ ).

राघोबादादांची वाट लावल्यावर त्यांच्या पक्षांतील सरदारांवर व लोकांवर नानांनीं कसें हत्यार उपसलें व त्यांचा कसा छळ केला ही हकीकत मागें आलीच आहे. दादासाहेबांच्या पक्षाच्या सरदारांत सखाराम हरि या नांवाचा कायस्थ प्रभू ज्ञातीचा अत्यंत शूर सरदार होता. त्याच्या पराक्रमाचें व कर्तबगारीचें यथोचित वर्णन करण्यांत आलें आहे. त्याचें शौर्य व धैर्य शिवाजी महाराजांच्या तोडीचें होतें असें दाखविलें आहे. (पान ६४१, ६४२ क ३). त्यांच्याविषयीं नानांच्या मनांत तेढ होती. त्यामुळें नानांनीं त्यांना व त्यांच्या मुलांना व पुतण्यांना कैद केलें. सखाराम हरीस किल्ल्यावर कैदेंत ठेऊन त्यांचा अत्यंत छळ केला. सखाराम हरीच्या बायकोनें बारा हजार रुपये देण्याचें कबूल करून त्यांना भेटण्याची परवानगी नानांकडून मिळविली. परंतु तिची व सखाराम हरीची भेट होण्याच्या आंतच सखाराम हरी कालवश झाले. त्यामुळें तिला आपल्या नवऱ्याला भेटण्याचें भाग्य लाभलें तर नाहींच, परंतु तिच्यामागें बारा हजार रुपये दंडाचा लकडा मात्र लागला ! ही हकीकत शिंद्यांना समजतांच त्यांनीं नानांना पत्र लिहून हा दंड माफ करविला. शिंद्यांनीं नानांना लिहिलेलें पत्र उद्धृत करण्यांत आलें आहे. ( पान ६९१ क ९ ). त्यांतील हकीकत

वाचून कोणाही सहृदय मनुष्याचें अंतःकरण पिळवटून निघाल्याशिवाय राहणार नाहीं. नानांच्या या कृतीवरून नानांना अंतःकरण होतें किंवा कसें व असल्यास तें कोणत्या स्वरूपाचें असावें, याचें संशोधन करण्याचें वाचकांना कुतूहल उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. ग्रंथकारानीं या संशोधनाच्या कामीं 'ते अत्यंत क्रूर होते' असा आपला निकाल जाहीर करून मदतच केली आहे असें वाचकांस वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

अहिल्याबाई होळकर यांच्यावर दत्तक घेऊन गादी चालविण्याचा प्रसंग ओढवला तेव्हां त्यांचे दिवाण गंगोबातात्या यानीं व राघोबादादांनीं होळकरांच्या घराण्यांतीलच एखादा मुलगा दत्तक घेऊन गादी चालविण्याचा त्याना सल्ला दिला. पण या सल्ल्याविरुद्ध नानांनीं व शिंद्यानीं होळकरांच्या घराण्याशीं संबंध नसलेल्या तुकोजीरावास दत्तक घेण्याचा अहिल्याबाईंना सल्ला दिला. त्या बद-सल्ल्यास बळी पडून अहिल्याबाईंनीं तुकोजीरावास दत्तक घेतल्यामुळें त्यांची पुढें कशी केविलवाणी स्थिति झाली व त्यांना पुढें या आपल्या कृत्याबद्दल कसा पश्चात्ताप झाला हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ६५६ क १४). ग्रंथ-कारानीं या प्रसंगाची माहिती देताना अहिल्याबाई होळकर यांच्या चारित्राचें व त्या माऊलीच्या ठिकाणीं असलेल्या सद्गुणाचें थोडक्यांत वर्णन केलें आहे. (पान ६५६, ६५७ क १४).

टिपूवर स्वारी करण्याच्या उद्देशानें नानांनीं निजामाची भेट घेऊन कांहीं अटीवर त्याची मदत घेण्याचें ठरविलें. या अटी पेशव्यांच्या राज्याच्या हिताला कशा विघातक होत्या याची चर्चा करण्यांत आली आहे. (पान ६६९ क ८) नानांचे घरसोडीचें वर्तन पाहून टिपूनें नरगुंदवर स्वारी केली. त्याच्या प्रति-काराकरतां नानांनीं सैन्य देऊन परशुरामभाऊ वगैरे सरदारांना पाठविलें. परंतु त्या स्वारीचा अखेर निकाल होण्यापूर्वींच नानांनीं परशुरामभाऊंच्या सल्ल्याविरुद्ध टिपूशीं तह केला. त्यामुळें नरगुंद संस्थानावर 'दे माय धरणी ठाय' असा भयंकर प्रसंग कसा ओढवला याचें वर्णन मागें आलेंच आहे यावरून नानांच्या

शहाणपणाची घमेंडच नरगुंदकरांना भोंवली असें स्पष्ट दिसून येतें. पुढें पुन टिपूवर स्वारी करण्यास परशुरामभाऊ वगैरे पटवर्धन सरदारांना नानांनीं पाठ विलें होतें. ही मोहीम चालू असतां पटवर्धनांच्या फौजेंतील कांहीं लमाण पेंढार लोकांनीं शृंगेरी येथील श्रीआद्य शंकराचार्य यांचा मठ लुटून अतिश नुकसान केलें व अत्यंत अनाचार करून स्वामींना उठवून लाविलें. या अत्या-चाराबद्दल गुन्हेगारांची चौकशी सुद्धां पटवर्धन सरदारांनीं केली नाहीं, यामुळें त्या स्वामींनी पुण्यास येऊन त्याबद्दल पेशवे-दरबारीं फिर्याद गुदरली. परंतु नानाकडून स्वामींना दाद मुळींच मिळाली नाहीं. ही नानांची न्यायनिष्ठा व धर्मनिष्ठा यासंबंधी सर्व हकीकत देऊन पेशव्यांच्या दरबारीं नानांकडून न्यायाची व धर्माची कशी विटंबना करण्यांत येत असे हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ६७९ क २३).

इंग्रजांचा पाडाव करण्याच्या हेतूनें नानांनीं टिपूशीं मैत्री जोडून त्याच्याशीं मसलत केली होती. पुढें पेशवे, निजाम व इंग्रज एक होऊन त्यांनीं सन १७९२ चे फेब्रुवारींत टिपूवर स्वारी केली. या तिघांपुढें आपला निभाव लाग-णार नाहीं असें पाहून टिपूनें तह केला. त्या तहांत या तिघांनीं त्याचें अर्धें राज्य बळकावलें. शिवाय एक कोट पासष्ट लक्ष रुपये लढाईच्या खर्चाकरतां ह्मणून घेतले ते वेगळेच. या मोहिमेसंबंधींच्या नानाच्या कारवाईबद्दल ग्रंथकारांनीं पुढील सार्थ उद्गार काढले आहेत. "नानांनीं साल्बाईच्या तहाच्या अगोदर इंग्रजांना हिंदुस्थानाबाहेर घालविण्याविषयींच्या केलेल्या मसलतींतील आपला एक दोस्त अशा प्रकारें जमीनदोस्त करून इंग्रजांचें राज्य वाढविण्यास हातभार लावला. हें मित्रनाशाचें दिव्य कृत्य करून नानांनीं फारच मोठें पुण्य आपल्या पदरीं बांधून घेतलें असें कोणताही त्रयस्थ इतिहासवाचक ह्मटल्यावांचून राहा-णार नाहीं." (पान ६८८ क ३७).

पेशवाईंत घाशीराम कोतवाल हा पोलीसखात्याचा मुख्याधिकारी होता. यासंबंधीं हकीकत मागें आलेली आहे. त्याच्यावर नानांची मेहेरबानी होती.

तो अगदीं नानांच्या नाकांतील बाल होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. घाशी-रामाचें वर्तन अत्यंत जुलमी असे. तरी त्याबद्दल दरबारीं दाद लागत नसे. नानांना हा जुलूम समजत नव्हता असें थोडेंच. तथापि घाशीरामाच्या जुलमी कृत्याकडे डोळेझांक करून नाना त्यास बक्षिसें देत असत. त्याच्या मुलाच्या लग्नाचे वेळीं नानांनीं त्याला ३४०० रुपये बक्षिस दिल्याचें दाखविलें आहे. (पान ६९६ क ९). घाशीरामाला ललितागौरी नांवाची एक सुस्वरूप मुलगी होती. ती नानांची रखाऊ होती असें इतिहासांत नमूद असल्याचें दाखविलें आहे. (पान ६९४, ६९५ क ९). यामुळें घाशीरामानें मागें दाखविल्याप्रमाणें ब्राह्मणांना कोंडून घालून त्यांचे मुडदे पाडले, तरीही त्याला वाचविण्याची नाना कां खटपट करीत होते याचा खुलासा होतो. या संबंधीं नानांनीं आपल्याकडून पराकाष्ठेची खटपट कशी केली होती हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. नानांचा नैतिक अधःपात सर्वतोपरी किती झालेला होता हें यावरून सहज दिसून येतें. ग्रंथकारांनीं या कामीं नानांनीं केलेल्या वर्तनावरून पुढील निष्कर्ष काढला आहे. "घाशीराम प्रकरणीं नानांच्या एकंदर वर्तनाचा जर विचार केला, तर नानांना धर्माधर्माची किंवा पापपुण्याची अगर नीतिअनीतीची चाड होती असें मुळींच ह्मणतां येत नाहीं." (पान ७१० क २६). हा निष्कर्ष योग्य व सयुक्तिक नाहीं असें कोण ह्मणूं शकेल? घाशीरामासारख्या जुलमी मनुष्याला उत्तेजन देऊन व इतर शक्य त्या वाम मार्गांनीं पैसे उकळण्याची नानांची खोड होती ह्मणूनच ते नवकोट नारायण बनले होते असें दाखविण्यांत आलें आहे. (पान ७१२ क २७). शेवटीं, 'पेशवाई बुडण्याला जीं कारणें घडलीं त्यांत घाशीराम कोतवालाच्या प्रकरणाचा खात्रीनें समावेश होतो' (पान ७१२ क २७) असें ग्रंथकारांचें ह्मणणें आहे तें कोणासही पटण्या-सारखेंच आहे.

नानांनीं ज्याच्या ज्याच्याशीं मैत्री केली, त्या त्या इसमांना त्यांनीं संकट-कालीं मदत केल्याचें दिसून येत नाहीं. ज्याच्याकडून आपला स्वार्थ साधत

नाहीं, मग तो मित्र असो वा नसो, त्याला मदत करणें हें त्यांच्या ठराविक तत्वांत बसण्यासारखें नव्हतें. महादजी शिंदे हे प्रथमपासून नानांचे जानी दोस्त ह्मणून प्रसिद्ध होते. इ. स. १७८७ सालीं हिंदुस्थानांत लालसोट येथें लढाई सुरू झाल्यावेळीं महादजी शिंदे संकटांत सांपडल्यामुळें त्यांनीं नानाकडे निकडीचीं पत्रें पाठवून मदत मागितली असतांही नानांनीं मदत केल्याचा बहाणा करून महादजीच्या तोंडाला कशी पानें पुसलीं ही हकीकत मागें आलीच आहे. यावरून 'तन्मित्रमापदि सुखे च समक्रियं यत्' या तत्वाप्रमाणें नाना मित्रत्वाचें नातें जोडण्यास पात्र नव्हते असेंच दिसून येतें. (पान ७२० क ८ ते १०). नानांनीं शिंद्यांना मदत केली नाहीं, एवढेंच नव्हे तर, नानांनीं शिंद्यांना दुष्मनाप्रमाणें समजून त्यांचेविरुद्ध सामना देण्यास फौजेची तयारीही करून ठेविली होती. यानंतर शिंदे पुण्यास आल्यावर त्यांच्यामध्यें व नानामध्यें कसकसे प्रसंग ओढवले याचें वर्णन मागें देण्यांत आलें आहे.

सचीवांचे कारभारी बाजीराव मोरेश्वर हे नानांचे हस्तकच होते. ह्यांनीं खुद्द शंकरराव सचीवांविरुद्ध कशा नीचपणाच्या कारवाया केल्या त्या मागें दाखविण्यांत आल्या आहेत. हा मनुष्य नीचपणांत व दुष्कर्में करण्यांत घाशीरामाच्या तोडीचाच होता. नानांच्या पदरीं शंकर जोशी हा एक तेलंगी शास्त्री होता. घाशीरामाच्या चौकशी-प्रसंगीं त्याचीही संभावना त्याचें पागोटें वगैरे फाडून लोकांनीं कशी केली हें मागें दाखविलेंच आहे. अशा तऱ्हेच्या बदमाष लोकांशीं नाना प्रेमाचा संबंध ठेवीत असल्यामुळें लोकांचा नानांच्या चारित्र्यावर विश्वास बसणें शक्य नव्हतें. ग्रंथकारांनीं नानाच्या बगलबच्चांविषयीं व खुद्द नानांविषयीं पुढील सार्थ उद्गार काढले आहेत. "नानाच्या बगलबच्चाना यवनाप्रमाणें देवांच्या मूर्ति फोडण्याचें पाप वाटत नव्हतें, ब्रह्महत्येची पर्वा नव्हती, स्त्रियांच्या शीलाची कदर नव्हती, विषप्रयोगानें खून करण्याची त्यांच्या मनाला खंत नव्हती. अशा आचाराचे व विचाराचे नानाचे विश्वासू हस्तक

होते. यावरून त्यांचे नेते नाना हे कसे होते, याचें चित्र रेखाटण्याची जरूरी नाहीं." ( पान ७५० क १८ ).

पुढें थोड्याच दिवसांत महादजी शिंदे वानवडी येथें मरण पावले. त्यांच्या मरणाच्या कारणासंबंधीं चर्चा मागें आलीच आहे. त्यांत नानांनीं दर्शविल्याप्रमाणें त्यांना नवज्वर होण्याचा संभव नव्हता हें वैद्यशास्त्रदृष्ट्या सिद्ध करण्यांत आलें आहे. तसेंच त्यांच्यावर नानांनीं मारेकरी घातले होते याबद्दलही विश्वासार्ह पुरावा नाहीं. फ्रेझर वगैरे इंग्रज इतिहासकार शिंद्यांना नानांनीं विषप्रयोग करून ठार केलें असें ह्मणतात. एवंच, नानांच्या कारस्थानालाच हा मोहरा बळी पडला असें दिसून येतें. नानांचा हा दोन नंबरचा बळी होय. नानांच्या व महादजीच्या स्वभावांत कोणता फरक होता हें दाखवून देण्यांत आलें आहे. ( पान ७८७ क ३।४ ).

यानंतर झालेल्या खर्ड्याच्या लढाईचे खरे सूत्रधार नानाच कसे होते हें मागें दाखविलेंच आहे. या लढाईत पेशव्यांना विजय मिळाला ही गोष्ट खरी. परंतु त्यामुळें खुद्द पेशव्यांचें समाधान न होतां नानांचें मात्र समाधान कां झालें याची योग्य मीमांसा करण्यांत आली आहे. ( पान ८१४ क २० ). ग्रंथकारांनीं या लढाईतील नानांच्या विजयाचें रहस्य पुढील शब्दांत दाखविलें आहे. "इतके दिवस नानांनीं कारभार केला त्यांत त्यांनीं जुन्या सर्व सरदारांत, मुत्सद्यांत व इतर स्वतंत्र राज्यकर्त्यांत निरनिराळ्या प्रकारांनीं फूट पाडली. ही फूट पाडण्याची कामगिरी खर्ड्याच्या लढाईमुळें संपली ह्मणून नानांस परमानंद झाला. खर्ड्याच्या लढाईतील नानांच्या विशेष विजयाचें रहस्य हेंच आहे." ( पान ८२७ क २२ ).

"सवाई माधवरावांच्या प्रतापसूर्यास नानांचें खग्रासग्रहण" या प्रकरणांत क. ७ ते २१ पर्यंत नानांच्या विविध कारवायांचें वर्णन करण्यांत आलें आहे. यांत स्वतंत्र राज्यकर्त्यांना तसेंच पेशव्यांच्या मांडलिकांना व सरदारांना त्यांच्यांत फूट पाडून आपल्या आहारीं नानांनीं आपल्या कारस्थानाच्या बळावर कसकसें

आणलें हें विशद रीतीनें दाखविण्यांत आलें आहे. नानांनीं पेशव्यांच्या घराण्यांतील तंटे पूर्णपणें निकालांत आणले होते. त्यामुळें 'भाऊबंदी तंट्यामुळें पेशवाई बुडाली ' हें ह्मणणें साफ खोटें आहे. ती इतर कारणांनी बुडाली असा ग्रंथकारांनीं स्पष्ट निष्कर्ष काढला आहे. ( पान ८२८ क २३ ). यापुढें सवाईमाधवराव जरी वयांत येऊन लायख झाले होते, तरी नानांनीं आपल्या ' आदमखोरी ' वृत्तीनें पेशव्यांचा खरा अधिकार स्वतःच बळकावून त्यांनीं त्यांना केवळ नामधारी पेशवे बनविले. त्यांनीं सवाईमाधवरावांना धमक्या कशा दिल्या, त्यांचा मानभंग कसा केला व त्यामुळें त्यांच्यावर आत्महत्येनें अंत होण्याचा भयंकर प्रसंग कसा ओढवला हें मागें दाखविलेंच आहे. सवाईमाधवरावांच्या आत्महत्येला सर्वस्वी नानाच कारण कसे होते, हें त्या प्रसंगाची चर्चा करून दाखविण्यांत आलें आहे. ( पान ८४९ क ३८ ) सवाईमाधवरावांच्या अंगीं असलेल्या गुणांमुळें पेशवाईचें गतवैभव फिरून प्राप्त होईल ही आशा कां नष्ट झाली यासंबंधीं ग्रंथकारांनीं पुढील खेदोद्गार काढले आहेत. " परंतु पेशवाईला व पेशव्यांच्या कारभारीपदाला नानांचा कायमचा क्षयरोग लागल्यानें ती आशा निष्फल ठरली. एकंदरींत पेशव्यांच्या घराण्यांतील सवाई माधवरावांसारख्या दैदिप्यमान सूर्याला नानांचें खग्रासग्रहण लागलें हें मात्र सत्य आहे. महाराष्ट्राचें दुर्दैव, दुसरें काय ? " ( पान ८४७ क ३९ ).

सवाईमाधवरावांच्या मृत्युनंतर नानांनीं पेशव्यांच्या गादीवर कोणाला आणावें याबद्दल कसकशीं कारस्थानें केलीं हें मागें दाखविलेंच आहे. प्रथम आपण चिमाजीअप्पांना दत्तक करण्याचें कारस्थान करणें व त्यानंतर स्वतःच तें दत्तविधान अशास्त्र ठरवून तें करणारांस जबर शिक्षा करणें, या सारखीं मन मानेल तीं परस्पर विरुद्ध कृत्यें नानांनीं केल्याचें दिसून येतें. नानांनीं चिमाजीअप्पास आणण्याचें कामीं मदत केल्याबद्दल हरी विष्णु सहस्रबुद्धे यांना कोरड्याचा मार दिला व कान आणि बोटें यांस चाप लावून त्यांचा अत्यंत छळ केला. ( पान १०३४ क १२ ). याबद्दल ग्रंथकारांनीं " नानांच्या

कारस्थानाला नीति आणि धर्म यांचा गंधसुद्धां नव्हता. नानांच्या मनाला जी गोष्ट येईल तीच नीति व तोच धर्म होता" असे सार्थ उद्गार काढून नानांच्या विसंगत वर्तनाचें कारण दाखविलें आहे. (पान ८५९ क १३). अशा तऱ्हेचें नीतिधर्मशून्य व बेछूटपणाचें वर्तन करून नानाचें काय कल्याण झालें असें कोणी विचारल्यास त्यास "तत्कुशल काय पुससी बा त्यावरि धर्मनीति सतत रुसे" (मो. महाभारत) असेंच कविवर्य मोरोपंताच्या वाणीनें उत्तर द्यावें लागेल. यानंतर महाडचें प्रसिद्ध कारस्थान करून बाजीरावांना पेशवे-पदावर कसें बसविलें वगैरे हकीकत मागें आलीच आहे. हें महाडचें कारस्थान करून नानांनीं कोणकोणत्या गोष्टी साधल्या हें स्पष्टपणें दाखविण्यांत आलें आहे. (पान ८९४ क १). हें महाडचें कारस्थान पुढें सर्वांच्याच नाशाला कारणीभूत झालें असेंहि ग्रंथकारांनीं दाखविलें आहे. (पान ८९६ क ५). कारस्थानें करण्यांत नानांच्या अंगीं कोणता विशेष गुण होता, याविषयीं ग्रंथ-कारांनीं पुढील विधानें केलीं आहेत. "एकंदरींत नानांच्या कारस्थानांतील विशेष असा असतो कीं, चोर स्वतः नानाच असतात, पण चोरी मात्र संन्याशावर लादून त्याला सुळावर दिल्याशिवाय ते कधींही रहात नाहींत. महाडच्या कारस्थानावरून हा त्यांच्या अंगचा विशेष गुण प्रकट झाला आहे." (पान ८९८ क ६). पेशवाईच्या रक्षणाकरतां नानांनीं हें महाडचें कारस्थान केलें वगैरे खरे शास्त्र्यांचीं विधानें कशीं लटकीं ठरतात हें दाखविण्यांत आलें आहे. (पान ९१६ क १९).

दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं कारभार करीत असतां नानांनीं लोकांवर निरनिराळ्या पट्ट्या बसवून पैसे उकळण्याची शिकस्त केली होती. यांतील संतोषपट्टीची अजब कल्पना नानांचीच होती. लोकांवर या पट्ट्या लादून त्यांच्या बजावणींत वसूल झालेल्या पैशानेंच, आपली पदरमोड न करतां व परभारें पेशवे-सरकारवर दोष लादून नाना आपलीं महाडसारखीं कारस्थानें पार पाडीत असत, असें दिसून येतें. (पान ९२८ क ७).

नानांच्या वेळीं जादूटोण्यावर लोकांचा विश्वास होता. खुद्द नानांचाही त्यावर विश्वास होता, असें दिसून येतें. महाडच्या कारस्थानानंतर दौलतराव शिंदे पुणें सोडून लवकर जाईनात ह्मणून नानांनीं त्यांच्यावर जादूटोण्याचा प्रयोग केला. तो प्रयोग पुण्यास आपल्याच वाड्यांत कालियामर्दनाची मूर्ति स्थापण्याचें निमित्त करून करण्यांत आला. त्या प्रयोगांतील जादूमंत्राचा दिवा शनिवारवाड्याचे गणेश दरवाजासमोर ठेवला. तो शिंद्यांच्या गारद्यांनीं पाहून व तो जादूचा आहे हें ओळखून त्यांनीं तो दिवा परत नानांच्या वाड्यांतच नेऊन ठेवला. याप्रमाणें नानांनीं केलेली जादू नानांवरच कशी उलटली हें सविस्तर दाखविण्यात आलें आहे. ( पान ९५८ क ३ ).

नारायणरावांना धरण्याच्या कटांत जसा त्यांना मारण्याचा गुप्त कट करण्यांत आला होता, त्याचप्रमाणें आतांही कालियामर्दन मूर्ति स्थापनेच्या पोटीं हा जादूटोण्याचा कट करण्यांत आला होता, असें सिद्ध करण्यांत आलें आहे. याच वेळीं नानाचे स्नेही बाबा गद्रे यांच्या बागेंत मुरलीधराच्या मूर्तीची स्थापना करण्याचें ठरलें होतें. तेथेंही दंगा होऊन त्या कामीं कांहीं खून पडले. ह्मणून त्या मुरलीधरास तेव्हांपासून खुन्या मुरलीधर असें लोक ह्मणूं लागले. नानांनीं कालियामर्दनाची मूर्ति स्थापन करण्याचें ठरविण्यांत त्यांचा काय हेतू असावा याची चर्चा करण्यांत आली आहे. या मूर्तीच्या स्थापनेचे व जादूटोण्याचे डाव कसे अजिबात फसले हेंही दाखविलें आहे. (पान ९६१ ते ९६७ क ६ व ७).

पेशव्यांच्या दरबारीं सखारामबापू एक शाहाणे व नाना अर्धे शाहाणे समजले जात होते. मागें दाखविल्याप्रमाणें सखारामबापूंचा निकाल केल्यावर त्यांच्या शाहाणपणाचा वारसा नानाकडेच आला व नाना हे दीडशाहाणे बनले व त्यांनीं हेतुपुरस्सर वरील कारस्थानें केलीं असें एक मजेदार कारण देण्यांत आलें आहे. ( पान ९६० क ५ ).

शिंदे शाहींतील रामचंद्र बाबा, जिवबादादा, बाळोबातात्या वगैरे शूर व मुत्सद्दी शेणवी सरदारांची हकीकत देण्यांत आली आहे. ( पान ९६१ क

६ ). महाडच्या कारस्थानाच्या वेळीं नानांनीं शिंद्याकडून बाळोबातात्या यांना कैद करविलें होतें. नानांच्या मनांत शिंदेशाहीतील सर्व शेणवी सरदार व अधिकारी मंडळी यांना कैद करवावें असें होतें. व त्याप्रमाणें कारस्थान करून त्यांनीं शिंद्यांकडून त्या सर्वांना कैद करवून शेणवी मंडळीवरील आपला बरेच दिवसांचा सुड उगवून घेतला. हा नानाच्या महत्वाकाक्षी कारस्थानाचा शेवटचा विजय होय असें दाखविलें आहे. (पान ९६३, ९६४ क ७) पुढें शिंदेबायांनीं स्वतः पुढाकार घेऊन या शेणवीमंडळींना मुक्त करणें शिंद्याना भाग पाडलें, व नानांचा डाव हाणून पाडला. यासंबंधींची हकीकत सविस्तर पणें देण्यांत आली आहे. (पान ९६८ क ९). नानांनीं जीं हीं कारस्थानें केलीं त्यांत नानांचा मुख्य हेतू काय होता हें ग्रंथकारांनीं थोडक्यांत पुढील शब्दांत नमूद केलें आहे. "एकंदरींत नानांच्या कारस्थानाचें सर्व धोरण पहातां पेशव्यांच्या राज्यांत काय वाटेल ती क्रांति जरी झाली तरी नानांना त्याचें शुभाशुभ नव्हतें. फक्त आपलें स्थान अढळ राहिलें ह्मणजे झालें एवढाच त्यांच्या कारस्थानाचा इत्यर्थ होता असें दिसून येतें." (पान ९७१ क १०).

नानांचे प्रतिस्पर्धी मोरोबादादा यांची कैदेंतून सुटका करण्याची शेणवी मंडळींनीं बाजीरावामार्फत खटपट केली होती, परंतु ती नानांनीं हाणून पाडली व पेशवाईंत खरा अधिकार कोणाचा, पेशव्याचा कीं आपला, हें प्रत्ययास आणून दिल्याचें दिसुन येतें. (पान ९८०, ९८१ क ६). महाडच्या कारस्थानाच्या प्रसंगीं नानांनीं शिंदे व घाटगे यांच्याशीं केलेले करार त्यांनीं पाळले नाहींत. त्या नंतरही नानांची कारस्थानें चालूच होती. पुढें 'शठं प्रति-शाठ्यं' या न्यायानें बाजीराव, शिंदे व घाटगे यांनीं मसलत करून नानांना शिंद्यांकडून कसें कैद करविलें हें मागें दाखविलेंच आहे. नानांना नगरच्या किल्ल्यावर कैदेंत ठेवण्यांत आलें होतें. तेव्हां सखारामबापूंनीं दिलेली भविष्य-सूचक चिट्ठी त्यांना किल्लेदारांनीं दिली. ती वाचून नानांना रडूं कोसळलें, असें दाखविलें आहे. (पान १०३७ क १९). किल्ल्यावर कैदेंत असतांनाही

नानांचीं कारस्थानें चालूंच असत. पुढें शिंद्यांनीं इंग्रजांचें विनंतिवरून नानांची कैदेंतून सुटका केल्यावर पुन्हां नानांनीं कारस्थानें कशीं सुरू केलीं व त्याचे परिणाम काय झाले हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे.

नानांच्या कारस्थानांच्या होमकुंडांत तिसरा बळी परशुरामभाऊंचा पडल्याचे प्रकरण ३९ मध्यें दाखविण्यांत आलें आहे. नाना कैदेंतून मुक्त झाल्यावर पुनः पेशवाईचा कारभार पाहूं लागले. नानांचे राजशाही विध्वंसनाचें तत्वच फ्रान्समधील लोकांनीं आपल्या राजाचा वध करून अमलांत आणले होते. या संबंधीं ग्रंथकारांनीं "त्यांत फरक एवढाच होता कीं, नानांची 'नानाशाही' केवळ स्वार्थी होती तर फ्रान्समधील 'लोकशाही' लोककल्याणाची होती, असे सार्थ उद्गार काढले आहेत. (पान ११९७ क २३). परशुरामभाऊंचा बळी घेण्याचें कारस्थान नानांकडून कसें रचण्यांत आलें, व त्याचा बळी कसा घेतला गेला हें मागें दाखविलेंच आहे. परशुरामभाऊंचे मृत्युनंतर करवीरकरांविरुद्ध परशुराभाऊसंबंधीं क्रूरपणाचें व नीचपणाचें त्यानीं वर्तन केलें असें दाखविणारीं दोन पत्रें (नं. ९ व १०) कशी निखालस बनावट करण्यांत आली याचें सयुक्तिक व सविस्तर विवेचन करण्यांत आलें आहे. (पान ११८२ ते १२०४ क ९ ते २९). नानानीं यावेळीं पटवर्धन सरदारांना उठवून खर्चाकरतां आपल्या पदरचे पांच लक्ष रुपये दिले व बाळोबातात्यांकडून चार लक्ष देवविले. यासंबंधीं ग्रंथकारांनीं "जेथें पैसा तेथें न्याय, शहाणपणा, विजय व कीर्ति हा नानांनीं त्यावेळीं स्वानुभवानें घालून दिलेला धडा होता" असे सार्थ उद्गार काढले आहेत. (पान १२०९ क २६).

नानांनीं आपल्या कारस्थानांनीं शिंदे व शिंदेबाया यांच्यामध्यें झालेला सलोखा नाहींसा केला व दौलतरावांना शह देण्याकरता त्यानीं यशवंतराव होळकरांना भोंसल्यांची मदत घेऊन सैन्यासह पाचारण केलें होते व त्याप्रमाणें ते पुण्यास येण्यास निघालेही. या कारवाईवरून शिंद्यांचा नाश करण्याचा नानांचा विचार ठरला होता असें स्पष्ट दिसून येतें. (पान १२१३ क ३२).

यापुढें नाना लवकरच ज्वरानें आजारी पडले व त्यांचा त्यांतच ता. १३ मार्च सन १८०० इ. रोजीं अंत झाला. ग्रंथकारांनीं नानांच्या जहागिरी किती होत्या व कुठकुठें होत्या, तसेंच नानांनीं आपल्या ठेवींची व्यवस्था कशी गुप्तपणें केली होती, याचें वर्णन दिलें आहे. (पान १२१५, १६ क ३६ व ३७). तसेंच नानांनीं खासगी व लोकोपयोगी इमारती बांधणें वगैरे जीं कृत्यें केलीं त्यांचेंही कलमवार वर्णन करण्यांत आलें आहे. ( पान १२१६ क ३८ ). नानांनीं आपल्या कामाबद्दल एक लाख रुपये ठराविक पगार घेण्याचे कबूल केलें नव्हतें हें मागें आलेंच आहे. त्यांना त्याच्या फडनविशीदरकाचें उत्पन्न दरसाल अदमासें चार पांच लाख रुपये येत असे. पेशव्यांच्या सरदारांच्या दरबारांत तसेंच पेशवाईंतील किल्ल्यावर फडनविस नेमण्याचा हक्क नानांचा असे. त्या नेमलेल्या लोकांकडून स्वामित्वाची बाब ह्मणून सुमारें दीड लाख रुपये दरसाल नानाना मिळत. नानांना सरंजामी उत्पन्न अदमासे पांच लाखांचें होतें. याशिवाय नानांच्या कित्येक दुसऱ्या बाबी उत्पन्नाच्या असत. त्यांजपासून त्यांना चांगलीच प्राप्ती असे, असें दाखविण्यांत आलें आहे. ( पान १२१८ क ३९ व ४० ). एवढें भरमसाट उत्पन्न असल्यामुळें नाना नवकोट नारायण बनले होते यांत नवल तें काय ? ग्रंथकारांनीं कांहीं तहाच्या प्रसंगीं हैदरकडून व निजामाकडून नानांचा खिसा कसा गरम झाला होता हें दाखविलें आहे. या सर्व युक्तायुक्त मार्गांनीं मिळवलेल्या अकोट संपत्तीमुळेंच 'पेशव्यास धत्तुरा व फडनविसास मञ्जिदा' अशी स्थिति झाली होती हें ग्रंथकारांचें विधान यथार्थ आहे, असें स्पष्ट दिसून येतें.

ग्रंथकारांनीं "आप मरे और दुनिया डुबे" हें नानांचें ब्रीद वाक्य होतें असें नमूद करून त्यावर एक स्वतंत्र प्रकरण ( प्र. ४१ ) लिहिलें आहे. नाना राज्यकारभारांत प्रथम शिरले, तेव्हां पेशवे-राज्याची सर्वतोपरी सुस्थिति होती, आणि त्यावेळीं पेशवे व त्यांचे नोकर व सरदार-मंडळी यांच्यामध्यें सेव्य-सेवक भावनेनुसार व्यवहार होत असे. तसेंच त्या वेळीं राज्यकारभारांत एकोपा

व संघशक्तीही मूर्तिमंत वसत होती, असें दाखविण्यांत आलें आहे. (पान १२२१ क १). नाना पेशवे-राज्याचे सर्वाधिकारी होऊन कारभार करीत असतां त्याचें देहावसान झालें. नानांनीं आपल्या हयातींत 'फोडा व झोडा' हें तत्व राज्यकारभाराचें कामीं अमलांत आणिल्यामुळें पेशवे-राज्याची वर वर्णन केल्याच्या उलट कशी दुरवस्था नानांच्या मरणसमयीं झाली याचेही ग्रंथकारांनीं सविस्तर वर्णन केलें आहे. (पान १२२२, १२२३ क २). "खूप शर्थीनें राज्य राखिलें फडणिस नानांनीं" हें भपकेबाज पोवाडेशाही वर्णन असत्य आहे व नानांच्या हातून राज्य राखण्याची कृत्यें न घडतां राज्यावर नाशाचा प्रसंग ओढविणाऱ्या कृती नानाकडून अखेरपर्यंत कसकशा घडून आल्या याची खुलासेवार चर्चा करण्यांत आली आहे. (पान १२२४ क ३).

कित्येक विचारमंद व भोळया लोकांची 'नाना नसते तर पेशवाई चालतीना' अशी खुळी समजूत आहे. या समजुतीचा चांगलाच परामर्ष ग्रंथकारांनीं घेतला असून त्यासंबंधीं त्यांनीं पुढील निष्कर्ष काढिला आहे. "पेशवाईच्या कारभाराला नानांची मुळींच जरूरी नव्हती. तर नानांनाच आपल्या स्वार्थाकरतां व आपली आसुरी महत्वाकांक्षा पुरी करून घेण्याकरतां पेशवाई पाहिजे होती." (पान १२२७ क ९). आपल्या पश्चात् पेशवाई टिकावी अशी कोणतीही व्यवस्था नानांनीं आपल्या अखेरीच्यावेळीं केली नाहीं. यावरून 'प्राप्ते संतेहिन मरणें' अशा स्थितींतही त्यांची जी दुर्वर्तणूक झाली व त्यांनीं ज्या कारवाया केल्या त्यावरून त्यांची इच्छा आपल्यामागें पेशवाई जिवंत राहावी अशी नव्हती व 'आप मरें और दुनिया डुबे' हीच निर्गल व बेझूट मनोवृत्ति त्यांच्या ठिकाणीं कशी वास करीत होती, हें ग्रंथकारांनीं मार्मिकपणें दाखवून दिलें आहे. (पान १२२७ ते १२३६ क ६ ते १९). नानांनीं आपल्या स्वतःच्या खासगी मिळकतींची व्यवस्था केली नाहीं, त्यांनीं दत्तक घेतला नाहीं, अगर लगतच्या भाऊबंदांनाही जवळ केलें नाहीं. (पान १२३९ क १४). नानांनीं एकंदर नऊ बायकांशीं लग्नें केलीं. त्यांच्या मृत्यु-

समर्थी एक १४ वर्षांची व दुसरी नऊ वर्षांची अशा दोन बायका जिवंत होत्या. त्यांच्यासंबंधीही नानांनीं कांहींच व्यवस्था केली नाहीं, एवढेंच नव्हे तर यांना त्यांनीं परगांवाहून अखेरच्या भेटीकरतांही बोलाविलें नाहीं. यावरून नानांचें अंतःकरण खासगी व जिव्हाळ्याच्या बाबींतही कसें पथ्थरवत् होतें हें दिसून येतें. ( पान १२३२ क १२ ). नानांच्या स्वभाव वैशिष्ट्याचें वर्णन ग्रंथकारांनीं प्रसंगानुसार ठिकठिकाणीं केलें आहे तेंही पाहण्याजोगें आहे.

नानासाहेब पेशवे व नाना याचे गुणावगुण सारखे होते हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. नाना आपलीं कारस्थानें कशी उभारीत व पार पाडीत यासंबंधीं ग्रंथकारांनीं त्याचें स्वभाव वैशिष्ट्य पुढील शब्दांत वर्णन केलें आहे. "कारण नाना आपल्या सर्व हालचालींत एवढी धूर्तता राखीत कीं कोणतीही जबाबदारी प्रथमतः ते आपल्या शिरांवर घेत नसत. कोणतेंही कारस्थान आपल्याला पचेल अशी खात्री झाल्याशिवाय ते स्वतः पुढें येत नसत. कोणतेंही नवीन कारस्थान करतेवेळीं पहिल्यानें दुसऱ्याला पुढें करावयाचें व आपण नामानिराळें राहावयाचें; कारस्थानाचीं सर्व गुप्त सूत्रें मात्र आपल्या हातीं ठेवावयाचीं. ही हातोटी नानांना उत्तम साधली होती." ( पान ११७ क ९ ). प्रसंगविशेषीं आपल्या मनाच्या अगर धोरणाच्या विरुद्ध कोणतीही गोष्ट घडल्यास नाना गडबडत नसत, धीर खचूं देत नसत या त्यांच्या स्वभावाचें दृष्टांतपूर्वक मजेदार वर्णन पुढीलप्रमाणें करण्यांत आलें आहे. "नाना फडनविस याच्या स्वभावाची जात बिबळ्या वाघाप्रमाणें होती. भीतीच्या प्रसंगीं हा वाघ गवतांत असा दडून बसतो कीं, त्या वेळीं गवताची एक काडीही हालूं देत नाहीं. पण निर्भयतेचा काळ येताच तो सापडतील त्या जनावरांच्या मुंड्या मुरगळण्यास कमी करीत नाहीं. नाना फडनविस याच स्वभावाचे होते." ( पान २११ क ४० ).

दादासाहेबाविरुद्ध नानांनीं आपला स्वतंत्र पक्ष उभारल्याचें मागें दाखविण्यांत आलें आहे. या उभय पक्षासंबंधीं ग्रंथकारांनीं पुढील सार्थ विधानें केलीं

आहेत. " दादांच्या पक्षांत सर्वच सत्पक्षी लोकांचा भरणा होता. दुसरा पक्ष नाना फडनविसांचा होता. तो मात्र जातिमत्सरानें पूर्ण भारलेला असा होता. नानांचे अनुयायी पटवर्धन, रास्ते, फडके, पेठे वगैरे बहुतेक चित्पावन कोंकणस्थच होते. त्यामुळें ब्राह्मणांतील पोटजातींच्या ब्राह्मणांनींसुद्धां पुढें येऊं नये अशी ते खबरदारी घेत होते." (पान २३६ क ९). यावरून जातिमत्सरयुक्त नानांच्या स्वभावावर चांगलाच प्रकाश पडतो. यासंबंधीं मागें उल्लेखलेल्या परभू व शेणवी प्रकरणांतील नानांचे अत्यंत नीच व सूडबुद्धीचें वर्तनही पाहण्याजोगें आहे. (पान २३७ क ९). नारायणरावांनीं बोथाटी खेळतांना नानाचें पागोटें पाडलें, त्या प्रसंगीं नानाचा स्वभावविशेष पुढीलप्रमाणें दाखविण्यांत आला आहे. "नाना फडनविस कोणाशीं विशेष सलगी करीत नसत. त्यांना थट्टा-विनोद आवडत नसे, त्यांचा कोणी अपमान केलेला त्याना कधीं सहन झाला नाहीं. त्यांच्या मनाचा धर्म नागसापाप्रमाणें होता. त्यांना कोणी दुखविलें कीं, त्याचा दबा धरून त्यांनीं त्याचा प्राण घेतलाच. त्यांनीं आपला भाऊ, स्नेही, उपकार-कर्ता, मालक वगैरे कोणाचीच पर्वा केली नाहीं." (पान २४० क ९).

नानाचा स्वभाव विश्वासघातकी होता. प्रथम आपल्याबद्दल विश्वास उत्पन्न होईल असें एखाद्याशीं वर्तन करून नंतर एकदम त्याचा घात करावयाचा हें त्यांनीं दादासाहेबांशीं केलेल्या वर्तनावरून दिसून येतें. (पान ३११ क ९). तसेंच त्यांनीं परशुरामभाऊंशीं जें विश्वासघातकी वर्तन त्यांच्या अखेरच्या प्रसंगीं केलें, त्यावरूनही हा नानाचा दुर्गुण स्पष्टपणें दिसून येतो. (पान ११९७ क ११). विश्वासघात करताना नानाच्या वागण्याची तऱ्हा ग्रंथकारांनीं "आपल्यावर बाजू उलटते असें दिसताच नाना मेणाहून मऊ बनत असत, व आपली बाजू बळकट होतांच वज्रापेक्षा ते कठीण होत असत." या एका वाक्यानें दाखवून दिलें आहे. (पान १०९९ क ११). सखारामबापूप्रमाणें नाना धर्मभोळे नव्हते. नानांचा दैवावर, देवावर अगर आपल्या सहकारी लोकांवर विश्वास नव्हता. त्यांचा सर्व विश्वास आपल्या बुद्धि-चातुर्यावर होता.

असें ग्रंथकारांनीं दाखवून दिलें आहे. (पान ३६८ क २०). नानांच्या अचाट बुद्धिचातुर्याबद्दल व कर्तबगारीबद्दल तोऱ्या-प्रकरणीं ग्रंथकारांनीं पुढील विचार प्रदर्शित केले आहेत. " नानांचे बुद्धिचातुर्य सर्व चित्पावन ज्ञातीवर मात करणारें, समुद्राप्रमाणें विशाल होतें, यांत कोणाचेंच दुमत नाहीं. नानांनीं अंगिकारलेलें कोणतेंही अन्यायाचें कार्य आपल्या इच्छेनुरूप यशस्वी करण्याकरतां न्यायान्यायाचें औदासिन्य, पाषाण हृदयत्व, बेफाट चिकाटी, आसुरी महत्वाकांक्षा, सहज फसवितां येण्यासारखी मधुरवाणी, निरालस श्रम करण्याची संवय हे जे गुणावगुण लागतात, तें नानांच्या ठिकाणीं विपुल पाणी भरीत होते. " (पान ५२८ क १२१ (१०)).

नानांचे व मोरोबादादांचे स्वभाव भिन्न स्वरूपाचे होते, हें त्यांनीं एकमेकांशीं केलेल्या वागणुकीवरून दिसून येतें. मोरोबादादा नानाशीं वागताना माणुसकीस जागले. उलट नाना मोरोबादादांशीं वागतांना सर्पाप्रमाणें त्यांच्यावर उलटले. त्यांनीं केलेले उपकार न स्मरतां द्वेषबुद्धीनें त्यांच्यावर व त्यांच्या पक्षावर नानांनीं सूड उगविला. यावरून उपकाराची फेड अपकार करून फेडण्याचा नानांचा स्वभावधर्म होता, हें स्पष्टपणें दिसून येतें. (पान ५८७ क ३९). नानांचा स्वभाव पराकाष्ठेचा लोभी होता. नरगुंद संस्थानची दोन वर्षांची खंडणी टिपूनें त्यांना देऊं केल्यामुळें त्यांनीं टिपूशीं तह करून नरगुंदकरांवर व तेथील एकंदर हिंदु प्रजेवर कसा भयंकर प्रसंग ओढवून घेतला हें मागें दाखविण्यांत आलेंच आहे. (पान ६७३, ६७४ क १३ ते १५). त्याचप्रमाणें नानांच्या कारभारांत योग्य वारसाहक्काची किंमत नव्हती. जो जास्त पैसे देईल त्याला वारसदार ठरविण्याची नानांची तयारी असे, हें गोविंदराव गायकवाड यांच्या हक्काची नानांनीं पायमल्ली केल्याच्या उदाहरणावरून स्पष्ट दिसून येतें. (पान ७४३ क १३). परशुरामभाऊविरुद्ध कारस्थान करून नानांनीं त्यांचा कां नाश केला याचें विवेचन करतांना ग्रंथकारांनीं नानांच्या स्वभावांतील विशेषधर्म पुढील शब्दांत दाखविला आहे. " नानांनीं एकदां एकाचा द्वेष धरला ह्मणजे

त्याच्याशीं पुन्हां त्यांचे सख्य घडून तें टिकलें आहे असें एकही उदाहरण इतिहासांत सांपडणार नाहीं. त्या इसमाला नानांनीं एक मारून तरी टाकावें किंवा डोंगरी किल्ल्यांत मरेपर्यंत डांबून तरी ठेवावें. नानांच्या स्वभावांतील हा विशेष होता." (पान १०८८ क ४). नानांच्या राजकारण करण्याच्या तऱ्हेविषयीं ग्रंथकारांनीं पुढील निष्कर्ष काढला आहे. "नानांच्या राजकारणाचा हातखंडा असा होता कीं, त्यांचें लिहिणें एक तर आंतून फूस निराळीच असून करणें भलतेंच होतें." या निष्कर्षावरून "मनस्यन्यद्वचस्यन्यत्कार्यमन्यद्दुरात्मनाम्" या सुभाषितार्थाची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

पटवर्धनांच्या त्या वेळच्या वकीलानें आपल्या धन्यास पत्र लिहिलें आहे, त्यांत त्यानें पुढील शब्दांत नानांची शिफारस केली आहे. "काम लागलें असतां साखरेपेक्षां गोड बोलावयास उशीर नाहीं. काम जाहलेंनंतर त्या गांवचेदेखील नव्हत." (पान १०९० क ६). याच्या उलट खरे शास्त्र्यांकडून नानांच्या वचन-पालनाची व 'न वितथं परिहास कथास्वपि' हा गुण नानांच्या अंगीं असल्याबद्दलची प्रौढी दाखविण्यांत आली आहे. त्या संबंधीं सयुक्तिक विवेचन करून ग्रंथकारांनीं खरे शास्त्र्यांचें ह्मणणें कसें खोटें आहे व ते नानांच्या बाबतींत कसे चुकले आहेत हें स्पष्टपणें विशद करून दाखविलें आहे. (पान ९४१, ९४२ क २०, २१). नानांनीं नवस फेडण्याकरतां लक्ष ब्राह्मण-भोजन घालण्याच्या निमित्तानें एक लक्ष रुपयांची बाजीरावाकडे मागणी केली होती. त्यांतही कांहीं तथ्य नव्हतें व तो निव्वळ आपल्या गर्भादानाच्या खर्चाकरतां पैसे उकळण्याचाच नानांचा एक डाव होता असें दाखवून देण्यांत आलें आहे. (पान ९५१ ते ९५३ क २८). कांट्यानें कांटा काढावयाचा व पाहुण्याकडून साप मारावयाचा हा नानांचा नीतिधर्म होता. त्याचप्रमाणें उंदराची शिकार करावयाचें ठरल्यास वाघाच्या शिकारीची तयारी करावयाची वगैरे स्वभाव विशेष प्रसंगोपात्त ठिकाठिकाणीं दाखवून देण्यांत आले आहेत. (पान ११०३ क १९).

नानांना कैद करण्यांत आल्यावर त्यांची मिळकत जप्त करण्यांत आली होती. नानांच्या वाड्यांतील तीस चाळीस लाखांचे कापड जप्त करून तें परशुराम-भाऊंनीं पेशव्यांच्या फौजेंतील लोकांना वांटून दिलें होतें. नानांनीं कैदेंतून सुटून आल्यावर पुन: कारभार हातीं घेतला तेव्हां फौजेंतील लोकांनीं मिळून जाऊन त्या वापरलेल्या कपड्यांच्या पुन: घड्या घालून त्या नानासमोर हजर केल्या व नानांनीं त्या निर्लज्जपणें परत घेतल्या. या हकीकतीवरून नानाचा मनोधर्म कसा हलक्या दर्जाचा होता, हें दिसून येतें. (पान ९२६ क ९). नानांना वैषयिक सुखाची लालसा चांगलीच होती. लहानपणापासून त्यांना या सुखाचा छंद लागला व पुढें पुढें त्याचा अतिरेक झाला. नानांनीं आपल्या आत्मचरित्रांतही हें दाखवून दिलें आहे. त्यानीं नऊ बायका लग्नाच्या केल्या. परस्त्रीगमनामुळें त्यांना सांसर्गिक रोगांनीं पछाडल्याचें दिसून येतें. त्यांच्या संसर्गानें त्यांच्या बायकानाही या रोगाची बाधा होऊन त्यांच्यावर अकालीं जगाचा निरोप घेण्याचा प्रसंग ओढवला यांत नवल नाहीं. या नानांच्या व्यसनासक्तीमुळें त्यांच्या बायकांना कसे हाल सोसावे लागले व स्वत: नानांचा नैतिक अध:पात कसा झाला होता याचें वर्णन करण्यांत आलें आहे. (पान ९४८ क २९।२६).

नाना गृहकलह पेटवून देण्यांत तरबेज होते असें दिसतें. एखाद्या नांदत्या घराचा अंत:कलहानें पेट घेतला म्हणजे त्यांना आनंद वाटावा अशी त्यांची मनस्थिति बनली असावी असें त्यांच्या आचरणावरून अनुमान करण्यास हरकत नाहीं. त्यांनीं खुद्द पेशव्यांचे घराण्यांत व पटवर्धन, शिंदे, होळकर, गायकवाड, भोंसले वगैरे सरदारांच्या घराण्यांत आपला स्वार्थ साधण्याकरतां अंत:कलह माजविल्याचें व त्या परस्परांमध्येंही तंटे उपस्थित केल्याचें दिसून येतें. हीं त्यांचीं कृत्यें त्यांच्या 'फोडा व झोडा' या तत्वाला सर्वस्वी पोषक अशीं होतीं. या त्यांच्या भेदप्रिय वृत्तीमुळें पेशवेराज्याचें कसकसें नुकसान झालें, हें प्रसंगानुसार दाखविण्यांत आलें आहे.

ग्रंथकारांनीं वर्णन केलेल्या नानांच्या आयुष्यक्रमाकडे नजर फेंकल्यास त्यांची कारस्थानी वृत्ति चांगलीच नजरेंत भरते. ' यत्र यत्र धूमस्तत्र तत्र वन्हिः' या न्यायाप्रमाणें ' नाना तेथें कारस्थान ' असें बेधडक ह्मणण्यास हरकत नाहीं इतकें त्यांचें साहचर्य दिसून येतें. परंतु त्यांतीलही हें वैशिष्ट्य दाखविण्यांत आलें आहे कीं, नानांचीं कारस्थानें उघड दिसण्यासारखीं नसत. त्यांचीं कारस्थानें गुप्तस्वरूपाचीं व पाताळयंत्री असत. (पान ३६९ क २०). ग्रंथकारांनीं या ग्रंथांत दिलेल्या इतिहासांत, नानांचा राजकारणी आयुष्यक्रम लपवा छपवी न करतां सत्यान्वेषण बुद्धीनें इतक्या ठळकपणें व महत्वपूर्ण रीतीनें वर्णन केला आहे कीं **'नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या ' या ग्रंथरूपीं रागाचा नाना फडनविस हा केवळ जीवनस्वर आहे असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं."**

यापुढें ग्रंथकारांनीं नानांची जन्मलग्न-कुंडली दिली असून तिचें ज्योतिषशास्त्रदृष्टया ( सायन पद्धतीचें ) यथोचित वर्णन पुणें येथील सुप्रसिद्ध ज्योतिषी होराभूषण गणेश प्रभाकर दिक्षित यांच्याकडून करवून तें या ग्रंथांत समाविष्ट करण्यांत आलें आहे. फलज्योतिषशास्त्राची माहिती असणाऱ्यांना तें वर्णन साधार व अत्यंत मार्मिकपणें करण्यांत आल्याचें दिसुन येणार आहे. ग्रंथकारांनीं नानांच्या जन्मकाळच्या राशीची, नक्षत्राची वगैरे यवनाचार्य मतानुसार शास्त्रीय फलें दाखविलीं आहेत, त्यावरून व सदर जन्म-लग्नकुंडलींतील ग्रहमानावरून प्राच्य व पाश्चिमात्य ज्योतिषशास्त्राप्रमाणें काढलेल्या फलादेशांशीं नानांच्या आयुष्यक्रमांत त्यांच्या हातून घडलेल्या गोष्टी कशा तंतोतंत पटतात हें पाहून आश्चर्य वाटणें साहजिक आहे. ज्योतिषनज्ञ इसमांना यांतील गोडी कळेल व इतरांना ज्योतिषशास्त्राचा खरेपणा प्रत्ययास येऊन आनंद वाटेल.

नानांची वैषयिक सुखलोलुपता ही त्यांच्या लग्नेश मंगळ व सप्तमेश शुक्र यांची युति चतुर्थस्थानीं झाल्यामुळें घडून आली. वयाच्या सोळाव्या वर्षींच विषयासक्तीचा प्रादुर्भाव होण्यास सप्तमेश शुक्राची त्या वर्षीं मंगळाशीं होणारी

युतीच कारण आहे. शुक्र आठ वर्षांत बारा राशीं फिरतो त्याप्रमाणें दुसरा फेरा पुरा होऊन तो मंगळाला येऊन मिळतांच त्यांच्या विषयासक्तीला चालना मिळाली. त्यांचें लवकर लग्न होणें, त्यांची नऊ लग्नें होणें, त्यांची वृत्ति व्यभिचारप्रिय असणें या सर्व गोष्टी या मंगळ-शुक्र युतीचेच परिणाम होत असें शास्त्रीय विवेचन करून ठामपणें दाखविण्यांत आलें आहे. (पान १२४२ क(१)).

नानांच्या जन्म-लग्नकुंडलींत लाभस्थानीं गुरुशनीची युति झाल्याचें दिसून येतें. शनि हा सुखस्थानाचा ( चतुर्थ ) व पराक्रमस्थानाचा ( तृतीय ) अधिपती असून सिंह या शत्रूराशींत आहे. त्यांतल्या त्यांत गुरु या शुभ ग्रहाशीं त्याची युति झाल्यानें शनीचा जबर परिणाम तितकासा दृष्टोत्पत्तीस आला नाहीं. मंगळ हा चतुर्थस्थानावरून आपला शत्रू शनि याला समोरासमोर प्रतियोगी होऊन राहिल्यामुळें नानांना शेवटीं कारागृहवासासारखीं संकटें प्राप्त होऊन त्यांची अपकीर्ति झाली, असें स्पष्टपणें दाखविलें आहे. सेफेरायल या पाश्चिमात्य ज्योतिष शास्त्रज्ञाचीं, जन्मकाळीं दशमस्थानीं शनि असतां कशीं फळें मिळतात व गुरु असतां कशीं मिळतात, याबद्दलचीं मतें उद्धृत करण्यांत आलीं आहेत. या शनिगुरुच्या युतीनें नानांच्या मुत्सद्देगिरीला व राजकारणाला कापट्याचें व पाताळयंत्रीपणाचें वळण लागलें असें दाखविलें आहे. ( पान १२४३ क २).

नाना नवकोट नारायण कां झाले, ह्याचें विवेचनही ज्योतिषशास्त्रदृष्ट्या उत्तम रीतीनें करण्यांत आलें आहे. धनाधिपति व पंचमाधिपति गुरु केंद्रांत दशमस्थानीं असल्यामुळें हा बहुधनप्राप्तीचा योग घडून आला असें साधार दाखविलें आहे. तसेंच या ग्रहयोगाचा मनुष्य निपुत्रिक असतो, असेंही प्रतिपादिलें आहे. या कुंडलींतील विशेष हा दाखविण्यांत आला आहे कीं, जरी गुरु हा धनप्राप्ती करून देणारा आहे, तरी तो शनि या पापग्रहानें युक्त असल्यामुळें द्रव्यप्राप्ती वाम मार्गानेंच झाली पाहिजे. हे योग नानांच्या आयुष्यक्रमांत तंतोतंत घडून आल्याचें स्पष्टपणें दिसून येतें. ( पान १२४९ क ३ ).

नाना पितृमातृसुखाला अल्प वयांतच कां आंचवले हेंही कुंडलींतील ग्रहयोगावरून

स्पष्ट करण्यांत आलें आहे. ( पान १२४५ क ४ ). नानांच्या जन्म-लग्न-कुंडलींत युद्धकारक ग्रह मंगळ (War Planet) हा शनीच्या गृहीं असल्यामुळें व सिंहरास शनीनें दूषित झाल्यामुळें नाना स्वभावानें भित्रे निपजले व या कुयोगामुळेंच नानांना पानिपतच्या लढाईंतून पळून जाण्याची बुद्धि झाल्याचें दाखविलें आहे. ( पान १२४६ क ५ ). सप्तमस्थानाचा म्हणजे जायास्थानाचा अधिपती जन्मकाळीं वक्री असल्यामुळें व तो सहाव्या ( रोगस्थान ) स्थानाचा मालक मंगळ यानें दूषित झाल्यामुळें, नानांना लैंगिक रोगांनीं पछाडल्याचें व नानांच्या स्त्रियानांही संसर्गदोषानें दुःख झाल्याचें दाखविलें आहे. तसेंच नानांना कुमारिका संभोग कां प्रिय होता हेही ग्रहांच्या योगावरून आधारसहीत स्पष्ट करण्यांत आलें आहे. ( पान १२४७ क ७ ).

पंचमस्थान हें मंत्रतंत्र, जादूटोणा वगैरेचे दर्शक आहे. त्या स्थानीं लाभस्थानाचा ( एकादशस्थानाचा ) अधिपती बुध असून चतुर्थस्थानाचा अधिपती शनि सिंहराशींत दशमस्थानीं ( कर्मस्थानीं ) असल्यानें नानांची दुसऱ्यांवर जादूटोणा करून लाभ करून घेण्याची प्रवृत्ति असे व या बुधाच्या अशा स्थितीमुळेंच नानांचे सल्लागार व मित्र दुष्ट, स्वार्थी व ढोंगी असत असें दाखविलें आहे. (पान १२४८ क ८). नानांचा जादूटोण्यावर, मंत्रतंत्रांवर व ज्योतिषावर भरंवसा होता हें स्पष्ट करण्यांत आलें आहे. ( पान १२४८ क ९ ). तसेंच नानांची मालकांना कुंकवाचे धनी बनवून आपण सर्वाधिकारी बनण्याची प्रवृत्ति कां असे व त्यांचीं कारस्थानें गुप्त कां असत, याचेंही त्यांच्या ग्रहमानावरून शास्त्रीय दृष्टीनें विवेचन करण्यांत आलें आहे. ( पान १२४९ व १२५० क ११ ). नानांच्या कुंडलींत पंचमांत बुध नीचराशींत असल्यानें त्यांना दत्तक घेण्याची बुद्धि झाली नाहीं असें दाखविलें आहे. त्यांच्या अकोट संपत्तीची त्यांच्यामागें वाताहात झाली हें त्यांच्या चतुर्थांत ग्रहांचा जबरदस्त कुयोग असल्यानें झाली, असें सिद्ध केलें आहे.

रा. हो. भू. दिक्षित यांनीं नानांच्या कुंडलीचें वैशिष्ट्य पुढील शब्दांत दाखविलें आहे. "एकंदरींत नानांच्या कुंडलीचें सार (१) सुखस्थानांतील मंगळशुक्र युति (२) दशमस्थ शनिगुरु यांची जोडगोळी आणि (३) बुध नेपच्यून त्रिकोणांत यांत आहे." (पान १२९३ क १४). ज्योतिषशास्त्र-दृष्ट्या नानांच्या जन्मकुंडलीची योग्य चर्चा करून त्यांतील ग्रहमानाचीं फलें नानांच्या आयुष्यक्रमांत घडलेल्या गोष्टींशीं व त्यांच्या स्वभावाशीं कशी तंतोतंत जुळतात हें प्रथमच दाखवून देण्याचें परिश्रम केल्याबद्दल होराभूषण रा. ग. प्र. दिक्षित यांना धन्यवाद देणें जरूर आहे. तसेंच ग्रंथकारांनीं नानांची नुसती कुंडली देऊन समाधान न मानतां हें महत्वाचें काम रा. दिक्षितासारख्या तज्ञाला करण्याची संधि देऊन त्याचा या ग्रंथांत समावेश केल्याबद्दल ग्रंथकारही धन्यवादास पात्र आहेत.

## खून कीं आत्महत्या.

हरदासाची कथा मूळपदावर येत असल्याचें आपण नेहमीं पाहतों. त्याचप्रमाणें ग्रंथकारांनीं मागील सर्व ऐतिहासिक माहिती देऊन मागें त्यांनीं केलेल्या गौप्यगोपनाचा खुलासा करण्याच्या हेतूनें ग्रंथांतील मुख्य विषय 'नारायणरावांचा खून कीं आत्महत्या' या विषयाचा पूर्ण खुलासा करण्याचें काम या ४२ वें प्रकरणात केलें आहे. ग्रंथकारांनीं 'खून कीं आत्महत्या' हें निश्चितपणें ठरवितां यावें म्हणून प्रथम पांच मुद्दे काढले असुन त्यांवर क्रमशः चर्चा करून त्यांचा निर्णय करण्यात आला आहे. त्यातील पहिला महत्वाचा मुद्दा नारायणरावांचा कोथळा कोणत्या परिस्थितींत व कोणत्या शस्त्राच्या वारामुळें बाहेर येणें शक्य होतें, हा आहे. या संबंधीं सविस्तर चर्चा पान १२९८ ते १२७४ क ३ ते १४ मध्यें करण्यांत आली आहे. या चर्चेच्या प्रारंभी डोळ्यांना जें दिसतें तें नेहमींच तसें असलें पाहिजे असा सिद्धांत नाहीं. हें तत्व श्रीज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद बोलाविल्याचा दृष्टांत देऊन विशद करण्यांत आलें आहे. (पान १२९८ ते १२६० क ३).

सुमेरसिंगानें नारायणरावांवर जें हत्यार चालविलें तें 'तेगा' हें सर्वांना कबूल असल्याचें दाखवून 'तेगा' या शस्त्राचें वर्णन देण्यांत आलें आहे. तसेंच 'तेग्यानें' शरीराच्या निरनिराळया भागावर निरनिराळया तऱ्हेचे वार कसकसे करतां येतात हेंही दाखविण्यांत आलें आहे (पान १२६१ ते १२६३ क ४, ५) सुमेरसिंगानें नारायणरावांच्या पाठीवर वार केल्याचें बखरीवरून व त्यावेळच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. (पान १२६३, १२६४ क ६). हे प्रसंग प्रत्यक्ष कसे घडून आले हें दाखविण्याकरतां ग्रंथकारांनीं या प्रसंगाची पांच चित्रें दिलीं आहेत. चित्र नं. १ हें नारायणराव, राघोबादादांस मारण्यास आलेल्यावेळचें आहे. चित्र नं. २ मध्यें नारायणराव राघोबादादांच्या डोक्यावर तरवार मारीत असल्याचें दाखविलें आहे. चित्र नं. ३ मध्यें राघोबादादांनीं आपल्या बिनोटी विद्येच्या बळावर नारायणरावांच्या पाठीवर येऊन त्यांनीं नारायणरावाला कसे बंदिस्त केलें हें दाखविलें आहे. चित्र नं. ४ हें नारायण-रावांनीं आत्महत्या करण्याच्या हेतूनें आपल्या पोटावर निमच्याचा वार कसा करून घेतला हें दाखविलें. चित्र नं. ५ हें नारायणरावाला तुळया पवारनें पाय धरून ओढल्यावर ते पोटावर पालथे कसे पडले व त्याच्या पाठीवर सुमेरसिंग तेग्यानें वार करण्याकरतां कसा तयार झाला होता हें दाखविलें. हीं चित्रें पाहून कोणालाही नारायणरावांच्या मृत्युसमयीं घटना प्रत्यक्ष कशा घडून आल्या असतील याची खात्री सहज पटण्याजोगी आहे. निव्वळ शब्दचित्रांवर अवलंबून न राहतां हीं त्या त्या प्रसंगाचीं उद्बोधक अशीं प्रत्यक्ष चित्रें देऊन ग्रंथकारानें नारायणरावाच्या आत्महत्येसंबंधाची आपली बाजू जिज्ञासु वाचकांच्या मनावर पूर्णपणें ठसविण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे यांत संशय नाहीं.

नारायणरावाचा कोथळा बाहेर आला व त्याच्या पोटातून साखरभात बाहेर पडला याबद्दल बखरीकारांची व इतिहासकारांची एकवाक्यता आहे. पोटा-तून कोथळा केव्हा बाहेर पडूं शकेल व पोटातील साखरभात केव्हां बाहेर येईल हें ग्रंथकारांनीं शरीरातील जरूर त्या अंतर्भागाचें शास्त्रीय दृष्ट्या वर्णन करून

विशदपणें दाखवून दिलें आहे. (पान १२६९ ते १२६७ क ७ ते ९ ). दादासाहेबांनीं ज्या बिनोट विद्येचा उपयोग करून ते नारायणरावांच्या पाठीवर आले व त्यांनीं नारायणरावांना हतबल करून आपलें संरक्षण केलें त्या बिनोट विद्येचें वर्णन करून तिच्या अंगभूत असलेल्या शस्त्रविद्या, मल्लविद्या व मर्मविद्या यांचेही यथोचित वर्णन करण्यांत आलें आहे. मानवी शरीरांतील मर्मांच्या स्थानांचें व त्यांच्या प्रकारांचें सविस्तर वर्णन देऊन त्याचा उपयोग कसा करण्यांत येतो याचेंही विवेचन करण्यांत आलें आहे. (पान १२६७ ते १२७१ क १० ते १२ ). यानंतर नारायणरावांनीं आपल्या हातांत धरलेल्या 'हातचा निमचा' या शस्त्राचीही माहिती आवश्यक तेवढी करून देण्यांत आली आहे. त्याचप्रमाणें निमचाचें वार कसे होऊं शकतात हें दाखवून नारायणरावांनीं या शस्त्राचा प्रयोग आपल्या पोटावर कसा केला असला पाहिजे हेंही दाखवून दिलें आहे. स्वतः ग्रंथकारांनीं मल्लविद्येचा, मर्मविद्येचा तसेंच शस्त्रविद्येचाही पूर्ववयांत अभ्यास केला असल्यामुळें त्यांना या गोष्टींचें वर्णन करून चर्चा करण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे, आणि ह्मणूनच हें ग्रंथकारांनीं केलेलें अधिकारयुक्त वर्णन वाचकांच्या मनावर ठसण्याजोगें बठलें आहे, असें दिसून येईल.

नारायणरावांनीं निमचाचा वार स्वतःच्या पोटावर केल्यावर ते हतबल झाले. ही त्यांची बलहीन स्थिति राघोबादादाच्या लक्षांत आल्यामुळें त्यांचें वात्सल्यप्रेम जागृत झालें व त्यांनीं नारायणरावांना पोटाशीं कवटाळून धरलें. अशा स्थितींत असतां तुळया पवार यानें पाय ओढून त्याना पालथें पाडलें. त्याचाच परिणाम पोटांतून कोथळा व साखरभात बाहेर पडण्यांत झाला. याप्रमाणें पहिल्या मुद्याचें विवेचन करून तें आत्महत्येला कसें पोषक आहे हें स्पष्ट करण्यांत आलें आहे. (पान १२७३, १२७४ क १४ ).

दुसरा मुद्दा राघोबादादांना डोक्यावर व डाव्या हातावर झालेले वार कोणत्या परिस्थितींत व कोणत्या हत्यारानें होणें शक्य होते ह्या संबंधीचा आहे. हरिवंशाच्या बखरींत फक्त हातावरील वाराचा उल्लेख आहे. त्या बखरींत राघोबा-

दादांनीं ' बाळांस मारूं नका ' ह्मणून हात पुढें केल्यावेळीं आनंदीबाईच्या प्रोत्साहनानें गारद्यानें हा वार केला असें तेथें वर्णन केलें आहे. हें वर्णन खोटें असल्याचें व आनंदीबाईवरील आरोप खोटा असून त्यांच्याविरुद्ध हें निव्वळ कुभांड रचल्याचें आनंदीबाईच्याच दिनचर्येवरून व आचरणावरून दाखवून देण्यांत आलें आहे तसेंच हा वार तेग्याचा नव्हे, तेग्याच्या वारानें हाताचा तुकडाच पडला असता, हा वार निसटतां होता तो तेग्यानें होणें शक्य नाहीं असेंही चिकित्सापूर्वक सिद्ध करून दिलें आहे. (पान १२७५ व ७६ क १५).

नारायणरावांच्या मृत्युनंतर लिहिण्यांत आलेल्या पत्र नं. ३ मध्यें दादासाहेबाना झालेल्या दोन वारांचा उल्लेख आहे. दादासाहेबांनीं दिलेल्या माहितीप्रमाणें हें पत्र लिहिलें आहे. त्यावेळीं दादासाहेब गोंधळलेल्या मनःस्थितींत असल्यामुळें कोणाच्या वारामुळें या जखमा झाल्या व केव्हां झाल्या, या गोष्टीकडे त्यांचें लक्ष न जाणें कसें साहजिक होतें हें दृष्टांतपूर्वक स्पष्टपणें दाखविण्यांत आलें आहे. ( पान १२७८ क १७ ).

दादासाहेबांना झालेल्या जखमांची स्थिति एका वारानें होण्याजोगी नव्हती. सुमेरसिंगानें तेग्याशिवाय दुसऱ्या शस्त्राचा उपयोग केल्याचा ऐतिहासिक दाखला नसल्यानें दादासाहेबांना झालेल्या दोन जखमा नारायणरावांच्या हातूनच त्यांच्यांत झालेल्या झटापटींत झाल्या असल्या पाहिजेत, हें अनुमान सिद्ध कोटींत येऊं शकतें. चित्र नं. २ वरून दादासाहेबांच्या डोक्यावर नारायणरावांकडून जखम कशी झाली असेल हें दिसून येतें. नारायणरावांनीं आपल्या हातून कांहीं होत नाहीं, आपली स्थिति अगदीं हीनबल झाली असें पाहून, हातच्या निमचानें ज्यावेळीं आपल्या पोटावर वार केला तेव्हांच दादासाहेबांच्या डाव्या हातावरील निसटती जखम झाली असली पाहिजे. कारण यावेळीं दादासाहेबांचा हाच हात नारायणरावांच्या छातीवरून गेला होता असें दाखविलें आहे ग्रंथकारांनीं अशी जखम होण्याजोगी त्या दोघांची कशी स्थिति होती

याची सविस्तर चर्चा करून हा दुसरा मुद्दाही नारायणरावांच्या आत्महत्येला कसा उपकारक आहे, हें विशद केलें आहे. (पान १२८२ क २०).

ग्रंथकारांनीं विचारांत घेतलेला तिसरा मुद्दा ' नारायणरावांना त्या प्रसंगीं आत्महत्या करण्याची प्रेरणा होणें व त्यांना तसें करण्याची संधि व साधनें मिळणें शक्य होतें काय ? ' हा आहे. नारायणरावांना प्रेरणा होणें शक्य होतें हें दाखवितांना साहजिकच नारायणरावांच्या स्वभावाची चर्चा करण्यांत आली आहे. त्यांचा स्वभाव अविचारी, स्वच्छंदी, क्रूर, निष्ठूर, साहसी वगैरे स्वरूपाचा असल्याचें मार्गें दाखविण्यांत आलेंच आहे. असा स्वभाव बनण्यास नारायणरावांना नाना फडनविसांची शिकवणूकच कशी कारणीभूत झाली असली पाहिजे हें स्पष्टपणें दाखवून देण्यांत आलें आहें. (पान १२८४, १२८९ क २१). प्रकरण १३ क ९ मधील पत्रांतील उल्लेखावरून नारायणरावांची मनः-स्थिति त्यावेळीं राघोबादादांच्या जिवावर उठण्याजोगी कशी झाली होती हें चांगलेंच दिसून येतें. राघोबादादांनीं बिनोट विद्येनें नारायणरावांच्या पाठीशीं येऊन त्यांना कैचींत पकडल्यावर (चित्र नं. ३) ते हतबल झाल्या कारणानें त्यांची चढाईची आशा नष्ट झाली व राघोबादादांची चढाई त्यांच्या प्रत्ययाला आली. अशा निराश स्थितींत नारायणरावांना आत्महत्या करून घेण्याच्या दुष्ट इच्छेनें कसें पछाडलें, हें विशद करण्यांत आलें आहे. (पान १२८७ क २४). शिवाय नानासाहेब व माधवराव यांच्या मनाचा कमकुवतपणाचा धर्म प्रसंगानुसार मार्गें कसा दृष्टोत्पत्तीस आला होता व तोच नारायणरावांमध्यें व पुढें सवाईमाधवरावांमध्येंही कसा उतरला याचें वर्णन करण्यांत आलें आहे. नारायणरावांच्या या स्वभावधर्मानुसार तसेंच आनुवंशिक संस्कारबळानेंही त्यांची प्रवृत्ति अशा प्रसंगीं आत्महत्येकडे स्वाभाविकपणें वळणें कसें साहजिक होतें, हें दाखवून देऊन आत्महत्येची संधि व साधनेंही त्यांना कशी पूर्णपणें अनुकूल होती हेंही दाखविण्यांत आलें आहे. (पान १२८८ क २५, २६).

ग्रंथकारांनीं चर्चिलेला चवथा मुद्दा 'नारायणरावांच्या आत्महत्येसंबंधीं ऐतिहासिक उघड पुरावा अंशतःसुद्धां कां नाहीं' हा आहे. नारायणरावांच्या चढाईला तोंड देण्याच्या कामांत राघोबादादा सर्वस्वीं गुंतले होते. बिनोटीच्या डावानें ते नारायणरावांच्या पाठीशीं आले, तेव्हां त्यांची मनस्थिति गोंधळून जाणें साहजिक होतें. नारायणरावांच्या पोटाचा भाग पुढच्या बाजूस असल्यामुळें तो त्यांना दिसण्याजोगा नव्हता व अशा गोंधळलेल्या मनःस्थितींत नारायणरावानीं हातच्या निमचानें करून घेतलेल्या पोटावरील वाराकडे त्याचें लक्ष वेधणें शक्य नव्हतें. तसेंच सुमेरसिंग वगैरे लोक आल्यावेळीं नारायणरावांचें तोंड, दादासाहेबानीं त्यांना समोरून कवटाळून धरल्यामुळें, त्यांच्याकडे होतें व त्या आलेल्या लोकांना फक्त नारायणरावाची पाठ दिसत असल्यामुळें त्यांनाही नारायणरावांच्या पोटावरील वाराची कल्पना येण्याजोगी नव्हती पुढें तुळपा पवारानें पाय ओढल्यामुळें नारायणराव पडले ते पोटावरच पालथे पडले. त्यामुळें साहाजिकपणेंच नारायणरावानीं पोटावर वार करून घेऊन आत्महत्या केल्याचें कोणालाही समजून आलें नाहीं. तुळपा पवारानें नारायणरावांना खालीं पाडलें व सुमेरसिंगानें त्याच्यावर शस्त्र चालविलें तेव्हा ते बेशुद्ध स्थितींत असल्याचें पेशव्याच्या बखरींत नमूद असल्याचें दाखविलें आहे. (प्र १२ क ७). याप्रमाणें कोणालाही उघडपणें न समजण्यासारख्या स्थितींत हा आत्महत्येचा प्रयोग घडून आल्यामुळें यासंबंधीं ऐतिहासिक पुरावा मिळणें शक्य नाहीं, असा ग्रंथकारांनीं या मुद्यावर निर्णय दिला आहे. तो तत्कालीन सर्व परिस्थिति लक्षांत घेतां सयुक्तिक आहे असें ह्मणावें लागतें.

ग्रंथकारांचा पांचवा महत्वाचा मुद्दा 'नारायणराव पेशवे यांच्या मरणाचें खरें कारण कोणतें? खून कीं आत्महत्या' हा आहे. नारायणरावांनीं जो हातच्या निमचानें पोटावर वार करून घेतला, त्यामुळेंच त्यांना मृत्यु येणें शक्य होतें काय या गोष्टीची शारीरशास्त्रदृष्ट्या चर्चा करण्यांत आली आहे. नारायणरावांनीं आपल्या पोटावर केलेला वार डावे बाजूचे स्तनापासून खालीं

••

बेंबीच्या ठिकाणापर्यंत उतरता झाला होता. त्या डावे भागांत असलेलीं रक्ताशय, अमाशय वगैरे इंद्रियें व त्यांत असलेलीं मर्मस्थानें यांना इजा झाल्यास तीं तत्काळ मृत्यु कसा घडवून आणतात, हें त्या त्या आंतील इंद्रियांचें व मर्मांचें शास्त्रीयदृष्ट्या विवेचन करून दाखवून देण्यांत आलें आहे. ( पान १२९४, १२९५ क ३० व ३१ ). नारायणरावाच्या वारामुळें झालेली पोटावरील चीर कोथळा बाहेर पडण्याजोगी मोठीच असली पाहिजे. पोटांतील इंद्रियांना व त्यांतील मर्मस्थानांना या वारानें इजा झाली असल्यानें त्यांची शुद्धीही जाणें ही गोष्ट ओघानेंच प्राप्त होतें. अशा स्थितींत जरी तुळ्या पवारानें पाय ओढून नारायणरावांना खालीं पाडलें नसतें व सुमेरसिंगानें आपल्या हातांतील तेग्यानें त्यांच्यावर वार केले नसते तरी नारायणरावांचा मृत्यु खास घडून आला असता, असें साधार प्रतिपादन करून नारायणरावांच्या मृत्यूस त्यांनीं केलेली आत्महत्याच कारण आहे असा स्पष्ट निर्णय देण्यांत आला आहे. ( पान १२९६ क ३१ ). जरी नारायणरावांचा मृत्यु आत्महत्येमुळें झाला तरी तुळ्या पवार, सुमेरसिंग वगैरे मारेकरी व त्यांचे साथीदार हे दोषमुक्त होऊं शकत नसल्यानें त्यांचा समाचार घेतल्याखेरीज लेखणीला विश्रांति देणें ग्रंथकारांना योग्य न वाटल्यानें पुढील ‘ उपसंहार ’ या स्वतंत्र प्रकरणांत त्यांची चांगलीच हजेरी घेतल्याचें दिसून येतें.

## उपसंहार.

ग्रंथकारांनीं ‘उपसंहार’ हें प्रकरण या ग्रंथांतील मागील सर्व प्रकरणांत ज्या ऐतिहासिक गोष्टींचें विवेचन केलें आहे, त्यांतील सत्य निर्णय वाचकांच्या मनावर पुनः पूर्णपणें ठसावा ह्या दृष्टीनें लिहिलें आहे. प्रथम एकाच वेळीं निरनिराळ्या परस्परविरुद्ध अशा घटना घडून आल्यास त्या परिस्थितींत सत्यासत्याचा निर्णय करणें किती कठीण जातें याचें सोपपत्तिक विवेचन करण्यात आलें आहे. नारायणरावांच्या मृत्युच्या वेळीं अशा घटना घडून आल्याचें मागें दाखविलेंच आहे. परंतु नारायणरावांचा मृत्यु दुसऱ्या कोणत्याही घटनेमुळें न

होतां, तो आत्महत्येमुळेंच झाला हें सत्य शोधून काढण्याच्या कामीं शास्त्रीय प्रमेयांचें बरेंच सहाय्य झालें, तसें सर्व प्रसंगीं होणें शक्य नसल्यामुळें त्या त्या प्रसंगाच्या परिस्थितीवरून निघणाऱ्या सयुक्तिक अनुमानावरच भर द्यावा लागतो. अशी भूमिका तयार करून आपल्या उद्दिष्ट कार्यास ग्रंथकारांनीं सुरवात केली आहे.

नाना फडनविसांनीं राज्यकारभारांत शिरल्यापासून राजकारणें कसकशीं हाताळलीं व कसकशा कारवाया केल्या, याचें थोडक्यांत यथार्थ वर्णन करून त्यांनीं माधवराव पेशव्यांना आपल्या लगामीं ठेऊन बाकीच्या पेशव्यांना केवळ नामधारी कसें बनविलें होतें व लष्करी सत्तेसुद्धा सर्व सत्ता हातीं ठेवण्याचा प्रयत्न सतत कसा चालू ठेवला होता व **नाना ह्मणजे पेशवाई व पेशवाई ह्मणजे नाना** ही नानाशाहीची परिस्थिति त्यांनीं कशी निर्माण केली होती हें स्पष्टपणें दाखविण्यांत आलें आहे. (पान १३०० ते १३०३ क २ व ३). आपलीं कारस्थानें पार पाडण्याकरतां नानाना क्षुद्र मनोवृत्तीची व बुभुक्षित माणसें आपल्या हातीं ठेवणें भाग पडत असे. घाशीराम कोतवाल, बाजीराव मोरेश्वर, सर्जेराव घाटगे, तुळ्या पवार वगैरे क्रूर, बदफैली व नीच माणसांना आपल्या कह्यात ठेऊन त्याचा नानांनीं कसा उपयोग करून घेतला हें मागें दाखविलेंच आहे. नारायणरावांना धरण्याच्या केलेल्या कटाच्या पोटशीं नारायणराव व राघोबादादा या दोघांनाही मारून टाकण्याचा कट करून ती कामगिरी नानांनीं आपला हुकमी हस्तक तुळ्या पवार याजकडे सोंपविली होती. परंतु त्यानें ती योग्य रीतीनें बजावून राघोबादादाना ठार करण्याची कामगिरी पार न पाडल्यामुळेंच नानाचा तुळ्यावर रोष झाला. नारायणरावाबरोबर राघोबादादाचा बळी घेण्याचा बेत फसल्यामुळें नानांनीं पुढें कशीं विविध कारस्थानें करून नारायणरावांच्या वधाचा आरोप दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न केला हें दाखवून देऊन अशा कामीं नानांच्या कौशल्याचें वर्णन ग्रंथकारांनीं पुढील शब्दात केलें आहे. "दुसऱ्यांवर आरोप लादण्यांत व चोराला सोडून संन्याशाला

बळी देण्यांत नाना इतके तरबेज व पटाईत होते कीं, त्या बाबतींत त्यांना बिनतोड उपमा देणें झाल्यास ती नानांची म्हणजे त्यांची स्वत:चीच द्यावी लागेल." ( पान १३०६ क ९ ).

नारायणरावांच्या संरक्षणाची जबाबदारी नानाकडे सोंपविण्यांत आली होती. असें असतां ह्याप्रमाणें नारायणरावांना व दादासाहेबांना मारण्याचा गुप्त कट केल्यामुळें नारायणरावांना पाडून त्यांच्यावर तेग्याचे वार करून त्यांच्या शरीराचे तुकडे तुकडे करण्यात आले. नानांच्या हातीं राज्याचा कारभार असतां व नाना खुद्द पुण्यास हजर असता, या गोष्टी घडल्या. यावरून या गुप्त कटाचे प्रवर्तक म्हणून नानांच्यावरच ही गुन्हेगारी निःसंशय येते, असें ग्रंथकारांनीं दाखविलें आहे. नानांना हा खुनाचा आरोप दादासाहेबांवर लादण्यांत, रामशास्त्री प्रभुणे हे पूर्णपणें नानांच्या पक्षातील असल्यामुळें, त्यांची नानांना मदत झाली होती. त्याचप्रमाणें त्यांनीं सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्याचे कामींही नानांना मदत केली होती. हरिपंत फडके यानींही या कामीं नानाना मदत कशी केली होती हें मागें दाखविलेंच आहे. नाना आपले हस्तक व साथीदार यांना पाठीशीं घालून कसा बचाव करीत असत, हें हरिपंत फडक्यांच्या व घाशीरामाच्या उदाहरणावरून स्पष्ट करण्यांत आलें आहे. नारायणरावांचा मृत्यु घडवून आणण्याच्या कामीं नानांना जरी त्यांच्या साथीदाराकडून मदत झाली होती, तरी त्या घटनेसंबंधींचे मुख्य गुन्हेगार नानाच होत, असा सिद्धात ग्रंथकारांनीं पुढें मांडला आहे. ( पान १३०७ क ६ ).

नारायणरावाच्या मृत्युसंबंधीं पुढाकार घेऊन प्रत्यक्ष भाग घेणाऱ्या सुमेरसिंग, तुळया पवार वगैरे इसमाना शिक्षा करण्यांत आल्या आहेत. या कामीं नाना हे मुख्य गुन्हेगार असताही आजवर शीरसलामत पार पडले. त्याच्या पापाला आतां वाचा फुटून या गुन्हेगारीचें पुरें माप त्यांच्या पदरीं पडल्यानें त्यांना त्याबद्दल शिक्षा होणें आवश्यक व न्यायाचें आहे. त्यांना शिक्षा करतांना त्या शिक्षेचें स्वरूप ठरविण्यासाठीं त्यांनीं राज्यकारभार हातीं घेतल्यापासूनची

त्यांची वर्तणूक लक्षांत घेणें जरूर असल्याचें प्रतिपादन करून ग्रंथकारांनीं त्यांच्या वर्तणुकीचें परीक्षण करण्याच्या हेतूनें महत्वाचे चार मुद्दे काढून त्यांचा क्रमशः विचार केला आहे. या चार मुद्यांच्या विवेचनांत नानांच्या राजकीय चारित्र्याचें सार-सर्वस्व सांठविलें आहे, असें दिसून येतें. (पान १३०८ क ७).

या चारी मुद्यांचे सयुक्तिक विवेचन करून त्या कामीं नानांनीं वेळो-वेळीं घडवून आणलेल्या ऐतिहासिक घटनांचे दाखले देऊन व नानांनीं विशिष्ट प्रसंगीं केलेल्या वर्तणुकीचें स्वरूप कसें होतें हें दाखवून देऊन नानांच्या निजस्वरूपावर ग्रंथकारांनीं चांगलाच प्रकाश पाडला आहे. या विवेचनात ग्रंथकारानीं मुख्यतः पुढील गोष्टी स्पष्ट केल्या आहेत. ' नानांनीं पेशवे घराण्यांतील कोणाही स्त्रीपुरुषाचें कल्याण केलें नाहीं. उलट त्याचा परो-परीनें नाशच केल्याचें दिसून येतें. आपल्या कारवाईनें त्यांनीं पेशव्यांची इभ्रत धुळीस मिळविली. नानानीं वेळोवेळीं केलेल्या अक्षम्य गुन्ह्यामुळें पेशवाईचें व त्यातील प्रजेचें अतोनात नुकसान झालें. नानांच्या वर्तणुकीवरून त्यांनीं केलेले गुन्हे निव्वळ आपल्या स्वार्थ साधनाकरताच त्यांनीं केले होते असें स्पष्टपणें दिसून येतें. राजा, प्रजा, मित्र, गुरु, पत्न्यादि आप्त इष्ट मंडळी, ज्ञाति, धर्म आपलें स्वतःचें कुल व स्वराज्य सुद्धां सर्वांचा नानानीं आपल्या उभ्या आयुष्यांत द्रोहच केला असें दाखवून नाना ते आतां भौतिक स्वरूपांत हजर नसल्या-मुळें, निराळ्याच पद्धतीची पाच कलमी शिक्षा ग्रंथकारांनीं आपल्या अधिकारांत फर्माविली आहे. हें या चारी मुद्यांवर करण्यात आलेलें विवेचन मूळ स्वरूपांत विचारपूर्वक वाचूनच वाचकानीं आपल्या जिज्ञासेची तृप्ति करून घेणें इष्ट आहे. त्यामुळें वाचकांना, ग्रंथकारांनीं आपल्या अधिकारांत नानांना दिलेल्या शिक्षेची योग्यायोग्यता अजमाविण्यास खास मदत होणार आहे. या शिक्षेच्या अंमल-बजावणीचें काम, जनतेवरच आपल्या इच्छेप्रमाणें करून घेण्याचें ग्रंथ-कारांनीं सोंपविल्यामुळें न्यायाच्या दृष्टीनें समग्र ग्रंथाचें विचारपूर्वक आलोचन करूनच तो अधिकार प्राप्त करून घेणें जरूर आहे. ग्रंथकारांकडून पेशवाईतील

ऐतिहासिक व्यक्तींच्या व राजकीय घडामोडींच्या करण्यांत आलेल्या वर्णनाचें 'वैशिष्ठय' दाखविण्याच्या सद्हेतूनें व सत्यान्वेषणास मदत करण्याच्या हेतूनेंच प्रस्तावनेच्या प्रपंचाची वरील प्रमाणें सविस्तर उभारणी करणें इष्ट वाटलें. ग्रंथकारांनीं 'गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः' या न्यायानें आजपर्यंतच्या इतिहासकारांची बखरीकारांची व विशिष्ट लोकांची री न ओढतां व व्यावहारिक इष्टानिष्टतेचीही पर्वा न करता व आजपर्यंत चालत आलेल्या नाना फडनविसांच्या दराऱ्यासही भीक न घालतां पूर्ण विचारांतीं आपल्या मनाला पटलेले सिद्धांत व ऐतिहासिक गोष्टींत दडून राहिलेलें सत्य स्पष्टपणें या ग्रंथांत नमूद केल्याबद्दल ग्रंथकार धन्यवादास पात्र आहेत यांत शंका नाहीं. या ग्रंथाच्या वाचनानें वाचकांच्या मनावर कित्येक ऐतिहासिक घटनाच्या सत्यासत्यतेचा स्पष्ट प्रकाश पडून श्रमसाफल्य झाल्याचें समाधान वाचकाच्या पदरीं पडेल अशी खात्री वाटते.

शेवटीं ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथाचा अभ्यास करण्याची व त्यावर विस्तृत प्रस्तावना लिहून देण्याची संधि दिल्याबद्दल ग्रंथकाराचे मनःपूर्वक आभार मानून व मूळ ग्रंथ वाचनास आतुर झालेल्या जिज्ञासू व इतिहासप्रेमी वाचकाची क्षमा मागून वाढलेला हा प्रस्तावनालेख संपवितों.

ज्येष्ठ वा|| १४ शके १८६६
ता. १९-६-४४, बेळगाव.

श्रीधर बळवंत नगरकर,
(केल्लकर.)

# अभिप्राय.



१.

श्रीयुत डॉ. पां. गो. रानडे यांनीं परिश्रमपूर्वक तयार केलेला, खूप पदरमोड करून छापविलेला आणि जबरदस्त जबाबदारी पत्करून प्रसिद्धीपर्यंत आणलेला प्रस्तुत ग्रंथ छापत गेला तसतसा प्रकरणशः मला त्यांच्या कृपेनें पहावयास मिळाला. (१) नारायणराव पेशवे याचा **शेवट,** (२) राघोबादादा व आनंदीबाई वगैरेंचें **चारित्र्य** आणि (३) नाना फडनविस यांचा **लौकिक** या तीन बाबतींत लोकांच्या ज्या प्रचलित समजुती आहेत त्या निराधारच नव्हत तर सपशेल चुकलेल्या आहेत असें सप्रमाण सिद्ध करण्याची या ग्रंथाची महत्वाकांक्षा आहे. " ऐतिहासिक व्यक्ति वा प्रसंग याविषयीं वाचकांच्या दृढमूल होऊन बसलेल्या समजांस एकाद्या अनपेक्षित रीतीनें धक्का देण्याचें कोणी मनांत आणल्यास तें वाचकांस अगदीं खपणार नाहीं; आणि आपल्या विचार-संपन्नतेवरच तो घाला आला आहे अशी हांकाटी केल्याशिवाय ते कधींही राहणार नाहींत......नव्यानेंच उजेडात येणारा पुरावा कितीही भक्कम असो, वाचकांच्या ठिकाणच्या मनोविकारास, पूर्वग्रहांस किंवा त्यांच्या हितसंबंधांस स्थानभ्रष्ट करण्यास—किंबहुना, बुद्धिमंतांच्याहि विचारदौर्बल्यास दूर सारण्यास—तो कांहीं काळ तरी अगदीं असमर्थ असतो." असा स्वानुभवाचा एक सिद्धांत विख्यात फ्रेंच ग्रंथकार ' अनातोल फ्रान्स ' यानें एके ठिकाणीं मांडला आहे. या ग्रंथामुळें ग्रंथकाराविरुद्ध चांगलीच वावटळ उठल्याशिवाय राहणार नाहीं. तशी जाणीव त्यास भरपूर असतांहि केवळ सत्यान्वेषणाच्या भरीं पडून त्यांनीं आखाड्यांत उतरण्याचें प्रशंसनीय साहस केलें आहे.

वरील तीन बाबींपैकीं १ ली ग्रंथकारांनीं शास्त्रोक्त पद्धतीनें निर्विवाद सिद्ध केली आहे. शिवाय ती सिद्धता कोणालाही बाधक होत नसल्यानें तिजवर

आक्षेप घेण्याचेंहि कोणास कारण पडणार नाहीं दुसऱ्या बाबीसंबंधांत लोकमताला निराळें वळण लावण्याचा प्रयत्न यापूर्वीच ३।४ वेळां करण्यांत आला असून प्रस्तुत ग्रंथानें तें काम बऱ्याच अंशानें तडीस नेलें आहे. मात्र नाना फडनविसांचें हल्लींचें उच्चस्थान राघोबास देण्याची शिफारस मान्य होण्याइतका लोकमतांत फरक पडेल असें वाटत नाहीं. तिसऱ्या बाबीसंबंधांत मात्र भयंकर रणकंदन माजल्याशिवाय राहणार नाहीं. या मुद्यावरील ग्रंथकारांची नानांच्या विरुद्ध फिर्याद अगदीं कल्पनातीत—देवाला सैतान ठरविण्याच्या तोडीची आहे. नानांवर केलेले आरोप अनेक असुन त्यातील अनेक भयंकर किंवा गलिच्छ स्वरूपाचे आहेत. त्यांतील कित्येक आरोप यापूर्वींहि इतरांनीं नानांवर केलेले आहेतच; परंतु या ग्रंथात सर्वच आरोपाचें समर्थन फार विस्तृतपणें केलें असुन आधार व प्रमाणें यांची त्यांस भरपूर जोड दिली आहे आणि अनुमान–प्रमाणाचा भरपूर उपयोग केला आहे. सर्व पुस्तकभर नानांचें चित्र असें रंगविलें गेलें आहे कीं सत्कृदर्शनीं नानांवर केलेल्या बऱ्याच आरोपांचा **'चार्ज'** ठेविल्याखेरीज गत्यंतर दिसत नाहीं. प्रॉसिक्यूशनतर्फे बाजू माडण्यांत कसलीहि कमतरता न राहील इतकी खबरदारी घेण्यांत आलेली आहे. ग्रंथप्रसिद्धीनंतर त्याजवर टीकांचा भडिमार होईलच. नानांचे अभिमानी त्यांच्या बचावास हिरिरीनें पुढें येऊन आपली शिकस्त करतील यांतहि शंका नाहीं. ग्रंथकारहि त्यांस अखेरचें उत्तर देतील. हें सर्व झाल्यावर आरोपांचा "खरे खोटेपणा" सुशिक्षित, विचारवंत आणि निःपक्षपाती इतिहासप्रेमी जन ठरावितील. तो निर्णय कसाहि लागला तरी ग्रंथकारांचे त्यांनीं सत्यान्वेषणार्थ केलेल्या अमोल परिश्रमाबद्दल इतिहासज्ञ सर्व प्रकारें ऋणी राहतीलच राहतील. त्यांचें लिहिणें सर्वत्र स्पष्ट व सुबोध आहे. छपाई, कागद वगैरे इतर ग्रंथसामग्री चांगली आहे. ग्रंथकारांच्या ठिकाणीं न्यायनिष्ठुरपणा व अन्यायाची मनस्वी चीड दिसत असुन स्वपरभावास त्यांनीं थारा दिलेला नाहीं आणि पूर्वग्रहापासून ते आलिप्त राहिले आहेत. खऱ्या इतिहासाच्या संशोधनाची त्यांची तळमळ व लोकनिंदेची परवा

न ठेवितां आपले विचार जनतेपुढें मांडण्याची त्यांची कळकळ अभिमानास्पद आहेत.

कोल्हापूर,
तारीख १०-७-४४

गो. स. सरदेसाई.

—o—

२

नारायणराव पेशवे यांचा अपमृत्यु हा उत्तर पेशवाईच्या इतिहासाचा मध्यबिंदु धरून त्या दुर्दैवी घटनेच्या पूर्वीचा व नंतरचा बराच इतिहास प्रस्तुत पुस्तकांत रा. रानडे यानीं वर्णिलेला आहे. कदाचित 'नाना फडणीसाच्या कारभाराचें समालोचन' हें किंवा या अर्थाचें नावहि या पुस्तकाला शोभलें असतें. शाहु महाराजांच्या मृत्यूपासुन नानाच्या मृत्यूपर्यंतच्या पन्नास वर्षांच्या पेशवाईच्या इतिहासाचें रा. रानडे यानीं या सुमारें १३०० पानाच्या ग्रंथात सविस्तर आणि काळजीपूर्वक विवरण केलें आहे. पेशवाईच्या इतिहासावरील अनेक लेखकांच्या मताविरुद्ध मतें रा. रानडे यानीं प्रस्तुत पुस्तकात प्रतिपादिलेलीं असल्यामुळें त्या लेखकाना व त्यांच्या चाहत्याना अर्थातच तीं आवडणें शक्य नाहीं. तथापि सर्व प्रतिपादन पुराव्यानें सिद्ध करण्याचा रा. रानडे यांनीं परिश्रमपूर्वक यत्न केला असून त्याची विचारसरणी कोणत्याही विकारवशतेच्या कारणांपासुन अलिप्त आणि तर्कशुद्ध आहे. ज्याना त्याची काहीं मतें पटणार नाहींत त्यांना देखील या पुस्तकाच्या वाचनापासून पुष्कळच फायदा होईल. कारण आपण आजवर गृहित मानलेल्या ऐतिहासिक सिद्धांताविरुद्ध काय दाखवितां येण्यासारखें आहे हें समजणें देखील महत्वाचेंच आहे. १८ व्या शतकाच्या महाराष्ट्रीय इतिहासाचें रा. रानडे यांनीं पूर्वग्रहरहित मनानें अध्ययन केलें आहे हें या पुस्तकावरून स्पष्ट दिसतें. या अभ्यासाचीं फळें त्यांनीं मराठी वाचकांना दिल्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करितों.

बेळगांव,
ता. १९।७।४४.

आ. बा. लठ्ठे,
एम्. ए. एल्एल्. बी.

—o—

३

बेळगांव येथील ' महाराष्ट्र औषधी कारखान्याचे ' मालक डॉ. पांडुरंग गोपाळ रानडे यांनीं ' नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या ' हा भला मोठा ऐतिहासिक ग्रंथ छापून त्याच्या प्रकाशनापर्यंत मजल गांठली आहे. त्या ग्रंथांतील प्रतिपादन केलेल्या ऐतिहासिक सत्यासत्यतेच्या गोष्टीशीं आमचा कांहींच संबंध नाहीं. तो विषय इतिहासज्ञांचा आहे. आमचा विषय केवळ आयुर्वेदापुरताच आहे. प्रस्तुत ग्रंथांत महादजी शिंद्यांचा मृत्यु नवज्वरानें झाला किंवा नाहीं याची चर्चा शास्त्रशुद्ध पद्धतीनें करण्यांत आलेली आहे. ती अगदीं यथायोग्य आहे. नवज्वरासारखे दोषी ज्वर वरचेवर येत नाहींत. नवज्वरांतून एकदां रोगी पूर्ण बरा झालेनंतर त्याला पुनः सात आठ महिनेच्या फरकानें तो ठाम येऊं शकत नाहीं. नवज्वर हा वरचेवर मनुष्याला येत असतो असा आधारहि आयुर्वेदांत कोठें नाहीं. यावरून पहातां महादजी शिंद्यांचा मृत्यु जो अकल्पित रीतीनें घडून आला त्याला नवज्वर हा विकार मुळींच संभवत नाहीं. त्यांच्या मृत्यूचीं कारणें नवज्वराव्यतिरिक्त असलीं पाहिजेत असा आमचा अभिप्राय आहे.

| | |
|---|---|
| **कोल्हापूर,** | राजवैद्य—**शंकरराव आनंदराव जगताप,** |
| ता. २७-७-४४ | चालक—आयुर्वेदिक केमिकल वर्क्स-कोल्हापूर. |

—o—

४

रा. पांडुरंग गोपाळ रानडे यांनीं ' नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या ' हा ऐतिहासिक ग्रंथ छापून प्रसिद्धीपर्यंत आणिला आहे. त्यांत नारायणरावांचा खून झाला नसून त्यांनीं आत्महत्या करून घेतली हें शास्त्रीय पद्धतीनें सिद्ध करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. या ग्रंथांतील प्रकरण ४२ वें हें त्याच्याच सिद्धतेकरतां लिहिण्यांत आलें आहे. त्यांतील बिनोट पद्धतीचें स्पष्टिकरण अगदीं शास्त्रशुद्ध आहे. आमच्या अप्रकाशित शस्त्रशास्त्राच्या

बाडांत बिनोटसंबंधीं पुढीलप्रमाणें ओंव्या आहेत. ॥ विधि निषेध नियमा जो जाणत। तत्वोपतत्वेंही समस्त। मिळवी सिद्धी जाणे सिद्धांत। शस्त्रशास्त्राचे ॥१॥ तैसी मल्लविद्याही जाणत। तोडी मोडी समस्त। शरीरमर्मेंही जाणत। बिनोटी श्रेष्ठ तो जाणावा ॥२॥ त्याचप्रमाणें चढाई व बचाव यासंबंधीही जी चर्चा केली गेली आहे तीहि पूर्ण शास्त्रशुद्ध पद्धतीची आहे. त्यासंबंधीं आमचे बाडांत पुढील आर्या आहे.

योग्य चढाई ती कीं जेथें तरतुद हो बचावाची ॥
योग्य बचाव असे तो ज्यामधिं तरतूद हो चढाईची ॥

एकंदरींत पाहतां ग्रंथकारांनीं सदर प्रकरणांत जी शस्त्रशास्त्राची माहिती दिली आहे ती माझे मतें शास्त्राला धरून आहे यांत शंका नाहीं. तेग्याचे वारानें पुस्तकांत वर्णन केल्याप्रमाणें कोथळा बाहेर येऊं शकत नाहीं; ही ग्रंथकारांची विचारसरणी अगदीं बरोबर आहे. कोथळा बाहेर येणें, साखरभात बाहेर पडणें, राघोबादादांना डोक्यावर एक व डाव्या हातावर एक असे दोन वार होणें यासंबंधीं ग्रंथकारांनीं जी शास्त्रशुद्ध चर्चा केली आहे ती तंतोतंत बरोबर आहे. **'हातचानिमचा'** या शस्त्रानें वरील गोष्टी घडून येऊं शकतात. तेग्याच्या वारानें त्या गोष्टी घडल्या असें ह्मणणें शस्त्रशास्त्राला सोडून आहे. रा. रानडे यानीं यासंबंधीं केलेली सर्व चर्चा शास्त्राला धरून असल्याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे.

| | |
|---|---|
| **जमखंडी,** | **गोपाळ विष्णु जोशी, सुभेदार.** |
| ता. १०-८-४४ | माजी चालक व शिक्षक व्यायाम शाळा-जमखंडी. |

—o—

५

माझे बालमित्र रा. रा. पाडुरंग गोपाळ रानडे यांनीं उत्तर पेशवाईचा इतिहास 'नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या' या अद्भुतरम्य आणि कुतुहलजन्य शीर्षकाखालीं छापून तयार केला आहे. हा मूळ ग्रंथ १३००

पानांपेक्षां अधिक असून प्रस्तावनाहि मूळ ग्रंथाला शोभेल अशी सुमारें दोनशें पानांची आहे. नाना फडनविसांनीं आपल्या कारकीर्दींत नानाविध कारस्थानें हाताळलीं असल्यामुळें इतिहासाची संगती आजपर्यंत लागावी तशी लागली नव्हती. परंतु रा. रानडे यानीं काळजीपूर्वक इतिहास संशोधन करून ती कामगिरी बजावली आहे. या पुस्तकांत नाना फडनविसांची जन्मपत्रिका दिली असून नानांच्या कुंडलीवर्णनाचें काम होराभूषण दीक्षित यानीं सायन पद्धतीनें केलेलें आहे. फलितांतील सायन निरयन वाद कसाहि असो. येथें फक्त फलितांची ताळेबंदी आह्मांस पहाणें आहे. होराभूषण दीक्षित यांनीं वर्णिलेलीं नानांच्या कुंडलीची फलितें निरयन पद्धतीच्या फलाशीं ततोतंत जमतात एवढी मात्र गोष्ट सत्य आहे. या पुस्तकांत पान १२३७ पासून पुढें १६ पानें नानांच्या पत्रिकेचा मजकूर व त्या विषयींचें विवेचन दिलेलें आहे सदर पत्रिकेचें गणित तत्कालीन रूढ ग्रंथाप्रमाणें निरयन पंचागाला अनुसरून असेंच आहे; आणि त्या निरयन पद्धतीला धरून फलित पद्धतींपैकीं यावनीय रीतीचीं फलें तिथ्यादिकाचीं दिलेलीं आहेत. त्याच्याशीच एकंदर पद्धतीनें या पुस्तकात वर्णिलेल्या नानांच्या चरित्राचा मेळ लागतो असें आमचें थोडक्यांत पण स्पष्ट ह्मणणें आहे. स्थळ संकोचामुळें येथें विस्तृत अभिप्राय देता आला नाहीं. प्रसंग विशेषीं तो आह्मीं देऊं.

मिति आषाढ कृष्ण १२ सोमवार तारणनाम शके १८६६.

भा. रा. उर्फ **भास्कराचार्य जोशी** ज्योतिषी
गोसेवक पंचाग कर्ते, बेळगाव.

— o —

६

रा. रा. पांडुरंग गोपाळ रानडे यांनीं लिहिलेल्या प्रचंड ऐतिहासिक ग्रंथाच्या प्रसिद्धीकरणापूर्वी माझ्या एका इतिहासप्रेमी मित्राकडून त्याची ओळख करून घेण्याची संधी मला मिळाली. 'नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या' या नामाभिधानानें हा ग्रंथ प्रकाशित होत आहे. १२००-१३००

पानांच्या मोठ्या ग्रंथाला २०० पानांची 'ओळख वजा' प्रस्तावना आहे. अशा या अफाट ग्रंथाचें परीक्षण करणें अत्यंत धाडसाचें व यावेळीं थोडेसें अनुचितच ठरेल. तथापि या ग्रंथाची ओळख करून घेण्यांत मला जो आनंद झाला त्यामध्यें वाचकांना या प्रसंगीं समभागी करण्यांत माझा आनंद द्विगुणितच होणार आहे. यासाठीं हे चार शब्द लिहित आहे.

पेशवाईतील सांप्रत सर्वमान्य मानल्या जाणाऱ्या नारायणरावांच्या खून प्रकरणावर नवाच प्रकाश टाकण्याच्या उद्देशानें लेखकांनीं अत्यंत दीर्घ परिश्रम करून त्याचीं फळें मुख्यतः इतिहास प्रेमी विद्वानांपुढें व सामान्यतः देशप्रेमी जनतेपुढें ठेविलीं आहेत. हा प्रचंड उद्योग पाहिला म्हणजे साश्चर्य कौतुक वाटतें.

नारायणरावांचा मृत्यु हा मुख्य विषय असला तरी त्यावर सत्य निर्णयात्मक निकाल देण्यासाठीं विषयाची पार्श्वभूमी व त्याचा पुरोभाग ( नंतर उत्पन्न झालेलीं फळें ) याचें लेखकांनीं अती विस्तृत प्रमाणावर छेदन करून ( वृक्षाच्या मुळापासून ते फळापर्यंत सखोल अभ्यास करून ) मुख्य विषयावर नवा प्रकाश पाडण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. या सर्व उद्योगामधून पेशवाईचा सबंध नवाच इतिहास पुढें आणला आहे. थोरल्या बाजीरावानंतर वंशपरंपरा 'पेशवाई' रुजली. पेशवाईचा इतिहास 'बऱ्या वाईट' फळासहित 'महाराष्ट्र' साम्राज्याशीं एकरूप बनला व पेशव्याच्या शेवटच्या नादान राजकारणानें दोन्हीहि ( इतिहासाचे पोटीं ) नाहींसे झाले. या सर्व प्रकरणावर प्रस्तुत लेखकानीं नवा प्रकाश टाकला आहे. नानासाहेब पेशव्याच्या चिटणिसाच्या मदतीनें साताऱ्च्या कारवाया; थोरले माधवराव व राघोबादादा यांच्या हालचालींचें सूक्ष्म छेदन; प्रसिद्ध नाना फडणविस याचें कारस्थानपटुत्व; या सर्वांवर नवा प्रकाश टाकून या मधूनच "नारायणरावास आत्महत्या करावी लागली, राघोबा थोर सेनापती, उदार कुटुंब संबंधी, श्रेष्ठ नीतिमान, अशी व्यक्ती झाली व त्यांना कारस्थानी नानादि बारभाईमुळें केवळ नाइलाजास्तव इंग्रजाकडे जावें लागलें" असा निकाल लेखकांनीं दिला आहे.

या सर्वांसाठीं जरूर तीं सनदापत्रें नि अशाच पुराव्याचा आधारहि दिला आहे पण काढलेलीं अनुमानें निव्वळ यावरच आधारलेलीं आहेत किंवा काय व तीं पूर्णांशानें ग्राह्य आहेत किंवा काय हें अभ्यासु वाचकांनीं ठरवावयाचें आहे. निदान या प्रसंगीं तरी मी माझें मत देऊं इच्छित नाहीं. पण येथें इतकेंच सुचवूं इच्छितों कीं, एकंदरींत हीं अनुमानें पुष्कळ अंशी " क्रांतिकारक " आहेत. तथापि लेखकांच्या दीर्घोद्योगाच्या प्रयत्नाकडे पाहिल्यास हीं अनुमानें कोणाहि अभ्यासकास सहजासहजीं बाजूला टांकतां येणार नाहींत. हीं स्वीकारल्यास स्वीकृत अनुमानांत मोठी क्रांती होईल पण यासाठीं भिण्याचें कारण नाहीं.

**कोल्हापूर,**
तारीख १४।८।४४.

**जी. एस्. देशपांडे**, बी. ए. बी. टी.
प्रोफेसर बी. टी. कॉलेज-कोल्हापूर.

—o—

७

श्रीयुत पा. गो. रानडे याचा माझा परिचय गेल्या ३० वर्षांचा आहे. आमचा परिचय मुळीं होण्याचें कारण ह्मणजे मराठ्याच्या इतिहासाच्या चर्चेची आवड हें होय. या ३० वर्षांच्या दीर्घ परिचयामध्यें श्री. रानडे याची चिकाटी, त्यांची इतिहासाच्या व्यासंगातील चिकित्सक बुद्धि व सत्यान्वेषणाची तळमळ याची मला पूर्ण ओळख झाली आहे. आजवर प्रकाशित झालेल्या इतिहास ग्रंथामध्यें जी एकांगीणता व सर्वत्र पेशवाईत प्रसिद्धीस आलेल्या मुत्सद्याचा व योद्धयांचा जो बोलबाला दिसून येतो त्याचा मेळ पेशवाईच्या नाशाशीं कसा बसतो या गूढाचें विवरण करण्यात आह्माला पुष्कळदा ' रात्रिरेव व्यरंसीत् ' असें ह्मणण्याची पाळी आली आहे. "भरया बुद्धिचे सागर" जे नाना फडणीस यांनीं " खूब शर्थीनें राखिलेलें राज्य " एकदम कसें विलयाला गेलें याचा विचार करता " देवीदास कहे मुझे गरज नहीं राज्य डुबाया बम्मनकी " याचाच पडताळा पदोपदीं येऊं लागल्याचें श्री. रानडे यांच्या विस्तृत विवेचना-

वरून पटल्यावांचून राहणार नाही. कोणतेंही राज्य एकदम नाश पावत नाहीं. त्याला कीड लागून तें कुजावें लागतें; ही कीड कोणती याच्यावर श्री. रानडे यांनीं लख्ख प्रकाश टाकिला आहे.

इतिहासावर नवा प्रकाश पडल्यामुळें पूर्वीच्या इतिहास-लेखकांनीं ठरविलेल्या व पोराबाळांपर्यंत पोहोंचलेल्या सिद्धांताला धक्का पोहोंचणार पण त्याला उपाय नाहीं. सत्य हें उशिरा कां होईना पण बाहेर पडल्यावांचून रहात नाहीं. श्री. रानडे यांनीं जी जोरकस बाजू मांडिली आहे त्याचा विचार होऊन मराठ्यांच्या इतिहासाला नवें वळण लावावें लागेल. ज्या ऐतिहासिक व्यक्तींना आजपर्यंत सर्वांचे शिव्याशापच खावे लागले त्याच्या संबंधीं श्री. रानडे यांनीं परिश्रमपूर्वक अभ्यास करून जी संगति लाविली आहे त्याबद्दल त्यांच्या आत्म्यांकडून तरी त्याना धन्यवाद खास मिळतील. देऊळ बांधण्यापेक्षां एकाद्या देवळाचा जीर्णोद्धार करण्यांत जास्त पुण्य आहे, असें आमची आर्यसंस्कृती सांगते.

'तोतयाच्या बंडाच्या' प्रकरणामध्यें श्री. रानडे यांनीं सर्व मुद्यांचा विचार करून शेवटीं जो निर्णय ठराविला आहे त्याकडे पाहिलें असतां निर्विकार व पूर्वग्रहदूषित दृष्टी सोडून इतिहाससागरामध्यें उतरल्यावर कोणतीं रत्नें हातीं येतात हें कोणालाही अनुभविल्यावांचून समजणार नाहीं.

असा विचारप्रवर्तक ग्रंथ लिहिल्याबद्दल श्री. रानडे यांचे हार्दिक अभिनंदन करण्यापलीकडे मी अधिक काय करूं शकणार ?

कोल्हापूर,
१९।८।१९४४.

एम्. जी. देशपांडे,
बी. ए. एम्. टी. सी.



॥ श्री ॥

# नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या?

## प्रकरण १ लें

## प्रवेश.

( इसवी सन १६७४ ते १७४८ )

१. नारायणराव पेशवे याच्या खुनासंबंधीं प्रमाणभूत ऐतिहासिक माहितीचा अभाव ऐतिहासिक उपलब्ध माहितीतील गोंधळ. विश्वसनीय एतिहासिक माहिती कशी मिळू शकेल.—२. ऐतिहासिक माहितीसंबंधी कार्यकारणभाव व एतिहासिक साखळीचे दुवे एके ठिकाणी आणून ते जुळविण्याची आवश्यकता.—३. नारायणराव पेशव्याचा खून होणे अगर त्यानी आत्महत्या करून घेणें याची कारणपरंपरा कशी भिन्न आहे.—४. इतिहासाला वृक्षाची उपमा कां ?—५ छत्रपती शाहुमहाराजापासूनची पुढील राजकीय घडामोड.—६. श्री छत्रपती शिवाजी महाराजांनीं हिंदुपदपादशाही स्थापन केल्यापासून शाहुमहाराज गादीवर येईपर्यंतचा त्रोटक वृत्तांत —७. थोरल्या बाजीरावाची आमदानी. मराठी साम्राज्याचीं तत्वें बाजीरावाचे धाकटे बंधु चिमाजीआपा व भिऊबाई आणि अनुबाई या दोन बहिणी याची थोडी हकीकत.—८. थोरले बाजाराव यांचा वंशविस्तार. मस्तानी व समशेर बहादूर व चिमाजीआपा याच्या वंशविस्तारासंबंधी त्रोटक माहिती —९ नानासाहेब पेशवे, राघोबा दादा व जनार्दन बाबा यांचा वंशविस्तार:—१०, नानासाहेब यास पेशवेपद मिळण्याबद्दल चिमाजीआपांची खटपट. रघोजी भोसले नागपूरकर याचा या गोष्टीस विरोध.

छत्रपती शाहूंनीं शेवटीं नानासाहेबांची पेशवेपदावर स्थापना केली.--११. चिमाजीआपांचा मृत्यु. सदाशिवरावभाऊ यांना नायबपेशव्याचीं वस्त्रें मिळून त्यांचे जागीं महादाजीपंत पुरंदरे यांची काम पहाण्यापुरती नेमणूक.-१२. सदाशिवरावभाऊंस दुय्यम पेशवा नेमला असतां त्यांचेकडे नानासाहेब दुर्लक्ष करूं लागले. पेशवाईतील गृहकलहाचा उदय. सदाशिवरावभाऊ साताऱ्याहून पुण्यास येतात.—१३. पेशवे घराण्यांत गृहकलहाला सुरुवात कोणाकडून व कशी झाली. गोपिकाबाई याच गृहकलहाच्या जननी. नानासाहेब पेशव्यांचें या बाबतीतील धोरण.—१४. छत्रपतींची द्विदल-राज्यपद्धती. याच तत्वावर बाजीराव व चिमाजीआपा यांच्या अनुक्रमें पेशवा व दुय्यम पेशवा या जागीं नेमणुका. याच तत्वावर रघोजी भोसले व कोन्हेरराम यांच्या नेमणुका. द्विदल-राज्यपद्धती ही हिंदुपदपादशाहीच्या राज्याची छत्रपती गुरुकिल्ली मानीत होते. नानासाहेब पेशव्यास ही पद्धत अमान्य होती.—१५. नानासाहेबांनीं सदाशिवरावभाऊची मानांत व शिक्षणांत चालविलेली अनास्था.

१. इ. स. १७७३ मध्यें नारायणराव पेशवे यांचा खून, रघुनाथराव दादा पेशवे आणि त्यांची पत्नी आनंदीबाई यानीं राज्याधिकाराच्या लालसेनें करविला असें आजपर्यंतचे बखरीकार, इतिहासकार, चरित्रकार, ऐतिहासिक पत्रें-यादी यांचे प्रकाशक वगैरे ह्मणत आले. नारायणराव पेशवे यांच्या खुनासबंधीं यांपैकीं कोणाचेंहि दुमत नाहीं. खुनाची माहिती देतांना त्याच्या तपशिलांत मात्र ठिकठिकाणीं बराच फरक असलेला दिसून येतो. कांहीं ठिकाणीं पक्षाभिमानाला बळी पडल्यामुळे स्वपक्षाच्या न्यायदेवतेची थोरवी मिरविण्याकरतां आणि विरुद्ध पक्षाची नाचक्की व त्याचा नैतिक ऱ्हास करण्याकरतां पराचा कावळा केलेला दिसून येतो. कांहीं ठिकाणीं खुनासंबंधींची तपशीलवार माहिती देण्याचा प्रयत्न केलेला आहे; पण त्यांत बराच असंबद्धपणा व अशक्य गोष्टींचा समावेश केल्यामुळें सत्य गोष्ट कोणती व असत्य कोणती हें ठरविणे कठीण जातें. कांहीं ठिकाणीं विश्वसनीय माहिती न मिळाल्यामुळें या खुनासंबंधीं तपशीलवार माहिती त्यांना देतां आली नाहीं. ह्मणून त्यांनीं तेवढ्यापुरता मुग्धपणा स्वीकारला

आहे एकंदरींत आजपर्यंतच्या उपलब्ध माहितीवरून–अर्थात् साधक, बाधक आणि बोधक अशा माहितीवरून, कोणती गोष्ट पूर्ण सत्य आहे व कोणती असत्य आहे हें जरी केवळ कागद पत्रांच्या पुराव्यानें म्हणजे प्रत्यक्ष पुराव्यानें सिद्ध करतां आलें नाहीं, तरी सत्याचा अंश कशांत जास्त आहे, हें ठरविण्याला ती माहिती पुरशी आहे.

२. कोणतीही भली अगर बुरी गोष्ट अकारण घडत नाहीं. त्याला कार्यकारण भाव लागतो तो शोधून काढावयाला मात्र देश, काल, परिस्थिती याचा चांगला अभ्यास करावा लागतो. एकाद्या वृक्षाच्या लहान अगर मोठेपणावर व त्याच्या जातीधर्मावर त्याचा मुळ जमिनीत किती खोल गेलीं असतील याचा जसा तर्क बांधतां येतो व तो तर्क अनुभवांतीं जसा खरा ठरतो, त्याचप्रमाणे नारायणराव पेशव्याच्या खुनाच्या बाबतीत उपलब्ध माहितीच्या रूपानें पुराव्याचा जो दृश्य वृक्ष आहे त्याचीं अदृश्य मुळें कोठें व कशीं पसरली असावींत, याचा त्या वेळच्या परिस्थितीचा चांगला अभ्यास केल्यानें तर्क बांधतां येण्याजोगा आहे पुण्याच्या पेशव्यांच्या इतिहासाच्या सांखळीचे दुवे मुत्सद्याच्या गुप्त व दिशाभूल करणाऱ्या राजकारणाच्या डावपेंचामुळें अलग झालेले आहेत. ते एके ठिकाणीं आणून त्यांची सरळ ऐतिहासिक सांखळी बनविणे हे मोठ्या परिश्रमाचे काम आहे.

३. नारायणराव पेशव्यांनीं आत्महत्या करून घेणें किंवा रघुनाथराव दादा यांनीं त्याचा खून करविणें या कांहीं सामान्य गोष्टी नाहींत. या दोन्ही गोष्टाचा परिणाम नारायणराव याचा मृत्यु हा जरी एकच असला तरी प्रत्येक गोष्टाची कारणपरंपरा मात्र भिन्न भिन्न असली पाहिजे यांत तिळमात्र संशय नाहीं. खुनासारखीं कृत्ये घडवून आणण्याला द्वेष, मत्सर, कपट, विश्वासघात, अपार राज्यतृष्णा वगैरे आसुरी मनोवृत्तीची पार्श्वभूमि का लागते, तर आत्महत्या करून घेण्याला मानसिक दौर्बल्य, भित्रेपणा, अविचार, हट्ट, गर्व, मूर्खता वगैरे ज्ञान-संस्काररहित

दुर्गुणांची जरूरी लागते. तेव्हां खून व आत्महत्या या दोन्ही कृती तात्विक दृष्टीनें निरनिराळे दोन स्वतंत्र वृक्ष आहेत. अर्थात् या वृक्षांची परस्परांतील भूमिका निराळी, त्यांचें खत-पाणी निराळें, त्यांचा विस्तार म्हणजे शाखा, पल्लव, फुलें, फळें निराळी आणि त्यांचा गुणधर्मही निराळा; म्हणून त्या दृष्टीने सध्यां उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक माहितीचें मंथन करून खून किंवा आत्महत्या यांपैकीं कोणत्या वृक्षाच्या पोषक द्रव्याचें त्यांतून सार निघतें हें सहज दिसून येईल.

४. या ऐतिहासिक कृतीला येथें वृक्षाची उपमा देण्यांत एवढाच हेतु आहे का, जमिनीवर वृक्ष उभा दिसावयाला जमिनीच्या आंत पसरलेली त्याची अदृश्य मुळें खरी कारणीभूत असतात. तेव्हां नारायणराव पेशव्याच्या खुनाच्या अगर आत्महत्येच्या बाबतीत त्यांचा पूर्वेतिहासही पहाणे जरूर आहे. नारायणरावाच्या मृत्यूपूर्वींचा त्यांच्याशीं संलग्न असलेला इतिहास हीं या वृक्षाचीं मुळं, त्यांचा मृत्यु हा त्याचा बुंधा, व त्यांच्या मृत्यूनंतरचा घडवून आणलेला इतिहास हा त्याचा विस्तार. या दृष्टीनें या आमूलाग्र इतिहासाची या ठिकाणीं मांडणी करणें अवश्य आहे. नारायणराव पेशव्याच्या मृत्यूला कारणीभूत झालेले पेशव्यांच्या घरातील भाऊबंदी तंटे, त्या तंट्याचा फायदा घेऊन स्वार्थ साधणारे पेशव्यांचे मुत्सद्दी, पेशवे व मुत्सद्दी यांच्यात कलह उत्पन्न होऊन त्यांच्यांत निरनिराळे पक्ष उत्पन्न झाल्यामुळें त्या कलहाचा फायदा घेणाऱ्या पेशव्यांच्या मांडलिक राज्यसत्ता व इतर स्वतंत्र राज्यसत्ता या कशा कशा कारणीभूत झाल्या हें दाखविणें म्हणजे बीजापासून वृक्षाला येणाऱ्या फळापर्यंत त्यासंबंधीं इतिहास देण्यासारखें होणार आहे.

५. १ साताऱ्याचे छत्रपती राजे व त्यांचे सेवक पेशवे यांच्यामधील स्वामी व सेवक या नात्याचा भंग कसा झाला ? २ त्यामुळें पेशव्यांच्या घराण्यांत भाऊबंदीचा उगम कसा झाला ? ३ त्या भाऊबंदीचा राजकारणावर कसा अनिष्ट परिणाम होत गेला ? ४ त्यामुळें मुत्सद्यांचें

कसें महत्व वाढलें ? ५ मुत्सद्यांना त्यामुळें पेशव्यांची सत्ता पुढें कशी डोईजड वाटूं लागली ? ६ नामधारी राजे असणें हें मुत्सद्यांना कसें फायद्याचें वाटूं लागलें ? ७ नामधारी राजसत्ता करण्याकरतां सरदार लोकांच्या पहिल्यानें मदती घेतल्यामुळें ते सरदार पुढें मुत्सद्यांना कसे डोईजड झाले ? ८ हे सरदार संघटित होऊन ते मुत्सद्यांना भारी होऊं लागले म्हणून सरदार मंडळींत भेद पाडून त्यांना विस्कळीत करून कमजोर करून ठेवण्याचे कसे प्रयत्न झाले ? ९ या मुत्सद्यांच्या भेद-नीतीमुळें पेशव्यांच्या राज्यांत कलहाग्नि कसा भडकला व तो शांत करण्याकरतां इतर स्वतंत्र राजसत्तेची कशी मदत मागावी लागली ? १० त्यामुळें त्या सत्ता जोगावून त्याच कशा शेवटीं घरच खाऊन टाकण्याला टपून बसल्या ? ११ त्यामुळें पेशवाईचें सिंहासन कसें डळमळूं लागलं ? १२ आणि शेवटीं तुला नको व मलाही नको घाल कुत्र्याला अशी का अवस्था झाली ? या मुद्यांचा इतिहास नारायणराव पेशवे यांच्या मृत्यूशीं निगडित आहे. नारायणरावांच्या मृत्यूपासून उत्पन्न झालेल्या अनंतशाखा व त्यांना लागलेलीं कटु फळें पाहिलीं म्हणजे वरील ऐतिहासिक सत्यांचा संबंध त्यांच्या मृत्यूशीं कसा लागतो हें लक्षांत येईल.

६. श्रीछत्रपती शिवाजीमहाराज यांनीं महाराष्ट्रांत हिंदपदपादशाही स्थापन केली त्यावेळीं या पादशाहीला यावनी राजसत्ता तीव्रतर विरोधी होती. इ. स. १६८० मध्यें त्यांचा कैलासवास झाल्यानंतर श्रीछत्रपती संभाजी महाराजांवर या यावनी राजसत्तेच्या अनंत संकटांची परंपरा ओढवली. त्यांतच त्यांचा इ. स. १६८९ मध्यें अंत झाला. त्यांची राणी येसूबाई व पुत्र शाहु यांना बंदिवान करून औरंगझेब बादशहानें दिल्लीला नेलें. त्यानें हिंदपदपादशाहीचे आधारस्तंभ जे अनेक सरदार त्यांच्यावर आक्रमण करून व हल्ले चढवून त्यांना अगदीं खिळखिळें करून सोडलें. सर्व मुलुख उध्वस्त करून टाकला; अशा परिस्थितींत श्रीछत्रपती राजाराममहाराजांनीं राजदंड हातीं धरला. प्राप्त झालेल्या परिस्थित्यनुसार त्यांना देशत्याग करून जिंजीवास पत्करावा लागला. परंतु हिंदुधर्म-रक्षणाचें वारें जें शिवाजीमहाराजांनीं उत्पन्न केलें होतें तें या

बिकट परिस्थितीनें बंद पडलें नाहीं. उलट तें महाराष्ट्रांतील मराठ्यांच्या रक्तांत जास्तच उचल खाऊं लागलें. श्रीछत्रपती शिवाजीमहाराजांनीं स्थापन केलेल्या हिंदुपदपादशाहीचें संरक्षण करूं, किंवा धारातीर्थीं पतन पाऊं असा महाराष्ट्रानें त्यावेळीं संकल्प केला. राजाराम महाराजांच्या छत्राखालीं महाराष्ट्राचें गतवैभव संपादण्याचे निर्वाणीचे प्रयत्न चालू झाले. त्यांत क्रमाक्रमानें यश येऊं लागलें. रायगडावरून हिंदुपदपादशाहीची गादी सातान्यास येऊन श्रीछत्रपती राजाराम महाराज राज्यकारभार हांकूं लागले. औरंगझेब बादशहाचे चढाईचे प्रयत्न ढांसळूं लागले. मराठी राज्याची घडी बसूं लागली. इतक्यांत श्रीछत्रपती राजाराम महाराज इ. स. १७०० मध्यें कालवश झाले. त्यांना त्यांच्या वडील राणी ताराबाई यांच्यापासून शिवाजी व लहान राणी राजसबाई यांच्यापासून संभाजी असे दोन पुत्र होते. राजाराम महाराजांच्या मृत्यूप्रसंगीं हे दोघेही मुलगे अल्पवयी असल्यामुळें ताराबाई यांनीं आपला मुलगा शिवाजी याच्या नांवानें हिंदुपदपादशाहीचा कारभार चालू केला. ताराबाई या मोठ्या हिंदुधर्माभिमानी, करारी, मुत्सद्दी, निग्रही, छत्रीच्या व तेजस्विनी राणी होत्या. त्यांनीं स्वपराक्रमानें आणि बुद्धिचातुर्यानें राज्यकारभार चालविला. औरंगझेब बादशहासारखा पराक्रमी व कारस्थानी पादशहा दक्षिणेंत आपलें अफाट सैन्यबल घेऊन हिंदुपदपादशाही नामशेष करण्याच्या इराद्यानें तळ देऊन बसला असतां व मराठी राज्याचीं भेदनीतीनें शकलें पाडतां येणारीं उपकरणें—राणी येसूबाई व शाहु हीं—त्यांच्या हस्तगत झालीं असतां मराठीसाम्राज्याचें रक्षण करणें ही गोष्ट सामान्य नव्हती. अशा स्थितींत इ. स. १७०० पासून इ. स. १७०८ पर्यंत म्हणजे शाहुमहाराज दिल्लीच्या बंदिवासांतून मुक्त होऊन हिंदुपदपादशाहीच्या तक्तावर आरूढ होईपर्यंत सुमारें आठ वर्षें मराठी साम्राज्याकरतां ताराबाईनीं अविश्रांत श्रम करून त्याचें संरक्षण केलें.

७. पुढें श्रीछत्रपती शाहुमहाराजांच्या कृपाछत्राखालीं थोरल्या बाजीराव पेशव्यांनीं हिंदुपदपादशाहीचा विस्तार अखिल हिंदुस्थानभर केला. त्यावेळीं गोब्राह्मणप्रतिपालकत्व हें मराठी साम्राज्याचें अन्न; श्रीछत्रपती शाहुमहाराज हे त्याचा प्राण व थोरले बाजीराव पेशवे हे त्याचा पराक्रम या स्वरुपांत तें

नटलेलें होतें. बाजीराव पेशव्यांना चिमाजीआपा या नांवाचे धाकटे बंधु होते. पुराणप्रसिद्ध रामलक्ष्मणाच्या जोडीप्रमाणें हे उभयतां बंधु होते. यांच्या पराक्रमामुळें हिंदुपदपादशाहीच्या कीर्तिचा डंका सर्व हिंदुस्थानभर गाजला. बाजीरावाला भिऊबाई व अनुबाई अशा दोन बहिणी होत्या. भिऊबाईला आबाजी नाईक बारामतीकर यांना दिलें होतें. धाकट्या अनुबाई यांना व्यंकटराव नारायणराव घोरपडे इचलकरंजीकर यांना दिलें होतें. अनुबाईचा जन्म इ. स. १७०६ च्या सुमारास झाला. त्यांचें लग्न वयाच्या ६-७ वर्षाच्या सुमारास ह्मणजे इ. स. १७१३ मध्यें[1] झालें.

८. बाजीराव पेशव्यांना त्यांची पत्नी काशीबाई यांच्यापासून १ बाळाजीपंत २ रामचंद्रपंत ३ रघुनाथराव ४ जनार्दनबाबा असे चार पुत्र झाले. बाळाजीपंत ऊर्फ नानासाहेब पेशवे यांचा जन्म इ. स. १७२० मध्यें झाला. रामचंद्रपंत हे अल्पवयी असतांच वारले. रघुनाथराव ऊर्फ राघोबादादा यांचा जन्म इ. स. १७३४ मध्यें झाला. आणि जनार्दनबाबा हे इ. स. १७३६ मध्यें जन्माला आले. बाजीराव पेशव्यांना मस्तानी या नांवाच्या यवन स्त्रीपासून समशेरबहादर या नांवाचा मुलगा झाला. त्याप्रमाणें चिमाजीआपा यांना अन्नपूर्णाबाई या त्यांच्या पत्नीपासून सदाशिवरावभाऊ व बयाबाई अशीं दोन अपत्यें झालीं. सदाशिवराव भाऊंचा जन्म इ. स. १७३० मध्यें झाला.

९. नानासाहेब पेशवे यांच्या पत्नीचें नांव गोपिकाबाई असें होतें. या भिकाजीपंत नाईक रास्ते यांच्या कन्या. यांचें लग्न इ. स. १७२९ मध्यें झाले. राघोबादादा यांच्या द्वितीय पत्नीचें नाव आनंदीबाई. राघो महादेव ओक यांच्या या कन्या. यांचे लग्न इ. स. १७५५ मध्यें झालें. जनार्दनबाबा यांच्या पत्नी सगुणाबाई. या भिडे यांच्या कन्या.

१०. थोरले बाजीराव पेशवे यांचा अंतकाळ इ. स. १७४० मध्यें झाला. त्यानंतर त्यांचा वडील मुलगा नानासाहेब यांना पेशवाईचीं वस्त्रें मिळण्याबद्दल चिमाजीआपा हे साताऱ्यास श्रीछत्रपती शाहुमहाराजांकडे जाऊन खटपट करूं लागले. त्यावेळीं नागपूरचे रघोजी भोंसले, सेनासाहेबसुभा यांनीं

---

१ खरेशास्त्रीकृत इचलकरंजी संस्थानचा इतिहास पान २७

नानासाहेबांना पेशवेपद मिळूं नये अशा प्रकारचा प्रयत्न चालविला. त्यांचा हेतु एवढाच होता कीं, पेशवे ह्मणजे मुख्य प्रधान. छत्रपतींच्या गादीचें स्थैर्य व नांवलौकिक यांची जबाबदारी बहुतांशीं त्यांच्यावर. तेव्हां अशा परिस्थितींत वंशपरंपरेनें पेशवेपद चालविण्याची प्रथा पडल्यास ती गादीला हितपरिणामीं होणार नाहीं; ह्मणून नानासाहेब यांना पेशवे न करतां बाबूजी नाईक बारामतीकर यांना पेशवेपदाचीं वस्त्रें द्यावीं. अशा प्रकारें पेशवेपदाकरतां दोन इसमांची शाहुमहाराजांजवळ रदबदली सुरू झाली. शेवटीं छत्रपती शाहु महाराजांवर चिमाजीरावआपा यांचें ज्यास्त वजन पडून त्यांनीं नानासाहेबांना पेशवेपदाचीं वस्त्रें दिलीं. रघोजी भोंसले हे त्यावेळीं मोठे मुत्सद्दी व पराक्रमी सरदार गणले जात. ते भोंसले कुळांतील असून शिवाय शाहुमहाराजांच्या पत्नी राणी सकवारबाई यांच्या अगदीं जवळच्या नात्याचे होते. राणी सकवारबाई व रघोजी भोंसल्यांची पत्नी सुळाबाई या चुलत बहिणी. ह्मणून रघोजी भोंसले यांना शाहुमहाराजांजवळ आपलें मोठें वजन आहे असें वाटे. परंतु राज्यकारभाराच्या दृष्टीनें पाहिलें असतां चिमाजीआपा हे बाजीराव पेशव्यांच्या तोडीचे होते. त्यांनीं आजपर्यंत मोठमोठ्या लढाया जिंकल्या. त्यामुळें बाजीराव पेशव्याएवढेंच चिमाजीआपाचें वजन शाहुमहाराजांवर होतें. याकरतां शाहुमहाराजांनीं चिमाजीआपा यांच्या शब्दाला मान देऊन नानासाहेबांना पेशव्याचीं वस्त्रें दिलीं. या प्रसंगीं जर चिमाजीआपा हयात नसते तर मात्र रघोजी भोंसल्यांच्या खटपटीप्रमाणें बाबूजी नाईक बारामतीकर हेच पेशवे-पदाला लायक ठरते, यांत संदेह नव्हता. चिमाजीआपा यांच्या खटपटीमुळें व वजनामुळें पुढें बाजीरावांच्या वंशांत पेशवेपद चाललें. नानासाहेबांना पेशव्याचीं वस्त्रें मिळाल्यानंतर ते चिमाजीआपा यांच्या सल्ल्यानें कारभार पाहूं लागले.

११. चिमाजीआपा यांस इ. स. १७४१ च्या[१] जानेवारी महिन्यांत सातारा मुक्कामीं देवाज्ञा झाली. त्यावेळीं सदाशिवरावभाऊ त्यांचे जवळच होते. त्यावेळीं त्यांचें वय अवघें आठ वर्षांचें होतें. छत्रपती शाहुमहाराजांनीं ज्यावेळीं थोरल्या बाजीराव पेशव्यांना पेशवाईचीं वस्त्रें दिलीं

---

१ पेशव्यांची बखर पान ४८ टीप.

त्यावेळीं चिमाजीआपांना त्यांनीं दुय्यम पेशव्याचीं ह्मणजे नायबपेशव्याचीं वस्त्रें दिलीं. या दुय्यम पेशव्याचें पद ह्मणजे पेशव्यांच्या कारभारीपणाची जागा होय. वडील भावाकडे पेशवेपद व धाकट्या भावाकडे पेशव्याच्या कारभारीपणाचें पद या व्यवस्थेनें पेशव्यांच्या वडील घराण्यांत व छोट्या घराण्यांत पुढेंमागें कलह उत्पन्न न व्हावा अशी खबरदारी घेण्यांत आली होती. त्याला अनुसरून नानासाहेबांना ज्यावेळीं शाहुमहाराजांनीं पेशव्याचीं वस्त्रें दिलीं, त्यावेळीं सदाशिवरावभाऊंना त्यांचे कारभारी[1] नेमलें. परंतु ते अल्पवयी असल्यामुळें चिमाजी आपांच्या मृत्युनंतर नानासाहेबांनीं महादाजीपंत पुरंदरे यांना आपले कारभारी, सदाशिवरावभाऊंच्या जागीं काम पहाण्या करतां नेमून घेतलें.

१२ इ. स. १७४६ मध्यें[2] पेशव्यांनीं सावनूरच्या नबाबावर जी स्वारी केली त्यांत महादाजीपंत पुरंदरे यांच्या समागमें सदाशिवराव भाऊंना धाडलें होतें. त्यावेळीं नबाबानें पेशव्याबरोबर तह केला. त्यांत कृष्णा व तुंगभद्रा यांच्यामधील मुलखाची खंडणी व बहादुरझेंडा या नांवाचा किल्ला पेशव्यांनीं घेतला. या स्वारीवरून सदाशिवराव भाऊ परत साताऱ्याला आले तेव्हां शाहुमहाराजांनीं त्यांना चिमाजीआपाप्रमाणें दुय्यम पेशवा नेमलें. शाहुमहाराजांनीं यावेळीं दुय्यम पेशवा नेमण्याचे एवढेंच कारण कीं, आतां सदाशिवरावभाऊ चवदा वर्षाचे झाले तेव्हां त्यांना कारभाराची माहिती करून द्यावी व हलके हलके त्यांचे अधिकार त्यांच्या स्वाधीन करावे. परंतु शाहुमहाराजांच्या या इच्छेप्रमाणें नानासाहेबांनीं वर्तन केलें नाहीं. वर्ष सहा महिने लोटले तरी सदाशिवरावभाऊंना त्यांनीं साताऱ्याहून पुण्यास नेलें नाहीं किंवा त्यांची विचारपूसही केली नाहीं. पुढें ते साताऱ्यास महाराजांच्या भेटीला आले. त्यानीं सदाशिवरावभाऊंविषयीं नानासाहेबांजवळ प्रश्न काढला. “ सदोबास पुण्यास न्यावयाचें नाहीं कीं काय ? ” असा स्पष्ट सवाल केला. या सवालांत बराच गर्भित हेतु असावा असें दिसतें. नानासाहेबांची पत्नी गोपिकाबाई ही सदोबाला बरोबर वागवून घेत नाहीं, उलट पाण्यांत पहाते अशा प्रकारच्या तक्रारी त्यांच्यापर्यंत गेल्या असाव्या. शिवाय या तक्रारीवर विश्वास बसण्या-

---

१ इचलकरंजीचा इतिहास पान ७०. २ पेशव्यांची बखर-टीप ४ पान ४६.

सारखी गोष्ट ह्मणजे वर्ष सहा महिन्यांच्या अवधींत सदाशिवरावभाऊंना साताऱ्याहून पुण्यास नेलें नाहीं किंवा त्यांची विचारपूसही केली नाहीं. एवढ्यावर करतां महाराजांनीं नानासाहेबांना वरील स्पष्ट सवाल टाकला. यावर नानासाहेबांना कांहींच बोलतां आलें नाहीं. कारण चूक त्यांचीच होती. त्यांनीं शाहुमहाराजांस 'घेऊन जातों' एवढेंच उत्तर दिलें. नंतर ते सदाशिवरावभाऊंना आपल्या बरोबर साताऱ्याहून पुण्यास घेऊन गेले'

१३. छत्रपती शाहुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें नानासाहेब सदाशिवराव भाऊंना पुण्याला घेऊन आले. पण त्यावेळेपासून पेशव्यांच्या घरांत भाऊबंदाच्या कलहाचें बीज पहिल्यानें उत्पन्न झालें. सर्व साधारण व्यवहारांत पहातां हे कलह पहिल्यानें स्त्रियांकडून उत्पन्न होतात. आपला प्रपंच, आपलीं मुलेंबाळें, आपला स्वार्थ यापलीकडे त्यांची व्यापक दृष्टि बनलेली नसते; ह्मणून कोणी आप्त आपल्या घरीं आला ह्मणजे त्यांना तो आपला हितशत्रु आहे असें वाटूं लागतें. सर्वच स्त्रियांना असें वाटतें अशांतला भावार्थ नाहीं. पण त्यांच्यावर शिक्षणाचा संस्कार विशेष न झाल्यामुळें त्यांचा स्वभावधर्म तसा बनतो. नानासाहेब पेशव्यांची पत्नी गोपिकाबाई ही वरील विचारांचीच स्त्री होती. सदाशिवरावभाऊ पेशव्यांचे कारभारी होऊन पुण्यास आलेले पाहून त्यांची मर्जी रुष्ट झाली. "असे भाऊबंद जवळ आगून आपले पोरास ठिकाण नाहीं असें करतील." असें त्यांनी नानासाहेबांना बजावलें. पण पुरुषांना बायकाप्रमाणे केवळ स्वतःच्याच घराकडे पाहून चालतां येत नाहीं. त्यांना स्वतःच्या स्वार्थाबरोबर लौकिकही संभाळावा लागतो. ह्मणून नानासाहेबांनीं गोपिकाबाईच्या प्रश्नास उत्तर दिलें नाहीं. त्यांनीं ती गोष्ट मात्र आपल्या लक्षांत पूर्ण ठेविली.

१४. पेशव्यांच्या कारभारीपदावर सदाशिवराव भाऊंची छत्रपतींनीं नेमणूक केली असतां त्यांना त्यांच्या कामाची माहिती करून देऊन त्यांचे अधिकार त्यांच्याकडे क्रमाक्रमानें सोंपवून देणें हें नानासाहेबांचें कर्तव्य होतें. परंतु तसें न करण्याचें कारण गोपिकाबाईच्या मनांत भाऊबंदांविषयीं द्वेषभाव होता. शिवाय दुसरी गोष्ट ह्मणजे छत्रपतींनीं एकदां पेशव्याची नेमणूक

१ पेशव्यांची बखर पान ४८.

केल्यानंतर त्याच्या हाताखालच्या दुय्यम पेशव्याची नेमणूकही छत्रपतींनींच करावी ही गोष्ट पेशव्यांच्या एकतंत्री अधिकाराला विघ्न आणणारी होती. मुख्य पेशवा बाजीराव व दुय्यम पेशवा चिमाजीआपा यांच्या नेमणुका छत्रपतींनींच केल्या होत्या. मुख्य पेशव्यानें मुलुखगिरी करावी व दुय्यम पेशव्यानें कारभार पहावा. अधिकारवांटणीची द्विदल राज्यपद्धती छत्रपतींच्या सिंहासनाला स्थिरता प्राप्त करून देणारी होती. एकादे प्रसंगीं मुख्य पेशवा बेइमान झाला तर त्याला प्रतिकार करण्याची शक्ती दुय्यम पेशव्याजवळ असे. पराक्रम मुख्य पेशव्याच्या हातांत तर खजिना दुय्यम पेशव्याच्या ताब्यांत. भावार्थ एवढाच कीं, राज्यसूत्रें बरोबर चालवयाला उभयतां पेशव्यांमध्यें सहकार्य लागे व तें ठेवण्याची गुरुकिल्ली छत्रपतींनीं आपल्या हातीं ठेवली होती. त्यामुळें राज्यकारभार छत्रपतीच्या विचारें पार पडत असे. रघोजी भोंसले यांना सेनासाहेब-सुभा नेमून त्यांना ज्यावेळीं छत्रपतींनीं वऱ्हाडप्रांतीं पाठविलें त्यावेळीं कोन्हेरराम यांना त्यांनी त्यांचे कारभारी नेमले. त्यांत छत्रपतींचा हेतु हाच होता कीं, मुलुखगिरी आणि राज्यकारभार या मोठ्या हुद्याच्या दोन जागा निरनिराळ्या व स्वतंत्र ठेऊन त्यांच्या नेमणुका करण्याच्या अधिकाराची—अर्थात राज्याच्या कारभाराचीं—मुख्य सूत्रें आपल्या हातीं असावीं. या द्विदल पद्धतीमुळें दोन्हीं पेशव्यांना समतोल वृत्तीनें परस्परांशी वागून आपलें स्थान स्थिर ठेवण्याला छत्रपतींशीं स्वामिभक्तीनें वागावें लागे. ही राज्यपद्धती छत्रपतींना जशी साधक होती तशी ती पेशव्यांना वाटत असलेल्या एकतंत्री स्वतंत्रपणाला बाधक होती. नानासाहेबांना मुख्य पेशव्याचीं वस्त्रें व सदाशिवरावभाऊंना दुय्यम पेशव्याचीं वस्त्रें देण्यांत छत्रपतींनीं आपलें पहिलें धोरणच चालविलें होतें. पण हें धोरण नानासाहेब पेशवे झाले त्यावेळीं सदाशिवराव भाऊ अज्ञान, व अल्पवयी होते, या सबबीवर कारभाऱ्याची जागा महादाजीपंत पुरंदरे यांना देऊन त्यांनीं कारभार चालविला. पेशव्यांनीं आपला कारभारी एकदां नेमून त्याचा कारभार सुरळीत चालला आहे तोंपर्यंत छत्रपतींना त्यांत ढवळाढवळ करण्याचें कारण नव्हतें. एकदां अशा प्रकारें कारभारी नेमण्याचा असा अधिकार पेशव्यांच्या पदरांत पडला म्हणजे पेशवेपद एकतंत्री झालें. शाहुमहाराजांनीं आपल्या राज्याची

सूत्रें आपल्या हातीं ठेवण्याची जी गुरुकिल्ली राखून ठेवली होती ती अशाप्रकारें नानासाहेब हस्तगत करून घेऊं पाहत होते. साताऱ्याहून सदाशिवराव भाऊंना पुण्याला आणण्याची ते जी अळमटळम् करीत होते त्याचें मुख्य कारण हें होतें.

१५. छत्रपती शाहुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें नानासाहेबांनीं सदाशिवराव भाऊंना पुण्याला आणलें खरें. परंतु त्यांनीं त्यांचा राज्यकारभारांत कोठेंच हात शिरूं दिला नाहीं. 'भोजन करून पंक्तीस होते. कामकाज कांहीं नाहीं. पंक्तीस जेवावें व दप्तरांत लिहावें.' अशा स्थितींत भाऊंना ठेवण्यांत आलें. नानासाहेबांच्या या व्यवस्थेनें भाऊंच्या हितचिंतकांना कांहींच बोलतां येण्यासारखें नव्हतें. कारण त्यांना दूर ढकललें असें ह्मटलें तर ते जवळ होते. जवळ ह्मणावें तर त्यांच्या हातीं कांहीं सत्ता ठेविलेली नव्हती. अशा खर्डेघाशी स्थितींत दोन तीन वर्षें निघून गेलीं. पण पुढें त्यांचे वय जसें १८।१९ वर्षांचें झालें तसा त्यांना आपल्या या स्थितीचा अपमान वाटूं लागला. त्यांना आपल्या स्थितीची कल्पना आली. हातांत सत्ता असल्याशिवाय जगांत अगर घरांत आपणाला मान नाहीं असें त्यांना वाटूं लागलें. निरुद्योगी लोकांप्रमाणें पंक्तीला दोन वेळ जेवून व कुत्र्यामांजराप्रमाणें जीवित कंठणें हें होतकरू तरुण भाऊंना मेल्याप्रमाणें वाटूं लागलें. शिवाय पेशव्यांच्या घरांत गोपिकाबाई वडील. त्या पेशव्यांच्या पत्नी. त्याच भाऊसाहेबांचा द्वेष व मत्सर करणाऱ्या. अशा घरांत सोन्याच्या ताटांत जरी अमृत वाढलें असलें तरी तें विषाप्रमाणें वाटणें सहाजिक होतें. ह्मणून पेशवाईचा कारभार आपल्या हातीं यावा ह्मणून भाऊंची सारखी धडपड चालली होती. नानासाहेब व गोपिकाबाई यांच्या मनांत भाऊंनीं कोणत्याच प्रकारें पुढें येऊं नये असें असल्यामुळें भाऊंच्या धडपडीचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. प्रयत्नाच्या फळाला संधीच यावी लागते.

---

१ पेशव्यांची बखर पान ४८.

# प्रकरण २ रें

# खऱ्या छत्रपतीच्या गादीची अखेर.

( इ० स० १७४९ ते १७५० अखेर )

१ शाहुमहाराजांचे मनांत रघोजी भोसले नागपूरकर यांचा मुलगा दत्तक घ्यावा असे विचार चालू होते. यांस नानासाहेब पेशवे यांचा विरोध.—२. रघोजी व नानासाहेब पेशवे यांची स्पर्धा. रघोजी तंजावर कार्बीज करतो. शाहुमहाराजांकडून रघोजीचा गौरव.—३. रघोजी कटक प्रांतावर स्वारीकरतां निघतो. नानासाहेब पेशवेही हिंदुस्थानच्या स्वारीकरतां निघतात —४. रघोजीनें बंगालवर स्वारी करून जगत्शेटची कोठी लुटली व अल्लावर्दीखान यांजकडे तीन कोटी रुपयांच्या खंडणीची मागणी केली व पुढें तो गयेस गेला.—५. रघोजीचे पारिपत्य करण्याकरतां अल्लावर्दीखान नानासाहेबाबरोबर संधान बांधतो. नानासाहेब रघोजीचा पराभव करतात —६. नानासाहेब पेशवे व रघोजी भोंसले यांचेमधील कलह शाहुमहाराजांनीं तोडला —७. रघोजीचा मुलगा शाहुमहाराजांनी दत्तक घेऊं नये अशी खटपट नानासाहेबांनीं करण्याचीं कारणें.—८. कोल्हापूरच्या राज्याच्या स्थापनेची व रामराजे याच्या रहस्यमय जन्माची त्रोटक हकीकत.—९ शाहूंनी कोल्हापूरच्या संभाजीमहाराजांचा पराभव करून ताराबाईस साताऱ्याच्या किल्ल्यावर बंदीत ठेवलें.—१०. नानासाहेब पेशव्यांनीं ताराबाईशीं संधान बांधून रामराजांस साताऱ्याच्या गादीवर आणण्याचा प्रयत्न चालविला.—११ नानासाहेब पेशव्यांच्या खटपटीस सकवारबाईचा विरोध. नानासाहेब पेशवे शाहुमहाराजांकडून सनदा लिहून घेतात.—१२. नानासाहेब वगैरेंनीं लिहून घेतलेल्या सनदांतील राजकारण.—१३. गोविंद खंडेराव व नानासाहेब पेशवे यांचें संगनमत. नानासाहेबांवर गोविंद खंडेरावाची राजकारणांत मात.—१४. शाहुमहाराजांकडे निरनिराळ्या दत्तकासंबंधीं निरनिराळ्या पक्षांचे निरनिराळे डाव.—१५. पहिल्या सनदेंतील मुख्य रहस्य.—१६ कोल्हापूरचे संभाजी महाराज व रामराजे यांच्या साताराच्या गादीवरील जन्मजात हक्काची मीमांसा.—१७. ताराबाई, नानासाहेब, गोविंदराव खंडेराव व संभाजी महाराज यांचे राजकारणांत परस्परांतील संबंध

यांचा समेट.—४३. नानासाहेबांची ताराबाईच्या पक्षाचे पंख तोडण्याची कामगिरी.—४४. सांगोल्याचे बंडाचीं कारणें —४५. सांगोल्याचें बंड मोडण्याकरतां रामराजे यांस ताराबाईपासून अलग करून मोहिमेवर नेलें. ताराबाई साताराचा किल्ला हस्तगत करते. ४६—सांगोल्याच्या बंडाचा मोड.—४७. रामराजे यांचेकडून नानासाहेबांनी मराठी राज्याचा घेतलेला राजीनामा —४८, नानासाहेबांची ताराबाईवरील अखेरची मात. ४९. ताराबाईनें रामराजांस बंदींत ठेवलें.—नानासाहेबांची स्वार्थी दृष्टी. मराठीराज्य तात्विक दृष्टीनें कां व केव्हां बुडालें.

१. इ. स. १७४९ च्या डिसेंबर महिन्याच्या १५ व्या तारखेस छत्रपती शाहुमहाराज दिवंगत झाले. त्यापूर्वी ते बरेच महिने आजारी होते. आपल्या मागें आपल्या राज्याचें कसें होईल या चिंतेत ते निमग्न असत. त्यांना संतती नव्हती. तेव्हां आपल्या घराण्यांतला एकादा दत्तक घेऊन त्याला राज्याला वारस करावें या दृष्टीनें त्यांचे विचार सुरू झाले. त्यावेळीं कोल्हापूरच्या गादीवर संभाजी महाराज होते. त्यानाही संतती नव्हती. ह्मणून छत्रपती शाहुमहाराजांनीं नागपूरच्या रघोजी भोंसल्यांचा मुलगा मुधोजी याला दत्तक घेण्याचा विचार चालविला. हा दत्तक घेण्याच्या बाबतींत शाहुमहाराजांची पट्टराणी सकवारबाईसाहेब या अनुकूल होत्या. रघोजी भोंसल्यावर शाहुमहाराजाचे विशेष प्रेम होते. त्यांना त्यांनीं लहानपणापासून आपल्या जवळ वाढविलें होतें. त्यांच्याच कृपेनें रघोजींना सेनासाहेब सुभा हें पद प्राप्त झालें होतें. त्यांच्या अंगचे गुण शाहुमहाराजांना आवडत असत. त्यावेळीं रघोजी हे अव्वल दर्जाचे मराठे सरदार गणले जात. त्यांचा पराक्रम, त्यांची धडाडी पाहून शाहुमहाराज आनंदीत होत, आपल्या पट्टराणी सकवारबाई यांची सख्खी चुलत बहीण सुळाबाई यांच्याबरोबर रघोजींचें लग्न करून अगदीं जवळचा नात्याचा संबंध त्यांनीं जोडून घेतला होता. शिवाय दत्तक घेऊन त्यांचे मुलाला मराठी राज्याचा वारस केल्यानंतर त्याच्या संरक्षणाकरतां

त्याच्या मागें जी जबरदस्त शक्ती असावयाला पाहिजे ती रघोजी भोंसले-सारख्या पराक्रमी पुरुषाची लाभणार होती. त्यामुळेंही शाहुमहाराजांना रघोजींचा मुलगा दत्तक घेण्यांत समाधान होतें. तसेंच हा दत्तक राणी सकवारबाई यांच्या बहिणीचाच मुलगा असल्यामुळें शाहुमहाराजांच्या पश्चात राणीसाहेबांना दत्तकापासून त्रास होईल हीही शंका त्यांना येण्याचें कारण नव्हतें. या सर्व गोष्टींमुळे, म्हणजे मराठी राज्याच्या स्थिर-स्थावरतेच्या दृष्टीनें व घरगुती स्वास्थ्याच्या दृष्टीनें रघोजींचा मुलगा दत्तक घेण्याचा विचार शाहुमहाराज नक्की ठरवूं पाहत होते; परंतु नानासाहेब पेशव्यांना मात्र हा दत्तक घेणें अगदीं मान्य नव्हतें. ते या गोष्टीच्या अगदीं विरुद्ध होते; म्हणून त्यांनीं शाहुमहाराजांची व राणी सकवारबाईची ही मसलत हाणून पाडण्याचीं कारस्थाने सुरू केलीं.

२. नानासाहेब पेशवे व रघोजी भोंसले यांचें बरें नव्हतें. नाना-साहेबांना पेशवेपद न मिळतां ते बाबूजी नाईक बारामतीकर यांना मिळावें अशी रघोजींची खटपट होती. म्हणून पेशवेपदावर आल्यानंतरही रघोजीबद्दल नानासाहेबांच्या मनांत वैमनस्य राहिलें. नानासाहेब व रघोजी भोंसले या उभयतांमध्यें विशेष पराक्रमी कोण आहे हें छत्रपतींच्या निदर्शनाला यावें म्हणून उभयतांमध्यें आपला पराक्रम दाखविण्याची अहमहमिका सुरू झाली. रघोजी भोंसले आपल्याबरोबर बाबूजी नाईकांस घेऊन त्रिचनापल्लीचे मोहिमेकरतां कर्नाटकांत गेले. त्यांच्याबरोबर श्रीप-तराव प्रतिनिधी व फत्तेसिंग भोंसले हेही होते. रघोजी तंजावरास गेले तेव्हां त्यांनीं तेथील मराठ्यांस आपलेंसे करून घेतलें. नंतर त्रिचनापल्लीवर हल्ला करून इ. स. १७४१ च्या मार्च महिन्यांत ती हस्तगत केली व तेथील नबाब चंदासाहेब याला कैद केलें मुरारराव घोरपडे यांना तेथील बंदोबस्ताकरतां त्यांनीं मुखत्यार नेमलें. घोरपड्यांच्या हाताखालील शिबं-दीचा खर्च छत्रपती शाहुमहाराजांकडून मिळत असे. परंतु हे लोक प्रत्यक्ष पेशव्यांच्या नोकरींत होते. म्हणून कर्नाटकाच्या खंडणीपैकीं प्रतिवर्षीं

वीसे हजार रुपये नानासाहेबांना देत जावें असें ठरलें. नंतर रघोजी चंदासाहेबाला बरोबर घेऊन साताऱ्यास शाहुमहाराजांच्या दर्शनाला आले. ' चंदासाहेब याजला हुजूर पोहचवून झालें वर्तमान राजश्रीस निवेदन केलें. चंदासाहेबास धरून आणिलें आणि भाऊबंद स्थलास कायम केले. हें ऐकून राजश्रींनीं बहुत खुषी मानून सेनासाहेबास बहुमान वस्त्रें देऊन गौरव केला. ' त्यावेळीं शाहुमहाराजांनीं प्रसन्न होऊन रघोजींना सरदेशमुखीचे बाबदीची व मोकाशाची गोंडवण झाडी तहत कटक याची माफी करून दिली.[3]

३. आपला प्रतिस्पर्धी रघोजी भोंसले याचा छत्रपतींनीं अशा प्रकारें गौरव केला हें नानासाहेबांना बरें वाटलें नाहीं. कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें त्याचें पारिपत्य करण्याचा त्यांनीं विचार चालविला. रघोजी कर्नाटकांत असतां मुर्शीदकुलीखान याचा दिवाण मीर हबीब यानें रघोजीचा दिवाण भास्करपंत याला कटक प्रांतावर स्वारी करण्याकरतां बोलाविलें. भास्करपंतांनीं तें कबूल करून ते तिकडे स्वारीकरतां निघाले. याच सुमारास नानासाहेब पेशवे हे हिंदुस्थानांत स्वारीला निघाले. त्यांनीं नर्मदातीरीं गढ व मंडळ काबीज केले व आपला मोर्चा गयेकडे वळविला.

४. रघोजी कर्नाटकाचा बंदोबस्त करून नागपूराहून बंगाल्यांत आले. त्यांनीं रतनपुरीं मोहनसिंग भोंसले यांना स्थापित करून ते स्वतः पुढें गेले व भास्करपंत यांना बंगाल्याचे सरहद्दींत मेदिनीपुराजवळ ठेऊन आपण मकसुदाबादीं गेले. तेथें हल्ला करून त्यांनीं जगत्‌शेटाची कोठी लुटली व तेथील नबाब अल्लावर्दीखान मोहबतजंग यांजकडे तीन कोट रुपये खंडणीची मागणी केली. त्यावेळीं त्यांनीं खंडणी देण्याकरतां आपला वकील रघोजीकडे पाठवून कांहीं दिवसांची मुदत मागून घेतली. तेथून ते ठिकठिकाणीं खंडण्या घेत गयेला गेले. त्यांनीं गया हस्तगत केली व तेथें गयावर्जनही केलें.

---

१ मराठ्यांची बखर पान. १६८. २ नागपूरकर भोसल्यांची बखर पान ४०. ३ सदर बखर पान ४१.

५. रघोजीला खंडणी देण्याकरतां अल्लावर्दीखान यानें जी मुदत मागून घेतली त्या अवधींत त्यानें निराळीच मसलत केली. नानासाहेबांचा मोर्चा गयेच्या बाजूला आहे व रघोजीचें व त्यांचें बरें नाहीं असें पाहून त्यानें त्यांच्या बरोबर संधान बांधलें, आणि रघोजीचें पारिपत्य करण्याची मसलत केली. नानासाहेबांना तेंच पाहिजे होतें. तेव्हां रघोजीबरोबर कांहीं कुरापत काढावयाला पाहिजे म्हणून त्यांनीं त्यावेळीं रघोजीकडे पैशाची मागणी केली. ही मागणी ह्मणजे बंगाल्यांत खंडणी वसूल करण्याचा जो अधिकार छत्रपतीकडून रघोजीला होता त्याची वांटणी नानासाहेब मागत होते. अर्थात् रघोजींनीं ती देण्याचें कबूल केलें नाहीं. म्हणून त्यांनीं रघोजीबरोबर लढाई करून त्यांचा पराभव केला व आजपर्यंत त्यांच्याबद्दल मनांत वागत असलेल्या वैमनस्याचा अशा प्रकारें सूड घेतला.

६. नंतर रघोजी साताऱ्यास छत्रपती शाहुमहाराज यांच्याकडे आले व त्यांनीं नानासाहेबांबद्दलच्या सर्व तक्रारी त्यांना निवेदन केल्या. त्या प्रसंगीं नानासाहेबही तेथेंच होते. छत्रपतींना सर्व बाजूंनीं नानासाहेब दोषी असल्याचें दिसून आलें, ह्मणून त्यांच्यावर ते रुष्ट झाले. "[1] त्यावरून राजेश्रींची ( शाहुमहाराजांची ) मर्जी यांजवर ( नानासाहेबांवर ) गेली. आमचे आप्त थोर माणसांचे मुलखांत जाण्यास लढाई करण्यास कारण काय ? ह्मणोन पेशवे याला नऊ महिने खराब केलें. आणि भोंसले सेनासाहेब यांजला बहुमान वस्त्रें देऊन, आज्ञा दिली कीं, '[2] आपल्या मुलखांत जाऊन बंदोबस्त राखावा " यावरून पेशव्यांनीं आपल्या अधिकाराचें अतिक्रमण करून रघोजीबरोबर जी लढाई केली ती केवळ त्यांचा सूड उगवण्याच्याच हेतूनें होती हें स्पष्ट दिसतें. शाहुमहाराजांनीं यापुढें पेशव्यांस रघोजीचा सूड उगवतां येऊं नये ह्मणून त्यांच्यामध्यें तह करून दिला; व त्याप्रमाणें परस्परांस निरनिराळ्या सनदा करून दिल्या. या सनदांमुळें पेशव्यांच्या मुलखाची व रघोजीच्या मुलखाची वांटणी झाली. या वांटणींत रघोजीस "[3] बंगालची खंडणी वसूल करण्याचा हक्क

---

१ ना. भों. बखर पान ४३. २ ना. भों.-बखर पान ४३. ३ मराठे व इंग्रज पान १२७.

मिळाला '. 'या तहानें रघोजी भोंसल्यास लखनौ, पाटणा, बहार, दक्षिण बंगाल, आणि वऱ्हाड ते कटकपर्यंतचा मुलूख या प्रांतांत वर्चस्व प्राप्त झालें. शाहुमहाराजांनीं या घडवून आणलेल्या तहामुळें नानासाहेब पेशव्यांना आपली मानहानि झाल्याप्रमाणें वाटलें. पण छत्रपतींच्या सत्तेपुढें त्यांना कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. या तहामुळें रघोजीबद्दल त्यांच्या मनांत जास्त द्वेषबुद्धि उत्पन्न होऊन राहिली असेल हें निराळें सांगावयास नकोच. ही हकीकत इ. स. १७४२–४३ च्या सुमारास घडली. यानंतर पेशवे व भोंसले आपापल्या मुलुखांत बंदोबस्त करूं लागले.

७. वरील एकंदर हकीकतीवरून नानासाहेब पेशवे व रघोजी भोंसले यांचें बरें नव्हतें, उलट पेशवे रघोजींचा द्वेष करीत होते हें स्पष्ट आहे. अशा परिस्थितींत शाहुमहाराज रघोजीचा मुलगा दत्तक घेणार व त्याला मराठी साम्राज्याचा मालक बनविणार ही गोष्ट पेशव्यांना 'मूले कुठारः' याप्रमाणें आपल्या सर्वस्वाचा घात करणारी होणार असें वाटल्यास आश्चर्य करण्याचें कारण नाहीं. नानासाहेबांना पेशवेपद मिळूं नये या मताचे रघोजी होते. पण शाहुमहाराजांच्या कृपेनें तें त्यांना मिळालें. परंतु त्यांच्या पश्चात् दत्तक गादीवर आल्यानंतर आणि रघोजीच्या हातांत सर्व राज्यसूत्रें गेल्यानंतर आपलें पेशवेपदाचें किंबहुना स्वतःचेंही अस्तित्व राहणें दुरापास्त होणार अशा समजुतीनें रघोजीचा मुलगा दत्तक न होईल अशी मसलत त्यांनीं चालविली.

८. इ. स. १७०९ मध्यें ताराबाईनीं करवीर संस्थान स्थापन केलें व आपला पुत्र शिवाजी याच्या नांवानें ती स्वतः राज्यकारभार करूं लागली. या शिवाजी महाराजांना भवानीबाई व पार्वतीबाई अशा दोन बायका होत्या. त्यांच्या मरणापूर्वी त्यांस व त्यांच्या दोन पत्नी व आई ताराबाई यांस कैदेंत ठेऊन राजसबाईचे (ताराबाईच्या सवतीचे) पुत्र संभाजीमहाराज यांस गिरजोजी यादव व पन्हाळयाचे गडकरी यांनीं करवीरच्या गादीवर बसविलें. पुढें थोड्याच दिवसांत इ. स. १७१४ मध्यें शिवाजीमहाराज पन्हाळयास कैदेंतच वारले.

त्या वेळीं त्यांच्या दोन बायकांपैकीं पार्वतीबाई या गरोदर होत्या. त्या तेथेंच प्रसूत झाल्या व त्यांना रामराजे या नांवाचा पुत्र झाला. ही हकीकत संभाजी महाराज व त्यांच्या पक्षाचे लोक यांना समजली तर, ते त्या मुलाच्या जीविताला धोका करतील या कल्पनेनें ताराबाईंनीं त्या मुलाला गुप्तपणानें रामचंद्रपंत अमात्य यांच्याकडे पाठविलें. त्यांनीं या मुलाचें पांच वर्षे होई-पर्यंत सर्व प्रकारें संगोपन केलें. शिवाजीमहाराजांचा हा पुत्र बावड्याला वाढला जात आहे, ही वार्ता संभाजी महाराजांची पत्नी जिजाबाई यांच्या कानां-वर आली. त्या लगेच त्या मुलाची चौकशी करण्याकरतां बावड्यास गेल्या. त्यावेळीं पंत अमात्यांनीं मोठ्या युक्तीनें त्या मुलास गडाखालीं पळवून नेऊन लपवून ठेवलें. हें वर्तमान ताराबाईस समजल्यानंतर त्यांनीं गोविंद खंडेराव चिटणीस यांस बावड्याला पाठवून दिलें. चिटणीसांनीं त्या मुलाला घेतलें व मोंगलाईंत पानगांवीं त्याची मावशी दर्याबाई निंबाळकर राहत होती तिच्या आश्रयाला त्याला ठेवलें. पुढें तिलाही उघड तऱ्हेनें त्याला ठेऊन घेतां येईना, ह्मणून तिनें त्यास तुळजापुरास एका भुत्याच्या हवालीं केलें. तेथें हे रामराजे वाढले.

९. इ. स. १७३० मध्यें छत्रपती शाहुमहाराजांनीं करवीरच्या संभाजी महाराजांचें पारिपत्य करण्याकरतां श्रीपतराव प्रतिनिधि यांच्याबरोबर मोठी फौज देऊन त्यांना त्यांच्यावर पाठविलें. प्रतिनिधींनीं अकस्मात् येऊन संभाजीमहाराजांच्या फौजेवर हल्ला केला व त्यांची दाणादाण उडवून देऊन त्यांना पळावयाला लावलें. प्रतिनिधींनीं संभाजीमहाराजांचे बरेच लोक पाडाव केलें. त्यांत ताराबाई, राजसबाई, रामचंद्रपंत आमात्य, त्यांचे पुत्र भगवंतराव वगैरे होते. त्यांना ते साताऱ्यास घेऊन आले. शाहुमहाराजांनीं राजसबाईंना परत पन्हाळ्यास संभाजीमहाराजांकडे पाठविलें. ताराबाईंसही तिकडेच परत पाठविण्याचा त्यांचा विचार होता. परंतु ताराबाईंचें ह्मणणें पडलें कीं 'मला कोठेंही कैदेंतच रहावयाचें मग पन्हाळा काय किंवा सातारा काय? मी

---

१ इचलकरंजी सं इ. पान. ६१.

येथेंच रहातें,' असें त्यांचें मत पडल्यामुळें शाहुमहाराजांनीं साताऱ्याच्या किल्यावर राजवाडा होता त्याची दुरुस्ती करून तेथेंच त्यांना ठेविलें. तेव्हांपासून ताराबाई शाहुमहाराजांच्या कैदेंत साताऱ्यास होत्या.

१०. ताराबाईचें व शाहुमहाराजांच्या पत्नी सकवारबाई यांचें बरें नाहीं हें नानासाहेब पेशवे यांना पूर्ण माहीत होतें; ह्मणून त्यांनीं ताराबाईकडे संधान बांधलें व त्यांना आपल्या पक्षांत ओढलें. रघोजी भोंसल्यांचा मुलगा साताऱ्याच्या गादीचा वारस होण्यापेक्षां जर आपल्या नातवाला—रामराजांना—पेशव्यांच्या मसलतीप्रमाणें गादी मिळाली तर सुमारें पस्तीस वर्षें कारागृहवास भोगल्याचें सार्थक होईल व आपल्या हातीं पुन्हां राज्याचा कारभार येईल या कल्पनेनें ताराबाई या पेशव्यांच्या मसलतींत शिरल्या. नानासाहेब ताराबाईच्या बळावर रामराजांना गादीवर आणण्याचा प्रयत्न करूं लागले. त्यामुळें पेशव्यांचा पक्ष व राणी सकवारबाई यांचा पक्ष असे दोन निरनिराळे पक्ष उत्पन्न झाले, व त्याप्रमाणें त्यांची कारवाई सुरूं झाली. राजकारणाचे डाव आपापल्या परीनें हे पक्ष टाकूं लागले.

११. शाहुमहाराज मरणापूर्वीं बरेंच दिवस आजारी होते व त्यांची शुद्धीही उडाली होती. तशांत रामराजांची वार्ता बाहेर पडली. तेव्हां राणी सकवारबाईनीं कोणी कांहीं कारस्थान करतील ह्मणून शक्यतो बंदोबस्त चालविला. त्यांनीं आपल्या पक्षाला यमाजी शिवदेव, जगजीवनराव प्रतिनिधि व दमाजी गायकवाड यांना अनुकूल करून घेऊन घाटमाथा व कोंकणपट्टी कडील बंदोबस्ताला कारभारी पाठवून तयारी चालविली. शाहुमहाराजांच्या भ्रांतिष्ट अवस्थेचा फायदा घेऊन कोणी कांही धोका देईल ह्मणून सकवारबाई-साहेब त्यांच्या जवळ नेहमीं बसून असत. त्यांच्या गैरहजिरींत त्यांच्या पक्षाचीं व त्यांच्या विश्वासाचीं माणसें बसत. परंतु अशी स्थिति असूनही मोठ्या हिकमतीनें नानासाहेब पेशव्यांनी त्यांच्याकडून आपणाला जशा सनदा पाहिजेत तशा करून घेतल्या. शाहुमहाराजांनीं नानासाहेबाकडे आपले सर्व अधिकार ज्या सनदांनीं दिले असें समजलें जातें त्या सनदा खालीं दिल्याप्रमाणें आहेत. अस्सल सनदा मोडींत आहेत.

## सनद पहिली.

श्री

राजमान रा। बाळजी प्रधान पंडीत यास आज्ञा तुह्मी फौज धरनेस खास आज्ञा केली त्यांच्या दैव नाहीं माहाराजास दुखने जाले नाहीं (कांहीं) वर हात (होत) नाहीं राजभार चाला पाहिजे तर पुढे वंस बसवने कोलापूरचे न करने चीटनीसा सरव सांगितले तसे करने वंस होईल त्याच्या आज्ञेत चालून राजमंडळ चालवने चीटणीस स्वामीचे इसवासू त्याच्या तुमच्या विचारे राज राखने वंस होईल तो तुमची घालमेल करनार नाहीं सुदन आसा.

## सनद दुसरी.

श्री.

राजमान रा। बालाजी पंडीत प्रधान आज्ञा जे राजभार तुह्मी चालवाल हा भरवसा स्वामीस आहे पहिले सांगीतले खातरजमा ती चीटनीसानी आसल कली (केली) तुमचे मसतकी हत (हात) ठेविला आहे वस होईल तो तुमचे पद प्रधान चालवील करील आतर (अंतर) तर सफत (शपथ) आसे त्याचे आज्ञेत चालून सेवा करने राज राखने बहुत काय लिहीने सुदन आसा.

१२. या दोन सनदांच्या आधारावर छत्रपतींच्या गादीचे अधिकार पेशव्यांकडे आले असें समजलें जातें. या लक्षपूर्वक वाचल्या ह्मणजे असें दिसून येईल कीं, पहिल्या सनदेच्या मजकुरावरून त्यांत चिटणीसांचा विशेष संबंध दाखव्यांत आलेला आहे. 'चिटणीसास सर्व सांगितलें. चिटणीस स्वामीचे विश्वासु' अशा गौरवानें व त्यांना प्राधान्य देऊन पेशव्यांनीं राज्यकारभार करावा असा त्यांतून स्पष्ट ध्वनि निघतो.

१३. यावेळीं साताऱ्यास छत्रपतींच्या चिटणीसांचें काम करणारे गोविंद खंडेराव हे होते. जिवाजी खंडेराव मेल्यानंतर इ. स. १७४२ मध्यें त्यांचा वडील मुलगा रामराव जिवाजी यास चिटणीशीचीं वस्त्रें दिलीं गेलीं. परंतु तो केवळ सात वर्षांचा लहान मुलगा असल्यामुळें शाहुमहाराजांकडून त्याचे

जागीं गोविंद खंडेराव हे मुत्सद्देगिरींत व लिहिण्यांत खबरदार होते ह्मणून त्यांना नेमून घेण्यांत आलें. नानासाहेब पेशव्यांनीं ताराबाईंस रामराजांना गादीवर आणण्याचें आमिष दाखवून त्यांना आपल्या पक्षांत ओढलें, त्याचप्रमाणें गोविंद खंडेराव यांच्या ओठाला त्यांचें चिटणीशीपद कायम राखण्याचें मधाचें बोट लावून त्यालाही आपल्या पक्षांत समाविष्ट करून घेतलें. गोविंदराव चिटणीस हे मुत्सद्दी होते. राणी सकवारबाईंच्या विरुद्ध पेशव्यांच्या कटांत सामील व्हावयाचें, ह्मणजे त्यांत आपला स्वार्थ जेवढा साधतां येईल तेवढा तो साधावा हें त्यांचें धोरण होतें. त्या धोरणाला धरून त्यांना पेशव्यांना मदत करावयाची होती. नानासाहेब पेशव्यांना जी पहिली सनद त्यांनीं छत्रपतींच्या शिक्कामोर्तबानें दिली, त्यांत त्यांनीं आपलें स्थान पेशव्यांच्या अधिकारावर ठेवण्याची मुत्सद्देगिरी लढविली.

१४. दोन्हीं सनदांत शाहुमहाराजांच्या पश्चात् कोणाला गादीवर बसवावें याचा उल्लेख नाहीं. रामराजे यांनाच जर गादीवर आणावयाचें होतें व शाहुमहाराजांनीं जर तसें नक्की ठरविलें असतें तर या सनदांत त्यांचा उल्लेख होणें जरूर होतें. पण तसें केलेलें नाहीं. या सनदा घेतल्या त्यावेळीं कोणताच वारसदार शाहुमहाराजांनीं नक्की ठरविलेला नव्हता. राणी सकवारबाईंनीं रघोजी भोंसल्यांचा मुलगा मुधोजी हा त्यावेळीं साताऱ्याजवळ देऊर गांवीं होता, त्याला आणून शाहुमहाराजांस दाखविलें व त्यांनीं त्याला आपल्या पक्षाचा दत्तक ह्मणून पुढें आणलें. पेशव्यांनीं ताराबाईंना पुढें करून व त्यांच्याकरवीं पडद्याआड दडलेल्या आपल्या रहस्यमय नातवाची जन्मकथा छत्रपतींना कथन करवून, आपल्या पक्षाचा दत्तक ह्मणून त्याला पुढें आणलें. चिटणीसांना आपलें स्थान स्थिर ठेवण्याकरतां आपल्या पक्षाचा दत्तक पुढें आणणें प्राप्त होतें. ह्मणून त्यांनीं छत्रपती शिवाजीमहाराजांचे चुलत आजे विठोजीराजे यांच्या वंशांतील एक मुलगा दत्तक ह्मणून पुढें आणला. याप्रमाणें शाहुमहाराजांच्या पश्चात् आपापलीं स्थानें मजबूत करण्याकरतां तीन दत्तक म्हणून पुढें करण्यांत आले. राणी सकवारबाईंच्या पक्षाचा दत्तक उघड पुढें आला. बाकीच्या दोन

पक्षाचे दत्तक मात्र गुलदस्तांत राहिले. राणीसाहेबांच्या दत्तकाची ठाम निश्चिती झाल्यामुळें शाहुमहाराजांच्या पश्चात् राज्यव्यवस्थेला कशा प्रकारें वळण लागणार हें उघड दिसतच होतें. रघोजी भोंसले यांचें प्रस्थ विलक्षण माजणार व त्यांच्या हाताखालीं पेशवे व चिटणीस यांना वागावें लागणार, त्यांच्या मर्जी-वर अगर इतराजीवर आपापलीं स्थानें स्थिर अगर अस्थिर राहणार हें पेशवे व चिटणीस यांच्या बुद्धीला पटण्यासारखें नव्हतें. म्हणून त्यांना रघोजींचा मुलगा दत्तक होणें हें हानिकारक वाटत होतें.

१५. रघोजी भोंसले यांचा मुलगा दत्तक न होण्यामध्यें चिटणीस व पेशवे यांची एकवाक्यता झाल्यामुळें त्यांना आपापले अमुक एक दत्तक घेण्याबद्दलचे मतभेद थोडे बाजूला ठेऊन एक व्हावें लागलें, आणि जेवढ्यापुरती एकवाक्यता झाली तेवढ्याच क्षेत्रापुरती कार्याची दिशा त्यांना आंखून घेऊन कार्यभाग साधावा लागला. शाहुमहाराजाकडून घेतलेली पहिली सनद याच मुद्यावर आहे. त्यांत दत्तकाचा नामानिर्देश न करण्याचें हेंच रहस्य आहे.

१६. पहिल्या सनदेंत दत्तकाचा नामनिर्देश केला नाहीं. पण त्यांत एका महत्वाच्या गोष्टीचा उल्लेख मात्र केला आहे. तो म्हणजे 'कोलापूरचे न करणे.' कोल्हापुरास संभाजीमहाराज गादीवर होते. त्यांना संतती नव्हती. संभाजी महाराजांना साताराच्या गादीवर आणण्यांत शाहुमहाराजांचें कोणतें अनहित होतें हा प्रश्न उत्पन्न होतो. शाहुमहाराज हे ज्याप्रमाणें मराठी साम्राज्याचे आद्य संपादक छत्रपती शिवाजीमहाराज यांचे नातु, त्याचप्रमाणें कोल्हापूरचे संभाजीमहाराज हे नातूच. फरक एवढाच कीं शिवाजीमहाराज यांचा वडील मुलगा संभाजी यांचा पुत्र म्हणून शाहु वडील घराण्याचा अधिकारी, व धाकटा मुलगा राजाराम यांचा मुलगा संभाजी म्हणून तो लहान घराण्याचा अधिकारी. याशिवाय अधिकाराच्या बाबतींत अथवा मालकीहक्काच्या बाब-तींत शाहु अगर संभाजी यांच्यांत दुसरा कोणताच फरक नव्हता. मराठी साम्राज्याची गादी ही शाहुमहाराजांची स्वसंपादित गादी नव्हती. ती वाडिलोपार्जित असल्यानें आपल्या स्वतःच्या कोणत्याही लेखानें संभाजी

महाराजांचा वारसा हक्क ते नष्ट करूं शकत नव्हते. फक्त एकाच गोष्टीनें सातारच्या गादीवरील संभाजीमहाराजांचा हक्क जाणारा होता. ती म्हणजे हिंदुधर्मशास्त्रपद्धतीनें शाहुमहाराजांनीं आपल्या मांडीवर दत्तक घेणें ही होय. शाहुमहाराजांनीं रामराजांना प्रत्यक्ष दत्तक घेतलें नाहीं. पहिल्या सनदेंत 'पुढें वंश बसविणें' एवढीच आपली इच्छा दर्शविली आहे. दत्तक घेऊन गादीचा वारस करणें हें मयत राजाच्या पश्चात् त्याच्या राणीचें कर्तव्य आहे. राणी सकवारबाईनींही रामराजांना दत्तक घेतलें नाहीं. शाहुमहाराजांची दुसरी राणी ही दत्तक घेण्यास जिवंत नव्हती. अशा स्थितींत गादीला वंश करण्याचा अधिकार—एकाद्या वकिलामार्फत दत्तक पुत्र घेण्याचा अधिकार—हिंदुधर्मानें दिलेला नाहीं. मग रामराजे शाहुमहाराजांचे दत्तक पुत्र कसे होऊं शकले व संभाजीमहाराजांचा सातारच्या गादीवरील जन्मजात वारसा हक्क कसा नष्ट झाला ? हा हक्क शाहुमहाराजांच्या कोणत्याही लिखाणानें रद्बातल होऊं शकत नाहीं. संभाजीमहाराजांनीं सातारच्या गादीचा जर राजीनामा दिला असता, तरच ही गोष्ट होऊं शकली असती. परंतु तसा त्यांनीं राजीनामा दिलेला नव्हता.

१७. अशी सर्व वस्तुस्थिति असतां कोल्हापूरचा वंश न करणें याचा अर्थ काय हा प्रश्न शिल्लक राहतो. यावेळीं पेशव्यांच्या पक्षांत मुख्य तीन माणसें होतीं. ताराबाई, गोविंदराव चिटणीस व नानासाहेब पेशवे. ताराबाईचें व संभाजीमहाराजांचे पूर्ण वैमनस्य होतें हें वर आलेंच आहे. शाहुमहाराज व संभाजी यांचा भाऊबंदी तंटा होता, ह्मणून त्यांचेंही बरें नव्हतें. आतां पेशवे व चिटणीस यांचें शाहुमहाराजांचे सेवक या नात्यानें राजकारणापुरतें वैमनस्य असेल, पण तें विचारांत घेण्याइतकें महत्वाचें नव्हतें. तथापि उभयतांना संभाजीमहाराज सातारच्या गादीवर यावयाला नको होते. ते जर वारसदार म्हणून आले असते तर त्यांच्या आज्ञेंत राहूनच पेशवे व चिटणीस यांना कारभार करावा लागता. त्यांची मर्जी रुष्ट झाली असती तर ते दोघेही आपापल्या पदाला मुकले असते

रघोजी भोंसले यांचा मुलगा दत्तक घेण्यानें जी परिस्थिती निर्माण झाली असती तीच संभाजीमहाराज साताऱ्च्या गादीवर आल्यानें होणार होती, असें या उभयतांना कळून चुकलें होतें. म्हणून शाहुमहाराजांचा वंश करावा पण तो कोल्हापूरचा नको अशी त्या सनदेंत नोंद करून ठेवण्यांत पेशवेपक्षाचा अंतिम हेतू होता.

१८. गोविंदराव चिटणीसांना वाटत होतें कीं शाहु महाराजांच्या पश्चात् दत्तक घ्यावयाचा म्हणजे तो राणी सकवारबाईनींच घेतला पाहिजे. शाहुमहाराजांच्या सनदेंतील आज्ञेप्रमाणें त्यांना संभाजी महाराजांना घेतां येणार नाहीं; रघोजीचा मुलगा घ्यावा तर त्याला पेशवे व चिटणीस या उभयतांचा पूर्ण विरोध तेव्हां तीही गोष्ट अशक्य होती. शिवाय ताराबाईनीं रामराजांच्या दत्तकाचें घोडें पुढें ढकलल्यामुळें त्याही या दत्तकाला विरुद्धच होत्या. आतां राहिला रामराजा. तो ताराबाईचा नातु. सकवारबाईंना वाटत होतें कीं रामराजाला दत्तक घेतलें तर सर्व सत्ता ताराबाईंच्या हातीं जाईल व आपणाला अखेरपर्यंत कैदेंत रहावें लागेल. तेव्हां रामराजाला दत्तक घेण्याला सकवारबाई केव्हांही तयार होणार नाहींत म्हणून तोही दत्तक होणें अशक्य. अशा सर्व परिस्थितींत कोणाचाहि विरोध नसलेला आपल्या पक्षाचा विठोजीराजे यांच्या वंशांतील मुलगा सकवारबाई आपल्या मांडीवर दत्तक घेतील असा डाव चिटणीसांनीं टाकला होता. व त्याच धोरणावर सनदेंत त्यांनीं दत्तकाच्या नांवाचा नामनिर्देश केलेला नव्हता हें लक्षांत येईल.

१९. पेशव्यांनाही आपला डाव साधण्याकरितां दत्तकाचा नामनिर्देश नकोच होता. या पहिल्या सनदेच्या वेळीं नानासाहेब जातीनें साताऱ्यास नव्हते. पेशवे व चिटणीस यांच्या मसलतींत अशा प्रकारची सनद छत्रपतींकडून घ्यावी असें ठरलें व त्याप्रमाणें चिटणीसांनीं ती घेतली. परंतु मागें दर्शविल्याप्रमाणें त्यांनीं अधिकाराच्या दृष्टीनें आपलें वर्चस्व या सनदेंत ठेवलें. ' पुढें वंश बसविणें, कोल्हापूरचा न करणें. चिटणीसास

सांगितलें तसें करणें. वंश होईल त्याच्या आज्ञेंत चालून राजमंडळ चालविणें. चिटणीस स्वामीचे विश्वासु, त्यांच्या तुमच्या विचारें राज्य राखणें.[१] यावरून चिटणीसास सांगेतलें तसें करणें या वाक्यांत गूढार्थ आहे. याचा अर्थ एवढाच निघतो की कोणता दत्तक घ्यावयाचा हें शाहुमहाराजांनीं फक्त चिटणीस यांस सांगितलें होतें. म्हणजे चिटणीस सांगतील तो दत्तक होणार होता. शिवाय चिटणीस हे स्वामीचे विश्वासू असें वाक्य त्यांत घालून चिटणीसांच्या सांगण्याबाहेर कोणी जाऊं नये व त्यांच्या सांगण्यावर कोणी अविश्वास दाखवूं नये अशी त्यांत खबरदारी घेतली होती. यावरून चिटणीस सांगतील तो दत्तक, अर्थात तो चिटणीसांच्या पक्षाचाच येणार. म्हणून छत्रपती चिटणीसांच्या हुकूमतींत व चिटणीस करतील ती पूर्व दिशा, असाच त्या सनदेचा अर्थ निघतो. 'त्यांच्या (चिटणीसांच्या) तुमच्या विचारें राज्य राखणें' या वाक्यावरूनही चिटणीसांना प्राधान्य देण्यांत आलें होतें. एकंदरीत ही सनद घेण्यांत मागें दर्शविल्याप्रमाणें चिटणीसांनीं आपली मुत्सद्देगिरी लढविली व आपलें स्थान पूर्ण मजबूत करून घेऊन मराठी साम्राज्याचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं ठेवण्याचा डाव त्यांनीं टाकला.

२०. पहिली सनद नानासाहेब पेशव्यांच्या हातीं ज्यावेळीं प्रत्यक्ष पडली त्यावेळीं त्यांना चिटणीसांनीं आपलें स्थान बळकट करून घेतल्याचें स्पष्ट दिसलें. पण पेशवेपद नानासाहेबांच्या कडेच चालावें असें त्यांवरून स्पष्ट होत असलेलें त्यांना दिसेना. चिटणीस व दत्तक छत्रपती हे जर एक झाले, तर ते पेशव्यांना त्यांच्या पदावरून खालीं ओढूं शकतील हें त्यांना दिसून आलें. आपलें स्थान अढळ करण्याकरतां पहिल्या सनदेची पुस्ती म्हणून दुसरी सनद करण्याची मसलत नानासाहेबांना करावी लागली. नाहीं तर एका कामाकरतां निरनिराळ्या वेळीं दोन निरनिराळीं चिटोरीं खरडण्याचें कारण नव्हतें.

२१. 'तुमचे ( नानासाहेबांचे ) मस्तकीं हात ठेविला आहे, वंश होईल तो तुमचें पद प्रधान चालवील, करील अंतर तर शपथ आहे' अशीं वाक्यें घालून दुसरी सनद घेण्यांत आली. अर्थात नानासाहेबांचें स्थान अढळ करण्याकरितांच ही दुसरी सनद त्यांना करून घ्यावी लागली हें स्पष्ट दिसतें. या दोन्हीं सनदांच्या एकंदर स्वरूपावरून शाहुमहाराज भ्रमिष्ट स्थितींत असतांना मुत्सद्यांना जसें वाटेल व जसें पटेल तसें त्यांनीं लिहून घेतलें आहे. शाहु महाराजांनीं आपल्या मनानें आपल्या राज्याच्या व्यवस्थेकरतां या सनदा दिल्या नसून पेशवे व चिटणीस यांना जशा पाहिजेत तशा त्यांनीं त्या करून घेतल्या हें उघड आहे. त्या सनदांच्या मजकुरांत शाहुमहाराजाची बुद्धि, अंतःकरण व आपलेपणा कोठेंच दिसत नाहीं. आपल्या मराठी साम्राज्याची व्यवस्था जर त्यांनीं आपल्या बुद्धीने केली असती तर त्यांच्या मायेचा एकच धागा त्यांच्या पश्चात् राहणार होता. तो म्हणजे त्यांची पट्टराणी सकवारबाई या होत. त्यांचा दर्जा, त्यांचा मान कशा प्रकारे ठेवण्यांत यावा याचा त्यांनीं खात्रीनें उल्लेख केला असता. दत्तक पुत्राचा व राणीसाहेबांचा जर बेबनाव झाला तर ताराबाईप्रमाणें आजन्म तुरुंगवास त्यांनीं भोगावा ही स्वतःची पुढें होणारी मानहानि त्यांनीं स्वतःच्या हाताने करून घेतली नसती. आपण दिलेल्या सनदांत सकवारबाईच्या नांवाचा उल्लेख करून व त्यांचें स्थान व त्यांचा दर्जा स्पष्ट करून नानासाहेब पेशव्यांना त्यांनीं सनदा दिल्या असत्या. परंतु ही अत्यंत महत्वाची गोष्ट सनदांत नाहीं.

२२. दुसरी तितकीच महत्वाची गोष्ट म्हणजे छत्रपती शाहुमहाराजांनीं राज्य सुरळीत चालावें या हेतूनें ही व्यवस्था केली असें गृहीत धरून चाललें, तरी त्यांना आपली छत्रपतीची गादी नष्ट व्हावी व जे वंश पुढें होतील ते पेशव्यांचे गुलाम बनावे असें मात्र वाटणें शक्य नव्हतें. असें असतां दुसऱ्या सनदेंत "जो वंश होईल तो तुमचें प्रधानपद चालवील, अंतर करील तर शपथ" असे शब्द प्रयोग करून शाहुमहाराज दत्तकाला

नैतिक बंधनानें बांधून टाकतात. परंतु उलटपक्षी पेशवे जर दत्तक छत्रपतीबरोबर निमकहराम झाले तर मात्र त्यांना कोणतेंच बंधन ठेवलेलें नाहीं. होणाऱ्या दत्तकावर बेभरंवसा म्हणून त्याला शपथ व पेशवे आणि चिटणीस हे पूर्ण विश्वासाचे गड्डे म्हणून त्यांना कोणतेंच बंधन नाहीं असा त्याचा अर्थ कीं काय ? परस्परामधील व्यवहार पाळावयाचा असला तर परस्परांनीं एकमेकांस नैतिक बधनानें मर्यादित करून घ्यावयाचें असतें, एवढें व्यवहारज्ञान शाहुमहाराजांना नव्हतें असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं.

२३. वरील अत्यंत महत्वाच्या व छत्रपतींच्या जिव्हाळ्याच्या दोन गोष्टींचा ज्या अर्थीं सनदांत उल्लेख नाहीं त्या अर्थीं त्या छत्रपती शाहु महाराजांनीं आपल्या बुद्धीनें, अंतःकरणपूर्वक व छत्रपतींच्या दर्जाची जाणीव असलेल्या स्थितींत खात्रीनें दिलेल्या नाहींत. धोकेबाजीनें छत्रपतींच्या भ्रमिष्टपणाचा फायदा घेऊन त्या केवळ स्वार्थ साधण्याकरतां संपादिल्या आहेत यांत तिळमात्र संशय नाहीं. शाहुमहाराजांचा चिटणीस व पेशवे याच्यावर सनदांत दाखविल्याप्रमाणें विश्वास होता कीं काय याचें प्रत्यंतर खालील पत्रावरून सहज लक्षात येईल.

२४. शाहुमहाराजाना दोन बायका होत्या. वडील सकवारबाई ह्या मोहिते घराण्यांतल्या व धाकट्या सगुणाबाई या शिर्के घराण्यांतल्या होत्या. शाहुमहाराजांनीं नानासाहेबांना पेशवेपद दिल्यानंतर त्यांना दोन वेळां पेशवेपदावरून दूर ठेवण्यांत आलें होतें. रघोजी भोंसल्यांच्या बाबतींत इ. स. १७४३ मध्यें नऊ महिने व इ. स. १७४७ मध्यें बाबूजी नाईक बारामतीकर यांच्या बाबतींत सुमारें ३।४ महिने त्यांना कामावरून दूर ठेवण्यांत आलें होतें. इ. स. १७४७ मध्यें नानासाहेबांना पेशवेपदावरून कांहीं काल दूर केलें त्या अवधींत शाहुमहाराजांकडे फिरून नोकरीवर घेण्यासंबंधी नानासाहेबांनीं जे वशिले लावले व जी खटपट केली त्या संबंधींचें खालील पत्र आहे. शाहुमहाराजांची धाकटी बायको

सगुणाबाई या नानासाहेबांबद्दल फिरून त्यांना नोकरीवर घेण्याकरतां रदबदली करीत होत्या हें या पत्रावरून समजेल. सगुणाबाईचें व सकवार बाईचें बरें नव्हतें. त्यांच्यामध्यें सवतीमत्सर होता. हें पत्र इ. स. १७४७ च्या एप्रिल महिन्यांत साताऱ्याहून महादाजी पुरंदरे यांनीं नानासाहेब पेशव्यांना लिहिलेलें आहे. सगुणाबाई म्हणजे धाकट्या राणीसाहेब, गोविंदराव चिटणीस व महादाजी पुरंदरे या त्रिवर्गाच्या खटपटी नानासाहेबांना फिरून नोकरीवर घेण्याकरतां कशा अंतस्थ रीतीनें चालल्या होत्या याचा खुलासा होईल. हें पत्र पुढील राजकारणाचीं कोडीं उकलण्याला विशेष मदतगार होईल म्हणून येथें तें सविस्तर देणें भाग आहे. " पुा सेवेशीं विज्ञापना. आजी शनवार प्रातःकाळीं दरबारास गेलों होतों राजश्रींचा (छत्रपती शाहुमहाराजांचा) मुजरा जाहाला. दरबार भरला होता, चार घटका दरबार जाहला. तदोत्तर राजश्री स्नानास गेले. मी धाकटे बाईकडे (सगुणाबाईकडे) मुजऱ्यास गेलो. दहापांच जण बाईकडे बसले होते. त्यांस बाईनीं सर्वांस उठोन जा म्हणून आज्ञा केली. सारे उठोन गेले. मला व सुकानंद यास बसा म्हणाली. तदोत्तर आज्ञा केली कीं, नानाला राजश्रींची मर्जी राखणें आहे की नाहीं. महाराज अतीशय रात्रौ रागें नानावर भरले. व त्रिवर्ग राऊ मशार निल्हे याजवरही भरले. त्यावरून बाई म्हणाली कीं, म्या महाराजांस अर्ज केला कीं, आपण उगीच रागें भरूं नये. विचारें करून नानास आज्ञा केली तर साहेबांचे सेवेशी हजीर आहेत. साहेबीं दुसरा विचार न आणावा. नानाची एकनिष्ठता साहेबांचे पायांशीं फार आहे. तेव्हां राजश्रींनीं बाईशीं उत्तर दिलें कीं, 'मी नानाजवळ एक तिरुका मागेन तर बाळकृष्णाची मला आण, व तुमच्या गळ्याची आण. मला पुरे जाहलें. नानाला म्या कागद लिहिला, त्याचें उत्तर " तिघांजवळ बोललों आहेच " असें लिहितो. तस्मात् माझा चाकर नाना नव्हे. या त्रिवर्गाचा चाकर नाना. असो. मला कांहींच

---

१ सरदेसाई कृत नानासाहेब पेशव्यांचें चरित्र पान ५० टीप.

मागणें नाहीं. नाना माझा माझा मी ह्मणत होतों, त्याची गत ही जाहली. त्रिवर्गांनीं जी केली ती बरीच केली. त्यांहींमध्यें गोविंदरायाचा ( गोविंदराव चिटणीस ) उपकार तो मजवर फारच आहे. मला गोविंदरायानें करंगळीवर खेळवून असा परिणाम केला. असो. मी तिघांच्या पायावर डोकीं ठेवतों. ऐसें फार फार रागास येऊन गोष्टी बोलले.' बाई ह्मणाली कीं, म्यां फार गोष्टी सांगितल्या. विचारें करून गोष्ट सांगा, मी नानास सांगोन ऐकवितें. तेव्हां मागती महाराज बाईशीं बोलले कीं, " तुह्मीं तोंडघशीं पडाल. ते तुह्मांस पाडितील. तुह्मीं मूर्ख आहां, तुह्मांस कळत नाहीं. नाना कांहीं ऐकतो असें नाहीं." ऐसें बोलल्याचा विचार तुह्मी काय करितां? खावंदाला खट्टे केल्यांत जीव नाहीं. देणें तें घालच, परंतु नासवूं नका. तेव्हां म्यां बाईसाहेबांस अर्ज केला कीं, महाराज जर विचारें करून आज्ञा करतील तर प्रधानपंतास लेहून पाठवूं. साहेबांचे आज्ञेशिवाय काय आहे! व नानाचें पत्रही महाराजांस असेंच आलें आहे. आपणच विचारें करोन आज्ञा करणें ते करावी. आज्ञेशिवाय नाना नाहींत. तेव्हां मागती बाईनीं आशंका हे पुसिली कीं, कदाचित् महाराजांचे मर्जी पाहून म्यां अर्ज केला तर नाना ऐकतील? गोविंदराव व तुह्मी "........ ( पुढील कागद नाश झाला आहे ).

हें पत्र लक्षपूर्वक वाचलें ह्मणणे गोविंदराव चिटणीस व नानासाहेब पेशवे यांच्यावर छत्रपती विश्वास टाकतील व त्यांना विश्वासू ह्मणतील हें संभवतें काय? " गोविंदरायानें मला करंगळीवर खेळवून असा परिणाम केला" " याचा अर्थ काय? हे मुत्सद्दी छत्रपतींना सुद्धां करंगळीवर नाचवीत होते व त्यांच्या इच्छेविरुद्ध राजकारण घडवून आणीत होतें हें स्पष्ट होतें. छत्रपती मनाच्या व शरीराच्या पूर्ण चांगल्या स्थितींत असतांना जर हे मुत्सद्दी त्यांना असा दगा देत होते तर त्यांच्या भ्रमिष्ट स्थितींत ते त्यांच्याकडून आपल्या मनाला येईल त्याप्रमाणें लेख लिहून घेऊन त्यांना व त्यांच्या वारसदारांना धोका देण्याला मागें पुढें पाहणार नाहींत, यांत कशाही प्रकारची शंका

प्रेम्याचें कारण नाहीं. नानासाहेबांबद्दल छत्रपतींचें अंतःकरण पुढील वाक्यांवरून स्पष्ट दिसेल 'मी नानास सांगोन ऐकवितें. तेव्हां मागती महाराज बाईशीं बोलले की, "तुह्मी तोंडघशी पडाल, ते तुह्मांस पाडितील, तुह्मी मूर्ख आहां, तुम्हांस कळत नाहीं. नाना कांहीं ऐकतो असें नाहीं.' यावरून नानासाहेब हे राणी सगुणाबाई यांना सुद्धां तोंडघशीं पाडावयाला मागें पुढें पहाणार नाहींत असें प्रत्यक्ष छत्रपती बजावीत होते. त्यांचें निक्षून सांगणें स्वतःच्या पूर्ण अनुभवाचें होतें. हें पत्र वाचलें असतां नानासाहेब व गोविंदराव चिटणीस याच्यावर छत्रपतींचा कितपत विश्वास होता हें आतां निराळें सांगण्याची जरूरी नाहीं.

२५. वरील पत्र कोणीतरी चिटणीस व पेशवे यांच्या हितशत्रूंनीं त्याच्याबद्दल भलताच ग्रह करण्याकरता लिहिलें असें कोणी ह्मणूं शकेल. परंतु या पत्राच्या बाबतींत तसें कोणाला ह्मणतांच येणार नाहीं. तें पत्र नानासाहेबांच्या व गोविंदरावाच्या कटांतील त्यांच्या पूर्ण विश्वासाच्या इसमानें ह्मणजे महादोबा पुरंदरे यानींच लिहिलें आहे. तेव्हा त्यांत कोणतेच मुत्सद्देगिरीचे डावपेच नाहींत. हें पत्र खरी वस्तुस्थिति दाखविणारें असून यांत छत्रपतींचे प्रामाणिक मत उघड झालें आहे. शिवाय या दोघांच्या कृतीबद्दल छत्रपतींना एवढा राग, इतका वैताग व इतकी चीड आली होती की ते त्या पत्रांत असें ह्मणतात "तिघांच्या पायांवर डोकी ठेवितों." छत्रपतींनीं आपल्या नोकरांच्या पायांवर डोकें ठेवावे एवढी मजल या पेशवे–चिटणीसांनीं गांठली होती, यावरून छत्रपती चांगल्या स्थितींत असतांना त्याना सळो का पळो असें त्यांनीं केलें होतें यांत तिळमात्र शंका उरत नाहीं. अशा कपटी व विश्वासघातकी पेशवे व चिटणीस या जोडीवर मरणाचे वेळीं छत्रपती केव्हांही विश्वास टाकणार नाहींत व त्यांना विश्वासू असें संबोधणार नाहींत. ह्मणून त्यांनीं घेतलेल्या दोन सनदा छत्रपतींची फसवणूक करून घेतल्या आहेत हें स्पष्ट ठरतें.

२६. वरील दोन सनदा पेशव्यांच्या हातीं पडल्यामुळें त्यांच्या कारस्थानाला जोर चढला. आपल्या डोळ्यांत धूळ फेंकून नानासाहेबांनीं

छत्रपतीकडून कांहीं लेख घेतले याचा सुगावा सकवारबाईंना लागतांच छत्रपतीची राजसत्ता पेशवे गिळंकृत करावयाला लागले आहेत, तेव्हां त्यांना तशी ती करूं दिल्यानें आजपर्यंतच्या मराठी राज्याच्या कीर्तीचा लोप होईल, छत्रपतीच्या सिंहासनावरील वंश पेशव्यांच्या हातचें बाहुलें बनल्यावर दरवेशाच्या अस्वलाप्रमाणें छत्रपतीचें विडंबन होईल, या कल्पनेनें त्यांनीं भवितव्यतेवर भार टाकून, शेवटचा प्रयत्न करण्याचें ठरविलें. रघोजी भोंसल्याचा मुलगा दत्तक घेण्यांत राणीसाहेबांचा उद्देश उघड होता. छत्रपतीचें तेज चमकावें, त्यानें नोकरांच्या ताटाखालचें मांजर होऊं नये आणि अशी स्थिति उत्पन्न न होण्याला दत्तकाच्या मागें एक जबरदस्त शक्ति असावयाला पाहिजे. रघोजी भोंसले यांचा मुलगा दत्तक घेतल्यानें त्याच्या मागें एक फार मोठी शक्ति राहणार होती. ते ज्याप्रमाणें स्वपराक्रमावर फार मोठ्या योग्यतेला चढले, त्याचप्रमाणें त्यांचा मुलगा आपल्या वडिलांच्या जोरावर आणि छत्रपतीच्या सिंहासनाच्या बळावर खात्रीनें उदयाला आला असता. राणीसाहेबांचा हा हेतु जर सफल झाला असता, तर दैववशात् मराठी राज्याच्या इतिहासाला फारच निराळें वळण लागलें असतें, आणि पुढें छत्रपतींचें झालेलें विडंबन टळलें असतें. परंतु होणारी गोष्ट टळत नाहीं. छत्रपतीची साताऱ्यास येण्याबद्दल रघोजी भोंसले यांना आज्ञा गेली होती. राणी सकवारबाई त्यांची सारखी वाट पहात होत्या. त्यांच्या येण्यावर छत्रपतीच्या गादीचें भवितव्य अवलंबून होतें. अशी सर्व परिस्थिति असतां रघोजी भोंसले मात्र शाहुमहाराजांच्या अंतकाळीं येऊं शकले नाहींत. त्यांचें वेळेवर न येण्याचें कारण ते बंगालवर स्वारीस गेले होते व त्यामुळें ते येऊं शकले नाहींत असें वरपांगीं दाखविलें जातें. परंतु खरें कारण निराळेंच होतें. बंगालच्या राजकारणापेक्षां आपला मुलगा छत्रपतीच्या गादीचा अधिपती होणार हें जास्त महत्वाचें कार्य होतें. परंतु त्या गोष्टीकडे रघोजींनीं दुर्लक्ष केलें, एवढेंच नाहीं तर शाहुमहाराजांनीं त्यांना येण्याबद्दल

आज्ञा केली असतां, ते ज्या अर्थी आले नाहींत त्या अर्थी, अंदरकी बात निराळीच होती यांत संदेह नाहीं.

२७. आपला मुलगा साताऱ्याच्या गादीवर दत्तक होणें हें नानासाहेब पेशव्यांना अनिष्ट आहे हे रघोजी जाणून होते. शिवाय नानासाहेबांच्या मनांत आपल्याबद्दल किती द्वेष आहे, हेंही ते जाणतच होते. अशा वेळीं रघोजीनें साताऱ्यास येणें ह्मणजे नानासाहेबाबरोबर लढाई करण्याच्या पूर्ण तयारीनें नागपुराहून येणें प्राप्त होतें. पेशव्यांच्या घरांत शिरून, त्यांच्याबरोबर लढाई देऊन, त्यांत आपणाला यश मिळालें तर ठीक, परंतु जर त्यांत पराभव झाला, तर मात्र रघोजीची परिस्थिति फार बिकट होणार होती. शाहुमहाराजाच्या मध्यस्तीनें पेशवे व भोंसले यांचा तह होऊन त्यांना जो सवता सुभा मिळाला व ते जे एक प्रकारचे स्वतंत्र राजे बनले, या गोष्टींना पेशव्यांच्या मुलखांत शिरून आगळीक केल्यानें हरताळ फांसला जाणार होता. हातचें सोडून पळत्याच्या पाठीला लागून त्यांत यश मिळण्याचा विश्वास रघोजीला वाटला नाहीं. ह्मणूनच ते हें भलतेंच धाडस करण्याला तयार झाला नाहीं, हेंच विचारांतीं खरें वाटतें. नानासाहेबांनीं रघोजीचा एकदां मोड केल्यामुळें त्याच्या मनांत नानासाहेबांविरुद्ध कोणतीही गोष्ट करण्याची भीति होती हें निराळें सांगण्याची गरज नाहीं. रघोजी भोंसले मुत्सद्दीही होते अशी त्यांची ख्याति आहे.

२८. रघोजी भोंसले येऊन आपल्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडतील ही आशा सकवारबाईंना आतां उरली नाहीं. ह्मणून त्यांनीं त्यांचा नाद सोडला व शेवटचा प्रयत्न ह्मणून त्यांनी करवीरच्या संभाजीमहाराजांशीं मसलत सुरू केली. संभाजीमहाराजांचा पराक्रम किती आहे हें त्या जाणून होत्या. परंतु ते पेशव्यांचे गुलाम बनून राहणार नाहींत एवढी मात्र त्यांना खात्री होती. थोरल्या शिवाजीमहाराजांचे शाहुमहाराज ज्याप्रमाणें नातू, त्याचप्रमाणें करवीरचे संभाजीमहाराजही नातूच. दोघेही मराठी राज्याच्या छत्रपतीपदाचे सारखेच अधिकारी. वडील घराण्याचा अधिकार किंवा

लहान घराण्याचा अधिकार याविषयीं तंटे माजून अगर शाहुमहाराजांना तोतया ह्मणण्यांत किंवा त्यांचा वारसाहक्क न मानण्यांत ताराबाईंची भावना अथवा त्यांचा स्वार्थ कांहींही असो, तो स्वार्थ आड येऊन जरी उभयतांमध्यें युद्धप्रसंग घडले असले, तरी राज्यावरील जन्मजात हक्क कोणी कोणाचा काढून घेऊं शकला नाहीं. ताराबाईंनीं करवीरचें स्वतंत्र राज्य स्थापिलें ह्मणून तें राज्य त्या घराण्याचें स्वसंपादित असें झालें. परंतु सातारच्या गादीचा वडिलोपार्जित हक्क या नवीन राज्यामुळें नष्ट झाला नाहीं.

२९. ताराबाईंनीं करवीर प्रांतीं राज्य स्थापन केल्यामुळें सातारा व करवीर यांमध्यें दुफळी झाली. वडील घराणें व धाकटें घराणें एवढाच काय तो फरक असल्यानें या भाऊबंदी तंट्याचा निकाल लागूं शकला नाहीं. या तंट्यांत छत्रपतीच्या गादीचे स्वामिभक्त सेवक दोन्ही घराण्याच्या राजपुरुषांची मर्जी समतोल राखून राहिले. ताराबाई प्रत्यक्ष वडील कार्यकर्त्या असल्यानें कित्येकजण त्यांच्या पक्षात राहिले, तर कित्येक शाहुमहाराज वडील घराण्याचे मुख्य वारस असल्यानें त्या भावनेप्रमाणें त्यांच्या पक्षाला धरून राहिले. कसें कां असेना, या दोन्हीं निरनिराळ्या राज्यामुळ जो तंटा माजला, तो तंटा हे निरनिराळे वंश चालू राहीपर्यंत मिटण्यासारखा नव्हता. राजाच्या घरचे भाऊबंदी तंटे राज्याच्या विस्तारापर्यंत सहज वाढले जातात व तें तसेच कायमही राहतात. ह्मणून त्या तंट्यांचें मूळच उपटून टाकलें असतां छत्रपती शिवाजीमहाराज यांनीं स्थापन केलेल्या हिंदुपदपादशाहीचें कल्याण होईल व त्यांची कीर्ति अबाधित राहील या भावनेनें सकवारबाईंनीं करवीरच्या संभाजी महाराजांकडे धांव घेतली.

३०. शाहुमहाराज यांना संतान नसल्यामुळें त्यांच्या पश्चात् करवीरचे संभाजीमहाराज सातारच्या गादीवर बसले काय, किंवा दुसरा कोणी दत्तक होऊन गादीवर आला काय त्यांच्या दृष्टीनें सारखेंच होतें. परंतु राज्याच्या सुव्यवस्थेच्या दृष्टीनें योजना करण्याच्या स्थितींत मरणापूर्वी कांहीं महिने

शाहुमहाराज नव्हते. म्हणून ती जबाबदारी अर्थात् सकवारबाई यांच्यावर, घराण्याच्या इभ्रतीच्या दृष्टानें आली व त्या दृष्टीनें सातारच्या गादीवर संभाजीमहाराज आल्यानें सातारा व करवीर या दोन स्वतंत्र राज्यांतील भाऊबंदी तंटे कायमचे मिटतील, व त्यामुळें मधल्या स्वार्थी लोकांना पायबंद बसेल आणि राज्यांत शांतता नांदेल या भावनेनें राणी सकवारबाईनीं करवीरच्या संभाजीमहाराजांना निरोप पाठविला. त्याचा भावार्थ असा होता कीं, "शाहुमहाराज निवर्तल्याबरोबर संभाजीमहाराजांनीं साताऱ्यास येऊन गादी ताब्यांत घ्यावी. प्रतिनिधि आपल्या पक्षाचे आहेत; दुसरे सरदार अनुकूल होऊन तुह्मांला मदत करतील असा आमचा प्रयत्न चालू आहे. आमची सर्वस्वी तुह्मांला मदत आहे." या राणीसाहेबांच्या निरोपाप्रमाणें संभाजीमहाराज कोल्हापुरास सैन्याची जमवाजमव करूं लागले.

३१. राणी सकवारबाई यांची मसलत संभाजीमहाराज यांच्याबरोबर चालू आहे, ही वार्ता नानासाहेब यांना समजतांच त्यांनीं आपल्या सैन्याचा कडेकोट बंदोबस्त करून साताऱ्याच्या बाजूनें नाकेबंदी केली. त्यावेळीं पेशव्यांच्या सैन्यबलापुढें महाराष्ट्रांत कोणत्याच सरदारांना टिकाव धरतां येण्यासारखा नव्हता. छत्रपतींची मुख्य शक्ति त्यावेळीं महाराष्ट्रांत पेशवे हींच होती. पेशव्यांनीं चारी बाजूंनीं नाकेबंदी केल्यामुळें राणी सकवारबाईच्या पक्षाच्या सरदारांचें कांहीं चाललें नाहीं. पेशव्यांच्या हातीं त्यांना पाहिजे तशा सनदा मिळाल्या होत्याच. फक्त ते शाहुमहाराजांच्या मृत्यूची वाट पहात होते. त्याचें देहावसान झालें ही वार्ता त्यांना समजतांच त्यांनीं पहिल्यानें दादोबा प्रतिनिधि यांना पकडून त्यांच्या पायांत बेड्या ठोकून त्यांना डोंगरी किल्ल्यावर रवाना केलें. सातारचा चारी बाजूंनीं बंदोबस्त केला. राणीसाहेबांचे सर्व प्रयत्न जेथच्या तेथें थंडावले. संभाजीमहाराजांची धडपडही कुचकामाची ठरली. छत्रपतींची गादी पराधीन झाली, भोंसल्यांच्या कुळाला बट्टा लागला, या कल्पनांनीं राणीसाहेबांना वाईट वाटलें. मुत्सद्यांच्या या स्वार्थी कृतीचा त्यांना रागही आला.

३२. नानासाहेब पेशव्यांनीं शाहुमहाराज निवर्तल्यावर राणी सकवारबाई यांचीं दत्तकासंबंधीं किंवा करवीरच्या संभाजीमहाराजासंबंधीं कोणतीच अडचण येणार नाही अशी जय्यत तयारी ठेवल्यामुळें त्यांना त्या बाबतीत कोणतीच भीति राहिली नव्हती. परंतु एवढ्यानेंच त्यांचें कार्य पूर्ण यशस्वी होणार नव्हतें. त्यांना सर्वांवरच मात करावयाची होती. शाहुमहाराजांच्या पहिल्या सनदेप्रमाणें गोविंदराव चिटणीस यांनीं आपलें स्थान पेशव्यावर ठेवण्याचें जें धोरण आंखलें होतें व शाहुमहाराज कालवश झाल्यानंतर आपल्या पक्षाचाच दत्तक सातारच्या गादीवर कसा येईल ही जी त्यांनीं मुत्सद्देगिरी लढविली होती, ती पहिल्यानें कशी हाणून पाडतां येईल, या विवचनेंत यावेळीं पेशवे होते सनदेंत लिहिल्याप्रमाणें गादीला वश करणें ह्मणजे तो शाहुमहाराजांच्या पश्चात् राणी सकवारबाईनीं दत्तक घेऊनच वंश चालविला पाहिजे होता. अर्थात् शाहुमहाराजांच्या सनदेप्रमाणें, राणी सकवारबाई यांनीं सहगमन न करतां दत्तक घेऊन वंश चालवावा, असा हेतू सनदेचीं चिटोरीं लिहून घेतांना होता हे स्पष्ट ठरतें. याच भरंवश्यावर चिटणीसांची कारवाई चालली होती. ती हाणून पाडण्याकरतां पेशव्यांची यावेळीं खटपट सुरू झाली.

३३. चिटणीसांच्या मनांत मालोजीच्या वंशापैकीं एक योग्य मुलगा राणीसाहेबांच्या मांडीवर दत्तक देऊन आपण कारभार पहावा असें होतें. ही त्यांची मसलत हाणून पाडावी ह्मणून पेशव्यांनीं एक रामबाण मात्रा योजिली, राणी सकवारबाई जिवंत राहिल्या तर त्या दत्तक घेणार व दत्तक घेतला तर चिटणीसांचा डाव साधणार, तेव्हां ज्या मार्गानें राणीसाहेब जिवंतच राहणार नाहींत, अशी मसलत योजिली म्हणजे आपलें कार्य साधलें, असें पेशव्यांनीं ठरविलें. त्यावेळीं पतीबरोबर सहगमन करणें हें अत्यंत पुण्यकारक समजलें जात असे. तेव्हां छत्रपती शाहुमहाराजांसारख्या थोर विभूति दिवगत झाल्या असतां त्यांच्याबरोबर सती न जाणें

म्हणजे भोंसले कुळाला बट्टा लावणें, हिंदुधर्माची अवहेलना करणें व आर्य-स्त्रियांच्या दिव्य पतिव्रता धर्माचें विडंबन करणें यासारखें होईल, अशा भ्रम-भोळ्या तीव्र भावनांची ठिणगी धर्मवेड्या शिर्के घराण्यांतील पुरुषांवर त्यांनीं टाकली. ताराबाई या शिर्के घराण्यांतल्याच. परंतु त्या राजाराम महाराजांबरोबर सती गेल्या नव्हत्या. असें असतांही या वेळीं त्यांची धर्मभावना उचंबळून आली व त्यांनीं राणी सकवारबाईना सती घालविण्याविषयीं कंबर बांधली. ताराबाई या पेशव्यांच्या कटांत होत्या. त्यांना आपला नातु गादीवर यावयास पाहिजे होता. तेव्हां सकवारबाईचा कांटा अशाप्रकारें निघून गेल्यानें त्यांचा पुढील कार्यभाग सुलभ होणार होता. या करतां पेशव्यांच्या या मसलतीला ताराबाई शंभर टक्के अनुकूल होती. म्हणून ती राणी सकवारबाईला सती घालविण्याबद्दल आतुर झाली होती.

३४. त्याचप्रमाणें शाहुमहाराजांची धाकटी राणी सगुणाबाई या पूर्वीपासून नानासाहेब पेशव्यांच्या बाजूच्या होत्या. त्यांचा बंधु कुवरजी शिर्के हाही पेशव्यांच्याच वतीनें होता. हा शिर्के जरी सवतीचा भाऊ होता तरी त्याला राणी सकवारबाई भाऊच मानीत. या भावाच्या नात्याचा फायदा घेऊन या शिर्क्यांनीं त्याना सती घालविण्याचा विडा उचलला. पेशव्यांनीं आपला डाव साधण्याकरतां राणीसाहेबांनीं बिनतक्रार सती गेलें पाहिजे अशी परिस्थिति निर्माण केली. बऱ्या बोलानें त्या सती जाण्यास तयार झाल्या तर ठीकच आहे, नाहींतर हे कुंवरजी शिर्के व ताराबाई त्यांचा हात धरून त्यांना सहगमन करावयाला भाग पाडणार होते!

३५. राणी सकवारबाईनीं ही सर्व परिस्थिति ओळखिली व यापुढें आपली—छत्रपतीच्या स्त्रीची—अमर्यादा होईल म्हणून त्यांनीं सहगमन करावयाचें ठरविलें. सती जाण्याच्या वेळीं पेशव्यांच्या या कुटिल कारस्थानाबद्दल राणीसाहेबांना किती संताप व किती चीड आली असेल तें त्यांचें त्यांनाच माहीत. या संतापाच्या भरांत त्यांनीं शाहुमहाराजांबरोबर सहगमन केलें व पतिव्रतेच्या अखेरच्या कर्तव्यांतून पार पडून अखंड पुण्य पदरीं बांधून स्वर्गारोहण केलें.

३६. तारीख १५ डिसेंबर सन १७४९ रोजीं शाहुमहाराज मरण पावले. त्यांच्या शवाबरोबर श्रीकृष्णेच्या काठीं माहुली येथें सगमावर राणी सकवारबाई यांनीं सहगमन केलें. शाहुमहाराजांच्या इतर तीन नाटकशाळाही सती गेल्या. त्या जागीं अद्यापही त्यांचें स्मारक आहे. राणीसाहेबांचा देह अग्निसंस्कारानें पंचतत्वांत मिळाला, पण पेशव्यांच्या कारस्थानामुळे त्यांच्या अंतःकरणांत पेटलेला द्वेषाग्नि मात्र निवाला नाहीं. तो पुढें बारा वर्षांनी पानिपतच्या रणभूमीवर उत्पन्न होऊन त्यानें रणकुंड पेटविलें. त्यांत लक्षावधि मराठे वीरांच्या आहुती पडल्या, नानासाहेबांचा वडील मुलगा विश्वासराव हाही त्यांत दग्ध झाला. सदाशिवरावभाऊ अदृश्य झाला. मराठी राज्याचा नांवलौकिक होरपळून निघाला. या वर्तमानानें नानासाहेब पेशव्यांना धक्का बसून ते कालवश झाले. ज्याप्रमाणें नानासाहेबांनीं आपल्या कुटिल कारस्थानाच विष छत्रपतींच्या–आपल्या स्वामींच्या–गादीवर ओकून तिचें जीवन हरण केलें, त्याचप्रमाणें पुढें पेशव्यांच्या गादीवर स्वामिभक्त म्हणविणाऱ्या त्यांच्या मुत्सद्यांनीं आपलें कारस्थानी विष ओकून त्या गादीचेही प्राण हरण केले. हा सती राणी सकवारबाईच्या शापाचाच घोर परिणाम आहे असें एकादा भाविक इसमानें म्हटलें तर त्याला दोष देतां येईल काय ?

३७ शाहुमहाराजांच्या मृत्यूनंतर दुसऱ्याच दिवशीं पेशव्यांनीं बापूजी खंडेराव चिटणीस, लिंबाजी अनंत व इंद्रोजी कदम ह्याच्याबरोबर लवाजमा, जवाहीर, पोषाख, खजिना वगैरे पाठवून, पानगांवाहून रामराजे यांस साताऱ्यास आणलें. तारीख ४ जानेवारी १७५० इसवी रोजीं सुमुहूर्तावर शहरांत प्रवेश करवून रामराजांस मोठ्या थाटानें राज्याभिषेक करण्यांत आला. सर्व लोकांना रामराजांची खात्री पटावी म्हणून ताराबाईनें त्यांना एक ताटांत घेऊन भोजन केलें. अष्टप्रधानांच्या नेमणुकाही या प्रसंगीं करण्यांत आल्या त्यांत फक्त भगवंतराव अमात्य हाच काय तो नवीन माणूस नेमला गेला. रामराजे नानासाहेब पेशव्यांना "तारुण्ययुक्त, राजतेजयुक्त व प्राक्तनवान्" असें दिसले. परंतु दिसतें तसें तें नसतें हें पेशव्यांनीच लवकर पुढें सिद्ध करून दाखविलें.

३८. राणी सकवारबाई सती गेल्यामुळें पेशव्यांनीं एका दगडानें दोन फळें पाडलीं. राणीसाहेब सती गेल्या, अर्थात् त्यांचा कांटा दूर झाला व त्यांच्या पक्षाचा दत्तकही संपुष्टांत निघाला. दुसरी गोष्ट ह्मणजे गोविंदराव चिटणीस यांचीही दत्तकाची मसलत आपोआप फसली. रामराजांना साताऱ्च्या गादीवर आणण्यांत पेशव्यांनी चिटणीस व करवीरचे संभाजी महाराज यांच्या तोंडाला चांगलींच पानें पुसलीं. राणीसाहेब सती गेल्यामुळें दत्तक घेऊन गादीला वारस करण्याचा प्रश्न आपोआप उडाला. आतां फक्त वारसाचा प्रश्न उरला. शाहुमहाराज साताऱ्च्या गादीवर येण्यापूर्वी रामराजांच वडील शिवाजी हे होते. अर्थात् शिवाजी यांचे वडील घराणें व करवीरचे संभाजी याचें धाकटें घराणें. ह्मणून अधिकारपरत्वे शिवाजीचा मुलगा रामराजा हाच साताऱ्च्या गादीचा खरा वारस, असें ठरविण्यांत आलें. या मानीव वारसाहक्कानेच रामराजे साताऱ्च्या गादीचे अधिपती झाले. यांत चिटणीस किंवा संभाजीमहाराज यांना तक्रार करण्याला मार्ग नव्हता. तक्रारीचा मुद्दा एवढाच होता कीं, रामराजे हे खरोखर शिवाजीचे पुत्र होते किंवा नाहीं. पण ताराबाईनीं त्यांना आपल्या ताटांत जेवावयाला घेऊन सर्वांची खात्री केली. त्यामुळें तो मुद्दाही तक्रारीला शिल्लक राहिला नाहीं. अशा प्रकारें नानासाहेबांनीं आपल्या कारस्थानाचा डाव जिंकला. आतां पेशव्यांना फक्त ताराबाईचा कांटा, जो त्यांच्या सर्वाधिकाराला आड येत होता, तो काढून टाकण्याच्या ते प्रयत्नाला लागले.

३९ रामराजे गादीवर आले त्यावेळीं त्यांचें वय सुमारें २५ वर्षांचें होतें. त्यांना प्राक्तनवान्, राजतेजयुक्त अशा विशेषणांनीं संबोधून व चुचकारून नानासाहेब आपल्या गटांत ओढूं पहात होते. ताराबाईही, आपल्या मसलतीनें त्यांना गादीवर आणलें अर्थात् आपल्या सल्ल्याप्रमाणें त्यांनीं वागावें ह्मणून पराकाष्ठेची खटपट करीत होत्या. त्यांची ती खटपट एका अर्थी बरोबर होती. कारण त्यांनीं गेलीं ३६ वर्षे कारागृहवास याच

राज्याच्या कटकटीमुळें भोगिला होता. तेव्हां रामराजे गादीवर आल्यानें आपलें व आपल्या भोंसल्यांच्या गादीचें गतवैभव पुन्हां संपादन करतां येईल या आशेनें त्यांनीं ही सर्व मसलत केली होती. त्यामुळें त्या रामराजांना आपल्या हुकमतींत ठेवण्याचा प्रयत्न करीत असत. एका बाजूला त्यांना पेशवे ओढीत व दुसऱ्या बाजूला ताराबाई खेंचीत, अशी रामराजांची थोड्याच दिवसांत कुतरओढ सुरू झाली. पेशवे फौजबंद पराक्रमी, त्यांचें ऐकावें, कीं आपली आजी ताराबाई यांचें ऐकावें, हें त्यांना समजेना. शिवाय लहानपणापासून भोप्याच्या घरीं पोत, कवड्याची माळ आणि कवड्याचा टोप एवढ्याच गोष्टीचा अवलंब करून भुत्याचा ते खेळ खेळल्यामुळें त्यांना राजकारण कसें खेळावें हे कोठून माहीत असणार ? म्हणून त्यांनीं या दोन्हीं पक्षाला खूष ठेवण्याचा फक्त प्रयत्न चालविला. पण परस्परविरोधी पक्षांना किती दिवस त्यांना खूष ठेवतां येणार !

४०. एक दोन महिन्याच्या अवधींतच रामराजे आपल्या कह्यांत पूर्णपणें सांपडत नाहींत असें पेशव्यांना दिसून आले. तेव्हां त्यांच्या नादीं जास्त लागण्यांत अर्थ नाही म्हणून त्यांनीं त्यांच्याबद्दल सरदार वगैरे मंडळींत गैरसमज फैलावण्याचा प्रयत्न सुरू केला. दोनच महिन्यांपूर्वी प्राक्तनवान् , राजतेजयुक्त अशा विशेषणांनीं पेशव्यांनीं ज्यांचा गौरव चालविला होता, ते आपल्या कह्यांत सांपडत नाहींत असें पाहून, तेच पेशवे त्यांना कर्तृत्वहीन, मळमळीत असें ह्मणूं लागले. रामराजे पेशव्याच्या हातांत सर्वस्वी येतील असें मंत्रसाधनाचे जादुटोणे करण्याचाही त्यांनीं एक मार्ग स्वीकारला होता. या बाबतींत ता. १६ मार्च १७५० इसवी रोजीं नानासाहेब दीक्षितांना लिहितात " राजश्री स्वामी तों मळमळीत. दोन्हीकडे आहेत. आणखी किती दिवस गुंता होईल तो न कळे. एतदर्थी कांहीं दैवी उपाय राजश्रींची कृपा आह्मांवर होय, आम्हांस निरोप देत, ऐसा असला तरी करावा. " दीक्षित हे एक मोठे मांत्रिक होते. त्यांना हें जें पेशव्यांनीं लिहिलें तें केवळ आपल्या ताब्यांत रामराजांनीं यावें असा एखादा ताईत किंवा मंत्र त्यांनीं द्यावा एवढाच हेतु या पत्राचा आहे.

४१. रामराजे आपल्या सांगण्याप्रमाणें वागण्याला तयार होत नाहींत, उलट ताराबाईंचा त्यांच्यावर जास्त पगडा आहे असें पाहून, आपला कार्यभाग साधण्याकरतां ताराबाईंच्या पक्षाचे पंख तोडण्याचा पेशव्यांनीं कार्यक्रम आंखला. ताराबाईंच्या मनांत रामराजांना आपल्या कह्यांत घेऊन स्वतंत्र राज्यकारभार चालवावा असें होतें. परंतु पेशवे तिला तसें करूं देईनात, ह्मणून ती रुसून तेथून सिंहगडास गेली. तेथें राजाराममहाराज यांची छत्री होती. आपल्या पतीच्या छत्रीचें दर्शन घेण्याचें तिनें मिष केलें ह्मणून तिला तेथें राहण्यास मनाई करतां आली नाहीं. तिनें तेथें सचिवांचा आश्रय घेतला व त्याला आपल्या पक्षांत घेतलें. त्याचप्रमाणें प्रतिनिधि, बाबूजी नाईक, दाभाडे व यमाजी शिवदेव यांनाही आपल्या बाजूला घेऊन पेशव्याबरोबर बखेडा करण्याची तिनें तजवीज केली.

४२. नानासाहेब पुण्यास आले त्यावेळीं त्यांनीं साताऱ्यास रघोजी भोंसले यांस रामराजे यांजकडे ठेऊन ते आले होते. रघोजी भोंसले हे राज्याभिषेक समारंभाच्यावेळीं साताऱ्यास आले होते. त्यांचें व ताराबाई यांचें बरें नव्हतें. शिवाय राणी सकवारबाई सती गेल्यामुळें पेशव्याबरोबर स्पर्धा करण्याचेंही कारण त्यांना उरलें नव्हतें. ते प्रसंगाचा फायदा घेणारे होते. म्हणून या प्रसंगीं आपला फायदा ज्याच्याकडून होईल तो पक्ष ते स्वीकारणार होते. पेशव्यांनासुद्धां यावेळीं रघोजींस नाराज करावयाचें नव्हतें. ह्मणून त्यांनीं त्यांना आपलासा करून घेण्याचा प्रयत्न चालविला होता. नानासाहेबांनीं रघोजी भोंसल्यास पुण्यास आणतेवेळीं त्यांच्याबरोबर कोणकोणत्या सरदारांस आणावयाचें याची यादी करून दिली होती.

४३. ताराबाईंनीं सचिवाला आपलेसें करून घेतलें हें पाहून व पुण्याजवळील सिंहगडासारखा मजबूत किल्ला आपल्या हवालीं असावा असें मनांत आणून त्यांनीं तो सर केला व सचिवास कैद केलें. हा किल्ला सचिवांचे ताब्यांतून गेला असें पाहतांच ताराबाईस पुण्यास यावें लागलें. इतक्यांत रघोजी भोंसले साताऱ्याहून रामराजांस घेऊन पुण्यास आले. ताराबाईंचा रुसवा काढण्याकरतां पेशव्यांनीं "तुह्मांला राज्यकारभारांतील बहुत कामें मिळतील"

असें सांगून बहुत प्रयासानें तिला वश केलें. आणि सांगितलें कीं ' माझ्या मसलतीप्रमाणें रामराजाला वागवावें. ' यास ताराबाई कबूल होतांच पेशव्यांनीं रघोजी भोंसले यांस वऱ्हाड, गोंडवण व बंगाल याची सनद करून देवविली. याखेरीज प्रतिनिधीची जहागीर वऱ्हाड प्रांताला लागून होती, तीही रघोजीस दिली. या देणगीनें रघोजी खूष झाला व तो पेशव्यांच्या पक्षांत अडकला. त्याचप्रमाणें यशवंतराव दाभाडे याला गुजराथचा निम्मा भाग दिला. राणोजी शिंदे याच सुमारास मृत्यु पावला, तेव्हां त्याच्या वडील मुलाला बापाचे अधिकार दिले. माळवा मुलखाची जमा दीड कोट रुपये वर्षाला होत असे, त्यांतून साडे चवऱ्याहत्तर लक्ष होळकरास दिले आणि साडेपांसष्ट लक्ष शिंद्यास दिले. बाकी दहा लक्ष आनंदराव पवारादि जहागिरदारांस वांटून दिले. यामुळें ही सर्व मंडळी पेशव्यास अनुकूल झाली. ' सरलष्कर ' पदवी सोमवंशीचे कुळांत होती ती निंबाजी नाईक निंबाळकर यांस दिली. ही सर्व व्यवस्था रामराजे यांच्याच सहीनें झाली. परंतु हें सर्व नानासाहेब पेशवे यांनीं करविलें, म्हणून ही सर्व मंडळी त्यांनाच वश झाली. या सर्व बंदोबस्तानें ताराबाईंच्या पक्षाचे पंख तुटले व पेशवे बलवत्तर झाले.

४४. ताराबाई पुण्यास आल्यानंतर तिला पुष्कळ अधिकार देतों असें दाखवून त्यांच्याशीं पेशव्यांनीं जो सलोखा दाखविला त्यावेळीं उभयतांतील वाटाघाटीकरतां दादोबा प्रतिनिधि व त्याचा मुतालिक यमाजी शिवदेव यांना पेशव्यांनीं कैदेंतून मुक्त केलें होतें. परंतु या वाटाघाटींत ताराबाईला कोणतेच अधिकार मिळाले नाहींत. उलट त्यांच्या पक्षाचा दादोबा प्रतिनिधि यांचें पद काढून घेऊन तें भवानरावास राज्याभिषेकाच्या वेळींच दिलें होतें. प्रतिनिधींचा मुलूख साताऱ्या जवळचा होता. त्या मुलखांत त्यांचेंच सैन्य होतें. भवानरावास जरी प्रतिनिधिपद मिळालें तरी दादोबाच्या ताब्यांतील मुलूख त्याच्या हस्तगत झाला नव्हता. यावेळीं त्यांनीं दादोबाला कैदेंतून सोडलें व त्याच्याकडून त्याच्या मुलखाचा बराच भाग सोडून दिल्याबद्दल पेशव्यांनीं लिहून घेतलें. ही गोष्ट त्यांच्या मनाविरुद्ध पेशव्यांनीं केली होती. तरी पण या लेखाप्रमाणें त्या मुलखाचा ताबा पेशव्यांच्या हस्तकांना देणें

प्राप्त होतें ह्मणून दादोबा प्रतिनिधींचा मुतालिक यमाजी शिवदेव तो ताबा देण्याकरतां पुण्याहून निघाला. तो सांगोल्यास गेला व पेशव्यांनीं आपल्या मालकाविरुद्ध सर्व कपट केलें ह्मणून त्यानें तेथें जाऊन बंड केलें.

४५. कोणतें तरी कारण दाखवून पेशव्यांच्या मनांत रामराजांना एकटेंच बाहेर काढावयाचें होतें. यमाजीचें बंड हें कारण त्यांना पुरें झालें. या बंडाचा मोड करण्याकरतां स्वतः नानासाहेब पेशवे आपल्याबरोबर रामराजांना घेऊन जाते तर कांहींतरी धोका होईल अशी कल्पना ताराबाई व तिच्या पक्षाच्या मंडळींना आली असती. परंतु बंड मोडण्यास नानासाहेब स्वतः गेले नाहींत, ह्मणून ताराबाई निर्धास्त राहिल्या. रामराजे यांच्याबरोबर सदाशिवरावभाऊ, रामचंद्रबाबा, गोविंदराव चिटणीस ही मंडळी दिली. ही सर्व मंडळी सैन्यासह सांगोल्याचें बंड मोडण्याकरितां निघाली. ताराबाई रामराजांच्या बायका घेऊन साताऱ्यास गेली. तेथें शेखमीराच्या मदतीनें तिनें सातारचा किल्ला हस्तगत केला व आपण बंदोबस्तानें राहिली.

४६. रामराजांना बरोबर घेऊन सदाशिवरावभाऊ जेजुरीवरून सांगोल्यास गेले व तेथें त्यांनीं किल्यास मोर्चे लाविले. यमाजीनें पंधरा दिवस टिकाव धरला पण शेवटीं पेशव्यांनीं किल्ला हस्तगत केला. त्याचप्रमाणें मंगळवेढेंही घेण्यांत आलें. अशा प्रकारें यमाजीचें बंड मोडलें.

४७. नानासाहेब पेशव्यानें सदाशिवरावभाऊ, रामचंद्रबाबा यांना सांगोल्याच्या मोहिमेवर पाठविलें होतें, तें केवळ बंड मोडण्याकरतांच नव्हे. रामराजांना कोणत्या तरी निमित्तानें बाहेर काढून त्यांच्याकडून साताऱ्याच्या छत्रपतीपदाच्या राजीनामा घ्यावयाचा होता. तो बेत पुण्यास अगर साताऱ्यास साध्य होण्याजोगा नव्हता. कारण या ठिकाणीं ताराबाईच्या पक्षाचे कोणी ना कोणीतरी लोक असावयाचेच. ह्मणून सांगोल्याची एका बाजूची जागा त्यांनीं पसंत केली व तशी कामगिरी बजावण्याबद्दल भाऊ व रामचंद्रपंतबाबा यांना मसलत दिली. या मसलतीप्रमाणें सांगोलें मुक्कामीं रामचंद्रपंतबाबाच्या मदतीनें सदाशिवरावभाऊंनीं रामराजांकडून राज्याच्या व्यवस्थेबद्दल नवीन लेख करून

घेतला. हा लेख ह्मणजे मराठी राज्याचा छत्रपती रामराजे यांचेकडून न घेतलेला राजीनामा होय. या राजीनाम्यानें छत्रपतींचे सर्व अधिकार पेशव्यांना मिळाले. नवरा मेल्यावर विधवेला पोटगी देतात त्याप्रमाणें रामराजे यांना प्रतिनिधींचा हस्तगत केलेला मुलुख पोटगीदाखल देण्यांत आला.

४८. छत्रपती रामराजे यांच्याकडूनं मराठी राज्याचा राजीरामा घेतला यामुळें ताराबाईंचे राजकारभार करण्याचे मनोरे आपोआप ढांसळले. पेशव्यांनीं याप्रमाणें ताराबाईवर मात केली. शाहुमहाराजांच्या वेळेपासून दत्तकप्रकरण जें उपस्थित झालें होतें, तें यावेळीं निकालांत आलें. दत्तक प्रकरणाचा निकाल शेवटीं नानासाहेब पेशव्यांप्रमाणें लागला. अर्थात् पेशवे हे शाहुमहाराजांच्या दत्तकाच्या जागीं उपस्थित झाले.

४९. सांगोलें मुक्कामीं रामराजे यांच्याकडून राजीनामा घेतल्यानंतर मराठी साम्राज्यांतील त्यांची नाटकीराजाची भूमिका आटोपलीच होती. नंतर तेथून त्यांच्याबरोबर सैन्य देऊन बंदोबस्तानें त्यांस ता. १७ नोहेंबर सन १७५० रोजीं साताऱ्यास पोंचविण्यांत आलें. ताराबाईंना ही हकीकत समजतांच त्यांना अतिशय वाईट वाटलें व अनावर रागही आला. पेशव्यांनीं अश्वत्थाम्याच्या मस्तकांतील मणी काढून घेतल्याप्रमाणें ८।१० महिन्याचे अवधींतच रामराजांचें छत्रपतिपदत्व आकर्षून घेतलें व त्यांना मृतवत् केलें या गोष्टीमुळें जातिवंत सिंहीण राणी ताराबाई यावेळीं जरी सत्तर वर्षांची वृद्ध होती तरी तिचा क्रोधानल भडकला. तिनें ता. २४ नोव्हेंबर सन १७५० रोजीं रामराजे यांना सातारच्या किल्यांत कैदेंत ठेवलें, व आपण त्या प्रांताचा बंदोबस्त करून भावी संकटाला तोंड देण्याची तयारी चालविली.

५०. छत्रपतींचे सर्व अधिकार पेशव्यांनीं कपटानें गिळंकृत केले असें ह्मणणारा एक पक्ष आहे. या पक्षाचें चातुर्यानें खंडन करणारा दुसरा पक्ष आहे. ज्याच्या हातांत ससा तो पारधी या न्यायानें वागणारा दुसरा पक्ष असला तरी त्या बाबतींत जास्त विचार करण्याचें कारण नाहीं. तात्विक दृष्टीनें दोष कोणामध्यें आहे तो निःपक्षपातानें पहाणें असेल तर छत्रपतींची सर्व सत्ता

झुंबाडण्याच्या आरोपांतून नानासाहेब पेशवे कधींच शिरसलामत बाहेर पडूं शकत नाहींत. पेशव्यांनीं मराठी राज्याच्या हितापेक्षां स्वार्थाकडे विशेष लक्ष दिलें असेंच मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें. पेशवे आपल्या कर्तव्याला जागले असें इतिहासकारांनीं एकमतानें ह्मणावें अशी जर नानासाहेब पेशव्यांनीं इच्छा धरली असती तर त्यांना कोणत्याही प्रसंगांतून योग्य मार्ग काढतां आला असता. सांगोल्याला रामराजांना नेऊन त्यांच्याकडून राजीनामा लिहून न घेतां त्यांना त्यांनीं पुण्यास ताराबाईचा उपसर्ग न पोंचेल अशा बंदोबस्तानें ठेवावयाचें होतें. मराठी राज्याचें कल्याण छत्रपतीपद कायम ठेवण्यांत होतें, तें लाथाडून देण्यांत नव्हतें खास! देवळांतील देव उकीरड्यावर फेंकून दिल्यानें पुजाऱ्याचें महत्व वाढत नसतें. देवाचें रक्षण करूनच पुजाऱ्याला आपलें अस्तित्व दाखवावें लागतें. पण हा साधा मानवी धर्म नानासाहेबानीं न स्वीकारतां त्यांनीं आसुरी कपटनीति अंगिकारली. देवाला फेंकून दिलें. पुजारी देव बनला. पुजारी देव बनला तेव्हां पुजाऱ्याच्या ठिकाणीं दुसरा पुजारी आला. त्या पुजाऱ्यानें पहिल्या पुजाऱ्याला फेंकून दिलें. शेवटीं देव गेला, देऊळ गेलें, पुजारी आटोपले आणि सर्वस्वाचा नाश झाला. क्रांति ही पहिल्यानें तत्वांत होत असते. तत्व हा पाया असतो. एकदां तत्व लाथाडून दिलें ह्मणजे सर्वस्वाचा नाश व्हावयाला विलंब लागत नाहीं. छत्रपती शिवाजीमहाराजांनीं हिंदुधर्माचें गोब्राह्मण—प्रतिपालकत्व हें रहस्यमय तत्व अंगिकारून हिंदुपदपादशाहीची स्थापना केली. शस्त्रधारी क्षत्रियांनीं राजदंड हातीं धरला. शास्त्र ब्राह्मणांच्या हातीं दिलें. गोब्राह्मण-पालकत्वाला क्षत्रियांच्या तीव्रतर समशेरीचें कुंपण घातलें. परंतु ज्यांचें क्षत्रियांनीं रक्षण करावयाचें त्यांनींच संरक्षक कुंपाला खाऊन टाकल्यानंतर ह्मणजे मूलतः हिंदुपदपादशाहीचें तत्वच उपटून टाकल्यानंतर पुढें सर्वस्वाचा नाश झाला यांत कोणतें नवल! इतिहासकार मराठी राज्य १८१८ मध्यें बुडालें असें समजतात, परंतु जें राज्य छत्रपती शिवाजी महाराजांनीं इ. स. १६७४ मध्यें स्थापिलें तें तात्विक दृष्टीनें इ. स. १७५० मध्यें सांगोलें मुक्कामीं बुडालें असेंच ह्मणणें जास्त खरें आहे.

---

# प्रकरण ३ रें

# नाक दाबल्याशिवाय तोंड उघडत नाहीं.

## इ० स० १७५१ ते १७५२

१. नानासाहेबांचा रामराजे यांच्या बद्दलचा दृष्टिकोन फक्त दोन महिन्यांतच कां बदलला.—२. रामराजांना कर्तृत्वहीन व मळमळीत असें नानासाहेबांनीं कां ठरविलें याची मीमांसा.—३. अधिकार काढून घेऊन नानासाहेबांनीं रामराजांची केलेली दुर्दशा.—४. नानासाहेबांच्या विरुद्ध ताराबाईनीं स्थापन केलेला नवीन गट, नानासाहेबांनीं गोविंदराव चिटणीस याना लिहिलेलें पत्र. नानासाहेबानीं जयापा शिंदे यांस लिहिलेलें पत्र —५. पत्रांतील भावार्थ. – ६. ताराबाईचा संभाजीमहाराजांस साताराच्या गादीवर आणण्याचा प्रयत्न.—७. ताराबाईच्या स्वभावातील बाणेदारपणा. —८. संभाजीमहाराजाचा साताऱ्च्या गादीवरील वारसाहक्क.—९. रामचंद्रबाबा शेणवी यांचे संबंधीचो पूर्व हकीकत.—१०. शिंदे होळकरातील वैमनस्याला नानासाहेब कारणीभूत कसे हाते.—११. जयपूर व पेशवे याचा संबंध. ईश्वरसिंग व माधवसिंग याचे हक्काची वाटणी.—१२. ईश्वरसिंग मराठ्याच्या मदतीनें माधवसिंगाचा पराभव करतो.—१३. ईश्वरसिंगाविरुद्ध होळकर माधवसिंगास मदत करतो. शिंद्यांचा दिवाण रामचंद्रबाबा याचे नानासाहेबाकडे तक्रारीचें पत्र. नानासाहेबांचें शिंद्यास उत्तर.—१४. नानासाहेबानीं ईश्वरसिंगाचा पक्ष सोडून माधवसिंगास मदत करण्यास होळकरांस द्रव्यलोभास्तव प्रोत्साहन दिलें.—१५. नानासाहेब पेशव्यांचे रजपुतांवरील वजन कमी होण्याचीं कारणे.—१६. शिंद्यांच्या दरबारांतून रामचंद्र बाबाची हकालपट्टी.—१७. रामचंद्रबाबांचा पेशवाईंत प्रवेश.—१८. रामचंद्रबाबा शेणवी सदाशिवरावभाऊस नजराणा देऊन पेशव्याच्या कारभारांत शिरतात. नजराणा व लाच यांची मीमासा.—१९. रामचंद्रबाबा सदाशिवरावभाऊंचे दिवाण बनतात.—२०. चिमाजी आपा व नानासाहेब यांचा संभाजीमहाराजांशीं पूर्वापार संबंध कसा होता.—२१. संभाजीमहाराजाबरोबर नानासाहेबांनीं केलेला ताजा करार.—२२. संभाजीमहाराजांनीं सदाशिवरावभाऊस कोल्हापूरच्या राज्यांतील अष्टप्रधानांपैकी पेशवे हें पद देण्याचें ठरविलें.—२३ सदाशिवरावभाऊ यांचे हातीं नायब पेशव्याचा अधिकार कसा आला या संबंधींची हकीकत.—२४. सदाशिवरावभाऊंचें पेशवे दरबारांत वजन वाढूं लागलें.—२५. संभाजीमहाराजांस साताऱ्च्या गादीवर आणण्याचा ताराबाईचा प्रयत्न निष्फळ झाला.

१. नानासाहेब पेशवे यांचे पक्षपाती इतिहासकार असें प्रतिपादन करतात कीं, रामराजे कर्तृत्वहीन व मळमळीत ठरल्यामुळें मराठी साम्राज्याच्या हिता-करतां व सुव्यवस्थेकरतां पेशव्यांना आपल्या हातीं सत्ता घ्यावी लागली. या त्यांच्या ह्मणण्यांत कितीसा अर्थ आहे हें त्या वेळेच्या परिस्थितीशीं ताडून पाहिलें असतां समजण्यासारखें आहे. रामराजे गादीवर आले त्यावेळीं ते नानासाहेब पेशव्यांसारख्या धूर्त, मुत्सद्दी, बुद्धिवान् आणि चाणाक्ष अशा मराठी साम्राज्याच्या धुरीणाला राजतेजसंपन्न व कर्तृत्ववान वाटले आणि गादीवर बसून दोनच महिने लोटतात, किंबहुना राज्याभिषेकाप्रीत्यर्थ झालेल्या समाराधनांचें जेवण होऊन हात धुऊन ते वाळतात न वाळतात, तोंच ते कर्तव्यहीन आणि मळमळीत असे त्याच श्रेष्ठ पुरुषाला दिसूं लागतात याचा अर्थ काय ?

२. नानासाहेब आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षीं राजकारणांत पडले. अगदीं बालपणापासून त्यांना चिमाजीआपा, अंबाजीपंत पुरंदरे यांच्यासारख्या थोर माणसांचा पूर्ण सहवास. शाहु छत्रपती यांच्याबरोबर वयाच्या पंधरासोळा वर्षाच्या वयापासून स्वारीशिकारीला जाऊन अनुभव मिळालेला. छत्रपतींची त्यांच्यावर पूर्ण कृपा, बलिष्ठ चुलत्याचें त्यांना पाठबळ, अशी सर्व अनुकूळ परिस्थिति असूनही पेशवेपद मिळाल्यापासून दोन महिन्याच्या अवधींत त्यांना स्वतःला आपला कोणताच पराक्रम दाखवितां आला नाहीं. असें असतां रामराजांना ते दोन महिन्यांत कर्तृत्वहीन, मळमळीत असें ह्मणतात तरी त्यांनीं रामराजांचा असा कोणता गुण कसाला लावला होता ? रामराजे जन्मले पन्हाळ्याच्या कारागृहांत. राजकीय आपत्ति येईल ह्मणून त्यांच्या वनवासाला जन्माबरोबरच प्रारंभ झालेला होता. पन्हाळ्याहून ते बावड्याला अमात्यांच्या संरक्षणाखालीं गेले. तेथें ते पांच वर्षाचे होईपर्यंत गुप्तपणानेंच वाढलें. त्या अज्ञान अवस्थेंत त्यांना संभाजीमहाराजांच्या भीतिमुळें सूर्यप्रकाशांत येण्याचीही चोरी होती. तेथून ते पानगांवाला मावशीकडे गेले. तेथेंही ते उघडकीला येतील ह्मणून चोरीच होती. तेथून ते थोड्याच दिवसांत तुळजापुराला भोप्याच्या घरीं गेले. तेथें त्यांना भुत्याची दीक्षा देण्यांत आली. ही दीक्षा देण्याकरतां कुलगोत्र

विचारण्याचें कारण पडत नाहीं. आईबापाची चौकशी करावी लागत नाहीं. तो हिंदु असला ह्मणजे झालें. भुत्या ह्मणजे तुळजापूरच्या देवीला वाहिलेला मुलगा. ही दीक्षा देतांना कवड्याची माळ, कवड्याचा टोप व कापडाचा पोत हे देतात. हा संस्कार झाला ह्मणजे देवीला वाहिलेल्या मुलाची कोणी चौकशी करीत नाहीं. रामराजे हे तेथें देवीला वाहिलेल्या मुलांमध्यें भुते होऊन राहिले होते. यांचेबरोबर दोन संरक्षक होते, तेही भुतेच झाले होते. वयाच्या सातव्या वर्षा-पासून साताऱ्च्या गादीवर येईपर्यंत, ह्मणजे सुमारें अठ्ठावीस वर्षें कवड्याची माळ, कवडयाचा टोप, कपडयाचा पोत यांच्याशीं गोंधळ घालण्याव्यतिरिक्त बाह्य व्यवहाराशीं ज्याचा परिचय नव्हता व राज्य आणि राजकारण कशाबरोबर खातात याचा गंधही ज्याला नव्हता अशा अविद्वान, अज्ञान आणि अज्ञातवासी इसमाचे अंगावर राज्याभिषेकाचें पाणी पडतांच सर्व गुणांचें व सर्व अकलेचें भांडार त्याच्या हातीं सांपडेल असे ब्रम्हतेजसंपन्न कोणते तपस्वी ब्राम्हण पेशव्यांनीं आणले होते ? गादीवर बसविण्याचे वेळीं हे भुत्या झालेले रामराजे पेशव्यांना राजतेजसंपन्न, प्राक्तनवान दिसतात आणि लगेच दोन महिन्यांतच ते कर्तृत्व-हीन व मळमळीत वाटतात यांतील गूढार्थ आतां सहज लक्षांत येईल. शिवाय ज्यांना छत्रपती शिवाजीमहाराजांनीं प्रस्थापित केलेल्या व त्यांच्या पराक्रम-रवीनें दैदीप्यमान झालेल्या सिंहासनावर बसवावयाचें होतें आणि ज्या सिंहास-नाचा दास ह्मणून थोरल्या बाजीरावांनीं—स्वतः नानासाहेब पेशव्यांच्या तीर्थ-रूपांनीं—ज्या सिंहासनाची कीर्ति भारतवर्षाच्या कोनाकोंपऱ्याला नेऊन गाजविली, त्या सिंहासनावर ज्याला स्वतःच्या कर्तबगारीवर आणून बसवा-वयाचें होतें, त्यांनीं त्याची चौकशी करून त्याला आणलें नसेल किंवा त्यांना त्या इसमाची माहिती नसतां केवळ दुसऱ्यांच्या सांग-ण्यावरून त्यांनीं ती गोष्ट केली असेल, असे तर्कवितर्क काढणें किंवा केवळ पक्षाभिमानाला बळी पडून समर्थनाकरतां मुख्य मुद्याच्या ठिकाणीं वेड पांघरणें, प्रामाणिकपणाचें व न्यायाचें ठरणार नाहीं. एकंदरींत नानासाहेब पेशव्यांनीं रामराजांचे कोणतेच गुण पाहिले नाहींत. त्यांना फक्त छत्रपतींची सत्ता

काढून घ्यावयाची होती. ते पूर्ण स्वार्थी होते. त्यांना जननिंदेची चाड नव्हती. म्हणूनच त्यांनीं हे सर्व उपद्व्याप केले व लोकांना रामराजे कर्तृत्वहीन व मळमळीत आहेत असें सांगून आपला पूर्ण स्वार्थ साधला. नानासाहेबांनीं छत्रपतीपद बुडवून स्वार्थ साधला हा त्यांजवर केवळ आरोपच नसून ती वस्तुस्थिति आहे असेंच पूर्ण विचारांतीं ठरतें.

३. रामराजाकडून छत्रपतीपदाचा राजीनामा घेतल्यानंतर त्यांची जरूरी संपली असें पाहून त्यांनीं त्यांना सातार्‍याला नेऊन सोडलें. शरीरांत जीव असेंपर्यंत एकाद्याची कोणीही पर्वा करतो, पण त्याच्या शवाजवळ जाण्यालाही लोक भितात. रामराजांचे अधिकार गेल्यामुळें त्यांची तीच अवस्था झाली. पेशव्यांना आतां त्यांची काय जरूरी होती? ताराबाई कितीही रागावल्या, कितीही बडबडल्या, तरी त्यांचा रामराजांशीं आंतड्याचा संबंध होता. त्यांना ताराबाईनीं किल्ल्यावर नेऊन कैदेंत ठेविलें, असें म्हणतात. पण ही कैद म्हणजे पुन्हां पेशव्यांच्या कपटजालांचा घाला नको म्हणून हा बंदोबस्त होता, एवढाच या कैदेचा अर्थ आहे. रामराजांचा बंदोबस्त केल्यानंतर पेशव्यांच्या कुटिल कारस्थानाला उलट कसें तोंड देतां येईल याचा ताराबाईनीं प्रयत्न चालविला.

४. रघोजी भोंसले यांचा मुलगा दत्तक घेण्याविरुद्ध गोविंदराव चिटणीस होते म्हणून त्यांच्याशीं पेशव्यांनी संगनमत केलें व त्यांना आपल्या पक्षांत घेतलें. परंतु सकवारबाई सती गेल्यामुळें त्यांच्या पक्षाचा दत्तक आला नाहीं. रामराजे यांना ताराबाईशीं मसलत करून गादीवर बसविलें व नंतर त्यांचा राजीनामा घेतला. त्यामुळें ताराबाई तोंडघशीं पडल्या. तेव्हां पेशव्यांच्या कारस्थानला बळी पडलेल्या मंडळींचा एक गट निर्माण झाला. या गटाला पेशव्यांनीं छत्रपतींची सत्ता गिळंकृत केली हें त्यांचें कृत्य पसंत नव्हतें. छत्रपतीपद चालविण्यांतच त्या लोकांना भूषण वाटत होतें. म्हणून नानासाहेबांची ही क्रांतिकारक नवीन राज्यपद्धति या गटाला पटणारी नव्हती. ताराबाईच्या पक्षाला याच कारणाकरतां, चिटणीस, महादोबा पुरंदरे, रामचंद्रबाबा, गंगोबा

चंद्रचूड, रघोजी भोंसले व त्यांचे दिवाण कोन्हेरराम, दमाजी गायकवाड, नासिरजंग, दादोबा प्रतिनिधि, दाभाडे, बाबूजी नाईक, शिंदे, होळकर, निजाम यांची सहानुभूति होती. परंतु प्रत्येकजण मात्र आपला स्वार्थ साधण्याच्या पवित्र्यावर डोळयांत तेल घालून होता. ताराबाईंच्या या खटपटीनें नानासाहेब पेशवे मात्र बरेच मेटाकुटीला आले होते. त्यांना सरदार लोकांची मनधरणी करतां करतां नाकीं नऊ येत चालले होते. या प्रसंगाच्या वेळचीं नानासाहेबांचीं बरींच पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यावरून त्या वेळची सर्व परिस्थिति लक्षांत येण्यासारखी आहे. येथेंही कांहीं पत्राचे उतारे दिले आहेत.

गोविंदराव चिटणीस नानासाहेबांच्या कृतीमुळें रागावला होता व तो ताराबाई यांना मिळाला होता. त्यावेळीं पेशव्यांनीं त्यांना लिहिलेलें खालील पत्र आहे.

## पत्र १ लें.

" अलिकडे सर्व दरबारचे मुत्सद्दी एक प्रकारचें जाणून सर्व प्रकारें तुह्मांसच हातीं धरून, बरावाईट सवालजाब तुमचे हातून केला. तुह्मीं यथाशक्ति आमचे कार्यास न चुकलेत. गतवर्षी रामाजीपंतांनीं भर देऊन सकवारबाई तुमचे केवळ पाठीसच लाविली ते प्रसंगीं तुमचे दरबारीं कांहीं चालेना, तथापि तुह्मांमुळें आह्मांवर सकवारबाईंनीं इतराजी, त्यांचा काळ होयतों, कशी केली, हें तुह्मांस स्मरण असेलच. तुह्मीं रामाजीपंतांचे पेंचामुळें, सकवारबाईंचे पेंचामुळें, गडकरी सर्व प्रकारें आपले विचारांत घेऊन आमचा आश्रय केलात. आह्मींही तोच विचार शेवट पावेतों निभावला. तोंपावेतों, आमचे चित्तांत, तुमचे ठायीं ममतेस अंतर नव्हतें. ज्याप्रमाणें बाबांचे ( महादोबा पुरंदरे ) चित्तांत तुमचा पक्ष त्याच प्रकारें आमचे चित्तांत. कां कीं तुमची बाबांचे ठायीं निष्ठा तशीच आमचे ठायीं. तदोत्तर राजश्री स्वामींनीं तुह्मांस कीं त्यांस लिहून, जवा बसे तें करावें, तेंही न करतां उफराटें, राज्यभारास युक्त, आह्मांस संमत, तुमचें हित, ऐसा विचार आरंभिला असतां टाकून लांबणीवर घालून बसलेत, तुह्मांस काय

ह्मणावें ? बाबूजी नाईक, देवराव यांचा दरबारीं अभिमान आह्मीं धरला. वेडेपणें अथवा शहाणपणें तेवढेंच तुह्मीं व बाबानीं तटीं लावून राज्य बुडविलेंत, या शहाणपणास काय ह्मणावें ? कलयुगांत खावंद तों वेडेच असतात, परंतु कार्यकर्ते शहाणे असतात ऐसें ऐकत होतों. तेंही येथें विपरति दिसून आलें. अद्यापही दुराग्रह टाकाल, विचारावर घ्याल, तर आमचा लौकिक राहील, राज्य वांचेल; येणेप्रमाणें केलिया तुमचेंही बरे होईल. याउपरी मनापासून आईसाहेबांस समजावून, भरवंसा पुरवून खालीं आणावी. नानानीं तुह्मीं मिळून राज्य चालवावें. आज नासरजंग मेला; अशा प्रसंगांत मोठा मनसबा केला पाहिजे. बाबा ( महादबा ) रागीट, उठोन गेले. त्यास आमचा लौकिक माल जाहला. परंतु थोडक्याच मजकुरावर आज एक वर्ष दुराग्रह वाढवून या थरास आणलें. आतां तरी विचार करून, समयसूचकता कराल तर सर्व कुशल होईल. नाहींतर ईश्वर प्रमाण. आशीर्वाद."

या पत्रावरून पूर्वी दर्शविल्याप्रमाणें नानासाहेब पेशवे व गोविंदराव चिटणीस यांचा पूर्वी कसा स्नेहसंबंध होता व अलीकडे पेशव्यांनींच फक्त आपला स्वार्थ साधल्यामुळें चिटणीस त्यांचा पक्ष सोडून ताराबाईंच्या पक्षांत कसे सामील झाले हें लक्षांत येईल. राणी सकवारबाई व पेशवे आणि चिटणीस यांचें शत्रुत्व विकोपाला जाऊन त्यांचा कांटा दूर करण्यांतच पेशवे व चिटणीस यांचें कल्याण होतें, हें या पत्रावरून दिसून येण्यासारखें आहे. महादोबा पुरंदरे हेही पेशव्यांच्या स्वार्थी दृष्टीमुळें त्यांचा पक्ष सोडून तारबाईकडे गेले होते. एकंदरींत पेशव्यांनीं रामराजाकडून छत्रपतीपदाचा जो राजीनामा घेतला तो कोणाही थोर माणसास रुचला नाहीं अगर न्यायाचा वाटला नाहीं. रामराजे व ताराबाई यांचाच पक्ष सत्पक्ष अशी सर्व मंडळींची कल्पना झाली व पेशवे निव्वळ स्वार्थी ह्मणूनच ते त्यांचा पक्ष सोडून गेले, हें उघडपण दिसून आलें. वरील पत्रामुळें पेशव्यांच्या कारस्थानावर चांगलाच प्रकाश पडतो.

## पत्र २ रें.

पुढील पत्र नानासाहेब पेशवे यांनीं जयापा शिंदे यांस लिहिलें आहे:—

" महादोबाची आमची विमनस्कता तीन वर्षें आहे. सातारियापासून विशेष वृद्धि पावली. तुमचे पक्षपातामुळे अति कष्टी होते. आह्मांस हरएक कामांत मुरदाड करावयाची तजवीज. रामचंद्रबाबा व भाऊंकडे पत्रें जात येत असत. आह्मांपासून हरएक मसलत पायाशुद्ध शेवटास न जावी या भावें, भाऊकडेच फौज पाठवावी, आह्मांस घरीं बसवून ताराबाईस गोविंदरायाचे मार्फतीनें चढवावें, आह्मांवर सर्वांचे हुकूम राहवे, ऐसा विचार ( महादोबाचा ) दिसोन आला. तेव्हां आह्मीं भाऊस साफ लिहिलें कीं जर भाऊ असलेस तर पत्रदर्शनीं येणें. दाभाडियाकडील काम चांगलें करूं. त्यावरून भिडेस पडून आले. दाभाडियाकडील काम रगडून आरंभिले. नासिरजंग गेला. जप्ती करावी; दहावीस लाख मेळवावे, ऐसा विचार आह्मीं केला. त्यामुळें महादोबांनीं बहुत वाईट मानून घरास गेले. कोणी ह्मणतात कीं, ताराबाईकडे जातील. परंतु ते कुलीन जुने चाकर, हरामखोरी कधीं करणार नाहींत असें वाटतें. कालगत मात्र न कळे. असो. आह्मांशीं, बाबाशीं ( महादोबाशीं ) तुट पडली. भाऊ अर्धे इकडे, अर्धे तिकडे. रामचंद्रबाबा बाह्यात्कारें आह्मांकडे, अंतर्यामीं बहुत गुप्तरीतीनें बाबाकडे. येथें बाहेर तों दाखवितात कीं, खावंदांची मर्जी तेंच प्रमाण. परंतु अंतर्याम तुह्मीं जाणतच आहां. त्रिंबक विनायक, कोन्हेरपंत, हे केवळ बाबांचे. गंगोबाशीं याशीं राजकारण पूर्ण. आमची तवकल ईश्वरावर आहे. तुमचे भरंवशावर ऐसें केलें. "

जयापा शिंदे हे नानासाहेब पेशव्यांचे अत्यंत विश्वासाचे ह्मणून त्यांना हें महत्वाचें पत्र लिहिलें आहे. या पत्रामुळें साताऱ्याची गादी व पेशव्यांचें कारस्थान यांमधील राजकारणाची गुंतागुत पुष्कळ अंशीं सोडवितां येण्यासारखी आहे.

५. छत्रपती शाहुमहाराजांच्या सनदेप्रमाणें मराठी राज्याचा भार पेशव्यांनीं घेतल्यामुळें त्या दोन्हीं सनदा पेशव्यांना मान्य होत्या असेंच ठरतें. असें

---

१ नानासाहेब पेशवे यांचें चरित्र पान १००

असतां पहिल्या सनदेंत ह्मटल्याप्रमाणें " चिटणीस स्वामींचे विश्वासू, त्यांच्या तुमच्या विचारें राज्य राखावें " या छत्रपतींच्या आज्ञेप्रमाणें पेशव्यांनीं राज्य राखिलें पाहिजे होतें. परंतु तसें न करतां त्यांनीं चिटणीसांना झुगारून देऊन केवळ तरवारीच्या जोरावर आणि कुटिल कारस्थानाच्या बळावर छत्रपतीपदाचे अधिकार काबीज केले असें ठरत नाहीं काय ? गोविंदराव चिटणीस, महादोबा पुरंदरे, त्रिंबक विनायक, कोन्हेरपंत, गंगोबा, वगैरे मुत्सद्दी राजकारणाचे कसेही डाव खेळणारे असोत, परंतु त्यांना छत्रपतीची सत्ता नष्ट व्हावी असें मात्र वाटत नव्हतें. म्हणूनच ते नानासाहेबांचा इतक्या दिवसांचा स्नेह सोडून केवळ स्वामिभक्तीच्या तत्वाकरतां ताराबाईच्या पक्षाला जाऊन मिळाले. पेशव्यांना आपल्यावर कोणाचाच अधिकार नसावा, आपणच सर्वाधिकारी बनावें, असें वाटत असल्यामुळें, राज्याच्या कल्याणाकरतां नव्हे तर, स्वतःच्या महत्वाकांक्षेकरतां, त्यांनीं छत्रपतीचे अधिकार लुबाडले, असेंच स्पष्ट दिसतें. वरील पत्रांत " आह्मांवर सर्वांचे हुकूम राहावे ऐसा विचार " या वाक्यावरून वरील विधान खरें ठरतें. भोंसले, शिंदे, होळकर यांना रामराजाकडून नवीन सनदां देववून पेशव्यांनीं ताराबाईच्या पक्षाचे उत्तरेकडील पंख तोडले होते. त्यांना आतां निजामाशीं संधान बांधून दक्षिणेकडीलही पंख तोडावयाचे होते. वरील पत्रांत जो नासिरजंगाबद्दल उल्लेख आहे त्याचा हेतू तोच होता. याच तत्वावर नानासाहेब पेशव्यांनी ताराबाईच्या पक्षाला नामोहरम केलें. आणि शेवटीं आपल्या सर्वाधिकारामधील तिचा कांटा कायमचा काढून टाकला.

६. पेशव्यानें रामराजांचा राजीनामा घेऊन त्यांना नामधारी बनविल्यानंतर वृद्ध ताराबाईनें छत्रपतीपदाचें अस्तित्व कायम राखण्याकरतां जे विश्वप्रयत्न केले, त्यांत कोल्हापूरच्या संभाजीमहाराजांना साताऱ्याच्या गादीवर आणण्याचाही शेवटचा प्रयत्न होता. पेशव्यांच्या तरवारीच्या बलापुढें ज्या प्रमाणें संभाजीमहाराजांना साताऱ्याच्या गादीवर. आणण्याचा प्रयत्न राणी सकवारबाई यांचा फसला, त्याचप्रमाणें या वेळीं ताराबाईचा प्रयत्न फसला यांत कांहीं नवल नाहीं. संभाजीमहाराजांना साताऱ्याच्या गादीवर आणण्यांत

ताराबाईंच्या इच्छेचा एकच किरण अवशेष राहिला होता. तो सफल झाला असता तर त्यांच्या मनाला तेवढेंच समाधान वाटलें असतें. रामराजे छत्रपती बनल्यामुळें सर्व राज्याचा कारभार ताराबाईंच्या हातीं येईल या हव्यासानें त्यांनीं आतांपर्यंत सर्व उपद्व्याप केले, ह्मणून ते केवळ त्यांच्या स्वार्थाचे होते, असा आरोप ठेवावयाला विरुद्ध पक्षाला जागा होती. परंतु कोल्हापूरच्या संभाजी महाराजांना रामराजांच्या राज्यारोहणानंतर आणण्याचा जो प्रयत्न त्यांनी चालविला त्या बाबतींत मात्र राज्याचा स्वतःला कारभार मिळावा हा हेतु ताराबाईंचा होता हें कोणालाही ह्मणतां येण्यासारखें नव्हतें.

७. इ. स. १७०९ मध्यें ताराबाईंनीं स्वतंत्र करवीरचें राज्य स्थापन केलें. असें असतां त्या करवीर संस्थानाच्या संस्थापिकेला पुढें पांचच वर्षांनीं संभाजीमहाराजांनीं कारागृहवास दाखविला. खऱ्या संस्थापिकेला कारागृहवास पतकरावयाला लावून तिच्या सावत्र मुलानें राज्याचा उपभोग घेणें हें कृत्य अन्यायाचें झालें असा समजणारा पक्ष कोल्हापुरीं असणें स्वाभाविक होतें. परंतु इ. स. १७१४ पासून १७३० पर्यंत सोळा वर्षांच्या कालांत, तसा पक्ष पुढें आला नाहीं व त्या पक्षानें न्याय्य रीतीनें अगर बंड उभारून ताराबाईंची मुक्तता करण्याचा प्रयत्न दाखविला नाहीं. अर्थात त्यांचा बंदिवास अन्यायाचा होता असें निदान करवीर संस्थानांतल्या प्रजाजनांना वाटत नव्हतें असें गृहीत धरून चालावयास हरकत नाहीं. ताराबाईंचा राज्यकारभार त्या प्रजाजनांना जास्त कडक वाटत असो, अगर त्यांच्या बंदिवासाचीं इतर कांहीं घरगुती कारणें असोत, तीं जोंपर्यंत सूर्यप्रकाशांत येत नाहींत तोंपर्यंत, त्यांच्या राज्यकारभाराविषयीं तर्कवितर्क करून विधानें दडपून देण्याचें हें स्थल नाहीं. परंतु एवढें मात्र सत्य ठरतें कीं, ताराबाईंचा पन्हाळ्यावरील संभाजीमहाराजांच्या ताब्यांतील सोळा वर्षांचा कारागृहवास व इ. स. १७३० पासून शाहुमहाराज कालवश होईपर्यंत एकोणीस वर्षांचा साताऱ्याच्या किल्ल्यावरील बंदिवास, ह्मणजे सुमारें पस्तीस वर्षेंपर्यंत करवीर संस्थानाच्या संस्थापिकेची जरूरी करवीर संस्थानाला भासली नाहीं, एवढेंच नव्हे तर, तिच्या बंधविमोचनाची सुद्धां करवीर

संस्थानाधिपती संभाजीमहाराजांनीं पर्वा केली नाहीं, इतके तिच्या बाबतींत उदास असलेले संभाजीमहाराज साताऱ्याच्या गादीवर आल्यानें राज्यकारभारांत ताराबाईचा हात शिरकणें शक्यच नव्हतें. त्यांच्या नशिबींचा कारागृहवास कायमचाच राहणार होता, हें त्यांना पक्कें अवगत असूनसुद्धां संभाजीमहाराजांना साताऱ्याच्या गादीवर आणण्याचे जे त्यांनीं प्रयत्न चालविले, त्यांत त्यांचा एकच हेतु दिसून येतो; तो ह्मणजे छत्रपती शिवाजीमहाराजांच्या कुळांत ती गादी चालावी. नोकरांचे छत्रपती गुलाम बनूं नयेत. ताराबाई या पाण्याची बायको होती कीं, राज्यकारभार करीन तर प्रजाजनांच्या मस्तकीं विराजमान होऊन बसेन, नाहींतर आजन्म कारागृहवासांत सुकून मरून जाईन. तेजस्वी आणि अस्सल क्षात्र वृत्तीच्या माणसांची अशीच रीत असते.

८. रामराजाप्रमाणेंच संभाजीमहाराजांचा वारसाहक्क साताऱ्याच्या गादीवर आहे व रामराजांनीं राजीनामा दिला तर ते केवळ स्वतः आपल्या अधिकारापासून भ्रष्ट होतील, पण त्यांच्यामुळें संभाजीमहाराज मात्र बांधले जाणार नाहींत. त्यांनीं आपला वारसाहक्क पेशव्यांना पचूं देऊं नये एवढाच हेतु त्यांना साताऱ्याच्या गादीवर आणण्यांत ताराबाईचा होता व तेवढ्याच-करतां हा त्यांचा शेवटचा प्रयत्न झाला. परंतु शेवटीं तोही फसला. त्याचें मुख्य कारण पुढें दिलें आहे.

९. इ. स. १७५० मध्यें राणोजी शिंदे मरण पावले. त्यांच्या गादीवर त्यांचा वडील पुत्र जयापा हा बसला. राणोजींच्या कारकीर्दीत त्यांच्या दिवाण-गिरीच्या जागेवर थोरल्या बाजीराव पेशव्यांनीं रामचंद्र मल्हार सुखटणकर या इसमाची योजना केली होती. हे कोंकणांतील अरवली गांवचे कुल-कर्णी होते. त्यांना रामचंद्रबाबा शेणवी ह्मणत. त्यांचें व राणोजींचा मुलगा जयापा याचें बरें नव्हतें. जयापा अधिकारारूढ झाल्यानंतर दिवाण-गिरीच्या जागेवरून त्यांची उचलबांगडी करण्याचा प्रयत्न सुरू झाला. शाहुमहाराज हयात असेपर्यंत अशा दिवाणांच्या जागा त्यांच्या सल्ल्यानेंच भरल्या जात; परंतु त्यांच्या मरणानंतर मराठी साम्राज्याचे अधिकार

पेशव्यांकडे आले. त्यामुळें शिंद्याच्या असलेल्या दिवाणाला कायम ठेवणें अगर तो काढून त्याच्या जागीं दुसरा नेमणें हा अधिकार पेशवे दर-बाराला आला. पेशवे दरबारची सत्ता व अधिकार यांची वांटणी शाहु-महाराजांनीं पूर्वींच केलेली होती. मुख्य पेशव्यानें मुलखगिरी करावी व नायब पेशव्यानें कारभार करावा. अर्थात् दिवाणांची नेमणूक करणें हें एक राज्यकारभाराचें अंग असल्यामुळें त्या प्रकरणाचा अखेरचा निकाल नायब पेशव्यानें करावयाचा होता. सदाशिवरावभाऊंना छत्रपती शाहु-महाराजांनींच नायब पेशवे ह्मणजे पेशव्यांचे कारभारी नेमलें होतें. त्यांच्या हातीं नानासाहेबांनीं जरी कारभार दिला नव्हता तरी त्या जागेचे मालक तेच होते. ह्मणून रामचंद्रबाबांनीं आपली शिंद्यांच्या दिवाणाची जागा कायम राहण्याकरतां छत्तीस लक्ष रुपयांचा नजराणा भाऊसाहेबांना देऊन त्यांची भेट घेतली व आपल्या बाबतींत नानासाहेब अन्याय करीत आहेत, तेव्हां आपण मला न्याय द्यावा अशी त्यांना विनंति केली.

१०. रामचंद्रबाबांच्या बाबतींत जाणून बुजून नानासाहेबांनीं अन्याय करण्याचें ठरविलें होतें. सत्तेपुढें कोणाचें शहाणपण चालत नाहीं. शिंदे व होळकर या उभय सरदारांमध्यें रामचंद्रबाबा यांच्यामुळें वैमनस्य वाढतें हें कारण पुढें करून नानासाहेबांनीं त्यांना दिवाणाच्या जागेवरून कमी केलें. शिंदे होळकर यांचेमधील वैमनस्याला खरें कारणीभूत नानासाहेब पेशवे होते. परंतु त्यांनीं परस्पर तो गुन्हा रामचंद्रबाबांच्या माथ्यावर लादून आपण मोकळे झाले. त्याचा इतिहास येथें देणें जरूर असल्यानें तो खालीं दिल्याप्रमाणें आहे.

११. थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत हिंदुधर्मा-विषयीं विशेष अभिमान बाळगणारा पुरुष ह्मणजे जयपूरचा सवाई जयसिंग होय. हा इतर संस्थानिकांप्रमाणें दिल्लीच्या पादशहाचा मांडलिक होता. दिल्ली दरबारांत हिंदुसरदारांच्या वतीनें चार शब्द बोलणारा हाच होता. याच्याकडे माळवा प्रांताचा सुभा होता. परंतु त्याच्याकडून तो काढून निजामानें आपल्याकडे घेतला. त्यामुळें जयसिंगाला वाईट वाटलें. या गोष्टीचा बाजीराव

पेशव्यानें फायदा घेऊन जयसिंगाबरोबर संधान बांधलें व त्याच्या प्रोत्साहनानें त्यानें माळव्यावर स्वाऱ्या केल्या. एका स्वारींत बाजीरावाची आई राधाबाई माळव्यांत गेली असतां जयसिंगानें आपली मुलगी तिच्या मांडीवर दिली. त्यावेळीं राधाबाईनें जयसिंगाला वचन दिलें कीं, माझ्या वंशांतील कोणी जयपूरच्या राज्याकडे वांकड्या नजरेनें पाहणार नाहीं. या गोष्टीच्या स्मरणार्थ जयपूरकर पन्नास हजार रुपये 'बाईची भेट' या नांवानें पेशव्यास देत. बाजीराव मेवाड व मारवाड या राज्यांतून चौथाई वसूल करी, परंतु जयसिंगाच्या मुलीबरोबर बाजीरावाचें भावाचें नातें जोडलें गेल्यामुळें जयपुराला कधींच उपसर्ग त्यानें पोंचूं दिला नाहीं. स. १७४३ मध्यें जयसिंग मरण पावला. त्याला दोन मुलगे. वडील ईश्वरसिंग व धाकटा माधवसिंग. माधवसिंग मेवाडच्या राजकन्येपासून झालेला मुलगा होता. त्यावेळीं राजपुतान्यांत अशी एक प्रथा होती कीं, मेवाडच्या राजकन्येचा मुलगा जरी लहान असला तरी तोच राज्याचा वारस मानला जात असे. म्हणून पुढें ईश्वरसिंग व माधवसिंग यांच्यामध्यें तंटा उत्पन्न होण्याचें कारण राहूं नये म्हणून जिवंतपणींच जयसिंगानें मेवाडच्या राण्याबरोबर ठराव करून माधवसिंगानें जयपूरचा वारसा सोडून रामपुरा परगण्याची जहागीर घेऊन त्याबद्दल मेवाडच्या राण्याची चाकरी करावी असें ठरवून दिलें होतें. त्याप्रमाणें जयसिंगाच्या मृत्यूनंतर ईश्वरसिंग जयपूरच्या गादीवर बसला व माधवसिंग रामपुरा जहागीर घेऊन उदेपुरास जाऊन जगत्सिंहाजवळ राहिला.

१२. या गोष्टीला तीन वर्षे लोटतात न लोटतात, तोंच इ स १७४६ मध्यें जगत्सिहानें माधवसिंगाला जयपूरचें राज्य मिळावें या उद्देशानें ईश्वरसिंगाबरोबर लढाई सुरू केली. त्या प्रसंगीं ईश्वरसिंगानें मराठ्यांची मदत मागितली. तेव्हां शिंदे होळकर यांनीं नानासाहेब पेशवे यांच्याबरोबर बाटाघाट करून ईश्वरसिंगाला मदत करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें ईश्वरसिंगाच्या मदतीला शिंदे होळकर गेले व त्यांच्या मदतीनें त्यानें माधव-

सिंगाचा राजमहाल येथें पराभव केला. या लढाईंत माधवसिंगाच्या बतीनें बुंदी व कोटा येथील राजे ईश्वरसिंगाबरोबर लढले म्हणून कोट्यास वेढा घालून तेथील राजा जालीमसिंग याचा ईश्वरसिंगानें पराभव केला. या लढाईंत जयापा शिंदे याचा एक हात गोळी लागून खराब झाला म्हणून ईश्वरसिंगानें त्याला बुंदी कोट्यांतून मोठी खंडणी देवविली.

१३. बुंदी कोट्यांतून जयपाला मोठी खंडणी मिळाली हें पाहून मल्हारराव होळकर यांच्या तोंडाला पाणी सुटलें. माधवसिंगाचा पराभव झाल्यानें पुढें काय करावें या विवचनेंत तो होताच. शिंद्यांना मिळालेल्या खंडणीबद्दल होळकर असंतुष्ट आहे असें समजतांच माधवसिंगानें होळकराशीं 'पासष्ट लक्ष रुपये देतों तुमची मदत आम्हांस द्या' असें बोलणें लाविलें. ही गोष्ट मान्य करून मल्हारराव होळकरांनीं ईश्वरसिंगावर चाल केली. हा प्रकार रामचंद्रबाबा यांस बिलकूल आवडला नाहीं. तो नानासाहेब पेशव्यांस लिहितो, 'माधवसिंगाचें राजकारण लटकें, त्यांत जीव नाहीं, पैका प्राप्त होणें नाहीं. स्वामींनीं ईश्वरसिंगाचा अभिमान धरला ऐसें लोकांत झालें, त्यास आतां ही गोष्ट विरुद्ध आहे. आम्हीं चाकर आज्ञांकित असों.' या रामचद्रबाबाच्या पत्राला नानासाहेब पेशवा लिहितो, राणाजींनीं मोंगलाई अमिरांकडे राजकारण करून मल्हारजीकडे प्रवेश केला. एतद्विषयीं मल्हारावांनीं आम्हांस बहुतां प्रकारें लिहिलें कीं, राजकारण खरें खुरें आहे. उभयतांची समजावीस होऊन कलह तुटतो, स्वामीस पैसा मिळतो. म्हणून कित्येक आग्रहपुरःसर लिहिलें आहे. मल्हारबास या गोष्टीचा पुर्ता अभिमान आहे. तुम्हांस ( शिंद्यास ) कोणे गोष्टीचा अभिमान आहे असें नाहीं. तुम्हीं सेवा निष्ठायुक्त करीत आलेत. ज्यांत खावंदाची मर्जी, हित व नक्ष, तेंच केलें. तन्मुळेंच सर्वही उत्तम प्रकारें दिसोन स्वामिसेवा घडत गेली. सांप्रत मल्हारबा अभिमानी. तुम्हीं ईश्वरसिंगाचाच पक्ष धरिल्यास, तुमची त्यांची ऐक्यता चालणार नाहीं. द्वैत दाखवितील. आजपर्यंतचा ऐक्यभाव विपर दिसेल. हिंदुस्थानांत दुर्लौ-

किक होऊन कार्यनाश होऊं शकतो. उमदे उमदे मनुष्यांस अंतर पडून, कित्येक फितवे अंग्रेज लोकांस बोटे घालावयास जागा होणार, ऐसें चित्तांत येतें. त्यास तुह्मी येविशीं दुराग्रह न करतां फूट न दिसतां, मल्हारबाचा मनोदय रक्षून संपादिल्या यशाची अभिवृद्धि होय तें करणें. आमच्या विचारें तुह्मीं ऐक्यरूप मनसुबा करीत आलां, तदनुरूपच चालवें. त्यास विपर्यास नसावा, हेंच सर्वात्मना आमच्या चित्तांत आहे. विस्तार लिहिण्यास कारण हेंच कीं, दुराग्रह मल्हारबाचा, नाहीं करीत ह्मटल्यानें वाईट मानतील. तुह्मांपासून जावयाचा आग्रह धरितील. दुसरें, पंधरा लक्ष राणाजी देणार असे असतां, दुराग्रह केलिया उत्तम दिसत नाहीं. यास्तव ज्याप्रकारें लौकिक फटकळ, ग्रहकलहाचा न होतां कार्य करणें"

१४. वरील दोन्हीं पत्रे वाचलीं ह्मणजे रामचंद्रबाबानें ईश्वरसिंगाचा सत्पक्ष धरला आणि मल्हाररावाने व नानाने द्रव्यलोभास्तव नीतिमार्ग सोडला हें स्पष्ट होतें. नानासाहेबाच्या पत्रांत मल्हाररावाला दुखविल्यानें मोठीं संकटें येतील वगैरे जो मजकूर आहे, तो केवळ शिंद्याला भिवविण्यापुरताच आहे. नानासाहेबांनीं पंधरा लक्ष रुपयाकरता हा वाममार्ग पतकरिला. पेशव्यांना जर सत्पक्षाची चाड असती तर त्यानीं मल्हारराव वेडावांकडा वागूं लागला असता, तर रघोजी भोसल्याप्रमाणे त्याचाही परामर्ष घेतला असता. पण पेशव्यांच्या मनांत द्रव्यलोभ उत्पन्न झाल्यामुळें त्यानें अन्यायाची बाजू धरली व रामचंद्रबाबाला तोंडघशीं पाडलें.

१५. रामचंद्रबाबाला हा अन्याय सहन झाला नाहीं. त्यानें होळकरांबरोबर सहकार्य केलें नाहीं. उलट दिवसेंदिवस शिंदे होळकर यांत बेदिली वाढत गेली. हें पाहून नानासाहेब उत्तर हिंदुस्थानात स्वारीला जाण्याकरतां ता. १०-१२-१७४७ रोजीं पुण्याहून निघाला. या स्वारीस नेवाईची स्वारी असें ह्मणतात. होळकरातर्फे पेशवे स्वतः स्वारीवर आल्यामुळें रामचंद्रबाबा हताश झाले. ईश्वरसिंगाला त्यांना मदत करतां आली नाहीं. माधवसिंगाचा पक्ष पेशव्यानें धरलेला पाहून ईश्वरसिंगानें तडजोड केली. त्यानें नेवाईसुद्धां

चार महाल माधवसिंगाला देण्याचें कबूल केलें. यावेळीं माधवसिंगाकडून पेशव्यास दहा लक्ष रुपये नजर मिळाली. ईश्वरसिंगानें पेशव्यास तीन लाख व त्याचा कारभारी महादाजी पुरंदरे यास पंचवीस हजार नजर कबूल केली. परंतु पेशवे परत फिरल्यावर ईश्वरसिंगानें या पैशाची टाळाटाळ चालविली. पेशव्यानें एकदां धरलेला आपला पक्ष सोडून केवळ पैशाच्या लोभानें तो सोडला, हें पाहून सर्व रजपुतांचीं मनें मराठ्यांविषयीं कलुषित झालीं. त्यांना मराठ्यांच्या शब्दाचा विश्वास वाटेनासा झाला. प्रथमतः जयापाची मदत घेतली व त्याबद्दल ईश्वरसिंगाला बराच पैसा खर्च करावा लागला. नंतर भावाबरोबर शत्रुत्व उत्पन्न करून घेऊन पुन्हा पैसा गेला व मुलूख राखला होता, तोही गेला. हें पाहून ईश्वरसिंगानें यापुढे युद्ध करूनच याचा शेवट लावावा असें ठरविलें. परंतु इतक्यांत होळकरानें त्याच्यावर हल्ला करून त्याचा सर्व मुलुख उध्वस्त करून टाकला व त्याचा पराभव केला. यामुळें ईश्वरसिंगाला पेशव्यांना ठरविलेली रक्कम देणें भाग पडलें. ईश्वरसिंगास होळकराकडून वरचेवर इतका जबरदस्तीचा जाच होऊं लागला कीं, शेवटीं ईश्वरसिंगाचें राज्य माधवसिंगाला मिळालें व त्यामुळें माधवसिंगानें आपला रामपुरा परगणा होळकरास मदतीदाखल दिला. तो अद्यापही होळकराकडे आहे.

१६. नानासाहेबानें या प्रकरणीं जें वर्तन केलें त्यामुळें मराठ्यांचा दुर्लौकिक झाला. पैशाच्या लोभानें वचनें मोडून, पाहिजे त्या पक्षाला मराठे मिळतात असें दिसून येतांच, रजपुतांस सवाई जयसिंगाचे वेळेपासून मराठ्याबद्दल हिंदुत्वाच्या अभिमानामुळे जो आदर वाटे, तो लयास गेला. ईश्वरसिंगाचा सर्वनाश झालेला पाहून जयपाला अति दुःख झालें. रामचंद्रबाबांनीं पेशव्यांना होळकरांच्या पक्षाला ओढलें असा संशय त्याला आला. म्हणून जयापानें रामचंद्रबाबाला दिवाणाच्या जागेवरून कमी केलें. होळकरालाही रामचंद्रबाबा नकोच होते. एकंदरींत नानासाहे-

१ सरदेसाईकृत नानासाहेब पेशवे यांचें चरित्र पान. ४१

बांच्या पैशाच्या लोभामुळें रामचंद्रबाबा मात्र तोंडघशीं पडले. पेशव्यांच्या या वर्तनानें पुढें त्याच्यावरील विश्वास उडाल्यामुळे इ. स. १७६१ मधील पानिपतच्या लढाईंत सर्व महाराष्ट्राला त्याचे प्रायश्चित्त भोगावे लागलें.

१७. रामचंद्रबाबाकडे कांहीं अपराध नसतां त्यांना नानासाहेबांनीं दिवाणाच्या कामावरून दूर केले हें सदाशिवरावभाऊ यांस रुचलें नाहीं. त्यांनीं नानासाहेबाकडे त्यांच्याबद्दल बरीच रदबदली केली. परंतु त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं. भाऊचा शब्द खालीं पडला ह्मणून त्यांना वाईट वाटलें. तेव्हां त्यांनीं रामचंद्रबाबा यांना आपला दिवाण नेमलें. नानासाहेबांनीं सदाशिवरावभाऊची रदबदली आपल्या अधिकारांत अमान्य केली आणि रामचंद्रबाबाना अधिकारच्युत करून त्यांची शिंद्यांच्या राज्यांतून हाकालपट्टी केली, ही गोष्ट त्यांनीं तेवढ्यापुरतें राजकारण साधण्याकरतां केली, एवढेंच ह्मणावें लागतें. या राजकारणाला शिंदे होळकरांतील एकोपा राखून मराठी राज्याचे दुवे पृथक् न करण्याचें धोरण नानासाहेबांनीं ठेवलें असें ह्मणून कांहीं इतिहासकार त्यांची तारीफ करतात. केवळ तेवढी वेळ साधून नेणें, हें खरें व भरीव राजकारण नाहीं. त्याला धोरण असेंही कोणी ह्मणणार नाहीं. ज्या राजकारणामुळे पुढील संकटें टळलीं जातील तेंच खरें राजकारण. पण तेवढें धोरण नानासाहेबांना ठेवतां आलें नाहीं. ईश्वरसिंगाच्या बाबतींत ज्याप्रमाणें केवळ तात्पुरत्या फायद्याकडे त्यांनीं लक्ष दिलें, पण कीर्ति व राजकारणाचें वजन त्यांनीं घालवून घेतलें, तोच प्रकार शिंदे व होळकर यांना तात्पुरतें संतुष्ट करण्याकरतां त्यांनीं केला. यामुळें त्यांनीं दूरचा कलह घरांत आणून ठेवला. यावेळेपासून पेशव्यांच्या गृहकलहाला तोंड फुटलें. मनुष्याची स्वार्थामुळे एकदां नजर बंद झाली ह्मणजे कितीही शहाणा मनुष्य असला तरी त्याला दूरवरचा विचार सुचत नाहीं. शहाण्यालासुद्धां स्वार्थामुळें बुद्धिभ्रंश होतो व त्याच्या शहाणपणाचा नाश करण्याला तो पुरेसा होतो. रामचंद्रबाबाच्या बाबतींत नानासाहेबांची तीच स्थिति झाली. पण ' बुंदसे-

गया तो हौदसे नहीं आता ' या ह्मणीप्रमाणें पुढें नानासाहेबांना झालेली चूक सुधारून घेतां आली नाहीं. या गृहकलहाला पुढें निरनिराळीं तोंडें फुटलीं व त्यांतच त्याची परिसमाप्ति झाली.

१८. या काळीं नजराणा घेणें हें एक बहुमानाचें लक्षण मानलें जात असे. दिल्लीचे बादशहा नजराणा घेत. सातान्याचे छत्रपती नजराणा घेत. त्यांचे अष्ट प्रधान नजराणा घेत. एकंदरींत ही नजराण्याची प्रथा अधिकार-परत्वे रावापासून सामान्य वर्गांपर्यंत होती व ती राजमान्य ठरली जात असे. ईश्वरसिंगानें पेशव्यांना तीन लक्ष नजराणा देण्याचें ठरविलें त्याच वेळीं, त्यांचे कारभारी महादोबा पुरंदरे यास पंचेवीस हजार नजराणा देण्याचें त्यांनीं कबूल केलें. माधवसिंगाने दिल्लीच्या पादशहास एक कोट रुपये नजराणा देतों असें कळविलें होतें. परंतु पेशव्यांनीं ईश्वरसिंगाचा पक्ष धरल्यामुळें पादशहानें माधवसिंगाला नजराणा घेऊन मदत केली नाहीं. छत्रपती पेशव्यांना वस्त्रें देते वेळीं नजराणा घेत. कोणतेंही न्यायाला अगर व्यवहाराला धरून कार्य करून द्यावयाचे झाल्यास आपला हक्क ह्मणून नजराणा घेण्यांत येई. त्या नजराण्याची रक्कम कार्याच्या लहानमोठेपणावर अवलंबून असे. सध्यां दिवाणी कोर्टांत दावा दाखल करण्याच्या वेळीं दाव्याच्या मागणीरकमेवर जो स्टांप भरावयाचा असतो तोही एक प्रकारचा सरकाराला नजराणाच देणें होय अशी सर्व प्रथा असतांना सदाशिवराव-भाऊनीं छत्तीस लक्षांचा लांच घेतला असा कांहीं इतिहासकार त्यांच्यावर आरोप करतात, परंतु तो खोटा आहे. एकादें अन्यायाचें काम करण्याबद्दल जें द्रव्य चारलें जातें त्याला लांच ही संज्ञा आहे. रामचंद्र बाबाचा कोण-ताही अन्याय नसतां केवळ नानासाहेब पेशव्यांच्या लोभी धोरणामुळें जर त्यांना अधिकारत्याग करण्याचा प्रसंग आला, व न्याय मिळण्या करतां जर सदाशिवरावभाऊ यांना त्यांनीं नजराणा दिला, तर तो निंद्य असा लांच होऊं शकत नाहीं. सदाशिवरावभाऊवर लांच खाण्याचा जे

१. मराठ्यांची बखर पा. १८०

इतिहासकार आरोप करतात त्यांना त्या वेळच्या दरबाराचा रिवाज माहीत नव्हता एवढेंच मोठ्या दुःखानें ह्मणावें लागतें. सदाशिवरावभाऊ लांच खाऊन अन्यायानें रामचंद्रबाबा यांना दिवाणाच्या जागेवर कायम करा असें नानासाहेब पेशव्यांना सांगत नव्हते. इ. स १७३२ मध्यें थोरल्या बाजीरावांनीं राणोजी शिंद्याला ज्यावेळीं पाग्याचीं वस्त्रें देऊन सरकारी शिक्के, कट्यार, जरीपटका वगैरे त्यांच्या स्वाधीन केलें, त्यावेळीं रामचंद्रबाबांना पेशव्याचे कारकून ह्मणून त्यांच्याकडे नेमून दिलें. राणोजी शिंद्याची कारकीर्द एकंदर १८ वर्षांची झाली. त्या अवधींत राणोजी जो सामान्य पागे होता, तो आपल्या पराक्रमावर व रामचंद्रबाबाच्या कारभाराच्या बळावर, ६५॥ लक्ष उत्पान्नाच्या मुलुखाचा मालक व सरदार बनला. तेव्हां ज्या रामचंद्रबाबानें गेलीं अठरा वर्षे इमानें इतबारें नोकरी करून शिंद्याच्या दौलतीचें वैभव आणि कीर्ति वाढविली, त्याना अधिकारारूढ होतांच केवळ फितुरीच्या संशयामुळें जयापा कामावरून कमी करतात काय व त्याला नानासाहेब पेशवे संमति देतात काय, याचे भाऊसाहेबांना आश्चर्य वाटलें. ह्मणून सत्पक्षाला न्याय मिळावा एवढ्याचसाठीं सदाशिवरावभाऊ त्यांच्याबद्दल रदबदली करीत होते. एकाची टोपी दुसऱ्याच्या डोक्यावर ठेवण्याकरतां ते लांच खात नव्हते, एवढी मात्र गोष्ट सत्य आहे. राजकारस्थानें खेळलीं जात असतांना त्यात सत्पक्षाचा जय झाला नाहीं, ह्मणून तीं निंद्य असें मात्र कोणी समजू नये.

१९. रामचंद्रबाबाच्या बाबतींत नानासाहेबांनीं दिलेला निकाल सदाशिवरावभाऊंना अगदीं आवडला नाहीं. त्यांना आपला अपमान झाल्याप्रमाणें वाटलें. एकदां एक पक्ष धरून पुढें आल्यानंतर त्या पक्षाचा पाणउतारा होणें हें भाऊसाहेबांना खपलें नाहीं. त्यांनीं रामचंद्रबाबांना आपला दिवाण नेमूण घेतलें. या गोष्टीमुळें भाऊबंदकी उघड घरांत शिरली. भाऊंना आपलें घर निराळें वाटू लागलें. आपले कायदेशीर व सनदशीर अधिकार जे जे होते ते ते भाऊ नानासाहेबांकडे मागूं लागले. नानासाहेब

या गोष्टीला तयार नव्हते. तेव्हां दरबारात दुफळी माजून दोन निरनिराळे पक्ष दिसूं लागले. कांहीं नानासाहेबांच्या पक्षाला मिळाले तर कांहींनीं भाऊंचा पक्ष उचलला. ताराबाई सदाशिवरावभाऊ यांच्या पक्षाला मिळाल्या. सदाशिवरावभाऊ रामचंद्रबाबांना घेऊन पुण्याहून साताऱ्याला गेले. तेथें कोल्हापूरच्या संभाजीमहाराजांना साताऱ्याच्या गादीवर आणण्याचें राजकारण सुरूं झालें. त्या राजकारणाचे रहस्य महत्वाचे असल्यामुळें तें येथें देणें जरूर आहे.

२०. इ. स. १७४० मध्यें थोरले बाजीराव पेशवे मेले व त्यानंतर पेशवाईचीं वस्त्रें नानासाहेब पेशव्यांना द्यावीं अगर बाबूजी नाईक बारामतीकर याना द्यावीं याची ज्यावेळीं वाटाघाट साताऱ्याला सुरूं होती, त्यावेळीं कोल्हापूरचे संभाजीमहाराज साताऱ्यास आले होते. नानासाहेबाना रघोजी भोसले हा मोठाच प्रतिस्पर्धी असल्यामुळे आपल्या पक्षाला जेवढी वजनदार माणसें मिळतील तितक्यांना अनुकूल करून घेणे, हे त्यांचे प्रयत्न सुरू होते. शाहुमहाराजानंतर संभाजीमहाराज हेच साताऱ्याच्या गादीचे हक्कदार व वारसदार असल्यामुळें त्यांचीही संमती नानासाहेबांना पेशवेपद मिळण्याला अत्यंत आवश्यक होती.[1] म्हणून चिमाजीआपा व नानासाहेब अशा उभयता चुलतेपुतण्यानी त्यावेळीं संभाजी महाराजांबरोबर एक करार केला. त्या करारनाम्यातील आशय पुढीलप्रमाणें आहे:— "सातारचे राज्य स्वामींचे ( संभाजीमहाराजांचें ) व एकछत्री शिक्का महाराजांचा ( संभाजी महाराजाचा ) चालावा. शाहु महाराजांचा जीवात्मा आहे, तो बाह्यात्कारी आम्ही त्याचे सेवक, परंतु अंतर्यामी स्वामींचे. शाहुमहाराज यांनीं कैलासवास केल्यावर दोन्हीं राज्यें स्वामीचीं, आणि आम्ही सेवक स्वामीचे. स्वामींच्या आज्ञेप्रमाणे वर्तणूक करूं अशी शपथ घेतली होती. त्याप्रमाणें दोन्ही राज्यें एक करून एकछत्री स्वामींचा शिक्का चालावा आणि आम्ही शाहुमहाराज याचे कारकीर्दीप्रमाणें सेवा करून असावें, हें प्रमाण. यासी अंतर करणार नाहीं "

---

१ का. सं. प. या. लेखांक ४२८.

२१. या करारनाम्याप्रमाणे साताऱ्याच्या गादीवर शाहुमहाराजांच्या पश्चात् वारसाहक्कानें येणाऱ्या संभाजीमहाराजांची संमती नानासाहेबांना पेशवेपद मिळण्याविषयी मिळाली. अर्थात् रघोजी भोसल्यांचा पक्ष हलका पडला व नानासाहेब पेशवेपदावर आरूढ झाले. वरील करारनाम्याचे वेळीं रामराजे अज्ञातवासामध्ये होते. त्यांचें रहस्यमय अस्तित्व कोणालाच अवगत नव्हतें; म्हणून साताऱ्याच्या गादीचे शाहुमहाराजांच्या पश्चात् संभाजीमहाराज हेच खरे वारसदार ठरत होते. शाहुमहाराजांना त्यानंतर औरस संतती होईल ही आशा कोणालाच नव्हती म्हणून संभाजीमहाराजांबरोबर वरील करार चिमाजीअप्पा व नानासाहेब यांनी केला होता. पुढें शाहुमहाराजांच्या मृत्युसमयीं साताऱ्च्या गादीचे संभाजी महाराजापेक्षां अव्वल दर्जाचे वारसदार म्हणून रामराजे पुढें आले व त्या कामीं ताराबाई यांनीं पुढाकार घेतला, तेव्हां संभाजी महाराजांचा साताऱ्याच्या गादीवर येण्याचा प्रयत्न ढिला पडला. अशा स्थितींत संभाजीमहाराजांना पूर्वी करून दिलेल्या वारसाहक्कासंबंधीं करारनाम्याचा संशय वाटू नये, म्हणून शाहुमहाराजांच्या मृत्यूनंतर नानासाहेबांनीं पुन्हां त्याना पूर्वीचाच करार ताजा करून दिला.

२२. नानासाहेब पेशव्यांनीं पूर्वीचा करार ताजा करून दिल्यामुळें संभाजीमहाराजांचा साताऱ्याच्या गादीवरील वारसाहक्क त्यांना अमान्य करतां येण्यासारखा नव्हता. इ. स. १७५० मध्यें सांगोलें मुक्कामीं पेशव्यांनीं रामराजे यांचा सक्तीचा राजीनामा जरी घेतला असला, तरी त्यामुळें संभाजीमहाराजांचा साताऱ्याच्या गादीवरील पेशव्यानी मान्य केलेला वारसाहक्क उडून जाण्यासारखा नव्हता. ह्मणून या एका मुद्यावर संभाजीमहाराजांना साताऱ्च्या गादीवर सनदशीर मार्गानें आणण्याची खटपट चालली होती. या खटपटीला ताराबाईनीं सुरवात केली व त्याला सदाशिवरावभाऊपासून बहुतेक मोठमोठे सरदार व मुत्सद्दी कबूल झाले. रामराजे जिवंत असेपर्यंत त्यांनी पेशव्यांना दिलेला राजीनामा रद्दबातल होण्यासारखा

नव्हता. रामराजे मरेपर्यंत वाट पहाणें फार दीर्घकालाचें ठरत असल्यामुळें रामराजे हे शिवाजीमहाराजांचे पुत्रच नव्हत, अशीही हूल उठविण्यास सुरवात झाली. शिवाय साताऱ्याच्या अष्टप्रधानांप्रमाणें कोल्हापुरास अष्टप्रधान होते. परंतु पेशव्यांनीं संभाजीमहाराजांबरोबर त्यांचें स्वामित्व कबूल करून करारनामा केल्यामुळें फक्त पेशवे हे कोल्हापूरच्या राजमंडळांत निराळे नेमले गेले नव्हते. संभाजीमहाराजांना साताऱ्याच्या गादीवर आणण्याची ही जी खटपट सुरू झाली त्यांत सदाशिवरावभाऊ असल्यानें व नानासाहेब ताज्या करून दिलेल्या करारनाम्याच्या विरुद्ध वर्तन करीत असल्यामुळें, सदाशिवरावभाऊंची कोल्हापूरच्या अष्टप्रधानांतील पेशवेपदावर नेमणूक करण्याचें संभाजीमहाराजांनीं ठरविलें आणि पारगड, कलानिधी आणि चंदगडी असे तीन किल्ले व पांच हजार रुपये उत्पन्नाची जहागीर सदाशिवरावभाऊंना देऊं करून त्यांची कोल्हापूरच्या पेशवेपदावर नेमणूक केली व त्याप्रमाणें सदाशिवराव भाऊंना हुकूमही रवाना झाला.

२३. संभाजीमहाराजांनीं भाऊंना पेशव्याचीं वस्त्रें देण्याचें ठरविलें ही गोष्ट नानासाहेबांना समजतांच ते घाबरून गेले. साताऱ्च्या राज्याची कोल्हापूरच्या राज्यापासून जर फारकत झालेली असती, तर सदाशिवराव भाऊ तिकडे गेल्यानें घरांतील एक ब्याद गेली, असें नानासाहेबांना वाटून आनंद झाला असता. परंतु या दोन राज्यांमध्यें असा संबंध न तुटल्यामुळें संभाजीमहाराज साताऱ्याच्या गादीच्या मालकीविषयीं केव्हां तंटा उपस्थित करतील याचा नेम त्यांना नव्हता. शिवाय शाहुमहाराजांना औरस संतती नसल्यामुळें रामराजे वारसदार ह्मणून साताऱ्याचे गादीवर आले. त्यांतून ते ताराबाईच्या कैदेंत पडले होते. ताराबाई केव्हां, कसें व कोणतें कारस्थान करतील याचा भरंवसा त्यांना नव्हता. अशा स्थितींत संभाजी व ताराबाई एक होऊन त्यांनीं जर साताऱ्याची गादी मिळविली तर तें एक मोठें संकट नानासाहेबांवर ओढवणार होतें. शिवाय कोण किती शहाणा, किंवा

पराक्रमी आहे, अथवा कोणाचा सत्पक्ष कीं विजयी पक्ष आहे, हे ठरविणारें एक सनदेचें चिटोरें भाऊसाहेबांच्या तरवारीला पाहिजे होतें. तें मिळतांच भाऊसाहेबांची तरवार यशस्वी ठरणार होती. संभाजीमहाराजांकडून पेशवेपदाची ( ती चिटोरेवजा ) सनद मिळणार हें दिसतांच नानासाहेबांचें धाबें दणाणून गेलें. आपल्या पेशवेपदाच्या सर्व वैभवाला घरींच मोठा शत्रू उत्पन्न झाला, व तो एकदां आपल्या हातून दूर गेला म्हणजे आपलें पुढें कांहीं चालणार नाहीं अशी त्यांची खात्री झाली. त्यांनीं भाऊंची समजूत काढण्याचा प्रयत्न चालविला. सदाशिवरावभाऊ या वेळीं सातार्‍यास होते. त्यांना नानासाहेबांनीं पत्र पाठविलें. त्यांत 'जर भाऊ असलेस तर पत्र दर्शनीं येणे' असा जातीचा रक्तसंबधाचा प्रश्न उत्पन्न करून मजकूर लिहिला. त्यामुळें सदाशिवरावभाऊ पुण्यास आले. नानासाहेबांनीं त्यांच्या सर्व मागण्या मान्य केल्या व महादाजीपंत पुरंदरे यांना कारभाऱ्याच्या जागेचा राजीनामा द्यावयाला लावून, त्या जागीं बिनशर्त सदाशिवरावभाऊंची स्थापना केली. या दिवसापासून पेशव्यांच्या कारभारीपणाचा सर्व कारभार सदाशिवरावभाऊ यांच्या हातीं आला.

२४. या प्रसंगीं सातारा व कोल्हापूर या दोन राज्यखंडाप्रमाणें पेशवेपदाचें जे दोन खंड पडणार होते व त्यामुळे जी नवीन यादवी माजणार होती ती भाऊसाहेबांची मागणी नानासाहेबांनीं मान्य केल्यामुळें या वेळीं तरी तात्पुरती टळली. परंतु या गोष्टीनें गृहकलह मात्र शांत झाला नाहीं. भाऊसाहेब घरांत शिरून अधिकारारूढ झाले हें पाहून, गोपिकाबाईचा राग भडकला व त्यामुळें घरांतल्या घरांत तो क्रमाक्रमानें जास्त वाढूं लागला. नानासाहेबांनीं यापूर्वींच जर भाऊंकडे कारभार सोंपविला असता, तर नानासाहेबांचा बोज राहून भाऊंवर त्यांचा धाक राहिला असता. परंतु आपली मागणी नानासाहेबांनीं धुडकावून लावल्यानंतर आपल्या प्रयत्नानें आपण आपला अधिकार संपादन केला असें भाऊंना वाटलें या बाबतींत भाऊंचा विजय झाला व नानासाहेबांकडे कमीपणा

आला. भाऊसाहेब कारभारांत आल्यामुळें रामचंद्रबाबांचें महत्व वाढलें. त्यामुळें शिंदे, होळकर यांना खालीं पहावें लागलें. या वेळेपासून पेशव्यांच्या दरबारांत सदाशिवरावभाऊ यांच्याशिवाय पान हालेनासें झालें. हें वर्तमान इ. स. १७५२ मध्यें झालें.

२५. नानासाहेब पेशव्यांनीं सदाशिवरावभाऊ यांना आपले कारभारी नेमल्यानें ताराबाई व संभाजीमहाराज यांचा पक्ष अगदींच लंगडा पडला व त्यांनीं साताऱ्याच्या गादीवर संभाजीमहाराजांस आणण्याचा जो अखेरचा प्रयत्न चालविला होता, तो निष्फळ झाला. शिवाजीमहाराजांची गादी त्यांच्या वंशांतीलच पुरुषांनीं, त्यांच्या नांवलौकिकाला शोभेल अशी चालवावी, अशी जी तळमळ ताराबाईला होती ती दुर्दैवानें, 'उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः' या उक्तीप्रमाणें त्यांच्या मनांतच विराम पावली.



# प्रकरण ४ थें.

## पेशवे व आंग्रे.

### इ० स० १७५३ ते इ० स० १७५८

१. राज्यस्थापनेस इमारतीची उपमा कशी योग्य आहे.—२. राज्यस्थापनेच्या तत्वांत फरक झाला ह्मणजे तें नाश कसें पावतें.—३. हिंदुपदपादशाहीच्या तत्वांत फरक कसकसा होत गेला व तात्विक दृष्टीनें ती केव्हां बुडाली.—४. छत्रपतीकडून त्यांची सत्ता पेशव्यांनीं आपल्या हातीं घेतल्यामुळें पेशव्यांच्या राज्यास कसें विपरीत वळण लागलें —५. शिवाजीमहाराजांच्या आरमाराविषयींची माहिती.—६. शिवाजीमहाराजांच्या आरमारावरील लहान मोठे सरदार.—७ कान्होजी आंग्र्यांचा उदय कसा झाला.—८. सेखोजी आंग्रे यांच्यासंबंधींची माहिती.—९. संभाजी आंग्रे व मानाजी आंग्रे यांमधील गृहकलहास सुरवात.—१०. तुळाजी आंग्रे यांचा पराक्रम.—११. पेशवे व आंग्रे यांचें वैमनस्य.—१२. तुळाजी आंग्र्याचा मोड करण्याकरता नानासाहेब पेशवे इंग्रजांची मदत घेतात. या बाबतींत उभयतांच्या झालेल्या तहाचीं कलमें.—१३ तुळाजी आंग्र्यांच्या पारिपत्याची पूर्वतयारी.—१४. तुळाजी आंग्र्यांच्या सुवर्णदुर्गाचा पाडाव.—१५. विजयदुर्गचा किल्ला पडला. तुळाजी आंग्र्याचा पराभव.—१६. तुळाजींस पेशव्यांनीं नैदेंत ठेवलें. तुळाजींच्या पारिपत्यानंतर इंग्रज व पेशवे यांचेमधील वांटणीचा तह.—१७ तुळाजीचें पारिपत्य करण्यांत राजकारणाच्या दृष्टीनें पेशव्यांनीं केलेल्या अक्षम्य चुका.—१८. मराठ्यांचें राज्य नाश पावलें जाण्यास नानासाहेब पेशव्यांनीं केलेल्या चुकीपासून सुरवात झाली —१९ तुळाजी आंग्र्यांच्या नाशामुळें पेशव्यांवर इंग्रजांचा चढेलपणा सुरू झाला.—२० पेशवे व सिद्दी यांचें युद्ध.—२१. मराठी राज्याच्या नाशाचें बीज नानासाहेब पेशव्यांच्या राजकारणांतून कसें उत्पन्न झालें.

१. ज्या कार्याकरतां एकादी इमारत उभारावयाची असेल त्या कार्याच्या उपयुक्ततेला सोईस्कर होईल अशी ती इमारत प्रथमारंभापासूनच बांधावी लागते. त्या इमारतीला कसकशा खोल्या येणार, त्याच्या भिंती कोठें कोठें उभारल्या जाणार, इमारतीच्या कोणकोणत्या भागावर किती प्रमाणांत बोजा

येणार, कोणकोणत्या ठिकाणीं ती इमारत किती किती उंच जाणार, किंवा कोण कोणत्या बाजूला संरक्षणाच्या दृष्टीनें जास्त मजबुती करावी लागणार, पावसाचा मारा इमारतीवर कोणत्या दिशेनें होणार, चोरांची भीति कोणत्या बाजूला असणार, अग्नीची भीति कोणत्या भागाला राहणार, वगैरे वगैरे, सर्व बाजूंनीं विचार करूनच इमारत बांधणारा मालक पाया खणतो, तो भरून घेतो व त्यावर आपल्या विचाराप्रमाणें इमारत उभारतो. जें तत्व एकाद्या सामान्य इमारतीला लागू असतें, तेंच तत्व राज्यस्थापनेंतही निगडित झालेलें असतें. सृष्टिनिर्मितीचीं तत्वें अगर सिद्धांत सृष्टीवरील कोणत्याही घडामोडीशीं तत्वत: अबाधितच असतात. रचलेल्या पायावरच जर इमारत उभारली गेली तरच ती टिकाऊ होते. पाया सोडून जर भिंती बांधल्या, तर इमारत खचते. इमारतीचा तोल जर पायावर काटकोनांत असेल, तरच ती इमारत राहूं शकतें. तिचा तोल जर बेतोल आला तर ती इमारत स्वत: तर कोसळतेच पण आपणा शेजारीं उभ्या असलेल्या लहान मोठ्या इमारतीही आपल्याबरोबर पाडून टाकते.

२. राज्यस्थापनेचेंही तत्व असेंच आहे. ज्या तत्वावर राज्यस्थापना झाली असेल, त्याच तत्वावर तिची जोंपर्यंत उभारणी होत आहे, अगर राज्याचें परिपालन चाललें आहे, तोंपर्यंतच त्याचें अस्तित्व राहतें. तें तत्व सोडलें ह्मणजे त्याचा नाश होतो. मोंगलराज्याचा आद्यसंस्थापक बाबर यानें स्वत:च्या मालकीचें स्वसंपादित राज्य आपणाला पाहिजे. ह्मणून दिल्लीला मोंगली राज्याची संस्थापना केली. त्यावेळीं इस्लामीधर्माच्या वाढीकरतां ह्मणून या राज्याचा पाया घातलेला नव्हता. औरंगझेब बादशहापर्यंत या मोंगलीराज्याचा हेतु मोंगल राजाचें राज्य एवढाच होता. तोपर्यंत बाबरनें उभारलेलें राज्य आपला तोल धरून होतें. औरंगझेब बादशहानें या मोंगली राज्याचा तोल इस्लामी धर्माची वाढ करण्याच्या उद्देशाकडे वळविला. त्यामुळें मूळ तत्वांत फरक पडून मोंगली राज्याचा तोल दिवसेंदिवस जाऊं लागला. संस्थापनेच्या वेळेच्या तत्वांत फरक पडल्यामुळें व त्याला निराळेंच वळण लागल्यामुळें मोंगली राज्याची इमारत ढांसळली.

३. इस्लामी धर्माच्या जबरदस्तीनें होणाऱ्या वाढीला हिंदुधर्मांतील लोकांत प्रतिक्रिया उत्पन्न झाली. गोब्राम्हणप्रतिपालकत्वाच्या तत्वावर छत्रपती शिवाजी महाराज यांनीं हिंदुपदपादशाही स्थापन केली. पुढें औरंगजेब बादशहाच्या मरणानंतर हिंदुधर्मावरील इस्लामीधर्माचे आघात कमी होतांच गोब्राम्हणप्रतिपालकत्वाचें तत्व बाजूला राहून व्यक्तिगत मालकीहक्काचें स्वरूप हिंदुपदपादशाहीला प्राप्त झालें. या बाबतीतही मूळ तत्वाला सोडून वागल्यामुळें त्याचा शेवटीं तोल गेला व तेंही राज्य बुडालें. इ. स. १७५० मध्यें सांगोल्याच्या तहामुळें श्रीशिवाजीमहाराजांनीं स्थापन केलेली हिंदुपदपादशाही बुडाली असें जें मागें म्हटलें आहे तें याच तत्वावर म्हटलें आहे.

४. हिंदुपदपादशाहीच्या उभारणीचें तत्व अगर तिचें निदान प्रतिबिंब जोंपर्यंत छत्रपती या व्यक्तींत दिसत होतें, तोंपर्यंत तिचा गाडा सुरळीत चालूं शकला. परंतु ज्यावेळीं ते अधिकारभ्रष्ट झाले व पेशवे मालकीहक्कानें पुढें आले, त्यावेळीं मूळ तत्व लोप पावलें व व्यक्तिविषयक स्वार्थाच्या तत्वाचा उपक्रम सुरू झाला. त्यामुळें पूर्वतत्वावरील राज्याच्या इमारतीचा तोल जाऊं लागला. इमारत ज्यावेळीं एका बाजूला तोल जाऊन कलंडूं लागते, त्यावेळीं ज्या भारानें ती इमारत कलंडत असेल तो भार इमारतीवरून खालीं जमिनीवर उतरविला पाहिजे. तसें न केलें तर दिवसेंदिवस ती इमारत जास्त जास्तच कलंडूं लागते. एका बाजूच्या भिंती व खांब इमारतीपासून आपोआप सुटूं लागतात. त्या डोक्यावर पडूं नयेत म्हणून पाडून टाकाव्या लागतात. अशा योगानें थोड्याच दिवसांत सर्व इमारत कोसळून खालीं पडते. असाच प्रकार तत्व सुटलेल्या राज्याच्या इमारतीचा होतो. नानासाहेब पेशव्यांनीं हिंदुपदपादशाहीचें तत्व उल्लंघून छत्रपतींची सत्ता आपल्या हातीं घेतली. त्यामुळें त्या राज्याचे आधारस्तंभ कसे कसे विलग झाले व ते राज्यकर्त्याला आपल्या हातानेंच कसे तोडून टाकावे लागले, हें पेशवे आणि आंग्रे यांच्या आरमारी युद्धावरून समजून येणार आहे.

५. श्रीछत्रपती शिवाजीमहाराज हे अवतारी पुरुष होते असें जें समजलें जातें व त्याचीं कारणें सांगतांना जीं निरनिराळीं दाखलेवजा उदाहरणें दिलीं जातात, त्यांत, हिंदुपदपादशाहीची सीमामर्यादा जो हिंदुस्थानचा पश्चिम-किनारा त्याच्या रक्षणाची तरतूद त्यांनी जी दूरदर्शीपणानें केली त्याचाही समावेश होतो. मराठी राज्यांत घुसण्याच्या चोरवाटा पश्चिम किनाऱ्यानेंच होणार हें भविष्य शिवाजीमहाराज जाणून होते, म्हणून त्यानीं आपलें बरेंच सामर्थ्य, बुद्धि आणि पैसा याच किनाऱ्याच्या मजबुतीकरतां खर्च केला होता. '[1]श्रीशिवाजीमहाराजांस राज्यसंस्थापनेच्या कामीं हेटकरी व मावळे यांनीं ज्याप्रमाणें खुष्कीवरील मुल्ख काबीज करण्यामध्यें मदत केलेली होती, त्याचप्रमाणें आरमार खात्यावरील दर्यासारंग व मायनाक भंडारी ह्या शूर वीरांनींही दर्या—युद्धामध्यें बरीच मदत केलेली होती. खुष्कीचे मुलूख व त्यांचें संरक्षण ज्याप्रमाणें महाराजांनीं निरनिराळ्या ठिकाणीं मोक्याच्या जागा पाहून किल्ले बांधून केलें, त्याचप्रमाणें समुद्र-कांठच्या मुलखाचें संरक्षण आरमारामार्फत केलें. त्यांनीं पश्चिम समुद्रामध्यें कच्छच्या बंदरापासून तों कालिकतपर्यंत सर्व समुद्रकिनारा आपल्या ताब्यांत ठेविला होता; व त्याचें संरक्षण पूर्ण जोमानें केलें होतें. खुष्कीच्या लढायांमध्यें ज्याप्रमाणे मराठावीरांनीं मोठमोठीं पराक्रमाचीं व अभिमानास्पद अशीं रणधुरं-धरत्वाचीं कामें केलीं, त्याचप्रमाणें त्यांनीं दर्यावर्दीपणाच्या कौशल्यानें समुद्रा-मध्येंही चांगलेंच शौर्य व्यक्त केलें. त्यावेळीं समुद्राकडील वर्चस्वाची मराठ्यांस किती तरी जरूरी होती. हबशी, इंग्रज, फिरंगी, फरांसीस वगैरे परकी राष्ट्रांचा हिंदुस्थानांत प्रवेश न होऊं देण्याबद्दल त्यांस डोळ्यांत तेल घालून जपावें लागत होतें, त्यांची सत्ता समूळ उखडून टाकण्यासंबंधानें ते प्रतिरोध करीत होते व हें प्रतिरोध करण्याचें काम मुख्यतः आरमाराकडूनच होत असे; ह्मणूनच महाराजांनीं आपल्या कारकीर्दीमध्यें आरमाराची जय्यत तयारी ठेविली होती. ही आरमाराची तयारी महाराजांनीं केव्हांपासून केली होती

---

१ मराठा कुळांचा इतिहास पान, ७३.

याचा नीटसा शोध लागत नाहीं; परंतु देशावरील बराच भाग काबीज केल्यानंतर महाराजांनीं कोंकणपट्टीकडे मोर्चा वळविला. त्यावेळीं विजापूरचा बादशहा कमजोर झाल्यामुळें जंजिऱ्याचे सिद्दी, वाडीचे सावंत, जव्हारचे कोळी व इंग्रज, फिरंगी, फरांसीस यांनीं बंदरकांठचीं एक एक बंदरें घेण्याचा उपक्रम सुरू केला. विजापुराकडून जंजिऱ्याच्या सिद्याला जरी नागोठण्यापासून बाणकोटपर्यंत जहागीर म्हणून मुलूख मिळाला होता, तरी सुद्धां तो आपली सत्ता वाढविण्याकरतां दुसरीं बंदरें काबीज करूं लागला. या सिद्याकडून हिंदु लोकांना फार त्रास होत असे. या त्रासापासून हिंदुंना सोडवावें म्हणून शिवाजीमहाराजांनीं कोंकणपट्टी हस्तगत करण्याचा प्रयत्न चालविला, व आपलें स्वतंत्र आरमार त्यांनीं उभारलें. या आरमारानें सिद्दी, इंग्रज, फिरंगी यांच्यावर दात्र बसला आणि दिवसें दिवस समुद्रावरील महाराजांची सत्ता वाढूं लागली. हें आरमार इ. स. १६६१ मध्यें उभारलें गेलें. सावंतवाडीकरांचे रामदळवी व तानसावंत हे दर्यावर्दी सरदार शिवाजीमहाराजांना येऊन मिळाले. त्यांना महाराजांनीं हशमांचे सुभेदार केलें. सावंतांचा मुख्य खेमसावंत हा महाराजांना शरण आल्यानें त्यांनीं त्याला कुडाळ प्रांताची देशमुखी दिली. अशा प्रकारें अनुकूल परिस्थिति प्राप्त होतांच महाराजांनीं कुलाबा, सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग या किल्ल्यांची सुधारणा करून त्या ठिकाणीं आरमाराची जागा केली. सिंधुदुर्ग हा नवीन किल्ला बांधून त्या ठिकाणीं आरमाराचें मुख्य ठाणें केलें. महाराजांच्या कारकीर्दीत " पाणियांतील तरांडीं जहाजें सुमारें—३० थोर गुराब, १०० गलबतें, १५० महागिऱ्या, ५० लहान गुराब, १० होडिया, १५० लहान होडिया, ६० तारवें, २५ माल, १५ जूग, ५० मचवे, अशीं जहाजें होतीं[1] "

६. या आरमाराचे दर्यासागर इब्राहिमखान व मायनाक भंडारी हे होते. त्याशिवाय नेताजी पालकर, मोरोपंत पिंगळे, आण्णाजी दत्तो, राम दळवी

---

1. चित्र गुप्ताची बखर.

तानाजी सावंत, रघुनाथ बल्लाळ हे सरदारही आरमारावर लहानमोठे अधिकारी होते.

७. शिवाजीमहाराजांनीं बहुतेक कोंकणपट्टी हस्तगत केली होती. परंतु जंजिऱ्याचा सिद्दी मात्र कमजोर झाला नव्हता. महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजी-महाराजांनीं त्याला जिंकण्याचा बेत केला. यावेळीं त्यांनीं दादजी रघुनाथ देशपांडे यांच्याकडे आरमाराचें आधिपत्य देऊन त्यास जंजिऱ्यावर रवाना केलें, व आपण स्वतः भरपूर सैन्य घेऊन तिकडे गेले. ह्या स्वारीमध्यें सिद्दी मिस्री, दौलतखान, मायनाक भंडारी, संताजी पवळा, गोविंदजी जाधव, गोविंद कान्हो वगैरे आरमारी सरदार होते. त्यांनीं लढण्याची पराकाष्ठा केली, पण त्यांना यश संपादितां आलें नाहीं. नंतर राजाराममहाराजांच्या कारकीर्दीत मराठ्यांचें आरमार वृद्धिंगत झालें. राजारामाची कारकीर्द ह्मणजे मराठ्यांच्या पराक्रमाची, स्वामी-निष्ठेची आणि अद्वितीय धैर्याची एक परीक्षाच होती. खुष्कीवरील लढायांमध्यें ज्याप्रमाणें धनाजी जाधव, संताजी घोरपडे वगैरे सरदारांनीं आपल्या शौर्याची कमाल केली, त्याचप्रमाणें दर्यावर्दी युद्धामध्यें कान्होजी आंग्रे यांनीं आपलें आरमारी बळ प्रकट केलें. कान्होजी आंग्रे हा शिवाजीमहाराजांच्या वेळीं प्रसिद्धीस आलेल्या तुकोजी आंग्र्यांचा पुत्र होता. कान्होजी हा संभाजीमहा-राजांच्या वेळीं आरमाराचे सुभेदार सिधोजी गुजर यांच्या हाताखालीं दुय्यम सुभेदार होता. त्यानें इंग्रज, वलंदे व फिरंगी यांची सत्ता उखडून टाकण्याचा जो अवर्णनीय प्रयत्न केला, त्याबद्दल राजाराम महाराजांनीं त्याला आरमारावरील सेनापती केलें, व त्याला सरखेल असा किताब दिला. या कान्होजी आंग्रयानें आपल्या अमदानींत आपल्या आरमाराची सुधारणा केली व तें खंबीर असें बनविलें. त्याच्या आरमारामुळें सर्व शत्रूंस त्याची भीति वाटूं लागली. इंग्रज लोक तर त्याला दुसरा शिवाजीच असें ह्मणत असत. शिवाजीमहाराजांच्या वेळेपासून जो जंजिऱ्याचा सिद्दी शिरजोर होऊन बसला होता व ज्याला संभाजीमहारा-जांच्या कारकीर्दीतही जिंकतां आलें नाहीं, त्याला या कान्होजी आंग्रयानें अगदीं जर्जर करून सोडलें. यानें परकीय राष्ट्रांतील लोकांबरोबर समुद्रांत

अनेक युद्धें केलीं व त्यांचीं अनेक जहाजें पाडाव करून आणली. हा कान्होजी आंग्रे इ. स. १७२९ मध्यें मृत्यु पावला.

८. कान्होजी आंग्र्याला सेखोजी व संभाजी असे दोन औरस पुत्र होते, व मानाजी, तुळाजी, धोंडुजी आणि येसाजी असे राखेचे चार मुलगे होते. कान्होजीनंतर सेखोजी हा अधिकारारूढ झाला. त्याला शाहुमहाराजांनीं सरदारकीचीं वस्त्रें दिलीं. यानंतर आंग्र्यांच्या घरांत कलह उत्पन्न झाला. परंतु सेखोजी हा मोठा दिलदार माणूस असल्यामुळें, गृहकलहाला जास्त वाव मिळाला नाहीं. सेखोजीनें आपल्या कारकीर्दीत जंजिऱ्याच्या शिद्याला मारून त्याची सत्ता संपुष्टांत आणिली. हा इ. स. १७३३ मध्यें कालवश झाला.

९. सेखोजीनंतर त्याचा भाऊ संभाजी हा आंग्र्यांच्या सरदारीचा अधिपति झाला. त्यानें गृहकलहाला वाव मिळूं नये ह्मणून मानाजीस कुलाब्याच्या आरमाराचें काम सांगितलें; पण त्यानें मानाजी तृप्त झाला नाहीं. त्यानें पेशवे व शाहुमहाराज यांच्याकडे संधान बांधून सरखेलचीं वस्त्रें मिळविलीं. त्यामुळें आंग्रे-घराण्यांत कलहाग्नीनें पेट घेतला व भाऊबंदी लढाया सुरू झाल्या. शेवटीं इ. स. १७३५ मध्यें बाजीराव पेशवे यांनीं संभाजीस सरखेल हा किताब व सुवर्णदुर्ग हा किल्ला आणि मानाजीस वजारतमाब हा किताब व कुलाबा हा किल्ला देऊन दोघांसही खूष करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. शेवटीं या उभयतांच्या कलहामुळें मराठी राज्याचें नुकसान होऊं नये ह्मणून पेशव्यांनीं स्वतंत्र आरमार ठेविलें व आंग्र्यांच्या मुलूख काबीज करण्याचा क्रम चालविला.

१०. संभाजी हा कमी शूर नव्हता. त्यानें आपल्या आरमाराच्या जोरावर दाभोळ व सावंतवाडी ह्या प्रांतावर आपली सत्ता प्रस्थापित केली. हा इ. स. १७४२ मध्यें मरण पावला. त्याच्या मागून मानाजीचा भाऊ तुळाजी हा अधिपती झाला. तुळाजी आंग्रे हा धाडसी, शूर व पराक्रमी सरदार होता. त्याच्या हाताखाली अनेक कुशल युरोपियन नोकर तोफखान्यावर व आरमारांत

१ मराठा कुळांचा इतिहास दळवीकृत पान ७५.

कामें करीत होते. शस्त्रास्त्रें, दारूगोळा व सैन्य या बाबतींत सुद्धां त्याची जय्यत तयारी होती. आपल्या अजिंक्य आरमाराच्या जोरावर इंग्रज, पोर्तुगीज, सिद्दी, झामोरीन वगैरे सर्व आरमारी सत्ताधीशांस तो धाकांत ठेवीत असे. सुरतेपासून तों कोचीनपर्यंतच्या पश्चिम किनाऱ्यावर त्याच्या आरमाराचा संचार असे. त्याचा दरारा इतका होता कीं, कोणतेंही परकी जहाज त्याच्या तडाक्यांत आल्यास, त्यास सुटण्याची आशा नसे. अशा प्रबळ माणसाचा इंग्रज, सिद्दी, वगैरेंनीं द्वेष करावा हें सहाजिक होतें.

११. हिंदुपदपादशाहीचें पश्चिमेच्या बाजूनें संरक्षण करण्यास आंग्र्या-इतका अनुभवी व पराक्रमी सरदार दुसरा कोणी नव्हता. आंग्रे-घराण्याशी पेशव्यांचे बाळाजी विश्वनाथ यांच्यापासून बरें नव्हतें; परंतु पेशवे व आंग्रे यांच्यामध्यें छत्रपती ही अजब सत्ताधारी शक्ति असल्यामुळें पेशवे अगर आंग्रे परस्परांमध्यें कोणीच कोणाचे कांहीं वाईट करूं शकले नाहींत. आंग्रे हे पेशव्यांना आपल्याप्रमाणेंच हिंदुपदपादशाहीचे एक नोकर ह्मणून लेखीत होते. पुढें नानासाहेब पेशव्यांनी छत्रपतींची सत्ता व मत्ता आपल्या हातीं घेतली, त्याचप्रमाणें तुळाजी आंग्रे हे पेशव्यांचे नोकर ह्मणून त्यांच्या सत्तेखालीं आले पाहिजे होते. परंतु तुळाजी आंग्रे या गोष्टीला तयार झाले नाहींत. त्यांच्या-वरील छत्रपतींचें छत्र बाजूला झाल्यामुळें ते आपणाला स्वतंत्र मानूं लागले. त्यांनीं पेशव्यांचा अधिकार झुगारून दिला, त्यामुळें पेशव्यांचें व आंग्र्यांचें विशेष वैमनस्य पडलें.

१२. आंग्र्यांचे शत्रू जे इंग्रज त्यांना ही गोष्ट हितावह झाली. आंग्र्यांचें एकट्यानें पारिपत्य करणें इंग्रजांना अशक्य होतें. ते मराठाशाहींतील आपसां-तील दुहीची वाटच पहात होते. पेशवेही आंग्र्यांच्या पारिपत्याकरतां इंग्रजांच्या सहाय्याची मार्गप्रतीक्षा करीत होते. पेशव्यांचा सरसुभेदार रामाजी महादेव बिवलकर या नांवाचा गृहस्थ कल्याणास रहात होता. नानासाहेब पेशव्यांचा हा अत्यंत विश्वासाचा इसम होता व त्यानें बरींच वर्षें कोंकणांतील सरसुभेदारीचें काम केल्यामुळें, त्याची इंग्रजांबरोबरही विशेष घसट असे. त्यामुळें इंग्रजांनीं

रामाजीमार्फत आंग्र्यांच्या पारिपत्यासंबंधीं पेशव्यांकडे भाषा चालविली. रामाजीनें तुळाजीचा भाऊ मानाजी याला आपलासा करून घेतला व त्याला खर्चाकरतां सालिना चाळीस हजार रुपये देण्याचें कबूल केलें. नंतर पेशवे व इंग्रज यांच्यामध्यें तुळाजी आंग्र्यांचा पराभव करण्याबद्दल रामाजी यांचेमार्फत तह ठरला. त्यांतील अटी खालीं दिल्याप्रमाणें होत्या:—

१. उभयतांचें आरमार इंग्रजांच्या ताब्यांत असावें. परंतु कारभार उभयतांच्या संमतीनें व्हावा.

२. तुळाजी आंग्र्यांकडून जीं जहाजें काबीज करण्यांत येतील तीं इंग्रजांनीं व मराठ्यांनीं निम्मेनिम वांटून घ्यावीं.

३. बाणकोट, हिंमतगड, व सावित्री नदीच्या दक्षिण तीरावरील पांच गांवें मराठ्यांनीं इंग्रजांस कायमचीं द्यावीं.

४. पश्चिम किनाऱ्यावरून आंग्र्यांची कोणत्याही किल्ल्यास समुद्रांतून मदत न जाईल असा बंदोबस्त इंग्रजांनीं ठेवावा.

५. आंग्र्याच्या मुलखांतील किल्ल्यांत जें द्रव्य, सामान, दारूगोळा, तोफा वगैरे सांपडेल तें सर्व मराठ्यांस देण्यांत यावें.

६. मानाजीच्या मुलखावर उभयतांनीं हल्ला केल्यास खांदेरी बेट व कित्येक गांवें इंग्रजांस द्यावीं.

७. जरूरी प्रमाणें जास्त कलमें नानासाहेबांच्या संमतीनें ठरविण्यांत यावीं.

१३. या संबंधानें पेशवे व मुंबईचा गव्हर्नर रिचर्ड बूर्शीयेर यांजमध्यें दोन तीन वर्षे पत्रव्यवहार चालला होता. इंग्रजांकडून शिवाजी रणछोड ह्मणून एक गृहस्थ पेशव्यांकडे येत असे. इ. स. १७५५ च्या आरंभीं नानासाहेबांनीं बूर्शीयेरला मद्रासचें आरमारही मुंबईस आणून ठेवावें असें सांगितलें. इंग्रजांनीं दर्यावरील सर्व व्यवस्था आपल्या ताब्यांतच राहिली पाहिजे असा आग्रह धरला होता. कराराप्रमाणें प्रथम सुवर्णदुर्ग ऊर्फ हर्णैचा किल्ला यावर स्वारी करावयाची होती. इंग्रजांनीं समुद्रांतून वेढा घालावा व मराठ्यांनीं जमिनीवरून त्यांजवर

१ सरदेसाई कृत नानासाहेब पेशव्यांचें चरित्र पा. १४९ ते १५४.

हल्ला करावा असें ठरलें. या ठरावाप्रमाणें आरमाराधिपती वुईल्यम जेम्स यास इंग्रजांनीं सुवर्णदुर्ग किल्ल्यावर हल्ला करण्याचा हुकूम केला. पेशव्यांच्या आरमाराचा मुख्य नानापंत ह्मणून इसम होता. स्वारीबरोबर रामाजीपंतही होता. खुष्कीच्या मार्गानें मराठ्यांची फौज समशेरबहाद्दराच्या हाताखालीं तिकडे पाठविण्यांत आली.

१४. इंग्रजांचें आरमार तारीख २२ मार्च सन १७५५ रोजीं मुंबईहून निघालें तें दुसऱ्या दिवशीं राजपुरीजवळ आलें. त्या ठिकाणीं त्यास तुळाजीचीं अठरा जहाजें दिसलीं. त्यांचा त्यांनीं पाठलाग करून त्यांस पिटून लाविलें. मागाहून पेशव्यांचें आरमारही इंग्रजांस येऊन मिळालें. वाटेंत श्रीवर्धन वगैरे ठिकाणा मुक्काम करीत दोनही आरमारें सुवर्णदुर्गास आलीं. सुवर्णदुर्गावर २९ मार्चला तोफांची सरबत्ती सुरू झाली. तेव्हां आंग्र्यांचें आरमार जयगडास पळून गेलें. सुवर्णदुर्गावर मारा करण्यांत पेशव्यांच्या जहाजांनीं मुळींच मदत न करतां तीं मजा पहात राहिलीं, अशी पुढें इंग्रज अधिकाऱ्यांनीं तक्रार केली. इंग्रजांनी एकट्यानेंच हल्ला सुरू ठेविला. तारीख ३ एप्रिल रोजीं तोफेचा गोळा लागून किल्ल्यांतील दारूखाना उडाला, तेव्हां तेथील लोक सैरावैरां पळूं लागले. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं तहाचें बोलणें सुरू केलें, व किल्ला सोडून जाण्याच्या अटीवर त्यांस जाऊं देण्यांत आलें. यानंतर रामाजीपतानें तुळाजीचे इतरही किल्ले हस्तगत केले व रत्नागिरीस वेढा घातला. परंतु पावसाळा आल्यामुळें मोहीम तहकूब होऊन विजयदुर्गाचा पाडाव पुढील वर्षावर गेला.

१५. पुढें सन १७५६ च्या फेब्रुवारींत विजयदुर्गावर स्वारी झाली. या वेळीं अॅडमिरल वॉटसन् व कर्नल क्लाइव यांच्या हाताखालीं मद्रासचें आरमार मुंबईकरांच्या मदतीस आलें होतें. हें आरमार फ्रेंचांचा मोड करण्यासाठीं मुद्दाम इंग्लंडहून नुकतेंच आलें होतें; पण इकडे आल्यावर मद्रासेस इंग्रज–फ्रेंचांचा तह झाल्याची वार्ता त्यास समजली, तेव्हां रिकामें बसण्यापेक्षां कोठें कांहीं फायद्याची कामगिरी क्लाइव शोधीत होता.

त्याचेकडे ही विजयदुर्गाची मोहीम आयतीच चालून आली. नोव्हेंबरपासून पेशव्यांच्या फौजेनें खंडोजी माणकराचे हाताखालीं आंग्रयांचे मुलखांत शिरून विजयदुर्ग किल्याभोवतालचा बहुतेक प्रदेश काबीज केला होता. हें दुहेरी संकट पाहून तुळाजी आंग्रयाने आपल्या बचावासाठीं रामाजीपंताकडे समेटाचें बोलणें सुरू केलें. पण गोडी झाली तर तुळाजी आपल्या हातीं लागणार नाहीं, व पुनः त्याचा त्रास कायम राहील अशी दहशत इंग्रजांस होती. कोणीकडून तरी तुळाजीचा काटा कायमचा निघावा अशी इंग्रजांची इच्छा होती. त्यामुळें रामाजीपंताने तुळाजीशीं परभारें बोलणे चालविललें पाहून करार मोडल्याचे निमित्त करून इंग्रजांनीं विजयदुर्गावर स्वतःच एकदम हल्ला केला. इंग्रजांचा एक गोळा आंग्रयांच्या आरमारांत पडून त्यास आग लागली, त्याबरोबर आंग्रयांचीं सर्व लढाऊ जहाजें जळून खाक झालीं. तारीख १३ फेब्रुवारी रोजी इंग्रजाचे लोक कॅप्टन फोर्डच्या हाताखालीं किल्यांत शिरले. किल्यातील पैसा पेशव्याच्या हातीं लागूं नये म्हणून इंग्रजांनीं आपली एक तुकडी मराठ्यांस किल्यात शिरताना प्रतिबंध करण्यासाठीं ठेंवली व आंतील सर्व लूट ताब्यात घेतली. त्यावेळीं तुळाजीने किल्यांत अंधार कोठडींत ठेंवेलेले आठ इंग्रज, दोन स्कॉच आणि तीन डच गृहस्थ इंग्रजास सांपडले. यावेळीं आंग्र्यानें पुन्हां डोकें वर काढूं नये अशी शक्य ती तजवीज इंग्रजांनीं केली. तुळाजी मात्र इंग्रजांच्या हातीं लागला नाहीं. तो जाऊन खंडोजी माणकराच्या स्वाधीन झाला. विजयदुर्ग किल्ला पाहून त्याचा इंग्रजांस लोभ सुटला. बाणकोटच्या ऐवजीं हाच आमच्याकडे राहूं द्या असे नवीन बोलणें त्यांनीं सुरू केलें. परंतु पेशव्यांनीं तें मुळींच मान्य केले नाहीं. नानासाहेबांनीं सहा महिने झाले तरी इंग्रज किल्ला सोडीत नाहींत असें पाहून त्यांना एक खरमरीत पत्र पाठवून इंग्रजांस तंबी दिली. त्यावर गव्हर्नरांकडून नरमाईचा जबाब पेशव्यांस गेला. त्यांत पावसाळा संपल्यावर आपले लोक परत मुंबईस बोलावूं व किल्ला सोडून देऊं असें अभिवचन होतें.

१६. सावनूरच्या स्वारींतून परत आल्यावर पेशव्यांनीं इंग्रजांस पत्र लिहून अनेक भानगडींच्या निकालासाठीं त्यांचा वकील पुण्यास बोलाविला. सदाशिवरावांच्या मनांत पोर्तुगीजांवर स्वारी करून त्यांचा गोंव्यासुद्धां सर्व प्रदेश काबीज करण्याचें फार होतें. त्यावरून पोर्तुगीजांनीं फोंडें येथील मराठ्यांच्या ठाण्यावर हल्ला केला. पण तेथें पोर्तुगीजांची धांदल उडून त्यांचा व्हॉइसराय मरण पावला. यावेळीं मराठे एकदम चालून जाते तर पोर्तुगीजांचा समूळ नाश झाला असता. परंतु दुसऱ्या भानगडीमुळें गोंव्यावर जाण्यास सदाशिवरावांस त्यावेळीं फावलें नाहीं. इंग्रजांचे वकील पुण्यास आले, तेव्हां पेशव्यांनीं निजामाच्या राज्यांतून बुसीस हांकून देण्यासाठीं इंग्रजांची मदत मागितली. परंतु अशीच मागणी सलाबत-जंगानें मद्रासकर इंग्रजांकडे केली आहे, म्हणून या गोष्टीचा जबाब आतांच देतां येत नाहीं, असें वकीलांनीं पेशव्यास सांगितलें. वास्तविक यावेळीं इंग्रजांची कलकत्त्यास फारच धांदल उडालेली होती व कोणासच मदत करण्याचें इंग्रजांस सामर्थ्य नव्हतें. अखेरीस बोलाचाली होऊन तारीख १२ आक्टोबर १७५६ रोजीं अठरा कलमांचा लेखी ठराव उभयतांत झाला. एक महिन्याच्या आंत इंग्रजांनीं विजयदुर्ग सोडून द्यावा, बाणकोट वगैरे दहा गांव पेशव्यांनीं इंग्रजांच्या हवालीं करावे, पेशव्यांनीं मागील कांहीं एक बाबतीबद्दल इंग्रजांकडे मागणी करूं नये, तुळाजी आंग्र्यांस घाटाचे-खालीं मुलुख वगैरे कांहीं देऊं नये, वगैरे कलमें या तहांत ठरलीं. तुळाजीस पेशव्यांनीं सहकुटुंब कैदेंत ठेवलें.

१७. तुळाजी आंग्रे याचें नाव मराठ्यांच्या इतिहासांत चिरस्मरणीय झालें आहे. त्याच्यासारखे धाडसी व करारी पुरुष विरळा निपजतात. त्यानें आपल्या हयातींत इंग्रजांना सारखें थरकांपांत ठेविलें. त्याचा कांटा काढून टाकणें एकट्या इंग्रजांस शक्य नव्हतें. तुळाजीसारखा पराक्रमी मोहरा नानासाहेबांसारख्या मनुष्यस्वभाव जाणणाऱ्या पुरुषानें फुकट घालविला आणि सत्कार्यांत त्याचा उपयोग करून घेतला नाहीं, ही गोष्ट

पेशव्यांच्या कीर्तीस काळिमा लावते. एकवार तरी तुळाजीची स्वतः भेट घेऊन त्याचें हृद्गत समजून घेणें हें मराठेशाहीचा सर्वाधिकार चालविणाऱ्या पेशव्यांचें कर्तव्य होतें. तुळाजी उद्दाम असेल, पेशव्यांचा अधिकार मानीत नसेल, चित्पावन ब्राम्हणांचा त्यानें अतोनात छळही केला असेल, वगैरे सर्व गोष्टी खऱ्या मानूनही, पेशव्यांच्या वर्तनाचें समर्थन करतां येणार नाहीं. प्रतिनिधि, दमाजी, रघूजी वगैरे व्यक्तींशी ज्या तऱ्हेने वागून पेशव्यांनीं त्यांचा समूळ नाश न करतां त्यास राष्ट्रकार्यांत गोंवून घेतलें, तशी गोष्ट तुळाजीच्या बाबतींत करतां आली नसती, असें वाटत नाहीं. ज्यावेळीं तुळाजीवर खुष्कीच्या मार्गानें पेशवे व समुद्रांतून इंग्रज येऊन दुहेरी संकटांत तो सापडला व त्यानें रामाजीपंताकडे समेटाचें बोलणें लाविलें, तीच वेळ पेशव्यांस तुळाजीला राष्ट्रकार्यांत आपलासा करून घेण्यास योग्य अशी होती त्यावेळीं इंग्रजास थोडें नाराज करण्याचें पाप जरी पेशव्यांच्या माथीं आलें असतें, तरी तें मराठशाही बुडवूं न देण्याच्या तत्वापुढें विशेष महत्वाचें खात्रीनें ठरलें नसतें. त्यावेळीं पेशव्यांनीं ज्याअर्थीं विशेष उचल खाल्ली नाहीं, व इंग्रजांस आपला मार्ग स्वीकारूं दिला, त्याअर्थीं पेशव्यांनीं मराठशाहीच्या तत्वापेक्षां व्यक्तिविषयक शत्रुत्वाकडे विशेष लक्ष दिलें एवढाच निष्कर्ष त्यांतून निघतो. पेशव्यांना तुळाजीचा कांटा काढावयाचा होता व तो काढण्याचा त्यांनीं प्रयत्न केला यांत कोणतीच वावगी गोष्ट नाहीं. तो मनुष्यस्वभाव आहे परंतु एक कांटा काढण्याच्या प्रयत्नात दुसरा मोठा इंग्रजाचा खिळा पेशव्यानी कायमचा ठोकून घेतला हें पेशव्याच्या मुत्सद्देगिरीचें किंवा शहाणपणाचें कृत्य नव्हतें खास ! त्यांत फक्त सूडाची कृति मात्र दिसून येते. मनुष्याची केवळ सूडाकडे प्रवृत्ति झाली ह्मणजे तो तत्व, राजकारण, सदसद्विवेकबुद्धि यांपासून बेतोल होत जातो. तशीच पेशव्याची तुळाजीच्या बाबतींत कृति घडली असें मोठ्या दुःखानें ह्मणावें लागतें.

१८. पाश्चात्यांना आरमारी युद्धांत तोंड देऊन झगडणारे प्रथम कान्होजी, व पुढे तुळाजी हे दोनच पुरुष हिंदुस्थानांत निर्माण झाले.

अशा तुळाजीचा नाश इंग्रजांशीं मित्रत्व करून नानासाहेब पेशव्यांनीं केला, हें मराठशाहीचें कधीं न भरून येणारें नुकसान व पुढें मराठशाही बुडविण्याचें बीजारोपण नानासाहेबांनीं आपल्या हातांनीं केलें असे कोणीही दूरदर्शी म्हणेल यांत संशय नाहीं. श्रीशिवाजी महाराजांनीं हिंदुपदपादशाहीच्या संरक्षणाकरतां पश्चिम किनाऱ्याला सुवर्ण दुर्ग, विजयदुर्ग, सिंधुदुर्ग वगैरे अनेक किल्ले बांधून व आरमारांत असंख्य पैसा घालून तें निर्माण केलें आणि पाश्चिमात्य शत्रूंच्या हल्ल्यांचे दरवाजे बंद करून दूर दृष्टीनें स्वराज्याचा मार्ग निष्कंटक केला. परंतु सुमारें शंभर वर्षांनंतर नानासाहेब पेशव्यांनीं त्याच किल्ल्यांना खिंडारें पाडून व त्याच आरमाराचा सत्यानाश करून पाश्चिमात्य शत्रूंना आक्रमण करण्याकरतां त्याच पश्चिमेच्या मार्गाचे दरवाजे उघडे करून दिले, ही गोष्ट मराठ्यांचें स्वातंत्र्य जाण्यास मुख्यत्वेंकरून कारणीभूत झाली हे निराळे सांगावयास नको.

१९. तुळाजीच्या नाशानंतर दोन वर्षांनीं फ्रेंच सरदार बुसी दक्षिणेंतून निघून गेला. त्यामुळे फ्रेंचाचे पारडे हलकें होऊन इंग्रजांची बाजू वर आली. बंगाल प्रांतांत मीरजाफरास नबाब करून व त्याच्या संरक्षणाची हमी आपणांवर घेऊन त्यांनीं पर्यायानें बंगाल प्रांत हस्तगत केला, त्यामुळे इतउत्तर इंग्रजांस पैशासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची जरूरी राहिली नाहीं. याचवेळा क्लाइव्हसारखे महत्वाकांक्षी इसम त्यांजकडे आल्यामुळें त्यांनीं आपणास मिळालेल्या संधीचा शक्य तो फायदा करून घेतला. विजयदुर्ग–प्रकरणापासून इंग्रजांचे हेतूविषयी नानासाहेबास शंका राहिली नव्हती. इंग्रजांस हाताशीं धरून आपण पोर्तुगीज व सिद्दी यांचा कांटा कायमचा काढू अशी नानासाहेबास आशा होती. परंतु तुळाजीचा नाश झाल्याबरोबर इंग्रजांचा तोरा वाढला. सुरत शहर मराठ्यांनीं घेण्याचें आरंभिलें. तेथें इंग्रजांनीं आड येऊन त्यांचा हेतु सिद्धीस जाऊं दिला नाहीं. जंजिऱ्याचा हबशी जिंकून सबंध कोंकणपट्टी मोकळी करण्याचा उद्देश पेशव्यांनीं मनांत आणला, त्यासही इंग्रज आडवे आले. ज्या रामाजीनें इंग्र-

जांची मदत तुळाजींविरुद्ध मिळविण्यासाठी शिकस्त केली होती, तोच लिहितो, " सांप्रत इंग्रजांचे बखेडे यामुळे उगणपर्यंत जाणें प्राप्त झालें आहे. इंग्रजांची नजर फिरली आहे. त्यांचे पारिपत्य श्रीने करावें. आपण प्रार्थना करावी." ह्मणजे मराठयांच्या हातून इंग्रजांचे पारिपत्य होणें अशक्य होऊन केवळ ईश्वरच्या प्रार्थनेवरच अवलंबून राहण्याची दुबळी स्थिति त्यांस प्राप्त झाली.

२०. तुळाजीची दहशत नाहींशी झाल्याबरोबर हबशास जोर चढला व त्यानें मराठयांच्या प्रदेशांत स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. घाट चढून सचिवाच्या मावळांत सुद्धां त्यानें लुटालूट केली. तेव्हां सन १७५८ च्या आरंभीं जंजिऱ्यावर स्वारी करण्याचें पेशव्यांनीं ठरविलें. रामाजी महादेव, शंकराजी नारायण सचिव व माणकर या मंडळींस खुष्कीच्या मार्गानें पाठवून मानाजी आंग्र्यानें आरमाराची बाजू साभाळावी असें ठरलें. हबशावरची ही मोहीम थावत थावत दोन वर्षें चालली होती. इंग्रजांची मदत हबशास असल्यामुळें त्याची बाजू पुनःपुनः सांवरली जाई. तरी सुद्धां उंदेरी किल्ला जिंकून मराठयांनीं हबशास जेर केलें, व जंजिऱ्यास कायमचा वेढा दिला. नानासाहेब स्वतः नोव्हेंबर १७५८ पासून फेब्रुवारीपर्यंत कोंकणांत होते. जंजिऱ्यास वेढा दिला होता. तरी सिद्दी इब्राहिम रात्रीच्या काळोखांत चोरवाटेनें आपले लोक किनाऱ्यावर पाठवी आणि रयतेस भारी उपद्रव करी. मराठयांचा हुकूम कोणी मानला तर हबशी येऊन त्यांचीं घरेंदारें जाळी किंवा त्यांस जिवंत मारून टाकी. हबशाच्या जाचामुळें लोक भयभीत होऊन पळून जात. सन १७५८ सालीं मानाजी आंग्रे वारला व त्याचा मुलगा रघूजी आंग्रे यास वजारतमाब हा किताब व सरखेल–पद मिळालें. त्यानें हबशाबरोबरच्या लढाईत जोरानें सामना केला. उंदेरी व कांसा हे किल्ले त्याच्याच मदतीने काबीज झाले. पण मोहिमेचे आधिपत्य आंग्र्यांस न देतां पेशवे आपल्याच हस्तकास देत, यामुळें वैषम्य वाढून आंग्र्यांकडून नेटानें काम तडीस लागत नसे पुढें पानिपतावरील संहारामुळें

पेशव्यांचा कोंकणांतील हा उद्योग फुकट गेला. कारण मराठ्यांच्या पराभवामुळें सिद्दी व इंग्रज यांना जोर करून पुनः पूर्व पदावर स्थिति आणली.

२१ ही सारी आपत्ति मराठीराज्यावर कां ओढवली याचा जर विचार केला तर स्वकीयांच्या पारिपत्याकरतां परकीयांची मदत जी नानासाहेबांनीं घेतली त्याचेंच हें फळ होय असेंच उत्तर आपोआप निघतें. इंग्रजांची मदत घेण्याचा पायंडा नानासाहेब पेशव्यांनी पहिल्यानें पाडला. त्यामुळें त्यांनीं कोंकणपट्टचें राजकारण कायमचें बुडविलें; रामराजांबरोबर कारस्थान करून सांगोल्यास त्यांनीं त्यांच्याकडून हिंदुपदपादशाहीचा राजीनामा घेतला, त्यामुळें मराठी राज्याची एकजुटीची भावना त्यांनीं नष्ट केली व सर्व सरदारांमध्यें स्पर्धेची दृष्टि उत्पन्न झाली. या नानासाहेबांच्या कृतीमुळें मराठी राज्यांतील राजकारणाला कायमची कीड लागली. सदाशिवरावभाऊ यांचे न्याय्य अधिकार देण्यांत त्यांनीं कसूर केल्यामुळें आपल्याच घरांत त्यांनीं भाऊबंदीचा कायमचा अग्नि पेटवून ठेविला. उत्तरेस ईश्वरसिंगाच्या बाबतींत अन्याय करून सर्व उत्तर हिंदुस्थानचें राजकारण त्यांनीं नासून टाकलें एकंदरीत हिंदुपदपादशाहीच्या नाशाचो सर्व मुळें नानासाहेब पेशव्यानीं मराठ्यांच्या सर्व राज्यांत पसरविलीं असेंच म्हणणें प्राप्त होतें. चूक प्रथम करतांना ती बिंदुमात्र असते, पण ती वाढतां वाढतां हिमालया एवढी होते हे सृष्टीचें उत्पत्तिशास्त्र राजकारणालाही लागू आहे.



# प्रकरण ५ वें.

# नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीचा शेवट !

## इ० स० १७५९ ते इ० स० १७६१.

१. सदाशिवरावभाऊ पेशव्यांच्या कारभारांत आल्यानंतर पेशवाईचा बोज कसा वाढला.—२. रघुनाथरावदादांचा स्वभाव व त्यांची कामगिरी.—३. रघुनाथरावदादांची अटकेपर्यंतची मोहीम. त्यानी येताना यशाबरोबर डोईजड कर्जही आणलें.—४. राघोबादादा व सदाशिवरावभाऊ यांच्यामधील बेबनाव. नानासाहेबांनीं मुलुखगिरीवर सदाशिवरावभाऊंची व कारभाऱ्याचे जागीं राघोबादादांची स्थापना केली.—५. सदाशिवराव व राघोबादादा यांच्या अधिकारांची अदलाबदल करण्यांत नानासाहेबांचा अंतस्थ हेतू.—६. नानासाहेब पेशव्यांचें पोकळ राजकारण.—७. पेशवे घराण्यांतील गृहकलह. सदाशिवरावभाऊ यांचेवर मारेकरी घालण्यांत आले.—८. सदाशिवरावभाऊ यांचेवर मारेकरी घालण्यांत कोणाचें अंग होतें.—९. सदाशिवरावभाऊंवर मारेकरी घालण्यांत गोपिकाबाईचें अंग असावें.—१०. पेशव्यांच्या राजकारणांतील तीन निरनिराळे रंग.—११. गोपिकाबाईचा राजपक्ष समजला जाऊन त्यात नाना फडनविसांचा समावेश.—१२. नाना फडनविस यांचा त्रोटक पूर्वेतिहास.—१३. नाना फडनविसांचें आत्मचरित्र.—१४. नानासाहेब पेशवे व नाना फडनविस याचे जिव्हाळ्याचे हितसंबंध.—१५. गोपिकाबाईचें स्वभावचित्र. नाना फडनविसांप्रमाणें पुरुषोत्तम दाजी पटवर्धन यांचा गोपिकाबाईच्या राजपक्षांत प्रवेश. सदाशिवरावभाऊ व पटवर्धन सरदार यांचें वैमनस्य दाखविणारें एक पत्र.—१६. नाना फडनविस व पुरुषोत्तम दाजी यांचीं स्वभावचित्रे.—१७ सदाशिवरावभाऊबरोबर विश्वासरावांना पानिपतच्या मोहिमेवर पाठविण्यांत नानासाहेबांचा कोणता हेतू होता.—१८. उदगीरची लढाई व त्यांत पेशव्यांना यश मिळाल्याचीं कारणें.—१९. पानिपतच्या मोहिमेकरतां सदाशिवरावभाऊंनीं केलेल्या तयारीचें वर्णन.—२०. सदाशिवरावभाऊ दिल्ली हस्तगत करतात.—२१. सदाशिवरावभाऊंच्या सरदारांतील दुफळी व त्याचीं कारणें.—२२. पानिपतची लढाई म्हणजे एक महाभारतच होतें.—२३ पानिपतच्या लढाईंत उभय पक्षांच्या सैन्यांची गणती.—२४. पानिपतच्या लढाई-

तील मराठ्यांच्या सैन्याची रचना.—२५. पानिपतचें रणकुंड कसें पेटलें.—२६. पानिपतच्या लढाईंतील मराठ्यांचा पराभव. सदाशिवरावभाऊ गर्दीत मिसळले.—२७. पराभवानंतर मराठ्यांच्या सैन्याचें भेसूर चित्र.—२८. पार्वतीबाई व मराठे सरदार यांचें दक्षिणेकडे पलायन.—२९. सदाशिवरावभाऊ पानिपतच्या लढाईत दिसेनासे झाले एवढाच निष्कर्ष काढता येतो.—३०. नाना फडनविस पानिपतच्या लढाईतून शीरसलामत पुण्यास परत आले. नाना साहेबांचा मृत्यु.—३१. पानिपतच्या लढाईच्या घोर परिणामाचें कारण.

१. तिसऱ्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सदाशिवरावभाऊंच्या हातांत कारभारीपदाचा सर्व अधिकार आल्यानंतर त्यांनीं तो मोठ्या उत्साहानें आणि धडाडीनें चालविला. राजकारभारांत जबाबदार पुरुषाच्या ठिकाणीं निस्पृहता आणि निःपक्षपाती धोरण यांची जी जरूरी लागते ती भाऊंनीं आपल्या प्रत्येक कामांत लोकांच्या निदर्शनाला आणून दिली. त्यामुळें लोकांत त्यांची ख्याति होऊं लागली. रामचंद्रबाबांच्या शिक्षणानें ते हरएक बाबतींत तरबेज झाले. या वेळपर्यंत मुलुखगिरीच्या पायीं पेशव्यांना डोईजड कर्ज झालें होतें. परंतु भाऊंच्या हिशेबी धोरणामुळे तें पुष्कळ कमी झालें. राज्याच्या उत्पन्नाची व खर्चाची तोंडमिळवणी कशी होत जाईल; उत्पन्न वाढून खर्च कसा कमी करतां येईल; कोणता खर्च अनाठायीं होतो, वगैरे बाबतींत ते जातीनें छाननी करूं लागले. सकाळपासून रात्रीचे बारा वाजेपर्यंत त्यांचा काळ या कारभारांत जात असे. राज्यांतील अठरा कारखान्यांत त्यांनीं निरनिराळ्या सुधारणा केल्या. जमाखर्च चोख ठेविले. त्याबाबतीं जमाखर्चांत भाऊंचा कोणी हात धरणारा नाहीं अशी लोकांनीं त्यांची वाहवा करावी एवढी त्यांनीं कीर्ति संपादन केली. बहुतेक मेहेकम्यावर त्यांची सक्त देखरेख असे, ह्मणून राज्यांतील बरेच घोंटाळे कमी झाले. एकंदरींत भाऊंच्या हातीं कारभार आल्यापासून पेशव्यांच्या कारभाराचा बोज वाढला व त्यामुळें नानासाहेबांजवळ त्यांचें वजन वाढलें.

२. रघुनाथरावदादा यांची योजना नानासाहेबांनीं मुलुखगिरीवर केली होती. त्यामुळें ते बहुतेक मुलुखावरच असत. त्यांनीं मोठमोठ्या लढ्यांत विजय संपादन करून सर्व हिंदुस्थानांत नांवलौकिक मिळविला होता. ते आपल्या

फौजेला बरोबर घेऊन रोज चाळीस पन्नास कोसांच्या मजला करीत. त्यामुळें शत्रूचें त्यांच्यापुढें कांहीं चालत नसे. त्यांना "राघोभरारी" (ह्मणजे राघु ज्याप्रमाणें भरारी मारून दूर उडून जातो त्याप्रमाणें भरारी मारणारा ) ह्मणत. ते मोठे लढवय्ये, शूर, लढाईच्या सर्व कौशल्यांत प्रवीण, धाडसी असे होते. त्यांच्या अंगीं वीराला शोभणारे सर्व गुण असल्यामुळें औदार्यही स्वभावतःच त्यांच्या ठिकाणीं होतें. त्यांचें औदार्यही लोकविश्रुतच आहे. त्यांना पैशाची पर्वा नसे. हाताखालच्या सरदार लोकांना व सैनिकांना आपल्या अंकित ठेऊन त्यांच्यावर लष्करी शिस्तीप्रमाणें आपला दरारा ठेवण्याची त्यांना उत्कृष्ट हातोटी साधली होती. त्यामुळें त्यांच्या केवळ शब्दाकरतां सैन्यांतील प्रत्येक सैनिक मरावयाला तयार असे. सर्व सैन्याचें त्यांच्यावर मोठें प्रेम असे. लढाईंत पराक्रम केलेल्या लोकांना ते सढळ हातानें इनामें देत. त्यांना उत्साह व उमेद येईल अशा धोरणानेंच ते त्यांच्याशीं वागत. त्यांच्या स्वभावांत आंत एक व बाहेर एक असा दुटप्पीपणा नसून अस्सल शिपाईगिरीला साजेल असा दिलदारपणा व उदारपणा होता. त्यांनीं शत्रूचा पराभव केल्यानंतर तो दांनीं तृण धरून आला ह्मणजे त्याला पिळून काढून त्याची सत्ता नामशेष करावी हें हलक्या मनोवृत्तीचें मुत्सद्दी वळण त्यांना माहीत नव्हतें. शत्रू शरण आला ह्मणजे त्याच्या दर्जाप्रमाणें त्याला वागवून, त्याच्या ऐपतीप्रमाणें ते त्याच्यावर खंडणी लादीत व त्याचा मुलुखही मराठी राज्याला जोडून घेत. या त्यांच्या वर्तनामुळें त्यांच्या शत्रूवरही त्यांची मोठी छाप बसे. त्यांना कपट व व्यावहारिक स्वार्थाचे डावपेंच माहीत नसत. ह्मणून त्यांना "भोळे दादा" या नांवानें लोक संबोधित होते.

३. इ. स. १७५८ मध्यें राघोबादादांनीं हिंदुस्थानांत मोहीम करून शिख्यांचा पराभव केला व त्यांना हिंदुस्थानांतून त्यांच्या देशाला पिटाळून लाविलें. या मोहिमेंत त्यांनीं लाहोर काबीज केलें आणि अटकेपर्यंत चाल करून कृष्णातीरच्या घोड्यांना अटकेवर सिंधुनदीचें पाणी पाजलें. श्रीछत्रपती शिवाजीमहाराजांच्या इच्छेप्रमाणें हिंदुस्थानाच्या उत्तरेच्या सीमेवर मराठ्यांचा यशस्वी जरी पटका नेऊन त्यांनीं रोंवला. त्यांनीं पंजाबप्रांत मराठी राज्याला जोडला.

ही राघोबादादांची मोहीम ह्मणजे मराठ्यांच्या शौर्याची, कीर्तीची व वैभवाची परिसीमाच होती. अशा अपूर्व मोहिमेंत मराठ्यांचें नांव गाजवून व धवल यश संपादून हिंदुस्थानांतून राघोबादादा पुण्यास परत आले. जिकडेतिकडे त्यांच्या कीर्तीचा बोलबाला झाला. महाराष्ट्रांत तर जिकडे तिकडे आनंदी आनंद पसरला. या मोहिमेंत राघोबादादांनीं तात्विक दृष्टीनें व लौकिक दृष्टीनें अपार यश संपादन केलें खरें, परंतु येतांना त्या यशाबरोबर त्यांनीं मोहिमेच्या खर्चाचें ऐंशी लक्षाचें कर्ज बरोबर आणलें. लढाईंत जय मिळाल्यानंतर शत्रुपक्षाकडून भरमसाट खंडण्या वसूल करणें, लूटमार करणें, जबरदस्तीनें सावकारांना लुबाडणें, वगैरे कृत्यांना जरूर असणारी मनोवृत्ति राघोबादादांच्या अंगीं मुळांतच नसल्यामुळें लढाईचा खर्च परभारें भागविण्याची हिशेबी राजकारणकुशलता त्यांना झेंपत नसे. बहुतेक लढायावरून परत येतांना ते कर्जच घेऊन परत येत. यावेळीं तर मोहिमेच्या प्रचंड यशा एवढेंच प्रचंड कर्जही ते घेऊन आले.

४. मागें सांगितल्याप्रमाणें राज्यकारभारांत सदाशिवरावभाऊंचें काटकसरीचें धोरण व राघोबादादांच्या उदार स्वभावाला कर्ज घेऊन येण्याचें लागलेलें वळण, या परस्परविरुद्ध उभय बंधूंच्या स्वभावामुळें त्यांच्यांत तंटे उत्पन्न झाले. मोहिमेच्या जमाखर्चाची झडती घेतांना भाऊंनीं दादांना चांगलेंच झाडलें. दादांना आपला अपमान झाल्याप्रमाणें वाटलें. तेव्हां रागाच्या भरांत दादांनीं भाऊंना उत्तर दिलें " एवढें चातुर्य तुह्मांजवळ असेल तर दुसरे स्वारीस तुह्मीच जा. " अशा प्रकारें उभय बंधूंत कलह झाल्यामुळें नानासाहेबांनीं त्यांची समजूत काढण्याची युक्ति काढली. राघोबादादांनीं या पुढें भाऊंचा कारभार पहावा व भाऊंनीं मुलुखगिरी सांभाळावी हाच त्या युक्तीचा निष्कर्ष होता.

५. सदाशिवरावभाऊ व राघोबादादा यांच्यामधील झगडा केवळ मराठी राज्यावरील कर्जाच्या बोजापुरताच नव्हता. त्यांत इतर कांहीं भाऊबंदी तंट्यांचा संबंध होता असें दिसतें. हा केवळ कर्जाचाच प्रश्न असता, तर तो नानासाहेबांच्या हमीनें सहज निकालांत आला असता. ऐंशी लाखांचें कर्ज ह्मणजे पेशव्यांच्या राज्याच्या मानानें कःपदार्थ होतें. असें असतां नानासाहे-

बांनीं ज्याअर्थी या उभय बंधूंच्या कामाची अदलाबदल केली त्याअर्थी त्यांना त्यांत निराळाच हेतु साधावयाचा होता असें दिसतें. सदाशिवरावभाऊंचें वास्तव्य पुण्याला कायमचें झाल्यामुळें व त्यांचा कारभार विशेष कडक असल्या-मुळें ते नानासाहेबांप्रमाणें गोपिकाबाईंनाही डोईजड झाले होते. गोपिकाबाईंच्या मनांत ते कारभारांत नसावे असें पूर्वीपासूनच होतें. ही ब्याद पुणें सोडून मुलुखगिरीवर जाईल तर बरें, असें त्यांना वाटणें स्वाभाविक होते. शिवाय राघोबादादा कारभारांत आले तर त्यांचा कारभार तितका कडक होणार नाहीं हें त्या जाणून होत्या. त्यांना कारभाराची तेवढी माहिती नसणार तेव्हां त्यांचा कारभार नानासाहेबांच्या सल्ल्याप्रमाणें व मर्जीप्रमाणें होणार हेंही त्या ओळखून होत्या. तेव्हां केवळ कामाच्या अदलाबदलीनें जर बंधूंतील तंटे आपोआप तुटतात व गोपिकाबाईंच्याही मनाप्रमाणें होतें, तर तसें करणें नानासाहेबांना इष्ट वाटलें यांत नवल नाहीं.

६. नानासाहेबांच्या कारकीर्दीचें सूक्ष्म रीतीनें निरीक्षण केलें असतां असें दिसून येईल कीं, आपल्यावर आलेलें संकट तेवढ्यापुरतें कसें टळेल व तेवढ्यापुरती कशी शांतता होईल, एवढेंच ते पहात असत. भावी कालाचा विचार करून, भरीव राजकारण साधण्याची त्यांची मनोवृत्ति नव्हती. आपल्या भावांच्या कामाच्या अदलाबदलीनें त्यांनीं तेवढ्यापुरता गृहकलह शांतविला, ही गोष्ट खरी. पण त्यामुळें त्यांनीं राजकारणाचा मात्र सर्वस्वीं नाश केला. जो ज्या कामांत निष्णात असतो, त्याला त्याच कामांत उत्तेजन देणें व तेंच काम त्याच्याकडून करून घेणें, यांतच कार्य करून घेणाऱ्या इसमाची कुशलता असते. ती नानासाहेबांस साधली नाहीं. राघोबादादांना कारभाराची माहिती नसतां, त्यांना त्या जागीं नेमणें, अगर भाऊसाहेब मुलुखगिरीच्या कामाला अनभिज्ञ असतां, त्यांना ती कामगिरी देणें, हें राज्याच्या हिताच्या दृष्टीनें खात्रीनें अयोग्य होतें. सारांश ‘ जेनु काम तेनु थाय, बीजो करे तो गोतो खाय ’ या म्हणीप्रमाणें या उभय बंधूंच्या कामाच्या अदलाबदलीचे पर्यवसान शेवटीं अनिष्टच झालें. नानासाहेबांनीं ही जी घोडचूक केली व त्यामुळें त्यांना जो

गोता आला तो त्यांच्या सर्वनाशाचाच होता हें पुढील इतिहासावरून दिसून येईल.

७. गृहकलह इतके दिवस घरांतल्या घरांत होता. पण तो आतां राजकारणांत शिरल्यामुळें दुसऱ्या कारस्थानी पुरुषांना आपले घोडे नाचवावयाला मोकळें रान मिळालें. राष्ट्रघातकी लोक असे प्रसंग पहातच असतात. सदाशिवरावभाऊंचें व गोपिकाबाईंचें वैमनस्य आहे, हें सर्वांस कळून चुकलेंच होतें. त्यांत राघोबादादांच्या तंट्याची भर पडली मग काय विचारतां ! मधल्या कारस्थानी लोकांना ही एक पर्वणी आल्याप्रमाणें झालें. भाऊसाहेबांनीं दादासाहेबांच्या कामाचा ताबा घेतल्यानंतर ते पुणें सोडून वानवडीस छावणींत जाऊन राहिले. तेव्हां त्यांच्या विरुद्धपक्षानें त्यांना मारण्याचा कट निर्माण केला. एके दिवशीं भाऊसाहेब छावणींतील आपल्या डेऱ्यांत लिहीत बसले असतां कवाईतीच्या पलटणीपैकीं एका इसमानें डेऱ्याच्या मागील बाजूनें आंत शिरून भाऊंच्या पाठीवर पक्का वार केला; परंतु त्यांच्याजवळ उभें असलेल्या एका नोकरानें त्याचा हात धरल्यामुळें भाऊंवर पक्का वार न होतां तो निसटता लागला. त्यामुळें त्यांना थोडी दुखापत झाली. त्या मारेकऱ्याला त्यांनीं तेथेंच पकडलें. त्याला मारहाण करून विचारतां तो कबूल झाला. हा मारेकरी मुजफरखान याच्या कवाईती पलटणीपैकीं एक शिपाई होता. मुजफरखानाच्या हुकुमावरून आपण हें काम केलें असें त्यानें सांगितलें. नानासाहेबांनीं ज्यावेळीं या मुजफरखानाला चाकरीला ठेविलें, त्यावेळीं तो बेइमान असल्यामुळें त्याला चाकरींत घेऊं नये, असें भाऊसाहेबांचें मत होतें. शिवाय भाऊंनीं लष्कराचा ताबा घेतला त्यानंतर त्यांनीं इब्राहिमखान गारद्याचीं कवाईत शिकलेलीं पलटणेंही आपल्या नोकरींत नवीन ठेविलीं. त्यामुळें मुजफरखानाचें महत्व कमी झालें. मुजफरखानाच्या नोकरीच्यावेळीं भाऊसाहेब विरुद्ध गेले व सध्यां त्यांनीं नवीन पलटणें ठेऊन त्याचें महत्वही कमी केलें. याचा संताप त्याला येऊन हें नीचकृत्य करण्याला तो प्रवृत्त झाला. मुजफरखानाला पकडून आणून त्याचा जबाब विचारतां तो कबूल झाला. त्या कटांत आणखी एक परभु इसम होता. या

गुन्ह्याबद्दल मुजफरखान व मारेकरी शिपाई यांना जिवें मारण्यांत आलें, व परभु इसमास किल्ल्यावर तुरुंगांत ठेविलें [१]

८. सदाशिवरावभाऊ यांच्यावर जो मारेकरी घातला त्याचा संबंध केवळ मुजफरखानापुरताच होता असें ह्मणवत नाहीं. त्याला दुसरीही पार्श्वभूमिका होती. सन १७५९ सालीं नानासाहेब पेशवे यांजकडे वुइल्यम अँड्र्यू प्राइझ यांचा वकील मुंबईच्या कौंसिलकडून पाठविण्यांत आला. त्याच्या कामगिरीची समजूत त्याला कौंसिलनें जी दिली त्यांत "हल्ली पेशव्यांच्या दरबारीं नानासाहेब व सदाशिवरावभाऊ यांजमध्यें दुफळी होऊन गोंधळ माजला आहे," असा मजकूर आहे. ही राजकारण साधूं पहाणाऱ्या त्रयस्थ इंग्रजांची माहिती आहे. अर्थात् ती जास्त विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. या माहितीवरून केवळ कर्जाच्या बोजाकरतां भाऊसाहेब व राघोबादादा यांमध्यें कलह नसून तो खुद्द भाऊसाहेब व नानासाहेब यांच्यामध्यें होता व त्याला कांहीं घरगुती कारणें होतीं असेंच ठरतें. त्याच घरगुती कारणांमुळें भाऊसाहेब व नानासाहेब यांच्यामध्यें दुफळी झाली होती.

९. घरगुती तंटे ह्मणजे पेशव्यांच्या कुटुंबांतील तंटे. "नानासाहेब [३] पेशव्यांची स्त्री गोपिकाबाई, ही भाऊंस अगदीं पाण्यांत पहात होती, व तेणेंकरून आपल्या भाऊंच्या जिवास केव्हां ना केव्हां तरी दगा पोंचण्याचा संभव आहे, असा नानासाहेबांस पुरा वहीम आला होता. नानासाहेब गोपिकाबाईच्या कौटिल्यामुळें इतके भारून गेले होते कीं, दरबारांतील यःकश्चित् लोकांप्रमाणेंही भाऊंशीं कधीं काळीं देखील संभाषण करावयास ते तयार नसत". याचेंच पुढें भाऊंवर मारेकरी घालण्यांत पर्यवसान झालें. या बाबतींत कटाच्या मुळाशीं आणखीं कोण कोण माणसें होतीं याची चौकशी नानासाहेबांनीं बरोबर केली नाहीं असा त्यांच्यावर आरोप आहे. त्यामुळें हा गोपिकाबाईचाच गुप्त कट असावा, अशीही शंका घेतल्यास ती अयोग्य ठरणार नाहीं.

---

१ इफकृत मराठयांची बखर, मराठी भाषांतर पान १९७. २. मराठे व इंग्रज पान ४१. ३. जिवबादादा बक्षी यांचें चरित्र पान २९.

१०. या गृहकलहामुळें नानासाहेब पेशव्यांच्या पुढील कारकीर्दीच्या ओघांत तीन निरनिराळ्या रंगाचे प्रवाह वाहूं लागले. गोपिकाबाईंना यावेळीं विश्वासराव, माधवराव व नारायणराव असे तीन मुलगे होते. अपत्यप्रेमापुढें त्यांना जगाची काळजी करण्याचें कारण नव्हतें. आपल्या मुलांचेंच फक्त कल्याण करणें एवढेंच त्यांचें ध्येय त्यांना साधावयाचें होतें. जवळचे भाऊबंद आपल्या पुत्रांच्या हितसंबंधाला बाध आणतील म्हणून राजकारणाच्या कोणत्याही बाबतींत स्वतःच्या हिताकडे थोडीसुद्धां डोळेझांक होऊं नये, म्हणून त्या डोळ्यांत तेल घालून राजकारण निरखून पहात. त्यामुळें त्यांची दृष्टि स्वार्थ व द्वेष आणि मत्सर यांनीं भारलेली होती, म्हणून यांतून निघालेल्या विचारसरणीचा रंग एकाच प्रकारचा होता. नानासाहेबांची धांव केव्हां केव्हां जरी बंधुप्रेमाकडे जात असली तरी त्यांचें व गोपिकाबाईंचें अंतिम साध्य एकच असल्यामुळें त्यांना त्यांच्याच मताप्रमाणें शेवटीं कार्यभाग करावा लागे. अर्थात् गोपिकाबाई यांचा पक्ष म्हणजे राजपक्ष असा समजला जाई. सदाशिवरावभाऊंचा पक्ष हा राजपक्षाच्या विरुद्ध असल्यामुळें त्याला राजपक्षाचे अभिमानी लोक शत्रुपक्षाप्रमाणें लेखीत. परंतु भाऊंना न्यायनीतीचें पाठबळ असल्यामुळें ते राजपक्षांतील लोकांची पर्वा करीत नसत. त्यांना पेशवाईची इभ्रत सांभाळून आपलें स्वतःचें बूड कायम ठेवावयाचें होतें. यामुळें त्यांना गृहकलहाला विशेष महत्व देऊन चालावयाचें नव्हतें. आपल्या पराक्रमावर आपली इभ्रत कायम टिकणार आहे या दृष्टीनें ते राजकारण साधीत होते. त्यामुळें त्यांच्या विचारसरणीचा स्वतंत्र प्रवाह राजकारणांत दिसून येत होता. रघुनाथरावदादा हे व्यावहारिक दृष्टीनें नानासाहेबांच्या मताप्रमाणें वागत. परंतु गोपिकाबाईंचा स्वभाव त्यांना भाऊंच्या प्रकरणीं अवगत झाल्यामुळें भाऊंप्रमाणें आपल्यावरही त्यांचा गहजब केव्हां तरी होईल ही त्यांना धास्ती वाटत होती. म्हणून आपलें स्थान कायम राखण्याकरतां ते शक्य तेवढी नानासाहेब व गोपिकाबाई यांची मर्जी संपादन करून राहण्याचा प्रयत्न करीत. त्यामुळें इकडे भाऊसाहेबांचा पक्ष नाहीं व दुसरीकडे गोपिकाबाईंचा पक्ष नाहीं अशी तारेवरील कसरत करून त्यांना राजकारण

साधावयाचें होतें. अशाप्रकारें तीन निरनिराळे प्रवाह आपापल्या परीनें सावध राहून पेशवाईच्या राजशासन–ओघांतून वहात जात होते.

११. गोपिकाबाईंच्या राजपक्षांतील मुख्य मंत्री म्हणजे नानाफडनवीस हे होत. पेशव्यांच्या घरांत भाऊबंदकीला जो जोर आला त्याच्या मुळाशीं गोपिकाबाईंचे सूत्रधार नाना हे असल्यामुळें त्यांना इतरांपेक्षां पेशव्यांच्या बायका मुलांमध्यें अगदीं घरच्या मनुष्याप्रमाणें शिरकाव कसा मिळाला याची थोडी माहिती येथें देणें अवश्य आहे.

१२. नाना फडनवीस यांचा जन्म शके १६६३ दुर्मती नाम संवत्सरे माघ कृष्ण ४ ( तारीख ४ मे सन १७४१ ) रोजीं सातारा येथें झाला. त्यांची मातोश्री सरदार बळवंतराव मेहेंदळे यांची बहीण. त्यांचे वडील जनार्दनपंत भानु हे नानासाहेब पेशव्यांच्या फडणीशीच्या कामावर होते. राघोबादादांनीं इ. स. १७५६ मध्यें जी हिंदुस्थानांत मोहीम केली त्यांत जनार्दनपंत हे होते. या मोहिमेंतच त्यांचा अंत झाला.

१३. नाना फडणीस यांनीं जें आपलें आत्मचरित्र लिहून ठेवलें आहे त्यावरून पहातां नानांचा स्वभाव लहानपणापासून फार हूड होता. बालपणीं त्यांचें विद्याभ्यासाकडे फारसें लक्ष नव्हतें. त्यांच्या मनोवृत्ति फार उच्छृंखल होत्या. त्यांच्या स्वभावांत एककल्लीपणा व हेकेखोरपणा फार असे. थोडे मोठे झाल्यावर दुर्विचाराचें प्राबल्य त्यांच्या मनावर अतिशय होत असे. प्रसंग विशेषीं तें इतकें अनावर होई कीं त्यापासून त्यांचा वर्तनक्रमही दूषित होत असे. नानांचे वडील मेल्यानंतर थोड्याच दिवसानीं नानासाहेब पेशव्यांनीं त्यांना फडणीशीचीं वस्त्रें दिलीं. त्यावेळीं त्यांचें वय १५ वर्षाचें होतें. यावेळेपासून त्यांचा राजकारणांत प्रवेश झाला. नानांचा पेशवे घराण्याशीं नात्याचाही संबंध होता. बाजीराव पेशव्यांच्या आतेभावाची मुलगी ही नानांची मातोश्री रखमाबाई होय. या आप्तसंबंधानें पेशव्यांच्या घरीं नानांचें येणेंजाणें लहानपणापासून होत असे. शिवाय जनार्दनपंतांना फडणीशी मिळाल्यानंतर त्यांत विशेष भर पडली.

१४. नानासाहेब पेशव्यांचे पुत्र विश्वासराव व माधवराव हे नानांचे सहाध्यायी व बालमित्र होते. घोड्यावर बसणें, मर्दानी खेळ खेळणें, विद्याभ्यास

करणें या गोष्टी उभयतां पेशवेपुत्रांबरोबरच नानांच्या झाल्या. त्यामुळें लहानपणापासून नानासाहेब पेशवे व गोपिकाबाई यांच्याशीं नानांचा विशेष घरोबा वाढत गेला. शिवाय त्यांना फडणीशीचें काम दिल्यापासून तर तो परिचय विशेष दृढ झाला. थोडक्याच दिवसांत नानांनीं पेशव्याची व गोपिकाबाईंची संपूर्ण मर्जी संपादन केली. नानांच्या जिव्हाग्रावर मधाचें वास्तव्य असल्यामुळें त्यांना कोणीही सहज वश होत असे. अशा प्रकारें नानांचा पेशव्यांच्या कुटुंबांत प्रवेश झाल्यामुळें थोड्याच दिवसांत नानासाहेब पेशवे व नाना यांच्यामधील सेव्यसेवकभाव नष्ट झाला. पेशवे नानांना आपल्या मुलाप्रमाणें वागवूं लागले. वाड्यांत त्यांना कोठेंच मज्जाव नाहींसा झाला. विश्वासराव व माधवराव यांना नाना आपला परममित्र आहे असें वाटूं लागलें. त्यामुळें गोपिकाबाईंचाही नानांवर लोभ व विश्वास बसला. खुद्द पेशव्याना तर नानांचा सहवास अत्यंत प्रिय वाटूं लागला. त्यांना नानावांचून चैन पडेनासें झालें. 'समानशीले व्यसनेषु सख्यम्' या उक्तीप्रमाणें पुढें नानासाहेब व नाना यांची मैत्री जमली. मैत्री जमावयाला समान वयाची जरूरी असते असें नाहीं. या दोघांत नांवाप्रमाणें गुणावगुणांचें मात्र फार साम्य होतें हें चाणाक्ष मनुष्याच्या लक्षात आल्यावांचून रहात नसे. कपट, विषयासक्ति, अंशतः भित्रेपणा, तसेंच भारदस्तपणा, धोरण, दूरदर्शीपणा इत्यादि गुणावगुण दोघांतही सारखे वसत होते[1] यामुळें उभयतांमधील सेव्यसेवकभाव नष्ट होऊन त्याचें पर्यवसान मित्रत्वाच्या संबंधांत झालें. नानांवर पेशव्यांची बहाल मर्जी आहे असें लोकांत दिसून आल्यामुळें त्यांचा प्रजाजनांत दर्जा वाढला. सरदार लोकांत त्यांची प्रतिष्ठा वाढली. नानांचा स्वभाव एककल्ली असल्यामुळें त्यांनीं एकदां जो राजपक्ष धरिला तो शेवटपर्यंत सोडला नाहीं. या पक्षाविरुद्ध जे जे पक्ष निर्माण झाले, त्या त्या पक्षाचें निर्मूलन करण्याकरतां न्यायान्यायाकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. आपला पक्ष ह्मणजे सत्पक्ष याच धोरणानें ते शेवटपर्यंत चालले.

---

१ देवकृत नाना फडनवीस यांचें चरित्र पान ६

१५. गोपिकाबाईंचा स्वभाव पूर्ण स्वार्थी होता. स्वतःच्या हिताआड येणाऱ्या मनुष्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं मोठा द्वेष असे. गर्व आणि मत्सर हेही दुर्गुण त्यांच्या ठिकाणीं वसत असत. त्यांना मुलगे झाल्यानंतर त्यांचा नानासाहेबांवर पगडा बसला. त्यांच्या मनाविरुद्ध कोणतीही गोष्ट करणें नानासाहेबांना कष्टप्रद होई. बऱ्याचशा बाबतींत ते त्यांच्या मनाप्रमाणेंच वागत. या वेळीं गोपिकाबाईंचा म्हणून जो राजपक्ष असे त्यांत नानाफडनविसांप्रमाणें पुरुषोत्तम दाजी पटवर्धन हेही एक इसम होते. या पुरुषोत्तम दाजींनीही नानाप्रमाणेंच या पक्षाला वाहून घेतलें होतें. त्यामुळें गोपिकाबाईप्रमाणें तेही सदाशिवरावभाऊंना पाण्यांत पहात. नानाप्रमाणेंच त्यांचीही वग बायकांत बरीच होती. नानासाहेबांची मर्जीही दाजींवर फार होती. नानासाहेबांच्या कुटुंबांतील माणसांना दाजी हे मोठे जिव्हाळ्याचे व कळकळीचे वाटत होते. विरुद्ध पक्षावर वृथारोप करण्याची व त्याची निर्भत्सना करण्याची त्यांना मोठी संवय असे. या त्यांच्या संवयीमुळें भोळ्या स्वभावाच्या बायकांवर त्यांचें चांगलेंच वजन पडे. त्यांना आपला हितकर्ता म्हणजे दाजी आहेत असें वाटे. दाजी हे पेशव्यांच्या जवळ असल्यामुळें व त्यांच्यावर पेशव्याची मर्जी असल्यामुळें इतर पटवर्धन सरदार दाजींच्या तंत्रानेंच वागत असत. ते सर्व गोपिकाबाईंच्या पक्षाचेच होते. त्यामुळें पटवर्धन सरदारांचें व सदाशिवरावभाऊंचें किती वैमनस्य होतें हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल. "पटवर्धनांची फौज कांहीं पानिपतचे स्वारीस गेली नाहीं. हे हुजूर पुण्यास होते. श्रीमंत भाऊसाहेब यांचा किंचित् रोष होता. सबब त्यांनीं समागमें नेलें नाहीं. श्रीमंत सौ० गोपिकाबाईसाहेब यांचें लक्षानें वागत होते. त्या उभयतांचें ( भाऊसाहेब व गोपिकाबाई ) ठीक नव्हतें असें ऐकीव. यांत गोपाळरावदादा ( पटवर्धन ) यांणीं पानिपतचे स्वारीची तयारी जाहली ह्मणोन ऐकिलें. त्यांत पटवर्धन समागमें नेण्याची योजना झाली नाहीं असें ऐकिलें. त्यावरून गोपाळरावदादा यांनीं श्रीमंत भाऊसाहेब यांस विनंतीपत्र लिहिलें कीं, सरकारस्वारीची जाण्याची

१ हरीवंशाची बखर पान १३.

तयारी जाहली, त्यांत आमची फौज नेण्याची मर्जी नसल्यास वडील गोविंद-पंतनाना येथें चाकरीस आहेत. मी एकट्या घोड्यानिशीं सडा स्वारीचे बरोबर येतों. त्याचें उत्तर श्रीमंत भाऊसाहेब यांनीं पाठविलें कीं, सरकारांतून श्रीमंत विश्वासरावसाहेब यांस स्वारीस जाण्याची आज्ञा जाहली आहे. समागमें मलाही जाण्यास सांगितले. त्यास आपली जाण्याची मर्जी असल्यास मी राहीन! याप्रमाणें उत्तर पाठविलेवरून पटवर्धन कोणी मंडळी गेली नाहींत."

१६. सदाशिवरावभाऊ आपल्याबरोबर पटवर्धनांची फौज न्यावयाला तयार झाले नाहींत, एवढेंच नव्हे तर, एकटे गोपाळरावदादा येतों ह्मणाले असतां, त्यांनाही निर्वाणीचा जबाब त्यांनी दिला 'गोपाळराव जर जाणार असतील तर आपण जाणार नाहीं;' याचा अर्थ जेथे पटवर्धन आहेत तेथें भाऊ नाहींत असा स्पष्ट निघतो. यावरून त्या परस्परांत केवढा द्वेष होता, व तो कोणामुळे होता हें सहज समजून येईल. नाना फडनविसाचा स्वभावधर्म धूर्तपणाचा होता. सदाशिवरावभाऊ यांच्याबद्दल त्यांच्या मनांत पक्षभेदामुळें जरी द्वेष व पाप वसत होतें, तरी ते बाहेर बोलून दाखवीत नसत. त्याला ते संधि साधून गुप्त कृतीनें उत्तर देत असत. त्यामुळें विरुद्ध पक्षाच्या डोळ्यांत नाना एकदम सलत नसत. ते विरुद्ध पक्षांतील लोकांचा कधीं उघड अपमान करीत नव्हते. ते त्यांच्याबरोबर मोठ्या लीनतेनें वागत. त्यामुळें नानांच्या या स्वभावाची ओळख दुसऱ्याला सहसा पटत नसे. ते आंतून कारस्थान करून शत्रूला पराजित करीत असत. हा स्वभाव पुरुषोत्तम दाजींच्या ठिकाणीं नव्हता. त्यांची मदार कृतीपेक्षां बडबडीवर जास्त होती. ते विरुद्ध पक्षावर वाटेल तेव्हां व वाटेल तसें तोंडसुख घेत असत. त्यामुळें विरुद्ध पक्षानें त्यांचा नेहमींच द्वेष केला. पानिपतच्या लढाईवर विश्वासराव जाणार म्हणून त्यांच्याबरोबर आपल्या कळकळीचीं निदान दोन तरी माणसें असावीं असें गोपिकाबाईंना वाटणें स्वाभाविक होतें. परंतु दाजीला बरोबर न्यावयाला भाऊ

तयार होणार नाहींत, तेव्हां निदान गोपाळरावाला तरी बरोबर घ्यावें एव-ढ्याचकरतां ही सारी खटपट होती. परंतु ती निष्फळ झाली. नाना मात्र विश्वासरावांबरोबर लढाईला गेले.

१७. इ. स. १७५९ च्या अखेरीस पानिपतच्या लढाईची पूर्व-तयारी झाली. या वेळपर्यंतची पेशव्यांच्या गृहकलहाची सर्वसाधारण रुपरेखा वर दिलेली आहे. दादांनीं कारभार पहावा, भाऊंनीं मुलुखगिरी करावी, असे ठरल्यामुळें पानिपतच्या लढाईवर भाऊंनाच पाठविण्याचे ठरलें. परंतु राजपक्षानें त्यांतही एक मेख मारून ठेविली होती. या मोहिमेचा भार जरी भाऊंच्यावर होता तरी मोहिमेचें खरें आधिपत्य पेशव्याचे वडीलपुत्र विश्वासराव यांनाच देण्यांत आलें होतं. या मोहिमेत यश आले असते तर तें विश्वासरावांना मिळणार होते पण अपयश आले तर त्याचें खापर मात्र भाऊंच्या माथ्यावर फुटणार होतें. विश्वसरावाना मोहिमेचे आधिपत्य देण्यात हा हेतु होता. हा यांतील भेद समजण्यापुरते भाऊ शहाणे होते ह्मणूनच त्यांनीं गोपाळराव याना उत्तर पाठविलें त्यात त्याचें स्पष्टीकरण कले होते. परंतु भाऊंना या घरगुती डावपेंचात विशेष लक्ष घालण्याचें कारण नव्हतें. त्यांना पेशवाईची इभ्रत संभाळावयाची होती, व आपला पराक्रम लोक-निदर्शनाला आणावयाचा होता. शिवाय राघोबादादांपेक्षा आपण विशेष कांहीं आहोत हंही त्याना या मोहिमेत दाखवावयाचे होते. त्यांची ईर्षा मोहिमेंत यश संपादून कर्ज न करता, उलट पेशवाईचा खजिना भरावयाची होती. दुसरी गोष्ट अशी होती कीं, भाऊंच्या पुढें स्वार्थाची दृष्टि नव्हती. त्यांना या वेळपर्यंत संतान नव्हते. जे काय करावयाचे तें सारें नानासाहे-बांच्या मुलाकरतांच होते. विश्वासराव, माधवराव व नारायणराव यांना त्यांनीं आपल्यां मुलाप्रमाणेच वागविले, वाढविलें आणि शिक्षण दिलें. तेव्हां मोहिमेचें आधिपत्य विश्वासराव याला दिलें काय किंवा ते आपणांकडे राहिलें काय त्यांत त्यांना कोणताच दुजाभाव वाटत नव्हता.

१८. पानिपतच्या लढाईची पूर्वतयारी झाली. परंतु मध्येंच निजामअल्लीचें खूळ माजल्यामुळें तें मोडून नंतरच हिंदुस्थानांत मोर्चा वळवावयाचा असा

मनसुबा ठरला. या निजामअल्लीच्या मोहिमेवर भाऊ, विश्वासराव व राघोबादादा असे त्रिवर्ग निघाले ते बेदरच्या रोखानें चालले; प्रसंगविशेषीं त्यांना मदत देतां यावी ह्मणून खुद्द नानासाहेब पेशवे आपल्या सैन्यासह अहमदनगर येथें तळ देऊन बसले. निजामअल्लीनें आपली सर्व फौज एकत्रित करण्यापूर्वींच पेशव्यांनीं लढाई दिली. या लढाईला उदगीरची लढाई ह्मणतात. या लढाईंत राघोबादादा व सदाशिवरावभाऊ हे उभयतां भीमार्जुनासारखे लढवय्ये असल्यामुळें त्यांनीं निजामाचा पूर्ण पराजय केला. इब्राहिमखान गारदी याच्या लोकांनीं व पेशव्यांच्या स्वारांनीं थोड्याच वेळांत शत्रूच्या तीन हजार लोकांची कत्तल केली. मागें राहिलेलें निजामाचें सैन्य जवळ येऊन ठेपलें होतें. पण त्याची व निजामाची गांठ पडेपर्यंत आपला सर्वनाश होईल या भीतीनें निजामअल्लीनें भाऊसाहेबांकडे तहाचें बोलणें लाविलें. यावेळीं तहाच्या ज्या ज्या अटी भाऊंनीं घातल्या त्या त्या सर्व निजामअल्लीनें कबूल केल्या. या तहामुळें पेशव्यांना बऱ्हाणपूर, सालेर, मालेर, दवलताबाद, अहमदनगर वगैरे सहा किल्ले व बासष्ट लक्ष उत्पन्नाचा मुलुख मिळाला. सदाशिवरावभाऊ व विश्वासराव यांच्या मोहिमेचा हा पहिला विजय असल्यामुळें सर्वांस आनंद झाला. ही उदगीरची लढाई तारीख २ फेब्रुवारी सन १७६० रोजीं झाली. या लढाईच्या वेळीं तिघे पेशवे बंधु व विश्वासराव ही मंडळी एकोप्यानें आल्यामुळें निजामअल्लीचें धाबें दणाणलें व पेशव्यांना मोठा विजय प्राप्त झाला.

१९. यानंतर नानासाहेब पेशवे, राघोबादादा, सदाशिवरावभाऊ व विश्वासराव ही मंडळी आपापल्या सैन्यासह आंबेपडदरी मुक्कामीं एकत्र झाली. तेथून भाऊसाहेब विश्वासरावांना घेऊन पुढें पानिपतच्या मोहिमेला निघून गेले. विश्वासरावांबरोबर नाना फडनविस होते. या हिंदुस्थानांतील स्वारीकरतां भाऊंनीं आपल्याबरोबर निवडक निवडक शूर सरदार व लोक घेतले होते. चांगली फौज, चांगले हत्ती, उमदे घोडे, उंचउंच वस्त्रें, मौल्यवान अलंकार, भरजरी व किनखाप यांनीं मढविलेले डेरे, राहुट्या वगैरे

जेवढ्या चांगल्या वस्तु असतील तेवढया त्यांनीं घेतल्या होत्या. बायका, मुलें बाजारबुणगे, वगैरे सर्व लचांडही बरोबर होतें. त्यांना इब्राहीमखान गारदी हिंडिया मुक्कामीं आपल्या फौजेसह येऊन मिळाला. यावेळीं भाऊंच्या बरोबर दक्षिणेंतील मोठमोठे सरदार आपापल्या पथकांसह निघाले होते. त्यांत दमाजी गायकवाड, यशवंतराव पवार, समशेर बहाद्दर, हरी दामोदर, सोनाजी धापकर, महादाजी व तुकोजी शिंदे, त्रिंबकराव पुरंदरे, संताजी आटोळे, आनंदराव व तुकोजीराव पवार, गोपाळराव बरवे, शिवाय मोहिते, बांडे, देवकांते, माहारणे, निंबाळकर, जाधवराव वगैरे प्रमुख मराठे सरदार होते. नाना फडनविसांचे मामा बळवंतराव मेहेंदळे हेही होते. त्यांनीं कर्नाटकांत मोहिमा करून ख्याति मिळविली होती. ह्मणून सदाशिवरावभाऊ त्यांचाच सल्ला घेत होते. अशा प्रकारें ही स्वारी मोठ्या थाटानें माळव्यांत आली. तेथें माणकेश्वर, गोविंदपत बुंदेले, विठ्ठल शिवदेव वगैरे सरदार येऊन मिळाले. शिवाय माळवा वगैरे प्रांतातील जेवढे ह्मणून राजेरजवाडे होते त्यांनींही थोडेबहुत लोक पाठविले. उज्जनी मुक्कामीं फौजेची गणती केली तेव्हां, १,२७,००० शिपाई, व शंभर तोफा बरोबर होत्या. भाऊंनीं या मोहिमेच्या खर्चाकरतां दोन कोट रुपये आणले होते. पुढें ग्वाल्हेरीस त्यांचा चार दिवस मुक्काम होऊन तेथून चंबळेच्या खळ्या उतरून ते धोलपुरास गेले. त्या मुक्कामाला शिंदे-होळकर यांच्याकडून पत्रे आलीं कीं, "तुम्हीं आतांच पुढें येऊं नये. आम्हीं गनिमी काव्यानें शत्रूस जेरीला आणतों. प्रसंग पडेल त्याप्रमाणें आपण पुढें यावे." शिंदे होळकर यांनीं शत्रूच्या हालचालीच्या दृष्टीने पेशव्यांना ही खबर दिली होती. परंतु शिंदे व होळकर यांच्याबद्दल भाऊंच्या मनांत रामचंद्र बाबा शेणवी यांच्या बाबतींत जें एकदां मन कलुषित झालें होतें तें अद्यापि तसेंच होतें. त्यांना असें वाटलें कीं, आपण दक्षिणेंतून एवढी मोठी फौज घेऊन आलों, त्यामुळें अबदल्लीबरोबर होणाऱ्या लढाईत आह्मांलाच विजयाचें श्रेय मिळेल या मत्सरबुद्धीनें हा शिंदे-होळकरांचा डाव असेल. अशा प्रकारें त्यांच्या

पत्राच्या बाबतींत तर्कवितर्क निघूं लागले. परंतु बळवंतराव मेहेंदळे यांचा उपदेश दिल्लीवर चाल करून जावयाचा पडल्यामुळें कुच करून आग्र्या-जवळ गंभिरा नदीचे तीरीं येऊन त्यांनीं तळ दिला. तेथें मल्हारराव होळ-कर, जनकोजी शिंदे व नारो शंकर हे आपापल्या फौजेसह येऊन मिळाले. शिंदे यांनीं सुरजमल्ल जाटासही आपल्याबरोबर घेतलें. होळकरांनीं भाऊ-साहेबाची गांठ घेऊन, त्यांनीं आपला सल्ला न ऐकल्याबद्दल त्यांची कान-उघाडणी केली. परंतु त्याचा उपयोग अर्थात् भाऊंचे मनावर झाला नाहीं.

२०. तेथून भाऊसाहेबांनीं बळवंतराव मेहेंदळे यांना पुढें दिल्लीवर पाठ-विलें. त्यांनीं दिल्ली शहरास मोर्चे लाविले. इतक्यांत मुख्य फौजही येऊन पोंचली. दिल्लींत नजीबखानाचे चार हजार पठाण लोक होते. त्यांनीं बराच वेळ टिकाव धरला. पण अखेरीस शहर काबीज होऊन भाऊंची फौज आंत शिरली. तेथें दिवाण-इ-खास मध्यें बादशहाच्या तक्तावर चांदीचें छत होतें तें भाऊंनीं तोडून काढून, दिल्ली मुक्कामीं त्याचे रुपये पाडले. त्या छताचे सत्रा लक्ष रुपये झाले. गोविंदपंत बुंदेल्यास पन्नास लक्ष रुपये देण्याबद्दल त्यांनीं तगादा लाविला. त्यामुळें तो तोंड चुकवून आपल्या पथकासह अंतरवेदींत गेला. राघोबादादा मोहिमेवर जाऊन यश संपादितात, परंतु येतांना कर्ज घेऊन येतात या बाब-तींत दादा व भाऊ या उभयतांचा जो कलह झाला होता, त्या ईर्षेवर यांवेळीं भाऊ लढाईंत यश संपादन करून पैसाही मुबलक मिळविण्याच्या प्रयत्नांत होते. त्याचेंच द्योतक ह्मणजे वरील तक्त फोडणें व बुंदेल्यांकडे पैशाचा तगादा लावणें हें होय.

२१. लोकांचें मन न दुखवितां त्यांच्याकडून पैसा काढणें फार कठीण असतें. लढाई जिंकून वर पैसाही मिळवूं या गोष्टीं नेहमींच साधत नसतात. लढाईच्या वेळीं पैसा उकळण्याकडे लक्ष दिलें ह्मणजे ऐनप्रसंगीं जयाचें पारडें कसें फिरतें याचें प्रत्यक्ष प्रतीक ह्मणजे पानिपतचा घोर रणसंग्राम हें होय. दिल्लीचें तक्त न फोडण्याबद्दल होळकर व जाट वगैरे वृद्ध लोकांनीं भाऊंना पुष्कळ सांगितलें, परंतु तिकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. फार दिवसांचें जुनें तक्त

असल्यामुळें त्याबद्दल उत्तर हिंदुस्थानच्या राजेरजवाड्यांना विशेष आभिमान व आदर वाटत होता. दिल्लीच्या तक्तावर शाह अलम बादशहाचा पुत्र जवान बख्त याला बसवून व नारो शंकर याला त्याचा वजीर नेमून दिल्लींतील राज्य-व्यवस्थेंत क्रांति करण्याचा भाऊंचा विचार होता. त्यामुळें रजपूत व जाट या लोकांना वैषम्य वाटून ते भाऊसाहेबांचा पक्ष सोडून एकएक जण आपआपला पाय मागें घेऊं लागले. त्यांतील कांहीं आपापल्या देशाला परत गेले. भाऊ-साहेबांनीं आपला सल्ला ऐकला नाहीं ह्मणून कांहीं जण मनांत संतापून लष्क-रांत असूनही नसल्याप्रमाणें विश्वासघाताच्या धोरणानें वागूं लागले. कांहीं बाहे-रून आपण भाऊंच्या पक्षाला आहोंत असें दाखवून, आंतून शत्रूला मदत करूं लागले. अशा प्रकारें भाऊंच्या सरदार लोकांची व सैन्याची, घुशीनें आंतून घर पोंखरल्याप्रमाणें, स्थिति झाली. राघोबादादा आपल्या सैन्याची अशी फाटाफूट कधींच होऊं देत नसत. आपल्या सैनिकांना ते नेहमीं खूष ठेवीत असत ह्मणून मारूं किंवा मरूं हेंच त्यांचें ध्येय असे. लढाईचें धोरण राज्यव्यवस्थेपेक्षां अगदीं भिन्न असल्यामुळें तें भाऊंना संभाळतां आलें नाहीं. ते दुसऱ्या सरदारांच्या ओंजळीनें पाणी पिऊं लागले. त्यामुळें त्यांच्यापैकींच कांहीं सरदारांना वैषम्य वाटून ते उदासीन होऊन मजा पाहूं लागले. एकंदरींत विचार करतां नानासाहेबांनीं या मोहिमेवर जी सदाशिवरावभाऊंची योजना केली, ती साफ चुकीची होती असें ह्मणणें प्राप्त होतें. गृहकलह राजकारणांत शिरला ह्मणजे त्याचा शेवटीं असाच अनिष्ट परिणाम होतो.

२२. या पानिपतच्या लढाईची हकीकत ह्मणजे एक महाभारत आहे. यांत लहान मोठ्या अनेक लढाया झाल्या, अनेक गनिमी काव्याचे प्रसंग घडले, अनेक लष्करी डावपेंचाचे सामने झाले, तहाच्या वाटाघाटींच्या खोट्याच बता-वण्या झाल्या, मुत्सद्देगिरीचे अनेक पेंचप्रसंग घडले आणि शेवटीं कुरुक्षेत्रावर भारतीय युद्धाचें यज्ञकुंड विक्रमसंवत्सर शक १६८२ पौष शु॥ ८ बुधवार तारीख १४ जानेवारी सन १७६१ रोजीं प्रातःकाळीं सूर्योदयाबरोबर पेटलें.

२३. काशीराय आपल्या बखरींत कुरुक्षेत्रावरील उभय पक्षांच्या फौजांची गणती खालीलप्रमाणें देतात. दुराणीकडील सर्व मुसलमान सरदारांची फौज

४१,८०० स्वार व ३८,००० पायदळ इतकी होती. आणि त्यांच्याजवळ ८० तोफा होत्या. दुराणीच्या पश्चिमेकडे मराठे लोकांची फौज होती. मराठ्यांकडे ५५,००० स्वार व १५,००० पायदळ असून २०० तोफा होत्या. याशिवाय लहानसहान पथकें, पेंढारी वगैरे मिळून २०,००० जवळजवळ आणखी फौज होती. या झुंझत्या फौजांखेरीज मराठयांकडे १,५०,००० बाजारबुणगे वगैरे निकामीं मनुष्यें होती. त्याचप्रमाणें मुसलमानांकडेही मोठा जमाव होता. म्हणजे अंदाजे साडेतीन लक्ष लोक कुरुक्षेत्राच्या रणसंग्रामावर जमले होते, असें ठोकळ मानाने ठरतें.

२४. वरील दिवशीं सूर्योदयापूर्वी[1] मराठ्यांनी खंदकाचा आश्रय सोडून मैदानांत सैन्य आणून उभें केले व पूर्वी ठरविल्याप्रमाणें आपल्या सैन्याची रचना केली. मध्यभागीं खाशा स्वाऱ्या आपआपल्या पथकांसह उभ्या राहून डावीकडे यशवंतराव पवार, दमाजी गायकवाड, अंताजीपंत, विठ्ठल शिवदेव, समशेर बहादर यांची सैन्यें राहिली. उजवीकडे शिंदे, होळकर वगैरे सरदार राहिले. पुढें तोफखाना असून मागें इब्राहीमखानाची पलटणे उभी राहिलीं होतीं. या सर्वांच्या पाठीमागें बुणगे होते. त्यांच्यामागे लहान लहान पथकें अनेक होतीं.

२५. वरीलप्रमाणें सैन्य रचना होऊन मराठ्यांचा सेनासागर दिल्लीच्या रस्त्यानें हळुहळु जाऊं लागला. इतक्यांत शत्रूला ही वर्दी पोंचून तेही तयार होऊन सामोरें येऊं लागले. उभयपक्षांकडून तोफांची सरबत्ती सुरू झाली. धुरानें दशदिशा भरून गेल्या. लष्करांत तोफांचे गोळे येऊन पडूं लागले, तोफा, बंदुका, बाण यांच्या वर्षावानें रणक्षेत्र आच्छादून गेलें. धुराच्या व धुरळयाच्या मेघांनीं सूर्य अदृश्य झाला. नंतर दुराणीनें सैन्य मराठ्यांच्या डाव्या बाजूला येऊन हातोहातीची लढाई सुरू झाली. पहिल्यानें विठ्ठल शिवदेव व यशवंतराव पवार यांनीं पुढें जाऊन बराच वेळ लढाई केली. परंतु ते माघारें जाग्यावर आले. त्यामुळें इब्राहिमखानानें तोफांचा मारा करून आपलीं पलटणें पुढें घातली.

---

१. नातुकृत महादजी शिंदे यांचे चरित्र पान ७५

त्यानें दुराणीच्या उजव्या बाजूवरील रोहिले-पठाणांच्या फौजांवर हल्ला सुरूं केला. प्रहर दिवसाचे सुमारास सर्व फोजा चारी बाजूस निकरानें लढूं लागल्या. इब्राहिमखानानें इतक्या निकराचा एक हल्ला केला की, त्याबरोबर त्यानें आठ हजार रोहिले ठार केले. रोहिल्यांचे हाफिज रहिमतखान व दुंदीखान वगैरे सरदारांजवळ फौजा राहिल्या नाहीत व तेही जखमी झाले. इब्राहिमखानास गायकवाडानें पुष्कळ मदत केली. परंतु दोघेही जखमी झाले होते. याप्रमाणें दुराणीची डावी तुकडी बहुतेक खलास होत आली इतक्यांत मध्यभागीं दुराणीच्या वजीरावर भाऊसाहेबांनीं हल्ला केला.

२६. भाऊसाहेब व विश्वासराव यांनीं पहिल्या तडाक्यालाच दुराणीची पंधरा हजारांची फळी फोडली व त्यांचे तीन हजार लोक कापून काढले. त्यांत खुद्द वजिराचाही मुलगा मारला गेला. गोविंदपंत बुंदेल्यास यानेंच मारलें होतें. तो ठार होतांच वजीर घाबरला व त्याचे लोक पळूं लागले. वजिराची बाजू रिकामी होत चालली हें पाहून नजीबखानानें आपली फौज भाऊंवर घातली. दुराणी-वजीर घोड्यावरून खालीं आला व तो पायीच लढत होता. इकडे जनकोजी शिंद्याचे दहा हजार लोक व होळकराची फौज सुजा व नजीब यांच्या बरोबर लढत होती. परंतु नजीबनें तोंड फिरवून भाऊंवर चाल केलेली पहातांच जनकोजीनें आपली तुकडी भाऊंच्या सहाय्यास नेली. तेथें मोठें तुंबळ युद्ध सुरूं झालें. रोहिल्यांच्या जेजालांच्या माऱ्यामुळें शिंद्यांकडील हजारो लोक मेले. तथापि शत्रूकडे लढाईचा जोर कमी होऊन मराठ्यांचा रिघाव पुढे होऊं लागला. इकडे डावे बाजूस इब्राहिमखान, पवार आणि गायकवाड वगैरे सरदार गिलचे जेव्हां जेव्हां पुढें येत तेव्हां तेव्हां "हरहर महादेव" असा गजर करून त्यांच्यावर हल्ला चढवीत व त्यांस माघारें फिरवीत. तथापि या बाजूस गार्दी लोकांची सहा पलटणें कामास आली होतीं. यशवंतरावास गोळा लागल्यामुळें त्याचे लोकही माघार घेऊं लागले होते. तथापि मराठ्यांस जय येत चालला म्हणून दुराणीच्या सैन्यांत पळापळ सुरूं झाली होती. परंतु अबदल्लीनें जवळ असलेली चार हजार फौज पळणाऱ्या लोकांवर पाठवून त्यांस त्यानें पुनः

लढाईला उद्युक्त केलें, व निकराच्या लढाईला प्रारंभ झाला. दुपारीं दोन वाजण्याच्या सुमारास विश्वासरावांस एक गोळा लागून ते मरणोन्मुख होऊन अंबारींत पडले. हें पाहून भाऊंनी आपला हत्ती विश्वासरावांजवळ नेला. त्यांची ती स्थिति पाहून भाऊ निराश झाले. पण त्या स्थितींतही विश्वासरावांनीं भाऊंना 'तुह्मी चला, लढाई बिघडेल' असें सांगितलें. आतां विश्वासराव जगत नाहीं असें पाहून भाऊसाहेब जिवावर उदार झाले. ते हत्तीवरून उतरून घोड्यावर स्वार झाले. भाऊ व समशेरबहाद्दर पुन्हां लढाईंत घुसले. त्यांच्याजवळच शिंदेही लढत होते. इतक्यांत मराठ्यांची पिछाडी पळूं लागली. याच वेळीं मल्हारराव होळकर आपल्या लोकांनिशीं पळून गेला. नाना फडनवीसही परागंदा झाले. पार्वतीबाई अखेरपर्यंत भाऊंची मार्गप्रतीक्षा करीत रणक्षेत्रावर होत्या. शेवटीं त्याही वाट फुटेल तिकडे निघून गेल्या. भाऊसाहेब, समशेरबहादर, शिंदे व इब्राहीमखान हे शेवटपर्यंत लढत होते. मराठे पळूं लागले असें पाहून दुराणीनें त्यांची कत्तल सुरू केली. भाऊसाहेबांनीं यश मिळाल्याचीं वाद्यें सुरू केलीं. तीं ऐकून तरी पळालेले मराठे परत फिरतील अशी त्यांना आशा होती. परंतु ती निष्फळ ठरली. अबदल्लीच्या सर्व सैन्याचा भार भाऊसाहेबांच्या थोड्याशा राहिलेल्या सैन्यावर पडला. तेव्हां सोनाजी भापकर व तुकोजी शिंदे यांनीं भाऊसाहेबांस सांगितलें कीं, 'यावेळीं आपण आपला जीव वांचवा, नाहींतर सर्वनाश होईल.' पण भाऊंनी, 'विश्वासराव ठार झाले, आतां नानासाहेबांस तोंड दाखविण्याला मार्ग नाहीं,' असें उत्तर दिलें. भाऊसाहेब शेवटपर्यंत 'हाणा हाणा' असें ओरडत होते. त्यांच्या तोंडास कोरड पडली ह्मणून त्यांनीं मागे पाहिलें, तों सर्व मराठी सैन्य पळून गेलेलें त्यांना दिसलें. त्यावेळीं भाऊंना आकाशपाताळ एक झाल्याप्रमाणें होऊन ते त्वेषानें शत्रूंवर चाल करून गर्दीत मिसळले. जनकोजी शिंदेही पाठोपाठ होतेच. पण त्यांना शत्रूनें घेरून कैद केलें. याप्रमाणें सायंकाळाचे सुमारास मराठ्यांचा पूर्ण पराजय झाला. फक्त पळपुटे लोकांची मात्र कत्तल सुरू होती.

२७. भाऊसाहेब वगैरे सरदार पुनः तळावर येतील ह्मणून आशेनें हजारों लोक पानिपतकडे पळाले होते. त्यांची कत्तल होऊन सर्व खंदक

प्रेतांनीं भरून गेले. सर्व चीजवस्त, सामानसुमान, तोफा, डेरे वगैरे सर्व लहान-मोठें सामान शत्रूंच्या हातीं लागलें. सर्व रणक्षेत्रावर प्रेतांचे ढीगाचे ढीग पडले होते. मराठ्यांच्या तीन निशाणाजवळ तर हजारों मुर्दे पडले होते. या रण-संग्रामांत मराठयांचे जे वीसपंचवीस हजार लोक पळाले, त्याखेरीज बाकीचे सर्व कापले गेले किंवा कैद झाले.

२८. पळून गेलेल्या लोकांपैकीं सुमारें पांच सात हजार लोक दिल्लीकडे आले. त्यांत समशेरबहाद्दर मल्हारराव होळकर व भाऊसाहेबांची पत्नी पार्वतीबाई वगैरे माणसें होतीं. विठ्ठल शिवदेव, महादजी शिंदे, दमाजी गायकवाड, नाना फडनविस वगैरे दुसरे लोक, जशी ज्याला वाट मिळेल तिकडे मोठया संकटानें पळून गेले. दिल्लींत लढाईचें वाईट वर्तमान समजल्यानंतर नारोशंकरासह होळकर व पार्वतीबाई यांनीं दिल्ली सोडून जाटांचे मुलखाचा मार्ग धरिला. भाऊ-साहेबांचें वर्तमान समजतांच समशेरबहाद्दर शोकानें व्याकूळ होऊन भरत-पुरास मरण पावला. सुरजमल्ल जाटानें लढाईंतून जगून परत आलेल्या लोकांना पोटभर अन्न देऊन त्या सर्वांस माळव्यांत सुखरूप पोंचविलें.

२९. लढाईच्या दुसऱ्या दिवशीं सर्व कैदी लोकांची क्रूर रीतीनें शत्रूंनीं कत्तल केली. विश्वासरावाचें प्रेत सुजाउद्दवल्याचे हातीं सांपडलें होतें. उमरा-वगिर गोंसावी व सुजाउद्दवला यांचे खटपटीनें त्यास हिंदुधर्माप्रमाणें अंत्यग्नि मिळाला. भाऊंचें धड सांपडलें होतें व एका दुराणीनें त्यांचें शीर नेलें होतें तेंही आणून दिल्यावर त्या प्रेताचेंही यथाविधि दहन केलें असें काशीरायाचें म्हणणें आहे. बाकीच्या मराठे लोकांस भाऊंचें काय झालें हें समजलें नाहीं. भाऊ गर्दीत मिळाले, त्याच्यापलीकडे ते मेले, अगर पळून गेले, हें कोणासही माहीत नाहीं. ‘ भाऊसाहेबांची कैफियत ’ “ भाऊसाहेबांची बखर ” ‘ रघुनाथ यादवरावकृत पानिपतची बखर ’ वगैरे मराठी ग्रथांत भाऊंचा पत्ता लागला नाहीं असें दिलें असून कदाचित् ते पुनः परत येतील अशी आशा दर्शविली आहे. नाना फडनविस यांचें ह्मणणें ते मारले गेले असें आहे. पार्वती-बाईचें म्हणणें ते शत्रूची फळी फोडून गेले व लवकरच ते परत येतील असें

होतें. एकंदरींत लढाईच्या गर्दींत भाऊ बेपत्ता झाले एवढी गोष्ट मात्र सत्य आहे. याविषयीं एक स्वतंत्र प्रकरण पुढें यावयाचें आहे. त्या ठिकाणीं या गोष्टीचा यथायोग्य परामर्ष घेतला जाईल. सध्यां भाऊ गर्दींत दिसेनासे झाले एवढाच इतिहास येथें पुरें आहे.

३०. या लढाईतून[1] नाना फडनविस शीरसलामत व रक्ताचा एकही बिंदु त्यांच्या शरीरास न लागतां पुण्यास परत आले. त्याचप्रमाणें पार्वतीबाईही आल्या. नानासाहेबांना ही दुःखदायक बातमी समजतांच त्यांची कंबर खचली, त्यांची छाती फाटली. ते भाऊ, भाऊ, विश्वास, विश्वास, असें म्हणूं लागले. त्यांचें डोकें फिरून ते भ्रमिष्ट झाले. त्यांना जो एकदां दुःखाचा धक्का बसला त्यामुळें ते शोकाकुल होऊन थोड्याच दिवसांत म्हणजे इ. स. १७६१ च्या जून महिन्याच्या २३ व्या तारखेस पर्वतीच्या देवालयांत दिवंगत झाले.

३१. पानिपतच्या लढाईंत भाऊसाहेबांना अपयश कां आलें याचें विवेचन करण्याचें हें स्थळ नाहीं. त्या बाबतींत निरनिराळ्या इतिहासकारांची निरनिराळी कारणें असूं शकतील. परंतु येथें एवढें मात्र नमूद करून ठेवणें प्राप्त झालें आहे कीं, पेशव्यांच्या कारभारांत सदाशिवरावभाऊ नसावे असा जर गोपिकाबाईंनीं हट्ट[2] धरला नसता तर, पानिपतच्या लढाईचा असा जो घोर परिणाम मराठी राज्याला भोगावा लागला, तो लागला नसता, एवढें मात्र सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे.

१. मराठ्यांची फकृत बखर पान. २१३ आवृत्ति ६ वी. २. महादजी शिंदे यांचें नातूकृत चरित्र पान. ५५.



# प्रकरण ६ वें.

## माधवरावांची पेशवेपदावर स्थापना.

### इ० स० १७६२ ते इ० स० १७६३.

१. पानिपतच्या लढाईनंतर राघोबादादांनीं चालविलेली राज्याचा स्थिर-स्थावरता.—२. गोपिकाबाईचे खरे हस्तक नाना फडनविस बनले.—३. माधवरावांना पेशव्यांच्या गादीवर स्थापन करण्यास चार महिन्यांचा कालावधि कां लागला?—४. सातारच्या महाराजांकडून पेशवाईचीं वस्त्रें आणण्याबद्दल राघोबादादा व नाना यांतील मतभेद. शेवटीं राघोबादादा रामराजांकडून पेशवाईचीं वस्त्रें आणून पेशव्यांच्या गादीवर माधवरावांची स्थापना करतात.—५. ताराबाईचा मृत्यु व पेशव्यांबद्दल तिचे शेवटचे उद्गार.—६. नानासाहेब पेशवे करवीर संस्थानाधिपती यांचेबरोबर बेइमान कसे झाले?—७. राघोबादादांनीं जिजाबाईंना दत्तक घेण्याची परवानगी दिली, व त्यांनीं दत्तक पुत्रास गादीवर बसवून स्वतंत्रपणें राज्यकारभार चालविण्यास संमति दिली.—८. गोपिकाबाईचा राघोबादादांच्या कारभारामुळें झालेला जळफळाट. राघोबादादा व सखारामबापू कारभार सोडून घरीं बसतात.—९. राघोबादादा व आनंदीबाई यांचेबद्दल नाना फडनविस माधवराव पेशवे व गोपिकाबाई यांची मनें विशेष कलुषित करतात व पेशव्यांचें नवीन कारभारी मंडळ स्थापन करतात.—१०. राघोबादादा घरीं बसल्यानंतर पेशवाईचा कारभार कसा सुरू झाला.—११. माधवराव पेशव्यांच्या भोंवतीं स्वार्थी लोकांच्या कंपूचें जाळें असल्याबद्दलचा राघोबादादांस संशय येतो. माधवरावांच्या मनाची द्विधा स्थिति.—१२. पेशवाईच्या कारभारांत राघोबादादांची यावेळीं जरूरी कां होती.—१३. गोपिकाबाई व माधवराव यांचा राजपक्ष तयार करणारा नाना फडनविसांचा कंपू व राघोबादादांचा पक्ष यांच्यामधील लढाईची पूर्वतयारी. राघोबादादा पुणें सोडून नाशिकास जातात.—१४. घोडनदी व आळेगांवची लढाई. राघोबादादा माधवरावांचा पूर्ण पराभव करतात. माधवराव राघोबादादांस शरण येतो. माधवरावांच्या पक्षाचे सरदार परागंदा होतात. राघोबादादा व सखारामबापू पुन्हां कारभारांत येतात.—१५. राघोबादादांनीं माधवराव पेशव्यांना नजरकैदेंत कां ठेवलें

याचीं कारणें.—१६. राघोबादादांस पेशवाई गिळंकृत करावयाची होती, वगैरे त्यांचेवरील आरोप धादांत खोटे कां ?—१७. माधवराव पेशव्यांच्या पोरकट स्वभावधर्माचें चित्र.—१८. राघोबादादा आपलें नवीन कारभारी मंडळ तयार करतात. माधवरावांच्या पक्षांतील बहुतेक सरदार राघोबादादाबरोबर समेट करून घेतात. पटवर्धन सरदार राघोबादादास शरण न येतां त्यांचेबरोबर लढाई देण्याची तयारी करतात.—१९. राघोबादादांनी पटवर्धन सरदारावर हल्ला करून मिरज काबीज केलें.—२०. पटवर्धनाच्या बाबतींत राघोबादादांनीं दाखविलेला मनाचा थोरपणा.—२१. गोपाळराव पटवर्धन निजामाची नोकरी पत्करतो. निजाम त्याचे मदतीनें पेशव्यावर स्वारी करण्याचे ठरवितो.—२२. निजामाची पेशव्यांच्या सरदारांत फितूरी. राघोबादादाची निजामास तोंड देण्याची तयारी. गनिमी काव्याच्या लढाईची राघोबादादांनीं केलेली सुरवात.—२३. निजामानें पुण्यावर स्वारी करून पुरंदरपर्यंत जाळपोळ व लूटमार केली. तोच प्रकार राघोबादादांनीं हैद्राबाद व बेदरच्या प्रदेशांत केला.—२४. राघोबादादांनीं निजामाच्या पक्षाला जाऊन मिळालेले मराठे सरदार फोडून निजामाचा पक्ष कसा हलका केला.—२५. निजामाचा दिवाण विठ्ठल सुंदर याची राक्षसभुवनच्या संग्रामांतील कामगिरी.—२६. राक्षसभुवनच्या लढाईतील मल्हारराव होळकरांचें वर्तन. माधवराव पेशव्यांची या लढाईतील धडाडीच्या शौर्याची कामगिरी. राक्षसभुवनची लढाई राघोबादादा जिंकतात. विठ्ठल सुंदर लढाईत पडतो.—२७. माधवराव पेशव्यांच्या अंगीं पेशवाईचें राज्य करण्यास योग्य गुण आले असें पाहून राघोबादादा त्यांचेकडे आपल्याकडील पेशवाईचा कारभार सोपवितात.—२८. पेशवे लायख झाल्याबरोबर त्यांचा कारभार त्याच्या स्वाधीन करण्यांत राघोबादादांनीं केलेलें कर्तव्य व दाखविलेला मनाचा थोरपणा.—२९. गोपिकाबाई व नाना फडनविस यांच्या पक्षांतील एक प्रमुख सरदार गोपाळराव पटवर्धन हे कसे कपटकारस्थानी होते, तें दाखविणारा एक प्रसंग.—३०. गोपिकाबाई व नाना फडनविस यांच्या पक्षांतील सरदारांची नैतिक पात्रता.—३१. माधवराव पेशव्यांनीं आपलें नवीन कारभारी मंडळ स्थापन केलें. नाना फडनविसांनी राघोबादादांबरोबर कायमचा दावा धरण्यास घडलेलें कारण.—३२ राघोबादादांनीं गोपाळराव पटवर्धनांस मिरजेचा किल्ला परत देऊन दाखविलेला मनाचा दिलदारपणा.—३३. राघोबादादांच्या मनोधर्माचें एक प्रतीक.

१. पानिपतच्या लढाईमुळें भाऊसाहेब नाहींसे झाले, विश्वासराव मरण पावले व या दोघांच्या शोकामुळें नानासाहेब कालवश झाले, या एकंदर भयंकर प्रसंगांमुळें पेशव्यांच्या घरांतील गृहकलह कमी होईल असें त्यावेळीं कित्येकांना वाटलें असेल. कारण ज्यावेळीं राज्यांत शातता नादत असते, त्यावेळीं भाऊबंदी सारखे विषय पुढें येतात. पण ज्यावेळीं राज्यात परचक्राचे हल्ले येऊं लागतात त्यावेळीं भाऊबंदी बाजूला ठेवून राज्यसंकटनिवारण सर्वांना एकोप्यानें करावें लागतें. यावेळीं पेशवाईवर असाच प्रसंग होता. पानिपत येथील पराभवामुळें मराठी राज्याला जी चारी बाजूंनीं आग लागली होती, ती शमविण्याचा प्रयत्न करणें पेशव्यांचें आद्यकर्तव्य होऊन बसलें होतें. या दृष्टीनें राघोबादादांनीं साताऱ्यास महाराजांकडे जाऊन त्यांच्याकडून माधवरावांना पेशवाईचीं वस्त्रें आणण्याचा विचार चालविला.

२. मागें सांगितल्यप्रमाणे नानासाहेबांच्या कारकीर्दीत राजकारणाचे तीन निरनिराळे प्रवाह वहात होते. परंतु सध्या तरी भाऊसाहेबांचा एक प्रवाह बंद पडल्याप्रमाणें झाला होता. गोपिकाबाईंचा राजपक्ष आतां त्यांच्या हस्तकांच्या हातीं ह्मणजे नाना फडनविसांचे हातीं सर्वस्वी गेला होता. त्यांच्या खलबतखान्यांत, सुपीक डोक्याचे ह्मणजे नानाच होते. लोकांना दिसावयला गोपिकाबाई, परंतु आंतील सर्व कारवाइ नानांची होती. नाना हे नानासाहेबाच्या तालमींत तयार झालेले त्यांचे पक्के शागीर्द होते. ह्मणून त्यांची विचारसरणी नानासाहेबांच्याच ओघानें जाणारी होती. यावेळीं माधवरावांना गादीवर बसवून त्यांच्या नांवानें पेशवाईचें राज्यशकट चालविणें यांत कोणाचाच मतभेद नव्हता. परंतु त्याच्या तपशीलांत मात्र भानगडी होत्या, हें सूक्ष्म तऱ्हेनें इतिहासाचें अवलोकन केल्यास दिसून येतें.

३ नानासाहेब निवर्तल्यानंतर तीनचार महिन्यांनीं माधवरावांना पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. नानासाहेबांनासुद्धां थोरल्या बाजीरावांच्या मृत्यूनंतर पेशवाईचीं वस्त्रें मिळण्यास तीनचार महिन्यांचा अवधि लागला होता. त्यावेळीं निदान नानासाहेबांना पेशव्यांचीं वस्त्रें मिळूं नयेत असा प्रयत्न करणारा दुसरा पक्ष तरी

उत्पन्न झाला होता. ह्मणून साधक बाधक विचार करून नानासाहेबांना पेशव्याचीं वस्त्रें देण्याला शाहुमहाराजांना तीनचार महिन्यांचा काळ लोटला हें बरोबर होतें. परंतु माधवरावांच्या बाबतींत तसें कांहीं नव्हतें. सध्यां पेशव्यांच्या हातीं छत्रपतीची सत्ता होती. तेव्हां त्यांना वस्त्रें देणें हें सातारच्या महाराजांच्या मर्जीवर नसून तें पेशव्यांच्या हातांत होतें. ज्यावेळीं वस्त्रें पाहिजेत त्यावेळीं ती त्यांना मिळणें शक्य होतें. असें असतां एवढा कालावधि कां गेला हें पहाणें येथें इष्ट आहे.

४. साताऱ्याच्या महाराजांकडून माधवराव पेशव्याना गादीवर बसविण्याचे वेळीं पेशव्याचीं वस्त्रें आणावीं कीं न आणावीं या तत्वावरच राजपक्ष व राघोबादादांचा कारभारीपक्ष यांत मतभेद झाला. गोपिकाबाई ह्मणजे नाना फडनविस यांचे ह्मणणें असें होतें कीं, " सांगोल्याच्या तहानंतर छत्रपतीच्या गादीचे सर्व हक्क पेशव्यांना प्राप्त झाले. असें असतां आतां माधवरावांच्या राज्यारोहण प्रसंगीं जुन्या पद्धतीप्रमाणें साताऱ्याहून वस्त्रें आणण्याचें कारण नाहीं. यावेळीं दुसऱ्या कोणत्याही राजकारणाकरतां जर एकदां तीं साताऱ्याच्या नामधारी राजांकडून आणण्याची प्रथा आपण पाडली तर त्यांचा वरिष्ठ अधिकार आपण मान्य केल्याप्रमाणें होईल व नानासाहेब आणि भाऊसाहेब यांनीं अति परिश्रमानें मिळविलेला मराठी राज्याचा सर्वाधिकार आपण आपल्या हातानें गमावल्याप्रमाणें होईल. तेव्हां साताऱ्याहून पेशवाईचीं वस्त्रें आणलीं जाऊं नयेत. " राजपक्षाचें म्हणणें असें होतें. राघोबादादांचे व त्यांच्या पक्षांतील लोकांचें असें ह्मणणें होतें कीं, जुन्या परंपरेला दुखवावयाचें नाहीं व नव्याला सोडावयाचें नाहीं. यावेळीं महाराजांकडून वस्त्रें न आणवितां आपण जर कारभार सुरू केला, तर नागपूरकर भोंसले, शिंदे, होळकर, गायकवाड वगैरे सरदार आजपर्यंत छत्रपतीची गादी पेशव्यांनीं गिळंकृत केली असें जें मनांत ह्मणत होते, तें आतां उघड ह्मणूं लागतील, व क्रमाक्रमाने तेही अशाच पद्धतीनें स्वतंत्र होऊं पाहतील. ताराबाई व करवीरच्या जिजाबाई पेशव्यांना उघड रीतीनें बंडखोर ठरवून याचवेळीं कलह माजवितील. त्यामुळें निजाम, हैदर, इंग्रज वगैरे पर-

शत्रूंना आयतेंच फावेल. शिवाय या अंतर्बाह्य शत्रूंना यावेळीं एकट्या पेशव्यांना पानिपतच्या प्रचंड हानीमुळें तोंड देता येणें अशक्य आहे. तेव्हां सरळ मार्ग ह्मणजे साताऱ्याहून महाराजांच्या हस्तें पेशवाईचीं वस्त्रें आणून माधवरावांना गादीवर बसविणें हेंच योग्य आहे. यावेळी नानाच्या पक्षापेक्षां राघोबादादांचा पक्ष वरचढ होता. तेव्हां खुद्द माधवरावांना दादांच्या मताविरुद्ध जातां येण्यासारखें नव्हतें. राघोबादादा व सखाराम बापू यांनीं ताराबाईकडे सधान बांधून साताऱ्याच्या महाराजांकडून माधवरावांना पेशवाईचीं वस्त्रें देण्याची खटपट चालविली व नंतर माधवराव यांना घेऊन ते साताऱ्यास जाण्याच्या तयारीस लागले. त्यावेळीं त्यांनीं नानास बरोबर येण्याबद्दल सांगितलें. राजपक्षाच्या तत्वाप्रमाणे नाना पुढारी असल्यानें त्यांच्या मनांत साताऱ्यास जाण्याचें नव्हतें. ते ह्मणाले "आपण पेशव्यांचे नौकर. साताऱ्याच्या महाराजांशीं आपला अर्थाअर्थीं कांहीं संबंध नाहीं." या नानाच्या एका वाक्यांत त्यांच्या पक्षाच्या विचारसरणीचे सर्व रहस्य एकवटलेलें होतें. परंतु राघोबादादांपुढें यावेळीं नानास कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. ह्मणून त्यांनीं मनांतली गोष्ट मनांत ठेऊन दादाच्या आग्रहास्तव तेही साताऱ्यास जाण्यास निघाले. राघोबादादाच्या सल्ल्याप्रमाणे त्यांनी माधवराव यांस साताऱ्यास नेऊन तेथून रामराजाकडून त्यांना पेशवाईचीं वस्त्रें, शिक्का, कट्यार ही देवविली. व माधवराव नंतर पुण्यास येऊन पेशव्यांच्या गादीवर बसले. त्यावेळीं त्याचे वय अवघें सतरा वर्षांचे होतें राघोबादादा पेशवाईचा कारभार पाहूं लागले, सखारामबापू याची दिवाणपदावर नेमणूक झाली. ही हकीकत इ. स. १७६१ च्या सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस झाली.

५. यानंतर सुमारें तीन महिन्यांनीं महाराणी ताराबाईसाहेब या स्वर्गवासी झाल्या. त्यावेळीं त्यांचें वय ८६ वर्षांचें होते त्या जिवंत होत्या तोंपर्यंत नानासाहेब व सदाशिवरावभाऊ यांच्या नांवानें त्या खडे फोडीत

---

१ देवकृत नाना फडनविस यांचें चरित्र पान १७.

असत. 'हे मेले माझ्या देखतच उलथून पडले, यानें माझ्या डोळ्याचें पारणें फिटलें. आतां मी सुखानें मरेन.' हे त्यांचे अखेरचे शब्द होते. ताराबाईच्या या द्वेषामुळें गोपिकाबाई व नाना फडनविस यांचा पक्ष त्यांच्या अगदी विरुद्ध होता. त्याचप्रमाणें नानासाहेबांनीं करवीर संस्थान जप्त करण्याकरतां सरदार पाठविले त्यांचा, राणी जिजाबाईनें पराभव केला व आपण स्वतंत्रपणानें करवीरचें राज्य ती चालवूं लागली, ह्मणून तिचाही हा राजपक्ष द्वेष करीत होता.

६. इ. स. १७६१ च्या जानेवारी महिन्यांत करवीर संस्थानाधिपति संभाजीमहाराज मृत्यु पावले. त्यापूर्वीं फक्त बाराच वर्षे करवीर संस्थान स्वतंत्र चालविण्याविषयीं, पेशव्यांनीं शाहुमहाराजाकडून छत्रपतीच्या गादीचे सर्वाधिकार ज्या याद्यांच्या साधनानें घतले, त्यात स्पष्ट उल्लेख आहे, व त्याप्रमाणें नानासाहेबानीं पुढ ते स्वतंत्र राज्य त्या पद्धतीनेंच चालविलें. पुढें सदाशिवरावभाऊ करवीरकरांची नोकरी करण्याकरतां ज्यावेळीं पुणें सोडून निघाले त्यावेळीं नानासाहेबांनी भाऊना पेशवाईचा कारभार देऊन त्यांस पुण्यास ठेऊन घेतले व संभाजीमहाराज आणि जिजाबाईसाहेब यांस असें सांगून पाठविले कीं, "आह्मी भाऊसाहेबाची समजूत काढिली आहे. इकडच्या राजमंडळांत आह्मीं पेशवे आहोंत ते तुमचेच आहोंत. सर्व राज्याची पेशवाई एकट्या आह्मासच द्यावी." याप्रमाणे निरोप पाठविल्यावर इ. स. १७५३ मध्यें नानासाहेब करवीरला गेले, त्यावेळींही नानासाहेबांनीं संभाजीमहाराजाजवळ करवीरचें राज्य स्वतंत्रपणे चालविण्याचें कबूल केलें. संभाजीमहाराजांनीं पुढें पेशव्यांबरोबर कोणत्याच प्रकारची प्रतारणा केली नाहीं. पण संभाजीमहाराज मृत्यू पावतांच नानासाहेबांची बुद्धि फिरली. त्यानीं करवीर संस्थान जप्त करून तें पेशवाईला जोडण्याचा घाट घातला. त्याप्रमाणें त्यांनीं हरिराम व विसाजी नारायण या दोन सरदारांबरोबर पांच हजार सैन्य देऊन करवीर संस्थान जप्त करण्याकरतां त्यांना पाठविलें. या नानासाहेबाच्या विश्वासघाताच्या वर्तनानें राणी जिजाबाईसाहेब

यांना विलक्षण संताप आला. त्यांनीं नानासाहेबांना 'बेइमान' म्हणून दूषण लाविलें. शेवटीं करवीरास जप्तीस आलेल्या सरदारांवर तिनें हल्ला करून त्यांचा पुरा मोड केला व त्यांची धूळधाण उडवून त्यांस हांकलून लाविलें. सध्यांच्या राजपक्षाचें करवीरच्या जिजाबाईसाहेब यांच्याबरोबर वैमनस्य असण्याचें कारण हें आहे.

७. इ. स. १७६२ मध्यें राघोबादादा कारभार पहात असतांना माधवराव पेशवे व त्रिंबक मामा पेठे यांस समागमें घेऊन ते कर्नाटकाच्या स्वारीला गेले. त्या स्वारींत त्यांनीं 'जयरामस्वामीचें' वडगांव लुटलें व करवीर संस्थानच्या राज्यांतही थोडीबहुत धामधूम केली. त्यावेळीं राणी जिजाबाई यांनीं तेथें येऊन राघोबादादा यांची भेट घेतली. त्यामुळे त्यांच्या राज्यांतील धामधूम बंद पडली. नंतर पेशवे पुण्यास आले. त्यांच्या मागोमाग राणी जिजाबाईही पुण्यास येऊन दाखल झाल्या. यावेळीं त्यांना करवीरच्या गादीचें पुढें काय करावयाचें याचा निकाल पेशव्यांकडून करून घ्यावयाचा होता. नानासाहेबांनीं करवीर संस्थानचा प्रश्न उपस्थित केला होता, त्याचा निकाल राघोबादादा यांना दरबार भरवूनच दिला पाहिजे होता. दरबारांत माधवराव पेशवे, रघुनाथराव, सखाराम बापू वगैरे मंडळींस राणी जिजाबाईनीं स्पष्ट सांगितलें कीं, 'दत्तक घेऊन माझ्या सर्व राज्याचा कारभार पूर्वीप्रमाणें मी स्वतः करणार. हा दत्तक तुम्हीं कबूल करीत असाल व करवीरचें राज्य मजकडे रहूं देत असाल तर बरें. तसें नसेल तर, आपण करवीरास परत न जातां याच पायीं काशीयात्रेस जाणार; राज्याचें वाटेल तें तुम्हीं करावें." छत्रपती थोरल्या शिवाजीमहाराजांची नातसून राणी जिजाबाई भर दरबारांत याप्रमाणे बोलल्यावर राघोबादादांना त्याचा पोक्त विचार करणें भाग पडलें. राज्यलोभामुळें नानासाहेबांनीं करवीरचें राज्य जप्त करण्याचा हुकूम दिला ही गोष्ट अन्यायाची होय, असें त्यांना दिसून आलें, शिवाय करवीरचें राज्य स्वतंत्र चालविण्याची शाहु-

१. इचलकरंजी संस्थानचा इतिहास पा० ५३.

महाराजांची आज्ञा आहे असा विचार करून दादासाहेबांनीं राणी जिजाबाईसाहेब यांना दत्तक घेण्याची परवानगी दिली व पूर्ववत् करवीरचें राज्य स्वतंत्रपणें चालविण्याबद्दलही संमति दिली. राणी जिजाबाईसाहेब करवीरला परत गेल्या, व पुढें लवकरच त्यांनी दत्तक घेतला. त्या दत्तक मुलाचें नांव शिवाजी असें ठेऊन त्या स्वतः राज्यकारभार पाहूं लागल्या.

८. साताऱ्याहून राणी ताराबाई यांच्या संमतीनें रामराजे यांचेकडून माधवरावांना पेशवाईची वस्त्रे आणणें आणि करवीरचे राज्य जप्त न करतां राणी जिजाबाईंना दत्तक घेण्याची परवानगी देऊन त्यांचे पूर्ववत् स्वतंत्र राज्य चालविणे हें राघोबादादाचे कृत्य अन्यायाचे अगर पेशवाईच्या नाशाचें होतें असें कोणत्याही प्रामाणिक विचारवंताला वाटणार नाहीं. असें करणें हें कोणत्याही राजकर्त्या पुरुषाला न्यायाचें ह्मणून भूषणावह असेच होतें. परंतु ज्यांना स्वार्थापलीकडे दृष्टि नाहीं अशा लोभी माणसाना, हे दादासाहेबाचे कृत्य पेशवाईच्या नाशाचे झालें असेंच वाटले. नाना फडनविस यांच्या राजपक्षाला हें दादांचें करणें विषासमान वाटले. नानासाहेबांनीं मुत्सद्दगिरी लढवून साताऱ्याचें राज्य मिळविलें व करवीरच्या राज्याला पुत्रसंतान नाहीं ह्मणून तेंही मिळविण्याचा घाट घातला असतां, राघोबादादा हे पेशवाईचा फायदा न पहाता, सातारच्या राजांचे महत्व मानतात व घरीं चालून आलेलें करवीरचे राज्य आपल्या हातानीं लोटून देतात, हे पेशवाईचें धडधडीत नुकसान दादासाहेबांच्या कारभारामुळे होते, असे राजपक्षाला वाटूं लागलें. नाना हे स्वतः दादासाहेबांना कोणतीच गोष्ट बोलू शकत नव्हते. त्यांच्या पक्षाचे मुख ह्मणजे गोपिकाबाई या होत्या. त्यांनीं दादासाहेब व सखारामबापू यांच्यावर तोंडसुख घेण्याला सुरवात केली. 'हे दोघे राज्याचा कारभार आटोपून माझ्या मुलांना भिकेला लावतील' अशी त्यांनीं कुरापत काढण्यास सुरवात केली. गोपिकाबाईंच्या अशा विषारी वाग्बाणांनीं भाऊसाहेबांचें डोकें पूर्वीं फिरून गेलें होतें. तोच प्रयोग या वेळीं दादासाहेबांवर सुरू झाला. राघोबादादा हे सरळ मनाचे व सरळ विचाराचे होते,

गोपिकाबाईंना फूस देणारा एकादा नानासारखा मंत्री त्यांच्या मागें उभा असेल अशी दादांना आतांपर्यंत शंका नव्हती. ह्मणून ही गोपिकाबाईंची केवळ स्त्रीबुद्धि असेल असेंच त्यांना वाटलें. आपण राज्याचा कारभार प्रामाणिकपणानें करतों पण तो बाईंना पसंत पडत नाहीं; उलट तो त्यांच्या मुलांना भिकेला लावणारा होतो अशीं कुजकीं व आपल्या चारित्र्याला कलंक लावणारीं बोलणीं प्रत्यक्ष पेशव्यांची आई धडधडीत बोलते, हें दादासाहेबांना सहन झालें नाहीं. त्यांना त्यामुळें अतिशय वाईट वाटले व रागही आला. नानासारख्या धूर्त व कारस्थानी पुरुषाला मनुष्यस्वभावाची उत्तम पारख होती. राघोबादादा हे लष्करीबाण्याचे सीधे इसम असल्यामुळें, त्यांच्यावर भलत्याच आरोपांचा मारा सुरू झाल्यास ते चिडून जातील, हें त्यांना पक्के माहीत होतें. ह्मणून गोपिकाबाईंच्या बडबडीचा तोफखाना त्यांनीं त्यांच्यावर कायम चालू ठेवला होता. त्यामुळें दादा व सखारामबापू आपापल्या कामाचे राजीनामे देऊन घरीं स्वस्थ बसले.

९. 'पेशवाईचा प्रचंड कारभार माधवरावांसारख्या अठरा वर्षांच्या मुलाला थोडाच आटपणार आहे ? सध्यां तो आपल्या आईच्या तंत्रानें वागतो, पण थोड्याच दिवसांत त्याला राजकारभार आटपत नाहीं असें दिसून येतांच, पुनः तो आपणांला परत कामावर बोलवील ' या पक्षीकडे राजीनामे देतांना या उभयतांच्या धोरणाची मजल गेली नव्हती. नानासाहेबांनंतर नाना फडनविस हे कोणत्याच अधिकारावर नसल्यामुळें प्रत्यक्ष राजकारभारांत ते नव्हते, तरी त्याचें गुप्त कारस्थान चालूच होतें. या काळांत गोपिकाबाईंचें मन दादांविषयी पूर्ण कलुषित करणें आणि माधवराव हे त्यांचे स्वतःचे खेळगडी असल्यानें त्याचेही धोरण दादांच्या विरुद्ध बनविणें नानांना सहज साध्य झालें. या वेळीं राघोबादादाची बायको आनंदीबाई अवध्या तेरा चौदा वर्षांच्या वयाची होती. या वयांत आपलें व दुसऱ्याचें हित कळण्याइतकेंहि ज्ञान तिला असेल किंवा नसेल याची शंका होती. परंतु तिच्याबद्दलही गोपिकाबाईंच्या मनांत त्यांनीं विकल्प भरविले.

माधवरावांच्या हातीं प्रत्यक्ष कारभार आल्यानंतर पेशवाईचें स्वतंत्र प्रधान-मंडळ कसें व कोणतें असावें याचा पूर्ण विचार करून आपल्या कारस्थानाला नानांनीं गोपिकाबाईची व माधवरावांची सहानुभूति घेऊन ठेवली होती. सदर कारवाईत अत्यंत गुप्तपणा राखल्यामुळें दादा व बापू यांना कोणतीच कल्पना आली नाहीं. त्यांना वाटलें कीं 'हीं पोरेंपोरें काय करणार आहेत!' परंतु त्यांनीं राजीनामे देतांच दुसऱ्या कारभाऱ्यांची योजना झाली हें पाहून त्यांचे डोळे उघडले. तरी पण या कारस्थानाच्या मुळाशीं त्रिंबकमामा पेठे व गोपाळराव पटवर्धन असावेत असें त्यांना वाटलें कारण नाना आपल्या सर्व हालचालींत एवढी धूर्तता राखीत कीं कोणतीही जबाबदारी प्रथमतः ते आपल्या शिरावर घेत नसत. कोणतेंही कारस्थान आपल्याला पचेल अशी खात्री झाल्याशिवाय ते स्वतः पुढें येत नसत. कोणतेंही नवीन कारस्थान करतेवेळीं पहिल्यानें दुसऱ्याला पुढें करावयाचें व आपण नामानिराळे रहावयाचें; कारस्थानाचीं सर्व गुप्त सूत्रें मात्र आपल्या हातीं ठेवावयाचीं ही हातोटी नानांना उत्तम साधली होती. राज्यकारभाराचीं सूत्रें हालविणारी मुख्य शक्ति जे पेशवे त्यांना हरप्रयत्नानें आपल्या मुठींत ठेवण्याची त्यांची नेहमीं धडपड असे. त्यामुळें नवीन राज्यव्यवस्थेंतही नानांचें उघड असें अंग कोठेंच दिसून आलें नाहीं.

१०. राघोबादादा व सखाराम बापू राजीनामे देऊन घरीं बसल्यानंतर त्रिंबकमामा पेठे व नानांचे चुलते बाबूराव फडनविस अशा दोघांना गोपिकाबाईनीं कारभारांत घेतलें. त्रिंबकरावमामा यांना दिवाणगिरी, व बाबूराव यांना फडणिशी दिली. गोपाळराव पटवर्धन यांना त्रिंबकराव मामा यांच्या हाताखालीं दिलें. याप्रमाणें पेशव्यांच्या राज्याचा कारभार सुरू झाला.

११. वरील मंडळीला राज्यकारभारांत घेतल्यामुळें दादा व बापू या उभयतांची मुळींच जरूरी भासली नाहीं. तेव्हां मात्र त्यांची पक्की खात्री झाली कीं माधवरावांच्या या कृत्यामागें कांहीं लोकांचा एक स्वतंत्र कट असून त्या कटा-

---

१ इचलकरंजी संस्थानचा इतिहास पान ९२.

तील कंपूच्या मनांत आपला कारभारीपणाचा हक्क काढून घ्यावयाचा आहे. ती वेळ व तो काळ असा होता कीं, हक्काची शाबिती मणगटाच्या बळावर अवलंबून असे. राघोबादादांना आपला हक्क गेला ह्मणून वाईट वाटलें नाहीं. कारण त्यावेळीं त्यांच्या मणगटांत भरपूर सामर्थ्य होतें. पुण्याची पेशवाई सोडून सदाशिवरावभाऊप्रमाणें दुसरीकडे कोठें जावयाचें त्यांच्या मनांत आलें असतें, तर ते जाऊं शकले असते, आणि स्वपराक्रमावर त्यांनीं नांवलौकिक व ऐश्वर्य संपादन केलें असतें. पण त्यांना जी चीड आली ती कारस्थानी लोकांची होती. भलभलत्या गोष्टींनीं गोपिकाबाई व माधवराव यांचीं मनें दूषित करून अखेर पेशव्यांच्या इभ्रतीला हा कंपू काळें फांसणार असें त्यांना पक्कें वाटलें. कारस्थानी कंपूला पेशव्यांच्या अब्रूची काय चाड असणार! त्यांचा जन्म पेशव्यांच्या घराण्यांतला नव्हता किंवा पेशवाई मिळविण्याकरतां त्यांचे श्रम खर्ची पडले नव्हते. अशा स्थितींत केवळ अधिकाराची लालसा व स्वार्थी महत्वाकांक्षा यापलीकडे त्यांची दृष्टि धांवणें शक्य नव्हतें. शिवाय दादासाहेब जें कांहीं सांगतात व करतात त्यामध्यें आपलें व राज्याचें अंतिम कल्याण कसें आहे हें ओळखण्याचें ज्ञान माधरावांना त्यावेळीं नव्हतें. ते वयानें लहान असल्यामुळें राजकारणाचे धागेदोरे उकलण्याइतकी त्यांना बुद्धि नव्हती. ते जरी बुद्धिवान् होते तरी, राजकारणाचा अभ्यास झाल्याशिवाय त्यांना कांहीं कळण्यासारखें नव्हतें. ह्मणून आपल्या कळकळीच्या माणसांवर अवलंबून राहणें हेंच त्यांना इष्ट वाटत होतें. त्यांच्या मनावर घरच्या मंडळींचा दाब पडत असे. एकदां त्यांना दादांचा पक्ष खरा वाटे; पुनः आपल्या आईच्या पक्षाची त्यांना सत्यता पटे. अशा परस्परविरुद्ध विचारांच्या द्वंद्वांत माधवरावांचा कालक्षेप चालला होता.

१२. पेशवाईच्या कारभाराच्या अधिकारासंबंधीं कांहींही होवो. त्या बाबतींत दादासाहेबांच्या तंत्रानें कारभार चालला काय किंवा गोपिकाबाईंच्या तंत्रानें तो चालला काय, त्रयस्थांच्या दृष्टीनें तें सारखेंच होतें. परंतु पेशवाईच्या कल्याणाच्या दृष्टीनें त्यावेळीं दादासाहेबांनीं कारभार हांकणें राज्याच्या कल्याणाचें होतें. कारण पानिपतच्या लढाईंत पेशव्यांचें जरी सर्व गेलें होतें तरी पुण्याला

अद्यापि " राघोबा भरारी " आहे याची दहशत हिंदुस्थानांतील लोकांना होती. शिंदे, होळकर, गायकवाड, नागपूरकर भोंसले, अक्कलकोटकर, कोल्हापूरकर सातारकर भोंसले, प्रतिनिधि, सचीव, आंग्रे, सावंत आणि सुरत, जंजिरा, सावनूर, अर्काट येथील नबाब, इंग्रज, वगैरेंवर दादासाहेबांचें चांगलें वजन होतें व त्यांचा त्यांना मोठा दराराही वाटत होता. पेशव्यांच्या राज्यकारभारांतून दादासाहेबांचें उच्चाटन झालें असें जर त्यांना समजलें असतें तर त्यावेळीं पेशवाईची सर्वांनीं मिळून कुतरओढ केली असती. कारण पेशवाईबद्दल साताराच्या गादीप्रमाणें लोकांत पूज्यभाव असण्याचें कारण नव्हतें. शिवाय पानिपतच्या प्रचंड पराभवामुळें त्यांत भर पडली होती. फक्त पुण्याच्या सरदारांना जो काय अभिमान वाटत होता तेवढाच. अशा स्थितींत राघोबादादांप्रमाणें माधवराव पेशव्यांचा नांवलौकिक व दरारा बसेपर्यंत दादासाहेबांची पेशवाईच्या कारभाराला अत्यंत जरूरी होती. उलटपक्षीं दादासाहेबांची योग्यता माधवराव, त्रिंबकराव मामा, बाबूराव फडणीस किंवा गोपाळराव पटवर्धन यांच्यांत त्यावेळीं तरी नव्हती, ही गोष्ट कोणालाही अमान्य करतां येण्यासारखी नव्हती. तेव्हां गोपिकाबाईला पुढें करून पेशवाईच्या नाशाचें जें खूळ कारस्थानी लोकांनीं माजविलें होतें तें मोडून टाकणें दादासाहेबांचें कर्तव्यच होतें. त्याप्रमाणें त्यांनीं आपलें कर्तव्य बरोबर बजावलें याची साक्ष पुढील इतिहास देईल.

१३. वर दर्शविल्याप्रमाणें दादासाहेब व सखारामबापू यांना अलग ठेऊन कारभार चालविण्याचें गोपिकाबाई यांनीं सुरू केलेलें पाहून, दादासाहेब पुणें सोडून नाशिकला गेले. दादासाहेबांबरोबर आबा पुरंदरे, महिपतराव चिटणीस, कृष्णराव पारसनीस व रामचंद्र गणेश कानडे हे गेलेच होते. विठ्ठलराव विंचूरकर, नारो शंकर, अंताजी माणकेश्वराचा पुत्र व दुसरे कांहीं देशस्थ सरदार यांनीं दादासाहेबांच्या व सखारामबापूंच्या सांगण्यावरून सैन्य जमविण्याची तयारी केली. सखाराम बापू पुण्यास होते तेही दादासाहेबांस जाऊन मिळाले. लढाईवर प्रसंग येतो असें पाहून इकडे गोपिकाबाईंच्या

कारभाऱ्यांनीही फौजा जमविण्याची सिद्धता केली. मल्हारराव होळकर, रायाजी पवार, रामचंद्र जाधव, पीराजी नाईक निंबाळकर यांनीं माधवरावांच्या पक्षास न सोडण्याचें वचन दिलें. परंतु होळकर व जाधव हे वरकरणीं लढाईला उत्सुकता दाखवीत. पण आंतून त्यांचा ओढा प्रतिपक्षाकडेच होता. विसाजीपंत बिनीवाले यांचीही तीच स्थिति होती. आनंदराव रास्ते, तात्या घोरपडे, नरसिंगराव धायगुडे इतकेजण मात्र माधवरावांचा पक्ष स्वीकारण्यांत पुढारी होते. त्या सर्वांजवळ फौजेची तयारी विशेष नसल्यामुळें त्या सर्वांची भिस्त गोपाळराव पटवर्धनांवर होती. ते व त्यांचें घराणें मात्र दादासाहेब व सखारामबापू यांचा पक्का द्वेष करणारें होतें. तेव्हां याप्रसंगीं लढाईची तयारी करण्यास गोपाळरावांकडून बिलकूल कसूर होणार नाहीं हें गोपिकाबाईस व दरबारांतील लोकांस माहीत होतें. गोपाळराव स्वतः व निळकंठराव, वामनराव, परशुरामभाऊ, कोन्हेरराव, नारायणराव, मोरोबा, विनायकराव, धोंडोपंत हे सर्व पटवर्धन—सरदार यावेळीं पुण्यास युद्धाची तयारी करण्यांत तत्पर होते. सर्वांस हरएक गोष्टींत मसलत सांगणारा, व युद्धसाहित्य आणि सैन्य जमा करून पुण्याकडे रवाना करण्यास मदत करणारा गोविंद हरी मिरजेस होता. पुण्यास बाबूराव फडनविस व त्रिंबकराव मामा या दोघांनी हुजुरात दहाबारा हजारापर्यंत जमा करण्याची व्यवस्था केली होती. शिवाय होळकर वगैरे सरदारांचीं पथकें होतींच. गोपाळरावांनीं पटवर्धनांच्या तीनही पथकांतील आठ हजार फौजेस नालबंदी देऊन पुण्यास दसरा झाल्याबरोबर निघून येण्यास ताकीद केली होती. परंतु तितकी फौज वेळेवर पुण्यास जाऊन पोंचली नाहीं. कित्येक शिलेदार तर घरींच बसून राहिले.

१४. दादासाहेब औरंगाबादेस गेले. त्यावेळीं त्या शहराचा मुख्य अधिकारी मुरादखान होता. त्यानें दादासाहेबांचा मोठा सन्मान केला. त्यानें दादासाहेबांच्या इच्छेप्रमाणें मोंगल सैन्याची त्यांना मदत केली. त्या ठिकाणीं बरेच मराठे सरदारही त्यांच्या मदतीकरतां धावून आले. मोंगलांची फौज मदतीला आल्यानंतर दादासाहेब पुण्याच्या रोखानें कूच करून चालून आले. इकडे माधवराव

पेशवेही आपले सरदार व सर्व फौज घेऊन मुकाबल्यास निघाले. दोन्हीं सैन्यांची घोडनदीवर गांठ पडली व लढाई झाली. तींत दादासाहेबांच्या फौजेनें हल्ला केला होता, तो पेशव्यांनीं मोठ्या शर्तीनें परत फिरविला. नंतर समेट करण्याचें बोलणें सुरू झालें. परंतु दादासाहेबांचा एकच आग्रह कीं, पेशव्यांनीं आपले कारभारी व सरदार दूर करून स्वतः आपल्या हस्तगत व्हावें. पेशव्यांची फौज थोडी असल्यामुळें दादासाहेबांपुढें आपला निभाव लागणार नाहीं हें त्यांस पक्कें माहीत होतें. शिवाय निजामअल्ली दादासाहेबांस मदत करण्याकरतां फौजेनिशीं स्वतः निघाला होता व त्याचप्रमाणें जानोजी भोंसले हा आपल्या फौजेसह पुण्याच्या रोंखानें निघाला होता. यामुळें माधवराव पेशवे घाबरून गेले होते. म्हणून घरांतल्या घरांत जास्त कलह माजविण्यापेक्षां दादासाहेबांच्या स्वाधीन व्हावें असा त्यांचा मनोदय होता. परंतु त्यांचे सरदार व कारभारी यांनीं आणखी लढाई करण्याचा हिय्या बांधला. रविवार तारीख ७ नोव्हेंबर सन १७६२ रोजीं घोडनदीची लढाई झाली. पुढें चार दिवस तेथेंच मुक्काम होता. पांचवे दिवशीं शुक्रवारीं पेशव्यांची फौज मागें हटत आळेगांवपर्यंत आली, तों दादासाहेब सड्या फौजेनिशीं पाठलाग करीत आले. पुनः आळेगांव मुक्कामीं सायंकाळच्या प्रहर दिवसापासून अस्तमानपर्यंत मोठ्या निकराचें युद्ध झालें. आपल्या फौजेचा पराभव होतो असें पाहून माधवराव पेशवे अठरा वर्षांच्या वयाचे असतांनाही स्वतः सैन्याचे पुढारी होऊन त्यांनीं पराक्रम व मेहनत फारच केली. त्याचप्रमाणें पीराजी नाईक निंबाळकर व पटवर्धन मंडळी जिवावर उदार होऊन शेवटपर्यंत झुंझत होती. पटवर्धनांपैकीं निळकंठरावांस गोळीची जखम झाली. नारायणरावांस तरवारीची जखम झाली. भास्करपंतास डोक्यावर वार लागला. याप्रमाणें पटवर्धनांचे फौजेची फार वाताहत झाली. पेशव्यांच्या सैन्याचाही मोड झाला. तेव्हां ते रातोरात भीमा पार होऊन निघून गेले. दुसऱ्या दिवशीं दादासाहेबांनीं त्वरेनें येऊन त्यांस गांठलें व त्यांचा धुव्वा उडविला. तेव्हां आपल्या सरदारांस जिकडे मार्ग फुटेल तिकडे जाऊन जीव वांचवावे असें सांगून माधवराव दादासाहेबांना शरण आले. त्यामुळें

पेशव्यांच्या राज्याचा कारभार दादासाहेबांकडे आला व इतउत्तर माधवरावांनीं दादासाहेब व सखारामबापू यांच्या सांगण्याबाहेर वागूं नये असें ठरलें.

१५. राघोबादादांनीं माधवराव पेशव्यांना नजरकैदेंत ठेविलें ह्मणजे त्यांनीं त्यांचें पेशवेपद गिळंकृत केलें असें मात्र कोणीं समजूं नये. त्याचा इतिहास पुढें ओघानें येईलच. स्वतः गोपिकाबाईनीं व त्यांच्या पक्षांतील लोकांनीं दादासाहेबांच्या विरुद्ध तोंडसुख घेण्याचा जो एकदां पाया घातला, त्यावर त्यांच्या पक्षांतील लोकांनीं आपापल्या बुद्धीप्रमाणें इमारती रचल्या. त्याचप्रमाणें आनंदीबाईंना कैदाशीण, कृत्या, वगैरे जीं विशेषणें एकदां गोपिकाबाईनीं देण्याला सुरवात केली होती, त्याच्या आधारावरही इतर लोकांनीं आपापल्या कल्पनेचे मनोरे उभारले. राघोबादादा स्त्रैण होते, ते आपल्या बायकोच्या तंत्रानें वागत, आनंदीबाईनें त्यांना आपल्या सौंदर्यानें मोहित केलें होतें वगैरे सर्व आरोप दिशाभूल करविणारे निव्वळ दरबारी थाटाचे होते. राजघराण्यांतील पुरुषांत दुफळी पाडल्याशिवाय मधल्या कारस्थानी लोकांचा स्वार्थ साधत नाहीं ह्मणून ही क्लृप्ति होती. आपल्या भेदनीतीचा उपयोग करतांना एकाद्या पक्षाच्या कल्याणाचे ह्मणून जे मार्ग ते त्यांच्या मनांत भरवून देत असतात, ते सर्व त्यांच्या स्वतःच्या फायद्याचे असतात; पण हें तत्व स्वार्थांधतेमुळें वरवर पाहणाऱ्या त्या पक्षाच्या लक्षांत येत नाहीं. कारस्थानी लोकांच्या मंत्राचा प्रयोग पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या मनावर लवकर व टिकाऊ असा होतो. एकदां का मंत्र लागू पडला, ह्मणजे लहानसहान गोष्टींवरूनसुद्धां कलह करावयाला स्त्रिया उद्युक्त होतात. हे अनुभव लहान मोठ्या कुटुंबांत सर्वसाधारणपणें नेहमींच येतात. पण त्यांत अपराधी कोण ? भेद करणारा कुटिलकारस्थानी पुरुष, कीं भेदनीतीला बळी पडणारा मूर्ख मनुष्य ? सांप्रतच्या न्यायनीतीप्रमाणें हे दोघेही गुन्हेगार ठरतात. लांच देणारा व लांच घेणारा; चोरी करविणारा व चोरी करणारा; खून करविणारा व खून करणारा; त्याचप्रमाणें कलह लावणारा व कलह करणारा हे सारखेच अपराधी आहेत. परंतु गवताला काडी पेटवून लाविली असतां गवत जळणें; अग्नीजवळ लोणी नेऊन ठेवलें असतां तें विरघळणें; अग्नीवर पाणी

टाकलें असतां तो विझून जाणें, किंवा त्यावर तेल ओतलें तर त्यानें भडकणें; लोहचुंबकाजवळ लोखंड ठेवलें तर त्यानें त्यास आकर्षून घेणें, या कृति गुणधर्मसिद्ध आहेत. ह्मणून त्या अपराध होऊं शकत नाहींत. परंतु जो कलिपुरुष गवताला आग लावतो किंवा अग्नीजवळ लोणी नेऊन ठेवतो तोच खरा अपराधी असतो. याच विचारसरणीच्या अनुरोधानें पहातां गोपिकाबाई व माधवराव यांची मनें कलुषित करणारीं मधलीं कारस्थानीं माणसेंच गुन्हेगार ठरतात. ह्मणून दादासाहेबांनीं त्यांचा बंदोबस्त करण्याकरतां माधवरावांना नजरकैदेंत ठेविलें होतें. त्यांचें हें करणें गैर होतें, असें कोणालाच ह्मणतां येणार नाहीं. शिवाय चांगल्या गोष्टीकरतां प्रसंगविशेषीं दुसऱ्याची मदत घेतली तर त्यालाही नांव ठेवतां येणार नाहीं. तशीं नांवें ठेवलीं तर त्याला कोणी महत्वही देणार नाहीं. दादासाहेबांनीं निजामअल्लीची मदत या प्रसंगीं घेतली ह्मणून त्यांना कांहीं अजाण लोक दूषण देतात, पण त्यांत कांहींच अर्थ नाहीं.

१६. दादासाहेबांच्या मनांत जर पेशवाई गिळंकृत करावयाची असती तर या वेळीं ती त्यांना सहज करतां आली असती. त्यांनीं माधवरावांना कैद केलेंच होतें. त्यांचे बगलबच्चे गोपाळराव पटवर्धन वगैरे परागंदा झाले होते. गोपिकाबाईही त्यांच्या हस्तगत झाल्याच होत्या. नारायणराव त्यांच्याच ताब्यांत आले होते. शिंदे, होळकर, नागपूरकर, गायकवाड, करवीरकर वगैरे सर्व सरदार त्यांच्याच तंत्रानें जाणारे होते. अशा वेळीं ज्या गोपिकाबाईच्या कारस्थानामुळें दादासाहेबांना इतका त्रास झाला त्यांना व त्यांच्या दोन मुलांना आणि त्यांच्या पक्षांत जेवढे होते त्या सर्वांना पकडून त्यांनीं डोंगरी किल्ल्यांत कायमचे डांबून टाकलें असतें व आपण खुशाल पेशवाईचा उपभोग घेत ते पडले असते. परंतु तसा प्रकार त्यांनी केला किंवा माधवराव, गोपिकाबाई, नाना फडनविस किंवा पुरुषोत्तमदाजी अगर त्रिंबकरावमामा यांना कोणत्याही प्रकारें विनाकारण त्रास दिला, असें इतिहासांत कोठेंच नमूद नाहीं. उलट सर्वांना त्यांच्या मरातबाप्रमाणें व मानाप्रमाणें त्यानीं वागविलें असेंच दिसून येतें. यावरून दादासाहेबांना पेशवाई गिळंकृत करावयाची होती, स्वतःचा स्वार्थ साधावयाचा होता, वगैरे त्यांच्यावरील आरोप धादांत खोटे ठरतात.

१७. माधवरावांना पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यानंतर पहिल्यानें ते ज्यावेळीं कारभारांत पडले त्यावेळीं, त्यांनीं ज्या ज्या गोष्टी केल्या त्यावरून त्यांच्या स्वभावाची चांगलीच ओळख पटते. गंगोबा तात्या म्हणजे गंगाधर यशवंत चंद्रचूड या नांवाचे एक वृद्ध, पेशव्यांच्या गादीचे जुने हितचिंतक आणि अनुभवी असे गृहस्थ मल्हारराव होळकर यांचे दिवाण होते. एके दिवशीं दरबारांत ते माधवरावांना बोलले कीं, ' हल्लीं कारभारांत चाललेला सर्व पोरकटपणा ह्या वृद्ध दृष्टीस स्पष्ट कळत आहे.' असें बोलतां क्षणींच भर दरबारांत आपल्या गादिवरून उठून माधवरावांनीं गंगोबा तात्यांच्या योग्यतेचा किंवा त्यांच्या वृद्धपणाचा विचार न करतां त्यांच्या तोंडांत भडकावली. दुसरी गोष्ट म्हणजे एके दिवशीं वाड्यांत माधवराव पेशव्यांच्या पंक्तीला दिनकर महादेव जोशी हे जेवीत असतां तेही असेंच कांहींतरी माधवरावांच्या पोरकटपणाबद्दल बोलले. पण त्यांचें बोलणें एक क्षणभरही सहन न करतां, जेवतानांच उठून त्यांच्याही त्यांनीं तोंडांत दिल्या. यावरून माधवरावांना त्यांच्याविरुद्ध कोणी ब्र काढलेला खपत नसे, हें दिसून येतें. त्यांचा स्वभाव तापट, दुरभिमानी आणि अविचारी होता. कोणी केवढ्याही योग्यतेचा असो किंवा वयाचा असो, कशाचाच विचार न करतां ते त्याला शासन करण्याला प्रवृत्त होत. एवढी स्वतःच्या मानापमानाची तीव्र भावना त्यांच्या ठिकाणीं होती. असें असतां ते आपला मानापमान गुंडाळून घोडनदीवर राघोबादादांना ज्याअर्थी शरण आले त्याअर्थी दादासाहेबांच्या विरुद्ध केलेले त्यांचे सर्व प्रयत्न हरले व त्यांना शरण गेल्याशिवाय आतां तरणोपाय नाहीं अशी खात्री झाल्यावरच त्यांनीं तो मार्ग स्वीकारला हें उघड होतें. माधवराव शरण आल्यानें दादासाहेबांचा त्यांच्यावरील राग मात्र नाहींसा झाला.

१८. दादासाहेबांनीं माधवरावांना आपल्याबरोबर पुण्यास आणलें व त्यांच्या नांवानें ते कारभार पाहूं लागले. त्यांनीं प्रथमतः आपलें कारभारी मंडळ बदललें; त्रिंबकमामा पेठे व गोपाळराव पटवर्धन यांच्या जागीं सखारामबापू व निळकंठ महादेव पुरंदरे यांच्या नेमणुका केल्या; बाबूराव फडनवीस यांच्या जागेवर चिंतो विठ्ठल रायरीकर यांस नेमलें. या प्रधान मंडळांतील फरकाशिवाय स्वतःच्या

विरुद्ध असलेल्या गोपिकाबाईंच्या पक्षाला दादासाहेबांनीं कोणत्याही प्रकारें दुखविलें नाहीं. गोपिकाबाई, नारायणरावसाहेब, पार्वतीबाई, सगुणाबाई ( विश्वासरावाची बायको ) ही सर्व मंडळी दादासाहेबांच्या ताब्यांत आली. माजी कारभारी बाबूराव व त्रिंबकराव हेही त्यांच्या हस्तगत झाले. रास्ते, बाबूजी नाईक, पीराजी नाईक यांनीं होईल त्या रीतीनें त्यांच्याशीं समेट करून घेतला. होळकर, जाधवराव व इतर लहान सहान सरदार प्रथमपासूनच दादासाहेबांकडे फितूर होते. तेव्हां आतां राहतां राहिले पटवर्धन. दादासाहेब व सखाराम बापू यांचें व पटवर्धनांचें पूर्वीपासून वैर होतें. आतां दादासाहेब यशस्वी झाल्यानें व सर्व पेशवाईचा कारभार त्यांच्या हातीं आल्यानें ते आपलें सर्व सामर्थ्य खर्च करून आपला निःपात केल्याशिवाय राहणार नाहींत असें पटवर्धनांस वाटत होतें. गोपाळराव जे घोडनदीच्या लढाईनंतर परागंदा झाले ते मिरजेस येऊन राहिले. इतर सरदारांप्रमाणें त्यांनीं समेटाची भाषा दादासाहेबांबरोबर केली नाहीं. म्हणून दादासाहेबांनीं मिरजेस गोविंद हरीस पत्र लिहिलें कीं, ‘ गोपाळराव त्या प्रांतीं पळून गेले आहेत. ते तिकडे जाऊन कांहीं दंगाधोपा करतील तर कामास पडणार नाहीं. तुम्हांकडे मिरजेचा किल्ला व सरंजामाचा मुलुख ठाणीं, गड, कोट, पागा हत्ती वगैरे सरकारी दौलत आहे. ती इकडून जो मनुष्य पाठविण्यांत येईल त्याचे स्वाधीन बिनतक्रार करावी. या राज्यांत रहावयाचें असल्यास बखेडे न करतां आम्हीं सांगूं त्या ठिकाणीं रहावें.’ या प्रमाणें पत्र येतांच पटवर्धनही बिथरले. ते दादासाहेबांबरोबर कलह करण्यास प्रवृत्त झाले व कांहीं झालें तरी मिरज दादासाहेबांच्या हवालीं करावयाची नाहीं असे त्यांनीं ठरविलें. गोविंद हरीने मिरजेस राहून किल्ला झुंझवावा व गोपाळरावानें फौज घेऊन मुलखावर पोट भरावें असें ठरलें.

१९. माधवराव पेशव्यांना बरोबर घेऊन पटवर्धनांचें पारिपत्य करण्याकरतां दादासाहेब मिरजेस मोठी फौज घेऊन गेले. त्यांनीं मिरज किल्ल्यास मोर्चे बसविले. पटवर्धनांनीं मिरज किल्ला लढविण्याची पराकाष्ठा केली. परंतु दादासाहेबांच्या माऱ्यापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. शेवटीं गोपाळराव

पटवर्धनांचे वडील गोविंद हरी यांनीं मिरजकिल्ला पेशव्यांच्या हवाली करण्याचें वचन दिलें व किल्ल्यातील चीजवस्त काढून घेऊन किल्ला मोकळा करून देण्याकरतां तीन दिवसांची मुदत दादासाहेबांकडून मागून घेतली. त्यांनीं ती दिल्यामुळें गोविंद हरीनें व परुषोत्तमदाजीनें किल्ल्यांतील खजिना वगैरे सर्व सामान कुरुंदवाडास पोंचतें करून किल्ला दादासाहेबांच्या हवालीं केला. तेव्हांपासून पेशव्यांचा अंमल तेथें सुरू झाला.

२०. पटवर्धन सरदार दादासाहेबाचा द्वेष करीत असतांना व त्यांचें पारिपत्य करण्याकरतां दादासाहेब मिरजेस गेले असतांना आणि सर्व बाजूंनीं त्यांची नाकेबंदी करून त्याना दांतो तृण धरून शरण येण्याची पाळी आणली असतांना, गोविंद हरीच्या बिनंतीस मान देऊन किल्ल्यांतील त्यांची संपत्ति व त्यांची सर्व चीजवस्त त्यांना नेऊं देण्याची दादासाहेबांनीं परवानगी दिली, यावरून दादासाहेबांच्या थोर मनाची व शुद्ध अंतःकरणाची कल्पना आल्याशिवाय रहात नाहीं. शत्रू शरण आला म्हणजे त्याला मारावयाचा नाहीं, उलट त्याच्यावर दया करावयाची, ही वीरवृत्ति दादासाहेबांच्या अंगीं पूर्ण बाणलेली होती, हे पदोपदीं निदर्शनाला येतें. दुसऱ्यांनीं दादासाहेबांचा जेवढा पाहिजे तेवढा द्वेष केला, परंतु दादासाहेबांनीं मात्र त्यांच्यावर दयाच केली. यावरून सत्पक्षाच्या पाठीवर कोण उभे होते व कोणीं असत्पक्षाचें अनुकरण केले होतें हें दिसून येईल.

२१. दादासाहेबांनीं मिरज हस्तगत केल्यामुळें गोपाळराव आपल्या फौजेसह वाट फुटेल तिकडे हिंडू लागले. त्यांनीं निजामअल्लीकडे सधान बांधून त्यांची नोकरी पतकरली. त्यानीं आपल्याबरोबर आपल्या पक्षाचे सरदार तिकडे नेले होते, तेही निजामअल्लीला मिळाले. त्यांपैकीं निजामाचा दिवाण साडेतीन शहाण्यांपैकीं विठ्ठल सुंदर हा एक होता. पुण्याच्या पेशवाई-दरबारांतून रुसून आलेले सरदार त्याला येऊन मिळतांच पेशवाईबद्दल निजामअल्लीच्या मनांत असलेल्या द्वेषाचा बदला घेण्याची त्याला इच्छा उत्पन्न झाली. गोपाळरावाच्या मदतीनें त्यानें पुण्यावर स्वारी करण्याची

खटपट सुरू केली. गोपाळराव पटवर्धन आपल्या पक्षाच्या लोकांना बरोबर घेऊन निजामअल्लीला मिळाला व तो आपला सूड घेण्याच्या उद्योगांत आहे, हें दादासाहेबांना समजताच, हाच आपल्या विरुद्ध पक्षाचा खरा पुढारी आहे अशी त्यांची खात्री झाली.

२२. निजामअल्लीला गोपाळरावाप्रमाणें धनाजी जाधवांचा नातू रामचंद्र जाधव हा जाऊन मिळाला होता. त्याचप्रमाणे निजामानें जानोजी भोंसले यांसही आपल्या पक्षाला ओढलें आणि लढाईची कडेकोट तयारी करून तो पुण्यावर चाल करण्याकरता निघाला. ही हकीकत दादासाहेबांस समजली. त्यावेळीं दादासाहेबांच्या फौजेची तयारी नव्हती. नंतर त्यांनीं फौजेची जमवाजमव करून मोगलांच्या मुलखावर स्वारी करण्याचें ठरविलें. दादासाहेबाकडे जरी शिंदे-होळकर हे सरदार होते, तरी निजामअल्लीच्या अफाट सैन्याला तोंड देण्याइतकी त्याची त्यावेळीं शक्ति नव्हती. म्हणून निजामाला गनिमी काव्यानें तोंड द्यावयाचें असे त्यांनीं ठरविलें. या गनिमी काव्यानें लढाई देण्यांत दोन हेतू होते. एक तर दादासाहेबांना फौजेची तयारी करावयास फुरसत मिळाली नव्हती, ती यामुळें मिळावी, व दुसरें पेशव्याकडील सरदार व नागपूरकर भोंसले हे निजामाला मिळाल्यामुळें त्यांचा जो पक्ष प्रबळ झाला होता, तो हलका करण्याकरतां, त्यांच्यांत फूट पाडण्याला संधि मिळावी. या विचारानें दादासाहेब निजामाच्या तोंडावर एकदम न जातां ते त्याला इकडे तिकडे झुकांड्या देऊन खेळवूं लागले. जानोजी भोंसले निजामअल्लीला मिळाल्याचा दादासाहेबांना फार राग आला. त्यामुळें ते भोंसल्यांच्या मुलखात शिरले व त्यांनीं त्यांत जाळपोळ व लुटालूट चालविली. भोंसल्यांचा बराच मुलुख दादासाहेबांनीं जाळपोळ करून फस्त केला. ही हकीकत निजामाला समजतांच तो त्वरेनें दादासाहेबांच्या मागें लागला. राघोबादादाच्या भराऱ्या इतिहासप्रसिद्धच आहेत. त्यांनीं आपल्या फौजेसह आज येथें तर उद्या भलत्याच ठिकाणीं, अशा दौडी मारण्यास सुरवात केली. दादासाहेबांच्या मनांत निजामाचे हैदराबाद

शहर लुटावयाचें होतें, म्हणून त्यांनीं तिकडे मोर्चा वळविला. निजाम दादासाहेबांच्या मागें लागून हैराण झाला व त्यांच्या पाठीमागें लागण्याचें सोडून देऊन त्यानें पुण्याकडे आपला मोर्चा वळविला.

२३. निजामअल्लीनें पुण्यावर स्वारी करून भयंकर जाळपोळ केली. त्याचप्रमाणें पुरंदरपासून भीमेपर्यंत लूटमार व जाळपोळ केली. राघोबादादांनीं हैदराबादेवर हल्ला करून तेथें त्याचप्रमाणें केलें, परंतु हैदराबादेचा किल्ला मजबूत असल्यानें त्यांना निजामाचा जास्त नाश करतां आला नाहीं. पुढें त्यांनीं बेदर शहर जाळलें व औरंगाबाद आणि भागानगर या शहरांपासून खंडणी घेतली.

२४. याप्रमाणें राघोबादादा व निजामअल्ली यांचे परस्परांच्या नुकसानीचे प्रकार चालू असतां निजामाकडे गेलेल्या घरभेद्या लोकांना फोडण्याचा प्रयत्न दादासाहेबांनीं चालविला. पेशवाईवर रूसून शत्रूला मिळालेल्या पेशव्यांच्या सरदारांना अभयाचीं पत्रें लिहून दादासाहेबांनी सखाराम बापू यांचेकडे दिलीं. सखारामबापू यांनीं दादासाहेबांचा पक्ष सोडून आपणही रुसून मोंगलांकडे जातो असा बहाणा केला व ते निजामाकडे गेले. त्यांनीं तेथे पेशव्यांच्या सरदारांत फितुरी केली. नागपूरकर भोंसल्यांनाही फितुर करून त्यांनाही निजामाच्या पक्षांतून फोडलें. याप्रमाणें सखाराम बापूनीं निजामाचा पक्ष हलका केला. आतां ही संधि समोरासमोर लढाई देण्याला योग्य आहे असें पाहून, दादासाहेबांनीं गोदावरी तीरीं राक्षसभुवन म्हणून गांव आहे तेथें लढाई दिली. ही लढाई इ. स. १७६३ मध्यें झाली.

२५. या लढाईंत विठ्ठलसुंदर हा जातीनें हजर होता. तो हत्तीवर बसून सर्व सैन्याची हालचाल करीत होता. इ. स. १७६० मध्यें उदगीरच्या लढाईंत निजामाचा झालेला पराभव त्याच्या मनांत डांचत होता. त्याचा सूड यावेळीं पेशव्यांवर घ्यावा असें त्याच्या मनांत होतें. त्याच्या फौजेंत या वेळीं एकजात ऐंशी नव्वद हजार पठाण होते. त्यानें अशा जबरदस्त फौजेच्या बळावर दादासाहेबांवर चाल केली व उभय सैन्यांची

कापाकापी सुरू झाली. दादासाहेब ही हत्तीवरच होते. त्यांच्यावर विठ्ठल सुंदरनें हल्ला चढविला. मोंगलांची सरशी होणार असा रंग दिसूं लागला. यावेळीं निजामअल्ली आपल्या सैन्यासह गोदावरीच्या पलीकडे होता. तो आपल्या सैन्यास घेऊन नदी उतरून येऊं लागला. त्यावेळीं जर तो विठ्ठल सुंदरला येऊन मिळाला असतां, तर राघोबादादांचा खात्रीनें पराभव झाला असता. विठ्ठल सुंदरनें राघोबादादांचा हत्ती चारी बाजूंनीं घेरण्याचा प्रयत्न चालविला.

२६. या प्रसंगीं या रणक्षेत्रापासून माधवराव पेशवे दोन कोस मागें होते. राघोबादादांनीं आपल्याबरोबर त्यांना लढाईवर आणलें होतें. परंतु लढाईंत केव्हां काय होईल याचा नेम नसतो; शिवाय पानिपतच्या लढाईंत विश्वासराव पडले होते, ह्मणून ती चूक पुनः होऊं नये, ह्मणून मुद्दाम त्यांनीं माधवरावांना दोन कोस मागें ठेवलें होतें. त्यांच्या रक्षणाकरतां त्यांनीं पंधराशे खासे घोडेस्वार ठेविले होते. हा रिसाला शत्रूच्या पंधरा हजार फौजेला भारी होता. दादासाहेबांना शत्रूच्या फौजेनें चारी बाजूंनीं घेरलें आहे अशी वर्दी येतांच माधवराव घोड्यावर स्वार झाले व त्यांनीं आपल्या बरोबरच्या पंधराशे स्वारांस सवाल केला. "आमच्याबरोबर तुह्मी मरावयाला तयार आहांत?" त्यांनीं उत्तर दिलें "जिकडे खाविंद तिकडे आह्मी". असें ह्मणतांच माधवरावांनीं सर्वांस निघण्याचा हुकूम दिला व ते रणक्षेत्राकडे तांतडीनें निघाले. मार्गांत लढाई सोडून परत फिरलेले मल्हारराव होळकर त्यांना भेटले. ते ह्मणाले "माघारें चला, पुण्याचें राज्य करूं." त्या वेळीं माधवराव त्यांना बोलले कीं 'काका, भाऊसाहेबांना पूर्वीं (पानिपतच्या लढाईंत) तुह्मीं बुडविलें असें मी ऐकत होतो; तें आज खरें झालें.' हे पेशव्यांचे शब्द मल्हाररावांच्या मर्मस्थानीं जाऊन भिडले. ते ह्मणाले 'बाळा, आतां चलावें व माझी तरवार पहावी.' नंतर मल्हारराव होळकरांना बरोबर घेऊन माधवराव ताबडतोब रणक्षेत्रावर येऊन पोंचले. त्यांनीं शत्रूपक्षावर एकदम निकराचा हल्ला केला व कापाकापी करीत जेथें दादासाहेबांचा हत्ती होता तेथें ते आले. या भयंकर चकमकीच्या लढाईच्या वेळीं विठ्ठल सुंदर याला गोळी लागून तो मरण पावला.

तेव्हां त्याच्या सर्व फौजेची धूळधाण झाली. मोंगलाचा पूर्ण पराभव झाला. रीतीप्रमाणें निजामाकडून खंडणी व मुलूख घेऊन दादासाहेबांची स्वारी विजय संपादून माधवरावांसह पुण्यास परत आली.

२७. या लढाईंत माधवराव पेशवे यांनीं जें प्रसंगावधान व शौर्य दाखविलें तें पाहून राघोबादादांना धन्यता वाटली. पेशव्यांच्या घराण्याचा अभिमान आणि समरांगणावरील तरवारीचा पराक्रम हे गुण माधवराव यांच्या ठिकाणीं आहेत, हें दादासाहेबांच्या नजरेला आल्यानंतर, त्यांना जो आनंद झाला तो सांगतां येत नाहीं. गादीवर असणाऱ्या पुरुषाच्याच मणगटांत शक्ति लागते. त्यानें दुसऱ्याच्या हातानें पाणी पिऊं नये हा राजपुरुषाला जरूर असणारा गुण, आतां माधवरावांच्या ठिकाणीं आला आहे हें पाहून, त्यांनीं माधवरावांना सांगितलें कीं, 'बाळ! आतां तुम्ही राज्यकारभार स्वतंत्र रीतीनें पहावयास लायक झाला; तेव्हां तुम्ही तो आतां संभाळा.' असें म्हणून त्यांनीं सर्व राज्यकारभार माधवराव यांच्या स्वाधीन केला.

२८. राघोबादादा आणि त्यांच्या पत्नी आनंदीबाई यांच्यावर जे लोक 'स्वार्थी स्वार्थी' असें म्हणून टीका करतात, त्यांनीं वरील प्रसंगाकडे लक्ष पुरविलें नाहीं, किंवा तिकडे मुद्दाम डोळेझांक करून ते त्यांना दूषण देतात असें मोठ्या कष्टानें म्हणावे लागतें. राघोबादादांना जर राज्याची हांव असती तर माधवराव पेशवेपदाला लायक झाले असें पाहतांच, मोठ्या सुखासमाधानानें, आपण होऊन, आपल्याकडे असलेला कारभार दादासाहेबांनीं त्यांच्या स्वाधीन केला असता काय, हें विचारपूर्वक टीकाकारांनीं आपल्या मनाला विचारून पहावें. सामान्यतः एकाद्या अज्ञानाचा पालक बनणारा इसम, त्याची मिळकत हातीं येतांच तो अज्ञानाचा सज्ञान झाला तरी त्याच्या हातांत ती देण्यास सहसा आत्मसंतोषानें तयार होत नाहीं. असें असतां ज्या दादासाहेबांचा कारभारीपणाचा हक्क जन्मजात होता, व जो त्यांनीं स्वतःच्या जोरावर व परिश्रमपूर्वक मिळविला होता, तो त्यांनीं स्वसंतोषानें हातावेगळा केला, यावरून त्यांच्या ठिकाणीं लोभीपणाचा अंशतः तरी लेश दिसतो, असें म्हणणें केवळ अन्यायाचें

ठरेल. शिवाय ज्याअर्थी गोपिकाबाईसारखी मत्सरी भावजय घरांत असतांना तिकडेही लक्ष न देतां आपला होणारा सर्व अपमान गिळून, केवळ पेशव्यांच्या गादीचा मालक लायक बनला या गोष्टीमुळें माधवरावांचे अधिकार दादासाहेबांनीं त्यांच्या स्वाधीन केले, त्याअर्थी ते निःस्वार्थी, मनाचे थोर व पेशव्यांच्या गादीचा अभिमान बाळगणारे होते हें उघड ठरत नाहीं काय ? वीरपुरुषाचें अंतःकरण कसें असतें हें त्याची कृति दाखवीत असते. कपटी, स्वार्थी व कारस्थानी माणसाप्रमाणें त्याला स्वतःची फुशारकी स्वतःच्या तोंडानें सांगावी लागत नाहीं.

२९. या ठिकाणीं गोपाळराव पटवर्धन याची एक गोष्ट नमूद करून ठेविल्यास नाना फडनविस व गोपिकाबाई यांच्या पक्षांतील लोकांबद्दल एक स्वभावचित्र दाखविल्याप्रमाणें होईल. माधवराव पेशवे हे दादासाहेबांना शरण आल्यानंतर माधवरावांच्या सल्ल्याप्रमाणें जिकडे वाट फुटेल तिकडे गोपाळराव गेले होते. त्यांना निजामअलीचा आसरा मिळाला. याच लोकांच्या मदतीनें निजामानें पुण्यावर स्वारी केली होती हा वृत्तांत मागें आलाच आहे. गोपाळरावांनीं निजामाची ज्या वेळीं नोकरी पतकरली त्या वेळी 'मला आज्ञास एक लक्ष रुपये कर्ज द्यावें' असें निजामास ह्मणून त्यानीं त्याचे नावें एक लक्ष रुपयांचे कर्जखत लिहून दिलें व रुपये घेतले. पुढें गोपाळरावांनीं निजामाची नोकरी सोडून पुण्यास जाण्याचें ठरविलें. पण कर्जखताचे रुपये परत दिले पाहिजेत, मोंगलाईंत लाख रुपयाचें कर्जखत गुप्त राहणें चांगलें नाहीं, ह्मणून तें खतच कोणत्या तरी युक्तीनें नाश करण्याची युक्ति त्यांनीं चालविली. त्यावेळी गोपाळरावाबरोबर त्यांचे बंधु नारायणराव नाना हेही होते. त्यांजकडून त्यानीं तें लाख रुपयाचें खत नाश करण्याची खटपट चालविली. पागेकडील खात्याच्या कचेरींत एक साधारण वेड्याप्रमाणें चर्या असलेला कारकून नारायणरावांनीं गाठला व त्याला काय द्यावयाचें असेल तें देऊं करून त्यांनीं त्याला फितूर केलें. त्यांनीं त्यास असें सांगून ठेविलें कीं, 'मी कचेरींत त्या कर्जखताचा हिशेब करण्याकरतां तें मागून घेईन. तें माझ्या हातांत पाहण्याकरतां आलें ह्मणजे तूं तें काढून

वे व मला चार शिव्या व मोंगलाच्या दिवाणाना चार शिव्या देऊन ते फाडून टाक. त्याबरोबरच आपलें शेलापागोटें फाडून टाकून शंखवाद्य करीत कचेरींतून निघून पळत जा. या पुढें जो प्रसंग येईल तो आमचा आह्मी पाहून घेऊं.' याप्रमाणें या एक लक्ष रुपयांच्या कर्जखताच्या नाशाच्या कपटनाटकाची योग्य तालीम त्या कारकुनाला देऊन, ठरल्याप्रमाणें नारायणराव कचेरींत गेले. त्यांनीं विठ्ठल सुंदर दिवाण, यांजपाशीं हिशेब करण्याकरतां कर्जखत मागून घेतलें. तोंच पूर्वसंकेताप्रणें त्यांच्या हातून तें त्या वेडसर दिसणाऱ्या कारकुनानें हिसकावून घेऊन त्याचें फाडून तुकडे तुकडे करून टाकले. त्यानें नारायणरावांना व विठ्ठल सुंदर यांना शिव्या दिल्या. आपलें अंगरखा—पागोटें काढून तेंही फाडून टाकलें व शंखवाद्य करीत तो कचेरींतून निघून गेला. त्या कारकुनाचें हें कृत्य पाहून विठ्ठल सुंदर हसूं लागले. अशा कपटनीतीनें तें एक लक्ष रुपयांचें कर्जखत नाश करण्यांत आलें. गोपाळरावांनीं ही योजलेली युक्ति या प्रमाणें नारायणरावांनीं पार पाडली. हें गोपाळराव यांना समजतांच निजामअल्लीच्या फौजेचा तळ पुढील मुक्कामास जाण्याच्या वेळीं "आजच श्राद्धतिथि आहे. तेवढी उरकून घेऊन मी मागाहून येतों" असा बहाणा करून ते मागें राहिले, आणि मजल दर मजल करीत ते माधवराव पेशव्यांना येऊन मिळाले. अशा प्रकारें निजामाच्या दरबारीं साडेतीन शहाण्यांपैकीं एक शहाणा ह्मणून नांवाजलेल्या विठ्ठल सुंदर दिवाणाला गोपाळरावांनीं हातोहात फसविलें.

३०. अशा प्रकारें कर्जखत फाडण्याची ही अश्लाघ्य युक्ति योजण्यांत आली. ही युक्ति त्यांनीं शत्रूच्या ठिकाणीं योजिली, त्या अर्थी ती श्लाघ्यच होती ह्मणून गोपाळरावांची स्तुति करणारे कांहीं हरीचे लाल्हीं निघण्याचा संभव आहे. कोणत्याही व्यक्तीवर चांगले अगर वाईट आरोप करण्याचें हें स्थळ नव्हे. गोपाळराव हे ज्या पक्षांत होते व ते ज्या पक्षाचें हित साधणार होते त्या पक्षांतील लोकांची नैतिक पात्रता किती होती, व त्यांच्या पराक्रमांत

---

हरिवंश बखर पान २०

कशा प्रकारच्या गुणधर्मांचा अंकूर होता हें दाखविण्याचाच केवळ हेतू आहे. गोपाळराव हे माधवराव पेशव्यांच्या पक्षाच्या इमारतीचे नरवारबहादर ह्मणून एक आधारस्तंभ होते.

३० राघोबादादांनीं माधवराव याच्या स्वाधीन राज्याचा कारभार केला त्या वेळीं माधवरावांनीं आपल्या इच्छेप्रमाणें व आपल्या पक्षाच्या अनुरोधानें त्यांत फेरबदल केला. चिंतो विठ्ठल रायरीकर हे दादासाहेबांच्या पक्षाचे ह्मणून त्यांना कमी करून नाना फडनविस यांचेकडे फडणिशीचें काम देण्याचा विचार सुरू झाला. अर्थात् नाना हे माधवरावांचे बालमित्र व पूर्ण हितचिंतक आणि त्यांच्या कळकळीचे होते. गोपिकाबाईचाही त्यांच्यावर पुत्राप्रमाणें लोभ होता. शिवाय त्यांच्या घराण्यांत तीन पिढ्यांपासून चालत आलेली फडणिशी ह्मणून ती जागा त्यांना देणें न्याय्य होतें. पण राघोबादादांचें त्या वेळीं असे ह्मणणें होतें कीं, नाना फडनविस यांनीं दरसाल एक लक्ष रुपये घेऊन फडणिशीचें काम पहावें. या पेक्षां जें अधिक उत्पन्न येईल तें त्यांनी सरकारांत जमा करावें. दादासाहेबांनीं नानांच्या प्रत्यक्ष स्वार्थावर हा हल्ला केला. त्यामुळें नानांना राग येऊन त्यांनीं ही गोष्ट माफ नाकारली. नानांच्या कटांतील गोपाळराव नुकतेच माधवराव यांच्याकडे आले होते. त्यांनींही माधवरावांकडे नानांची सक्त रदबदली केली. तेव्हां माधवरावांनी आपल्या कळकळीच्या पक्षाकडे लक्ष देऊन दादासाहेबांच्या ह्मणण्याकडे लक्ष न देतां नाना व मोरोबा यांना फडणिशीचीं वस्त्रें इ. स. १७६३ च्या आक्टोबर महिन्यांत दिलीं. नानांच्या खासगी स्वार्थावर दादासाहेबांनीं हल्ला केल्यामुळें नानांनीं त्यांच्यावर पुढें कायमचा दावा धरला. नानांचा दावा काळसर्पाप्रमाणें होता. त्यांना कोणी दुखविलें कीं ते त्याचा पूर्ण नाश करीत असत.

३२. या वेळीं गोपाळराव पटवर्धन हे निजामाकडून आपल्या बोलावण्याप्रमाणें परत आल्यामुळें राघोबादादांनीं त्यांचा मिरज किल्ला नवीन सनद करून देऊन त्यांच्या हवालीं केला. यावरून राघोबादादांच्या थोर मनाची पारिपत्य करण्याची पद्धत लक्षांत येईल. ते कारणापुरतेंच व अपराधी लोकांना सुबुद्धि

गावी या दृष्टीनें त्यांचें पारिपत्य करीत, परंतु त्यांचा जन्माचा नाश होऊं देत नसत. त्यांच्या पारिपत्याच्या पद्धतींत द्वेषबुद्धि बिलकूल नसे.

३३. दादासाहेबांनीं माधवरावाना नजरकैदेंत ठेऊन पेशवाईचा कारभार केला असें मागें आलें आहे. त्यांच्या या कारभारांत एक अत्यंत महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. त्यांच्या या कारभाराविषयीं लोकमत काय होतें हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल. 'तेव्हां रघुनाथरावानें त्यांस (माधवरावांस) बंदींत ठेविलें. परंतु त्यांचा असा मान रक्षिला की बंदीत असतांही त्यांची जेवढी प्रतिष्ठा होती तेवढी पुढे तो मोठी योग्यता मिळवून निरंकुशपणें मोठे पदवीस तो चढला तरी त्यास मिळाली नाहीं.'[1] हें शिफारसपत्र म्हणजे दादासाहेबांच्या थोर मनोवृत्तीचें प्रतीकच आहे. त्यांचा मनोधर्म जर पेशव्यांचें राज्य गिळंकृत करण्याचा असता तर त्यानीं माधवरावाचा असा दर्जा कधींच वाढविला नसता. त्यांना कैदेतच डांबून ठेविलें असतें व आपलाच डंका हिंदुस्थानभर वाजवून घेतला असता. यावरून दादासाहेबांचा स्वभाव कसा होता हें आतां निराळें सांगावयाला नको.



---

1 मराठ्यांची बखर ग्रँट डफकृत (मराठी) पान २१६.

## प्रकरण ७ वें.

# हैदरवरील स्वारी व कोळ्यांचें बंड.

### इ० स० १७६३ ते इ० स० १७६४.

पेशव्यांचा हैदरशी बेबनाव. माधवराव पेशवे कर्नाटकच्या स्वारीवर निघतात.—२. राघोबादादा पुण्याहून निघून नाशिकला जातात.—३. माधवराव पेशवे व हैदर यांची पहिली सलामी —४. माधवराव कुंदगोळास छावणी करून राहिले. धारवाडचा किल्ला हस्तगत केला. विसाजी नारायण यांजकडे धारवाड किल्ल्याचा बंदोबस्त दिला.—५. माधवराव पेशव्यांचें आजारीपण. राघोबादादांस हैदरवरील स्वारीकरितां माधवराव बोलावितात.—६. राघोबादादा माधवरावांना येऊन मिळतात व हैदरच्या स्वारीची जबाबदारी आपल्या शिरावर घेतात.—७. राघोबादादा हैदरचा पराभव करतात. हैदरबरोबरील तहाचीं कलमें. दादासाहेबांविरुद्ध माधवरावांचे मनांत वितुष्ट उत्पन्न होतें.—८. माधवराव पेशवे व विठ्ठल शिवदेव यांचा बेबनाव. मल्हारराव होळकरांची मध्यस्ती व समेट. या बाबतींत राघोबादादांचें धोरणी पत्र.—९. या पत्रासंबंधीं राघोबाबादादांची नीति व व्यवहार.—१०. गोपिकाबाई पुणें सोडून गंगापुरी कायमच्या जाऊन राहतात.—११ गोपिकाबाईंच गंगापुरास कायमचें जाण्याचें कारण.—१२. पुरंदरचा किल्ला आपल्या वळणात असावा असें गोपिकाबाईंना वाटत होतें.—१३. पुरंदर किल्ल्याचे कारस्थान हेंच गोपिकाबाईंनीं गंगापुरास निघून जाण्याचें कारण.—१४. पुरंदर किल्ल्यावर कोळ्यांचें बंड. राघोबादादा माधवराव पेशव्यांच्या अनुमतानें बंडाचा मोड करतात.—१५. राघोबादादांनीं पुरंदरचा किल्ला सरकारांत कां ठेवला — १६. माधवरावांचें त्रिंबकराव मामांना पत्र.—१७. पुरंदर किल्ल्याबाबत त्रिंबकराव मामांची हलवाढवळ. माधवरावांचें त्यांस पत्र. त्रिंबकराव मामांची कंबर खचते. कोळ्यांचे बंडांत एका अज्ञात मनुष्याचा हस्तक्षेप.—१८. राघोबादादांचा पुरंदरप्रकरणीं निकाल.—१९. पुरंदरप्रकरणीं राघोबादादांची दिसून आलेली न्यायप्रियता.—२०. पुरंदरचा किल्ला सरकारांत ठेवावा असेंच माधवराव पेशव्यांचें मत पडलें.—२१. पुरंदरप्रकरणांतील शंकास्थानें व त्यांशीं नाना फडनविसाचा सेगारा संबंध.—२२. पेशव्यांच्या घरांतील

स्त्रियांचें स्वभाववैचित्र्य. —२३ - नाना फडनविस प्रत्यक्ष राजकारभारांत आले त्यावेळीं त्यांनीं कोणतीं धोरणें संभाळण्याचें ठरविलें ?—२४. पुरंदरचें बंड उभारण्यांत नाना फडनविसांचा संबंध कसा आला?—२५ पुरंदरप्रकरणीं नाना फडनविस यांचें पाताळयंत्री धोरण.—२६. गोपिकाबाई कायमच्या गंगापुरास कां राहिल्या याचा निवाडा.

१. मागें सांगितल्याप्रमाणें माधवराव पेशवे यांनीं कारभाराचीं अधिकारसूत्रें हातीं घेऊन राज्याचा कारभार आपल्या मताप्रमाणें हांकण्याला सुरवात केली. राज्यकारभारांत माधवराव जी कामगिरी सांगतील व सल्ला विचारतील तेवढ्या-पुरतेंच लक्ष घालावयाचें दादासाहेबांनीं ठरविलें. त्यामुळें माधवरावांभोंवतीं त्यांचे जीवे सर्व शागीर्द गोळा झाले. पूर्वीप्रमाणे संधि साधून माधवराव व दादासाहेब यांच्यामध्यें भेदनीतीनें कलह उत्पन्न करण्याची त्यांची तयारी सुरू झाली. कारण कुटिल कारस्थानी मध्यस्थ लोकांची कुशलता भेदनीतीच्या जीवनावरच अवलंबून असते. अशा वेळीं हैदरअल्ली प्रबळ होऊन त्यानें पेशव्यांविरुद्ध आगळीक कर-ण्याला सुरवात केली. त्यानें बेदनूर प्रांत आपल्या सत्तेंत घेऊन सावनूरच्या नबाबाला जिंकलें. हा नबाब पेशव्यांचा मांडलिक होता. पुढें हैदरनें धारवाड घेतलें आणि आपलें ठाणें कृष्णातीरानजिक आणून ठेवलें. त्यावेळीं पेशवेदरबारांत असें ठरलें कीं, हैदरची याउपर उपेक्षा केली तर त्याचा हा उत्कर्ष मराठी राज्याच्या नाशाला कारणीभूत होईल, म्हणून त्याच्यावर स्वारी करण्याची तयारी करावी. त्याप्रमाणें सैन्याची जमवाजमव होऊन पुण्यास पेशव्याचें मोठें सैन्य तयार झालें. त्यावेळीं या मोहिमेवर दादासाहेबांनीं जावें असें माधवरा-वांच्या मनांत होतें. कारण यापूर्वी माधवराव स्वतंत्रपणें मोहिमेवर कधीं गेले नव्हते. शिवाय हैदरासारख्या बलिष्ट व निढावलेल्या शत्रूबरोबर सामना द्याव-याचा होता. म्हणून या मोहिमेवर दादासाहेबांनींच जाणें पेशवेदरबारला इष्ट वाटत होतें. माधवरावांनीं दादासाहेबांना हैदरावर चालून जाण्याविषयीं विनंति केली. त्यावेळीं दादासाहेबांनीं त्यांना सांगितलें कीं, "एवढें मोठें सैन्य घेऊन हैदरावर जाण्याचे हे दिवस नाहींत; सध्यां पावसाळा अगदीं डोक्यावर आला आहे, म्हणून तो संपतांच आम्ही मोहिमेवर जातों"* हें उत्तर अर्थात् दादा-

साहेबांनीं आपल्या लढाईच्या धोरणाप्रमाणें दिलें होतें. दादासाहेबांच्या या उत्तराचा माधवरावांभोंवतालच्या कारस्थानी कंपूनें विपर्यास केला. ' दादासाहेब हे सैण आहेत, आनंदीबाईनें मोहिमेवर जाऊं नका असें सांगितल्यामुळें ते जात नसतील; त्यांची ती दुसरेपणाची लाडकी बायको; तिच्या ते अर्ध्या वचनांत वागतात, ह्मणून यावेळीं त्यांनीं कांहींतरी निमित्त काढलें आहे, ' अशा-रीतीनें भेदनीतीचे सूर कारस्थानी मंडळीकडून निघूं लागले. त्यामुळें या सुराच्या नादानें उतावळ्या व तापट माधवरावांना विवेक न राहतां त्यांना दादासाहेबांचा राग आला. त्यांनीं दादासाहेबांना सांगितलें कीं, ' आपण पुण्यास राहून कारभारावर लक्ष ठेवावें. आम्हीच हैदरावर चालून जातों. ' याप्रमाणें रागानें ते फौज घेऊन इ. स. १७६४ च्या मे महिन्यांत पुण्याहून हैदरच्या स्वारीवर निघाले. या स्वारींत पटवर्धन, रास्ते, होळकर, विठ्ठल शिवदेव विंचुरकर वगैरे सरदार होते.

२. माधवरावांनीं दादासाहेबांचा सरळ सल्ला न ऐकतां ते मोहिमेवर निघून गेले. त्यांनीं दादासाहेबांच्या गळ्यांत कारभाराचें परतंत्र असें लोढणें अडकविलें म्हणून त्यांना राग आला. त्यामुळें पुण्यालाही राहणें नको व बेजबाबदारीचा राज्यकारभारही पाहणें नको; विनाकारण अपवादाला कारण व्हावयाचें, म्हणून दादासाहेब पुण्याहून निघून नाशिकला येऊन गोदावरीच्या तीरीं राहिले. तेथें त्यांनीं स्नानसंध्या, वगैरे अनुष्ठानें चालविलीं व विरक्तपणानें आपला परमार्थाचा मार्ग सुरू केला. दादासाहेब यांची पूजाअर्चा फार असे. त्यांनीं निरनिराळीं अनुष्ठानें केलीं. त्यांच्या परमेश्वरावरील भक्तिभावाबद्दलही विरुद्ध पक्ष त्यांची निंदा करीत असे. ' हीं अनुष्ठानें माधवराव व नारायणराव यांना मारण्याकरतांच आहेत, ' इतका त्या अनुष्ठानांचा विपर्यास करण्यापर्यंत कारस्थानी पुरुषांच्या भेदनीतीची मर्यादा गेली होती.

३. माधवराव आपल्या फौजेसह पुण्याहून निघाले ते शिंगणापूर महादेवावरून कृष्णातीरीं आले. त्यावेळीं करवीरकर यांच्या राज्यापैकीं कांहीं ठाणीं पुंडपाळेगारांनीं बळकाविलीं होतीं. तीं त्यांच्याकडून माधवरावांनीं

काढून घेऊन करवीरकरांच्या हवालीं केली. करवीर संस्थानच्या राणी जिजाबाईसाहेब यांच्याकडून माधवरावांनीं प्रस्तुतच्या स्वारीच्या खर्चाकरतां पांच लाख रुपये घेतले, व तेथून ते मनोळीस गेले. मराठे आपल्यावर चालून आले असें हैदराला समजतांच, तो झाडींत शिरला. पुढें माधवरावांनी जुनी व नवी हुबळी काबीज केली आणि गदगही घेऊन शिरहट्टीला मोर्चे लाविले. नंतर हैदराशीं रट्टेहळ्ळी येथें पेशव्यांनीं लढाई करून त्याचा पराभव केला. हैदर तुंगभद्रेच्या पलीकडे झाडीचा आश्रय करून राहिला. पेशव्यांनी तुगभद्रेच्या अलीकडील मुलुख काबीज केला.

४. हैदराबरोबर एक लढाई पुरी होत न होते तोंच पावसाळा सुरू झाला. तुंगभद्रेला पूर आल्यामुळ पलीकडे जातां येणें शक्य नव्हतें. परत पुण्याला यावें म्हटलें तरी कृष्णा नदीला पूर आल्यानें तसेंही करणें अशक्य होतें. तेव्हां सर्व पावसाळा त्यांना कुंदगोळनजीक छावण्या करून काढावा लागला. पावसाळा संपेपर्यंत लढाई करणें शक्यच नव्हतें. फौज मात्र बसून राहिली इतके दिवस मोहिमेसंबंधाचा असा परिपाठ होता कीं, पावसाळयांत फौजेंतील लोकांना रजा मिळे त्यामुळें चार महिने ते लोक आपापल्या घरीं जात. फौजेचा जेवणखर्च व पगार अंगावर पडत नसे. माधवरावांनीं पावसाळा तोंडावर घेऊन ही मोहीम काढल्यामुळें लढाईला तोंड लागतें न लागतें तोंच पावसाळा सुरू झाला. छावण्या करून राहणें भाग पडलें. फौजेचा सर्व खर्च अंगावर पडला त्या मुलखांतील पावसाळी हवा शिपायांना सहन होईनाशी झाली. त्यावेळीं माधवरावांना दादासाहेबांचा सल्ला योग्य असल्याचें कळून आलें पण करतात काय? पुढें पावसाळा संपेपर्यंत त्यांनीं धारवाडचा किल्ला घेण्याचा प्रयत्न चालविला. सप्टेंबर महिन्यांत धारवाडला वेढा दिला व दोन महिने लढाई करून तो ता. ५ नोव्हेंबर सन १७६४ मध्यें घेतला हा किल्ला बरेच दिवस इचलकरंजीकराकडे होता, म्हणून त्यांच्या तर्फे भिमाजी नारायण यानें दरबारखर्चासुद्धां सव्वासात लक्ष रुपयांस धारवाडचा सुभेदारी कबूल केली.

५. या सर्व खटपटी माधवराव पेशव्यांनीं केल्या, त्यामुळें त्यांना फार दगदग झाली. शिवाय त्या मुलखाची पावसाळी हवाही त्यांना सहन झाली नाहीं. त्या स्थितीत त्यांना ज्वरही येऊं लागला. तरी त्यांचीं कामें सुरूच होतीं. मोहीम सोडून परत पुण्यास जावें तर हैदराचा पराभव न करतां जाणें म्हणजे मोठ्या शरमेची गोष्ट असें त्यांना वाटूं लागलें. माधवरावांची ही स्थिति पाहून सखाराम बापूंनीं त्यास परत पुण्यास जाण्याचा सल्ला दिला. पण त्या मानी पुरुषाला तो बरा वाटला नाहीं. मोहिमेवर रहावें तर प्रकृति जास्त बिघडत चालली; मोहिमेच्या जबाबदारीचें काम हातून पार पडत नाहीं हैदर अगदीं बचावाची जागा धरून बसला होता. अशा काळजींत माधवराव पडले असतां त्यांची स्त्री रमाबाई यांनीं त्यांना सल्ला दिला. माधवरावांचे आपल्या पत्नीवर फार प्रेम होतें रमाबाई या फार समाधानी, सद्गुणी, सच्छील व विचारवंत होत्या. त्यांनीं माधवरावांना सांगितलें कीं 'आपली प्रकृति क्षीण होत चालली आहे; आपल्या प्रकृतीला या मोहिमेचा त्रास इतःपर सोसणार नाही; तेव्हां आपण नाशकाला पत्र पाठवून दादासाहेबांना बोलावून घ्यावें. दादासाहेब जरी रागानें निघून गेले असले तरी आपली प्रकृति बरी नाही असें त्यांना समजताच, ते खात्रीनें पळत येतील. अनुभव पहावा.' माधवरावांना हा आपल्या कुटुंबाचा पोक्त सल्ला पसंत पडला. त्याप्रमाणें त्यांनीं पत्र लिहून नाशकास सांडणीस्वार रवाना केला.

६. सांडणीस्वार हें पत्र घेऊन नाशकाला गेला. त्यावेळीं दादासाहेब गोदावरी नदींत स्नानाकरतां उतरले होते. त्यांचें अर्धें वस्त्र नदींत भिजत होतें. अशा वेळीं सांडणीस्वाराने त्यांच्या हातीं लखोटा आणून दिला. ते वाचतांच स्नान सोडून त्यांना त्या ओल्या वस्त्राचाच कांसोटा घातला तसेच घोड्यावर बसून पुढील टप्यावर येऊन त्यांनीं स्नान केलें. अशा खऱ्या कळकळीच्या व प्रेमाच्या अंतःकरणामुळें दादासाहेब तांतडीनें मजल दर मजल करीत माधवरावांच्या छावणीला येऊन पोंचले. माधवरावांनी

पुढील मोहिमेची कामगिरी त्यांच्यावर सोंपविली व आपण स्वस्थ बसले. या वेळीं माधवरावांना दादासाहेबांचें अंतःकरण कसें आहे याची साक्ष पटली. परंतु त्यांच्या येण्यानें माधवरावांच्या कारस्थानी पक्षाचा मात्र हिरमोड झाला. ते दादासाहेबांचीं व्यंगें काढीत बसले.

७. पुढें पावसाळा संपून नद्यांच्या पाण्याचा उतारा झाला असे पाहतांच दादासाहेब सैन्यासह नदी उतरून गेले. हैदर अनवटीजवळ असलेल्या दाट जंगलाचा आसरा घेऊन बसला होता. तेव्हां दादासाहेबांनीं जंगल तोडून आपली फौज जाईल असा साफ रस्ता केला व अनवटी येथें हैदरावर स्वारी करून त्याचा मोड केला. हैदराचे बरच लोक त्यावेळीं झाडींत पळून गेले. हैदर स्वतः एक हजार पायदळ व अडीच हजार स्वारांनिशी बेदनूरला गेला. राघोबादादा त्याच्या मागें लागले. त्यांनीं पुनः बेदनूरला लढाई देऊन हैदराचा पूर्ण पराभव केला. त्यामुळें तो दांतीं तृण धरून दादासाहेबांना शरण आला. तेव्हां त्याच्याबरोबर त्यांनीं तह केला. 'पेशव्यांना हैदरानें बत्तीस लक्ष रुपये द्यावे, घोरपड्यांचा जो मुलुख हैदरानें घेतला होता तो त्यांस परत द्यावा, सावनूरच्या नबाबाकडून खंडणी वगैरे घेऊं नये' अशा कलमांचा तो तह आहे. दादासाहेबांनीं या तहाचीं कलमें ज्या कारणा-करतां हैदरानें आगळीक केली त्याचें निवारण करण्यापुरतींच लादलीं होतीं. बत्तीस लक्ष रुपये त्यांनीं मोहिमेच्या खर्चाचे म्हणून घेतले. शत्रूचा पराभव झाला म्हणून भलत्याच अटी त्याच्यावर लादण्याचा दादासाहेबांचा स्वभावधर्म नव्हता. ते शत्रूचें बलाबल पाहून समेटामुळें पुढें दोस्ती टिकावी या उद्देशानें तह करीत असत. परंतु हें धोरण माधवराव यांच्या कारस्थानी पक्षाला रुचलें नाहीं. 'या प्रसंगीं वाटेल त्या जबर अटी हैदरावर दादासाहेबांना लादतां आल्या असत्या. परंतु त्यांनीं त्या त्याच्यावर लादल्या नाहींत. त्यामुळें त्यांनीं पेशव्यांच्या राज्याचें नुकसान केलें' असे विषारी फुत्कार दादासाहेबांचें व्यंग काढणाऱ्या लोकांनीं सोडले. त्यामुळें माधव-रावांचें मन पुनः दादासाहेबांच्याबद्दल कलुषित झालें. परंतु या वेळीं

दादासाहेबांकडे मोहिमेचे सर्व अधिकार असल्यामुळें माधवरावांना कांहीं बोलतां येण्यासारखें नव्हतें. हैदरवर पुनः स्वारी करून आपणाला पाहिजे तसा नवा तह करून घेऊं अशी त्यांनीं आपल्या पक्षाची समजूत केली. दादासाहेबांच्या मनांतील धोरण हैदराचें राज्य नामशेष करण्याचें नव्हतें. ती गादी जिवंत ठेऊन त्याच्याशी सहकार्य करून व स्नेह वाढवून त्याच्या बळावर नवीन बळावत चाललेल्या इंग्रजी सत्तेला पायबंद घालण्याचें त्यांचें दूरदृष्टीचें धोरण होतें. हें धोरण वरवर राज्यकारभार पाहणाऱ्या लोकांच्या लक्षांत येणें शक्य नव्हतें. याप्रमाणें मोहीम यशस्वी होऊन सर्व मंडळी पुण्यास इ. स. १७६५ च्या जून महिन्यांत परत आली.

८. या हैदरवरील मोहिमेच्या सुरवातीला विठ्ठल शिवदेव विंचुरकर आणि माधवराव पेशवे यांच्यामध्यें एक मोठाच खटका उडाला होता. विठ्ठल शिवदेव हा शूर, तेजस्वी व बाणेदार होता. तो राघोबादादांच्या पक्षाचा होता. या कर्नाटकाच्या मोहिमेंत तो प्रमुख सरदार होता. माधवराव व त्यांच्या पक्षाच्या सरदारांच्या मनांत त्याच्याविषयीं, तो दादासाहेबांच्या पक्षाचा असल्यामुळें, द्वेष होता. परंतु त्याचे पारिपत्य करण्याची संधि या कार-स्थानी पक्षाला मिळाली नव्हती. एके दिवशीं विठ्ठल शिवदेव याच्या फौजेंतील शिपायांची व पेशव्यांच्या फौजेंतील शिपायांची काहीं क्षुल्लक कारणावरून मारामारी झाली. ती माधवरावांना समजतांच त्यांनीं विठ्ठलरावांचा गोट लुटावा अशी आज्ञा केली. विठ्ठल शिवदेव थोरल्या बाजीराव पेशव्यांपासून मातब्बर मर्द सरदार होता, तसाच तो कडवाही होता. पेशव्यांनीं आपला गोट लुटण्याची आज्ञा दिली हें त्याला समजतांच त्यानें आपल्या पाच हजार सैनिकांना तावडतोब लढाईला सज्ज केलें व आपण माधव-रावांच्या सैन्याबरोबर लढण्याकरतां सामोरा आला. ही हकीकत मल्हारराव होळकर यांना समजली. ते लगेच माधवरावांकडे गेले. त्यांनीं त्यांना सांगितलें कीं, 'तुह्मीं हा काय प्रकार मांडला आहे? विठ्ठल शिवदेव काय कमी शूर आहे? त्यानें शिपाईपणांत आपल्या आजोबापासून तुमच्या

गादीची नेकजातपणानें सेवा केली आहे. त्याचें तुम्हीं हें असें बक्षिस त्याला देणार आहां काय ? तुमचें दहा हजार सैन्य जेव्हा खराब होईल, तेव्हां त्याच्या गोटांत तुमचा शिरकाव होईल. त्याचें पारिपत्य करावयाचें तुमच्या मनांतच असेल तर चालू मोहिमेंत त्याला आघाडीवर ठेवावे म्हणजे झालें.' हा होळकरांचा अनुभवी उपदेश माधवरावाना रुचला. पण सोडलेली आज्ञा मानहानि न होतां परत कशी घ्यावी असें होळकराना त्यांनीं विचारलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, " त्याची तुह्मीं काळजी करूं नका. मीं त्यांना आणून आपल्या पायावर घालतों." असें म्हणून मल्हारराव विठ्ठल शिवदेव यांच्या गोटांत गेले आणि त्याच्या दंडाला धरून ह्मणाले ' आतां म्हातारपणीं तुह्मीं हें काय आरंभिलें आहे ? तुह्मी कदीम नोकर. बाजीरावांच्या वेळेपासून तीन पिढ्या धन्याची नोकरी इमानें इतबारें करून त्याची अखेर अशी साधणार काय ? माधवराव मूल आहेत. तुह्मी वृद्ध झाला आहांत. लोक तुह्मांला बोल लावतील. चला मी तुमचा व श्रीमंताचा सलोखा करतों.' असें ह्मणून मल्हारराव विठ्ठल शिवदेवास घेऊन माधवराव यांचेकडे आले. नंतर परस्परांचीं बोलणीं होऊन त्यांचा सलोखा झाला. या बाबतींत विठ्ठल शिवदेव यांनीं दादासाहेबांना नाशकाला पत्र पाठवून वर्तमान कळविलें. त्याचे उत्तर त्यानीं स्वदस्तुरनें त्याना पाठविलें. त्यांतील मजकूर असा आहे. " विनंती उपरी चिठ्ठी पाठविली. किरकोळ कज्जा साठीं उदासपणें लिहिलें तरी असें तुह्मीं न करावें व चिरंजीवही करणार नाहींत. किरकोळ मजकुरासाठीं वाईट दाखवावें हें काय ? असे कज्ज्यासाठीं दुतर्फा सांड असावी. मी चिरंजीवासही सांगून पाठवितों. तुह्मा उदास न होणें हे विनंती[२] "

९. या राघोबादादांच्या स्वदस्तुरच्या पत्रावरून पहातां विठ्ठल शिवदेव हे जरी दादासाहेबांच्या पक्षाचे होते तरी त्यानीं माधवरावाविरुद्ध त्यांना

१. बावडा दप्तरांतील रामचंद्रपंतानें आज्ञापत्र २. प्रौढ प्रतापनिधी माधवराव. पान ३०.

उठावणी न देतां किती न्यायीपणाचा व व्यावहारिक दृष्टीनें किती योग्य असा सल्ला दिला, हें पहाण्यासारखें आहे. दादासाहेबांच्या मनांत जर माधवरावांबद्दल कांहीं द्वेष असता, तर असें पत्र त्यांनीं विठ्ठल शिवदेव यांना कधींच पाठविलें नसतें. उलट त्याना अशा प्रसंगीं चिथवून माधवरावाची व त्याची चकमक करविली असती, आणि उभयताच्या लढ्यांत आपला स्वार्थ साधून घेतला असता. पण असे प्रयत्न मधल्या कारस्थानी लोकांचे असतात. दादासाहेबांचा स्वार्थ माधवरावांना सोडून निराळा नव्हताच तर ते नवीन विघ्नें कशीं उत्पन्न करणार? विघ्नें टाळण्याचाच ते प्रयत्न करीत रहाणार. दादासाहेबानीं विठ्ठल शिवदेवसारख्या वृद्ध सरदाराला एका वाक्यात मोठी व्यावहारिक नीति शिकविली. 'असे कज्जासाठीं दुतर्फा साड असावी.' एवढी नीति शिकविणारा मनुष्य खात्रीनें नीतिमानच असला पाहिजे. सूर्यचंद्राच्या उज्ज्वलतेला सुद्धां ग्रहण लावणारे राहु-केतु असतात. मग दादासाहेबाच्या उज्ज्वल नीतिमत्तेला कलंक फांसणारे कलिपुरुष कां न निघावे?

१०. या कर्नाटकाच्या मोहिमेवर माधवराव पेशवे पुण्याहून निघून गेल्यानंतर दादासाहेबही नाशिकजवळील आनदवल्लीला जाऊन बसले होते. पुढें थोड्याच दिवसांनी गोपिकाबाई नाशिकजवळील गंगापुरी जाऊन राहिल्या. माधवराव मोहिमेवर असतांना त्यांची पुण्यास परत येण्याची वाट न पहातां व पेशवे घराण्यातील जबाबदार वडील माणूस पुण्यास कोणीही नसतां गोपिकाबाई या सौ. रमाबाई, सौ. पार्वतीबाई, व सगुणाबाई यांना पुण्यांत एकट्या ठेऊन गंगापुरी तांतडीनें रहाण्याकरतां गेल्या, तेव्हां त्यांच्या जाण्याच्या मुळाशीं काहींतरी राजकारण असावें असें वाटतें. माधवराव कर्नाटकाच्या मोहिमेवर गेले, त्यावेळीं त्यांनी समागमें रमाबाईना नेलें नव्हतें. परंतु पुढें ज्याअर्थीं त्या तिकडे मोहिमेवर गेल्या, त्याअर्थीं गोपिकाबाई गंगापुरास गेल्यानंतर त्या मोहिमेवर गेल्या असें दिसतें. यावेळीं गोपिकाबाई ज्या एकदा पुणें सोडून गंगापुराला गेल्या त्या फिरून केव्हांही

पुण्याला परत आल्या नाहींत. त्या गंगापुराला गेल्यानंतर पुढें पंचेवीस वर्षे जगल्या. एवढ्या दीर्घकालांत फिरून त्यांनीं पुण्याचें तोंड पाहिलें नाहीं. या अवधींत माधवरावांचा मृत्यू, रमाबाईचें सती जाणें, नारायणरावांचा पेशव्यांच्या गादीवर बसण्याचा समारंभ, नारायणरावांचा मृत्यू, सवाई माधवरावांचा जन्म, त्यांचा व्रतबंध, त्याचें लग्न, वगैरे अनेक सुखदुःखाचे प्रसंग खुद्द गोपिकाबाईच्या कुटुंबांत घडले. परंतु कोणत्याच प्रसंगीं, निरनिराळीं बोलावणीं गेलीं असतांही त्या आल्या नाहींत त्याअर्थी, पुणें सोडून जाण्याच्या कारणापेक्षां पुण्याला परत न येण्याचें कारण कांहीं तरी महत्वाचें असलें पाहिजे यांत संशय नाहीं. पतीच्या दुःखानें किंवा विश्वासरावाच्या पुत्रशोकानें प्रपंचाला विटून जाऊन, विरक्त होऊन, त्या गंगापुराला जाऊन राहिल्या, असें म्हणावें तर, नानासाहेबांच्या व विश्वासरावांच्या मृत्यूनंतर त्या तीन वर्षे पुण्याला राहिल्या. प्रापंचिक घालमेली गृहकलहांत जेवढ्या करावयाच्या तेवढ्या सर्व त्यांनीं केल्या. असें असतां त्या अकल्पित रीतीनें माधवराव याच्या गैरहजेरींत गंगापुरी जाऊन राहिल्या तेव्हां यांत कांहीं तरी कारस्थान असावें असाच तर्क दुणावतो. राघोबादादा नाशकास गेले तेव्हां ते माधवरावांच्या विरुद्ध कांहीं कारस्थान उत्पन्न करतील म्हणून त्यांच्यावर नजर ठेवण्याकरतां तेथेंच जवळ असलेल्या गंगापुरीं त्या जाऊन राहिल्या, असें म्हणावें तर, माधवराव व दादासाहेब मोहिमेवरून परत पुण्याला येतांच त्याही परत पुण्यास आल्या असत्या. पण तसें ज्याअर्थी झालें नाहीं त्याअर्थी त्यांनीं ज्या कारणाकरता पुणें सोडलें तें कार्य त्यांच्या हेतूप्रमाणें शेवटपर्यंत साध्य झालें नाहीं असेंच कोणतें तरी ते कारण असले पाहिजे असें अनुमान निघतें.

११. या दृष्टीनें विचार करूं लागतां, गोपिकाबाई गंगापुरास निघण्यापूर्वीं कोणतें राजकारण सुरू होतें व तेथें गेल्यानंतर थोड्याच दिवसांत तें प्रकाशांत आलें हें पहाणें जरूर आहे. त्या राजकारणामुळें जर गोपिकाबाईच्या हट्टी व मत्सरी स्वभावाला धक्का बसला असेल तर तेंच कारण त्यांच्या

पुण्यास परत न येण्याला कारणीभूत झालें असे म्हणतां येईल. या दृष्टीनें पहातां आबाजी पुरंदरे यांच्या ताब्यांत दिलेला पुरंदर किल्ला व त्याबाबत झालेला कोळ्यांचा दंगा आणि शेवटीं त्या प्रकरणी पेशव्याचा अखेरचा निवाडा, या गोष्टीशीं गोपिकाबाईंच्या वरील सर्व वागणुकीचा संबंध असावा असें दिसून येतें.

१२. इ. स. १७६२ मध्यें माधवराव दादासाहेबांना शरण आले व त्या नंतर दादासाहेब राज्यकारभार पाहूं लागले. त्यावेळी त्यांनीं सखाराम बापूंस नऊ लाख रुपयांची जहागीर व सिंहगड किल्ला आणि आबा पुरंदरे यास अकरा लाखांची जहागीर व पुरंदर किल्ला असे करार करून दिले होते. पुढें इ. स. १७६३ च्या आगष्ट महिन्यांत राक्षसभुवनाची लढाई झाल्यानंतर दादासाहेबांनीं आपला कारभार माधवरावांकडे सोंपविला. नंतर जी कारभारी मंडळीची अदलाबदल झाली त्यांत आबा पुरंदरे हे कारभारांतून निघाल्यानंतर पुरंदर किल्ला त्यांच्याकडे रहाणें हें गोपिकाबाईंना व त्यांच्या कारस्थानी लोकांना इष्ट वाटलें नाही. शिवाय त्यांच्या जागीं त्रिंबकरावमामा पेठे हे काम पाहूं लागले. हे मामा गोपिकाबाईंच्या पूर्ण विश्वासाचे व पूर्ण मर्जींतले होते. तेव्हां पुरंदरचा किल्ला आबा पुरंदरे यांच्या ताब्यांत न राहतां तो त्रिंबकराव मामांना मिळावा हा हेतु गोपिकाबाईंचा व त्यांच्या अंतस्थ कारस्थानी लोकांचा होता. गोपिकाबाईंचा ओढा पुरंदर किल्ल्यासंबंधीं विशेष होता. कारण सन १७६१ च्या डिसेंबर महिन्यांत निजामअली ज्यावेळी उरली पावेतों चालून आला, त्यावेळीं गोपिकाबाईंनीं सर्व खाशा कुटुंबासह याच किल्ल्यावर प्रयाण केलें होतें. नारायणरावांची मुंजही याच किल्ल्यावर झाली होती. त्या ठिकाणीं गोपिकाबाईंचें बरेच दिवस वास्तव्य झाल्यामुळें किल्ल्यावरील शिबंदी, चाकर वगैरे लोकांचा ओढा गोपिकाबाईंकडे लागला होता. परंतु त्या किल्ल्याचा ताबा आबा पुरंदरे यांच्या हातीं गेल्यावर एकाद्या प्रसंगीं पुरंदर किल्ल्यावर आपणाला जाण्याचा प्रसंग आला व त्या ठिकाणीं आपण जाऊन राहिलों तर अनायासें दादासाहेब कारस्थान करून तेथेंच आपणाला कैदेंत ठेवतील ही कल्पना त्यांच्या मनांत कारस्थानी लोकांनीं भरवून दिली "इ. स. १७६३ मध्यें

निजामअल्लीनें पुण्यावर स्वारी केली त्या वेळीं पुरंदरावर जाऊन राहण्याकरतां गोपिकाबाईंना राघोबादादांनीं पुष्कळ आग्रह केला. परंतु तेथें गेल्यावर ते आपणाला अडवून ठेवतील या भीतीनें त्यांनीं पुणें सोडलेंच नाहीं. [१] " ज्या राघोबादादांनीं पुढें थोड्याच दिवसांत माधवरावांच्या हातीं स्वसंतोषानें—ते राज्यकारभार पहाण्यास योग्य झाले असें पाहून—सर्व कारभार दिला, त्या थोर व प्रामाणिक राजपुरुषाविरुद्ध कारस्थानी लोकांनीं गोपिकाबाईंच्या कानांत कसें संशयाचें विष ओतून ठेविलें होतें, हें यावरून समजून येईल. यावेळीं पुरंदर किल्ल्याचा ताबा आबा पुरंदरे यांच्याकडेच होता.

१३. आबा पुरंदरे यांच्या ताब्यांत पुरंदर किल्ला दादासाहेबानीं दिला हें अर्थात् गोपिकाबाई वगैरे लोकांना पसंत पडलें नाही. त्यामुळें पुरंदर किल्ला पुनः आपल्या हातीं कसा येईल यासंबंधी त्यांची खटपट सुरू झाली. आबा पुरंदरे व त्याचा भाऊ आप्पा पुरंदरे यांचें वैमनस्य होतें. आप्पा हे गोपिकाबाई यांच्या पक्षाचे होते. तेव्हां त्यांच्या करवीं आबा पुरंदरे यांचा अंमल पुरंदरावर न बसेल अशी खटपट सुरू झाली. या किल्ल्यावरील कोळी लोक आपला अंमल बरोबर बसूं देईनात अशी तक्रार आबा पुरंदरे यानीं दादासाहेबाकडे केल्यामुळें तेथें प्रत्यक्ष ते गेले. आणि शिरजोर झालेल्या कांहीं कोळी लोकांना कामावरून कमी करून त्यांना किल्ल्याखालीं पाठविलें व त्यांच्या जागीं नवीन भरती करून आबा पुरंदरे याचा अंमल प्रस्थापित केला. पुढें कर्नाटकाच्या स्वारींत आप्पा पुरंदरे गेले. नाशिकला दादासाहेबांबरोबर आबा पुरंदरे गेले. अशा वेळीं पुरंदर किल्ल्याची मसलत केल्यास ठीक पडेल असें वाटून पुढील कारस्थानाची जोडणी केली गेली; व गोपिकाबाईंचा या कारस्थानाशीं कांहीं संबंध असेल अशी शंका राघोबादादाना व माधवरावांना वाटूं नये म्हणून त्यांनीं पुण्याहून निघून गंगापुरास जाण्याची युक्ति काढली असली पाहिजे, असा तर्क बसतो. या कारस्थानाचे सूत्रधार मात्र पुण्यास राहिले.

---

१. भा. इ. सं. मं. वर्ष ५ अंक १।२।३।४ पा. २५ ले. गो. म. सरदेसाई.

१४. तारीख ७ माहे मे सन १७६४ रोजीं पुरंदरच्या कोळी लोकांनीं बंड करून किल्ला हस्तगत केला. यासंबंधीं रामाजी सखाराम सरनाईक यांनीं आपल्या वडील बंधूस पुढील पत्र लिहिलें आहे. "हवालदार सरनौबत वगैरे चार असामी ठार झाले. नवे लोक किल्ल्याखालीं घातले. जुने कोळी यांची समजावीस राघो गंगाधर यांनीं केली. घरें शाकारावयाचें निमित्त करून चारशें माणूस गडावर गेलें. वाघाची पारध निघाली. ऐशी बाजी करून सदरेवर चालून आले. पुरंदर घेतल्यावर पांचवे रोजीं रुद्रमाळ घेतली. हें वर्तमान नाशीक मुक्कामीं राघोबादादांना समजलें. तेव्हां त्यांच्याकडून आबा पुरंदरे आले. कोळ्यांनीं गड घेतल्याबरोबर त्यांनीं धोंडोबा आबा पुरंदरे यांचे कारकून विसाजी केशव सान्ये यास गडावर नेलें. त्याचे आज्ञेनें सर्व वर्तणुक करतात. किल्ला घेतल्यावर कोळ्यानीं लोकांची संपत्ति लुटून आपले रोजमुरे वगैरे भागविले. विसाजीपंत व कोळी कारभार करतात. मुलखांत सर्वत्र दंगा व धामधूम चालू आहे. राज्य बुडालें. या उपर पुरंदर कोणाकडे होईल कळत नाहीं. श्रीमंतांनीं ( आबा पुरंदरे यांनीं ) नारायणाचे देवळांत मृत्युंजयाच्या अनुष्ठानास प्रारंभ केला होता. तेथेंही दंगा होऊन सर्व जिन्नस कोळ्यांनीं किल्ल्यावर नेले. ब्राह्मण पळून गेले. श्रीमंतांची सर्व वस्त्रभाव कागद देखील गडावर सर्वस्व बुडालें. पुढें श्रीमंत आल्यावर रंग कसा बसेल पहावें. कोळ्यांनीं सासवडास पुरंदरे, सरनाईक वगैरे अनेक मंडळीकडे रोखे करून पैसा बहुत नेला" या पत्रांतील मजकूर लक्षांत घेतां पहिल्यानें दादा-साहेबांची व आबा पुरंदरे यांची अशी कल्पना झाली कीं, या कोळ्यांच्या बंडाला माधवराव सामील असावेत. त्यामुळें राघोबादादाना त्यांचा मनस्वी संताप आला. राघोबादादांनीं याची चौकशी माधवराव यांचेकडे पत्रद्वारें केली. त्याचें उत्तर कोणत्याही प्रकारें या प्रकरणांत आपलें अंग नाहीं असें त्यांनीं दादासाहेबांना कळविलें. 'आपल्या मनाला येईल त्याप्रमाणें न्याय

---

1. पुरंदरे दप्तर अप्रकाशितपैकीं रामाजी सखाजी सरनाईक यांचें आपल्या वडील भावास पत्र.

करावा. किल्ला ज्याचा त्याचे स्वाधीन करावा ' अशा आशयाचे माधवरावांकडून त्यांना उत्तर आलें. त्यानंतर दादासाहेबांनीं विसाजी केशवाचें पारिपत्य करण्याकरतां माणसें पाठविलीं. त्यांनीं जाऊन बंडखोरांचा बंदोबस्त केला व किल्ला आपल्या ताब्यांत घेतला.

१५. माधवरावांचें पत्र राघोबादादांना ' किल्ला ज्याचा त्याचे स्वाधीन करावा ' असें आलें असतां तो किल्ला आबा पुरंदरे याच्या ताब्यांत न देतां तो सरकारजमा कां करून घेतला याबद्दल कांही इतिहासकारांचे निराळे तर्क आहेत. त्यांचें असें ह्मणणें आहे कीं दादासाहेबांच्या मनांत तो किल्ला लाटाव-याचा होता. परंतु असें ह्मणणाऱ्या इतिहासकारांनी दादासाहेबांच्या स्वभावाची पारख तर केली नाहींच पण उपलब्ध पत्रांतील मागील पुढील संदर्भ लावून त्या वेळच्या परिस्थितीचाही विचार केला नाहीं, असें दिसतें. माधवरावांच्या कडून ज्यावेळीं ताकिदी आल्या व ज्या वेळी या पुरंदर किल्ल्याच्या प्रकरणाशीं माधव-रावांचा संबंध नाहीं असें दिसून आलें, त्यावेळीं हें कारस्थान माधवरावांच्या नांवावर त्यांच्या कारस्थानी लोकांनी गोपिकाबाईंना घेऊन केलें असावें असें दादासाहेबांना वाटलें. अर्थात् याची नीट चौकशी केल्याशिवाय किल्ला कोणा-च्याच ताब्यांत द्यावयाचा नाहीं असा त्यांनीं निर्धार केला.

१६. पुरंदर किल्ल्याच्या प्रकरणीं माधवराव पेशवे यांनीं विसाजी केशव याचा कैवार न घेतां कानांवर हात ठेवले व वैतागानें तारीख २६ माहे जून सन १७६४ चें पुढील पत्र लिहिलें.[1] ' विसाजी केशवाचें पारिपत्य करण्यास श्रीमंती माणसें पाठविलीं, त्यांनीं येऊन बहुत पीडा केली. गडकऱ्यांचे कबिले कित्येक धरले. बायकापोरांना हाणमार करून चोळणें घालविलें. पोरें सरा-ट्यावर टाकलीं. गांव लुटून जाळून उध्वस्त केलें.' गंगापुराहून त्रिंबकराव मामांचा पत्रव्यवहार माधवराव पेशवे यांच्याबरोबर सारखा होताच. इकडे दादासाहेबांकडे कायकाय व्यवहार चालले आहेत, ते त्यांना तिकडे कळवीत होते. त्यांच्या एका पत्राचें उत्तर माधवरावांनीं पाठविलें तें असें. ' पुरंदरचा

१. ख. ले. ४३१

प्रकार येथील संकेतानें कदापि न झाला. कोळी, बेरड, स्थाईक कदीम, तिसां वर्षांचे चाकर. त्यांस दूर करून अन्नास यजित केलें. या साठीं त्यांनीं दावा पाहून हें कर्म केलें. दुष्ट लोक नाना प्रकारें विकल्प आणून देतील त्यास इलाजें नाहीं. विसजीपंत धोंडोबाआप्पाकडून दोनतीन वर्षें दूर आहेत. ते कोळ्या-बेरडांत आमच्या आज्ञेशिवाय मिळाले आहेत. दादासाहेबांच्या मर्जीप्रमाणें वर्तणुक करावी हेच येथील मानस आहे. किल्ला ज्याचे त्याचे स्वाधीन करणें अशा ताकीदी येथून दिल्या आहेत. वरकड कृष्ण कल्पना कोणी मनांत आणून देतील तर इलाज नाहीं. तारीख ५–६–१७६४.' या नंतर राघोबादादांनीं रागावून धोंडो मल्हारचा सरंजाम जप्त करविला.

१७. या पत्रव्यवहारावरून स्पष्ट दिसून येतें कीं विसाजी केशव याला "तुला माधवराव पेशव्यांचें पाठबळ आहे; व त्यांच्याच आज्ञेनें तूं बंड करून पुरंदरचा किल्ला हस्तगत कर" असें माधवराव पेशव्यांच्या पक्षांतील ह्मणवणाऱ्या मोठ्या व्यक्तीनें सांगितल्यावरून त्यानें हा उपद्व्याप करून किल्ला हस्तगत केला होता. परंतु शेवटीं माधवरावांना या प्रकरणाची तिळमात्र माहिती नाहीं असें दिसून आल्यानें आपणाला मधल्या कारस्थानी लोकांनीं तोंडघशी पाडलें असें वाटून त्याला वैताग यावा हें सहाजिक आहे. शिवाय गेलीं दोनतीन वर्षें तो आपल्या नोकरींतही नाहीं असें आपा पुरंदरे यांनीं सांगून आपल्या अंगावरील बाजू काढून टाकली. त्रिंबकराव मामांना पेशव्यांकडून आलेल्या पत्रावरून असें दिसतें कीं, पुरंदर किल्ल्याच्या बाबतींत दादासाहेब माधवरावांवर वाटेल ते आरोप करीत आहेत; तर्‍हां पुरंदरचा बंदोबस्त करण्याची कामगिरी माधवरावांनीं आपल्याकडे द्यावी अशी त्रिंबकराव मामांनीं मागणी केली असावी. कारण माधवरावांना मामांनीं पाठविलेल्या एका पत्रांत असा मजकूर आहे कीं, 'राघोबादादा पुरंदरामुळें फारच विकल्प विपरीत दर्शवितात. चित्तांत येऊन श्रीमंत (दादासाहेब) मनस्वी भाषण करतात. कोणे रंगास जाईल पहावें. सर्व दौलतीचा कारभार येथील कारभारी (दादासाहेबांचे) ढवळीतच आहेत.' या पत्रावरून मामा हे राघोबादादांच्या चहाड्या करून

त्यांच्याविषयीं माधवराव याचें मन जास्त जास्त कलुषित करीत होते असें स्पष्ट दिसून येतें. व पुढें त्यांनीं जें पत्र पाठविलें त्याचें उत्तर माधवरावांनीं वरीलप्रमाणें दिलें. 'दादासाहेबांच्या मर्जीप्रमाणें वर्तणुक करावी हेंच येथील मानस आहे.' याचा अर्थ असाच कीं, 'तुह्मांला या कामीं ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं. तरी आमचें मत असें आहे कीं, तुह्मी दादांच्या मर्जीप्रमाणें वर्तन ठेवावें. किल्ला दुसऱ्या कोणाचे ताब्यांत न देतां ज्याचे त्याचे स्वाधीन करण्याबद्दल येथून ताकिदी गेल्या आहेत.' अर्थात् या पत्रावरून त्रिंबकराव मामा यांची कंबरच खचली असेल यांत शंका नाहीं. पुढें अशीही एक हूल उठवण्यांत आली होती कीं, राघोबादादांनीं पुरंदरचा किल्ला सरकारी वतीनें जरी आपल्या ताब्यांत घेतला तरी आता पुरंदरे त्यांच्या वतीनें येऊन मुलखांत बखेडा माजविणार. ही हूल पसरविल्यामुळें पुनः एक दिवस गडबड झाली. परंतु खरा प्रकार लोकांना कळल्यामुळें ते शांत झाले. पुढें पुरंदरचे कोळी लोक आपली तक्रार घेऊन नाशीकाला दादासाहेबांच्याकडे गेले. त्यांची सर्व तक्रार व किल्ल्यासंबंधींची सर्व घडलेली हकीकत दादांनीं ऐकून घेतली, आणि त्यांच्या अर्जाचा निकाल त्यांनीं खालीलप्रमाणें दिला.

१८. 'तुह्मीं पिढी दर पिढीचे एकनिष्ठ सेवक. तुह्मांपासून खावंदांची बेमानी झालीच नाहीं. ऐसें असतां किल्ले मजकूर आबा पुरंदरे यांजकडे दिल्हा असतां त्यांनीं खावंदांचे जागीं दुजाभाव करून तुम्हांस इमान प्रमाण मागत होते. तेव्हां तुम्हीं पहिल्यानें न दिल्हे म्हणून तुम्हांस दूर केलें. दुसरे लोक चढविले. तुह्मांस बाहेर घालवूं लागले. तेव्हां कळेल त्या प्रकारें तुह्मीं जागा हस्तगत केली यामुळें खुब खराबी कित्येक गोष्टी तुमचेकडून झाल्या. इतक्यावर तुमची एक निष्ठता जाणून तुह्मांस सर्व अन्याय माफ केले. तुमचा अर्ज कीं, किल्ला फिरोन आबा पुरंदरे यांस अगर कोणासही न द्यावा. हा तुमचा अर्ज कबूल केला. खातरजमा असो देणें. तुमचे पूर्ववत्प्रमाणें हुजुरच किल्ला ठेऊन चालविलें जाईल. किल्ल्यावर सरकाराचा व पुरंदऱ्यांचा पैकाटक्का, जवाहीर, कापड चोपड, व इतरांची मालमता आहे ती सर्व सरकारची आहे. मनसब्याचे कामास आली

पाहिजे ह्मणून त्याची पक्की याद करून किल्ल्यावरून उतरून देणें. सर्व लोकांस खातरजमेकरतां कौल पाठविला असे. ( तारीख ३०।८।१७६४ पुरंदरे दप्तर अप्रकाशित ).

१९. याप्रमाणें दादासाहेबांनीं कोळ्यांना न्याय दिला. माधवरावांची आज्ञा ज्याचा किल्ला त्याला द्यावा अशी असतां व तो किल्ला आबा पुरंदरे हे दादासाहेबांच्या पक्षांतील व त्याच्या विश्वासांतील असतां त्यांना तो न देतां फिरून कोळ्यांच्याच हवालीं सरकारी किल्ला म्हणून ठेवण्याचा न्याय त्यांनीं केला; अर्थात् दादासाहेबांनीं आबा पुरंदरे यांची ही निव्वळ फसवणुक केली असें इतिहासकारांचें म्हणणें आहे. राघोबादादांनीच तो किल्ला आबा-पुरंदरे यांना जहागिरींत दिला होता, व पेशव्याचीही तशी आज्ञा नसतांना तो त्यांनीं काढून घेऊन सरकारजमा केला व आपल्या पक्षांतील एका बलिष्ठ कारभाऱ्याचे मन दुखाविलें हें कसें ? असे वरवर पहाणाऱ्यांना वाटेल. परंतु त्याचा खुलासा वरील राघोबादादांच्या हुकमांत आहे ' किल्ले मजकूर आबा पुरंदरे यांजकडे दिला असतां त्यानीं खावंदाचे जागीं दुजाभाव कल्पून तुम्हांस इमानप्रमाण मागत होते ' या एका वाक्यानेंच आबा पुरंदरे यांचेकडे किल्ला न देण्याचें कारण दिसून यईल. कोळी लोक ज्यावेळीं नाशीकला दादासाहेबांकडे आले व त्यांना किल्ल्याची कची हकीकत समजली, तेव्हाच त्यांनी हा न्याय दिला. आबा पुरंदरे हा दादासाहेबांच्या पक्षांतील अगदीं जीवश्च कंठश्च इसम जरी होता, तरी त्याला किल्ला दिल्यावर तो खावंदांशीं म्हणजे माधवराव पेशव्यांशी ज्या-अर्थी दुजाभाव किंवा पोटांत कपट ठेऊन त्या कोळी लोकांकडून इमान-प्रमाण मागत होता, त्याअर्थी तो अप्रामाणिक आहे, असें दादासाहेबांना दिसून आलें. म्हणून त्यांनीं आपला माणूस म्हणून त्याची गय न करतां असा योग्य न्याय दिला. हा न्याय केवळ न्यायप्रियच मनुष्य देऊं शकेल. आपला जरी मनुष्य असला तरी माधवराव पेशव्यांविषयी जो दुजाभाव ठेवतो तो मनुष्य राजकारणांत चांगला नाहीं, ही वृत्ति राघोबा-

दादांची होती हे या उदाहरणावरून स्पष्ट होतें. असे असतां दादासाहेब स्वार्थी, पेशव्यांच्या दौलतीचा अपहार करणारा, पेशवाईचा शत्रू असें कांहीं अजाण लोक त्यांना दूषण देतात. त्यांनीं या पुरंदरच्या प्रकरणांत आपलें मन नीट साफ करून पहावें म्हणजे दादासाहेब किती न्यायी व निःस्वार्थी होते हें त्यांना दिसून येईल.

२० अशा प्रकारे हे प्रकरण निकालांत काढल्यावर माधवरावांच्या बोलावण्याप्रमाणें दादासाहेब कर्नाटकाच्या मोहिमेवर निघून गेले. पुढें ते ती मोहीम आटोपून माधवरावांसह इ. स. १७६५ च्या पावसाळ्यांत पुण्याला परत आले. या वेळीं पुनः ही किल्ल्याची भानगड माधवरावांच्या पुढें निघाली. ‘ कोळी ह्मणतात किल्ला निळकंठ महादेवास न द्यावा, कोणासही न देतां हुजुर ठेवावा. ’ दादासाहेबांनीं हाच निकाल दिला होता. तोच योग्य आहे, असें माधवराव पेशव्यांनीं सांगितलें व किल्ला सरकारांत ठेवला.

२१. अशा प्रकारें पुरंदर किल्ल्याचें प्रकरण माधवरावांच्या वरिष्ठ न्याय कचेरींत पुनः न्याय मिळण्याच्या दृष्टीनें निघालें व शेवटीं दादासाहेबांच्या खालच्या न्यायकचेरीचा ठराव कायम करण्यांत आला. या प्रमाणें पुरंदर किल्ल्याचें प्रकरण बाह्य दृष्टीनें निकालांत काढण्यांत आलें. परंतु या पुरंदर प्रकरणाच्या मुळाशीं काय असावें हे समजल्याशिवाय इतिहासजिज्ञासूंचें समाधान होणार नाहीं. ह्मणून या दृष्टीने या प्रकरणांतील शंकास्थानें प्रकाशात आणून त्यावर विचार करणे बरें.

१. पुरंदर किल्ल्याशीं आबा पुरंदरे याचा जर संबंध नव्हता व विसाजी केशव हा जर आबा पुरंदरे यांच्या नोकरींतून दोन वर्षे दूर होता, तर कोळी लोकांनीं त्यालाच आपला पुढारी करून बंड केलें व त्याच्या ताब्यांत पुरंदर किल्ल्याचा कारभार दिला याचें कारण काय ?

२. कोळ्यांच्या मनांत जर पुरंदरचा किल्ला दुसऱ्या कोणाच्याही अधिकारांत न ठेवतां तो सरकारजमा करावा असें पहिल्यापासून होतें तर त्यांनीं किल्ला हस्तगत केल्याबरोबर माधवरावांना किंवा दादासा-

हेबांना सरकारतर्फे किल्ला ताब्यांत घेण्यांत यावा असा विनंतिअर्ज कां केला नाहीं ?

३. आबा पुरंदरे जर माधवरावांविरुद्ध इमानप्रमाण कोळ्यांजवळ मागत होते व ते मागणें जर कोळ्यांच्या बंडाला कारण झालें तर बंड करून किल्ला ताब्यांत घेतल्याबरोबर त्याची वर्दी माधवराव व दादासाहेब यांना कोळ्यांनी ताबडतोब दिली पाहिजे होती, व आबा पुरंदरे यांच्यावर गुन्हेगारी लादण्याकरतां आपल्या विनंतिअर्जांत मागणी करावयाला पाहिजे होती. परंतु त्यांनीं तशी ती बंडापूर्वी अगर किल्ला ताब्यांत घेतल्याबरोबर कां केली नाही ?

४. त्रिंबकरावमामा पुरंदर किल्ल्याबाबत माधवराव पेशव्यांकडे पत्रव्यवहार ठेऊन कां ढवळाढवळ करीत होते ?

५. पुरंदर किल्ल्याबाबत कोळी लोकांनी दादासाहेबांच्याकडे अर्ज करून त्यांच्याकडून न्याय घेतला असें असतां त्यावर पुनः न्याय मागण्याकरतां माधवरावांच्या वरिष्ठ न्यायकचेरींत दादासाहेबांविरुद्ध कोणी प्रयत्न केले ?

अशा प्रकारच्या शंका उत्पन्न होतात, म्हणून त्या दृष्टीनें या पुरंदर किल्ल्याच्या प्रकरणांत जास्त घुसून पाहणें इष्ट आहे. नाना फडनविस हे राक्षसभुवनच्या लढाईनंतर माधवराव स्वतंत्रपणें कारभार पाहूं लागले त्यावेळीं, फडणीशीच्या जागेवर प्रत्यक्ष असे काम पाहूं लागले. या वेळपर्यंत त्यांनीं कोणतीही सरकारी नोकरीची जागा स्वतः जबाबदारीनें पतकरली नव्हती. इतके दिवस त्यांचे पेशव्यांच्या घरांतील सरदारांचे व राजकारणाचे धागेदोरे कसे आहेत याचा अभ्यास करणें यांतच गेले होते. राज्यकारभारांत शिरल्या नंतर आपलें आसन स्थिर राहील असें त्यांना ज्यावेळीं दिसून आलें, त्याच वेळीं त्यांनी फडणीशी स्वीकारली. अधिकाराच्या जागेवर येईतोंपर्यंत आपल्या पक्षांतील लोकांना विरुद्धपक्षावर वाटेल तसें तोंडसुख घ्यावयाला लावून त्यांना कार्यभाग करतां आला. पण

राज्याच्या कारभारांत आल्यानंतर केवळ स्वपक्षांतील लोकांना पाहून चालतां येण्यासारखें नव्हतें. शिवाय फडणीशीच्या कामाची जबाबदारी पार पाडून आपल्या पक्षांतील लोकांना खूष करणें ही नित्याची बाब त्यांच्यामागें लागलेली होती. अर्थात् त्या दृष्टीने गृहकलह कायम ठेवून पण त्याची झळ आपणाला न बाधेल अशा सावधगिरीनें त्यांनीं व्यवस्था करण्याची खटपट चालविली.

२२. गोपिकाबाईंच्या स्वभावाची नानाना पूर्ण माहिती होती. त्यांच्या मनाविरुद्ध एखादी गोष्ट झाली म्हणजे त्या कशा द्वेष्ट्या बनत होत्या ह्याचा अनुभव त्यांना होता. त्या जशा हट्टी तशाच त्या निष्ठूरही होत्या. या वेळ-पर्यंत त्यांच्या या स्वभावाचा उपयोग राघोबादादाच्या पक्षाविरुद्ध नानांनीं करून घेतला. परंतु आतां नाना राजकारभारांत पडल्यामुळे गोपिकाबाई-च्याच सल्ल्यानें त्याना सर्व कारभार करतां आला नसता. अर्थात कचित् प्रसंगीं गोपिकाबाईंच्या मर्जीविरुद्धसुद्धां त्यांना कामगिरी बजावावी लागली असती. गोपिकाबाईंचा जो स्वार्थ तोच माधवराव याचा जरी होता तरी, माधवरावाना राज्यांत मोठेपणा घ्यावयाचा होता तेव्हां केवळ आईच्या विचारावरच त्यांना सदासर्वदा अवलंबून राहतां येण्यासारखें नव्हतें. अशा स्थितींत माधवराव तापट व हट्टी पण पेशवे म्हणून नानांना पहिल्यानें त्यांची मर्जी संभाळावयाची होती. माधवरावांचे आपल्या पत्नीच्या ठिकाणीं मोठें प्रेम होतें, म्हणून त्यांना रमाबाईंचीही मर्जी पाहूनच वागलें पाहिजे होतें. गोपिकाबाईंचा स्वभाव विचित्र म्हणून सौ. रमाबाई, पार्वतीबाई किंवा सगुणाबाई या सर्वच त्याच्यापासून फटकून वागत. रमाबाईंचें तर त्यांच्या-बरोबर बिलकुल पटत नसे. या तिघीजणींचें आनंदीबाई यांच्याबरोबर मात्र सख्य असे

२३. नाना हे मोठे धोरणी, मुत्सद्दी, राजकारणकुशल असे असल्या-बद्दल त्यांची प्रशंसा होती. ते कारभारांत आल्याबरोबर त्यांच्या कृतीला वरील धोरणानेंच सुरवात होणार होती. त्याप्रमाणें त्यांनीं आपलीं धोरणें

संभाळून राजकारभार सुरू केला असला पाहिजे यांत संशय नाहीं. त्यांनीं राज्यकारभारांत आपलें अस्तित्व कायम ठेवण्याकरतां जीं धोरणें राखिलीं त्यांत त्याचीं खालील धोरणें मुख्य होती. १ पेशव्यांच्या घरांतील कलह अबाधित चालू ठेवणें. २ पेशव्यांच्या राज्यांतील लढाईच्या प्रसंगीं रक्षण-क्षम अशीं महत्वाचीं स्थळें आपल्या स्वाधीन ठेवणें. ३ राघोबादादांचें वजन जेणें करून कमी होईल असे इलाज करणें व त्यांचा पक्ष हलका होण्या-करतां त्यांच्या सरदारात फूट पाडणें. ४ पेशव्यांच्या राज्यांतील मोठमोठ्या सरदारांत नेहमींच फूट राहील अशीं धोरणे संभाळणें. ५ कोणतीही मसलत आपल्या मनाप्रमाणे पार पाडण्याकरतां पैशाची फार जरूरी असते, या करतां हरप्रयत्नानें पैसा मिळवून त्याचा संचय करून ठेवणें. हीं धोरणें संभाळण्याकरतां न्यायान्यायाचा विचार केला नाहीं तरी त्यांना चालण्यासारखें होतें.

२४. नानांचीं हीं धोरणें ते कारभांत पडल्यानंतर पुरंदर प्रकरणाच्याही बाबतींत अमलांत आलीं असलीं पाहिजेत यांत शंका नाहीं. तेव्हां कोणतें तरी एक राजकारण उत्पन्न करून त्यातून आपलीं अनेक धोरणें साधून घेण्याची मुत्सद्देगिरी नानाजवळ पाणी भरीत होती, म्हणून त्यांनी पुरंदर प्रकरण उपस्थित केलें यांत संशय नाहीं. आबा पुरंदरे हा दादासाहेबांचा मनुष्य. पुरंदरासारखा सुरक्षित किल्ला त्यांच्या ताब्यांत राहणें नानांना नको होतें. किल्ला तर काढून घेतला पाहिजे व तो अशा युक्तीनें काढला पाहिजे कीं ज्यामुळे आबा पुरंदरे व दादासाहेब यांच्यात वितुष्ट उत्पन्न होईल ! या धोरणानें किल्ला सरकारजमा होऊन दादासाहेबांचा एक मदतगार कमी होईल ही एक बाजू झाली. दुसरी बाजू म्हणजे पुरंदर किल्ला काढून घ्यावयाला कोणी तरी प्रतिस्पर्धी उभा केला पाहिजे होता. म्हणून त्यांनीं त्रिंबकरावमामा यांना उभें केलें. आबा पुरंदरे यांची जागा त्रिंबकराव मामांना मिळाली अर्थात् त्या जागेची जहागीर व किल्ला त्यांना मिळणें न्यायाचें होतें व त्याची मागणी माधवराव पेशव्यांकडे त्यांना उघड रीतीनें

करतां येण्यासारखी होती. या बाबतींत गोपिकाबाईचेंही मामांना पूर्ण पाठबळ होतें. यामुळें दादासाहेबांविरुद्ध योग्य प्रतिस्पर्धी नानांच्या हातीं होता. परंतु पुरंदर किल्ल्याची मागणी माधवराव यांच्याकडे कायदेशीर रीतीनें करून, दादासाहेबांची मर्जी पाहून त्यांच्या कलानें हें प्रकरण निकालांत आणावयाचें ह्मणजे किती दिवस लोटतील याचा नेम नव्हता. तेव्हां हें प्रकरण ताबडतोब रंगांत आणावयाला कांहीं तरी निमित्त उत्पन्न करणेंच प्राप्त होते. म्हणून नानांनीं विसाजी केशव याच्या नेतृत्वाखालीं कोळ्यांचें बंड उभारण्याची कारवाई केली. या बंडाशीं आप्पा पुरंदरे याचा संबंध न दिसावा म्हणून तो लढाईवर माधवरावांबरोबर पाठविला होता. त्रिंबकरावमामा व गोपिकाबाई यांचा संबंध दिसूं नये ह्मणून त्यांची रवानगी गंगापुरीं केली व स्वतः नानानिराळे राहून गुप्तप्रकारें पुण्यास पुरंदरप्रकरणाची सूत्रें हालवीत नाना बसले.

२५. नानांनीं त्रिंबकराव मामांना पुरंदर किल्ल्याचें आमिष दाखविलें व गोपिकाबाईंना त्या बाबतींत ईरेला घातलें. आपला प्रत्यक्ष मुलगा पेशवा असतांना आपल्या इच्छेप्रमाणें किल्ला मामांना कसा मिळणार नाहीं असा त्यांना अभिमान वाटत होता ह्मणून त्या दृष्टीनें त्यांचा प्रयत्न चालू होता. नानांच्या मनांत तो किल्ला मामांना पचूं द्यावयाचा नव्हता. तो त्यांच्या तंत्रांत व कारभारांत यावयाला पाहिजे होता. ह्मणून त्यांनीं कोळ्यांना उठावणी देऊन किल्ला सरकारजमा होईल अशी कारणें दाखवून त्यांजकडून अर्ज करविला. दादासाहेबांचा स्वभाव सरळ ह्मणून आबा पुरंदरे यांनीं कोळ्यांकडून इमानप्रमाण मागितलें अशी कायदेशीर तक्रार करवून त्यांच्याकडून किल्ला सरकारजमा करण्याबद्दल न्याय देवविला. व शेवटीं पुरंदर किल्ला हा पेशव्याच्या राज्यरक्षणाचा बालेकोट किल्ला आहे असें माधवराव पेशव्यांच्या कानांत मंत्र देऊन व दादासाहेबांना थोरपणा देववून त्याचा निकाल कायम करविला. दादासाहेबांनीं निकाल दिल्यानंतर त्रिंबकरावमामा व गोपिकाबाई यांना आपल्याप्रमाणें वर हुजुरांत

दाद मिळेल असा पूर्ण विश्वास होता. परंतु या बाबतींत मामापेक्षां आपला स्वार्थ माधवरावांना जास्त वाटला. ह्मणून नानांनीं आपल्यावर गोपिकाबाई व मामा यांचा रोष होऊं नये ह्मणून पुरंदर प्रकरणाचा फेरविचार माधवरावांकडून करवून मामा व गोपिकाबाई याचा त्यांच्याकडूनच अपमान करविला. अशा मुत्सद्देगिरीच्या पूर्ण धोरणानें नानांनीं पुरंदरचा किल्ला सरकारजमा करून घेतला. पुरंदर किल्ला सरकारजमा करण्याचें नानांचें धोरण कशाकरतां होतें हें पुढें बारभाईंच्या कारस्थानाच्या वेळीं दिसून येईल.

२६. गोपिकाबाई ज्या कार्याकरतां गंगापुरास गेल्या तें कार्य सिद्धीस न जातां उलट प्रत्यक्ष आपल्या पुत्राकडून आपला अपमान झाला हें त्या मानी स्त्रीला रुचलें नाहीं. ह्मणूनच त्यांनीं पुण्याचा अखेरपर्यंत त्याग केला असावा असें संभवतें. हट्टी माणसांच्या स्वभावाचा हा असाच धर्म असलेला दिसतो. वरील गोष्टींच्या संगतीवरून उत्पन्न झालेलीं शंकास्थानें थोडींतरी निरसन होतील असें वाटते.



# प्रकरण ८ वें.

## राघोबादादांविरुद्ध नानांचा स्वतंत्र पक्ष.

### इ० स० १७६४ ते इ० स० १७६६.

१. नाना फडनविस यांनी श्री. रमाबाईसाहेब याचा केलेला पाणउतारा.—२. राघोबादादांच्या मनाविरुद्ध नाना फडनविस माधवरावाकडून शिंद्याची सरदारी महादजीला देवविनात.—३. गोहदच्या जाटाचा मोड करण्याकरतां दादासाहेब जातात. महादजी शिंदे राघोबादादाविरुद्ध जाटाला आतून फितूर होतो. महादजी शिंद्याची राघोबादादांपुढें होळकरांच्या मध्यस्तीनें शरणागती —४. राघोबादादा मल्हारराव होळकरांना केवढा वडीलकीचा मान देत असत या संबंधींचा एक प्रसंग.—५. पेशव्याच्या दरबारात नाना फडनविस हाच महादजीचा पाठीराखा होता.—६. राघोबादादाचा व गोहदच्या जाटाचा तह. गुन्हे करण्याची प्रवृत्ति गुन्हेगाराना शासन करण्यानेंच कमी होते.—७. मल्हारराव होळकर यांचा मृत्यु. अंतकाळीं मल्हाररावानी राघोबादादास मालेरावास सरदारकी देण्याबद्दल विनंति केली.—८. मालेराव होळकर याचा मृत्यु. राघोबादादा व गंगोबातात्या यांचा स्नेह संबंध. अहिल्याबाईनीं दत्तक घेऊन राज्य चालवावें, अशी मसलत —९. तुकोजी होळकर यास दत्तक घेण्याबद्दल गंगोबातात्या विरुद्ध होते.—१०. तुकोजीलाच दत्तक घेण्या विषयी राघोबादादा व गंगोबा तात्या यांचेविरुद्ध महादजी शिंदे व नाना यानी कारस्थान सुरू केलें —११. राघोबादादा व गंगोबातात्याविरुद्ध होळकरांच्या राज्यात नाना फडनविस कारस्थानी जाळे पसरूं लागतात.—१२. महादजी शिंद्यानें अहिल्याबाईना आपल्या पक्षांत ओढले. माधवराव पेशवेही नानांच्या खटपटीनें त्यांच्या पक्षालाच सामील झाले.—१३. अहिल्याबाईची झालेली दिशाभूल.—१४. महादजी शिंद्यानें अहिल्याबाईचे कान फुंकल्यामुळे तिला सारासार विचार राहिला नव्हता. —१५. अहिल्याबाईच्या अंगांत संशयपिशाच्याचा संचार.—१६. राघोबादादा मातंगपोशीकरतां अहिल्याबाईच्या भेटीस इंदुरास जातात —१७. राघोबादादा अहिल्याबाईचे भेटीस गेले असता तिनें त्याना पाठविलेला निरोप.—१८. राघोबादादांच्या टीकाकारांच्या अकलेचे तारे.—१९. राघोबादादांच्या मनांत होळकर-

गाही गिळंकृत करावयाची नव्हती.—२०. या दत्तक प्रकरणीं महादजी शिंदे यांनीं होळकरांकडून लांच घेतली असें लोक म्हणूं लागले.—२१. नानांचा पक्ष अन्यायाच्या पायावर फोफावूं लागला.—२२. तुकोजी होळकर यास माधवराव पेशवे सरदारीचीं वस्त्रें देतात. माधवराव पेशवे तुकोजीकडून इमानप्रमाण घेतात.—२३. अहिल्याबाईच्या इच्छेमुळेच तुकोजी दत्तक झाला असें नसून तो नाना फडनविसांच्या पक्षाच्या प्रेरणेनेंच झाला असें ठरतें.

१. मागील प्रकरणांत नानाच्या धोरणाची व स्वभावाची थोडीशी चुणुक दिसून आली आहे. आपल्या पक्षाविरुद्ध वागणाऱ्या लोकांचा प्रसंग पाहून ते कसा पाणउतारा करीत होते, याचें एक चित्र पुढील हकीकतीवरून दिसण्यासारखें आहे. माधवराव पेशवे हैदराच्या स्वारीवर गेले त्या वेळी त्यांच्या पत्नी सौ. रमाबाई या पहिल्यानें पुण्यालाच राहिल्या. त्यांचें व गोपिकाबाईचें बरें नव्हतें. त्याचा ओढा आनंदीबाई व राघोबादादा यांच्याकडे होता. त्यामुळें नाना फडनविस सौ. रमाबाई यांचा मनांतून द्वेष करीत असत. माधवराव पेशवे कर्नाटकाच्या मोहिमेवर गेल्यानंतर वाड्यांतील सर्व कारभार नानांच्या हातीं आला. त्यावेळीं सौ. रमाबाई यांच्याविषयीं घडलेली एक आख्यायिका आहे. या वेळीं रमाबाईसाहेब यांचें वय अवघें पंधरा वर्षांचें होतें. त्यांस पुण्यास ठेऊन माधवराव स्वारीस गेल्यावर पहिल्याच आठवड्यांत बाईसाहेबांकडील कारकून खर्चाची यादी घेऊन रीतीप्रमाणें मखलाशी करून घेण्याकरतां नानांकडे आला. तेव्हां त्यांनीं ती पाहून तींतून विड्याच्या पानांचें कलम काढून टाकलें. कारकुनास आश्चर्य वाटून त्यानें तक्रार केली. तेव्हां नानांनीं सांगितलें कीं, ' श्रीमंत ( माधवराव ) घरीं परत येईपर्यंत बाईसाहेबांस विड्यांच्या पानांचें प्रयोजन नाहीं. हा खर्च गैरवाजवी आहे सबब बंद केला आहे. ' याप्रमाणें सौ. रमाबाई यांच्याबद्दल मनांत असलेले वैर त्यांच्या हातांत जेवढा अधिकार होता तेवढा त्यांनीं गाजवून घेऊन साधलें. या नानांच्या कृतीबद्दल इतिहासकार त्यांच्या हिशेबी बाण्याची फार तारीफ करतात. नाना अत्यंत हिशेबी व अत्यंत काटकसरी होते. पण ते केवळ आपल्या विरुद्धपक्षाकडील लोकां-

पुरतेच होते. याचीं उदाहरणें पुढें त्या त्या प्रसंगीं येतील. नानांनीं सौ. रमाबाईंना आपल्या मनांतील द्वेषाची असल्या क्षुल्लक कारणानें कां होईना जाणीव करून दिली, पण ती जाणीव अशी मुद्देसूद व वरवर पाहणाऱ्या लोकांना पटण्यासारखी करून दिली कीं, नानांचेंच करणें लोकदृष्टीनें व पेशव्यांच्याही दृष्टीनें योग्य ठरेल. परंतु श्रीमंत घराण्यांतील व्यवहाराच्या दृष्टीनें त्याचा विचार केला तर नानांचे हें करणे केवळ द्वेषबुद्धींचेच होतें असें ठरतें. कारण श्रीमतांच्या घरीं विड्याचीं पानें जीं लागतात तीं केवळ स्वतःला तांबुलविहार करण्यापुरतींच असत नाहीत. भेटीला येणाऱ्या जाणाऱ्या लोकांना पानाचे विडे देऊन त्यांची संभावना करावी लागते. बरंदाज माणसांना स्वतःच्या खर्चापेक्षां इतरांची संभावना करण्याकरतांच बहुतेक सर्व खर्च होत असतो. माधवराव मोहिमेवर गेले तर त्यांच्या पश्चात् त्यांच्या पतिव्रता स्त्रीनें मंचकावर शयन करूं नये, तांबुलविहार बंद ठेवावा, व्रतवैकल्यांत कालक्षेप करावा, ही पतिव्रता स्त्रियांकरितां नानांनीं दिलेली शिकवण नीतिधर्मशास्त्राप्रमाणें योग्य आहे. परंतु स्वतः तांबुलविहार न केला ह्मणून त्यांनीं भेटीला येणाऱ्या मंडळींची विडे देऊन संभावनाही करूं नये असा कांहीं धर्मशास्त्राचा निर्बंध नाहीं. शिवाय नानांनीं सौ० रमाबाईंचा पानांचा खर्च तोडला ह्मणून त्यांच्या मनांत तांबुलविहार करावयाचा असता तर त्यापुरते त्यांच्या जवळ पैसे नव्हते, असाही प्रकार नव्हता; किंवा माधवराव मोहिमेवर जातांना त्यांनीं रमाबाईंच्या पाठराखणेपणाचा अधिकार नानांना देऊन गेल्याचाही कोठें उल्लेख नाहीं. अशा स्थितींत रमाबाईंच्या सदाचाराची जोखीम नानांवर नसतां, त्यांनीं विड्याच्या पानांचें कलम कमी करण्यांत आपल्या अधिकाराचें अतिक्रमण केलें असेंच ह्मणणें भाग पडतें. सौ० रमाबाईसारख्या सद्गुणी, सदाचारी स्त्रीला नीतिशास्त्राचे पाठ पढविण्याइतके नाना खात्रीनें सदाचारी नव्हते. अर्थात् त्यांच्या या कृतींत सद्भावना तर कोठें नव्हतीच, उलट द्वेषाचें मात्र मूळ होतें हें स्पष्ट आहे. यःकश्चित् गोष्टीवरूनसुद्धां ते प्रतिपक्षाचा पाणउतारा करून द्वेष साधीत असत. वरवर

पाहणाऱ्या लोकांना नानांच्या अंतःकरणाचा ठाव लागत नसे, म्हणूनच त्यांची प्रत्येक वेळीं दिशाभूल होत होती.

२. पानिपतच्या लढाईंत शिंद्यांचें औरस घराणें नामशेष झालें. त्यामुळें शिंद्यांच्या गादीचा वारसा राणोजी शिंद्यांचा दासीपुत्र, महादजी शिंदे सांगूं लागले. त्याचप्रमाणें शिंद्यांचा जवळचा भाऊबंद मानाजीराव शिंदे हेही आपला वारसा सांगूं लागले. त्यामुळें शिंद्यांची एवढी मोठी गादी कोणाला द्यावी हा प्रश्न पेशव्यांच्या दरबारीं उपस्थित झाला. त्यावेळीं दादासाहेब कारभारांत होते. दादासाहेबांचें म्हणणें असें पडलें कीं, राणोजी शिंद्यांची एवढी मोठी दौलत दासीपुत्राकडे जाणें पेशव्यांच्या इभ्रतीला योग्य नाहीं. अस्सल घराण्याची गादी अस्सल घराण्याकडेच चालावी, हें त्या घराण्याला व पेशवाईच्या राज्यकारभाराला भूषणावह आहे. या सरळ रूढीप्रमाणें दादासाहेबांनीं मानाजीराव शिंदे ऊर्फ फांकडे यांना शिंद्यांच्या गादीचा वारसाहक्क दिला. ही गोष्ट नाना फडनविस यांना आवडली नाहीं. त्यांना दादासाहेबांचा पक्ष हलका करावयाचा होता. महादजी शिंदे हे नानांच्या पक्षाचे होते. गोपाळराव पटवर्धनाप्रमाणें तेही घोडनदीच्या लढाईनंतर निजामाकडेच गेले होते. त्यामुळें नानांनीं महादजीचा पक्ष उचलून धरला. एका दासीपुत्राकडे शिंद्यांची गादी जाते हें माधवराव पेशव्यांना मनापासून आवडलें नाहीं. परंतु आपलें राजकारण साधण्याच्या हेतूनें ते नानांच्या या धोरणाला बळी पडले. "मानाजी हा जर शिंद्यांच्या गादीचा वारस कायम झाला तर तो दादासाहेबांच्याच तंत्रानें चालेल. शिंद्यासारखा फौजबंद सरदार नेहमीं मुख्य पेशव्यांच्या मुठींत असला पाहिजे. शिवाय कोणत्या प्रसंगीं दादासाहेबांबरोबर युद्धप्रसंग ओढवेल याचाही नियम नाहीं. महादजी तरुण व कर्तृत्ववान् आहे. त्याच्यासारखा सरदार जर आपल्या वचनांत कायम राहील तर दादासाहेबांच्या ओंजळीनें पाणी पिण्याचा प्रसंग येणार नाहीं. दादासाहेबांचा पक्ष हलका पडेल. पेशव्यांचा पराक्रम लोकांना दिसूं लागेल." ही स्वपक्ष-संवर्धनाची नानांची विचारसरणी माधवराव पेशव्यांना रुचली. माधवरावांच्या हातांत कारभार येतांच त्यांनीं महादजी शिंदे

यांना शिंद्याच्या गादीचे वारस केलें. नानाच्या कारस्थानानें दादासाहेबावर विजय मिळविला. महादजीच्या स्वार्थाच्या आड दादासाहेब आले होते म्हणून महदजी शिंदे आजन्म त्यांच्या विरुद्धच राहिले. ज्यावेळीं रीतीरिवाजाला सोडून, जाणून बुजून एवढ्या मोठ्या दौलतीचा दासीपुत्राकडे वारसा देण्याचें धाडस दादासाहेबांच्या मनाविरुद्ध, नानाच्या सांगण्याप्रमाणें माधवरावांनीं केलें त्या अर्थी, 'राघोबादादांचा पक्ष कधींही मी धरणार नाहीं' असा बेलभंडार त्यांनीं महादजीकडून उचलवून घेतला असला पाहिजे. राघोबादादांना नाना व महादजी शिंदे हे दोन उदयोन्मुख शत्रू मात्र कायमचे झाले. पण मजा ही कीं दादासाहेब या दोघांकडे पुत्रासमान दृष्टि ठेवीत असत. या दोघांची दृष्टि मात्र दादासाहेबांचा सूड केव्हा व कसा उगवितां येईल इकडे लागलेली होती. चांगल्या आणि वाईट प्रकृतींचे हे अस्सल मासले असावयाचे.

३. माधवराव पेशवे यांनीं जानोजी भोंसले याचा बंदोबस्त केला व त्यांनीं दादासाहेबांना उत्तरहिंदुस्थानांत मोहिमेवर जाण्याची विनंति केली. त्याप्रमाणें ते विठ्ठल शिवदेव, मल्हारराव होळकर, महादजी शिंदे यांना बरोबर घेऊन स्वारीस निघाले. ते माळवा, जयपूर वगैरे प्रांतांत जाऊन खंडण्या घेऊं लागले. इतक्यांत गोहदचा जाट बलिष्ट होऊन तो मराठ्यांच्या मुलखांत उपद्रव करूं लागला होता. शिवाय त्यानें दादासाहेबांच्या धान्य मिळविणाऱ्या एका टोळीला लुटलें होतें. तेव्हां त्याचें परिपत्य करण्याकरतां दादासाहेब तिकडे गेले. त्यांनीं गोहदच्या किल्ल्याला वेढा दिला. त्या वेढ्यांत महादजीसुद्धां आपल्या सैन्यासह होते. परंतु त्यांचें दादासाहेबांबद्दल मन साफ नव्हतें. तथापि विठ्ठल शिवदेव, मल्हारराव होळकर हे त्यांच्या वर्तीचे असल्यामुळें व ते खुद्द नाना व पेशवे यांच्या वशिल्याचे असल्यामुळें दादासाहेब आपलें कांहींही वाईट करूं शकणार नाहींत असा महादजींना धीर होता. या गोहदच्या जाटाचें व महादजीचें सख्य होतें. शिवाय तो शिंद्यांच्या राज्याजवळचा पडला. तेव्हां त्याचें परिपत्य व्हावें असें महादजीला वाटेना. म्हणून तो त्या जाटाला दादासाहेबांविरुद्ध आंतून फितूर झाला. गोहदच्या किल्ल्याला वेढा देऊन

सात आठ महिने झाले तरी तो जाट दाद देईना. तेव्हां त्या जाटाला तळाशी दडपल्याशिवाय जावयाचें नाहीं असा दादांनीं संकल्प केला, आणि किल्ला लढविण्याचें काम चालू ठेवलें. पुढें महादजीचें व गोहदच्या राण्याचें सख्य आहे व गुप्त तऱ्हेनें त्याला महादजी दारूगोळ्याची सुद्धां मदत करतात असें वर्तमान दादासाहेबांच्या कानावर आलें. त्यावेळीं त्याना महादजीचा अतिशय राग आला. महादजीला पकडून मेखसूखालीं ठार करा असें ते बोलूं लागले. ही हकीकत मल्हाररावांना कळली. तेव्हां ते दादासाहेबांच्याकडे येऊन त्यांची महादजीबद्दल विनवणी करूं लागले. तेव्हां दादासाहेब ह्मणाले 'सुभेदार, आपण या कारभारांत पडूं नये. अखेर गुलामाची जात (दासीपुत्र) आपल्या जातीवर गेली!' महादजी हा दासीपुत्र आहे, तेव्हां तो खात्रीनें केव्हां ना केव्हां धोका देणार असें दादासाहेबांना वाटत होतें. तें या प्रसंगीं खरें ठरलें. असें असतांही मल्हाररावांनीं महादजीची मध्यस्ती केली. त्यांनीं महादजीला आणून दादांच्या पायावर घातलें. शरणागताला अभय देणें हें वीराचें ब्रीद. त्याप्रमाणें महादजीचे सर्व अपराध दादासाहेबांनीं त्याला माफ केलें. सर्पाच्या मनोधर्माचीं जीं माणसें असतात त्यांच्यावर जरी उपकार केले तरी त्यांचें स्मरण त्यांना राहत नाहीं. प्रसंग आला ह्मणजे ते उलटतातच.

४. या मल्हाररावांच्या मध्यस्तीसंबंधी एक आख्यायिका आहे. मल्हारराव होळकर महादजी शिंद्यावरील दादासाहेबांचा राग कमी करण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु तो व्हावा तसा कमी झाला नाहीं. त्यांच्या मनांत कांहीं किल्मिष राहिलें आहे असें मल्हारराव यांना वाटलें. तेव्हां एके दिवशीं मल्हाररावांनीं हातरुमालानें आपले दोन्ही हात बांधून घेतले व दादासाहेबांच्यापुढें साष्टांग-नमस्कार घातला. त्यावेळीं दादासाहेबांनीं आपल्या हातांनी त्यांना उठवून बसविलें आणि मोठ्या नम्रपणानें त्यांना वडीलपणाचा आदर देऊन म्हणाले 'आह्मां त्रिवर्गास (रावोबादादा, माधवराव व नारायणराव) आपण रायाचे (नानासाहेबांचे) ठिकाणीं. त्यांत आपण मजला लेंकरासारखें मोजून या मरातब्यास आणलें. तें हें कृत्य करणें आमचे अकल्याणाचें सूचक आहे.' माधवराव हे

मल्हाररावांना काका म्हणत असत. राघोबादादा त्याना आपल्या वडील भावाप्रमाणें लेखीत असत. मल्हारराव हे, खरें पाहिलें तर, जातीचे धनगर. ते वयानें जरी वडील असले तरी राघोबादादा हे जातीनें ब्राह्मण; अधिकारानें धनी; असें असतां मल्हारराव हात बांधून घेऊन पायां पडले तर त्यांत आश्चर्य कोणतें असें कोणाला वाटेल! परंतु त्यांत आश्चर्य मानण्यासारखेंच आहे. मल्हारराव जातीनें धनगर असले तरी त्यांना नानासाहेबांनीं बंधु मानलें होतें. ह्मणूनच माधवराव त्यांना काका ह्मणत. अधिकारानें ते राघोबादादांचे जरी चाकर होते तरी नानासाहेबांनीं त्यांना बंधु मानल्यानंतर ते दादासाहेबांचे बंधूच झाले. हें वडील बंधूचें नातें लागल्यानंतर व त्याप्रमाणें इतके दिवस वर्तन ठेवल्यानंतर जर मल्हारराव अशा प्रकारें दादांच्या पायां पडले तर त्यांना कां वाईट वाटणार नाहीं? मल्हारराव हे आपल्या पायां पडल्याबद्दल राघोबादादांना इतकें वाईट वाटलें कीं, त्याचें प्रतिबिंब त्यांच्या शेवटच्या वाक्यांत स्पष्ट दिसत आहे. 'हें कृत्य करणें (हात बांधून पायां पडणें) आमच्या अकल्याणाचें सूचक आहे!' मानलेल्या कां होईना, पण वडील भावाकडून लहान भावानें पायां पडून घेणें हें अकल्याणाचें, नाशाचें द्योतक आहे असें राघोबादादांना वाटलें. यावरून वडील माणसांची मर्यादा ठेवण्यांत व त्यांचा आदर राखण्यांत दादासाहेब केवढे दक्ष होते हें यावरून सिद्ध होतेंच, पण त्याबरोबर आणखी एक गोष्ट स्पष्ट होते. "आमचे अकल्याणाचें सूचक आहे" या वाक्यांत धर्मभावनेचा, पापपुण्याच्या कल्पनेचा आणि सदाचरणाच्या आस्थेचा किती गूढार्थ भरलेला आहे हें दिसून येतें. दादासाहेब कपटी नव्हते. त्यांच्या अंतःकरणाला जें वाटत असे तेंच त्यांच्या तोंडून बाहेर पडे व तेंच त्यांच्या मुद्रेवरही दिसे. त्यांना धर्माची चाड होती. त्याना नीतिमत्तेचा अभिमान होता. त्यांना कुळाचा व मराठी राज्याचा लौकिक सांभाळावयाचा होता. ह्मणूनच त्यांच्या तोंडून असे शब्द निघाले. यामुळेंच त्यांच्या सैनिकांना, त्यांच्या इमानी नोकरांना दादासाहेबांवरून आपले प्राण ओवाळून टाकावे असें वाटे. याचीं उदाहरणें पुढें त्या त्या प्रसंगीं येतीलच. अशा प्रकारें मल्हाररावांनीं महादजीसंबंधीं मध्यस्ती केली.

५. राघोबादादा मोहिमेवर जातात व प्रत्येक ठिकाणीं जय मिळवितात, त्यामुळें त्यांची दरबारांत व माधवराव यांच्या जवळ प्रतिष्ठा आहे ती कमी होण्याकरतां, त्यांच्या मोहिमेच्या कार्यांत खीळ घालण्याचा नानांच्या संकेतानें हा प्रयत्न झालेला होता. कारण शत्रूला फितूर होऊन मदत केल्याबद्दल महादजीला पकडून मेखसूखालीं मारण्याची ज्यावेळीं भाषा झाली त्यावेळीं ती हकीकत दक्षिणेंत माधवरावांना पोंचून मल्हारराव होळकर व विठ्ठल शिवदेव यांना स्वदस्तुरच्या चिठ्ठ्या आल्या. त्यांत ते लिहितात 'आजपर्यंत आपले कार्याकरतां शिंदे यांचे कुळाचे सर्व पुरुष रणांत बळी पडले. फक्त महादजी एवढाच आतां उरला आहे. तोही स्वामीभक्त आहे. यास्तव त्याचा बचाव होईल असें हरतऱ्हेनें करावें.' या बाबतींत माधवरावांना स्वयंस्फूर्तीनें जर महादजीला वांचवावयाचें असतें, तर त्यांनीं होळकर अगर विंचुरकर यांना चिठ्ठ्या न लिहिनां सरळ दादासाहेबांनाच विनंतिपूर्वक चिठ्ठी लिहिली असती. दादासाहेब जरी रागावले तरी आपल्या विनंतीला किती मान देतात हें माधवरावांना कर्नाटकाच्या मोहिमेंत दिसून आलेंच होतें. असें असतां माधवरावांनीं दादासाहेबांना चिठ्ठी न पाठवितां असा हा वाममार्ग स्वीकारला त्याअर्थी गुन्हेगार माणसाची तरफदारी करणारा महादजीचा दोस्त नानाच असला पाहिजे असें ठरतें. नानांच्याच चिथावणीनें व त्यांच्याच प्रेरणेनें उत्पन्न झालेल्या कृत्यावर पांघरूण घालण्याकरतां नानांनीं ही माधवरावांजवळ महादजीची तरफदारी केली व नानांचे शब्द न मोडावे म्हणून माधवरावांनीं या अशा चिठ्ठ्या पाठवून कार्यभाग केला. उगीच कोणाची मिनतवारी करावयाची नाहीं असा नानांचा स्वभाव. पण या प्रसंगी माधवरावांची त्यांना मिनतवारी करावी लागली. शिवाय महादजी हे नानांच्या पक्षांतील असल्यानें कोणतीही महत्वाची गोष्ट ते आपल्या गुरूला विचारल्याशिवाय करणें शक्य नव्हतें. कारण सर्व कारस्थानाचे सूत्रधार नाना हेच होते. यांत दुमत नाहीं. म्हणून गोहदच्या वेढ्यांत घडलेली हकीकत नानांच्या प्रेरणेनेच झाली असें अनुमान उघड उघड निघतें.

६. पुढें दादासाहेबांनीं गोहदच्या जाटाच्या तहनाम्याच्या अटी कबूल केल्या. त्याचेकडून मोहिमेचा खर्च घेऊन ते परत देशीं निघून आले. हें वर्तमान इ. स. १७६६ मध्यें झालें. या मोहिमेंत दादासाहेबांना एक नवीन अनुभव आला. इतके दिवस त्यांच्या फौजेंत कधींही कोणी फितूर झाला नव्हता. त्यामुळें दादासाहेब नेहमीं जयाबद्दल निःशंक असत. या त्यांच्या मोहिमेंत महादजी शिंद्यानें फितुरीचें नवीन बीजारोपण केल्यामुळें त्याचा भावी वृक्ष पेशवाईच्या नाशाला कसा कारणीभूत होईल याचें चित्र दादासाहेबांच्या डोळ्यापुढें उभें होतें. राजधर्मनीतितत्वांत अशा विषवृक्षांना जागा नसावी ह्मणूनच दादासाहेबांनीं महादजींना मेखसूखालीं मारून टाकण्याची भाषा चालविली होती. गुन्हेगारांवर दया करून गुन्हे थांबत नाहींत. त्यांचें पारिपत्य करण्यांतच गुन्हे करण्याची प्रवृत्ति कमी होत असते.

७. होळकरांच्या गादीस शिंद्याच्या गादीप्रमाणें वारस करण्याचा प्रसंग पेशव्यांच्या दरबारावर लवकरच आला. या बाबतींतही दादासाहेबांवर नानाप्रकारचे आरोप करण्यांत आले आहेत. तरी त्यासंबंधी हकीकत विशेष महत्वाची असल्यामुळें त्याचा येथें उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. मल्हारराव होळकर यांच्या विषयीं दादासाहेबांच्या मनांत केवढी आदरबुद्धि, केवढा पूज्यभाव व किती कृतज्ञता वास करीत होती हें मागें आलेंच आहे. या गोहदच्या मोहिमेवर असतांनाच, ह्मणजे पुण्याला परत जाण्यापूर्वी, मल्हारराव होळकर हे अलमपूर येथें आजारी पडून अत्यवस्थ झाले. त्यांना आपण या दुखण्यांतून वाचत नाहीं असें वाटलें म्हणून त्यांनीं दादासाहेबांना बोलावून आपल्या मनांत अतृप्त राहिलेल्या दोन गोष्टी सांगितल्या. महादजी शिंदे व तुकोजी होळकर यांनाही जवळ बोलाविलें आणि आपला नातु मालेराव याचा हात या तिघांच्या हातीं देऊन याचा नीट सांभाळ करा म्हणून सांगून शांतपणें त्यांनीं परलोकचा मार्ग सुधारला (इ. स. १७६६ सप्टेंबर). त्यांच्या मृत्यूनें दादासाहेबांना फारच दुःख झालें.

८ मल्हाररावांच्या मृत्यूनंतर मालेराव हे होळकरांच्या गादीचे मालक झाले. परंतु अवध्या दहा महिन्यांच्या आंतच त्यांचाही अंत झाला. पुढें

होळकरांच्या गादीला वारस पाहिजे ह्मणून मल्हाररावांची सून राणी अहिल्याबाई यांनीं तुकोजीला सेनापतीपद देऊन आपण स्वतः गादीचा कारभार चालविण्याचा विचार केला. गंगाधर यशवंत चंद्रचूड ऊर्फ गंगोबा तात्या हे मल्हाररावांच्या वेळेपासून फार जुने व अनुभवी दिवाण होते. त्यांचा व राघोबादादांचा स्नेहसंबंध होता. मल्हारराव होळकरांचा व दादासाहेबांचा चाकर आणि धनी या संबंधाखेरीज जसा बंधु-भावनेचा संबंध होता त्याचप्रमाणें गंगोबा तात्या हे राघोबादादांवर ते खरे शूर, निष्कपटी, इभ्रतदार आणि सदय अंतःकरणाचे असल्यामुळें लोभ करीत असत गंगोबा तात्यांना मल्हारराव निवर्तल्यानंतर कोणाची योग्य सल्ला विचारावयाची झाल्यास दादासाहेबांशिवाय निष्कपट सल्ला देणारा त्यांना त्या वेळीं दुसरा कोणी वाटत नव्हता. तुकोजीराव होळकर व महादजी शिंदे हे वयानें लहान असल्यामुळें व अनुभवानें ते कमी दर्जाचे असल्यामुळें त्यांना त्यांचा सल्ला योग्य वाटणें शक्य नव्हतें. मालेराव मरण पावल्यानंतर ज्या वेळीं दत्तक घेण्याचा प्रश्न उपस्थित झाला तेव्हां ही गोष्ट मोठ्या जोखमीची असून एकादे वेळीं दत्तक चांगला निघाला तर ठीक, नाही तर दत्तक घेणाऱ्या साध्वी अहिल्याबाईलाच पश्चातापाला कारण व्हावयाचें, ह्मणून मोठा विचाराचा प्रश्न गंगोबा तात्यांना पडला. अशा स्थितींत राघोबादादांना बोलवावे असा विचार करून त्यांनीं त्यांना इंदुरास येण्याविषयीं कळविले. यांत गंगोबातात्यांचा हेतु दुहेरी होता. एक दादासाहेब आल्यानें दत्तक प्रकरणीं विचार ठरेल, आणि अहिल्याबाईवर पुत्र निवर्तल्यानें आणि दोघी सुना सती गेल्यामुळें जें दुःख कोसळले होतें त्याचें अंशतः तरी परिमार्जन दादासाहेब स्वतः त्यांच्या समाचाराला आल्यामुळें होईल. राघोबादादांना इंदुरास बोलावण्यांत गंगोबा तात्यांचा व्यवहार व राजकारण साधण्यापुरताच उद्देश होता.

९. दत्तकासंबंधानें अहिल्याबाईच्या जवळ प्रश्न निघाला ह्मणजे गंगोबा तात्या साधकबाधक रीतीनें विचार करणारे असल्यामुळें होळकर

घराण्यांतील अज्ञान मुलगा दत्तक घेऊन बाईनीं कारभार चालवावा असें त्यांचें मत पडे. तुकोजीराव होळकरांना दत्तक घ्यावयास संमति देण्याजोगी गंगोबा तात्यांची मनःप्रवृत्ति नव्हती. एक तर ते वयानें मोठे व त्यांनीं मल्हाररावांच्या हाताखालीं नोकरी केलेली. शिवाय ते मल्हारराव होळकरांचे कोणी आप्तही नव्हते. तुकोजीराव हे फक्त होळकर आडनांवाचे असून त्यांनीं नोकरपेशा पतकरलेला होता. सैन्यांत शिलेदारी करणाऱ्या इसमाला गादीचा धनी करावें असें गंगोबा तात्यांना वाटेना. तुकोजी हा पराक्रमी होता. पण केवळ पराक्रमावर गादीची मालकी देण्याची त्यावेळीं चाल पडलेली नव्हती. म्हणून अहिल्याबाईनीं होळकर घराण्याच्या आप्त वर्गापैकीं कोणी मुलगा घेऊन कारभार पहावा असे गंगाबांचें मत हात. हे मत गंगोबांच्या स्वार्थाचें किंवा अन्यायाचें होतें असें कोण ह्मणेल ?

१०. याही प्रश्नाला उत्तर देणारा एक पक्ष पुण्याला अस्तित्वांत होताच. त्या पक्षाचा विस्तार पुण्यापासून ग्वाल्हेरपर्यंत यापूर्वींच पसरला होता. तो दिवसें दिवस वाढतही जात होता. मल्हारराव मरतेवेळीं त्यांनीं राघोबादादा, महादजी शिंदे व तुकोजी होळकर या तिघांच्या हातांत आपल्या नातवाचा हात दिला होता. त्यांपैकीं दादासाहेब हे दूर पुण्यास राहिले. पण तुकोजी हे इंदुरांतच असल्यामुळें त्यांचा मल्हाररावांच्या मृत्युनंतर कारभारांत हात शिरला. तिसरे महादजी हे इंदुरकरांना जवळ ह्मणून त्यांचा होळकराशीं पूर्वींपासून संबंध होताच, तो तुकाजीमुळें पुढें जास्त वाढला होता. तुकोजीनें आपणालाच दत्तक घ्यावें ह्मणून महादजीचें सहाय्य मिळविलें होतें. महादजीला उत्तरहिंदुस्थानांत आपला एक मोठा फौजबंद स्नेही करून ठेवावयाला पाहिजेच होता. शिवाय राघोबादादांचें मन आपल्याविषयीं शुद्ध नाहीं, ते आपणावर केव्हां गदा उचलतील याचा नेम नाहीं, असा धाक महादजीला वाटत होता. तेव्हां तुकोजी होळकरासारखा एक कायमचा स्नेही मिळाला तर मोठी मदत होईल असें

त्यांना वाटत होतें ह्मणून त्यांनीं तुकोजीला दत्तक घेण्याबद्दल पुण्यास नानां-मार्फत खटपट चालू केली.

११ तुकोजी होळकर व महादजी शिंदे यांच्या खटपटीला प्रत्यक्ष आड येणारे ह्मणजे गंगोबा तात्या दिवाण हे होत. या दिवाणांनीं पूर्वी पुणें दरबारांत राघोबादादांची स्तुति व माधवरावांची निंदा माधवरावांच्याच तोंडावर केल्यामुळें माधवरावांना राग येऊन त्यांनीं त्यांच्या तोंडांत मारली होती. त्या वेळेपासून माधवरावांचा त्यांच्यावर राग होता. शिवाय ते दादासाहेबांच्या पक्षाचे होते. या वेळीं माधवरावांच्या तोंडपुज्या कारस्थानी लोकांनीं त्यांचें मन दादासाहेबांविषयीं जवळ जवळ पूर्ण कलुषित केलें होतें. माधवराव यांच्याकडे पूर्ण कळकळीनें वकिली करणारे महादजींचे गुरु नाना हे पुण्याला होतेच. नानांच्या डोळ्यांत गंगोबा तात्या हे खुपत होतेच. कारण ते इंदुरास दिवाण असल्यामुळें नानांच्या कारस्थानाची मुळें होळकरांच्या राज्यांत पसरत नव्हतीं. ह्मणून तुकोजीला दत्तक करविणे व गंगोबा तात्यांची तेथून उचलबांगडी करणें असे कारस्थानी जोड पाश इंदुरास तयार होऊं लागले.

१२. गंगोबा तात्यांनीं अशा प्रसंगीं दादासाहेबांना बोलावलें ही गोष्ट अर्थात् या कारस्थानी मंडळींना समजली. हिंदुस्थानांत जावयाचें ह्मणजे कोणत्या वेळीं काय प्रसंग येईल याचा नियम नसल्यानें, दादासाहेबांनीं आपली फौज बरोबर घेतली व ते इंदुरास अहिल्याबाईच्या भेटीला निघाले. तेव्हां महादजी शिंदे यांनीं अहिल्याबाईना असें सांगितलें कीं, "होळकरांची दौलत खालसा करण्याच्या कामावर राघोबादादांनीं माझी योजना केली होती; पण मीं तें काम करण्याचें नाकारलें व असा जबाब पाठविला आहे कीं 'मी नोकर म्हणून जातीनें पेशव्यांची पाहिजे ती चाकरी करण्यास तयार आहे, पण माझी फौज कांहीं या कामास लावणार नाहीं' म्हणून राघोबादादा स्वतः फौज घेऊन दौलत खालसा करण्याकरतां इंदुरास येत

१. महादजींचें चरित्र नातूकृत पान ९७.

आहेत. त्यांची राज्यतृष्णा आतां फार वाढली आहे. पेशवाईंत अर्धें राज्य-माधवराव यांच्याकडे दादा मागत आहेत. पण तें त्यांना माधवराव देत नाहींत म्हणून ही दौलत खालसा करून दादा घेणार आहेत. या गोष्टीला त्यांचे दोस्त आपले दिवाण गंगोबा तात्या हे सामील आहेत." या प्रकारें महादजींनीं अहिल्याबाईंचे कान भरले. शिवाय 'गंगोबांच्या सल्ल्याप्रमाणें लहान मूल दत्तक घेतलें तर आपण बायकोमनुष्य. राघोबादादांसारख्या बलाढ्य माणसाशीं गांठ. तेव्हां त्यांच्याबरोबर सामना द्यावयाला तुकोजी-सारखा तरुण लढवय्याच योग्य आहे. त्यालाच दत्तक घेण्याचा आपला विचार कायम करून त्याप्रमाणें माधवराव पेशवे यांना कळवावें. तुमचें सर्व काम मी करून देतों' असेंही महादजीनें अहिल्याबाईंस सांगितलें. अहिल्याबाईंच्या मनांत पहिल्यानें कोणालाच दत्तक घ्यावयाचें नव्हतें. परंतु महादजीच्या या कारस्थानामुळें तिनें तुकोजीस दत्तक घेण्याचें कबूल केलें. अगोदरच दुःखानें पीडिलेली स्त्री, त्यांत राघोबादादा आपली दौलत अपहार करणार या कल्पनेनें ती घाबरून गेली. तिला सारासार विचार राहिला नाहीं. तिनें महादजीच्या म्हणण्याप्रमाणें पुण्यास माधवराव पेशव्यांस तुकोजीला दत्तक घेण्याचें कळविलें. या प्रमाणें नानांच्या संकेतानुसार महादजी हा आपल्या कारस्थानाचा सुरुंग तयार करून दादासाहेबांच्या येण्याची वाट पहात बसला.

१२. अहिल्याबाईंनीं आपल्या दुःखाचें गांठोडें एकीकडे बांधून ठेऊन मोठमोठ्या मराठे सरदारांस पत्रें लिहिलीं. 'माझ्या सासऱ्यानें इतक्या मेहनतीनें कमावलेल्या दौलतीचा अभिलाष धरून धनी पेशवे सांप्रत येत आहेत. करितां या प्रसंगीं मजला कुमक करावी. आपल्या वडिलांनीं समशेर गाजवून दौलत मिळविली आहे. तेव्हां आपण ती अशीच कांहीं जाऊं देणार नाहीं.' हा निर्धार अहिल्याबाईंनीं सर्वांना कळविला.

---

१. प्रौढ प्रतापनिधी माधवराव पान ५०.

१४. हा निर्धार होण्यापूर्वी गांगरलेल्या अहिल्याबाईंच्या डोक्यांत दादासाहेबांच्या स्वभावाबद्दल व त्यांच्या सांप्रतच्या अधिकाराबद्दल कोठून विचार येणार ? राघोबादादांनीं सर्व कारभार माधवरावांच्या स्वाधीन केला होता. त्यांना राज्यकारभारांत माधवरावांच्या आज्ञेशिवाय हात घालतां येण्यासारखें नव्हतें. दादासाहेब आपल्याच अधिकारांत होळकरांची दौलत खालसा करूं शकत नाहींत हे विचार त्यावेळीं बाईंना सुचणें जरूर होतें. शिवाय फार दिवसांचे जुने दिवाण गंगोबा तात्या हे होळकरांची दौलत राघोबा-दादांच्या घशांत घालण्यास तयार होतील कीं काय, याचा तरी त्यांना समज रहावयाला पाहिजे होता. इतक्या वर्षांत दिवाणगिरीच्या कारभारांत नांव ठेवण्यासारखें वाईट कृत्य गंगोबा तात्या यांच्याकडून झालेलें नव्हतें. असें असतां होळकरशाही इतक्या नांवलौकिकाला चढलेल्या वेळीं गंगोबा तात्या अशा उतार वयात दौलतीशीं निमकहराम होऊन आपली आजपर्यंतची कीर्ति कलंकित करतील काय हे विचार त्यावेळीं अहिल्याबाई यांच्या डोक्यांत येणें जरूर होते. पण महादजीने त्यांचें डोकें कानांत वारें शिरलेल्या वासरापेक्षांही आपल्या विषारी मंत्रानें जास्त तुफान करून ठेवलें होतें.

१५. यावेळी अहिल्याबाई यांच्या लक्षांत दादासाहेबांविषयीं आणखी एक महत्वाची गोष्ट आली नाहीं. दादासाहेबांनीं थोड्याच दिवसापूर्वीं कर-वीर संस्थानचें दत्तकप्रकरण निकालांत काढलें होतें. खुद्द नानासाहेबांनीं करवीर संस्थान जप्त करण्याची आज्ञा दिली असतां राघोबादादांच्या हातीं कारभार आल्यानंतर, त्यांनी राणी जिजाबाईसाहेब यांची हकीकत ऐकून घेऊन, नानासाहेबांची आज्ञा अन्यायाची होती म्हणून त्यांनीं ती फिरविली व राणी जिजाबाई यांस दत्तक घेण्याची परवानगी देऊन, त्यांचें करवीरचें राज्यही स्वतंत्रपणें चालविण्याचें ठरविलें. या दादासाहेबांच्या न्यायी कृतीला चार पांच वर्षेंच लोटलीं होतीं, व ही महत्वाची गोष्ट कोणाच्या दृष्टिआड होण्यासारखीही नव्हती. अहिल्याबाईंना ही ताजी हकीकत माहीत नव्हती असेंही म्हणतां येण्यासारखें नव्हतें. असें असतां व दादासाहेबांच्या न्यायी-

पणाचा बोलबाला सर्व हिंदुस्थानभर झाला असतां, त्यांच्या धोरणाविषयीं अहिल्याबाईच्या मनावर जें संशयाचें पटल आलें, व त्यांना सारासार विचाराचें जें धोरण राहिले नाहीं, तें केवळ महादजीच्या मंत्रोपदेशाचेंच द्योतक होय, असें ह्मणावें लागतें.

१६ राघोबादादा आपल्या सैन्यासह क्षिप्रा नदीजवळ आले, तेव्हां अहिल्याबाईच्या तर्फे तुकोजी होळकरांनीं राघोबादादांना असा निरोप पाठविला कीं, 'क्षित्रा नदी उतरलांत, कीं धनी ह्मणणार नाहीं; आपणावर शस्त्र चालवूं.' तेव्हां दादासाहेबांनीं उलट निरोप पाठविला कीं, 'सांप्रत मालेराव कैलासवासी झाले. सबब अहिल्याबाईच्या समाचारास आपला पूर्वापार घरोबा जाणून येत असतां, असा निरोप पाठविला याचें कारण काय!' या निरोपावर अहिल्याबाईतर्फे तुकोजीरावांकडून परत जबाब आला कीं, 'आपण आमचे धनी, मालक आहांत. वडीलही आम्हांस आपणच. मातंग पोसीस येतां उत्तम गोष्ट आहे. पण बरोबर सैन्य कशाला हवें? आमचें सैन्य आहे तें आपलेंच नव्हे कीं काय?' या उत्तरानंतर राघोबादादा आपल्या दोन खिदमतगारांनिशीं सडेच अहिल्याबाईच्या भेटीला गेले. या उभयतांच्या भेटींत होळकरांची दौलत खालसा करण्याचे विचार व तशा प्रकारचा दादांचा कल किंवा गंगोबा तात्यांचा निमकहरामपणा कोठें बाहेर आल्याचा गंधही नाहीं. यावरून कारस्थानी लोकांनीं राघोबादादा व गंगोबा तात्या यांच्याबद्दल निरर्थक आरोप केले होते व त्यांनींच आपलें कारस्थान साधून घेण्याकरतां हा मुत्सद्दीपणाचा डाव टाकला होता हें आतां ध्यानांत येईल. या अहिल्याबाईच्या भेटीनंतर दादासाहेब परत आनंदवल्लीला निघून गेले.

१७. राघोबादादांच्या मनांत होळकरांच्या दौलतीबद्दल अभिलाष होता आणि आपली राज्यतृष्णा ते होळकरांचें राज्य खालसा करून व त्या ठिकाणीं आपण स्वतः राज्य करून शांत करणार होते असा आरोप करणाऱ्या टीकाकारांनीं अहिल्याबाईस दादासाहेबांनीं पाठविलेला निरोप

शुद्ध अंतःकरणानें वाचावा ह्मणजे दादासाहेबांच्या मनाची निर्दोषता, निष्कपटीपणा, निःस्वार्थबुद्धि आणि होळकर घराण्याबद्दल शुद्ध प्रेम हेंच त्यांना दिसून येईल. 'अहिल्याबाईच्या समाचारास आपला पूर्वापार घरोबा जाणून येत असतां असा निरोप पाठविला याचें कारण काय?' राघोबा दादांच्या टीकाकारांना या निरोपांतील तेजस्वीपणा आणि शुद्ध अंतःकरणाचा ध्वनि समजला नाहीं, किंवा त्यांनीं तो समजून घेण्याचा प्रयत्न केला नाही, असें मोठ्या दुःखाने ह्मणावें लागतें. ह्मणून त्यांनीं दादासाहेबांचें वरील वाक्य शभर वेळां निरनिराळ्या पद्धतीने वाचून पहावे. त्याचा निरनिराळ्या तऱ्हेने अर्थ लावून पहावा आणि नतर दादासाहेबांवर टीका करण्यासारखें त्यांत काहीं दिसतें कीं काय याचे प्रामाणिक मत बनवावें. या वाक्यांतील सरळपणा लक्षांत घेतला ह्मणजे दादासाहेबांच्या मनांत होळकरांची जहागीर जप्त करण्याचा गंध तरी होता काय हें लक्षांत येईल. या बाबतींत दादासाहेबांचें मन गंगाजलाप्रमाणें निर्मळ आणि पवित्र होतें असेंच विचारांतीं खात्रीनें ठरेल. सोपटला साप समजून मारीत बसणें हें विचारवंतांचें लक्षण नव्हे.

१८. राघोबादादाच्या मनांत होळकरशाही गिळंकृत करावयाची होती, पण तुकोजीरावाकडून 'क्षिप्रा नदी उतरला तर धनी म्हणणार नाहीं, आपणावर शस्त्र चालवूं' अशी धमकी येतांच ते घाबरून गेले, आणि त्यांनी होळकरांच्या राज्याचा अभिलाष सोडला, असें जर कोणाचें मत असेल तर त्याबद्दल त्यांची कींव करणेंच बरें. कारण दादासाहेबांनीं तुकोजीरावासारखीं कित्येक पोरें खेळविलीं होतीं. अटकेला झेंडा रोंवून मराठी राज्याच्या वैभवाचा कळस चढविणारा "राघोभरारी", तुकोजीरावाच्या बालिश बडबडीला घाबरून जाईल असें शहाण्या मनुष्याच्या स्वप्नांत तरी येऊं शकेल काय? पण कल्पनातरंगावर तरंगणाऱ्या लोकांना असंबद्ध कल्पनापासूनही मजा वाटत असते, याला कोण काय करणार? दुसरी गोष्ट अशी कीं तुकोजीरावांचा निरोप आल्यानंतर, आपल्या येण्यामुळें

होळकरांच्या दरबारांत कांहीं विपरीत ग्रह उत्पन्न झालेला आहे, पुण्याच्या दरबारींही आपल्याला कैद करण्याचे प्रयत्न चालू आहेत, ही सर्व प्रतिकूल परिस्थिति दादासाहेबांना माहीत होऊनही, आपले सैन्य न घेतां फक्त दोन खिदमतगारांनिशीं इंदुरास ते अहिल्याबाईंच्या भेटीला जातात यावरून त्यांच्या धैर्याची आणि त्यांच्या आत्मविश्वासाची तारीफ न करता उलट 'त्यांचा डाव कसा फसविला, कसे एकटेच भेटीला आले, त्यांना आपली अब्रू कशी संभाळून घ्यावी लागली' अशा प्रकारचीं त्यांना दूषणें लावणें ह्मणजे आपल्या अकलेचें प्रदर्शन करणें होय. जे खरे शूर व प्रतापी असतात, ते वाघाना शेळ्या समजून त्यांच्या गुहेंत बेधडक शिरतात. पण जे कारस्थानी व कपटी असतात ते मात्र शेळ्यांना वाघ समजून घराचे दरवाजे झांकून आंत बसत असतात. पण ज्याला कर नाहीं त्याला डर कसली असणार ?

१९. दादासाहेबांबरोबर त्यांचें सैन्य होतें. अहिल्याबाईंच्या समाचाराला जर केवळ ते येणार होते तर त्यांच्याबरोबर फौज कशाला पाहिजे होती असा आरोप त्यांच्यावर आहे; दादासाहेब हे कांहीं सामान्य सरदार नव्हते. त्यांच्याविरुद्ध पुण्याच्या दरबारांत फितूरी चालू आहे हें त्यांस माहीत होतें. शिवाय इंदुरचा दूरवरचा पल्ला. त्यांच्यावर केव्हां कसा घाला येईल याचा नियम नव्हता. अशा परिस्थितींत त्यांनीं आपली फौज स्वसंरक्षणाकरतां बरोबर आणली तर त्यांत कांहींच वावगें नव्हतें. दादासाहेबांच्या मनांत खरोखर होळकरांची दौलत जप्त करण्याचा इरादा असतां तर खात्रीनें मोहिमेवर निघण्यापूर्वी शत्रूचें बलाबल पाहून त्याच्याशीं सामना देण्याची पूर्ण तयारी करूनच ते निघाले असते. लष्करी धोरणें संभाळण्यांत ते पूर्ण वाकबगार होते. ह्मणून ते जर त्या तयारीनें व विचारानें इंदुरास निघाले असते तर तुकोजीरावाच्या पहिल्या निरोपाबरोबर त्यांनीं लढाईची ध्वजा उभारली असती. परंतु त्यांनीं तशी कोणतीच गोष्ट ज्या अर्थीं केली नाहीं, त्या अर्थी सैन्य बरोबर नेण्यांत त्यांचा कोणताच वाईट हेतू नव्हता, असेंच ठरत नाहीं काय ?

२०. राघोबादादांनीं व्यवहाराला अनुसरून अहिल्याबाईचें सांत्वन केलें; व त्यांच्या विचाराला येईल त्याप्रमाणें करण्याची त्यांना मोकळीक दिली. त्या प्रमाणें अहिल्याबाईंनीं तुकोजीरावांना दत्तक घेतलें व गंगोबा तात्यांबरोबर त्यांना वस्त्रें आणण्याकरतां पुण्यास पाठविलें. गंगोबा तात्या हे राघोबा-दादांना इंदुरास बोलावून घेऊन जर होळकरांची गादी सरकारजमा करण्याच्या कटांत असते तर ते तुकोजीरावांस घेऊन वस्त्रें आणण्यास पुण्यास कसे गेले असते? ते ज्या अर्थी गेले त्या अर्थी कारस्थानी लोकांची ही केवळ कोल्हेकुई होती असेंच ह्मणणें प्राप्त होतें. या दत्तक प्रकरणीं महादजी शिंदे यांनीं अहिल्याबाईंना व तुकोजींना इतकी मदत केली अगर इतकी मदत केल्याचें प्रदर्शन केलें कीं ती मदत पाहून महादजीबद्दल लोकांना भलताच संशय येऊं लागला. दुसऱ्याला कोणतीही मदत करणें असेल ती व्यवहाराला धरून असेपर्यंत त्याचा सर्वसाधारण विपर्यास होत नाहीं. पण व्यवहाराला सोडून कोणतीही गोष्ट केली गेली ह्मणजे त्यासंबंधी कुतर्क निघूं लागतात. या वेळीं महादजींच्या मनांत तुकोजीला प्रत्यक्ष अशी मदत फारच थोडी करावयाची होती. त्यांना त्यांच्या मदतीचें अवडंबरच जास्त दाखवावयाचें होतें. ही मदत जर केवळ दाखवण्यापुरतीच होती तर ती कमी तरी कां दाखवावी? या कल्पनेनें महादजीनें अहिल्याबाईंना व तुकोजींना अफाट मदत केल्याचें दाखविलें. पण त्यामुळें लोकांच्या मनावर उलटा परिणाम झाला. तो असा कीं या दत्तक प्रकरणीं महादजी शिंदे यांनीं होळकरांकडून लांच घेतली असें लोक ह्मणूं लागले.

२१. नाना फडनविस यांनीं महादजीला दासीपुत्र असूनही शिंद्यांच्या फार मोठ्या दौलतीचे धनी केलें; त्याचप्रमाणें होळकरांच्या गादीला आप्तसंबंध नसलेल्या एका शिलेदार नोकराला धनी केलें यामुळें हे दोघे मोठे फौजबंद सरदार नानांचे जन्माचे ऋणी होऊन बसले. आणि दादासाहेबांशीं त्यांनीं विरोध केल्याबद्दल किंवा विरोध केल्याचा गवगवा झाल्याबद्दल ते त्यांचे जन्माचे शत्रू बनले, एवढीमात्र गोष्ट खरी. कारस्थानी लोकांचा हा असाच विजय होत असतो.

---

१ महादजी शिंदे यांचें चरित्र, नातुकृत पान ९७.

२२. वर सांगितल्याप्रमाणें तुकोजी होळकर यांना बरोबर घेऊन गंगोबा-तात्या हे पुण्यास आले. त्या प्रसंगी दादासाहेबही पुण्यास आले. सरदारीचीं वस्त्रें देण्याचे अगोदर तुकोजीरावांकडून माधवरावांनीं इमानप्रमाण घेतलें. त्यावेळीं माधवराव तुकोजीराव होळकरांना ह्मणाले ' प्रस्तुत आमचे काकासाहेब आह्मांशीं वैरभावानें वागतात. घरांत त्यांनीं नाना प्रकारचे तंटे माजवून जिकडे तिकडे बखेडे मांडले आहेत. त्यांतून तुमचे दिवाण गंगोबा त्याच्या जिव्हाळ्याचे. तर आतां आपला ओढा कोणीकडे? गंगोबावर अहिल्याबाईनें मेहेरनजर पूर्ववत् केली असावी. कारण त्याच्याकडे वरपांगी तरी पुष्कळ कामकाज ती सोंपवीत आहे.' तुकोजीनें त्यावर उत्तर केलें, ' गादीवर जो धनी तो आमचा मार्तंड. आह्मीं दुसऱ्याला ओळखीत नसतो. आह्मांला माणसें या गादीनें केलीं आहेत. या गादीच्या आशीर्वादानें आम्हीं लहानाचे थोर झालों. तर या गादीशीं आमच्या हातून बेइमानगिरी व्हावयाची नाहीं. आमचे धनी आपण. आपल्या सेवेंत हा देह खर्चण्याला आम्हीं तयार आहों. चाकरी सांगून अनुभव पहावा.' या इमानप्रमाणात दूरदर्शीपणा ठेवण्यांत आला होता. राणी ताराबाईसाहेब यांच्या वेळीं केवळ गादीबद्दल इमानप्रमाण होत असे. परंतु त्यांतही पुढें सदोषता दिसून आल्यामुळें यावेळीं होळकरांकडून गादी व गादीवरील व्यक्ति अशा दोन्ही प्रकारानें इमानप्रमाण घेण्यांत आलें हें विशेष आहे. अशीं इमानप्रमाणें घेतल्यानंतर त्यांना सरदारीचीं वस्त्रें माधवराव यांनीं दिलीं व त्यांना देशीं जाण्याचा हुकूम झाला.

२३. तुकोजीरावांच्या ' आह्मांला माणसें या गादीनें केलीं आहेत,' या वाक्यावरून त्यांना दत्तक करण्याचा प्रयत्न माधवरावांच्या वतीनें झाला हें उघड होतें. त्यांत अहिल्याबाईच्या इच्छेचा विशेष कांहीं संबंध नव्हता. शिवाय ज्याअर्थीं अहिल्याबाईंना गंगोबा तात्या कामावर असावेत असें वाटत असतां माधवराव पेशवे हे तुकोजीच्या मनांत गंगोबा तात्यांविषयीं शंका उत्पन्न करून त्यांच्याबद्दल अविश्वास दाखवितात, म्हणजे तुकोजीरावांनीं इमानप्रमाण केल्यावर गंगोबा तात्यांना कामावरून दूर करण्याबद्दल आपला संदिग्ध अभिप्राय व्यक्त करतात, त्याअर्थीं अहिल्याबाईंच्या प्रेरणेनें तुकोजी होळकर हे दत्तक झाले असावे असें ठरत नाहीं. नानांच्या कारस्थानामुळें तुकोजीलाच दत्तक घेणें अहिल्याबाईंना भाग पडलें असेंच यांतील सार निघतें.

---

# प्रकरण ९ वें.

# माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीचा शेवट.

## इ० स० १७६६ ते इ० स० १७७२.

१. माधवराव पेशवे व राघोबादादा याचेमधील तह. राघोबादादा आनंदवल्लीस जाऊन राहतात.—२. मॉस्टिनसाहेब याने पेशवेदरबारची मुंबईच्या गव्हर्नरास दिलेली माहिती. राघोबादादास भेटीचे वेळीं कैद करण्याबद्दल गोपिकाबाईनीं माधवरावास दिलेली चिथावणी.—३ माधवराव पेशवे व राघोबादादा यांचेमधील तहात सखारामबापूंची मध्यस्ती राघोबादादाचें पेशवाईच्या कारभारातून पूर्णपणें उच्चाटन.—४. राघोबादादाची त्यागवृत्ति. विरुद्धपक्षाची त्याच्यावर कुरघोडी करण्याची धडपड.—५. राघोबादादांची व ब्रोमसाहेबाची भेट. राघोबादादांशी माधवराव कसे कृतघ्न बनले.—६. राघोबादादा व माधवराव पेशवे याचेमधील तहाच्या अटी पूर्णपणें पाळण्यांत राघोबादादा हलसंकल्पी होते.—७. पेशवेदरबारने राघोबादादांना नादार करणें ठरविलें. —८ माधवराव पेशवे नाना फडनविसाच्या सल्ल्याप्रमाणें राघोबादादांस कैद करण्यास प्रवृत्त होतात. राघोबादादा पुण्याहून निसटून नाशिकला जातात. —९ राघोबादादांशी तुकोजी होळकराचे विश्वासघाताचे कृत्य. माधवराव पेशवे तुकोजी होळकराच्या सहाय्याने राघोबादादास विश्वासघाताने कैद करतात. राघोबादादाचा पुण्यातील बंदीवास सुरू झाला.—१०. तुकोजींचें राघोबादादाच्या बाबतींतील विश्वासघाताचे कृत्य गंगोबास आवडले नाहीं. गंगोबा तात्या होळकराच्या दिवाणपदास लाथ मारून संन्यास घेतात. माधवराव संन्याशी झालेल्या गंगोबा तात्याची विटंबना करून त्यास कैदेंत डाबून टाकतात. —११. शनिवारवाड्यांत राघोबादादांस कैदेंत ठेवलें त्याचेवरील कडेकोट बंदोबस्त. नाना फडनविसांची त्याच्या बंदोबस्तावरील देखरेख. बंदीवासांतील राघोबादादा व माधवराव यांची दोन परस्परविरोधी स्वभावचित्रें—१२. बंदीवासांतील राघोबादादाची देवपूजा व अनुष्ठानें—१३. राघोबादादांच्या बंदीवासांतील नाना फडनविसाच्या कडक देखरेखीचा एक मासला. माधवराव पेशवे सखारामबापूंस समज देतात —१४. सखारामबापूंचा कुचेष्टा करीत राहण्याचा

स्वभाव —१५ नाना फडनविस व सखारामबापू यांचेमधील राजकारण साधून घेण्याविषयींचा फरक. नाना फडनविसांचें हेरांचें जाळें कसें होतें.—१६. माधवराव पेशव्यांचे हैदर व हिंदुस्थान यांतील राजकारण.—१७. रामशास्त्री प्रभुणे यांचा पूर्ववृत्तांत व पेशवाईच्या कारभारातील त्यांचा उदय.—१८. माधवराव पेशवे राजयक्ष्म्याने आजारी पडतात. त्यांचा थेऊरास जाण्याचा संकल्प. —१९. थेऊरास माधवराव पेशवे सर्व दरबारी मंडळानिशीं व लव्याजम्यानिशीं जातात. तेथील त्यांचा आजार व औषधोपचार —२०. आजारीपणांतील माधवरावांची संभाव्य मानसिक तळमळ. त्यांचेकडून आत्महत्येचा प्रयत्न. सौ. रमाबाईची दिव्य पतिसेवा. मरणसमयींची माधवरावांची दिव्य दृष्टि.—२१. माधवराव पेशव्यांची राज्यकारभारांतील शेवटची निरवानिरव. दरबारी मंडळीपुढें माधवराव आपल्या अतृप्त इच्छा पुऱ्या करण्याची मागणी करतात.—२२. माधवरावांच्या कर्जफेडीसंबंधी नाना फडनविस यानीं हलवायाच्या दुकानावर ब्रह्मार्पण केल्याचें उदाहरण. माधवराव पेशव्यांकडून रामचंद्रपंत नाईक यांचा सन्मान.—२३. माधवराव पेशवे हरिपंत फडके यांस श्रीवर्धनच्या देशमुखीच्या सनदा करून देतात.—२४ राघोबादादांचे बंधविमोचन. माधवराव व राघोबादादा यांची थेऊरास भेट. माधवराव राघोबादादाकडे सर्व राज्याचा कारभार सोपवितात. नारायणरावाच्या संरक्षणाविषयी व अतृप्त इच्छा पुऱ्या करण्याविषयीं ते राघोबादादांकडून वचनप्रमाण घेतात.—२५. सखारामबापूंचेही बंधविमोचन. त्यांस पुन्हां कारभारात घेतलें.—२६. माधवरावांचा कैलासवास.—२७. सौ. रमाबाईसाहेब यांचे सहगमन.—२८. माधवराव पेशव्यांचा महत्वाकांक्षी व उतावळा स्वभावधर्म.—२९. राघोबादादाविरुद्ध नानाच्या स्वतंत्रपक्षाची विशालता.—३०. माधवराव पेशव्यानी आपल्या मरणकालीं जी राज्याची निरवानिरव केली त्यांत त्याच्या शुद्धभावनेचे प्रतिबिंब कसें होतें.—३१. माधवराव पेशव्यांनीं नाना फडनविसास आपल्या मरणानंतर कुलमुखत्यार कां नेमलें नाहीं?—३२. माधवराव पेशव्यांना अंतकाळीं दिव्य दृष्टि फुटल्यानंतर त्यांना नाना फडनविस हलक्या दर्जाचे दिसूं लागले.—३३. राघोबादादांच्या हातीं नारायणरावांना दिल्याबद्दल विरुद्ध पक्षाचे कुतर्क.—३४. माधवरावांनीं नारायणरावास राघोबादादाच्या हातीं देण्याचें कारण.—३५. नाना फडनविसांची वणिग्वृत्ति. महादजी शिंदे व गोपाळराव पटवर्धन यांच्या दांभिक स्वामीभक्तीचा

माधवरावांस आलेला अनुभव.—३६. नारायणराव पेशव्यांस बाळ ह्मणण्याची व्यावहारिक पद्धत होती.—३७. नारायणराव पेशव्यांबद्दल माधवराव पेशव्यांनी केलेलें भाकित.—३८. नारायणराव पेशव्यांचा भित्रा स्वभाव.—३९. माधवरावांकडून राघोबादादांस मिळालेला अधिकार न्यायदत्त कसा होता.—४० माधवरावानीं नाना फडनविसांच्या तोंडांत पडणारी अमृताची धार राघोबादादांस पाजली. नाना फडनविसाचा बिबट्या वाघाप्रमाणे सूडाचा मनोधर्म.

१. इ. स. १७६७ च्या डिसेंबर महिन्यांत मुंबई गव्हर्नरांकडून मॉस्टिनसाहेब माधवराव पेशवे यांची भेट घेण्याकरतां मुंबईहून पुण्यास आले. त्यावेळीं त्यांनीं पुण्याच्या राजकारणाची माहिती मिळवून तारीख ६ डिसेंबर रोजीं मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांना कच्च्या हकीकतीचें एक पत्र पाठविलें. त्यांत ते लिहितात: 'गोपिकाबाईच्या चिथावणीवरून रावोबाला समक्ष भेटींत कैद करण्याचा माधवरावांचा विचार होता, पण सखारामबापूंच्या मध्यस्तीनें चुलत्या पुतण्यांचा तूर्तातूर्त तह ठरला. पेशव्यांनीं रघुनाथरावांस नाशिक त्रिंबकचे आसपास तेरा लाखांचा मुलुख व कांहीं किल्ले द्यावे. पंचेवीस लक्षांपर्यंत रावोबांच्या फौजेची थकलेली पगाराची बाकी देण्याबद्दल पेशव्यांची जामीनकी द्यावी. व राघोबानें कारभारांत ढवळाढवळ न करतां गप्प बसावें.' माधवराव पेशवे व राघोबादादा यांच्यामध्यें हा तह सखारामबापूंनी घडवून आणला. या तहानंतर राघोबादादा आनंदवल्लीस निघून गेले.

२. वरील मजकूर जो मॉस्टिनसाहेबानें गव्हर्नरास लिहून कळविला तो पेशवे घराण्यांतील कोणाच्याही पक्षाचा कैवार घेऊन लिहिलेला नाहीं. इंग्रजांना त्यांचें राजकारण साधावयाचें होतें. तेव्हां वस्तुस्थिति काय आहे हेंच त्यांना समजावून घ्यावयाचें होतें. त्या दृष्टीनें त्यांनीं त्यावेळीं जी माहिती मिळविली ती खरी होती असें धरून चालावयास हरकत नाहीं. पक्षांधत्वानें प्रेरित होऊन जो माहिती देईल त्याची माहिती खोटी व बनावट असूं शकेल. परंतु जे इसम पेशवाईच्या दरबारांत काय घडामोडी चालल्या आहेत याचें बारकाईनें निरीक्षण करावयाला येत असत व ज्या माहितीवर त्यांना पुढें आपलें राजकारण साधा-

---

१. मराठे व इंग्रज पान ४७.

वयाचें होतें ते केव्हांही अगदीं खरीखुरी माहिती मिळविण्याचाच प्रयत्न करून, जी तशी खरी मिळालेली माहिती असेल, तेवढीच ते आपल्या वरिष्ठ अंमलदारांकडे पाठवीत असत. या माहितींत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, 'गोपिकाबाईंच्या चिथावणीवरून राघोबाला समक्ष भेटींत कैद करण्याचा माधवरावांचा विचार होता.' या कैद करण्याला गोपिकाबाईंच्या चिथावणीशिवाय दुसरें कांहीं कारण नव्हतें. राघोबादादाना कैद करण्याच्या उद्देशांत त्यांनीं माधवरावांचा किंवा पेशव्यांच्या गादीचा कांहीं अपराध केलेला नव्हता. राघोबादादांना कैद करण्याला प्रवृत्त करणारी गोपिकाबाईंची चिथावणीच फक्त कारणीभूत होती. चिथावणीचें जर पृथःकरण केलें तर त्यांतून सूडाची भावना, द्वेष, मत्सर, स्वार्थबुद्धि आणि कपट हींच तत्वें बाहेर निघतील. राघोबादादा हा आपला दीर. त्याला राज्याचा वांटा मागण्याचा अधिकार आहे. त्याला राज्यांत वांटा देणें म्हणजे आपला स्वार्थ बुडविणें होय. तेव्हां त्याला नामशेष करण्यांतच माधवरावांचें कल्याण आहे, हाच या गोपिकाबाईंच्या चिथावणीचा निष्कर्ष होय. गोपिकाबाईला आपल्या वाऱ्यालासुद्धा भाऊबंदांनी उभें रहावयाला नको होतें, हें सदाशिवरावभाऊंच्या प्रकरणावरून दिसून आलेंच आहे. शिवाय माधवराव आतां कर्ता पुरुष झाल्यामुळें राघोबादादांच्या तरवारीची कोणाला जरूरी नव्हती. मग हें निरुपयोगी लचांड पाहिजे कशाला असें तिला वाटत होतें. गोपिकाबाईंचेंही नानाप्रकारें नाना विकल्प उत्पन्न करवून डोकें फिरवून टाकणारे नाना हे होतेच. त्यांच्या हातीं गोपिकाबाईंची 'महाकाली तोफ' होतीच. नाना ज्याप्रमाणें इतर राज्यांतील लोकांचीं मनें दादासाहेबांविषयीं कलुषित करण्याचे प्रयत्न करीत होते, त्याचप्रमाणें घरींही त्यांचे अव्याहत प्रयत्न चालू होते. त्यामुळें गोपिकाबाईंचें डोकें जास्त फिरलें. म्हणूनच राघोबादादांना कैद करण्याची गोपिकाबाईंनीं माधवरावांना चिथावणी दिली.

३. गोपिकाबाईंच्या चिथावणीमुळें दादासाहेबांना भेटीला बोलावून तेथेंच त्यांना कपटानें कैद करण्याच्या विचारांत माधवराव होते. पण सखारामबापूंना हा भयंकर अन्याय होतो आहे असें दिसून आल्यामुळें त्यांनीं राघोबादादां-

बद्दल माधवरावांकडे मध्यस्ती केली. सखारामबापू हेही स्वार्थीच. पण ते नानाप्रमाणें अंतःकरणशून्य नव्हते. सखारामबापू यावेळीं जरी कोणत्याही कारभारांत नव्हते, तरी त्यांचा नांवलौकिक व त्यांचें वजन अद्याप राज्यकार-भारांतून कमी झालें नसल्यामुळें माधवराव आणि त्यांचें मंडळ यांनीं दादासाहेबांबाबतच्या तहाच्या अटी, किमान पक्षी, सखारामबापूंच्या मध्यस्तीनें कबूल केल्या. तेरा लक्ष रुपयाची जहागीर दादासाहेबांना देणें ह्मणजे पेशवाईचें भयंकर नुकसान होतें असें राजमंडळाला वाटत होतें, तरी सखा-रामबापूंच्या भिडेखातर ती गोष्ट मान्य केली गेली. सैनिक लोकांच्या पगाराची बाकी पेशव्यांना देणें जरी प्राप्त होतें तरी ती त्यांनीं दिली नसती तर दादासाहे-बांनीं काय केलें असतें ? परंतु दादासाहेबांवर उपकार केल्याचें दाखविण्याकरितां व सखारामबापूंचा शब्द राखल्याचे भासविण्याकरितां माधवरावांनीं त्या अटी मान्य केल्या. परंतु दादासाहेबांनीं पेशव्यांच्या राज्यकारभारांत एक ब्रही काढावयाचा नाहीं अशी अट मात्र माधवरावांनीं त्यांचेवर लादली.

४. ज्या राघोबादादांनीं, आपल्या हाताखालच्या सरदारांना वीस वीस, पंचेवीस पंचेवीस लाखांच्या जहागिरी दिल्या, ज्यांनीं लहानपणापासून मोहि-मेवर जाऊन पेशव्यांची कीर्ति वाढविली, सर्व हिंदुस्थानभर दरारा बसविला व पेशव्यांचें राज्य संभाळून ठेवलें, आणि जे नानासाहेब पेशव्यांचे सख्खे भाऊ, पेशव्यांच्या राज्याचे कायदेशीर अर्धे हिस्सेदार, त्यांच्या तोंडावर दुसऱ्याच्या मध्यस्तीनें व त्याच्या मुर्वतीखातर तेरा लाखांच्या जहागिरीच तुकडा टाकावा व पेशव्यांच्या ह्मणजे त्यांच्याच जन्मसिद्ध राज्यकारभाराच्य हक्कांचा त्यांना त्याग करावयाला लावावें ह्मणजे पर्यायानें दादासाहेबांन स्वतःची कीर्ति व मान बाजारांत विकून भीक मागावयाला पाठविण्यासारखेंच होतें. थोड्या स्पष्ट शब्दांत लिहावयाचें ह्मणजे आपण पंचपक्वान्नांचें भोजन करून दादासाहेबांच्या तोंडावर खरकट्या उष्ट्या पत्रावळी फेंकण्याप्रमाणेंच या तहाच्या अटी होत्या. गोपिकाबाई आणि त्यांची कारस्थानी मंडळी यांनं आपल्या न्यायाच्या बाजारांत धनी दादासाहेब यांची अशा स्वरूपांत

किंमत केली. या प्रमाणें आपला सर्व बाजूंनीं झालेला नाश दादासाहेबांनीं सहन केला आणि 'आपलेच दांत व आपलेंच ओंठ' असे समजून त्यांतही समाधान मानून ते स्वस्थ बसले परंतु कारस्थानी लोकांच्या मनांत त्यांना ती तेरा लक्ष रुपयांची जहागीरी द्यावयाची नव्हती. ह्मणून त्यांचीं नवीन कारस्थानें सुरू झालीं. राघोबादादांविषयीं निरनिराळ्या कंड्या उठविण्याची पराकाष्ठा झाली. या कारस्थानी लोकांना राघोबादादा मोकळे नसावयाला पाहिजे होते. म्हणून त्यांना पकडून कैदेंत डांबून कसें टाकतां येईल याबद्दल त्यांचे प्रयत्न सुरू झाले. राघोबादादांच्या तेरा लक्षांच्या जहागिरीऐवजीं त्यांचेच तीनतेरा करण्याचा डाव नानाफडविसांनीं टाकला.

५. माधवराव पेशव्यांच्या भेटीला ज्या प्रमाणें मॉस्टीनसाहेब आला, त्याच-प्रमाणें त्याचा मदतगार ब्रोमसाहेब राघोबादादांच्या भेटीला गेला. त्यानें दादा-साहेबांची भेट नाशिकजवळ इंद्रगड येथें घेतली. त्या भेटींत राघोबादादांचें ह्मणणें 'नानासाहेब पेशव्यांच्या मरणोत्तर माधवरावाला सर्वस्वी मी मदत केली, त्याचा मान मरातब राखला, मुलुखगिऱ्या व स्वाऱ्या केल्या, माधवरावास पोटच्या मुलाप्रमाणें सांभाळलें, असे असतां माधवराव कृतघ्न बनला. माझा अपमान करूं लागला. माझे स्नेही, सरदार फोडूं लागला व अखेर मला कैद करण्यापर्यंत पाळी आली.' याप्रमाणें ब्रोमसाहेबाला दादासाहेबांच्या प्रत्यक्ष तोंडून हकीकत समजली. हा साहेब परका असल्यामुळें त्याला त्रयस्थ म्हणून आपलीं घर-गुती व्यंगें झांकून ठेऊन जितकी त्रोटक हकीकत सांगतां येणें शक्य होतें तेवढीच दादासाहेबांनीं सांगितली. अर्थात् गृहकलहाच्या आंतील गोष्टी व राज्यकारभारांतील कारस्थानी मंडळाच्या कित्येक गोष्टी त्यांना सांगतां येण्या-सारख्या नव्हत्या. शिवाय दादासाहेब हे वडील असल्यानें त्यांना आपल्या घराण्यांतील व राज्यकारभारांतील मंडळीचा लौकिक ठेऊनच कोणतीही गोष्ट बाहेर सांगावयाची होती. याकरतां केवळ माधवराव पेशवे यांचेंच नांव पुढें करून त्यांनीं आपल्या सध्यांच्या परिस्थितीची कल्पना ब्रोमसाहेबांना

१. मराठे व इंग्रज पान ४९.

थोडक्यांत दिली. यावरून दादासाहेबांना कसें जखडून टाकण्यांत आलें होतें हें दिसून येईल. त्यांचा सर्व खर्च तेरा लक्ष रुपयांत आल्यामुळें, त्यांना हजार पंधराशेंच फौज ठेवण्याव्यतिरिक्त मार्ग नव्हता. म्हणून दादांनीं फौज कमी केली. राघोबादादांचे सरदार फोडण्याचा सपाटा नानांनीं सुरू करून त्यांचें बल कमी केलें. राज्यकारभारांतून त्यांचें अंग काढून टाकून त्यांचा दर्जा कमी केला. त्यांच्यावर निरनिराळीं कुभांडें रचून त्यांची नीतिमता लुबाडून घेतली. त्यांना मराठी राज्यांत कोठें जातां येऊं नये अशी कारस्थानें करून त्यांचेच लोक त्यांना शत्रू करून ठेवले. मुलाप्रमाणें वाढविलेल्या माधवरावांकडून उघड अपमान करवून दादासाहेबांच्या मानी मनाला विलक्षण दुःख देवविलें. इतकेंही सर्व करून त्यांना कैद करण्याचा घाट घातला. माधवराव न्यायी होते म्हणून त्यानीं आपल्या चुलत्याची ही अशी दशा केली कीं काय ? दादासाहेबांनीं माधवरावांना आपल्या नजरकैदेंत ठेविलें त्यावेळीं त्यांचा कोणता अपमान केला होता म्हणून त्याचा सूड घेण्याचा हा प्रयत्न होता ? किंवा यावेळी आनंदीबाईनीं कोणावर विषप्रयोग केला होता, किंवा कोणावर मारेकरी घातले होते म्हणून त्याचें हें प्रायश्चित होतें ? अगर पुढें आनंदीबाई व दादासाहेब असे उभयतां राज्यतृष्णेकरतां नारायणरावांचा खून करणार आहेत असें माधवरावांना स्वप्न पडलें होतें म्हणून त्यांची पुढील शिक्षा ते त्यांना आतांच देत होते कीं काय ? याला उत्तरें काय ?

६. अशी सर्व बाजूंनीं राघोबादादांची नांगी दाबून टाकल्यानंतर सुद्धां राघोबादादा आपल्या वचनाला पूर्णपणें जागत होते. तेरा लाखांची नेमणूक माधवरावांनी करून दिली व पंचवीस लाख रुपये सैन्याच्या पगाराचे द्यावयाचे ठरलें. पण ते दादासाहेबांच्या पदरांत पडले नाहींत. कारण तारीख १ जानेवारी सन १७६८ रोजीं राघोबादादांचा वकील गोपाळपंत चक्रदेव हा मॉस्टीन साहेबांना भेटला. त्या वेळीं त्यांनीं राघोबादादांचा विचार त्यांना सांगितला. त्यांत तहाच्या अटी पाळण्यांत माधवराव यांच्याकडून यत्किंचितही चूक होईल तर त्यांचा तह दादासाहेब उलथून पाडतील असें होतें. याचा

भावार्थ एवढाच कीं त्या तहांतील अटी माधवरावांनीं आपल्या कारस्थानी-मंडळाच्या सल्यानें अगदीं हीन बुद्धीनें जरी ठरविल्या होत्या व सर्व बाजूंनीं दादासाहेबांच्या कीर्तीचा, व अब्रूचा नाश करणाऱ्या आणि त्यांची सर्वस्वी दुर्दशा होईल असें करणाऱ्या जरी होत्या, तरी आपण होऊन त्या अटी मोडावयाच्या नाहींत; आपलें काय वाटेल ते झालें तरी त्या अटीप्रमाणें चालावयाचें; पण इतकें करूनही जर माधवराव स्वतः त्या अटी पाळणार नाहींत तर मात्र दादासाहेब इतःपर त्यांच्यावर दया करावयाला तयार नव्हते. याचें कारण एवढेंच कीं दादासाहेबांच्या दृष्टीनें तहांतील अटी पूर्ण दुष्ट-बुद्धीच्या व हीन वृत्तीच्या परमावधीला गेलेल्या होत्या. स्वतःच्या गळयावर उठल्या नंतर त्याला पायाखालीं तुडविणारा अन्यायी ठरत नाहीं. हा एक नीतिमार्गच आहे.

७ दादासाहेबांच्या हातांत सत्ता असती तर त्यांचा गौरव कोठेंही झाला असतां. पण पुण्याच्या पेशवेदरबाराने त्यांना वरीलप्रमाणें नादार ठरविल्यामुळें त्यांना आतां कोणी जवळ करणारे नव्हते. त्याचें ज्या लोकां-बरोबर सख्य होते व ज्याचे पेशवेदरबारांत वजन होतें त्यांना पेशव्यानीं कोठें भेदनीतीनें तर कोठें अन्यायानें तोडून टाकलें होतें. होळकर व शिंदे यांच्याप्रमाणें नागपूरकर भोंसले आणि गायकवाड हे आपापल्या दौलतींचें हित सांभळणार असल्यामुळे ते दादासाहेबांच्या या दैन्यावस्थेंत त्यांना मदत करून पेशव्यांचे वैर संपादून घेण्याला तयार होण्यासारखे नव्हते. अशा दीनवाण्या परिस्थितीत दादासाहेब आनंदवल्लीला राहत होते.

८. गंगोबा तात्या तुकोजीरावांस बरोबर घेऊन पुण्यास वस्त्रें घेण्याकरतां आले त्यावेळीं दादासाहेबही पुण्यास आले होत. त्यावेळीं तुकोजीरावांच्या वस्त्रें देण्याच्या समारभाला हजर राहतां येऊन दुसरेंही त्यांचे खासगी काम माधवराव यांच्याकडून करून घ्यावयाचें होते. मागे तहांत ठरल्याप्रमाणें पंचवीस लाख रुपये दादासाहेबांना यावेळीं माधवराव यांचकडून घ्यावयाचे होते. परंतु कारस्थानी लोकांनीं दादासाहेबांच्याकरतां निराळाच चक्रव्यूह

त्चून ठेवला होता. दादासाहेबांबरोबर ठरलेल्या तहांत, नाशिक व त्रिंबक हे दोन किल्ले व त्याच्या दरम्यानचा मुलुख दादासाहेबांना देण्याचें माधवराव यांनीं ठरविलें होतें. त्यावेळीं राजकारणाच्या दृष्टीनें पुण्यापासून नाशिक दूर एवढीच माधवरावांनीं व त्यांच्या कारस्थानी पुढाऱ्यांनीं आपली स्वतःची सोय पाहिली. दादासाहेबांचा उपसर्ग आपल्याला नको एवढीच सोय त्यांनीं व त्यांच्या मंडळानें पाहिली होती. त्यावेळीं गोपिकाबाईच्या सोयीगैरसोयीकडे या मंडळाचें लक्ष गेलें नाहीं. गोपिकाबाई गंगापुरीं राहत असल्यामुळें तो मुलुख दादासाहेबांच्या जहागिरींत, गेला आणि त्यामुळें त्यांच्यावर दादांच्या हद्दींत राहण्याचा प्रसंग गुदरला, म्हणून त्यांच्या अंगाचा तीळपापड झाला. त्या गंगापूर सोडावयाला तयार नव्हत्या व दादासाहेबांच्या मुलखांतही राहण्याची त्यांची तयारी नव्हती. यामुळें माधवराव दोन बाजूंनीं पेंचप्रसंगांत आले. पण असे अनेक पेंचप्रसंग निभावून नेणारे त्यांचे मुख्य मुत्सद्दी नाना हे होतेच. त्यांना आपल्या पक्षांतील गोपिकाबाईचें समाधान करून दादासाहेबांना नामशेष करावयाचें होतेच. नानांच्या सल्ल्यानें व गोपिकाबाईच्या चिथावणीनें माधवराव दादासाहेबांवर कपटजाल टाकण्यास उद्युक्त झाले. या वेळीं दादासाहेबांना कैद केल्यास तहाच्या अटीप्रमाणें तेरा लाखांची जहागीर व पंचवीस लाख रुपये रोख द्यावयालाही नकोत, मातोश्रींचें समाधानही होतें आणि दादासाहेबांची कटकटही जाते असा त्या कपटजालाचा निष्कर्ष होता. दादासाहेबांना माधवराव आपणाला कैद करणार आहेत ही बातमी समजली, त्याबरोबर ते रातोरात वाड्याच्या बाहेर पडले व त्यांनीं नाशिकचा मार्ग सुधारला.

९. मार्गांत त्यांना तुकोजीराव होळकर हे पुण्याहून इंदुरला जाण्याकरतां निघाले होते ते भेटले. गंगोबा तात्या बरोबरच होते. त्यांना राघोबांनीं पुणे दरबारचा आपणाला कैद करण्याचा हेतु सांगितला. तेव्हां गंगोबांचा सल्ला असा पडला कीं, या वेळीं इकडच्या टापूंत राघोबांनीं न रहावें.

१ पेशव्याची बखर पा० ७६.

पुण्याचें वातावरण निवळल्यानंतर इकडे यावें. तोंपर्यंत अहिल्याबाई यांच्या भेटीला जाण्याचा बहाणा करून आपले स्वारीबरोबर त्यांनीं चलावें. राघोबांनाही तें योग्य वाटलें. त्यांनीं इंदुरास अहिल्याबाईच्या भेटीकरतां जाण्याचें ठरविलें. हें वर्तमान पुण्यास माधवराव यांना समजतांच राघोबा-दादांना तुकोजीराव इमानप्रमाण देऊन फितुर झाले कीं काय असा संशय आला. ह्मणून त्यांनीं तुकोजीरावांना एक गुप्त चिट्टी लिहून विचारलें कीं, 'तुह्मीं समक्ष काय बोललांत ? आणि आपलीं हल्लीं खलबतें काय चाललीं आहेत ?' त्याला तुकोजींनीं उत्तर लिहिलें कीं 'बोललों त्यांत अद्याप बालाग्र अंतर नाहीं. धन्यांनी सैन्यासह येऊन नाशिकास मुक्काम करावा. आह्मीं त्रिवर्ग कूच करूं लागलों ह्मणजे आमच्यावर स्वामींनीं चाल करून यावें. आपण आलात असें कळताच राघोबास लुटून घेतों.' त्याप्रमाणें तुकोजींच्या लिहिण्याचा भरंवसा धरून माधवराव आपल्या सैन्यासह नाशिकला येऊन दाखल झाले. माधवराव येईपर्यंत तुकोजींनीं आनंदवल्लीच्या बाजूस मुक्काम केला. पुढें मुक्काम निघणार तेंव्हां राघोबादादांनीं आपलें सैन्य बरोबर घेतलें व ते पुढील मुक्कामास निघाले. तुकोजींना माधवराव पेशवे जवळ आल्याची वार्ता समजली. माधवरावांनीं त्यांच्या सैन्याचा पाठलाग केला. ते अगदीं जवळ आले असें पाहून तुकोजीच्या सैन्यानें पलट खाल्ली; व राघोबादादांच्या सैन्याची दाणादाण करावयाला सुरवात केली. दादासाहेबांचें सैन्य अगदीं थोडें होतें व असा प्रसंग येईल असें कोणाच्या स्वप्नांतही नसल्यानें राघोबांचे सर्व लोक पळत सुटले. तुकोजींनीं त्यांना लुटलें व त्यांची दाणादाण उडवून दिली. तुकोजींचें हे विश्वासघातांचें कृत्य पाहून आतां आपला कांहीं इलाज चालत नाहीं असें पाहून दादासाहेब एकटेच घोड्यावरून पळत सुटले व धोडपच्या किल्ल्यांत शिरले.[1] तोंच माधवरावांचें सैन्य त्या ठिकाणीं येऊन पोंचलें. किल्लेदाराने दादासाहेबांस माधवरावांच्या स्वाधीन केलें. त्यांना घेऊन ते पुण्यास आले

१ होळकर कैफियत पतप्रतिनिधी माधवराव पान. ६४.

व शनिवारवाड्यांत तेव्हांपासून दादासाहेबांना कैदेंत ठेवण्यांत आलें. अशा-प्रकारें तेरा लाखांची जहागीर जाऊन त्यांच्या कारागृहवासाला सुरवात झाली. आजपर्यंत माधवराव पेशव्यांच्या राजमंदिराचे मुख्य स्तंभ नाना, गोपाळराव पटवर्धन, महादजी शिंदे वगैरे होतेच. त्यांत या नवीन तुकोजीरावाची भर पडली.

१०. हें तुकोजीरावांचे विश्वासघातकी कृत्य गंगोबा तात्यांना अगदीं खपलें नाहीं. त्यांना झाल्या गोष्टीबद्दल अत्यंत वाईट वाटले. त्यांनीं असल्या विश्वासघातकी सरदाराच्या दिवाणगिरीच्या नोकरीला लाथ मारिली व सन्यासवृत्ति धारण करून ते फिरूं लागले. माधवरावांच्या मनांत गंगोबा तात्यांचं पारिपत्य करावयाचें होतेच. पण ते सांपडेनात. म्हणून त्यांना पकडण्याकरतां माणसें पाठविण्यांत आली. माधवरावांनीं पाठविलेल्या दोन हुजऱ्यांनीं या संन्याशाची नोकरी पतकरिली. एके दिवशीं प्रकट होऊन हुज-ऱ्यांनी गंगोबांस पकडून पुण्यास आणलें. पुढें माधवरावानीं त्यांना तुरंगांत मरेपर्यंत ठेवलें. माधवरावांपुढे दादासाहेबांची स्तुति केल्याबद्दल त्यांना त्यांच्याकडून हें शेवटचें घोर शासन मिळाले. सत्ताधारी पुरुषाच्या अन्यायास न्यायच समजला जातो. इतके दिवस दादासाहेब व गंगोबा तात्या हे दोघेजण माधवराव, गोपिकाबाइ, नाना वगैरे मंडळींच्या डोळ्यांत जे खुपत होते ते अशा प्रकारें बंदिवान झाल्यामुळे त्यांचे डोळे शांत झाले. त्या सर्वांना इतःपर आपलें राज्य निष्कंटक झाल्याप्रमाणें वाटलें. ही हकीकत इ. स. १७६८ मध्यें झाली.

११. राघोबादादांना पुण्यास शनिवारवाड्यात मोठ्या बंदोबस्तानें कैदेंत ठेवण्यांत आले. त्यांच्या सभोंवती सरकारी पहारे व चौक्या ठेऊन कडेकोट बंदोबस्त करण्यांत आला.[1] दादासाहेबाचा हा कारागृहवास सुमारें चार वर्षें झाली. या अवधींत त्यांनीं कोठे फंदफितूरी केली नाहीं. किंवा माधव-रावांना कोणत्याही प्रकारें त्रास दिला नाहीं, या अवधीत कित्येक वेळां

१. पेशव्यांची बखर पान. ७७.

माधवराव पुण्यास होते, तर कित्येकवेळां ते बाहेर मोहिमेवर होते. त्यामुळें दादासाहेबांच्या बंदोबस्ताची कामगिरी नाना फडनविस यांच्यावर असे. राघोबादादांना नाना फडनविस किती पाण्यांत पहात होते हें मागें आलेंच आहे. नानांचा स्वभाव किती मत्सरी आणि द्वेषी होता याचें एक उदाहरण सौ. रमाबाई यांच्या बाबतींत मागील प्रकरणीं आलेंच आहे. तेव्हां राघोबादादांच्या व्यवस्थेच्या खर्चांत नानांनीं किती काटकसरीचें धोरण ठेऊन पेशव्यांच्या गादीचें किती लाखांनी उत्पन्न वाढविलें असेल हें निराळें सांगावयाचें कारण नाहीं. या कैदेंतील दादासाहेबांच्या दैन्यावस्थेमुळें त्यांच्या हितचिंतकांना नानांचा अत्यंत राग आला. पण इलाज काय? दादासाहेबांनीं माधवरावांना कैदेंत ठेविलें असतां, माधवरावांचा जो मान, इभ्रत व दर्जा त्यांनीं ठेवला होता तो माधवराव कर्ते होऊन व स्वतंत्रपणें राज्यकारभार पाहूं लागल्यानंतरसुद्धां त्यांना मिळाला नाहीं अशा योग्यतेची कैद माधवरावांना होती तर माधवरावाच्या कैदेंत दादासाहेब आल्यानंतर त्यांना माधवरावांनीं अत्यंत हीन स्थिति प्राप्त करून दिली. यावरून उभयतांच्या मनोवृत्ति व राजकारण करण्याची पद्धत स्पष्ट दिसून येते. हे चित्र पहा व तें चित्र पहा!

१२. राघोबादादा हे 'परम पुण्यवान् स्नान संध्याशील'[१] अशी त्यांची ख्याति होतीच. या कारागृहवासांत पडल्यानंतर त्यांना दुसरा कोणताही व्याप नव्हता. भेट घेणें, भेट देणें वगैरेही व्यवहार बंदच करण्यांत आले होते. त्यांच्याकडील नोकरचाकर माणसें अगदीं बेताचीं व तींही नाना फडनविसांच्या पूर्ण विश्वासाचींच होतीं. भलत्याचा शिरकाव आंत व्हावयाचा नाहीं, असा पूर्ण बंदोबस्त होता. अशा स्थितींत दादांची देवपूजा, जपजाप्य, अनुष्ठाने वगैरे जोरानें सुरू झाली व त्यांतच ते आपला काल घालवूं लागले.

१३. असे कांहीं दिवस गेल्यानंतर नाना फडनविसांनीं राघोबादादांना अगदीं सक्तीच्या कैदेंत ठेविलें आहे असे समजल्यामुळें राघोबादादांच्या

---

१. अधिकारयोग पान ६. २. हरिवंशाची बखर पा. ४३.

हितचिंतकांपैकीं सखारामबापू यानाही फार वाईट वाटलें. त्या वेळीं सखारामबापू हे कामावर नव्हते. तरी नजर कैदेतच होते. त्यांच्या स्वतःच्या राहत्या घरावर पहारा होता. राघोबादादांकडून कच्चे वर्तमान कांही समजेना. ह्मणून त्यांनीं एके दिवशीं एक चिट्टी लिहून आपल्या घरच्या कुणबिणीजवळ दिली आणि तिला सांगितलें कीं, वाड्यांतुन धुणें घेऊन दादासाहेबांच्या कुणबिणी नदीवर येतील त्यांच्याजवळ ही चिट्टी दे, आणि ती दादासाहेबांना नेऊन द्यावयाला सांग. त्याप्रमाणें त्यांच्या कुणबिणीनें ती चिट्टी धुणें घेऊन येणाऱ्या वाड्यांतल्या दादांच्या कुणबिणीजवळ वेळ साधून दिली. नाना फडनविस यांचे गुप्त हेर दादासाहेबांच्या सर्व माणसांवर होतेच. अशापैकीं एकानें ती चिट्टी देतांना पाहिली व धाकदपटशा दाखवून ती त्या कुणबिणीकडून घेऊन माधवराव पेशवे यांच्याकडे पोचती केली. त्या रात्रीं पेशव्यांचें बोलावणें सखारामबापूंना गेले व ते वाड्यांत आले. माधवरावांना नमस्कार करून सखारामबापू नित्याप्रमाणें एकांतांत बसले. त्यावेळीं श्रीमंतांनी बापूंस विचारलें 'सरकार अपराधी आहे त्याचें पारिपत्य काय करावें?' तेव्हां बापूंनीं उत्तर दिलें कीं, 'पायांत बेडी घालून किल्लयावर टाकावे.' असे बापूंच्याकडून उत्तर येतांच श्रीमंतानीं बापूपुढे त्यानीं दादासाहेबांना पाठविलेली चिट्टी टाकली. ती बापूंनीं पाहिली व ते निःस्तब्ध बसले. तेव्हां श्रीमंत बापूंना म्हणाले 'तुमचे कुचेष्टा करावयाचे ढंग अद्यापी जात नाहींत.' तेव्हां बापूंनीं श्रीमंतास विनंति केली कीं, 'आतां स्वामीपुढें आमची अक्कल चालवून एकादें कुभांड होईल असें नाहीं. आता फिरून आह्मांपासून अशी गोष्ट वाकडी व्हावयाची नाहीं.' हें उत्तर ऐकून श्रीमंतांनीं बापूंना सांगितले कीं, 'आजचा अपराध तुह्मांस क्षमा केला. फिरून कांहीं आढळलें असतां क्षमा होणार नाहीं. फिरून असे ढंग करूं नका.'[1]'

१४. या गोष्टीवरून दुसऱ्या कित्येक गोष्टींची कल्पना येण्यासारखी आहे. राघोबादादा नेमधर्मांत गुतले असतां त्यांना कोणत्या तरी कार्याला

१. पेशवे बखर पान. ७३.

प्रवृत्त करणारा व दादासाहेबांच्या पक्षाचा ह्मणविणारा मुत्सद्दी सखारामबापू हा होता. हा पूर्ण स्वार्थी होता हे इतिहासप्रसिद्धच आहे. तेव्हां त्यांच्या स्वार्थी प्रवृत्तींचीं उदाहरणें देण्याचें कारण नाहीं. माधवरावांनी आपणास घरीं बसविले हें त्यांना बरे वाटत नव्हतें. कारभार करण्याची त्यांना संवय. शिवाय आपल्याखेरीज राज्यकारभार सुरळीत चाललेला त्यांना बघवत नव्हता कांहीं कुचेष्टा केल्याशिवाय प्रतिष्ठा राहत नाहीं हाही त्यांचा स्वभाव होताच. कोणतीही नवी गोष्ट घडली कीं, ती सखारामबापूंच्या डोक्यांतील म्हणून लोक समजत. अशा कुचेष्टा करण्याचे ढग त्यांच्या अंगीं खिळले होते. त्यांनीं सदर प्रसंगाला इतःपर असे ढंग करणार नाहीं म्हणून कबूल केलें. पण जित्याची खोड मेल्याशिवाय थोडीच जाते? ती प्रसंगाला बाहेर येणारच.

१५. सखारामबापूनीं दादासाहेबांना चिट्ठी लिहिली, त्यात सखारामबापू दोषी. दादासाहेबांचा त्यांत कांहीं संबध नव्हता. दादासाहेबांना अशीं गुप्त कारस्थानें करावयाची माहीत नव्हतीं. त्यानीं ती आजपर्यंत कधीं केलींही नाहींत. वीर पुरुष कारस्थानी नसतो म्हणूनच तो कारस्थानीं लोकांच्या कपटजालानें फसतो. दादासाहेब वीरपुरुष असल्याबद्दल आख्यायिका आहेच. ते जसे शूर होते तसेंच भोळेही पण होते. म्हणून त्यांच्या भोळेपणाचा फायदा मुत्सद्यांना घ्यावयास कमी केलें नाहीं. दादासाहेबामध्यें जसें भोळेपणाचें (कपटी लोकांच्या दृष्टीनें) व्यंग होतें, तसेंच सखारामबापूमध्ये एक व्यंग होतें. तें नवीन कारस्थान करीत; पण ते गुप्त रीतीने पार पाडण्याकरतां त्या कामावर योग्य माणसाची निवड त्याचेकडून होत नसे. अशीं गुप्त तऱ्हेनें कामे पार पाडून नेणारी मंडळी त्यांच्या संग्रहाला नव्हती. गुप्त कारस्थानें आज्ञेबरहुकूम पार पाडावयाला पोलीस खात्यांतील निढावलेलीच माणसें पूर्ण विश्वासात असावीं लागतात. आणि अशीं माणसें जवळ

बाळगून काम करून घ्यावयाला त्यांचे अपराधही तसेंच पोटांत घालवे लागतात. कपट कारस्थानें निःशंकपणें पार पाडावयाला घाशीराम कोतवाला-सारख्या निशाचरी वृत्तीच्या माणसांचे पूर्ण सहकार्य व पाठबळ असावें लागतें. या शिवाय गुप्त हेरांचें जाळें निजामाच्या राजवाड्यापर्यंत पसरलें जात नाहीं. नानांच्या मागें घाशीराम कोतवालाची शक्ति होती, व घाशीराम कोतवालाच्या मागें नाना फडनविसांचें अधिष्ठान होतें. ह्मणूनच नानांचीं कारस्थानें गुपचुप पार पडलीं व तीं शेवटपर्यंत बाहेर आलीं नाहींत. सखाराम बापूंच्या मागें अशी शक्ति नसल्यामुळें ज्या बापूंच्या कारस्थानांत नाना नाहींत तेवढींच बापूंचीं कारस्थानें चवाट्यांवर आलीं. अशा अनंत कारस्थानांत घाशीराम यानें नानांची नोकरी बजावली ह्मणून नानांच्या कारकीर्दीत घाशी-राम कोतवाल इतिहासप्रसिद्ध झाला. धुणें घेऊन जाणाऱ्या कुणबिणीवरही अशा प्रकारें हेरांचें नियंत्रण होतें, यावरून राघोबादादांविषयीं कसा कडेकोट बंदोबस्त ठेवण्यांत आला होता हें दिसून येईल.

१६. राघोबादादांना बंदींत ठेवल्यानंतर सुमारें चार वर्षें माधवराव जगले. त्या अवधींत त्यांनीं कर्नाटकांत स्वारी केली. हैदराचा पूर्ण पराभव केला व आपल्या इच्छेप्रमाणें त्याच्या बरोबर तह केला. परंतु त्या तहाच्या अटी अंमलांत येण्याकरता किंवा त्यांची अंमलबजावणी करण्याकरता पन्नास हजार फौज हाताखालीं देऊन व लाखो रुपयाचा खर्च सोसून त्रिंबकरावमामा पेठे यांना वर्षानुवर्ष तिकडे रखडत ठेवावें लागलें. उत्तर हिंदुस्थानांतही माधवरावांनीं आपला चांगला अंमल बसविला. पानिपतच्या लढाईनंतर पेशव्यांचें नांव जें तिकडे ऐकिवांत येत नव्हतें तें त्यांनीं गाजविलें.

१७. माधवरावांच्या कारकीर्दीत रामशास्त्री प्रभुणे या एका थोर विद्वान गृहस्थाचा उदय झाला. त्यांचें मूळगांव सातारा जिल्ह्यांत माहुली क्षेत्र होतें. त्यांना लहानपणीं विद्याभ्यास करण्याची संधि न मिळाल्यामुळें ते विद्याहीन राहिले. पुढें त्यांनीं नानासाहेब पेशव्यांच्या घरीं शागीर्दाची नोकरी धरली. एके दिवशीं त्यांनीं माधवरावांचें स्नानाचें पाणी काढलें. माधवराव स्नानाकरतां

बसले असतां त्यांच्या अंगावर हा रामा शागीर्द पाणी ओतूं लागला. त्यावेळीं त्याचीं नजर माधवराव पेशव्यांच्या कानांत मोत्याची मोठी भिगबाळी होती तिकडे गेली. भिगबाळीचीं मोत्यें फारच सुंदर व पाणीदार होतीं. तीं पाहून रामा शागीर्दाचें लक्ष ती सुंदर भिगबाळी पाहण्यांत गुंतलें. तो त्या नादांत श्रीमंतांचें अंगावर पाणी घालण्याचें विसरला व भिगबाळी पहातच उभा राहिला. माधवराव, राम्या आतां पाणी घालील, थोड्या वेळानें घालील अशी वाट पहात बसले. परंतु राम्या शागीर्दाचें लक्ष भिगबाळीकडे होतें. असें पाहून माधवराव राम्याला ह्मणाले ' तुझें लक्ष माझ्या भिगबाळीकडे कां ? असली भिगबाळी मिळावयाला एक तर राज्य असावें लागतें किंवा एक तर विद्वानांचा शिरोमणी व्हावें लागतें. तुझ्या ठिकाणीं दोन्हींही गुण नाहींत. मग तुला असली भिगबाळी कशी मिळेल ? ' या गोष्टीनें रामा शागीर्दाला आपण जगांत कोणीच नाहीं असें वाटलें; जगांत जर राजा किंवा विद्वान असेल तरच त्याला मान व वैभव. या गोष्टीचा परिणाम त्याच्या मनावर झाला व त्यानें ती शागीर्दाची नोकरी सोडली. नंतर तो काशीला गेला. त्यानें तेथें बारा वर्षें मोठ्या कळकळीनें व मन लावून अध्ययन केलें व तो परत पुण्यास आला. तो पुण्यास नंतर मोठ्या विद्वानांत मोडूं लागला. पुढें पुण्यांतील बाळकृष्ण शास्त्री हे मृत्यू पावले, तेव्हां त्यांच्या जागेवर माधवराव पेशव्यांनीं रामशास्त्री प्रभुणे यांची नेमणूक केली. त्या वेळीं रामशास्त्री हे पुण्यांतील विद्वानांचे अग्रगण्य झाले. त्यांच्याकडे माधवरावांनीं न्यायखातें सोंपविलें. माधवरावांनीं त्यांना राम्याचें रामशास्त्री केलें ह्मणून माधवरावांचा त्यांना मोठा अभिमान वाटे. माधवरावांनीं दादासाहेबांना कैदेंत टाकलें ह्मणून रामशास्त्री यांना दादांचा पक्ष अन्यायाचा आहे असें वाटत होतें. ते शेवटपर्यंत माधवरावांचा पक्ष ह्मणजे राजपक्ष असें मानीत होते. त्यामुळें राजपक्षानें केलेलीं कृत्यें त्यांना न्यायाचीं वाटत होती.

१८. माधवराव यांचे मनांत हैदरवर स्वारीस जावयाचें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं त्रिंबकरावमामा यांस पुढें पाठविलें होतें. त्यानंतर ते स्वतः आपली फौज

घेऊन पुण्याहून निघाले. मजल दर मजल करीत ते कृष्णा तीरापर्यंत गेले. मोहिमेवर निघण्यापूर्वी त्यांची प्रकृति बरी नव्हती. कृष्णा तीरापर्यंत जातात न जातात तोंच त्यांच्या प्रकृतींत जास्त बिघाड झाला. म्हणून ते तेथूनच पुण्यास परत जाण्याकरतां मागें फिरले. पुण्यास परत येईपर्यंत दिवसेंदिवस प्रकृति जास्तच बिघडत गेली. निरनिराळ्या ठिकाणाहून पुष्कळ वैद्य आणले. रोगाची चिकित्सा करून वैद्यांनी निदान ठरविलें. या रोगाचें नांव राजयक्ष्मा म्हणजे क्षय रोग होय. तेव्हां माधवरावांनी मनानें ठरविलें कीं, आतां येथें पुण्यांत राहणें प्रशस्त नाहीं. थेऊरास श्रीगणपतीच्या चरणाजवळ जाऊन पडावें. तेथें गेल्यावर जो सोक्षमोक्ष व्हावयाचा असेल तो होईल.

१०. याप्रमाणें मनाचा निर्धार करून सरदार, मानकरी, हुजुरात, सरंजामी वगैरे सर्व लोकांना व कारभारी, मुत्सद्दी, दरकदार वगैरेंना सर्व फौजेसह थेऊरास येण्याचा हुकूम केला. अठरा कारखानेही थेऊरास पाठविले. नंतर माधवराव थेऊरास जाऊन राहिले. पेशव्यांची राजधानी त्यावेळीं थेऊर झाल्या-प्रमाणें वाटली. सर्व राज्यकारभार तेथेंच सुरू झाला. पुण्यास फक्त कैदेंत राघोबादादा व आनंदीबाई एवढीच राहिलीं. त्यांच्या कैदेचा बंदोबस्त मात्र उत्तम प्रकारें केला होता. थेऊरास गेल्यानंतर गणपतीची आराधना मांडली. निरनिराळीं अनुष्ठानें बसलीं. जप सुरू झाले. नवस केले गेले. परंतु माधवरावाच्या प्रकृतीला आराम पडला नाहीं. वैद्यांनीं आपल्या बुद्धीची, ज्ञानाची आणि अनु-भवाची पराकाष्ठा करून औषधें दिलीं. परंतु प्रकृतीला गुण असा न येतां ती दिवसेंदिवस जास्त भटकत चालली. हिंदुस्थानांतून गंगा विष्णु या नांवाचे नामांकित वैद्यही आणविले होते. पुण्याचे नामांकित लागवणकर वैद्यही होतेच. निरनिराळीं औषधें आलटून पालटून देण्यांत आलीं. गुण नाहीं. तेव्हां वैद्यांना विचारण्यात आलें कीं, 'श्रीमंतांना गुण कां येत नाहीं? तुमचीं औषधें या रोगावर जालीम दिसत नाहीत.' त्यावेळीं औषधांचा काय प्रभाव आहे हें दाख-विण्याकरतां एक मातीचें मडकें आणलें. त्याला खिळ्यानें चाळणीप्रमाणें भोकें पाडलीं. त्यांत पाणी ओतलें. त्याबरोबर त्या मडक्याच्या छिद्रांतून पाणी

झिरपूं लागलें. तेव्हां जें भस्म माधवराव यांना देण्यांत येत असे, त्याची एक पुडी त्या पाणी भरलेल्या मडक्यांत टाकली. कांहीं वेळानें तें मडक्यांतून झिरपणारें पाणी बंद झालें. माधवराव, रमाबाई वगैरे सर्वांनीं तें पाहिलें. त्यावेळीं वैद्यांनीं सांगितलें कीं, 'श्रीमंतांच्या फुफुसांना छिद्रें पडलीं आहेत. तीं बंद होण्याकरतां अशा जालिम भस्मादि औषधांची योजना सुरू आहे.' तें पाहून औषधादि क्रियेंत कांहीं दोष नाहीं, आपला भोग आहे तो भोगलाच पाहिजे; मृत्यू येणार असेल तर तो वैद्य टाळू शकत नाहींत, अशा भावनेनें माधवराव कालक्षेप करूं लागले.

२०. नारायणराव, पार्वतीबाई, सौ. रमाबाई, दुर्गाबाई वगैरे मंडळी थेऊराला आलीच होती. गोपिकाबाईंना माधवरावांच्या प्रकृतीची साद्यंत हकीकत गंगापुराला कळविली, परंतु त्या आल्या नाहींत. मातेचे आंतडें अत्यंत हळवें व कोमल असतें असें ह्मणतात. परंतु माधवराव मृत्यूच्या दारांत बरेच दिवस बसले असतांही गोपिकाबाईंच्या मनानें आपल्या पुत्राच्या भेटीला येण्याची धांव घेतली नाहीं. जी आई दीराचा सूड उगविण्याकरतां मुलाला चिथावणी देते व मुलाच्या कल्याणाच्या गोष्टी मागते, ती आपल्या मुलाच्या मृत्यूच्या प्रसंगींही थेऊरास येत नाहीं. हें पाहून, माधवरावांच्या मनाला काय वाटलें असेल? आजपर्यंत आईचें मन प्रसन्न ठेवण्याकरता तिच्या शद्वाप्रमाणें माधवराव वागले; आईच्या आज्ञेप्रमाणें दादासाहेब व आनंदीबाई यांचा अपमान केला; त्यांना कैदेंत ठेऊन त्यांची दुर्दशा केली; सदाशिवरावभाऊ हे पानिपतच्या लढाईंतून जिवंत परत येऊन उघडकीला आले असतां राजकारण साधावें ह्मणून त्यांना किल्यावर कैदेंत ठेवलें; त्यांची व पार्वतीबाईंची भेट होऊं दिली नाहीं; वगैरे वगैरे, अनेक गोष्टी त्यांनी आपल्या कारभारांत ज्या केल्या, त्या यावेळीं त्यांच्या डोळ्यांपुढें नाचूं लागल्या असतील. राज्यकारभारांतील त्यांच्या अतृप्त राहिलेल्या

---

[1] हा इतिहास पुढें तोतयाच्या बंडात येईल. एके ठिकाणीं सर्व मजकूर असावा ह्मणून त्या प्रकरणात तो दिला आहे. माधवरावानीं इ. स. १७६६ मध्यें त्यांना कैदेंत ठेवलें.

इच्छाही त्यांच्यापुढें उभ्या राहिल्या. ज्याप्रमाणें रोगाच्या वाढत्या बलानें शरीराला पीडा होऊं लागली, त्याचप्रमाणें मानसिक पीडा व व्यावहारिक राज्याची चिंता यामुळें त्यांचें मन त्रस्त झालें. त्यांना हाल सहन होईनात. या क्लेशांचा पगडा त्यांच्या मनावर एकादे वेळी एवढा होई की, खंजीर खुपसून घेऊन आत्महत्या करावी असें त्यांना वाटे. त्यानीं एकदोन वेळां आत्महत्या करण्याचा प्रयत्नही केला. परंतु सौ. रमाबाई यांनीं ते प्रसंग टाळले. सौ. रमाबाई या मोठ्या पतिव्रता होत्या. त्या त्यांच्या उशाला अष्टौप्रहर बसून राहत असत. त्याची तहान भूक मेली होती. झोपही डोळ्यावरची उडाली होती. एक क्षणही त्या माधवरावाना विसंबत नसत. उभयतांचें मोठें प्रेम होतें. पतिव्रता स्त्रीचें लक्षण कसें असतें हें त्या वेळीं लोकांना दिसून आलें. माधवरावांना मनातील विचार बोलून दाखविता येईनात, त्यामुळें त्याचा मनातल्या मनात कोंडमारा होऊं लागला. दुःखानें व त्वेषानें त्यांच्या अंगाची आग होऊं लागली. मरावे ह्मटले तर त्याना सौ. रमाबाई आत्महत्याही करूं देईनात. त्याचा माधवरावावर सक्त पहारा. त्याच्या डोळ्याला सतत पाणी. अशा स्थितींत माधवरावाना आत्महत्या त्या कशी करूं देणार? अशा प्रकारें माधवरावाचा कालक्षेप होऊं लागला. मनुष्य मरणाच्या दारांत एकदां बसला ह्मणजे त्याला त्या वेळीं न्याय अन्याय, पाप पुण्य हें सर्व आठवूं लागतें. दादासाहेबांच्या बाबतींत आपण अत्यंत अन्याय केला आहे असें त्याना वाटून त्यांनीं त्यांना कैदेंतून मुक्त करून येऊरास आणण्याविषयीं माणसे रवाना केलीं. या वेळीं माधवरावांना आपल्या खऱ्या कळकळीचीं व खऱ्या प्रेमाचीं माणसें कोण आहेत याची दृष्टि फुटली असावी असें दिसतें.

२१. क्षयाच्या विकारांत मनुष्याला शेवटपर्यंत चांगली स्मृति असते. या विकाराचे कित्येक रोगी बोलतां बोलतां प्राण सोडतात. माधवरावांची ही स्मृति अखेरपर्यंत राहिली होती. त्यामुळें त्यांच्या डोळ्यांपुढें सर्व गोष्टी नाचत होत्या. आजपर्यंत आपण केलेल्या कारभाराची वासलात लावावी ह्मणून कारभारी मंडळींना त्यांनीं बोलावणें पाठविलें. त्याप्रमाणें नाना फडनविस, मोरोबादादा

फडनविस, हरीपंततात्या फडके, त्रिंबकरावमामा पेठे, सखारामबापू, महादजीपंत गुरुजी, आबाजीपंत अण्णा, गोविंद शिवराम खासगीवाले, आनंदराव पानसे, विंचुरकर, पटवर्धन राजेबहादूर अशी सर्व थोर थोर मंडळी दरबारांत येऊन बसली. माधवराव त्या वेळीं अंगांत अंगरखा घालून, डोक्याला पागोटें व वरून शालनाम्याचा रुमाल बांधून पायांत विजार घालून बसले. त्या वेळीं श्रीमंतांनीं गोष्ट काढली कीं, ‘ आमचे कारभाराचे हेतु बहुतेक पुरते झाले. परंतु तीन गोष्टी मनांत राहिल्या. ’ त्यावेळीं नाना फडनविस व हरीपंत फडके अशा दोघांनीं श्रीमंतांस विनंति केली कीं, ‘ कोणत्या गोष्टी मनांत राहिल्या असतील तर आतां त्या बोलावयास मनांत संशय येऊं नये. सेवकांच्यांनीं पार व्हावयाजोग्या असल्यास रुकार देऊं. नाहींतर उगेंच राहूं. ’ असें ऐकताच श्रीमंत म्हणतात, ‘ पूर्वी भाऊसाहेब, विश्वासरावसाहेब, पानिपतांत गर्क झाले. तें वर्तमान ऐकून गिलच्यांचें पारिपत्य करण्यासाठीं तिर्थरूप दादासाहेब गेले. त्यांनीं पारिपत्य केलें. तथापि गिलच्यांचें पारिपत्य माझ्या मनाजोगें झालें नाहीं. ’ एवढें ते बोलले. हरीपंत तात्या यांस उद्देशून ते म्हणाले कीं, ‘ माझ्या आतां फक्त तीन अतृप्त इच्छा राहिल्या आहेत; १ गिलचे व हैदर यांचें पारिपत्य माझ्या मनाप्रमाणें झालें नाहीं, तें करणें, २ नारायणराव बाळ आहेत त्यांच्या संगोपनाची हमी देणें. ३ मला कर्ज झालें आहे तें फेडणें. या माझ्या तीन इच्छा कोण पुऱ्या करतो तें सांगणें. ’ यावर नाना फडनविस यांनीं छातीला हात लावून आपण त्या पुऱ्या करतो अशी हमी दिली. त्यावर माधवराव म्हणाले ‘ माझ्या हातचे रेखे गुंतले आहेत ते मला आतांच्या आतां परत आणून द्यावे ’ नानांनीं माधवरावांच्या तीनही इच्छा पुऱ्या करण्याची छातीला हात लावून हमी दिली तरी त्यांनीं नानांवर फक्त कर्जाचाच बोजा तेवढा टाकला. कारण इतके दिवस नानांनींच कारभार केला होता. अर्थात् एवढी कर्जाची एक इच्छा नानांना उद्देशून होती.

२२. कर्जपाणी, पैसा आडका, हा सर्व व्यवहार नानांच्या हातीं होता. तेव्हां पैशाचा व्यवहार भागविणें त्यांना प्राप्त होतें. हा कर्जाचा सवाल प्रत्यक्ष

आपणावर आहे हें नानांनी ओळखलें. तेव्हां स्वतःवरील बोजा दूर करून या वेळीं श्रीमंतांचीही मर्जी प्रसन्न करावी असें त्यांना वाटलें. ह्मणून त्यांनीं पेशव्यांचे पूर्वीचे सावकार रामचंद्र नाईक परांजपे, जे तेथें होते, त्यांना सांगितलें की, 'हीच वेळ आहे, श्रीमंतांचें मन प्रसन्न झालें पाहिजे. तुह्मीं सरकारी सावकारांना तुमचे नांवचे कर्जरोखे लिहून देऊन श्रीमंतांच्या नांवचे रोखे आतां परत आणून द्यावे'. रामचंद्रपंतांची श्रीमंतांच्या ठिकाणीं निष्ठा. शिवाय नाना फडनविसांचा शब्द मोडला तर पुढें काय आपत्ति ओढवेल कोण जाणे ही भीति. ह्मणून त्यांनीं ती गोष्ट कबूल केली. तेव्हां श्रीमंतांच्या सवालास नानांनीं उत्तर दिलें कीं, 'आपल्या कर्जाची हमी मी घेतों. श्रीमंतांनीं निर्धास्त असावें.' परंतु नाना हे कारस्थानी पुरुष. त्यांचा तरी विश्वास कोणी धरावा ? ह्मणून माधवराव ह्मणाले, 'माझ्या हातचीं खतें आणून माझ्या पुढें ठेवावी.' तेव्हां नानांनीं सावकारास बोलाविलें. त्यांना रामचंद्र नाईकाकडून पंचवीस लाखांचीं खतें लिहून द्यावयास लाविलीं व श्रीमंतांचीं खतें परत घेऊन त्यांच्या पुढें नेऊन ठेविलीं. माधवरावांना त्या वेळीं समजलें कीं, 'नानांनीं हा डाव केला. माझीं खतें परत आलीं, पण रामचंद्रपंतांचीं गुंतलीं. ह्मणजे तात्विक दृष्टीनें मी ऋणमुक्त झालोंच नाहीं. सावकारांच्या ऋणांतून सुटलों व रामचंद्रपंतांच्या ऋणांत पडलों'. पण गोष्ट होऊन गेली. तेव्हां त्याचें थोडें तरी परिमार्जन करण्याकरतां त्यांनी रामचंद्रपंतांना बोलाविलें व त्यांचा सन्मान करण्याकरतां त्यांस पालखीचीं वस्त्रें दिलीं. हा पालखीचा मान सरकारांतून मिळावयाचा असतो. हा सरदार वगैरे लोकांना दिला जाणारा मान यावेळीं रामचंद्र नाईक यांना दिला गेला. श्रीमंत लोक हा पालखीच्या वस्त्रांचा मान सरकारांतून मिळण्याकरतां लाखों रुपयांचा नजराणा श्रीमंतांना करीत असत. तेव्हां माधवरावांनीं आपल्या मनांत हा नजराणा समजून यावेळीं रामचंद्रपंतांचा असा सन्मान केला. यावेळीं नाईकांनीं नानांची अब्रू निभावून नेली, आणि माधवरावांचें कर्ज फेडून त्यांच्या मनाला समाधान उत्पन्न करून दिलें.

२३. या वेळेस हरीपंत तात्या फडके तेथें होतेच. त्यांस श्रीमंत बोलले, 'तुह्मी माझी सेवा एकनिष्ठपणें केली. तुह्मांस काय द्यावें ?' तेव्हां तात्यांनीं

हात जोडून विनंति केली कीं, 'जें स्वामी कृपा करून देतील तें घेईन;' असें ऐकतांच श्रीमंतांनी उत्तर केलें कीं, 'तुह्मांस गांव इनाम देईन अथवा महाल मागितले तरी देईन. परंतु माझे मागें तें चालणें कठीण. अनेक तऱ्हेचे कारभार होतील. तेव्हां तुम्हांस श्रम वाटतील कीं, श्रीमंतांनीं दिलें आणि आतां याला हे हिसके देतात. हें नीट नाहीं. यास्तव असें देणें देतों कीं, ज्यावर कोणाचा वारसा नाहीं.' हें ऐकून तात्यांनीं ती गोष्ट मान्य केली. त्या वेळीं श्रीवर्धनच्या देशमुखीपैकी आपल्या स्वतःचा हिस्सा माधवराव पेशव्यांनीं हरीपंततात्यांस बक्षिस देऊन त्याच्या सनदा करून दिल्या.

२४. राघोबादादा पुण्याहून थेऊरास आले. माधवरावांची व त्यांची भेट झाली. माधवरावांनीं कृतापराधाबद्दल दादासाहेबांची क्षमा मागितली. या दुखण्यांतून आपण जगत नाहीं असें त्यानीं त्यांना सांगितलें. उभयतांना भयंकर दुःख झालें. माधवरावांची ही स्थिति पाहून दादासाहेबांना गहिंवर आला. ते माधवरावांचे सर्व अपराध विसरून गेले. ते मनाचे मोठे सरळ. त्यांचे अंतःकरण फार मृदु. त्यांना हुंदके आवरेनात. उभयतांच्या भेटींतील दुःखाचा पहिला उमाळा थोडा ओसरल्यावर माधवरावांनीं त्यांना आपल्या दोन अतृप्त इच्छा सांगितल्या व दादासाहेबांनी त्या पार पाडाव्या अशी त्यांना विनंति केली. १ गिलचे व हैदर यांचें पारिपत्य करणें. २ नारायणरावाचा पुत्रवत् सांभाळ करून राज्यकारभार करणें. माधवरावांच्या या दोन्ही अखेरच्या इच्छा राघोबादादांनीं मान्य केल्या. तेव्हां माधवरावांनीं नारायणरावाचा हात त्यांच्या हातीं दिला व त्याचा सांभाळ करण्याकरतां त्यांना विनविलें. त्यावेळीं राघोबादादा म्हणाले, 'माधवा, मी नारायणाला बिलकुल अंतर देणार नाहीं. तें मूल माझें आहे. तुझ्या अतृप्त इच्छा मी पुऱ्या करीन.' याची खातरजमा म्हणून राघोबादादांनीं देवांच्या पंचायतनातील बाण उचलून माधवरावांच्या हातीं दिला. राघोबादादानीं बाण हातीं देऊन वचन दिलें हें पाहून माधवरावांस आनंद झाला. 'तुम्हीं माझे पश्चात् नारायणराव यास गादीवर बसवावें व तुमच्या मनाला येईल त्याप्रमाणें राज्यकारभार करावा, मनांत

कोणत्याच प्रकारें अढी ठेऊं नये. सर्व तुमचें आहे असें समजून नारायणरावावर दृष्टी देऊन राज्य चालवावें. तुह्मीं आतां नानासाहेबांच्या जागीं आहांत नारायणराव बाळ आहेत. त्यांना रक्षावें ' असें नाना प्रकारें माधवरावांनी दादासाहेबांस सांगितले. दादासाहेबांनीं आपणाला अंतःकरणापासून क्षमा केली, त्यांच्या अंतःकरणांत आतां आपल्याबद्दल कोणत्याही प्रकारची अढी राहिली नाहीं, व त्यांनीं आपल्या अतृप्त इच्छा पुऱ्या करण्याचेही वचन दिले, यामुळे माधवरावांना समाधान झालें. त्यांच्या मनाची हुरहुर कमी झाली. राघोबादादा वचन देतील त्याप्रमाणे वागतील याची त्याना खात्री होती. म्हणूनच त्यांनी वचन दिल्याबरोबर माधवराव निर्धास्त झाले. राघोबादादाचे वचन एकवचन होतें, पण कारस्थानी मुत्सद्यांचें वचन म्हणजे नेहमीच अनेक–वचन असते हे माधवराव पूर्ण जाणून होते.

२५. नंतर माधवरावांनी सखारामबापू यांस बोलाविले व सांगितलें कीं, ' आतां पुढे राज्य चालविणें तुह्मांकडे आहे. आजपर्यंत ज्या गोष्टी झाल्या त्या मनांत न आणतां निःसंशय राज्यकारभार चालवावा. ' त्यांनी त्या वेळीं त्यांचे हातीं नारायणराव यांस दिलें आणि ते ह्मणाले, ' हे लहान लेंकरूं. याने कांहीं पाहिलें नाहीं. याचा सांभाळ चांगला करून राज्यकारभार न्याय्य रीतीने चालवावा. आतां दुसरा अर्थ मनांत न आणतां काम करावें. ' हें ऐकून बापू श्रीमतांच्या पायास हात लावून बोलले, ' आतां मजकडून वाकडी वर्तणूक कांहीं व्हावयाची नाहीं. यांप्रमाणे सखारामबापूंची माधवरावांनी खातरजमा करून घतली.

२६. पुढे नाना फडनविस, हरीपंत फडके, रामचंद्र गणेश, गोविंद शिवराम, बाजीपंत अण्णा, महादजीपंत गुरुजी वगैरे मंडळींना बोलावून राज्याची निरवानिरव केली. सर्व नारायणरावसाहेब यांस निरवून माधवरावांनीं शके १६९४ नंदननाम संवत्सरे कार्तिक वद्य ८ बुधवार प्रातःकाळीं प्रहर दिवसास ता. १८ नोव्हेंबर सन १७७२ रोजीं थेऊरास श्रीगणपतीजवळ कैलासवास केला.[1]

---

१ पेशव्यांची बखर पान ८८.

२७. त्या वेळीं सौ. रमाबाई यांनींही सहगमन करण्याचा निश्चय केला. कारभारी मंडळींनीं त्यांना सती न जाण्याबद्दल पुष्कळ विनविलें. त्यांनीं सर्वांना स्पष्ट सांगितलें कीं, 'मला पाठीमागें राहावयाचें नाहीं' दादासाहेब व पार्वतीबाई यांनींही त्यांना पुष्कळ प्रकारें सांगितलें. परंतु त्यांचा निश्चय ढळला नाहीं. तेव्हां त्यांच्या सहगमनाची तयारी करण्यांत आली. सौ. रमाबाई यांनीं सौभाग्यवायनें वाटलीं. त्यांच्या मनांत कोणाला काय द्यावयाचें होतें तें त्यांनीं दिलें. सती जातेवेळीं त्यांनीं पुन्हां दादासाहेब व सखारामबापू या दोघांस नारायणरावांबद्दल पुष्कळ पुष्कळ सांगितलें. 'हें लहान लेंकरूं, याचा प्रतिपाळ तुह्मीं आतां चांगला करावा. दुजाभाव दाखवूं नये.' नंतर त्यांनीं सहगमन केलें. अशा तऱ्हेनें सद्गुणी, सदाचरणी, शीलवती व सती असें पेशवे घराण्यांतील अमोल स्त्रीरत्न आपली अखंड कीर्ति मागें ठेऊन आपल्या पतिसमवेत निजधामाला निघून गेलें.

२८. माधवराव पेशवे हे शहाणे व मुत्सद्दी होते असा त्यांचा नांवलौकिक होता. त्याचप्रमाणें ते तापट व उतावळ होते असेंही त्यांचें स्वभाववर्णन आहे. आपणाला लोकांनीं शूर ह्मणावें, आपली कीर्ति वाढावी, आपणाला मुत्सद्दी समजून लोकांवर आपली छाप बसावी असें त्यांना वाटत असे. या त्यांच्या स्वभावधर्माच्या आड राघोबादादा व सखारामबापू येत असत. हे जोपर्यंत राज्यकारभारांत वावरत होते, तोंपर्यंत माधवरावाचें तेज लोकांना दिसून आलें नाहीं. राघोबादादांना कैदेंत टाकण्याला गोपिकाबाईंच्या चिथावणीबरोबर हाही त्यांचा महत्त्वाकांक्षी स्वभाव कारणीभूत झाला. दादासाहेबांना कैदेंत ठेविल्यानंतर माधवरावाचें शौर्य लोकनिदर्शनाला येऊं लागलें. त्यांना स्तुतीची फार आवड असे. त्यामुळें त्यांना कोणी त्यांच्या विरुद्ध बोललेलें खपत नसे. हा त्यांच्या स्वभावांत दोषच होता. गंगोबा तात्या व दिनकर महादेव यांनीं दादासाहेबांची स्तुती केली व माधवरावाचे दोष दाखविले त्याबरोबर, त्यांचें मस्तक फिरून त्यांनीं त्यांचें स्वतः पारिपत्य करण्याचा भयंकर प्रमाद केला.

सखारामबापूंना तर त्यांनीं उघडच विचारलें कीं, 'दरबारांत माझें तेज पडावयाला काय केलें पाहिजे?' बापूंनीं आपणां स्वतःला घरीं बसविल्याशिवाय तेज पडणार नाहीं असें सांगितलें. तेव्हां त्यांची जहागीर चालवून माधवरावानीं त्यांना घरीं बसविलें. त्यानंतर दरबारात माधवरावांचें तेज पडूं लागलें. परंतु सखारामबापूंचा सल्ला मात्र ते मरेपर्यंत रात्रीं एकांतांत घेत असत. एकंदरींत राघोबादादा व सखारामबापू यांना घरीं बसविल्यानें माधवरावांचे तेज पडूं लागलें व त्यांची कीर्ति पसरूं लागली. स्वतःच्या कीर्तीच्या आड येणाऱ्या माणसांशीं माधवरावांना अर्थात् अन्यायानें व निष्ठुरपणानें वागावें लागे. प्रजेच्या कल्याणाकरतां ते न्यायी होते. पण स्वार्थाकरतां राघोबादादा, सदाशिवरावभाऊ, सखारामबापू वगैरे मंडळीविषयीं ते अन्यायीच झाले. त्यांना अन्यायानेच या मंडळींची मुस्कुटदाबी करून आपणाला पुढें आणून घ्यावें लागलें. यावरून राघोबादादांपेक्षां माधवराव हे शौर्यांत कमी दर्जाचे व सखारामबापूंपेक्षां मुत्सद्दीपणांतही ते कोत्या बुद्धीचे होते, हे निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

२९. माधवराव पेशव्यांचा स्वतःचा पक्ष-म्हणजे नानांचा पक्ष जो होता तो-राघोबादादा व सखारामबापू यांना कैदेत ठेविल्यानंतर बळावला. माधवराव यांच्या या पक्षांतील हरीपंत फडके, पटवर्धन, त्रिंबकरावमामा, रास्ते, शिंदे, होळकर वगैरे जे तरवारबहादर होते त्या सर्वांचे मिळून राघोबादादांच्या बंदिवासानंतर तेज पडूं लागलें. त्याचप्रमाणें सखारामबापूंच्या कैदेनंतर नानांचें तेज पडूं लागलें. यामुळे आपलें स्वतःचें तेज पडण्याकरतां नानांच्या पक्षानें या राघोबादादांच्या पक्षाचा शक्य तेवढा द्वेष केला. आपला पक्ष बळकट करणे व राघोबादादांचा पक्ष कमकुवत करणे, एवढेंच नव्हे तर, साधेल तेव्हा त्याचा नाश करणें हा नानांच्या पक्षाचा अंतिम हेतु असे. माधवराव जिवंत असेपर्यंत नानांनीं आपला एक स्वतंत्र पक्ष आहे असे कोणासच भासूं दिलें नाहीं. माधवरावांचा पक्ष म्हणूनच ते आपला पक्ष चालवीत होते. परंतु माधव-

रावांच्या मृत्यूमुळें या माधवरावांच्या पक्षाचें नानांचा पक्ष यांत रूपांतर झालें. या पक्षाचें व राघोबादादांच्या पक्षाचें कधींही जमणें शक्य नव्हतें. नानांच्या पक्षानें माधवरावांचे हितकर्ते असें पांघरूण घेतल्यानें तो पक्ष माधवरावांना प्रिय व आपला असा वाटूं लागला. या पक्षाचे सूत्रधार नाना फडनविस होते. त्यांनीं माधवरावांची म्हणून सर्व कारस्थानें करून त्यांचीं सर्व सूत्रें आपल्या आधीन ठेवलीं. राघोबादादांच्या पक्षाविरुद्ध नानांच्या पक्षाची ही एक स्वतंत्र सत्ता निर्माण झाली. त्या सत्तेनें राज्यकारभारांत व पेशव्यांच्या गृहकलहांत इतकें प्राधान्य मिळविलें होतें कीं, माधवरावांच्या पश्चात् स्वतः माधवराव यांच्या इतकीच नानांच्या पक्षाची सत्ता बलवत्तर होती.

३०. माधवरावांना क्षय झाल्यामुळें ते थेऊरास आले व तेथें राजकारभाराची निरवानिरव करूं लागले. क्षयाच्या विकारांत मेंदू फार तेजस्वी व तल्लख असतो. देहानें मनुष्य क्षीण होतो. परंतु त्याचे मन पूर्ण कार्यक्षम असतें. माधवरावांना पेशव्याच्या राज्याचें पुढें कसें होईल ही काळजी लागली होती. आपण या दुखण्यांतून बरे होत नाहीं हेंही त्यांना समजून चुकलें होतें. तव्हां पेशव्यांच्या राज्याची निरवानिरव व घराण्याची कीर्ति, राज्याची सांप्रतची परिस्थिति या दृष्टीनें करावयाची होती. सामान्य मनुष्य मरणापूर्वीं आपल्या इच्छेप्रमाणें म्हणजे जन्मापासून मरण कालापर्यंत मनावर जसे बरेवाईट परिणाम झाले असतील त्याप्रमाणे आपल्या मिळकतीचें मृत्युपत्र करतो. त्या मृत्युपत्रावरून त्या मनुष्याचें खरें प्रेम कोणावर होतें, त्याच्या खऱ्या जिव्हाळ्याचें मनुष्य कोणतें, त्याच्या प्रसगाला खरें कोण उपयोगी पडलें, कोणावर त्याचा खरा विश्वास होता, आपल्या मिळकतीचा उपभोग घेण्याचा खरा हक्क कोणाचा आहे, वगैरे, वगैरे, सद्विचारपरिपोषक आणि सत्यान्वेशी गोष्टी दिसून येतात. मृत्युपत्रांत मनुष्याच्या खऱ्या अंतःकरणाचें प्रतिबिंब असतें. यावरून पहातां माधवराव यांनीं आपल्या राज्याची जी निरवानिरव केली, त्या व्यवस्थेंत माधवरावांच्या

अंतःकरणाचें पूर्ण प्रतिबिंब आहे, या दृष्टीनें त्यांच्या निरवानिरवीकडे लक्ष देऊन विचार केला पाहिजे. शाहु छत्रपतीप्रमाणें माधवरावांना मरण-कालीं भ्रम झाला नव्हता. ते राज्यकारभाराची निरवानिरव करण्याकरतां दरबारांत अंगरखा, पागोटें, विजार वगैरे घालून येऊन बसले व आपल्या अतृप्त इच्छा त्यांनीं पुढें मांडल्या. त्यावरून त्याची बुद्धि पूर्ण निर्दोष व स्वतःवरील जबाबदारी ओळखण्याच्या स्थितींत होती यांत संशय नाहीं. शिवाय त्यांनीं आपल्या इच्छा सरदार व मुत्सद्दी--कारभारी लोकांपुढें पहिल्यानें मांडल्या. त्याअर्थी माधवरावांच्या त्या स्वतःच्या मनाशीं विचारविनिमय करून ठरविलेल्या होत्या. त्यांत परकीय मनुष्याचा म्हणजे त्यांच्या पक्षांतील इतर लोकांचा संबंध नव्हता. कारण त्यांच्या पक्षांतील लोकांपुढेंच त्यांनीं त्या पहिल्याने मांडल्या होत्या. यावरून त्यांच्या त्या स्वतःच्याच विचाराच्या होत्या यात संदेह नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं, मरणाच्या दारांत मनुष्य उभा राहिला म्हणजे त्याच्या हातून सहसा अन्याय होत नाहीं. त्या वेळीं तो आजपर्यंत आपण केलेला अन्याय सुधारून घेण्याचाच प्रयत्न करीत असतो. अर्थात् हा स्वभाव सद्भावी माणसाचाच असतो. माधवराव हे सद्भावी नव्हते असें कोणीं म्हणू शकणार नाहीं. मरणानंतरची व्यवस्था करणे असेल तर ती आपल्या प्रेमळ पत्नीच्या विचारें केली जाते. सौ. रमाबाईवर माधवरावांचें किती प्रेम होते व ते बिकट प्रसगीं आपल्या पत्नीचा कसा सल्ला घेत होते, व त्यांना तो त्यांच्याकडून कसा योग्य मिळत होता हें इतिहास-प्रसिद्धच आहे. माधवरावांच्या मृत्यूच्या वेळीं जी राज्यव्यवस्था करण्यांत आली त्यांत माधवरावांनीं आपल्या प्रेमळ पत्नीचा सल्ला घेऊन त्याप्रमाणें निरवानिरव केली. अर्थात् या निरवानिरवींत राजकीय धोरण जसें पाळलें गेलें असेल तसेंच सौ. रमाबाई यांच्या सद्गुणी स्वभावामुळें व्यावहारिक आणि कौटुंबिक धोरण राखलें गेलें असेल यांत संशय नाहीं. या दृष्टीनें माधवराव पेशवे यांनीं जी शेवटीं आपल्या राज्याची निरवानिरव केली त्याचा विचार करणें भाग आहे.

३१. राघोबादादांना कैद केल्यानंतर माधवरावांनीं राज्यकारभाराचा पूर्ण स्वेच्छेनें चार वर्षें अनुभव घेतला. त्या कालांत त्यांनीं आपल्या पक्षांतील लोकांचाही अनुभव घेतला. तेव्हां त्या अनुभवामध्यें त्यांच्या पक्षांतील लोकांचा जर त्यांना चांगला अनुभव आला असता, तर त्यांनीं आपल्या मरणकालीं राज्यकारभारांत क्रांति घडवून आणली नसती. कारण राज्याची निरवानिरव करणें म्हणजे ती राज्याच्या हिताचीच असली पाहिजे, असें प्रजाहितदक्ष राजाला वाटणें स्वाभाविक होतें. तेव्हां नानांचा पक्ष हा सदाचरणी, न्यायप्रिय, प्रजाहितदक्ष, स्वामिभक्त आणि निःस्वार्थी होता, असा अनुभव माधवरावांना आपल्या निष्कंटक राज्यकारभाराच्या वेळीं आला असता तर, त्यानीं नारायणराव याना गादीवर बसवून पूर्ववत् राज्यकारभार नाना फडनविस यानीं करावा असें मनांत ठरविलें असतें. आपल्या मागे राघोबादादा बंड करतील याची काळजी करण्याचें त्यांना कारण नव्हते. कारण राघोबादादांना कैदेत ठेवलें होतें. त्याच्या पक्षाचे समजले जाणारे सखारामबापू हेही कैदेंतच होते. दादासाहेबांच्या इतर कांहीं पक्षपाती लोकांचें पारिपत्य करून त्यांना डोंगरीकिल्ले दाखविलेच होते त्यामुळे राघोबा भरारी यांची स्थिति पंख तुटलेल्या राघूप्रमाणें झाली होती. ते बंड करतील ही धास्तीच बाळगण्याचें मुळीं कारण नव्हतें. शिवाय नानांच्या पक्षाच्या लोकांनीं आपल्या कर्तबगारीनें चार वर्षें राज्यकारभार केलाच होता. तेव्हां छत्रपति शाहुमहाराजांनीं नानासाहेबाना ज्याप्रमाणें कुलअख्त्यारानें राज्यकारभार करावा असें सांगितलें, त्याप्रमाणें त्याचाच उच्चार माधवरावांनीं 'मम' म्हणून केला पाहिजे होता. पेशव्यांच्या राज्यकारभाराबद्दल त्यांना चिंता अगर काळजी बाळगण्याचें कारण नव्हतें. शिवाय माधवरावांच्या सर्व अतृप्त इच्छा पूर्ण करण्याचें नाना फडनविस यांनीं छातीला हात लावून अभिवचन दिलें होतें. तेव्हां खरें पाहिलें तर त्याच वेळीं माधवरावांनी 'नारायणराव हे बाळ आहेत, त्यांना राज्यकारभार करण्याची अक्कल नाहीं, ते द्वाड, संशयी

व मित्र आहेत; असें असले तरी ते राज्याचे वारस आहेत. तेव्हां त्यांना गादीवर बसवून व राघोबादादाना कैदेंत ठेवलें आहे, त्यांचा तसाच कारागृहवास अखंड चालवून, व त्यांना मुलेंबाळें झालीं तरी पेशवेपदावर त्यांचा कोणत्याही प्रकारचा हक्कसंबंध नाहीं असें जाणून कुलअख्त्यारीनें तुह्मीं राजकारभार चालवावा ' असें नाना फडनविस याना सांगून व तशा त्यांना सनदा करून दिल्या पाहिजे होत्या. माधवराव पेशवे हे तशा सनदा करून देतील असें नानाना वाटत असावें अगर त्यांनीं त्या तशा करून द्याव्या म्हणूनच त्यानीं छातीला हात लावून आपली कायकी जगजाहीर केली होती. माधवरावांच्या तीन अटी म्हणजे त्याच्या अतृप्त इच्छा, त्यानी ज्या सांगितल्या, त्या सामान्य नव्हत्या. त्याला शौर्याची, पैशाची व सर्व राज्याचा संभाळ करण्याच्या शक्तीची, युक्तीची वगैरे गुणांची जरूरी होती. गिलच्यांचे पारिपत्य करून पानिपतांतील गतवैभव व गतकीर्ति पुन्हा मिळविणे ही गोष्ट केवळ लेखणीच्या फटकाऱ्यानें होणारी नव्हती. हैदरचा पराभव करून माधवरावाच्या हातून जी गोष्ट झाली नाहीं ती करणें म्हणजे केवळ कलमबहादुरीच्या सामर्थ्यावर होणारी गोष्ट नव्हती. त्याला तरवारबहादुरीची आणि निढावलेल्या संग्रामवीरत्वाचीच आवश्यकता होती. असें असता या माधवरावाच्या इच्छा तृप्त करण्याची हमी नानानीं घेतली. शिवाय नारायणरावांचा हट्टी स्वभाव होता. राजहट्ट, बालहट्ट व स्त्रीहट्ट हे तीन हट्ट पुरविणे फार कठीण. परंतु राजहट्ट आणि बालहट्ट पुरवून नारायणरावाचें संगोपनही करण्याचें, स्वतःला अपत्यप्रेम माहीत नसतांही, नानांनी अभिवचन दिलें. पंचवीस लाख रुपयाच्या कर्जाबद्दल त्यानीं तेथल्या तेथेंच एकाची टोपी दुसऱ्याच्या डोक्यावर ठेवून कर्जफेड केली व बाकीच्या अतृप्त इच्छा फलद्रूप करण्याचा विडा प्रत्यक्ष कार्याला सुरवात केलेली दाखवून उचलला, आणि आपण सर्वांपेक्षा कुलअख्त्यारीला लायख असल्याचें सर्वांपुढे जाहीर केलें. यावरून कुलअख्त्यारीची नानाची मागणी होती असेंच ठरते.

३२. नाना फडनविस हे माधवरावांचे बालमित्र. गोपिकाबाईंचा त्यांच्यावर विश्वास आणि मेहेरनजर. त्रिंबकरावमामांचा त्यांच्यावर लोभ. इतर दरबारी मंडळींचा नानांवर विश्वास. असें असतांना नारायणरावांचा प्रतिपाळ नानांच्या कडून होईल कीं नाहीं याचा विचार माधवरावांना करण्याचें कारण नव्हतें. अशा सर्व उघड उघड गोष्टी असतांना, व स्वतः नाना फडनविस या सर्व गोष्टींचा बोजा आपल्या शिरावर घेऊन कार्यभाग उरकून नेण्याला पूर्ण तयार असतांना, माधवरावांनीं ज्याअर्थीं त्यांच्यावर नारायणरावांचा प्रतिपाळ करण्याचें व गिल्चे आणि हैदर यांचें पारिपत्य करण्याचें सोंपविलें नाहीं, व राज्यकारभार त्यांच्या स्वाधीन न करतां, तो आजपर्यंत त्यांना वाटणाऱ्या त्यांच्या शत्रूपक्षाच्या ताब्यांत त्यांनीं दिला, त्याअर्थीं लोकांना जसें दिसत होतें व माधवरावांना जसें तें वाटत होतें तसें तें खात्रीनें मुळांत नव्हतें, हीच गोष्ट सिद्ध होतें. माधवरावांना इतके दिवस नाना जसे दिसत होते तसे ते त्यांना मरणकालीं ह्मणजे त्यांना दिव्य दृष्टि फुटल्यानंतर दिसले नाहींत. त्याचप्रमाणें राघोबा-दादांच्याकडे ते ज्या दृष्टीनें पहात ती दृष्टीही त्यांची शेवटीं राहिली नाहीं. अखेर त्यांच्या मरणकालच्या दृष्टीला परस्परविरुद्ध गोष्टी दिसूं लागल्या. आणि त्या दृष्टीप्रमाणें त्यांनीं कारभाराची निरवानिरव केली. बाह्य दृष्टीनें जें दिसतें तें अंतर्यामीं तसेंच असतें असा सिद्धांत नाहीं.

३३. माधवरावांना संतती नाहीं. त्यामुळें नारायणरावांवर त्यांचें फार प्रेम. सौ. रमाबाई या आपल्या लहान दीरावर पुत्रासमान प्रेम करीत होत्या. सख्खा असा तोच एक अंकूर राहिल्यामुळें त्याच्यावर सर्वांची मर्जी, त्याला तळ हातावरील फोडाप्रमाणें जतन केलेलें, त्याचे सर्व हट्ट पुरविलेले, माधवरावांच्या मायेचा तो एकच अवशेष राहिलेला, असे नारायणराव हे होते. अशा स्थितींत आपल्या मरणकालीं माधवरावांनीं, राघोबादादा हे स्वार्थी, राज्यलोभी, दुष्ट, खुनी, कृतघ्न असे जर असते तर त्यांच्या हातीं त्यांनीं नारायणरावाला दिलें असतें काय? मरणाची पायरी चढतांना गरीब गाय कोणी कसायाला दान करूं शकेल काय? त्या समयीं तिजोरीच्या किल्ल्या

चोराच्या हवालीं कोण करील ? असें करणें मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध आहे, मानवी कृतीला सोडून आहे. असें असतां कांहीं इतिहासकार तसा तर्क करतात. पण तो सुतर्क नसून खात्रीनें कुतर्कच आहे.

३४. राघोबादादांनीं लहानपणापासून माधवरावांना अंगाखांद्यावर खेळविलें. त्यांचे लाड केले. नानासाहेबांच्या मृत्यूनंतर त्यांना नजरकैदेंत ठेऊन सुद्धां कसें दरबारी थाटानें वागविलें हें इतरांना कदाचित माहीत नसेल, पण माधवरावांच्या अंतःकरणाला तें पूर्ण अवगत होतें. आनंदीबाई कशा आहेत, त्यांच्या स्वभावही कसा आहे, त्या विषप्रयोग करणाऱ्या किंवा खुनी वृत्तीच्या आहेत कीं काय, हेंही माधवरावांना पूर्ण माहीत होतें. राघोबादादा स्त्रैण आहेत किंवा कसे आहेत ह्याचेंही ज्ञान त्यांना होतें. सौ. रमाबाई यांचा या बाबतींतील अनुभवही माधवरावांपेक्षां कांही कमी नव्हता. किंबहुना जास्तच होता. आनंदीबाई व रमाबाई यांचा विशेष लोभ होता. त्यांच्यामध्यें कलह कधी झाला होता याचा कोठें उल्लेख नाहीं. उलट आनंदीबाईंच्या मुलीवर—चि. दुर्गाताईवर—माधवरावांसुद्धां सर्वांचे फार प्रेम होतें. ती त्यांच्या जवळच राहत असें. नारायणरावांच्या पत्नीचा—सौ. गंगाबाईंचा—त्या मुलीवर फारच लोभ होता. नारायणराव स्वतःही त्या मुलीवर भारी प्रेम करीत होते. एकंदरींत दादासाहेब व आनंदीबाई यांच्याबद्दल माधवराव किंवा नारायणराव अगर त्यांच्या बायका यांचें वितुष्ट नसून उलट त्यांच्याबद्दल त्यांना प्रेम व आदरच वाटत होता. नारायणराव हट्टी व बाळ असल्यानें त्यांचा प्रतिपाळ राघोबादादाच करूं शकतील, इतर कोणाकडून तो होणार नाहीं या पूर्ण विश्वासानेंच माधवरावांनीं आपल्या मरणसमयीं दादासाहेबांच्या हातीं नारायणरावांचा हात देऊन आपल्या जबाबदारींतून ते मुक्त झाले.

३५. नाना फडनविसांची वणिक् वृत्ति होती. राजाच्या क्षत्रियवृत्तीचा त्यांच्या ठिकाणीं लवलेश नव्हता. कुलअख्त्यारीनें राज्यकारभार करावयाला क्षत्रियांची निःपक्षपाती व उदारवृत्ति 'असावी लागते. तरच राज्याचीं सर्व कामें बरोबर चालतात. एकाची टोपी दुसऱ्याच्या डोक्यावर चढविणें किंवा

क्षुल्लक बाबतींत मोठ्या माणसांचा अपमान करणें हें राजनीतीचें शील नाहीं. आपला पक्ष बलवत्तर करण्याकरतां दासीपुत्रांना अगर एकाद्या सामान्य शिलेदाराला पिढीजाद मोठमोठया दौलतीची मालकी अन्यायानें देवविणें हाही खरा राजधर्म नव्हे. ही स्वार्थी वणिग्वृत्ति आहे. शिवाय नानांच्या पक्षाच्या उत्पादक, माधवरावांच्या प्रत्यक्ष मातोश्री गोपिकाबाई या माधवरावांच्या मरण-कालीं त्यांच्या प्रत्यक्ष बोलावण्याचा अव्हेर करून आल्या नाहींत, तेव्हां आईचें अंतःकरण कसें आहे याचाही अनुभव माधवरावांना आलाच होता. नानांनीं स्वामिभक्त ह्मणून ठरविलेले व अन्यायानें माधवरावांनीं त्यांना सरदार बनविलेले महादजी शिंदे यांचाही अनुभव दादासाहेब ह्मणत होते त्याप्रमाणें आलाच होता. इ. स. १७६९ मध्यें हिंदुस्थानच्या स्वारीकरतां माधवरावांनीं विसाजी-कृष्ण बिनिवाले यांना मोहिमेचें प्रधानत्व देऊन त्यांच्याबरोबर शिंदे, होळकर वगैरे सरदारांना जाण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें सर्व सरदार आपापली फौज घेऊन पुण्याचा तळ उठवून मोहिमेवर गेले. महादजी शिंदे मात्र पुण्याहून निघाले नाहींत. एके दिवशीं माधवराव घोड्यावर बसून थेऊरास जात असतां त्यांनीं महादजीचा तळ अद्यापि पुण्यासच असलेला पाहिला. तेव्हां त्यांनीं शिंद्यांना बोलावून आणून ताकीद दिली की, ' मी थेऊराहून परत येईपर्यंत जर तुमचा तळ मला हाललेला दिसला नाही, या ठिकाणीं मला जर एक तंबू शिल्लक राहिलेला दिसेल, तर याद ठेवा. छावणी लुटून फस्त करीन. आणि जहागीर हिसकावून घेईन. ' याप्रमाणें माधवरावांनीं शिंद्यांना तंबी देतांच त्यांनीं आपल्या फौजेचा तळ तावडतोब उचलला. गोपाळराव पटवर्धन हेही महादजीप्रमाणें नानांच्या पक्षाचे एक आधारस्तंभ होते. त्यांनींही माधव-रावांचा एकदां आज्ञाभंग केला होता. त्यामुळें त्यांच्यावर माधवरावांनीं जप्तीचा हुकूम काढला होता. याचा भावार्थ एवढाच कीं, जोंपर्यंत माधवराव डोळ्यांत तेल घालून काम पहात होते, तोंपर्यंतच नानांच्या पक्षाचे स्वामीभक्त ह्मणविणारे सरदार आज्ञा मानीत होते. मालकाचें थोडेंसें दुर्लक्ष झालें ह्मणजे हेच स्वामीभक्त ह्मणविणारे सरदार मालकावरही उलटावयाला कमी करणार नाहींत हा अनुभव माधवरावांना वरील गोष्टीवरून आलाच होता.

३६. वरील सर्व साधकबाधक गोष्टींचा माधवराव व सौ. रमाबाई यांनीं शांत मनानें विचार केला असला पाहिजे. यावेळीं नारायणरावांचें वय १७ वर्षांचें होतें. माधवराव गादीवर बसले त्या वेळीं त्यांचें वयही तेवढेंच होतें. विश्वासराव पानिपतच्या लढाईला गेले त्या वेळी त्यांचेंही वय जवळ जवळ एवढेंच होतें. असें असतां नारायणराव बाळ आहेत, त्यांना संभाळावें असें जें वरचेवर राघोबादादा व सखारामबापू यांना सांगण्यांत आलें याचा अर्थ काय? ते बाळ म्हणजे सात आठ वर्षांचे अगदीं लहान नव्हते. यांचें लग्नही झालें होतें. मग असें असतां, त्यांच्याबद्दल जें 'बाळ, बाळ' म्हणून सांगण्यांत येत होतें, त्याचा अर्थ एवढाच कीं, श्रीमंताचें मूल मूर्ख, अविचारी, व्यवहारशून्य, नाठाळ असें असलें म्हणजे त्याला 'बाळ' म्हणावयाचें, व तें गरिबाचें असलें तर त्याला वरील विशेषणांनीं उघड संबोधावयाचें अशी व्यावहारिक पद्धत असते.

३७. माधवरावांनीं नारायणरावाचीं लक्षणें नीट बारकाईनें पाहिलीं होतीं. त्यांचा स्वभाव विशेष संशयी असे. माधवराव मोहिमेवर जातांना नारायणरावांना समागमें घेत असत. एकदां मंगळवेढ्यास स्वारी गेली असतां, एके दिवशीं राहुटींत माधवराव बोलत बसले होते. तोंच नारायणराव स्नान करून तेथें आले, आणि धोतर नेसूं लागले. धोतर नसून पुरें होतें न होतें, तोंच त्यांनीं सोंवळें मागविलें व तें नेसलें. हें माधवराव यांनीं पाहिलें; तेव्हां ते नारायणरावांना रागें भरले. 'तुला इतक्यांत विटाळ कशाचा झाला? विटाळ व्हावयाला राहुटीच्या कनाती लहान आहेत कीं काय? याचा स्वभावच तसला आहे. फार च्छांदस आहे' असें रागें भरलेलें ऐकून पुरुषोत्तमराव दाजी म्हणाले, 'श्रीमंतांनीं सांभाळून घ्यावें.' तेव्हां माधवराव बोलले 'याचे कपाळीं राज्य नाहीं.' माधवरावांनीं नारायणरावाचे गुण पाहून या प्रमाणें आपलें मत ठरविलें होतें. नारायणरावांच्या अंगीं, राज्याला जे गुण पाहिजेत ते नाहींत, राज्य सांभाळण्याची अक्कल, दूरदर्शीपणा व समंजसपणा अंगीं नाहीं. सतरा वर्षें झालीं तरी नारायणराव असाच ढ राहिला, अगदीं

हलक्या लोकांबरोबर स्नेह, हुजरे लोकांत खेळणें बागडणें, अविचारानें वाटेल तें करणें, दरबारांत येण्याचा कंटाळा करणे, वगैरे सर्व लक्षणें राज्य-पदाला पात्र नसलेली नारायणराव यांच्या अंगीं आहेत, हें पाहून व अनुभव घेऊनच त्यांनीं दाजीजवळ वरील उद्गार काढले होते. नारायणरावांच्या कपाळीं राज्य नाहीं हें माधवरावाचें ज्ञान ज्योतिषी नव्हतें तर तें अनुभवाचें होतें.

३८. नारायणराव भित्रेहि होते. राजाच्या ठिकाणीं भित्रेपणा नसावा असें माधवराव यांना वाटत होतें. भिऊन जो पाठ दाखविणारा तो राजा कसला? नारायणरावांच्या अंगीं भित्रेपणा होता. एके दिवशीं पुण्यास गुलटे-कडीजवळ हत्तींची टक्कर होती. ती पहावयास माधवराव हे नारायणरावांना बरोबर घेऊन गेले होते. त्यांच्या शेजारीं तमाम मानकरी बसले होते. बाजूनें बरीच मंडळी उभीही होती. लढतां लढतां एका हत्तीनें लढत सोडून मोहरा फिरविला, व ही मंडळी बसली होती तिकडे येऊं लागला. त्या वेळीं कांहीं मंडळी पळूं लागली. हें पाहून नारायणरावही आपले जागेवरून उठून पळूं लागले. त्या वेळीं माधवराव यांनीं त्यांचा हात धरून त्यांना खालीं बसविलें आणि म्हणाले, 'तुम्हीं असे पळाला तर भावी इतिहासकार तुमच्याबद्दल काय लिहून ठेवतील?' इतक्यांत आपाजीराव पाटणकर यांनी हत्तीच्या सोंडेवर कट्यार मारली व त्याला परत फिरविलें. या लोकप्रसिद्ध गोष्टीचा भावार्थ एवढाच की, नारायणरावाच्या ठिकाणीं राजाला जरूर असलेले गुण नव्हते. म्हणून अशा बाळाचीं हीं सर्व लक्षणे पाहून माधवराव यांनीं ठरविलें होतें कीं, या बाळाच्या नशिबीं राज्य नाहीं.

३९. या सर्व गोष्टीचा विचार करूनच माधवरावांनीं दादासाहेबांना कैदेतून मुक्त करून, त्यांच्या स्वाधीन नारायणरावांना केलें व सर्व राज्याचा कारभार कुलअख्त्यारीनें दादासाहेबांना दिला. सखारामबापूंना कारभारी नेमलें. अशी शेवटीं माधवरावांनीं पेशवाईच्या राज्याची निरवानिरव केली. सौ. रमाबाई यांनीं सती जातांना याच गोष्टींची पुनरावृत्ति केली. अशा-प्रकारें जो अधिकार राघोबादादांना मिळाला तो राजाज्ञेनें व्यवहाराला धरून व

राज्याच्या आणि राजाच्या कल्याणाच्या दृष्टीनें योग्य असाच मिळाला. राघोबादादांना भिक्षा मागून किंवा कोणाचा वशिला लावून तो मिळाला नव्हता, अगर त्यांनी स्वतः कोणतेंही कपटकारस्थान निर्माण करून तो मिळविला नव्हता. गोपिकाबाई, नाना फडनविस वगैरे मंडळींच्या मनाविरुद्ध केवळ सदसद्विवेक बुद्धीला न्याय्य वाटलें ह्मणून माधवरावांनीं तो अधिकार राघोबादादांना दिला. असा हा न्यायदत्त अधिकार काढून घेणें अगर तो काढून घेण्याचा प्रयत्न करणे हें अधर्माचें, अनीतीचें व अन्यायाचेंच द्योतक होतें; वरील गोष्टी ध्यानांत घेतल्यानें हें स्पष्ट दिसून येईल.

४०. माधवरावांनीं या व्यवस्थेनें नाना फडनविसांच्या तोंडांत पडणारी अमृताची धार राघोबादादांना पाजली, असें नानांच्या कारस्थानी पक्षाला वाटलें. गोपिकाबाईंना ही हकीकत समजल्यानंतर त्यांनीं आकाश पाताळ एक केलें असेल, हें सांगण्याची जरूरी नाहीं. त्रिंबकरावमामा, शिंदे, होळकर, पटवर्धन, रास्ते वगैरे लोकांची छाती धडधडूं लागली. राघोबादादा आतां कोणाकोणाचा सूड घेतात, कोणाकोणावर गुन्हेगारी लादतात, याची भीति त्यांना वाटूं लागली. जो तो आपापली पापें आठवून मनांत झुरूं लागला. नाना फडनविस यांच्या स्वभावाची जात बिबळ्या वाघाप्रमाणें होती. भीतीच्या प्रसंगीं हा वाघ गवतांत असा दडून बसतो कीं, त्या वेळीं गवताची एक काडीही हालूं देत नाहीं; पण निर्भयतेचा काल येतांच तो सांपडेल त्या जनावरांच्या मुंड्या मुरगळण्यास कमी करीत नाहीं. नाना फडनविस याच स्वभावाचे होते. ते राज्यकारभाराचे वरील सर्व प्रकार पाहून भग्नहृदयी झाले नाहींत. त्यांनीं विनयाचें पांघरूण पांघरलें, आणि त्याच्या आड राहून पुढें आपल्या कपटकारस्थानाचा डाव कसा टाकता येईल याचा त्यांनीं गुप्त रीतीनें प्रयत्न चालविला.

माधवरावांच्या मरणानंतर नारायणरावांनीं त्यांची उत्तरक्रिया केली. तेरा दिवसांनंतर दादासाहेब नारायणरावास बरोबर घेऊन पुण्यास आले. थेऊरास गेलेली सर्व मंडळी लवाजम्यानिशीं पुण्यास परत आली. अशा प्रकारें माधवरावांच्या कारकीर्दीचा शेवट झाला.

# प्रकरण १० वें.

# जंबुकाचा सांपळा.

## इ० स० १७७२.

१. राघोबादादा व नारायणराव यांचें सलोख्याचें वर्तन.—२. राघोबादादांनीं नारायणराव यास छत्रपतींकडून पेशवाईची वस्त्रें देवविलीं. राघोबादादा छत्रपतींचा सन्मान करतात. नवीन कारभारी मंडळ स्थापन होतें.—३. राघोबादादांनीं छत्रपती रामराजे यांची कैदेंतून मुक्तता केली.—४. छत्रपती राघोबादादांना पेशवाईचीं वस्त्रें अंगिकारण्याबद्दल सांगत असतां राघोबादादांनीं तीं नाकारून नारायणरावांच्या नांवें दिलीं.—५. नारायणरावांचें स्वभाववर्णन. नारायणरावांवर फक्त राघोबादादाचा धाक होता.—६. नारायणराव व राघोबादादा यांची परस्परांशीं वागणूक. दुर्गाताईच्या लग्नाची वाटाघाट. पार्वतीबाईना सोंवळी करून घेण्याचा प्रश्न.—७. राघोबादादाची मुलगी दुर्गाताई हिचें लग्न नारायणराव पेशवे स्वतः पुढाकार घेऊन मोठ्या थाटानें करतात. राघोबादादा व नारायणराव हे एकचित्तानें वागून राज्यकारभार करतात हें पाहून, कारस्थानी लोकांची तळमळ सुरू होते.—८. राघोबादादांच्या स्वभावांतील सिंहवृत्ति दाखविणारे गुण. हैदरवरील स्वारीबद्दल राघोबादादा विचार करतात.—९. नाना फडनविस दरबेशाचें काम करूं लागले. गोपिकाबाईचा जळफळाट.—१०. राघोबादादांचा उत्कर्ष न होऊं देण्याबद्दल नाना फडनविसांचें कारस्थान. बाबा बर्वे यांस नाना हाताशीं धरतात.—११. हैदरवरील स्वारीकरतां राघोबादादांवर उत्पन्न झालेला पेचप्रसंग.—१२. नारायणरावाची व गोपिकाबाईची भेट. गोपिकाबाई नारायणरावास राघोबादादाबद्दल चिथावणी देते. राघोबादादांचा पुन्हां बंदिवास सुरू झाला.—१३. सहजा सहजीं नारायणराव राघोबादादांना कसे कैद करू शकले ? त्यांना कोणाचें अधिष्ठान मिळालें, या बाबतींतील उघड उघड दिसणारे मुद्दे.—१४. राघोबादादांना कैद करण्यांत त्यांचा कोणताही गुन्हा नव्हता.—१५. राघोबादादांना कैद करण्याचा अधिकार नारायणराव पेशव्यांना नव्हता.—१६. कोणत्या महंत गारुड्याच्या मंत्रानें नारायणराव राघोबादादांना कैद करण्याइतके बलिष्ठ झाले.—१७. नाना फडन-

विस हेच नारायणरावांना बलिष्ट करणारे गारुडी. नाना फडनविस यांनीच नारायणरावांना नाममात्र पुढे करून राघोबादादांना अन्यायानें कैद केलें.—१८. राघोबादादांना अगर आनंदीबाईंना राज्यतृष्णा नव्हती, ती नाना फडनविसांनाच होती असें ठरतें. —१९. राघोबादादांना नाना फडनविसांनीं कैद केलें यामुळें त्यांनीं पेशव्यांच्या राज्याचें कल्याण न करतां नाशच केला.—२०. राघोबादादांची आपल्या वचनपूर्तीकरतां हैदरवर स्वारी करण्याची गनिमी काव्याची मसलत —२१. राघोबादादांस शनिवारवाड्यांतून जाण्यास बंदी.—२२. राघोबादादांचा हैदरवरील स्वारीचा बेत फसतो. त्यांची कैद जास्त सक्त होते.

१ मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें दादासाहेब नारायणरावांना घेऊन पुण्यास आले. शहरांत प्रवेश करण्यापूर्वी नारायणराव व दादासाहेब या दोघांनीं असा निश्चय केला कीं, "झाल्या गोष्टी होऊन गेल्या. मागचें सर्व विसरून जाऊन, यापुढें उभयतांनीं एकदिलानें वागावें. निद्रा मात्र दोघांनीं पृथक् स्थळीं करावी स्नान-संध्या, भोजन, बसणें-उठणें, राज्यकारभार हे सर्व दोघांनीं एके ठिकाणीं बसून करीत जावें. 'घावें' नारायणरावसाहेबांनीं व 'देववावें' दादासाहेबांनीं. याप्रमाणें उभयतांचा निश्चय झाला.

२. मार्गशीर्ष शु॥ ७ च्या मुहूर्तानें राघोबादादा नारायणरावांना घेऊन साताऱ्यास रामराजाकडून वस्त्रें घेण्याकरतां पुण्याहून निघून गारपीरावर येऊन दाखल झाले. त्याचेबरोबर सखारामबापू, बजाबा पुरंदरे, नाना फडनविस, हरीपंत फडके अशी मंडळी होती. ते साताऱ्यानजिक एक कोसावर वेण्यच्या दक्षिण तीरी येऊन राहिले. तेथें श्रीमंत महाराज रामराजे यांस आणवून मेजवानी केली. मोत्यांची कंठी, तुरा, जेगा, शिरपेंच याप्रमाणें जवाहिर, खेरीज पाच उंची पोषाख व हत्ती आणि घोडा याप्रमाणें दादासाहेबांनीं महाराजांस दिलें. अर्काटच्या नवाबाकडून माजी पेशव्यांस नजराण्यांत पालखी आली होती, तीच या प्रसंगीं महाराजांना त्यांनीं दिली. ते खूष होऊन किल्ल्यावर परत गेले. महाराजांच्या दोन स्त्रिया होत्या. त्यांच्याही दर्शनाला जाऊन दादासाहेबांनीं त्यांना

वस्त्रें व जवाहिर दिलें. मार्गशीर्ष वद्य ४ रविवार या दिवशीं महाराजांना श्रीमंत नारायणरावसाहेब यांस पेशवाईचीं वस्त्रें, शिक्के, कट्यार व जरीपटका दिला. दादासाहेबांनाही वस्त्रें व जवाहिर दिलें. मुतालिकी वस्त्रें बजाबा पुरंदरे यांस दिलीं. पूर्वी दादासाहेबांनी विठ्ठलराव विंचुरकर यांस न्यायाधीशाचें पद देवविलें होतें. तें आता त्याच्या घराण्यांतून काढून पूर्वीच्या न्यायाधीशाच्या घराण्याकडे कायम करण्यात आलें. खंडेराव दरेकर यांजकडे पुनः सरलष्करीचें पद कायम झालें. सखारामबापू यांस कारभाऱ्याचीं वस्त्रें मिळालीं. नाना फडनविस हे फडणीशीच्या कामावर होते ते तेंच काम पाहूं लागले.

३. यावेळीं दादासाहेबांनीं एक महत्वाची गोष्ट साताऱ्च्या महाराजांबद्दल केली. साताऱचे छत्रपती रामराजे यांच्याविषयीं दादासाहेबांच्या मनांत मोठा आदर होता. त्यांचे आपण नोकर आहोंत, ही त्यांची भावना होती. सांगोल्याच्या तहानंतर रामराजे यांना राणी ताराबाईसाहेब यांनीं साताऱ्याच्या किल्ल्यावर बंदींत ठेवलें. पुढे नानासाहेब यांनींही ताराबाईंना तेथेंच किल्ल्यावर बंदींत ठेवलें. नानासाहेबांच्या मरणानंतर माधवरावांना वस्त्रें मिळालीं. परंतु आपला आतां साताऱ्याच्या गादीशीं सेव्यसेवकभाव राहिला नाहीं, अशी माधवरावांची भावना झाली होती. त्यांच्याकडून वस्त्रें घेणें म्हणजे ती एक रूढी आहे एवढाच संस्कार त्यांच्या मनावर होता. म्हणून त्यांच्या कारकीर्दीत त्यानीं साताऱ्च्या महाराजांकडे विशेष लक्ष पोंचविलें नाहीं. रामराजे हे माधवरावांच्याही कारकीर्दींत साताऱ्याच्या किल्ल्यावर बंदींतच होते. त्यावेळीं दादासाहेबांना त्यांचा तो बंदिवास अन्यायाचा वाटला. त्यांनीं रामराजे यांना बंधमुक्त करून किल्ल्यावरून काढून खालीं गांवांत राजवाड्यांत आणून ठेवलें व त्यांच्यावरील बाहेर फिरण्याचा वगैरे जो प्रतिबंध होता तो काढून टाकला. यावरून दादासाहेबांच्या थोर मनाची सहज कल्पना येते. मागें करवीरसंस्थानाबाबत नानासाहेबांनीं जो अन्याय केला होता व पुढें जो दादासाहेबांनीं दूर केला त्याचीच ही पुनरावृत्ति होती.

४. नारायणरावांच्या मनावर मात्र याचा बिलकूल संस्कार नव्हता. त्यांना आपण राजे आहोत व छत्रपती हे आतां आपले एक सरदार आहेत असें वाटत होतें माधवरावाच्या कारस्थानी मंडळाच्या शिकवणी प्रमाणेच त्यांचें हें मत बनलें होतें. त्यामुळें पेशव्याचीं वस्त्रें घेण्याकरतां नारायणराव साताऱ्यास आले तरी त्याचें वर्तन रामराजेमहाराज यांच्या-बरोबर उद्धटपणाचें होतें. हें पाहून नारायणरावांना वस्त्रे देण्यापेक्षां दादा-साहेबांनीं स्वतःच पेशव्यांचीं वस्त्रें धारण करावीं असें महाराजांना वाटलें, त्यांनीं त्याप्रमाणें दादासाहेबांच्या जवळ गोष्ट काढली. परंतु त्यांना तें रुचलें नाहीं. नारायणरावांनाच वस्त्रे देण्याबद्दल दादासाहेबांनीं विनंति केली, ह्मणूनच महाराजांनी त्यांना वस्त्रे दिलीं याप्रमाणें वस्त्रें घेतल्यानंतर सर्व मंडळी पुण्यास आली. रामराजे यांनाही यावेळीं आपली बंदी उठली म्हणून आनंद झाला.

५ नाना फडनविस व हरिपंत फडके यांजवर नारायणरावांचा पहि-ल्यानें विश्वास नाच होता, पटवर्धन मंडळीवरही प्रेम चांगलें होतें सखारामबापूवर त्याचा मर्जी मूळपासूनच नव्हती, नारायणरावाचा स्वभाव संशयी, उतावळा व उद्धट असून वृत्ति क्षणभगूर होती. त्याचे कान हलके होते. त्यांच्या मनाच्या वागणुकींत सुद्धां उग्रपणा फार होता भारदस्तपणा बिलकुल नव्हता. त्याच्या लहान वयाकडे लक्ष देऊन काही दिवसांनंतर त्यांच्यांत कांहीं सुधारणा होईल असें समजणारे कांहीं लोक होते, परंतु सध्यां तरी त्यांना नवीन प्राप्त झालेल्या अधिकाराचा कसा उप-योग केला पाहिजे याचें बिलकुल ज्ञान नव्हतें. सेवक लोकांना (ह्मणजे त्यांत सखाराम बापूसारखे मुत्सद्दीही आले) जरबेंत वागविणें व काम काजांत तडफ दाखविणें या बाबतींत (माधवरावाच्या दुर्गुणाच्या बाबतींत ते आपल्या थोरल्या भावाचें अनुकरण करीत होते. परंतु माधवरावांच्या गुणांच्या बाबतींत मात्र त्यांना काडीमात्र अनुकरण करतां आलें नाहीं

१. साने यांची बखर.

प्रथमतः त्यांनीं एका कामांत सखारामबापूंची रदबदली न ऐकतां त्यांना दुरुक्ति बोलून त्यांचें मन दुखविलें व आपलाच हेका शेवटाला नेला. यामुळें बापू राज्यकारभाराविषयीं उदासीन झाले. नारायणरावाजवळ हलक्या लोकांची रीघ पडत चालली. त्यामुळें अंबूदार मुत्सद्द, दरबारी कामांत फारसा पुढाकार घेईनासे झाले नाना हे नारायणरावाबरोबर मोठ्या सावधगिरीनें वागत. त्यामुळें त्यांनीं त्यांच्याजवळ आपलें वजन ठेवलें होतें. नारायणराव हे दादासाहेबांना मात्र भिऊन वागत होते.

६. माधवराव पेशव्यांना दादासाहेबांनीं नजरकैदेंत ठेविलें असतां त्यांची ज्या थाटानें व्यवस्था ठेविली होती, त्यापेक्षा जास्त थाटाची व्यवस्था त्यांनीं नारायणरावांची यावेळीं ठेवली. जेवण एका पक्तीला, बसणे उठणे एका बैठकीवर, राजकारण एकमतान, फक्त निद्रा घेणें तेवढें प्रत्यकाचें पृथक पृथक् होत असे. कोणाच्याही मनांत तिळप्राय विकल्प येणार नाहीं, अशा प्रकारें पूर्ण समाधानानें दोघजण एकचित्तानें वागूं लागले. हीच एकी कौटुंबिक आणि राजकीय व्यवहारांत दिसत असतां राघोबादादांची मुलगी चि. दुर्गाताई हिचा विवाह करण्याची भाषा निघूं लागली. बाबूजी नाईक बारामतीकर यांचा मुलगा पांडुरंगराव याला दुर्गाबाई देण्याचे ठरले. त्यावेळीं सदाशिवरावभाऊंना पानिपतच्या लढाईंत नाहींसे झाल्याला बारा वर्षे पुरीं होत होतीं. म्हणून हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें त्यांची स्त्री पार्वतीबाई हिला पहिल्यानें सोंवळी करून घेऊन नंतर दुर्गाताईच्या लग्नाचा मुहूर्त ठरवावा असें ठरलें. अद्यापपर्यंत पार्वतीबाई या सौभाग्यचिन्हें धारण करीत होत्या. त्यांनीं कारभारी मंडळीस सांगितलें कीं, नगरच्या किल्ल्यावर तोतया म्हणून ज्याला ठेविलें आहे त्याला मजपुढें आणून उभा करा. तो खरा किंवा खोटा याची मी स्वत खात्री करून घेईन, व तो खरोखर तोतया ठरल्यास मी सोंवळी होईन. या उत्तरानें सर्व मंडळींनीं त्यांना तोतयाचें दर्शन करूं न देण्याचें ठरविलें व त्यांना सोंवळी करण्याचा नाद सोडून देऊन शास्त्रार्थात पर्याय काढून दुर्गाताईचें लग्न उरकून घेण्याचा निश्चय झाला.

७. नारायणरावांना सख्खी बहीण नव्हती, म्हणून दुर्गाताईवरच त्यांचा मोठा लोभ होता. हें कार्य पुण्यासच करण्याचें ठरलें. नारायण-रावांनीं दुर्गाताईच्या विवाह कार्यांत जातीनें फार परिश्रम घेतले. सरदार, मानकरी, मुत्सद्दी, कारभारी वगैरेंच्या घरा हत्तीवर बसून स्वतः नारायण-रावांनीं अक्षत दिली. पेशवाईंत अशा अक्षतीचा थाट यापूर्वी कधींच झाला नव्हता. लग्नांत सर्व तऱ्हेनें नारायणरावांनीं पुढाकार घेतला होता. दुर्गाताईच्या लग्नाचा थाट पुण्याला एवढा उडाला कीं, सर्वांच्या तोंडीं पेशवेघराण्यांत असें कोणाचें थाटाचें लग्न झालें नाहीं, अशी भाषा निघाली. मेजवान्या, वरात वगैरेचा थाट अपूर्व असा होता. अर्थात् या लग्नासाठीं बराच पैसा खर्च झाला. व्याही बाबूजी नाईक हेही घरंदाज श्रीमंतच. लग्न पुण्यासारख्या ठिकाणीं पेशव्यांच्या राजधानींत होतें. पेश-व्यांच्या लाडक्या एकुलत्या एक बहिणीचा विवाह ! दादासाहेबांची एकु-लती एक मुलगी, त्यांच्या घरचें हें पहिलेंच कार्य; शिवाय नारायणराव व दादासाहेब यांचें एकमत. अशा सर्व गोष्टी जमून आल्यानें दुर्गाताईचें लग्न मोठ्या थाटानें कां होणार नाहीं ? या समारंभानें पुण्यांतील नागरिकांना मोठा संतोष वाटला. नारायणराव व राघोबादादा हे एकचित्तानें वागूं लागले, पेशव्यांच्या घरांतील भाऊबंदी तंटे नामशेष झाले, हें पाहून सर्व-साधारण सज्जन लोकांना आनंद वाटला. परंतु नाना फडनविस यांच्या व त्यांच्या कारस्थानी लोकांच्या पोटांत या समारंभानें आग पेटूं लागली. चुलते-पुतणे एकचित्तानें वागतात ही स्थिति कारस्थानी लोकांना वज्राघाता-प्रमाणें वाटली. गृहकलह बंद पडल्यानंतर आमचें कसें होणार अशी भीति त्यांना पडली. त्यामुळें हा आनंदकारक समारंभ पाहून त्यांचे डोळे फुटले. त्यांना या चुलते-पुतण्याच्या एकचित्तांत केव्हां विष कालवूं असें झालें, व त्याप्रमाणें त्याची खटपट सुरूं झाली. त्यांच्या कारस्थानाला यामुळें गति मिळाली व तें वायुवेगानें धावूं लागलें.

८. राघोबादादा पेशवाईचा कारभार पाहूं लागले पण त्यांनीं आपल्या विरुद्ध असलेल्या पक्षांतील एकाही माणसाला कैद केलें नाहीं, किंवा

कोणाला त्रास ही दिला नाहीं ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. त्यांना या वेळीं आपल्या विरुद्ध असलेल्या लोकांना डोंगरी किल्याची हवा दाखवितां आली असती व त्यामुळें आपल्या कारभारांत उत्पन्न होणारीं विघ्नें त्यांना सहज टाळतां आलीं असतीं. पण त्यांचा स्वभाव कपटी व हलका नसल्यामुळें त्यांनीं हा मार्ग स्वीकारला नाहीं. त्याना राजा ह्मणून राज्यकारभार करावयाचा होता. त्यांना सिंहपण पाहिजे होतें. त्यांना कोल्ह्यांची कोल्हेशाही नको होती. या दादासाहेबांच्या निष्कपट मनोवृत्तीचा फायदा नाना फडनविस यांनीं घेतला. बजाबा पुरंदरे याला त्यांनीं आपल्या पक्षांत ओढला. नानांच्या पक्षाची बाकीची सर्व मंडळी सर्वसिद्ध होतीच. सखारामबापू दादांच्या पक्षाचे होते. परंतु नानांच्या पक्षांत गुप्त कारस्थान काय चाललें आहे याचा पत्ता त्याना लागला नाहीं. दादासाहेब लग्नाच्या कामांतुन मोकळे झाल्याबरोबर त्यांच्या व सखाराम बापूंच्या डोळ्याला हैदराचा सूड दिसूं लागला. हैदराचा सूड घेण्याबद्दल दादासाहेबांनीं माधवरावांना वचन दिलें होतें. त्याना तें ताबडतोब पुरें करणें योग्य वाटलें. शिवाय बऱ्याच दिवसांच्या कारागृहवासानें त्याच्या मणगटांतील शक्ति शत्रूला हात दाखविण्याकरतां अगात सळसळ करीत होती. ह्मणून ते हैदरवर मोहीम करण्याच्या खटपटीला लागले, आणि दरबार भरवून हैदरच्या स्वारीचा प्रश्न त्यानीं उपस्थित केला.

९. गोपिकाबाई या गंगापुरालाच होत्या. आनंदीबाई या गोपिकाबाईच्या भेटीला गंगापुराला कधींच गेल्या नाहींत. अर्थात् आनंदीबाई व गोपिकाबाई यांचें पटण्याचें अगर न पटण्याचें नवान कारण कांही प्रत्यक्ष घडलेलें नव्हतें. गोपिकाबाईंना त्यांच्या पक्षाकडून जी माहिती जाई त्या माहितीमुळें गोपिकाबाइंचा द्वेष वाढत होता. गोपिकाबाईंच्या पक्षांतील लोक त्यांना पराचा कावळा करून राघोबादादा व आनंदीबाई यांच्या विरुद्ध गोष्टी सागत. त्यामुळें गोपिकाबाई त्वेषानें त्या गोष्टी जास्त भडक रंगवीत असत. नाना फडनविस हे एक अट्टल दरवेशी होते. पेशवेघरा-

ण्यांतील लोकांच्या गळ्यांत व त्याचप्रमाणें आपल्या पक्षांतील सरदारांच्या गळ्यांत अस्वलाप्रमाणे भेदकपटनीतीच्या सांखळ्या अडकवून त्यांना नाचवीत होते. दादासाहेब जरी कारभार पाहूं लागले, तरी सैन्य व पैसा यावरील ताबा अद्यापि नानांचाच होता. तेव्हां राघोबादादांनीं कोणतेंही काम करण्याचें योजिलें, तरी तें नानांना समजत असे. राघोबादादांना हैदरवर जाण्याचा विचार आहे असे नानाना समजतांच त्यांनीं कारस्थानाला सुरवात केली. दुर्गाताईच्या लग्नाला दौलतींतून पाण्यासारखा पैसा खर्च केला हें एक कारण व हैदरवर स्वारी करून नवीन कर्ज दौलतीच्या डोक्यावर ते बसविणार हें दुसरें कारण. या दोन कारणांवर त्यांनीं आपले कारस्थान उभारण्याचा चंग बांधला.

१०. हीं कारणें वरवर दाखविण्यापुरतींच होतीं. याच्या आंत निराळाच हेतू होता. राघोबादादा मोकळे होऊन ते एकदां लढाईवर गेले तर त्यांना जय मिळणार, यात तिळप्राय संशय नव्हता. एकदां दादासाहेबांना लढाईवर जाण्याचा प्रसंग मिळाला म्हणजे ते कोणाला ऐकणार नाहींत. शिवाय इतके दिवस त्याची अपकीर्ति करण्याचा जो आपण कसून प्रयत्न केला, तो सर्व व्यर्थ जाऊन त्यांची कीर्ती वाढतच जाईल. सर्व लोक त्याच्याकडे चांगल्या दृष्टीनें पाहूं लागले तर आपली मात्रा त्यांच्यापुढें चालणार नाहीं; उलट आपलाच पक्ष खोटा व अन्यायी आहे असें लोक समजतील म्हणून कोणीकडून तरी त्यांना लढाईवर जाण्याचा योग येऊं देऊं नये हा नानांचा डाव होता. याकरतां त्यांनीं हैदरवर होणारी मोहीम कशी टाळतां येईल याची खटपट चालविली. माधवरावांच्या मनांतील अतृप्त इच्छेपैकीं ही एक गोष्ट असल्यानें नानांना या मोहिमेबद्दल स्वतः विरोध करतां येण्यासारखा नव्हता. तेव्हा बाबा बर्वे या नांवाचा एक इसम नारायणरावांच्या अगदीं प्रेमातला होता, त्याच्याकडून नारायणरावांचे मन बिघडविण्याचा नानांनीं प्रयत्न चालविला. राघोबादादांच्या सहवासांत नारायणराव राहूं लागल्यामुळें या उडाणटप्पू लोकांच्या स्वच्छंद

बागणुकीस अडथळा झाला होता. म्हणून या हलक्या लोकांना दादा-साहेबांचा राग आलाच होता. नाना फडनविसांचीं धोरणे सर्व बाजूनीं होतींच. तेव्हां बाबा बर्वे यास नानांनीं अनुकूल करून घेतला. दरबारांत हैदरच्या मोहिमेचा प्रश्न निघणार हे ठरल्यामुळें या बाबा बर्वे-कडून नारायणरावांना अशी शिकवणूक देण्यांत आली कीं, पानिपतच्या लढाईमुळें महाराष्ट्रांतील एक लक्ष बायका विधवा झाल्या, त्यांच्या शापामुळें माधवराव अल्पायुषी झाले, असें असतां आणखी लाख पन्नास हजार मराठे लोक हैदराकरतां बळी देऊन त्यांच्या बायकांकडून नवीन शाप घेण्यापेक्षां हैदरावर स्वारी न करतां त्याच्याबरोबर तह करावा हेंच सध्यां उत्तम आहे. नारायणराव हे जात्या भित्रे असल्यामुळें त्यांना लढाई नको वाटे. त्यांना हा उपदेश पटला. त्याप्रमाणें हैदरवर होणारी मोहीम त्यांनीं रद्द करण्याचा संकल्प केला. राघोबादादा मोहिमेवर गेले, तर खात्रीनें ते आपणाला बरोबर घेऊन जातील, व त्यामुळें आपला व आपल्या खेळगड्यांचा वियोग होईल याही गोष्टी टाळण्याकरतां बाबा बर्वे यांची मसलत नारायणरावांना पटली.

११. या वेळीं राजकारणाकरतां भरणारा दरबार हा नारायणरावांच्या कारभाराचा पहिलाच दरबार होता. त्या दरबारांत हैदरवरील मोहिमेच्या प्रकरणीं नारायणरावांचें मत विरुद्ध पडल्यामुळें हैदरवरील मोहीम तहकूब झाली. सखारामबापू व नारायणराव यांचा जो खटका उडाला तोही याच बाबतींत होता. कारण सखारामबापू हे या मोहिमेच्या बाबतींत दादांच्याच मताचे होते. दादासाहेबांनाही मोहिम रद्द झाल्यामुळें वाईट वाटलें. पण 'बाळाचा हट्ट' पुरविल्याशिवाय गत्यंतर नाहीं या पेंचात ते अडकलेले होते. तसेंच माधवरावांना बाण उचलून देऊन हैदराचा पराभव करण्याचें वचनही त्यांनीं दिलें होतें. यावेळी त्यांच्यावर या परस्परविरुद्ध गोष्टींचा पेंच येऊन पडल्यामुळें त्यांची स्थिति विपरीत झाली. याही स्थितींतून मार्ग काढणें म्हणजे त्यांच्या सत्वाचीच परीक्षा होती. पुणें दरबाराकडून मोहिमेकरतां मदत मिळत नाहीं तेव्हां स्वतःच्या पायावर नागपूर वगैरे ठिकाणांहून मदत घेऊन स्वतंत्रपणें मोहिमेवर जावें असा त्यांचा विचार चालला.

१२. एके दिवशीं नारायणरावसाहेब मातोश्रीचे दर्शनाकरतां गंगापुरास गेले. चार दिवस ते तेथें राहिले. गोपिकाबाई नारायणरावांना बोलली कीं, 'कांहीं कीर्त वडिलांपाठिमागें कराल कीं चुलत्यामागें पोट भरून रहाल ?' हे शब्द मनांत धरून नारायणराव पुण्यास आले. त्यांनीं दादासाहेबांस सांगितलें कीं, 'आपण स्नानसंध्या करून स्वस्थ असावें. आम्हीं कारभाऱ्यांचे विचारें राज्य-करतों.' दादासाहेब म्हणाले. 'उत्तम.' त्यांनीं कारभार सोडला व ते स्वस्थ बसले. राघोबादादा नारायणरावांना जरी 'उत्तम' असें म्हणाले होते तरी तें केवळ नारायणरावांचें समाधान करण्यापुरतेंच होतें. त्यांचें लक्ष हैदरवर मोहीम कशी करतां येईल या विवंचनेंत होतेंच व त्या दिशेनें त्यांचे प्रयत्न चालू होते. दादासाहेब व त्यांची शागीर्द मंडळी यांच्यांत कांहीं मसलती चालू आहेत असें नारायणरावांना कोणी तरी सांगितलें. त्यावरून ते क्रुद्ध होऊन चौकशी न करतां त्यांनीं दादासाहेबांना व त्यांच्या शागीर्द मंडळींना एकदम कैदेंत टाकलें.[1]

१३. नारायणरावांनीं राघोबादादांना कैद केलें ही गोष्ट लोकांच्या कानावर गेली. त्यावेळीं लोकांच्या कानावर गेलेल्या गोष्टीप्रमाणें पत्रव्यवहार झाले. बखरी-कारांनींही तीच माहिती बखरींत नमूद केली. इतिहासकारांनीही त्याचीच री ओढली. परंतु ही महत्वाची गोष्ट अशा प्रकारें हातावेगळी करण्याइतकी फोल टर्पलाप्रमाणें हलकी कां वाटली हें समजत नाहीं. राघोबादादांना या वेळीं कैद करणें ही एवढी महत्वाची गोष्ट होती कीं, त्या गोष्टीच्या उलगड्यानें पुढील नानांच्या सर्व कारस्थानांवर उजेड पडणारा आहे. अन्याय कोणाचा ? खरे बंडखोर कोण ? गृहकलहाला कारणीभूत कोण ? स्वार्थी कोण ? राज्य-तृष्णा कोणाला होती ? पेशव्यांचें राज्य बुडविण्यास कोण कारणीभूत झाला ? या सर्वांचें मूळ या एका गोष्टीशीं आहे. ही गोष्ट इतकी महत्वाची असतां आजपर्यंत इतिहासकारांचें या गोष्टीकडे जावें तसें लक्ष न गेल्यामुळें त्यांनीं चोराला सोडून संन्याशाला सुळीं देण्याचें मोठें पाप केलें आहे. या गोष्टीत विशेष मन घालून विचार केल्यास खालील मुद्दे डोळ्यापुढें उभे राहतात.

१. मराठा साम्राज्याची छोटी बखर पान ९६. २. ऐ. ले. संग्रह पा. १९५१.

१ यावेळीं राघोबादादांना कैद करण्यासारखा त्यांच्याकडून कांहीं अपराध झाला होता कीं काय? झाला असल्यास तो कोणता? व तो त्यांना कैद करण्याइतक्या लायकीचा होता काय?

२. राघोबादादांना कैद करण्याचा नारायणराव पेशव्यांना अधिकार होता काय? त्यांना तो माधवराव पेशव्यांकडून मिळाला होता काय?

३ नारायणराव माधवरावांच्या मृत्यूसमयीं 'बाळ' होते, ते चार पांच महिन्यांतच राघोबादादांना कैद करण्याइतके प्रौढ व बलिष्ठ कसे झाले? ते तसे एकदम होणें शक्य नसल्यास त्यांच्यामागें कोणती शक्ति होती कीं ज्या शक्तीमुळें ते राघोबादादांसारख्या बलिष्ठ वीराला सहज कैद करूं शकले?

४ राघोबादादांना कैद करणारी शक्ति कोणत्या स्वरूपाची होती?

५ हें कृत्य न्यायाला व राज्याच्या कल्याणाला धरून होतें की काय?

असे पांच सर्व साधारण मुद्दे दादासाहेबांच्या या कैदेच्या प्रसंगामुळें उत्पन्न होतात. त्यांचा येथें विचार करणें योग्य आहे.

१४. पहिल्या मुद्यावर विचार करावयाचा ह्मणजे या वेळीं कैद करण्यासारखा एकही अपराध दादासाहेबांकडून घडला नव्हता. बखरीकार किंवा इतिहासकार कोणीही त्यांच्यावर तसा आरोप करीत नाहींत. राघोबादादांनीं पेशव्यांच्या राज्याची अर्धी वांटणी मागितली नाहीं. नारायणरावांस कैद करून आपणच पेशव्यांच्या राज्याचें वैभव उपभोगावें असाही प्रयत्न केलेला नाहीं. आनंदीबाईंची राज्यतृष्णा, दुष्ट बुद्धि किंवा पुतण्याला धरण्याचा अगर मारण्याचा कटही यावेळीं कोठें बाहेर आलेला नाही. तशी जर कोठें हूल उठली असती तर केवळ कारस्थानी लोकांच्या डोक्यांतून निघालेली ती कल्पनाच ठरणार होती. असें असतां त्यांना कैद कां केलें? या कैदेला पूर्वीचें माधवरावांच्या वेळेचेंच कारण पुढें केलें जातें: गोपिकाबाईंचें व आनंदीबाईंचें पटत नव्हतें. पण त्या वेळीं या दोघी निदान एका वाड्यांत तरी राहत होत्या. पण सध्यां त्या सुमारें दीडशे दोनशें मैलाच्या अंतरावर होत्या. अशा स्थितींत राघोबादादांना कोणत्या न्यायानें कैद केलें? अर्थात् याचें कोणतेंच योग्य

कारण दाखवितां येत नाहीं. जें दाखविलें जातें तें केवळ गोपिकाबाईंच्या चिथावणीचेंच फक्त आहे. 'कांहीं कीर्ति वडिलापाठीमागें कराल कीं चुलत्यामागें पोट भरून रहाल?' ही गोपिकाबाईंची चिथावणी आहे. हिचा घडलेल्या गोष्टींवरून विचार करतां न्याय, अन्याय, व्यवहार अगर राज्यकारभार याचा विचार न करता दादासाहेबांना कैदेंत टाकणें एवढीच स्वतःच्या पुरुषत्वाची व कीर्तीची गोष्ट गोपिकाबाईंच्या सल्ल्यानें नारायणरावांना करावयाची होती. या शिवाय त्यांत दुसरा कोणताही गुन्हा दादासाहेबांचा नव्हता हें स्पष्ट दिसतें.

१५. अधिकाराच्या दुसऱ्या मुद्यावर विचार करावयाचा ह्मणजे राघोबादादांना कैद करण्याचा कोणताही कायदेशीर हक्क अगर अधिकार नारायणराव यांना नव्हता. कोणी असें ह्मणेल कीं पेशव्याचीं वस्त्रें नारायणरावांना मिळाल्यावर दादासाहेबांना कैद करण्याचाही अधिकार त्यांना सहज प्राप्त झाला. पण तशी वस्तुस्थिती नाहीं. माधवरावांनीं राज्यकारभाराच्या निरवानिरवीच्या वेळीं पेशवाईचा सर्व कारभार कुलअख्त्यारीनें राघोबादादांना दिला होता. नारायणराव हे केवळ नामधारी पेशवे एवढाच अधिकार त्यांना माधवरावांच्या अखेरच्या व्यवस्थेंत मिळाला होता. त्यांत कोणालाच हात घालतां येण्यासारखा नव्हता. ही राज्यव्यवस्थेची कुलअख्त्यारी माधवरावांनीं पूर्व रूढीला अनुसरून दादासाहेबांना दिली होती. शाहुमहाराजांनीं आपल्या मरणकालीं मराठी राज्याची कुलअख्त्यारी नानासाहेब पेशव्यांना दिली. गादीचा जो वंश होईल त्यानें ही कुलअख्त्यारी चालवावी असें ठरलें. त्याप्रमाणें रामराजे साताऱ्याच्या गादीवर आल्यानंतर त्यांनीं शाहूची आज्ञा मोडून नानासाहेब पेशव्यांना जर कैद केलें असतें व त्यांची कुलअख्त्यारी जर रद्दबातल केली असती तर तें न्यायाचें ठरलें असतें काय? ज्याच्या हातीं ससा तो पारधी; अगर ज्याच्या हातीं सत्ता तिकडे न्याय; किंवा जिकडे विजय तिकडे नीतिधर्म; असेंच जर समजावयाचें असेल तर गोष्ट निराळी. परंतु निःपक्षपातानें जर विचार करावयाचा असेल तर दंडुकेशाही पद्धतीनें

विचार करतां येणार नाहीं. माधवरावांनीं जर एकदां राघोबादादांवर सर्व राज्याचा कारभार सोंपविला होता, तर तो कोणत्याही कारणानें नारायणरावांचें बुजगावणें पुढें करून कोणाला काढून घेतां येण्यासारखा नव्हता. सांप्रत साताऱ्याच्या महाराजांकडून जीं पेशव्याचीं वस्त्रें आणलीं जात होतीं त्याची किंमत कुलाचार पाळण्यापुरतीच होती. भट्टाकडून जानवें मंत्रवून घ्यावयाचें किंवा उपाध्यायाकडून लग्न लावून घ्यावयाचें हा जसा घराण्याचा एक रीतिरिवाज त्यापैकींच साताऱ्याहून वस्त्रें आणणें हा एक कुलाचार होऊन बसला होता. ज्यांत वस्त्रें देणें अगर न देणें यावर देणाराच्या इच्छेचें अगर अधिकाराचें नियंत्रण नाहीं, असें देणें व घेणें याला केवळ कुलाचारच ह्मणतां येईल. अर्थात् नारायणरावांना जीं पेशव्याचीं वस्त्रें मिळालीं तीं माधवरावांच्या व्यवस्थेप्रमाणेंच होतीं. दादासाहेबांना जी कुलअखत्यारी मिळाली तीही माधवरावांच्या व्यवस्थेप्रमाणेंच होती. असें असतां राघोबादादांनीं नारायणरावांना कैदेंत टाकून रामराजांच्या इच्छेप्रमाणे जर त्यांनीं स्वतः पेशव्याचीं वस्त्रें धारण केलीं असतीं, तर त्यांचें हें कृत्य कोणी न्यायाचें ह्मटलें असतें काय? तें जसें अन्यायाचें झाले असतें, तसेंच राघोबादादांना कैदेंत टाकणें हें निःसंशय अन्यायाचें व माधवरावाची व्यवस्था पायाखालीं तुडविल्याप्रमाणें झालेलें आहे. अर्थात् दादासाहेबांना कैद करण्याचा कोणताच अधिकार नारायणरावांना नव्हता.

१६. तिसऱ्या मुद्याचा विचार करावयाचा म्हणजे एक अद्भुत गोष्ट दिसूं लागते. माधवरावांच्या मरणसमयीं नारायणराव हे 'बाळ' होते. त्यांना राजकारण समजण्याची अक्कल नव्हती. त्यांचा सांभाळ कसा होईल याची चिंता माधवराव व रमाबाई यांना लागली होती. तेच 'बाळ' नारायणराव चार पांच महिन्यांत एवढे मोठे कर्तबगार आणि राजकारणी झाले कीं, त्यांना आपलें हिताहित समजूं लागलें. राघोबादादा हे त्यांचे भाऊबंद म्हणून ते त्यांचे शत्रु अशी त्यांना दिव्य दृष्टि फुटली. एवढ्याशा चार महिन्याच्या अल्पावधींत नारायणरावांनीं आपल्या स्वसंरक्षणाचा भार आपल्या शिरावर घेऊन उलट माधव-

रावांनी नेमलेल्या त्यांच्या संरक्षणकर्त्यांचेच ते रक्षणकर्ते बनले. ही अचाट शक्ति; हें अद्भुत सामर्थ्य कोणत्या महंतानें त्यांच्या डोक्यावर हात ठेवल्यामुळें नारायणरावांना प्राप्त झालें, हें एक मोठें आश्चर्यच आहे. याबरोबरच दुसरीही तेवढीच आश्चर्याची गोष्ट अशी आहे की, पुढें फक्त चार पांच महिन्यांनींच नारायणराव पेशव्यांना जी शक्ति व जे सामर्थ्य प्राप्त झालें होतें, तें एकदम अंतर्धान पावून ते पहिल्याप्रमाणें निराश्रित असे बाळ झाले. त्यामुळें त्यांची गारद्यांनीं कत्तल केली. अर्थात् नारायणरावांना शक्ति व सामर्थ्य देणारा जो गारुडी महंत होता त्यानें आपला मंत्र काढून घेतल्याबरोबर पुन्हां नारायणराव पहिल्या प्रमाणेंच बाळ बनले. यावरून त्या महंत गारुड्याच्याच अचाट शक्तीनें नारायणरावांचें नांव पुढें करून दादासाहेबांना कैद केलें हेंच सिद्ध होत नाहीं काय ? न्यायान्यायाचा विचार न होतां, आपले अधिकार, आपलें वर्चस्व व राज्यकारभारांतील आपलें स्वातंत्र्य कायम टिकविण्याकरतां त्या महंत गारुड्यानें हें कारस्थान केलें आणि माधवरावानीं केलेल्या निरवानिरवीला हरताळ फांसला. यांत अर्थाअर्थी नारायणरावांचें स्वतःचें अंग होतें असें समजण्याचें बिल्कुल कारण नाहीं. कारण पूर्वी ते जसे 'बाळ' होते तसेंच ते चार पांच महिन्यानंतरही बाळच राहिले.

१७. आतां चवथ्या मुद्याचा विचार करावयाचा म्हणजे नारायणरावांना कोणती शक्ति मदतगार झाली व त्यामुळें नारायणरावाच्या पोटांतील पाणी न हालतां राघोबादादांसारख्या रणसिंहाला एकदम पिंजऱ्यांत अडकविता आले ? अर्थात् ती शक्ति सामान्य नव्हती. एक दोन अगर चार महिन्यांत ही अफाट शक्ति निर्माण होणें शक्य नव्हतें. या शक्तीचीं पाळेंमुळें बऱ्याच दिवसांच्या कालावधीनें खोल गेलीं होतीं. माधवरावांच्या वेळी दादासाहेबांना कैद करण्याला जी शक्ति प्रवृत्त होऊन यशस्वी झाली, त्याशिवाय दुसरी कोणतीही शक्ति नवीन निर्माण झालेली नव्हती. माधवरावाच्या इच्छेप्रमाणें न्यायानें व सुरळीतपणें दादासाहेब कारभार करीत असतां, त्यांना कैद करण्यांत आलें. हा धडधडीत अन्याय होत असतां, तसें उघड म्हणण्याची कोणाचीही प्राज्ञा

त्या वेळीं झाली नाहीं. अर्थात् त्यावेळीं दादासाहेबांविरुद्ध पेशव्यांच्या दरबारीं एक अचाट शक्ति निर्माण झालेली होती यांत कोणालाच संदेह वाटण्याचें कारण नाहीं. त्यावेळीं फक्त दोनच पक्ष होते. एक दादासाहेबांचा व दुसरा माधवराव पेशव्यांचा ह्मणविणारा नाना फडनविसांचा पक्ष. नानांच्या पक्षांत माधवराव व गोपिकाबाई यांचा समावेश असल्याचें समजलें जात होतें. दादासाहेबांच्या पक्षाचे पंख तोडून नानांचा पक्ष बळकट झाला होता, हें पूर्वी आलेंच आहे. माधवरावांच्या मरणानें नानांचा पक्ष मात्र न मरतां, तो माधवरावांपासून भिन्न असल्यानें पूर्ण जिवंत राहिला होता. राघोबादादांच्या हातांत कारभार आला, त्यावेळी त्यांना फक्त राजाज्ञेचें अधिष्ठान मिळालें. राघोबादादा व सखारामबापू यांची बाकीची सर्व मदार नानांच्या पक्षावरच होती. परंतु माधवरावांच्या मरणसमयीं माधवरावांचे सर्व हक्क मागणारा नानांचाच पक्ष होता. राघोबादादांना कैदेंतच ठेऊन नारायणरावांच्या नावें कुलअख्त्यारीनें पेशव्यांचें राज्य चालविण्याची त्या नानांच्याच पक्षाची हिंमत होती. त्यांनीं त्याप्रमाणें आपली सत्ता प्रस्थापित केली होती व तसा त्यांना विश्वास आला होता, ह्मणूनच नानांनीं छातीला हात लावून माधवरावांची खातरजमा केली होती. असें असतां त्यांचा उत्साहभंग करून त्यांच्या शत्रुपक्षाच्या हातीं माधवरावांनीं दिलेली सत्ता ठेवणें त्यांना खपणें अशक्य होतें. अर्थात् यावरून नारायणरावांना नाममात्र पुढें करून या नानांच्या पक्षानेंच दादासाहेबांना कैद केलें हें स्पष्ट होतें. नानांच्यापक्षाचें ध्येय असें होतें कीं, पेशव्यांच्या गादीवर केवळ नामधारी पेशवा बसवून त्याची सर्व सत्ता आपल्या हातीं ठेवावयाची. हें धोरण नाना फडनविस नानासाहेब पेशव्यांकडूनच शिकले होते. नानासाहेबांनीं छत्रपती रामराजे यांना ज्याप्रमाणें नामधारी बनविलें, त्याचप्रमाणें नानासाहेबांचे अस्सल चेले जे नाना फडनविस ते आपल्या मालकाला नामधारी करणार होते. परंतु या त्यांच्या ध्येयाच्या आड माधवराव आपल्या मरणकालीं आले व त्यांनीं हें नानांच्या पक्षाचें धोरण ओळखून तशी चूक न व्हावी म्हणून दादासाहेबांच्याकडे अधिकार दिले. अर्थात् दादासाहेब हे नानांच्या पक्षाच्या ध्येयाआड

आले म्हणून नानांच्या पक्षानें त्यांना कैद केलें. या कैदसंबंधी नानांच्या पक्षानें जरी गृहकलहामुळे दादासाहेबाना नारायणरावांनीं कैद केलें असें लोकांना भासविलें असलें, तरी त्या चोराच्या उलट्या बोंबा होत्या, हें निश्चित आहे. या वेळीं जर नानासाहेब पेशवे दादासाहेबांच्या जागी असते, तर त्यानीं 'गुरूची विद्या गुरूला फळली' असें म्हटलें असतें.

१८. पांचव्या मुद्यावर विचार करता हें झालेलें कृत्य अर्थात् पूर्ण अन्यायाचे व राजकारभाराला सोडून झालें हें आता निराळे सांगण्याची आवश्यकता राहिली नाहीं. वरील गोष्ट नानाच्या पक्षाकडून घडल्यामुळें काहीं गोष्टी मात्र सूर्यप्रकाशात आल्या. राघोबादादा व आनंदीबाई याच्याशीं गोपिकाबाईचा भाऊबंदी गृहकलह असल्यामुळे नारायणरावांनीं दादासाहेबांना व त्याच्या पक्षातील लोकांना कैदेंत टाकलें, असें जें समजलें जात होतें, तें सर्व खोटें ठरलें. या गृहकलहाचा नाना फडनविसांच्या पक्षानें पूर्ण फायदा घेतला. या वेळीं गृहकलहाचें बुजगावणे मात्र त्यांनीं पुढे करून आपला पूर्ण कार्यभाग साधून घेतला; हीच गोष्ट दादासाहेबाना कैद करण्यावरून ठरते. दुसरी गोष्ट अशी कीं या दादासाहेबांच्या कैदेवरून दादासाहेबाना राज्यलोभ नसून तो नानानाच होता असें ठरते. नाना फडनविस दादासाहेबांच्या राज्यलोभाचा बागुलबावा लोकांना व नारायणराव आणि गोपिकाबाई याना दाखवून आपला पूर्ण स्वार्थ साधीत होते. आनंदीबाईना राज्याची तृष्णा नव्हती. ती तृष्णा गोपिकाबाईना होती. गोपिकाबाईना प्रतिस्पर्धी दाखविण्याकरता आनंदीबाईचा साप त्यांच्या पायांत सोडणे नानाच्या पक्षाला प्राप्त होतें. एवढ्याकरतां आनंदीबाईच्या तारुण्याचा व लावण्याचा फायदा घेऊन, राघोबादादांना राज्यतृष्णा उत्पन्न करावयाला लावणारी कृत्या हीच आहे, असा बोभाटा त्या पक्षानें करविला. वास्तविक माधवरावांच्या शेवटच्या निरवानिरवीमुळें गृहकलह नामशेष झाला होता. परतु नानांच्या पक्षाला गृहकलह नसणे हें वावडें होते. तो कायम टिकविण्यांतच त्याची खरी मुत्सद्देगिरी होती.

एकंदरींत दादासाहेब व आनंदीबाई यांच्यावर जे राज्यतृष्णेचे आरोप करण्यांत येतात ते सर्व धादांत खोटे आहेत, व त्यांचा उत्पादक नानांचाच पक्ष होता, हे या वेळेच्या दादासाहेबांच्या अनपेक्षित कैदेमुळें सिद्ध होतें. या बाबतींत जर कोणी नानांची तरफदारी केली तर ती न्यायाला, व्यवहाराला व मनुष्यस्वभावाला अनुसरून होणारी नाहीं, हें निश्चित आहे.

१९. आतां नाना फडणविसांनी हे अन्यायाचे कृत्य केले, पण तें राज्याच्या तरी कल्याणाचें केलें की काय हे पहाणें युक्त आहे. कारण एकाद्या व्यक्तीच्या नाशाने जर राज्याचें कल्याण होत असेल तर तें एकाद्या वेळी क्षम्य मानता येईल. परंतु नानांच्या पक्षाकडून तसेंही कल्याण झालेलें नाहीं. उलट राजसत्ता नामशेष करण्याच्या नानांच्या नवीन ध्येयामुळें पुढें नानांच्या पक्षांतून जे नवीन बारा भुंगे निर्माण होऊन बाहेर पडले, त्यांनीं पेशव्याचे सिंहासन पोंखरून मोहरममधील तें ताबुताप्रमाणें पोकळ केले. हा इतिहास पुढें येणारा असल्यानें येथें त्याचा उहापोह करीत नाहीं. परंतु एवढें मात्र खरें कीं, नानांच्या पक्षानें पेशव्यांच्या राज्याचें कल्याण तर केलें नाहींच, उलट ते पोंखरून टाकून त्याचा संपूर्ण नाश मात्र करविला. पेशव्यांच्या राज्याच्या नाशाचें मूळ नानांचाच पक्ष आहे, हें विचारवंतांना पुढील इतिहासावरून दिसून येईल.

२०. राघोबादादा मुत्सद्दी नसल्यामुळें त्याचें कारभारांत स्वतंत्र तेज पडण्यासारखें नव्हतें. अर्थात् पेशव्यांच्या राज्यकारभारांत दादासाहेबांची जरूरी भासणारी नव्हती. त्यांचे फक्त तेज समरांगणावर चमकलें असतें. पण तो योगच आणूं दिला नाहीं, म्हणजे नानांच्या पक्षाचें काम होणार होतें. म्हणून त्यांनीं मोहिमेवर जाण्याच्या पूर्ण विरुद्ध नानांचा पक्ष होता. दादासाहेबांचें पराक्रमक्षेत्र मोहीम हेच असल्याने त्यांना मोहिमेवर जाण्याची संधि दिली नाहीं, म्हणजे आपला कार्यभाग झाला हें धोरण

दादासाहेबांच्या कैदेमुळें नानांनी साधून घेतलें. त्यामुळें दादासाहेबांबद्दल लोकांना वाटणारी जरूरी व सहानुभूति नष्ट झाली. आतां राहिली त्यांची न्यायबुद्धि व धर्मभावना. त्याचे एकदां धिंडवडे निघाले म्हणजे कार्यभाग झाला. नंतर दादासाहेब हे जिवंत असून लोकदृष्टीनें मेल्याप्रमाणेच होणार होते, असें नानाचें धोरण दिसतें. दादासाहेबांना जरी कैद केलें, तरी त्यांत आपलें अंग आहे, असें नानांनीं दाखविलें नाहीं. उलट त्यांना वाईट वाटलें असें त्यांनीं औपचारीं दाखविलें. सखारामबापू दादासाहेबांच्या कैदे-विरुद्धच होते. नानांनीं आपला कल सखारामबापूप्रमाणें आहे असाच बाहेरून आव आणला. दादासाहेबांना कैद करण्याचे कारण नारायण-रावांची इच्छा व गोपिकाबाईंची चिथावणी असें त्यांनीं दाखविलें. त्यामुळें सखारामबापूंस नाना आपल्या विचाराचे आहेत असें वाटले. आपल्या पुतण्यानेंच आपणाला कैदेत टाकलें असें दादासाहेबांना वाटल्यावर 'आपलेच दांत व आपलेच ओंठ तेव्हां बोलून काय उपयोग आहे ? त्याचे थोड्याच दिवसांत डोळे उघडतील. तोंपर्यंत आपण हैदरचें पारिपत्य करण्याच्या उद्योगाला लागावें' असें त्यांना वाटलें. व त्या मार्गानें त्यांची खटपट सुरू झाली. हैदरसंबंधी दादासाहेबांनीं जे वचन दिलें होतें तें त्यांना पार पाडलेंच पाहिजे होतें. अर्थात् त्याच्याबद्दल सल्लामसलत सखारामबापूशिवाय करणेंच शक्य नव्हतें. त्या बाबतींत मसलत अशी ठरली की, राघोबादादांनीं ठिकठिकाणीं सैन्य जमविण्यास हुकूम द्यावे. पेशवे दरबारची या मोहिमेस मदत नसल्यामुळें थोड्या सैन्यानें हैदरचें पारिपत्य करणे म्हणजे तें गनिमी काव्यानेंच व हैदराला बेसावध ठेऊनच केलें पाहिजे होतें त्याकरतां दादा-साहेबांना एक कारस्थानी डाव रचण्याचा प्रसंग आला. कारस्थान करण्याचा त्यांचा जरी स्वभावधर्म नव्हता, तरी स्वतःच्या वचनपूर्ततेकरतां त्यांना हा डावपेंचाचा मार्ग धरावा लागला. दादासाहेबांच्या वतीनें सखाराम-बापू यांनीं पुणे येथील हैदराच्या वकीलाला कळवावें कीं, दादासाहेबांना पुतण्याला गादीवरून काढण्याकरतां हैदरची मदत पाहिजे; तरी ती मागण्याकरतां राघोबादादा आपल्या फौजेसह जातीनें तिकडे भेटीकरतां

येत आहेत. अशी हैदरच्या वकीलानें हैदरची समजूत करून द्यावी आणि अशा प्रकारें तो गैरसावध राहिल्यानंतर दादासाहेबांनीं त्याच्या मुलखांत शिरून त्याच्यावर हल्ला करावा. याला नागपूरकर भोसल्यांचीही मदत मागावी. याप्रमाणें मनसुबा ठरला व त्याप्रमाणें सैन्य तयार करण्याचे प्रयत्न चालले.

२१. याच सुमारास नारायणराव गोपिकाबाईच्या भेटीकरतां गंगापुरास गेले. दादासाहेबांनी हैदरच्या वकीलाला हैदरकडे पाठविण्याकरतां मनसुबा ठरल्याप्रमाणे वरील आशयाची चिट्टी दिली. पुण्याहून राहुट्या तंबु वगैरे सामान बाहेर काढल, व रुसल्याचें निमित्त करून नाशकाला जातों म्हणून दादासाहेब वाड्यांतून बाहेर जाऊं लागले. या कामीं नानांची नजर होतीच त्यानीं शहराचे मुख्य अधिकारी नारो आप्पाजी तुळशीबागवाले यांना शहराची नाकेबंदी करण्यास लाविलें. वाड्याभोंवतीं खडे पहारे उभे केले 'हे पहारे आह्मांवर काय म्हणून उभे केले आहेत? आह्मींच निघून जावयाचे मनांत आणिल्यास कोण प्रतिबंध करणारा आहे?' याप्रमाणें दादासाहेब बोलले परंतु कृष्णराव बल्लाळ काळे यांच्या खटपटीमुळें नारायणराव गंगापुराहून येईतोंपर्यंत दादासाहेबांनीं वाड्यांत राहण्याचें कबूल केलें.

२२. हैदराच्या वकिलाने दादासाहेबाची चिट्टी सांडणीस्वाराबरोबर हैदरकडे रवाना केली होती परंतु त्या चिट्टीबद्दल नानांना बातमी मिळाल्यानें हेरांकडून त्या सांडणीस्वाराला गाठून त्यांनीं ती चिट्टी हस्तगत केली व नारायणरावांच्या येण्याची ते वाट पहात बसले. गंगापुराहून नारायणराव पुण्यास आले तेव्हां त्यांना दादासाहेबाच्या हातची चिट्टी दाखविली त्यांत 'नारायणरावांना गादीवरून काढून आपणाला गादी मिळविण्याच्या कामीं तुमचेकडे मदत मागण्याकरतां येत आहों' असा स्पष्ट खुलासा असल्यामुळें

नारायणरावांचा क्रोध भडकला व त्यांनीं दादासाहेबांची कैद सक्त केली. हैदराचा वकील आपाराम यास पकडून आणून त्याच्या पायांत बेडी ठोकून त्याला सिंहगडावर पाठविलें. याप्रमाणें राघोबादादा हे दुष्ट, कृतघ्न, राज्या-लोभी असे त्याच्यावर आरोप करून, त्याच्या नीतिमत्तेवर निमकहराम ह्मणून शिक्कामोर्तब केला. अशा प्रकारें नानांनीं दादासाहेबांच्या पक्षांत आपण आहों अशी बतावणी करून शेवटीं वरीलप्रमाणें त्यांची मसलत ढांसळून पाडली व त्यांची कीर्ति कलंकित केली. दादासाहेब केवळ आपल्या वचनपूर्तीच्या मागें लागले असता, कोल्ह्यांनीं सिंहाला बिनतोड आपल्या सांपळयांत कसें अडकविलें हें पुढील हकीकतीवरून दिसून येईल.



# प्रकरण ११ वें.

# जेथें शितें तेथें भुतें.

## इ० स० १७७२.

१. सखारामबापूंचा दर्जा.—२. राघोबादादांना कैदेंत टाकल्यामुळें मुख्य तीन गोष्टी प्रकाशांत येतात.—३. नाना फडनबिस गृहकलहाची कीड भोंसल्यांच्या राज्यांत फैलावतात.—४ साबाजी व मुधोजी यांच्या युद्ध प्रसंगाला नाना फडनविस कारणीभूत झाले.—५. परभू प्रकरण. नाना फडनबिस परभू समाजाचा उपमर्द व छळ करतात.—६ हैदराची पुण्यावरील स्वारीकरतां तयारी. त्याला तोंड देण्याकरतां हिंदुस्थानांतील फौज पुण्यास परत बोलाविल्यामुळे राजकारभारात बराच गोंधळ माजला—७. शनिवारवाड्यात नानांच्या छत्राखालीं नारायणरावांच्या चाललीला. राघोबादादा व आनंदीबाई यांचा अनन्वित छळ. —८. नारायणरावांकडून नाना फडनविसाचा अपमान.—९. नाना फडनबिसांचा स्वभावधर्म नाग सर्पाप्रमाणें होता—१०. आपल्या अपमानाचा नारायणरावावर सूड घेण्याचा नानाचा संकल्प.—११ —या संबंधी बखरीकाराची दिशाभूल. —१२. नारायणरावास धरण्यासंबंधीच्या कटाच्या कल्पनेंतील मुद्दे.—१३. नारायणरावांनीं नानांचा अपमान कोणत्या दिवशीं केला? —१४. नाना फडनबिसांनी नारायणरावांस इषारा दिला असें इतिहासकारांचे ह्मणणे खोटें असल्याची प्रमाणें.—१५.नारायणरावांना नाना फडनविसांनीं आपल्या अपमानाच्या सूडाकरतां आव्हान दिले असाच निर्णय.—१६ नाना फडनविसांचें नवीन कारस्थान —१७. नारायणरावांना धरण्याच्या कटाचे नाना हेच प्रवर्तक होते.—१८. नारायणराव पेशव्यांस धरण्याच्या कामगिरीवर सर्वांनुमतें सुमेरसिंगाची योजना. त्यास राघोबादादांची संमती. सुमेरसिंगाची या कामगिरीबद्दल बक्षिसाची भरमसाट मागणी.

१. राघोबादादांना सक्तीची कैद सुरूं होण्यापूर्वी, म्हणजे साध्या कैदेपासूनच, नारायणराव पेशव्यांचा कारभार बजाबा पुरंदरे, नाना फडनविस, हरिपंत फडके हे पाहूं लागले होते. या त्रिकुटाचें व सखारामबापूंचें मनोमनीं

बरें नव्हतें. तथापि हें त्रिकुट धूर्त असल्यानें मनांतून तें सखारामबापूंचा द्वेष करतें अशी शंका कोणाला येत नसे. सखारामबापूंना मानाची व मोठेपणाची हांव असे. वरवर तेवढा त्यांचा मान संभाळला, म्हणजे ते खूष असत. सखाराम-बापूच मुख्य कारभारी असें अद्यापि लोक समजत होते. ते आपला आब ठेऊन कांटेतोलपणानें वागत होते.

२. राघोबादादांना अन्यायानें पुनः कारागृहवासांत पुण्याच्या कारस्थानी मंडळींनीं टाकलें यावद्दल पेशव्यांच्या राज्यांत गडबड सुरू झाली. या वेळीं प्रामुख्यानें तीन गोष्टी पुढें आल्या. त्या तीन्हींचा संबंध नारायणराव पेशवे यांच्या मृत्यू प्रकरणाशीं जोडण्यांत येतो. ह्मणून त्याची कल्पना येण्याकरतां त्याची थोडथोडी माहिती येथें देणें प्राप्त आहे. या गोष्टी नारायणराव यांच्या मृत्यूपूर्वी किंवा त्याच सुमारास घडल्या, म्हणून बहुतेक इतिहासकारांची मदार याच गोष्टीत नारायणरावांच्या वधा संबंधच्या कटाचें कांहीं काळें बेरें असेल अशी आहे. परंतु केवळ शंका उत्पन्न करून ठेवण्यापलीकडे आजपर्यंत त्यांतून कोणी कांहीं निष्पन्न मात्र केलें नाहीं. त्या तीन गोष्टी म्हणजे १ नागपूरकर भोंसल्यांचा गृहकलह. २ परभू मंडळींचें ग्रामण्याचें प्रकरण व ३ हैदरची पुण्यावर आक्रमण करण्याची तयारी या त्या तीन गोष्टी होत. या तीनही गोष्टींना दादासाहेबांना कैदेंत टाकल्यानंतर रंग चढला. व त्यांनीं त्या दिवसा-पासून राजकारणीलोकांचें लक्ष आपल्याकडे पूर्णपणें वेधून घेतलें.

३. वृक्षाच्या मुळाला एकदां कीड लागली, ह्मणजे ती शाखा उपशाखापर्यंत चरत जाते. त्याप्रमाणें मराठी राज्याच्या वृक्षाला, शाहुमहाराजांच्या दिल्लीहून झालेल्या सुटकेनंतर, सातार्‍यांत जी छत्रपतीघराण्याला गृहकलहाची कीड लागली, ती शाहुमहाराजांच्या मरणानें नाश पावली खरी, पण तिनें पुढें पेशव्यांच्या घरांत शिरकाव केला. 'जेथें शितें तेथें भुतें.' असा व्यावहारिक सिद्धांत आहे. पेशव्यांच्या गृहकलहाची जखम मलमपट्टीनें भरून काढण्याचा प्रयत्न तर राहूं देच, पण ती जर आपोआप बरी होऊं लागली तर ती बरी होऊं न देतां ती चिघळविण्याचें दुष्ट कृत्य स्वार्थलोलुप माणसें करूं लागलीं. त्यामुळें ही गृहकलहाची

जखम जास्त जास्त चिघळत जाऊन तिचें वीष मराठी राज्याच्या शाखाशाखांतूनहि भिनूं लागलें. नागपूरकरांचा गृहकलह हा पेशव्यांच्याच गृहकलहाच्या विकाराचा स्पर्शजन्य परिणाम आहे. शिंदे, होळकर यांच्या राज्यांत हात घालून एक दौलत दासीपुत्राला दिली तर दुसरी नात्यागोत्याचा संबंध नसलेल्या एका शिलेदाराला दिली व त्या दोघांना नानांनीं आपल्या पक्षाचे करून घेतलें. तोच डाव नागपूरच्या भोंसले घराण्यांत खेळण्याचा नाना फडनविस यांनीं प्रयत्न केला. आपल्या निष्कपटी व भोळ्या स्वभावानुसार सरळ गोष्टी करणें राघोबादादांना आवडत असे, व त्याप्रमाणें करण्याचा ते नेहमी प्रयत्नही करीत होते. सत्पक्षाला व न्यायाला अनुसरून ते काम करीत. असें असतां नानांचा पक्ष मात्र त्यांच्याविरुद्ध कोणतेंही कारस्थान निर्माण करीत असे. परंतु नानांच्या पक्षाच्या हातीं सत्ता असल्यामुळें त्यांच्याकडून जी गोष्ट घडे ती मात्र अर्थात् पूर्ण अन्यायाचीच होत असे. त्यामुळें नागपूरकर भोंसल्यांच्या बाबतींत असाच अन्याय करून नानांनीं त्यांच्या घरीं कलहाग्नि पेटविला आणि पेशव्यांच्या घराप्रमाणेंच भोंसल्यांचेंही घर जाळण्याचें श्रेय घेतलें.

४. नागपूरच्या गादीवर जानोजी होते. त्याना संतती नव्हती. ह्मणून त्यांचा भाऊ मुधोजी यांचा मुलगा रघोजी याला दत्तक घेऊन पुढें गादी चालवावी असें जानोजींच्या मनांत होतें. तसें करण्यास त्यांनीं माधवराव पेशवे यांची संमति घेतली. त्याप्रमाणें त्यांनी रघोजीला दत्तकही घेतला. रघोजी यावेळीं अल्पवयी होता. म्हणून त्याच्या बापाला ह्मणजे मुधोजींना जानोजींनीं त्याचा पालनकर्ता नेमिलें. पुढें तारीख १६ माहे मे सन १७७२ रोजीं जानोजी बालाघाटाजवळ दिवंगत झाले. त्यावेळी त्यांचा भाऊ मुधोजी यांना सेनाधुरंधर असा किताब होता. नंतर मुधोजींनीं पुण्याहून रघोजींच्या नांवानें सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें मिळविलीं व रघोजींना नागपूरच्या गादीवर बसवून आपण कारभार पाहूं लागले. मुधोजींचा धाकटा भाऊ साबाजी म्हणून होता. त्याला जानोजींनीं मुधोजीचा मुलगा दत्तक घेतला ही गोष्ट आवडली नाहीं. त्यानें जानोजींची एक बायको सती न जातां मागें राहिली होती, तिला आपल्या

पक्षांत सामील करून घेतलें, आणि युद्धाची तयारी करून मुधोजीबरोबर लढाई केली. मुधोजींना व रघोजींना दोघांनाही साबाजीनें पळावयाला लाविलें. ही गोष्ट पुण्यास माधवराव यांस समजली. तेव्हां तेथें कारस्थान सुरू झालें. मुधोजी हा दादासाहेबांच्या पक्षाचा होता. पुण्याच्या नानांच्या पक्षानें तर राघोबादादांचा पक्ष नेस्तनाबूद करण्याचा विडाच उचलला होता. तेव्हां माधवरावांच्या मनांत भेद उत्पन्न करून साबाजी भोंसले यांना सेनासाहेब सुभ्याची वस्त्रें नाना फडनविस यांनीं द्यावयाला लाविलीं. यावेळीं माधवरावांकडून नानांनीं केवढा अन्याय करविला हें दिसून येईल. रघोजींना दत्तक घेण्याची संमति माधवरावांनी दिली. त्याला सेनासाहेब सुभ्याची वस्त्रेंही माधवरावांनींच दिलीं. असें असतां नाना फडनविसांच्या उठावणीनें साबाजीनें बंड केलें व खऱ्या मालकाला गादीवरून हुसकून लाविलें. यावेळीं मुधोजीला मदत करून साबाजीचें पारिपत्य करणें हे माधवरावांच्या राजनीतीला व पेशव्यांच्या नांवलौकिकाला भूषणावह खास झालें असतें. पण तसा न्यायाचा मार्ग न स्वीकारतां केवळ राघोबादादांच्या पक्षाचा मुधोजी आहे व त्यांचा पक्ष हाणून पाडला पाहिजे, या एकाच दुष्ट हेतूनें केवळ उघड उघड अन्याय करून साबाजीला सेनासाहेब सुभ्याची वस्त्रें नाना फडनविस यांच्या सल्ल्याप्रमाणें देण्यांत आलीं. माधवराव जर आणखीं कांही दिवस जास्त जगते, तर त्यांच्या हातून नानांनीं आणखी कोणती पातकें करविलीं असती कोण जाणे! पुढें माधवराव पेशवे मरण पावले व राघोबादादा कारभार पाहूं लागले. त्यामुळें मुधोजींना जोर आला व ते साबाजीबरोबर युद्ध करण्याची तयारी करूं लागले. मुधोजींना दादासाहेबांचें पाठबळ होतें. मुधोजींचा वकीलही पुण्यास येऊन बसला होता. परंतु त्यानंतर राघोबादादांना कैदेंत टाकलेलें वर्तमान मुधोजींना समजलें. तेव्हां ते चवताळून गेले. त्यांनीं साबाजीच्या पारिपत्याची तयारी केली आणि मुधोजी व साबाजी यांचें युद्ध सुरू झालें. मुधोजींचा वकील पुण्यास दादासाहेबांच्या मुक्ततेसंबंधीही खटपट करूं लागला.

५. दुसरी गोष्ट म्हणजे चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंचें ग्रामण्य ही होय. राघोबादादांचा म्हणून जो पक्ष समजला जात होता, तो न्यायी व सरळ

असल्यामुळें, त्या पक्षांत जातिकलहाचें भूत वावरत नव्हतें. राघोबादादा शूर व लढवय्ये असल्यामुळें राजाचे क्षात्र गुण त्यांच्या ठिकाणीं पूर्ण भरलेले होते. त्यांना सर्वच माणसें पाहिजे होतीं. आपल्या जातीचीं--फक्त कोंकणस्थ चित्पावन माणसेंच--आपल्या पक्षांत असावीं, असें त्यांना वाटत नव्हतें. कार्यकर्ता पुरुष असला ह्मणजे ब्राह्मण, मराठा, परभू, असा भेदभाव न ठेवतां त्याच्याकडून तो काम करून घेत असतो. भलत्याच जातीच्या मनुष्याला भलतेंच काम राघोबादादा व्यवहाराला सोडून देत नसत. त्यामुळें दादांच्या पक्षांत सर्वच सत्पक्षी लोकांचा भरणा होता. दुसरा पक्ष नाना फडनविस यांचा होता. तो मात्र जातिमत्सरानें पूर्ण भारलेला असा होता. नानांचे अनुयायी, पटवर्धन, रास्ते, फडके, पेठे वगैरे बहुतेक सर्व चित्पावन कोंकणस्थच होते. त्यामुळें ब्राह्मणांतील पोटजातींच्या ब्राह्मणांनीं सुद्धां पुढें येऊं नये, अशी ते खबरदारी घेत होते. दुसऱ्या जातीला कमी लेखणें, आपल्या जातीचा बडेजाव करणें, आणि आपल्या जातीच्याच लोकांना आपल्या कारस्थानी कटांत सामील करून घेणें, वगैरे त्यांचे प्रयत्न आपला पक्ष मजबूत करण्याच्या दृष्टीनें चालले होते. दादासाहेबांच्या पक्षांत सखारामबापू हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते. नानांचा पक्ष सखारामबापूंचा द्वेष करीत होता याचें कारणही हेंच होतें. शिवाय दादासाहेबांच्या पक्षांत सखाराम हरी सारखे पुष्कळ तेजस्वी असे चांद्रसेनीय कायस्थ प्रभु होते. त्यांना क्षत्रिय समजलें जात असे. त्यांच्या घरीं वेदोक्त पद्धतीनेंच सर्व धर्मकृत्यें होत होतीं. असें असतां ते क्षत्रिय म्हणजे द्विज नाहींत, त्यांना वेदाचा अधिकार नाहीं, ते शूद्र आहेत, अशी त्यांची हेटाळणी नानांच्या पक्षाकडून होऊं लागली. त्यांची धार्मिक कृत्यें करण्याकरतां ब्राम्हण त्यांच्या घरीं जाईनासे झाले. पूर्वीपासून त्यांच्या घराण्यांत वेदोक्त पद्धतीनें कार्यें घडत असतां, कांहीं ब्राम्हण त्यांच्याबद्दल सरकारांत तक्रारी नेत होते. परंतु त्याचा निकाल "पूर्वी चालत आलें आहे तसें चालवावें; नवें करूं नये. जुनें मोडूं नये." असा मिळत असे. यामुळें इतके दिवस ही गोष्ट कोणत्याही प्रकारें चिडीला

पेटली नव्हती. परंतु यावेळीं चित्पावन ब्राम्हणांचें प्रस्थ दरबारात वाढल्या-मुळें ब्राम्हण मंडळी परभूंच्या घरीं वेदोक्त कर्म करण्यास जाईनाशी झाली. तेव्हां त्यांची धार्मिक कृत्यें नडूं लागलीं. म्हणून परभूंनीं ब्राह्मणांविरुद्ध पेशव्यांच्या दरबारांत तक्रार आणिली. त्यावेळीं दादासाहेब कैदेंत होते. परभू मंडळी ही दादांच्या पक्षाची आहे असा त्यांच्यावर शिक्का बसला होता. तेव्हां अनायासें या लोकांचीं नाकें ठेंचण्याला ही संधि उत्तम आहे असें नानांना वाटलें. या परभू मंडळींपैकीं मुख्य मुख्य माणसांना पकडून बंदींत टाकण्यांत आलें. त्यांचे नाना प्रकारें तेथें छळ करण्यांत आले. त्यांना तीनतीन दिवस अन्न पाण्यावांचून तळमळत पाडण्यांत आलें. याप्रमाणें नानांनीं मनसोक्त त्यांच्यावर सूड उगवून घेतला; व नारायणराव यांच्याकडून त्यांच्या तक्रारीवर असा ठरांव देवविला कीं, 'परभू क्षत्रिय नाहींत. त्यांस वेदोक्त कर्माचा अधिकार नाहीं. शूद्राप्रमाणें त्यांनीं वागावें' असा ठराव झाल्यानंतर तो चांद्रसेनीय कायस्थ प्ररभूंना मान्य झाला अशाबद्दल त्यांची लेखी कबूली घेण्याच्या हेतूनें, त्यांच्या जातींतील प्रमुख लोकांना धरून कैदेंत टाकलें होतें. त्यांना तेथें उपाशी ठेऊन व इतर सर्व प्रकारें छळ करून त्यांना 'त्राहि भगवन' करून सोडलें. त्यांना या यातना सहन होईनात. अशा वेळीं त्यांच्याकडून बळजबरीनें नानांनीं नऊ कलमाची यादी (कतबा) लिहून घेतली. ती यादी नानांच्या पक्षाला जशी पाहिजे होती तशी त्यांनीं ती लिहून घेतली होती. त्यावर पुढील सोळा इसमांच्या सह्या होत्या. १ रामराव जिवाजी, २ विठ्ठल येशवंत ३ रामाजी मल्हार, ४ मुरारराव दौलत, ५ बाजीराव साबाजी ६ सोयरो वामन, ७ बाजी खंडेराव, ८ अपाजी भिकाजी ९ खंडेराव बापूजी, १० निलकंठ रामचंद्र, ११ नारायणराव हरी, ११ सखाराम हरी १३ त्रिंबक महिपतराव, १४ बळवंतराव शंकर १५ बाळाजी गणेश १६ त्रिंबक सूर्याजी. अशा प्रमुख सोळा इसमांच्या सह्या घेतल्या गेल्या.

१. ऐ. ले. संग्रह पा. ११५७

त्यामुळें परभू लोक फार चवताळले. नानांच्या पक्षानें हें अत्यंत निंद्य, अन्यायाचें व सूडबुद्धीच्या अतिरेकाचें कृत्य केलें. राजकारणांतील पक्षभेदाचा वचपा अशा प्रकारें धार्मिक प्रकरणांत काढावा व त्यामुळें लोकाच्या धर्म-भावना दुखवून जातिवैमनस्य उत्पन्न करावें याच्यासारखें निंद्य कर्म दुसरें कोणतें? पण अशी कित्येक निंद्य कर्मे नानांनीं आजपर्यंत सहज पचविलीं होतीं. त्यापुढें या निंद्य कर्माची विशेष महती नव्हती.

६. तिसरी गोष्ट ह्मणजे हैदरअल्लीच्या स्वारीची होती. खरें पाहिलें असतां हैदरअल्लीचा सूड घेण्याचें काम राघोबादादांनी हातीं घेतलें होतें, व त्याकरतां हैदर गाफील रहावा ह्मणून त्याला चिठ्ठी पाठविण्याची युक्ति केली होती. परंतु ती ज्या वेळी उघडकीस आली त्या वेळीं राघोबादादाची कैद सक्त झाली. त्यांचे कैदेंत अनन्वित छळ होऊं लागले, हें समजतांच हैदराला राग आला. राघोबादादा एवढा पराक्रमी पुरुष, तो आपल्याकडे मदत मागण्याकरतां येत असतां त्याचा असा छळ होऊं लागला, म्हणून या गोष्टीचा सूड घेण्याकरता हैदर पुण्यावर स्वारी करण्याच्या उद्योगाला लागला. ही वार्ता पुण्यास समजताच त्याच्यावर स्वारी करण्याचा नानाचा निश्चय ठरला. हा निश्चय तडीस नेण्यास फौजेची तयारी मोठ्या प्रमाणावर केली पाहिजे होती. सबब हिंदुस्थानच्या फौजेस दिल्लीहून येण्याविषयीं सक्तीचीं पत्रें पाठविलीं गेलीं. खरें पाहिलें तर होळकर व शिंदीवाले यांस चंबेली नदीच्या अलीकडे बोलावणें ह्मणजे त्यांनीं आज तीन वर्षेपर्यंत तिकडे केलेले श्रम व्यर्थ घालविणें होतें. बादशहा व बक्षी नजीबखान, जाट, पठाण, रोहिले, सुजाउद्दवला, इंग्रज, राजपुतान्यांतले व बुंदेलखंडांतले राजे, हे सर्व मराठ्यां-वर उठले होते. त्यांना जरबेंत ठेवण्यासाठीं आणखी मोठ्या फौजेची रवानगी पुण्याहून व्हावयास पाहिजे होती. तसें न करतां तिकडे आहे तीच फौज परत आणल्यानें अंतर्वेदी, रोहिलखंड, आग्रा, दिल्ली, मथुरा, कनोज हे सर्व प्रांत आपल्या हातचे जातात; काशी व प्रयाग या क्षेत्रांबद्दल बादशहापासून मिळविलेल्या सनदा व्यर्थ होतात; याकडे नानांनीं राघोबादादांच्या सूडाच्या

धुंदींत लक्ष दिलें नाहीं. पुण्याहून वारंवार सर्काचे हुकूम येऊं लागल्यामुळें होळकर व शिंदीवाले दिल्ली सोडून पुण्यास येऊं लागले. अशा प्रकारें दादासाहेबांना कैदेंत टाकल्यामुळे राज्यकारभारांत निरनिराळीं संकटें उत्पन्न होऊं लागलीं.

७. ही पेशव्यांच्या राज्यांतील स्थिति झाली. परंतु खुद्द राजवाड्यांत नारायणरावांच्या बाललीलांना ऊत येऊं लागला होता. त्यांना नवीन प्राप्त झालेल्या अधिकाराचा मद दिवसेंदिवस चढूं लागला होता. त्यांच्यावरील दादासाहेबांचा धाक कमी झाल्यामुळें अधिकाराचा उपयोग कसा करावा याचें त्यांना धोरण राहिलें नाहीं. त्याच्या सहवासांत चौवीस तास नाना फडनविस व हरिपंत फडके हे राहूं लागले. त्यांच्याशिवाय नारायणराव एकक्षणही बाजूला राहत नसत. कोणाचे कान तर कोणाचें नाक व हात कापून नारायणराव आपल्या बाललीला पुऱ्या करीत असत. त्याचप्रमाणें राघोबादादांचा छळ करण्याच्या उठावण्या नारायणरावांना मिळूं लागल्यामुळें 'माकडाच्या हातीं कोलीत' दिल्याप्रमाणें झालें. दादासाहेबांचा सक्त कारागृहवास सुरू झाल्यानंतर त्यांनीं अनुष्ठानें सुरू केलीं. याचे कारण असें कीं, 'मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यद्विचिंतयेत' याप्रमाणें दादासाहेब करूं गेले एक व होऊं लागलें भलतेंच. तेव्हां परमेश्वराच्याच मनात पेशव्यांच्या राज्याचें कल्याण व्हावें असें दिसत नाहीं. त्याला पूर्वीच्या लोकाचे मोठमोठे शाप बाधत आहेत. म्हणून परमेश्वराच्या आराधनेनें तरी कांहीं कल्याण झालें तर पहावें, म्हणून त्यांनीं अनुष्ठानें सुरू केलीं. या अनुष्ठानांचा नानांच्या टोळीनें असा अर्थ केला कीं, असेच देवदेव करून दादांनीं माधवरावांना मारून टाकलें; आतां हीं अनुष्ठानें नारायणरावांना मारण्याकरतांच चाललीं आहेत! या कल्पना नारायणरावांच्या मनांत भरवून दिल्या गेल्यामुळें त्यांचा राग भडकला. नंतर त्यांनीं आपल्या मनाला येतील ते दादासाहेबांचे व आनंदीबाईंचे छळ सुरू केले. हे छळ कसे अनन्वित होते याचें वर्णन परभूंनीं

---

१. ऐ. ले. सं. पान. १९६९.

आपल्या बखरीत केलें आहे. ते येथें देणें ह्मणजे परभू समाजाच्या वतीनें नारायणरावांना दोषदिल्याप्रमाणें होणार असल्यानें तो पक्षपात येथें करणें योग्य नाहीं. तथापि दादासाहेबांच्या छळाची एक चुणुक येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं. राघोबादादांचें गायत्री पुरश्चरण चालल्यावेळीं त्यांना सूर्यदर्शन घेतल्याशिवाय अन्नग्रहण करतां येत नसे. ह्मणून त्यांना सूर्यदर्शन न व्हावें याकरतां त्यांना खोलींत कोंडून घालीत होते. यामुळें दादासाहेबांना चार चार आठ आठ दिवस उपोषण पडत होते. आनंदीबाईंचे तर इतके हाल केले कीं ते लेखणींतून उतरणेंच शक्य होत नाही. फंदाचे कागद लुगड्यांत लपविले आहेत या सबबीवर आनंदीबाईंचे लुगडें फेडून त्यांचा छळ होत असे. नारायणरावांना ज्या व्यक्तीचा दरारा होता त्यांचेच हाल नानाफडनविस यांनीं नारायणरावांकडून करविले. त्यामुळें नारायणरावांच्या मनावर जो दाब होता तो नष्ट होऊन ते पूर्ण स्वच्छंदी व निर्भय बनले. ही त्यांची वृत्ति गुरुचा मंत्र गुरूलाच फळूं लागण्यापर्यंत जेव्हां येऊं लागली, त्यावेळीं नानांचे व त्यांच्या टोळींतील लोकांचे डोळे थोडथोडे उघडूं लागले.

८. एके[१] दिवशीं नारायणराव पर्वतीला गेले होते. तेथें सारी मंडळी बोथाटी खेळत होती. खेळ चालला असतां नारायणरावांनीं आपल्या बोथाटीनें नाना फडणविस यांचें पागोटें उडवून जमिनीवर पाडलें. ते हांसून ह्मणाले. ‘ नाना तुमचे पागोटे खालीं पडले !’ तेव्हां नानांनीं उत्तर केलें कीं, ‘ मी कारकूनच आहे. माझें पागोटे पडले हें कांहीं आश्चर्य नाहीं. स्वामींनीं आपलें पागोटें संभाळावें ! ’

९. नाना फडणविस कोणाशीं विशेष सलगी करीत नसत. त्यांना थट्टाविनोद आवडत नसे. त्यांचा कोणी अपमान केलेला त्यांना कधीं सहन झाला नाहीं. त्यांच्या मनाचा धर्म नागसापाप्रमाणें होता. त्यांना कोणी दुखविलें कीं, त्याचा दावा धरून त्यानीं त्याचा प्राण घेतलाच. त्यांनीं आपला भाऊ, स्नेही, उपकारकर्ता, मालक वगैरे कोणाचीच पर्वा केली नाही. सर्प

२. नागपुरकर भों. ब. पान ९४. १. हरिवंशाची बखर पान ४०.

ण्याप्रमाणें त्याला दुखविणाऱ्याला चावणें एवढेंच जाणतो, त्याला त्या वेळीं शत्रुमित्राची जाणीव राहत नाहीं, तोच स्वभावधर्म हुबेहुब नानांचा होता. नानांना ज्यांनीं ज्यांनीं त्याच्या मनाविरुद्ध दुखविलें, त्यांना त्यांना नानांनीं ठारच करून टाकलें. इतकें त्याच्या द्वेषबुद्धीचें वीष जालीम होतें. नागसर्पाच्या कंठावर काळ्या रंगाच्या कांहीं आडव्या रेघा असतात. त्या जितक्या असतील तितके प्रहर त्यानें दंश केल्यानंतर मनुष्य वाचूं शकतें, असा एक ठोकताळा आहे. त्याचप्रमाणें नानांना ज्यांनीं दुखविलें त्या दुःखाच्या कमीजास्त प्रमाणावर ते लोक कमीजास्त मुदतपर्यंत जगले. कोणी तात्काळ मेले, तर कोणी आठपंधरा दिवसानंतर मेले, तर कोणीं चार दोन महिने काढले, एकंदरींत मेले एवढी मात्र गोष्ट खरी.

१०. नारायणरावानीं नानाची ही केवळ थट्टा ह्मणून केली होती. इतरांची अशा प्रकारची थट्टा करण्याचीही त्यांना संवय होतीच. परतु थट्टा करून घेण्याची संवय नानांना नव्हती. त्यामुळें त्यांना स्वाभाविक राग आला. त्यांना आपला अपमान झाला असे वाटलें. ते एकटेच असतांना त्यांचें पागोटें नारायणरावांनीं उडविलें असतें, तर त्याना इतकें वाईट वाटलें नसतें. परंतु त्या ठिकाणी पुष्कळ मंडळी जमलेली होती. सर्वांसमक्ष हा प्रकार घडला, त्यामुळें नानाना विशेष अपमान वाटला. नारायणरावांचा स्वभाव दिवसेंदिवस बेताल होत चाललेला त्याना दिसून येत होता. सखारामबापूंना भरदरबारांत त्यांनीं शिवीगाळ केली होती. इतर मोठमोठ्या सरदार मंडळींचे त्यांनी निरनिराळ्या प्रकारें अपमान केले होते. हरिपंत फडकेही त्यांच्यापुढें जाण्याला भिऊं लागले. अब्रूदार मनुष्य त्यांची भेट घेण्याचें टाळू लागले. परंतु इतके दिवस नानाना मात्र वाटत होते कीं, नारायणराव आपल्या वाटेला जाणार नाहींत. पण वरील प्रकार सर्वांसमक्ष झाल्याकारणानें त्याची नानांना चीड आली. नाना कधीं जास्त बोलत नसत. जें बोलतील तेंच खरें व तेच घडवून आणण्याची ते पराकाष्ठा करीत. अशीं पुष्कळ उदाहरणें पुढें घडलीं आहेत. त्यांचा विचार करूनच

नानांच्या स्वभावाची ही रूपरेषा रेखाटली आहे. अशा स्वभावाच्या नानांचें पागोटें नारायणरावांनीं उडविलें, तेव्हां नानानीं उत्तर दिलें: 'मी कारकूनच आहे. माझें पागोटे पडलें हें आश्चर्य नाहीं. स्वामींनीं आपले पागोटें सांभाळावें.' या वाक्यातील जोर असा आहे कीं, माझें पागोटें पडलें तर मी कारकूनच आहे. पण स्वामींनीं आतां सावध रहावें आणि या कारकून बच्चाच्या तावडींतून आपलें पागोटे सांभाळावें. या वेळीं नानांनीं या उत्तरानें नारायणरावांना भावी सामान्याबद्दल एक प्रकारें आवाहनच दिलें. यावेळीं नानांनीं नारायणरावांचें पागोटें पाडण्याचा स्वतःच्या मनाशी संकल्प करूनच सूडाच्या भावनेनें असें उत्तर दिलें होतें.

११. आजपर्यंतच्या इतिहासकाराची अशी विचारसरणी आहे कीं, नारायणरावांना धरावा अशी फितुरी सखारामबापूंनीं राघोबादादांच्या संमतीनें चालविली होती व त्याचा सुगावा नाना फडनविस यांना लागल्यामुळें त्यांनीं नारायणरावांना अशा प्रकारच्या धोक्याचा इषाराही दिला होता. या नानांच्या इषाऱ्याकडे नारायणरावांनीं लक्ष दिलें नाहीं. परंतु अशी विचारसरणी ठेवण्यामध्ये इतिहासकार व बखरीकार यांची पूर्ण चूक झाली आहे. काहीं बखरी पक्षाभिमानानें लिहिल्या गेल्या आहेत, तर कांहीं मिळालेल्या त्रोटक माहितीवरून लिहिल्या आहेत, असें स्पष्ट दिसून येतें. तेव्हा अशा बाबतींत प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टी विचारांत घेऊन त्यांचा मनुष्यस्वभावाला व व्यवहाराला जसा मेळ बसेल त्याप्रमाणें त्यांची जुळणी बसविली पाहिजे. नानानीं केवळ इषाऱ्यादाखलच 'स्वामींनीं आपलें पागोटें सांभाळावें,' असें म्हटलें असेल असें संभवत नाहीं.

१२. या बाबतींत कांहीं मुद्दे इतिहासकारांनीं विचारांत घ्यावयाला पाहिजे होते. पण त्यांनीं तसें केलेलें दिसत नाहीं. या बाबतींत विचार करतां कांहीं मुद्दे उपस्थित होतात, ते असे. १ नारायणरावांना धरण्याचा कट राघोबादादांनीं व सखारामबापूंनीं केला. ही गोष्ट नानांना केव्हां

समजली ? २ राज्यकर्त्याला धरावा असा कट चालू असतां व त्याची माहिती नानांना लागली असतां, तो कट उघडकीला आणून कटांतील लोकांचें पारिपत्य करण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती किंवा नाहीं ? त्यांच्यावर नसल्यास ती कोणावर होती ? सदर जबाबदारी नानांवर असल्यास ती पार पाडण्याकरतां नानानीं स्वतः काय प्रयत्न केले अगर करविले ?

१३. पहिल्या मुद्यावर विचार करावयाचा ह्मणजे या धरण्याच्या कटाची माहिती नानांना कधीं समजली याचा विचार करणें भाग आहे. दोन घटकापूर्वी, दोन दिवसांपूर्वी कीं आठ-पधरा दिवसांपूर्वी, नानांना ही कटाची माहिती लागली हें पहाणें योग्य होईल. याचा विचार करावयाचा ह्मणजे नानांनीं पर्वतीवर नारायणरावाना जो इषारा दिला तो पर्वतीवर सर्व मंडळी बोथाटी खेळत असताना दिला होता. हरिपंत फडके, नानाफडनविस वगैरे सर्व मंडळी जमली होती, अशा वेळीं नारायणराव पेशव्यांची स्वारी आली. सर्व मंडळींनी बोथाट्या खेळाव्या; मोठमोठ्या मंडळींनीं हजर असावें, श्रीमंत स्वारीनेंही त्या ठिकाणीं यावें, तो प्रसंग पर्वतीसारख्या देवस्थानच्या जागीं व्हावा, असा तो प्रसंग कोणता होता हें पहिल्यानें ठरविले पाहिजे. हा प्रसंग एकाद्या कुळाचाराचा अगर एकाद्या सणाचाच प्रसंग असला पाहिजे यांत संशय नाहीं. कारण त्या ठिकाणीं सर्वच मोठमोठी मंडळी जमली असता बोथाटी खेळणें शक्य नव्हते. शिवाय पेशवे अशा सर्व लोकासमोर हातात बोथाटी घेऊन खेळणार नाहींत. यावरून तो दिवस पेशवे दरबारीं पाळला जाणारा एकाद्या विशिष्ट सणाचाच असला पाहिजे असें ठरतें. या दृष्टीनें पहातां श्रावण शु॥ १५ हाच तो सणाचा दिवस असला पाहिजे. या दिवशी रक्षाबंधनाची चाल महाराष्ट्रांत सर्वत्र असे. ही चाल अद्यापीही नागपूर, बडोदें, वगैरे ठिकाणीं पाळण्यांत येते. या रक्षाबंधनाच्या दिवशीं मर्दानी खेळ आखाड्यांतून अद्यापीही ठेवले जातात. ते पहाण्याकरतां प्रतिष्ठित

लोकानांही बोलावण्यांत येतें. हे खेळ झाल्यानंतर एकमेकांनीं स्नेहभावानें एकमेकांच्या हातांत राखी बांधण्याचा समारंभ होतो. याचा अर्थ एवढाच कीं, एकमेकांनीं एकमेकांच्या रक्षणाकरतां या राखीबंधनानें बांधलें जावें. हा रक्षाबंधनाचा सण लष्करी लोकात मोठा मानला जातो. हा दिवस व्यापारी लोकांत नारळी पौर्णिमा म्हणून मोठा मानतात. कारण पावसाळ्यांत खवळलेल्या समुद्रामुळें जलमार्गावरील व्यापार बंद पडतो व या पौर्णिमेच्या मुहूर्तावर सागराला श्रीफळ अर्पण करून सर्व व्यापारी व्यापार सुरू करतात. म्हणून त्यांना नारळी पौर्णिमा हा सण मोठा वाटतो. त्याचप्रमाणें फौजेतील लोक पावसाळ्यांत आपापल्या घरीं जात असत. ते पुन्हां आपल्या फौजेंत नारळी पौर्णिमेच्या दिवशी परत येत. मोहिमेवर जाण्यापूर्वी फौजेंतील प्रत्येक शिपायाच्या रक्षणाची नैतिक जबाबदारी प्रत्येक इसमावर पडावी व परस्परांच्या मनांत कांहीं खासगी वितुष्ट असल्यास तें या समारंभानें जावें म्हणून हा रक्षाबंधनाचा सण प्रत्येक फौजेंत पाळण्यांत येत असे. लढाईवर जाणाऱ्या प्रत्येक इसमाने त्या दिवसाच्या सुमुहूर्तानें हातांत शस्त्र धरावें लागे. प्रत्येकानें प्रत्येकाच्या हातांत राखी बांधून रक्षाबंधन करावें लागे. हा समारंभ पर्वतीवर झाला. अर्थात् त्या ठिकाणची मंडळी म्हणजे फौजेंतील लोक होते. ही खाशी फौज असल्यामुळें हा समारंभ खाशांच्या खाशा जागेंत झाला. शिवाय तेथें नाना व हरिपंत फडके होते, यावरून ती फौज हरिपंत फडक्यांची होती असेंच ठरतें. ही फौज नारायणरावांच्या खासगी सरदाराची असल्यामुळें तेथें नारायणरावांना खासगी निमंत्रण येणें साहजिक होतें. त्या ठिकाणीं नाना व फडके नारायणरावांचा सन्मान करण्याकरतां समोर उभे होते हेंही योग्यच होते. यावरून नारायणरावांनीं नानांचें पागोटें उडविले तो दिवस श्रावण शु॥ १५ हाच होता हें निश्चित ठरतें.

१४ दुसऱ्या मुद्याचा विचार करावयाचा म्हणजे नानांनीं श्रावण शु॥ १५ च्या दिवशीं नारायणरावांना ज्याअर्थी धोक्याची सूचना

दिली, त्याअर्थी त्या दिवसाच्या पूर्वी कांहीं दिवस तरी नारायण-रावांच्या विरुद्ध निर्माण झालेल्या कटाची माहिती नानांना होती, हें सिद्ध होतें. नारायणरावांचा ज्या कटामुळें मृत्यु झाला, तो दिवस भाद्रपद शु॥ १३ हा होता. ह्मणजे अर्थात् नानांना निदान एक महिन्यापूर्वी या कटाची माहिती लागली होती हें निर्विवाद ठरतें. एक महिन्यापूर्वी नारायणरावांना धरण्याच्या कटाची माहिती नानांना लागल्यामुळें त्याचा बंदोबस्त करण्याची जबाबदारी सर्वस्वी नानांवरच होती. ती कोणत्याही कारणानें नानांना अंगाबाहेर टाकतां येणें शक्य नव्हतें. माधवरावांनीं नारायणरावांच्या संरक्षणाची जबाबदारी राघोबादादांवर टाकली होती. परंतु दादासाहेबांना कैदेत टाकल्यानंतर ती सर्व जबाबदारी नानांनीं आपल्या शिरावर घेतली होती. नारायणराव गंगापुराला गेले होते. त्यावेळीं राघोबादादा रुसून जाऊं लागले. तेव्हां त्यांना प्रतिबंध नानांनींच केला होता. शिवाय हैदराकडे पाठविलेला सांडणीस्वार त्यांनींच पकडवून त्याच्याकडून लखोटा काढून घेतला होता. शिवाय नाना व फडके हे नारायणरावांच्या कळकळीचे त्यांचे संरक्षणकर्ते त्यांच्या भोंवतीं चोवीस तास हजर होते. राघोबादादांनीं हैदरची कुमक घेऊन नारायणरावांना गादीवरून काढून टाकण्याचा कट नानांच्या मतें नारायण-रावांच्या गैर हजेरींत झाला होता, निदान तसा कट केल्याचा आरोप त्यांनीं राघोबादादांवर केला होता. असे खरोखर असलेले किंवा खरोखर नसलेलेही कट नानांनीं उजेडांत आणून गुन्हेगारांना शासन दिलें होतें. या वेळीं तरी नारायणरावांच्या रक्षणाची सर्व जबाबदारी नानांवर होती. असें असतां व इतके दिवस अगोदर या कटाचा सुगावा त्यांना लागला असतां, त्याबद्दल नाना फडनविस, हरिपंत फडके, बजाबा पुरंदरे वगैरे लोकांनीं कांहीं खटपट केली नाही, चौकशी केली नाहीं; नारायणरावांच्या संरक्षणाकरतां निराळी संरक्षक फौज ठेऊन बंदोबस्त केला नाहीं; किंवा ज्या दिवशीं गारद्यांचा दंगा झाला त्या दिवशीं स्वतः नारायणरावांनीं हरि-

पंत फडक्यांना दंग्याची आगाऊ वर्दी देऊनही त्यांनी त्याचा बंदोबस्त केला नाहीं. एक महिन्यापूर्वी सखारामबापूंचा हा कट चालू आहे असें नानांना समजलें होतें. नाना फडनविस, हरिपंत फडके व बजाबा पुरंदरे हे तिघे कारभारी एकचित्तानें वागणारे होते. ते सखारामबापूंचा द्वेष करीत होते. माधवराव पेशव्यांच्या वेळीं जसे राघोबादादा कैदेंत होते तसे सखाराम बापूही कैदेंतच होते. मग असें असतां आणि त्यांचा नारायणरावांना गादीवरून काढण्याचा कट चाललेला आहे हें जर नानांना समजलें होतें व नानांचें आणि सखारामबापूंचें मनोमनीं जर नीट नव्हतें, तर त्याचा पूर्ण फायदा नानासारख्या पाताळयंत्री मुत्सद्यानें केव्हांही घेतलाच असता. जीं माणसें मुळांत कांहीं नसतांना अंगीं गुन्हेगारी लादून पारिपत्य करणारी होती ती कटाचा इतका पत्तामुद्दा लागूनही गप्प बसणें शक्य नव्हतें. शिवाय नाना-फडनविस यांना दादासाहेबांचें वारेंसुद्धां नको होतें. ते गादीवर पुन्हां येणें ह्मणजे नाना फडनविस याचा प्रत्यक्ष आत्मघातच होता. नानांच्याच करामतीनें व दीर्घोद्योगानें ते पुनः कैदेंत पडले होते. दादासाहेब व सखारामबापू यांनीं कट करून नारायणरावांना धरणें व पुनः दादासाहेबांनीं स्वतः गादीवर बसणें हें नानांना व त्यांच्या सहकारभाऱ्यांना कदापि पसंत पडणें शक्य नव्हतें. शिवाय त्या वेळीं दादासाहेबांवर सक्त पहारे लागलेले होते. त्यांचीं अनुष्ठानें चाललीं होतीं. सखारामबापू सांगूनसवरून, दादासाहेबांच्या पक्षाचे, अर्थात् नांव बद्दू झालेले ते होते. त्यांना सैन्यबळ नाहीं, मनुष्यबळ नाहीं. दादांना एक चिठ्ठी पाठविली तर ती सांपडून कट उघडकीस येतो असा त्यांचा अनुभव. तेव्हां त्यांच्या एकट्याकडून कोणतेंही काम यशस्वी होणें शक्य नव्हतें. असें असतांना त्यांनीं जर नारायणरावांना धरण्याचा कट केला व तो नानांना समजला तर त्याचें त्यांनीं पारिपत्य पांच मिनिटांत केलें असतें. नानांनीं स्वतः किंवा त्यांच्या त्रिकुटापैकीं हरिपंत फडके व बजाबा पुरंदरे यांनीं त्याबद्दल चौकशी, योजना किंवा बंदोबस्त कांहींच केला नाहीं. त्यांनीं पक्षाभिमानानें अगर कर्तव्य ह्मणून किंवा अधिकारी ह्मणून सुद्धां तिकडे लक्ष दिलें नाहीं. दुसरा मुद्दा याप्रमाणें निकालांत येतो.

१५. यावरून हें अगदीं स्पष्ट होतें कीं, नारायणरावांना धरण्याबद्दल नाना फड-नविसांच्या विरुद्ध-पक्षाकडून कट झालेला नव्हता; 'स्वारीनें आपलें पागोटें संभाळावें' असें जें नाना फडनविसांनीं नारायणरावांना सांगितलें, यांतील जें मर्म आजपर्यंत इतिहासकार समजत आले तसें तें नसून त्यापेक्षां तें अगदीं भिन्न होतें. नानांनीं वरील उत्तरानें नारायणरावांना असें दाखविण्याचा प्रयत्न केला कीं, 'माझी तर पगडी पडलीच पण आतां तुम्हीं आपली पगडी संभाळा. मी आतां या गोष्टीचा वचपा घेणार आहे. सावध रहा.' हेंच अनुमान नानांच्या उत्तरांतून निघतें. दुसरें कोणतेंच निघूं शकत नाहीं. हेंच अनुमान इतिहासाच्या संगतीला व नानांच्या स्वभावाला जुळूं शकतें.

१६. नारायणरावांनी इतक्या मंडळीसमोर नानांचें पागोटें उडवून अपमान केला तो त्यांना सहन होणें अशक्य होतें. ज्या नानांचा दरारा सर्व लोकांना वाटत असे त्यांचा हा असा उपमर्द झालेला त्यांना कसा खपेल? त्यांनीं रागानें पेशव्यांना उत्तर दिलें. त्यांचें पारिपत्य करण्याचें नानांच्या मनांत पूर्ण बिंबलें; तरीपण मार्ग कोणता काढावा हा प्रश्न नानांच्या मनांत उभा राहिला. या वेळेपासून नानांच्या मनांत नारायणरावाविषयीं जसा तिटकारा व द्वेष उत्पन्न झाला तसाच दादासाहेबांबद्दल त्यांचा द्वेष पूर्वीपासून होताच. नारायणरावांना गादीवरून काढून राघोबादादांना गादीवर बसविणारा एक पक्ष त्यांच्याजवळ तयार होताच. परंतु नारायणरावांच्या जागीं राघोबादादा येणें हें खुद्द नानांनाच नको होतें. नारायण-रावांच्या पारिपत्याकरतां दादासाहेबांना गादीवर पुनः येऊं देणें ह्मणजे पर्यायानें तें खुद्द नानांनाच पारिपत्य मिळणारें होतें. नानांच्या मनांत नारायणरावांचें पारिपत्य तर झालेंच पाहिजे होतें. पण दादासाहेबांनीं गादीवर येतां उपयोगी नव्हतें. असें दुहेरी राजकारण नानांना साधावयाला पाहिजे होतें. आणि तसें साध्य करून घेतल्याशिवाय त्यांना चैन पडणें शक्य नव्हतें.

१७. या पागोटें उडविण्याच्या प्रकरणानंतर नारायणराव यांना धरण्याचा कट अस्तित्वांत आला. तो कट राघोबादादाकडून करवून घेणें हें एकच साधन होतें. कांट्यानेंच कांटा काढावयाचा हा कारस्थानी धर्म. राघोबादादांना उठाव देणारे सखारामबापू हे होतेच. नानांचा अपमान नारायणरावांनीं केला हें एका

अर्थी सखारामबापूंना समाधानाचेंच वाटलें. कारण त्यांच्या अपमानांत नाना आतां वांटेकरी झाले होते. त्यामुळें ' समानशीले व्यसनेषु सख्यं ' या न्यायानें नानांची व बापूंची गट्टी जमली. व ह्मणून बापूंनीं नारायणरावांना धरून कैदेंत टाकावें व दादासाहेबांना गादीवर बसवावें असा कट करण्याचा घाट घातला. या कटांत सखारामबापू, नाना फडनविस, हरिपंत फडके, बजाबा पुरंदरे, त्रिंबकमामा पेठे ही मंडळी सामील होतीं, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. हा कट गुप्त होता व तो नारायणराव पेशव्यांविरुद्ध असल्यामुळें गुप्तच ठेवावा लागला. या कटाशीं नानांचें अंग नाहीं असें दादासाहेबांना व लोकांना दिसावयाला पाहिजे होतें. कारण इतके दिवस त्यांनीं नारायणरावांचा पक्ष घेतला होता. तेव्हां या कटाचें प्रमुखत्व सखारामबापूंनाच देण्यांत आलें. कारण साधलें न साधलें तरी कानफाटे ह्मणून सखारामबापूंना नांव पडलेंच होतें. त्यांना कशाचा विधिनिषेध नव्हता. नारायणरावांना धरण्याची कामगिरी कोणाला द्यावी हा प्रश्न सखारामबापूंच्या पुढें होता. नारायणरावाना धरण्याचें काम राघोबादादांच्या पक्षाकडील एकाद्या सरदाराला सांगावें तर त्याला नानाचा विरोध होता. याचें कारण असें होतें कीं नारायणरावांना धरण्याच्या कामगिरीवर एकाद्या त्रयस्थ माणसाची योजना करावी. तो मागेल तें इनाम कबूल करावें पण तें त्याला न देतां कार्यसिद्धीनंतर त्याला राज्यांतून हांकलून लावावें. यामुळें फुकट काम पदरांत पडेल. परंतु पेशव्यांच्या राज्यांतील एकाद्या सरदाराची योजना जर या कामगिरीवर केली, तर तो भरमसाट इनाम मागेल व काम झाल्यानंतर त्याला त्याचें इनाम दिल्याशिवाय आपल्याला गत्यंतर राहणार नाहीं. शिवाय असल्या नाजुक कामांत आपल्या सरदाराकडून कामगिरी घेतली तर तो जन्मभर आपल्याला डोईजड होऊन बसणार! ह्मणून एकाद्या त्रयस्थ परदेशी इसमाची या कामगिरीवर योजना होणें इष्ट होतें. ही नानांची युक्ति अर्थात् सखारामबापूंना सयुक्तिक वाटली. त्याप्रमाणें सुमेरसिंग गारदी यास या कामीं पसंत करण्यांत आलें.

१८. ठरल्याप्रमाणें सुमेरसिंग याच्याबरोबर नारायणरावांना धरण्यासंबंधीं सखारामबापूंच्या वाटाघाटी सुरू झाल्या. सुमेरसिंग हा परदेशी माणूस. पैशाकरितां दाक्षिणेंत तो आलेला होता. त्यानें नारायणरावांना धरून देण्याच्या कामगिरीला मान्यता दिली.

त्याबद्दल इनाम ह्मणून पुरंदर, अहमदनगर व साष्टी हे तीन किल्ले व पांच लक्ष रुपये सुमेरसिंग यानें मागितले. खुद्द पेशव्यांना धरणें ही कामगिरी धोक्याची होती हें जाणून सुमेरसिंगानें वरील इनामाची मागणी केली होती. पेशव्यांना धरण्याच्या बाबतींत जर एकादे प्रसंगीं वेडावांकडा प्रकार झाला व आपले अंगावर बाज आली तर मुत्सद्दी लोक बाजूला राहातील व आपणाला तोफेच्या तोंडीं जाण्याचा प्रसंग येईल. कदाचित गोष्ट साधली तर जन्माचें कल्याण होईल, ह्मणून स्वतःच्या नशिबाची परीक्षा समजून सुमेरसिंगानें इनामाची अशी मागणी केली. दुसरें असें कीं, वरील तीन किल्ले मागणें ह्मणजे पेशव्यांच्या राज्यांतील खरे बंदोबस्ताचे ते किल्ले असल्यानें पर्यायानें पेशव्यांचें राज्यच मागण्यासारखें होतें. ह्मणून ही गोष्ट मुत्सद्दी कबूल करणार नाहींत असें सुमेरसिंगाला वाटलें असावें. कारण या मसलतींत मोठमोठे मुत्सद्दी पडले आहेत हें त्याला माहीत होतें. त्यांच्या शब्दाला या वेळीं मान दिला नाहीं तर, ते आपला घातही करण्याला तयार होतील, ह्मणून त्या भीतीनें त्यांचें बोलणेंही मानल्याप्रमाणें झालें व ते लोक आपली किल्ल्याची मागणी कबूल करणार नाहींत यामुळें आपणावरील संकटही सहज जाईल, याच बुद्धीनें सुमेरसिंग यानें इनामाची मागणी केली होती. परंतु मुत्सद्यांनीं सुमेरसिंगाची इनामाची मागणी अडथळे न आणतां कबूल केल्यामुळें सुमेरसिंगाला आपल्या नशिबाची परीक्षा पहाण्याकरतां नारायणरावांना धरण्याची कामगिरी हातीं घ्यावी लागली. मुत्सद्यांचा डाव असा होता कीं, इनामाची देणगी अगोदर द्यावयाची नाहीं. कार्यभाग उरकल्यावर ती देणें अगर न देणें त्यांच्या हातीं होतें. तेव्हां सुमेरसिंगाची मागणी कबूल करणे मुत्सद्यांना जड वाटण्यासारखें नव्हते. ही मुत्सद्यांची विचारसरणी होती. परंतु सुमेरसिंग कांहीं कमी नव्हता. तो मुत्सद्यांना ह्मणाला 'तुह्मीं माझी मागणी कबूल केली हें ठीक आहे. पण या इनामाला मला योग्य जामीनकी पाहिजे.' तेव्हां कारभाऱ्यांचें घोडें अडलें. सुमेरसिंगाला लिहून द्यावयाच्या कागदावर राघोबादादांची सही पाहिजे, अर्थात् त्यांची समजूत घालून त्या कागदावर त्यांची सही घेतली पाहिजे, तरच हें काम पार पडतें असें मुत्सद्यांस वाटलें. शेवटीं सखारामबापूंनीं राघोबादादांची समजूत घालून नारायणराव यांस धरावें या कागदावर त्यांची सही घेतली. त्यामुळें सुमेरसिंगाचें समाधान झालें व तो नारायणराव यांस धरण्याच्या कामगिरीला उद्युक्त झाला.

---

# प्रकरण १२ वें.

# नानांच्या कारस्थानाची जोडगोळी.

## इ० स० १७७३.

१. राघोबादादाच्या नजरकैदेचा बंदोबस्त कशा प्रकारचा होता. नारायणरावांस धरावें या यादीवर राघोबादादांची सखारामबापूंनी सही घेतली त्याला नाना फडनविसांची अनुमती होती असाच निष्कर्ष निघतो.—२. नारायणरावांस धरावें या यादीवर राघोबादादांनीं कां सही केली याची समर्पक कारणें.—३. सुमेरसिंग गारद्याला नारायणरावांस धरण्याबद्दल इनाम देण्याचें धरण्याच्या यादींत कलम नाही. हें इनाम सखारामबापू वगैरे मुत्सद्यांनींच ठरविलें असावें, ह्मणून इनामाच्या रकमेबद्दल इतिहासकारांची एकवाक्यता नाही.—४. नारायणराव पेशव्यांचे शरीरसंरक्षक व हुजुरातीं फौजेचे सर्वाधिकारी हरिपंत फडके होते. हरिपंत फडक्यांच्या सल्ल्यानें वागलांत तरच जगाल असा माधवराव पेशव्यांचा नारायणरावास उपदेश.—५. हरिपंत फडके यांची धरण्याच्या कटाला संमती होती, एवढेंच नव्हे तर साहाय्य होतें.—६. नारायणरावांना धरून राघोबादादांनीं पेशवाईच्या कारभारांत येणें हें नानांच्या पक्षाला नावडे होतें. या धरण्याच्या कटामुळें नानांच्या पक्षावर पडणारी जबाबदारी.—७. नानांच्या कारस्थानाची रूपरेषा नारायणराव मरावयाला पाहिजे होते पण राघोबादादा गादीवर यावयाला नको होते अशी होती.—८. तुळ्या पवार यावेळीं कोणाच्या नोकरींत होता, त्याचा दर्जा काय होता व नारायणरावांबद्दल त्याच्या मनात सुडाची कल्पना किती प्रमाणांत असूं शकेल याची मीमांसा.—९. धरण्याच्या कटांत मारण्याचा कट निर्माण करण्याची जरूरी. नारायणरावांस मारण्याच्या कटाची नानांची उभारणी.—१०. मारण्याच्या कटांत तुळ्या पवाराला सामील करून घेण्याची नाना फडनविसांची निवड.—११. नाना फडनविस हे धरण्याच्या कटाचे व मारण्याच्या कटाचे सूत्रधार होते. घाशीराम कोतवाल मारण्याच्या कटांतील नानाचा प्रमुख हस्तक होता.—१२. तुळ्या पवार व सुमेरसिंग यांचें सहकार्य कसें घडून आलें.—१३. नारायणरावास धरण्याच्या व मारण्याच्या कटाची कशी गुप्त प्रकारें सिद्धता नानांनीं केली.

१. मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सखारामबापूंनीं 'धरावा' या यादीवर दादासाहेबांची समजूत घालून सही घेतली असा मजकूर आला आहे. दादासाहेब, खरें पाहूं गेलें असतां, वांकडी गोष्ट करणारे नाहींत, तेव्हां या यादीवर तरी त्यांनीं सही कशी केली, याबद्दल साहजिक शंका उत्पन्न होते. त्यांतून ते त्या वेळीं अनुष्ठानांच्या मार्गे असून पारमार्थिक मार्गाचा आनंद उपभोगीत होते. त्यांची स्वार्थाचीही इच्छा नष्ट झालेली होती. असें असतां नारायणरावांना धरण्याच्या बाबतीत त्यांनीं यादीवर सही कशी केली व ती कोणत्या हेतूनें केली हें पहाणें जरूर आहे. या यादीवर दादासाहेबांनीं सही केली, त्या वेळीं त्यांची कैद फार सक्त होती. गायत्री पुरश्चरणें चालू होतीं. सूर्याचें दर्शन होऊं नये म्हणून त्यांना चारचार, आठआठ दिवस कोंडून घालण्यांत येत होतें. त्याचप्रमाणें आनंदीबाईंच्या छळाचीही परमावधी झालेली होती. पहारा सक्त होता. कोणाच्या भेटी घेऊं द्यावयाच्या नाहींत, कोणाच्या भेटीला त्यांनीं जावयाचें नाहीं अशी सक्त कैद. कोणाला चिट्टी लिहावयाची नाहीं, कोणी दादासाहेबांना चिट्टी पाठवावयाची नाहीं, एवढा कडक बंदोबस्त होता. दादासाहेबांच्या नोकरींतील माणसें अगदीं बेताचीं व तीं पेशव्यांच्या व नानांच्या पूर्ण विश्वासांतलीं होतीं. शिवाय या वेळीं दादासाहेबांना जी कैद झाली होती ती नारायणरावांना गादीवरून काढून टाकून ते स्वतः गादीवर बसणार असल्याच्या राजद्रोहाच्या भयंकर स्वरूपाची होती. अर्थात् यावेळी त्यांना कोणत्याच प्रकारची व कसलीच सवलत नव्हती, इतकी ती पूर्ण सक्त कैद होती. माधवरावांच्या वेळीं दादासाहेबांच्या कैदेला कांहींतरी सवलत असणें शक्य होतें. तरीसुद्धा एका कुणबिणीनें दुसऱ्या कुणबिणीस दिलेली चिट्टी पकडण्यांत आली. परंतु आतां त्याहीपेक्षां दादांची कैद सक्त होती. तेव्हां दादांच्या जागेकडे पेशव्यांच्या कडक पहाऱ्यांतून व खुद्द पेशव्यांच्या व नानांच्या कडक देखरेखींतून चिटपांखरूं सुद्धां जाणें शक्य नव्हतें. असें असतां दादांनीं नारायणरावांना धरण्याचा स्वतंत्र कट करणें हें घोड्याला शिंगें येण्यापलीकडे एक अशक्य कारस्थान होतें. त्याचप्रमाणें भोंसल्याचे वकील व्यंकटराव काशी व

लक्ष्मणराव काशी, परभु मंडळीपैकीं सखाराम हरी वगैरे मंडळी, त्याचप्रमाणें भवानराव प्रतिनिधि, सदाशिव रामचंद्र, विठ्ठल शिवराम, चिंतो विठ्ठल, सखोरामबापू या मंडळींनीं गुप्त कट करून रावोबादादांना सोडविण्याचा प्रयत्न चालविला होता, असें ह्मणावें तर, धरावा या यादीवर दादासाहेबांची सही होती. ज्या ठिकाणीं चिटपांखरूं जाऊं शकणार नाहीं, त्या ठिकाणीं सखारामबापू स्वतः जाऊन त्या यादीवर दादासाहेबांची सही घेऊन येतात, हेंही वाळू मर्दन करून तेल काढण्याइतकेंच अशक्य होते. शिवाय नारायणरावांविरुद्ध कट चालला आहे, हें नाना फडनविस यांना एक महिन्यापूर्वीच समजलें होतें. तेव्हां त्यांनीं दादासाहेबावरील बंदोबस्त जास्त कडक ठेवला असला पाहिजे यांत संशय नाहीं. त्याचप्रमाणें सुमेरसिंग गारदी यानें शनिवारवाड्यांत दादासाहेबांच्या कैदखान्यांत जाऊन त्यांची भेट घेणें व नारायणरावांना धरण्याच्या हुकमाची यादी लिहून घेऊन येणें, हेंही मृगजल पिऊन तहान भागविण्याइतकेंच अशक्य कोटींतलें होतें. अशा दादांच्या कैदखान्याची चारही बाजूंनीं नाकेबंदी असतां व नाना फडनविस यांच्या कडक बंदोबस्ताचा इतक्या दिवसांचा दादासाहेबांना अनुभव असतां, सखारामबापू हें दादासाहेबांकडे ज्यावेळीं राजरोस आले, त्यावेळीं दादासाहेबांना आश्चर्य वाटलें असेल यांत शंका नाहीं. शिवाय त्यांनीं कडक अनुष्ठानें चालविलीं होतीं. त्यामुळें परमेश्वरालाच दया आली अशी त्यांची भावना झाली असल्यास त्याचेंही नवल वाटण्याचें कारण नाहीं.

२. नारायणरावांना धरण्याच्या हुकमाच्या यादीवर दादासाहेबांनीं सही केली, अर्थात् त्यांच्या मनोधर्माप्रमाणें त्यांचें समाधान झाल्याशिवाय त्यांनीं ती सही केली नाहीं हें स्पष्ट आहे. अर्थात् त्यांना सखारामबापूंनीं ज्या गोष्टी सांगितल्या त्यामुळें त्यांचें समाधान झालें हें निश्चित होतें. आतां त्यांचें समाधान होण्याजोग्या गोष्टी कोणत्या होत्या तें येथें देणें योग्य आहे. १ नारायणरावांनीं सर्व मोठमोठ्या लोकांचे अपमान केले व त्याचप्रमाणें शेवटीं प्रत्यक्ष

१ ऐ. क. सं. पान १९६०

नाना फडनविस यांचें सर्वांसमक्ष पागोटें उडवून अपमान केला. त्यामुळें सर्वच कारभारी मंडळी नारायणरावांवर भयंकर नाराज व रुष्ट झालेली आहेत. २ परभूंना धार्मिक बाबतींत अन्यायाचा ठराव देऊन व त्यांचे हालहाल करून त्या समाजांत नारायणरावांनीं स्वत:विषयीं भयंकर द्वेष उत्पन्न करून घेतला आहे. ३ दादासाहेबांना कैदेंत टाकल्यामुळें हैदर भयंकर रागावला असून तो पेशव्यांच्या राज्यावर मोठी फौज घेऊन आक्रमण करण्याकरतां निघाला आहे. ४ हैदराच्या पारिपत्याकरतां हिंदुस्थानांतील फौज परत पुण्यास मागविल्यानें, गेली तीन चार वर्षे हिंदुस्थानांत मराठ्याची सत्ता प्रस्थापित-करण्याकरतां जे परिश्रम झाले ते सर्व व्यर्थ गेले. ५ नागपूरकर भोंसल्यांमध्यें युद्ध सुरू झालें तें साबाजीच्या पक्षाकरतां नारायणराव चिडीला पेटल्यामुळें झालें आहे. याप्रमाणें पेशव्यांच्या खुद्द दरबारांत व त्यांच्या राज्यांत जिकडे तिकडे अंदाधुंदी, अस्वस्थता, असंतोष व लढाया माजल्यामुळें पेशव्यांच्या राज्याला केव्हां व कसा धोका येईल हें सांगवत नाहीं. नारायणरावांना जग मूर्ख किंवा बाळ ह्मणतील. पण पेशवाई बुडविल्याचें खापर मात्र दादासाहेब व कारभारी यांच्या डोक्यावर फुटेल. तेव्हां राज्याच्या रक्षणाकरतां यावेळीं नारायणरावांना कैदेंत ठेऊन दादासाहेबांनीं कारभार पाहिला, तरच पेशव्यांची गादी जिवंत राहते. सर्व कारभारी व सर्व सरदार यांनी दादासाहेबांना गादीवर आणण्याची संमती देऊन ते आपापल्या जबाबदारींतून मुक्त झाले आहेत. या वेळीं दादा-साहेब जर कारभाऱ्यांची गोष्ट न ऐकतां अनुष्ठानें करीत बसतील तर पेशवाई बुडविल्याचें खापर एकट्या दादासाहेबांच्या डोक्यावर फुटेल. या सर्व गोष्टी ऐकून घेऊन राघोबादादांनीं आपलें कर्तव्य समजून यादीवर सही केली, असें स्पष्ट अनुमान निघतें.

३. नारायणरावांना धरण्याकरतां सुमेरसिंगाला जें इनाम सखारामबापूंनीं ठरविलें त्या बाबतींत इतिहासकारांचीं निरनिराळीं मतें आहेत. कोणी पुरंदर, नगर, साष्टी हे तीन किल्ले व पांच लाख रुपये इनाम देण्याचें ठरलें होतें, असें ह्मणतात. कोणी फक्त तीन लाख रुपयांचें इनाम ठरलें असें ह्मणतात.

१ ऐ. ले. सं. पान १९६१. २ मराठी साम्राज्याची छोटी बखर पा. ९६. महादजी शिंदे यांचें चरित्र पान११६. ना.भों.ब.पा. ९४.

कोणी असें ह्मणतात कीं सुमेरसिंगाला फक्त नऊ लक्ष रुपये देण्याचा करार दादासाहेबांनीं केला होता. कांहीं ठिकाणीं सहा किल्ले व तीन लक्ष रुपये असा ठराव होता असेंही दिसून येतें. एकंदरींत इनामाचा ऐवज पहिल्यानें व्यवहार ठरविण्याच्या वेळी जर नक्की आलेला होता, तर त्या बाबतींत त्याला इतकीं तोंडें फुटण्याचें कारण नव्हतें. दादासाहेबांनीं जी यादी सुमेरसिंगाला लिहून दिली, त्या यादींत या इनामाचा तपशील असता तर इतके निरनिराळे तपशील खात्रीनें बाहेर आले नसते. एकंदरींत ज्या गोष्टीबद्दल ती यादींत नमूद केली असती तर एकवाक्यता सहज होऊं शकली असती ती गोष्ट यादींत नसली पाहिजे. यावरून दादासाहेबांनीं ज्या हुकमाची यादी सुमेरसिंगाला दिली त्यांत इनामाचें कलम नव्हतें हेंच सिद्ध होतें. हें इनाम अर्थात् सखाराम-बापू वगैरे मंडळींनीं सुमेरसिंगाबरोबर ठरविलें होतें; ह्मणूनच पुढें त्याला निर-निराळीं तोंडें फुटलीं होतीं. कांहीं इतिहासकारांचा असा तर्क आहे कीं ज्या-अर्थी पुरंदर, नगर व साष्टी हे मराठी राज्याच्या नाक्याचे किल्ले असल्यानें ते दिले गेल्यास मराठी राज्यच सुमेरसिंगाला दिल्याप्रमाणे होणार होतें. राघोबा-दादांनीं ही असली सुमेरसिंगाची अट कधींही कबूल केली नसती. त्यांनीं फक्त पैशाची बाब कबूल केली असेल व ती केवळ नारायणरावांना धरण्यापुरतीच असेल. पण किल्ल्याची जी मागणी मान्य करण्यांत आली, ती राज्यकारभार न जाणणाऱ्या एकाद्या स्त्रीची ह्मणजे आनंदीबाईची असावी. अर्थात् ती नारायणरावांना मारण्याकरता जादा बक्षिसाची असावी, असेहा तर्कवितर्क निघा-लेले आहेत. परंतु हे तर्क इतिहासकारांच्या डोक्यांतून स्वतंत्रपणें आले असल्यानें त्यांचा विचार करण्याचें कारण नाहीं. ऐतिहासिक माहितीवरून मात्र असें ठरतें कीं राघोबादादांनीं सुमेरसिंगाला फक्त 'धरावा' एवढाच हुकूम दिला; आणि इनामाची रक्कम जी द्यावयाची ठरली ती मात्र सखारामबापू वगैरे कार-भाऱ्यांनीं ठरविली हें निश्चित आहे. या करारांत आनंदीबाईचें कोणत्याही प्रकारें अंग नव्हतें. तसें अंग असलेलें दाखवावयाला आजपर्यंत कोणाजवळ

१ पेशव्यांची बखर पान ८६.

तसा पुरावा नाहीं. त्याच्या उलट मात्र अनेक पुरावे आहेत. ते क्रमानें योग्य स्थळीं येतील.

४. पेशव्याच्या नोकरींत गारदी लोक होते. त्यात सुमेरसिंग, खरगसिंग व महंमद इसब असे तीन जमातदार होते. सुमेरसिंग हा जमातदारांचा म्होरक्या असल्यामुळे त्यानें आपल्या डोक्यावर घेतलेल्या जबाबदारीचे वांटेकरी बाकीचे दोघे झाले. यांच्या पलटणींत रोहिले, हबशी, पुरभय्ये, आरब वगैरे सर्व परदेशी लोकच होते. यांत मराठे लोक बिलकुल नव्हते. या गारद्यांच्या पलटणीं मोठ्या इमानी मानल्या जात असत. ज्याचे ते नोकर असत व ज्याचें ते अन्न खात असत त्याची चाकरी ते इमानेंइतबारें करीत असत. हे सर्व लोक लष्करी शिस्तीचे होते. वरिष्ठ अंमलदाराच्या हुकमाप्रमाणें कार्य करावयाचें एवढेंच त्याना लष्करी शिस्तीचें वळण होतें. राजकारणांतील डावपेंच त्यांना माहीत नव्हते. ही पलटण पेशव्यांच्या नोकरींतील असल्यामुळें त्याचे अन्नदाते यावेळीं नारायणराव हे होते. या पलटणीवर नारायणरावाच्यातर्फे हरिपंत फडके यांचें नियंत्रण होतें, व हरिपंतावर नानाफडनविस यांचे लक्ष होतें. नारायणराव हे बाळ असल्यामुळें त्यांचे प्रत्यक्ष नियंत्रण कोणत्याच फौजेवर नव्हतें. हरिपंत फडके यांच्याच प्रत्यक्ष अधिकारांत सर्व सरकारी फौज यावेळीं असे. माधवराव पेशव्यापासून या पलटणी हरिपंत फडके यांच्याच ताब्यांत होत्या. पुणे शहरावर कांहीं संकट आल्यास त्याचें निवारण हरिपंत फडके यानाच करावें लागत होतें. शनिवारवाड्यावरील पहाऱ्यावर हरिपंत फडक्यांचाच अंमल होता. त्यामुळें त्यांच्याच संरक्षणाखाली पेशव्याना प्रत्यक्ष रहावें लागे. माधवराव पेशवे हे सुद्धा हरिपंत फडक्याच्या संरक्षणाखालीं अशा तऱ्हेनें असल्यामुळें, ते हरिपंतावर विशेष लोभ करीत असत व त्यांना ते नेहमीं जवळ ठेवीत होते. नारायणरावांनाही एकदां माधवरावांनीं स्वतःचें रक्षण कसें होईल याबद्दल उपदेश केला होता. 'श्रीमंत रावसाहेब ( माधवराव पेशवे ) यांनीं एकांतीं नारायणरावसाहेब यांस सांगितलें होतें 'जें काय करणें तें हरीपंत यांचे विचारें करीत जा, तर

काहीं दिवस वांचशील, नाहीं पेक्षा तुझ्या जिवास कठीण आहे.' याप्रमाणें माधवरावांचा नारायणरावांना स्पष्ट शब्दात उपदेश होता. या माधवरावाच्या सूचनेतून दोन अर्थ स्पष्ट निघतात. हरिपंत फडके हे पराक्रमी सरदार आहेत. ते चांगले फौजबंद आहेत. त्यांच्यावर पेशव्याच्या संरक्षणाची जबाबदारी आहे. पेशव्यांना स्वतःच्या संरक्षणाची जबाबदारी नेहमींच सांभाळता येत नाहीं. तेव्हां त्याच्या रक्षणाची जबाबदारी त्यांच्या विश्वासांतील मनुष्यावरच टाकावी लागते. तसेच हरिपंत फडके हे शत्रूपासून पेशव्यांचे रक्षण करणारे आहेत, ह्मणून त्यांच्याशीं प्रेमानें वागून व त्यांचें मन प्रसन्न ठेऊन पेशव्यांनी वागले पाहिजे. तसें न करतां जर संरक्षण करणाऱ्या इसमाला दुखविलें, व जर तो आपला शत्रू झाला, तर मात्र त्याच्या तावडीतून प्रत्यक्ष परमेश्वरही वांचवूं शकत नाहीं. याचा अर्थ एवढाच कीं, संरक्षणकर्त्याला शत्रू बनवूं नये. तो उलटला ह्मणजे प्राण घेतल्याशिवाय सोडीत नाहीं. हा नीतिधर्म माधवरावांनीं नारायणराव यांना सांगितला होता व नारायणरावांचे मरण कशांत होतें हेही त्यांच्या नजरेला त्यांनीं आणून दिलें होतें. "काय करणें ते हरिपंत यांचे विचारें करीत जा, तर कांहीं दिवस वांचशील, नाहीं पेक्षा तुझ्या जिवास कठिण आहे." या वाक्यांत माधवरावांनीं अगदी स्पष्टपणें नारायणरावानीं काय केले पाहिजे याचा उल्लेख केला आहे व इषाराही दिला आहे. हरिपंतांच्या विचारानें जाशील तर जगशील; नाहींतर मरशील, अर्थात् जगविणें किंवा मारणें या दोनही गोष्ट हरिपंताच्या हातीं होत्या, हें माधवरावांनीं अनुभवानें मिळविलेलें ज्ञान त्यांनीं नारायणरावांना एकांतीं सांगितलें.

५. हरिपंत फडके यांना ह्मणजे आपल्या संरक्षकाला नारायणरावांनीं बरेच प्रसंगी दुखविलें होते. त्यांचा त्यांनीं अपमान केला होता. मनाला वाटतील त्या गोष्टी ते त्यांना करावयास सांगत होते. यामुळें हरिपंत फडके नारायणरावांच्या समोर येण्याचे पुढेंपुढे टाळूं लागले. झालेल्या अपमानाबद्दल

१ हरिवंशाची बखर पान ४०.

हरिपंतांना वाईट वाटून ते उदासीन राहत असत. पुढें नारायणरावांकडून प्रत्यक्ष नानांचाही अपमान झाला. त्यामुळे हरिपंत फडक्यांनासुद्धां नारायणरावांचा जास्त राग आला. आपण ज्याचें संरक्षण करतों ती व्यक्तीच आपल्या माणसावर उलटूं लागली, हें पाहून त्या व्यक्तीचें संरक्षण करण्याची भावना त्यांच्या मनातून गेली. हरिपंतांची तरवार संरक्षण करण्याकरतां जशी तरबेज होती तशी ती जीव घेण्याकरतांही मजबूत होती. त्यामुळें 'रक्षणकर्ता हात' मागें घेऊन 'मारता हात' पुढें करण्याचा हरिपंत फडक्यांवर साहजिक प्रसंग आला. कुणाचीच संमति असल्यानंतर कुणाचा विध्वंस व्हावयाला कितीसा उशीर लागणार ? आपल्या सेनापतीची संमति असल्यानंतर सुमेरसिंगाला नारायणरावांना धरण्याची कामगिरी पार पाडण्याला अशक्य असें कांहींच नव्हतें.

६. या वेळीं नाना फडनविस याचा पक्ष बुद्धिमत्तेनें, लष्करी सामर्थ्यानें किंवा पैशाच्या दृष्टीनें राघोबादादाच्या पक्षापेक्षां निःसंशय बलिष्ठ होता. नारायणरावांना धरण्याचा जो कट झाला, त्याची इत्थंभूत माहिती नानाना होती. परंतु केवळ नारायणराव धरले जाणें एवढीच गोष्ट त्याना साधावयाची नव्हती. नारायणराव पेशव्यांच्या नावावर नानांच्या पक्षाचें जीवित अवलंबून होतें. नारायणराव बंदींत पडून राघोबादादांनीं गादीवर येणें व आपल्या हातांतील एक बाहुलें दादांच्या हस्तगत होणें असा दुहेरी पेंच नानांच्या पक्षावर होता. दादासाहेब गादीवर येणें हें जितकें नानांना भयप्रद होतें, त्यापेक्षां किंबहुना जास्त, नारायणराव दादांच्या स्वाधीन होणें हें भयप्रद होतें. 'दादासाहेबांच्या बंदींत नारायणराव राहिले तर चुलते पुतणे केव्हांही एक होतील व ते एक झाल्यानंतर आह्मी कट निर्माण केलेले लोक तोंडघशीं पडून आपल्याच पायावर आपण दगड मारून घेतल्याप्रमाणें होईल.' राघोबादादा गादीवर आल्यानंतर कोणत्याही निमित्तानें नारायणराव नानांच्या कैदेंत स्वतंत्रपणें राहणें शक्य नव्हतें. तेव्हां नानांच्या पक्षाचें जें खरें शस्त्र तें दादासाहेबांच्या पक्षाच्या हातींत देण्याइतके मूर्ख

नाना फडनविस अगर त्यांच्या पक्षांतील लोक खात्रीनें नव्हते. ह्मणून नारायणरावांना जिवंत न ठेवणें हेंच नानाच्या पक्षाला पाहिजे होतें. असें घडून आल्यानेंच नाना व नानांचा पक्ष जिवंत राहणार होता.

७. नारायणरावांच्या जीवितार्ची जबाबदारी नानांवर व हरिपंत फडक्यांवर होती. त्याच्याच रक्षणाखालीं पेशवे होते. अशा स्थितीत नारायणरावांना विषप्रयोग करून किंवा त्यांचेवर मारेकरी घालून अगर कोणत्याही अन्य प्रकारांनी त्यांचा बिनबोभाट नानांना खून करता आला असता. परंतु या उपायानें नारायणराव मेले असते, पण त्यांच्या जागीं राघोबादादा आले असते व नाना फोपाट्यांतून निघून निःसंशय आगींत पडले असते. त्यांत त्यांचा कोणताच हेतु साध्य होण्यासारखा नव्हता. नानांना नारायणराव मरावयाला पाहिजे होते व दादासाहेब गादीवर यावयाला नको होते. अर्थात् नारायणरावाचा मृत्यू राघोबादादाना गादीवर न येऊं द्यावयाला कारणीभूत झाला पाहिजे अशी रामबाण मात्रा नानाना आपल्या सुपीक कारस्थानी डोक्यांतून निर्माण केली पाहिजे होती. त्याशिवाय त्यांचा तरणोपाय नव्हता. नाना हे झटपट रंगारी होते. पण त्याच्या कारस्थानाचा रंग मात्र पक्का होता.

८. तुळाजी पवार या नावाचा एक पेशव्याचा खिदमदगार होता. खिदमदगार म्हणजे पेशव्यांचे जोडे उचलणे, ते सभाळणे, पेशव्यांचे हात पाय चेपून देणे, पिकदाणी उचलणे, कपडे काढणे, वगैरे पेशव्यांचीं सेवेचीं कामे करणारा एक नोकर होय. हा तुळाजी नारायणरावांच्या सेवेत असतांना त्याला नारायणरावांनी सवींदरात फटके दिले होते.[1] हा तुळाजी पवार खरोखर कोणाचा नोकर होता याबद्दल इतिहासकार व बखरीकार यांची एकवाक्यता नाहीं. कोणी ह्मणतात कीं तो नारायणरावांचा नोकर[2] होता. कोणी ह्मणतात की, तो दादासाहेबांचा नोकर[3] होता. कोणी ह्मण-

१. पेशव्याची बखर पान ८८, टाप १४. २. ऐ. ले. सं. पान १९६४.
३. पेशव्याची बखर पान ८७.

ात कीं तो आनंदीबाईंचा नोकर होता. तुळाजी पवार याच्या नोकरीबद्दल ासे तीन दाखले सांपडतात. तेव्हां तो नोकर होता तरी कोणाचा येथें पाहणें जरूर आहे. कारण नारायणराव पेशव्यांचा वध ज्या कारथानामुळें झाला त्या कारस्थानामध्यें सुमेरसिंगाप्रमाणें तुळाजी पवार हा प्रामुयानें पुढें आलेला आहे. तेव्हां तो जर एक सामान्य खिदमदगार होता र तो नारायणरावांचा वध करण्यास प्रवृत्त होण्याइतका एकदम मोठा ासा झाला हें पहाणें जरूर आहे. तो एकदम रंकाचा राव किंवा शेळीचा ाघ कोणत्या मांत्रिकाच्या मंत्रानें बनला, याची मीमांसा होणें येथें आवश्यक ाहे. नारायणरावांचा तो खिदमदगार असतांना त्यांनीं त्याला सर्वांसमक्ष ाटके मारले होते, व त्याचा सूड घेण्याकरतां तुळाजी नारायणरावांचा 'ध करण्यास उद्युक्त झाला अशी एक कारणपरंपरा दाखविली जाते. ी खरी असल्यास नारायणरावांनीं तुळाजीला संताप चढण्याइतके फटके ारले असले पाहिजेत असें ठरतें. नोकर मनुष्याकडून चूक झाली व या चुकीबद्दल मालकांनीं फटके मारले तर मालकाचा उलट सूड घेण्या:तकी हलक्या नोकराची प्रवृत्ति असत नाहीं. सर्वांसमक्ष फटके मारले, यामुळें त्याचा अपमान झाला, एवढी त्याची अब्रू खात्रीनें नाजूक नव्हती. जोडे उचलणाऱ्या इसमाला आपल्या अब्रूची एवढी मोठी चाड असेल असें संभवत नाहीं. कारण हलकी कामें करणाऱ्या नोकराना पेशव्यांच्याच काय पण इतर अंमलदारांच्या रोज लाथा खाव्या लागत असतात. आणि त्यांतच त्यांना आपली नोकरी संभाळून रहावें लागतें. हलकी नोकरी करून दोन पैसे आपल्या प्रपंचाकरतां पदरांत पाडून घेणे याच्या रेक्षां त्यांना जास्त कांहीं पहावयाचे असत नाहीं. आज मालकानें फटके मारले तर उद्यां एकादें बक्षिसही तोच मालक देतो. त्यावेळीं मागच्या फटक्याचें :याला विस्मरण होऊन गेलेलें असतें. शिवाय मानापमानाची चाड असावयाला तुळाजी हा कांहीं कोणी सरदार, मानकरी, मुत्सद्दी किंवा एकादा प्रतिष्ठित पंडीतही नव्हता. माधवरावांच्या कारकीर्दीपासून ही अशी शिक्षा

१. हरिवंशाची बखर पान ४२

करण्याची प्रथा पडलीच होती. गंगोबातात्या दिवाण यांच्या तोंडांत भरदरबारांत माधवरावांनी मारली होती. त्याचप्रमाणें दिनकर महादेव जोशी यांच्याही तोंडांत त्यांनीं भर पगतीत मारल्या होत्या. परंतु त्या मोठमोठ्या लोकांचा सर्वांसमक्ष अपमान असा झाला म्हणून त्यांचा सूड घेण्याच्या इच्छेनें माधवरावांचा वध करण्याचा त्यांनी कधीं कट केलेला नाही. असे असता केवळ नारायणरावांनीं फटके मारले म्हणून तुळाजी पवार त्यांचा वध करण्याला तयार होईल असें संभवत नाहीं. तुळाजीच्या मनात नारायणरावाबद्दल द्वेष राहिला असतां तर तो त्या दिवसापासून त्याच्या नोकरींत राहिला नसता. त्यांची नोकरी सोडून तो दादासाहेबाकडे नोकरीला राहिला असतां तर नारायणरावांना ही गोष्ट आवडली नसती. शिवाय यावेळीं दादासाहेब सक्तीच्या नजरकैदेंत होते. त्याचीं नोकरमाणसें नारायणरावांच्या व नानाच्या विश्वासांतलींच ठेवण्यांत आलीं होतीं. अर्थात् नारायणरावांचा मार खाल्लेला व त्यांची नोकरी सोडून गेलेला नोकर त्यांनीं राघोबादादाकडे राहूं देणें अगदींच संभवत नाहीं. तेव्हा तो नोकरींत असल्यास नारायणरावांच्याच नोकरींत असणे शक्य होतें. दादासाहेबांच्या किंवा आनंदीबाईच्या नोकरींत या वेळीं तो होता असें ह्मणणें हिशेबांत बसत नाहीं.

९. नाना फडनविस यांनी नारायणरावाना जो धरण्याचा कट केला तो सर्व मुत्सद्यांचा सार्वजनिक असा कट होता. त्या कटांत नारायणरावांना मारण्याचा अगदीं अंतस्थ असा खासगी कट नानांनीं केला. त्या कटाचे असें स्वरूप होतें कीं नारायणरावांना तर ठार करावयाचें, पण त्यांच्या खुनाचा आरोप राघोबादादा आणि आनंदीबाई यांच्यावर मुद्दसूद लादून त्यांनीं या केलेल्या ब्रह्महत्येच्या व राजहत्येच्या पापाबद्दल राघोबादादांना पेशव्यांच्या गादीला नालायक ठरवावयाचें. अशा प्रकारानें राघोबादादा नालायक ठरले ह्मणजे पेशव्यांच्या राज्यांतील सर्व सरदारांच्या मनांतून ते उतरतील व प्रजेलाही त्यांचा तिटकारा येऊन ते सहजच बहिष्कृत होतील. ते ब्रह्मघातकी, महापातकी अशी त्यांची अपकीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरेल व

त्यांना कोणी आपल्या वाऱ्यालासुद्धां उभें करणार नाहीं. यामुळे पेशव्यांचें राज्य चालविण्याचा सर्व कारभार पूर्ण अख्त्यारीनें आपल्या पक्षाच्या ताब्यांत येईल, असा नानांच्या मनाचा ठाम कयास झाला होता. ह्मणून आपलें कोणत्याही प्रकारें त्यांत अंग न दिसतां या मारण्याच्या कटाची कशी उभारणी करावी याचा ते विचार करूं लागले.

१०. नाना फडनविस यांच्या दृष्टीला नारायणरावांना मारण्याच्या कटाचें काम उत्तम तऱ्हेनें पार पाडून नेण्यासारखा तुळाजी पवार हा दिसला. तो पेशव्यांचा खिदमदगार असल्यानें तो रात्रंदिवस त्यांच्या सान्निध्यांत होता. नारायणराव बाहेर जातात केव्हां, जेवतात केव्हां, झोंपतात केव्हां, उठतात केव्हां, वगैरे अगदीं लहान सहान गोष्टीसुद्धां त्याला माहीत असावयाच्या. कोठें जेवावयाला जावयाचें असलें, किंवा कोणाची भेट घ्यावयाची असली, तरी त्याची सर्व माहिती याला असे. शिवाय दादासाहेब, आनंदीबाई, गंगाबाई, पार्वतीबाई, सगुणाबाई वगैरे सर्वांच्या हालचाली, तो वाड्यांतच असल्यामुळें, त्याला सहज समजत असत. शनिवारवाड्यांतील लपून बसण्याच्या जागा, चोरवाटा, दालनें, खोल्या, नोकरांच्या जागा, पहारेकऱ्यांच्या ओवऱ्या, वगैरे शनिवारवाड्यांतील सर्व कोनाकोपऱ्याची देखील माहिती त्याला होती. तो हुशार असून सांगितलेली कामगिरी ईर्षेला चढून पार पाडणारा होता. शिवाय त्याला नारायणरावांनीं फटके मारल्यामुळें त्याच्या मनांत तें शल्य होतेंच. श्रीमंतांच्या सहवासांत राहून चैन कशी करावी, श्रीमंतींत काय मजा आहे हें त्याला रोज पहावयाला मिळत होतें. पण नशिबीं पैसा नसल्यामुळें त्याला खिदमदगाराची नोकरी करणें प्राप्त होतें. आपण श्रीमंत असतों तर काय केलें असतें, कसें वागलो असतो, याचीं मनोराज्यें हलक्या नोकर लोकांच्या डोक्यांत सतत चालू असतात. पण त्यांच्या नशिबानें माघार घेतली असल्यामुळें त्यांना सेवेंतच कालक्षेप करावा लागतो. पण प्रसंगविशेषीं त्यांना श्रीमंत होण्याची जर संधि प्राप्त झाली, तर ते जिवाकडेही न पहातां वाटेल तें साहस करण्याला प्रवृत्त होतात.

त्याच्या डोळ्यांना संपत्ति दिसू लागली म्हणजे तिचा मद त्यांच्या डोळ्यांवर चढतो व त्या धुंदींत त्यांना मालक, स्नेही, भाऊ किंवा उपकारकर्ते हे कोणीच दिसत नाहींत. द्रव्याच्या मोहिनीमंत्राने त्या वेळी ते पूर्ण भारलेले असतात. हलक्या प्रतीच्या सेवकाचा सर्वसाधारण मनोधर्म असा असतो. तो कोणांत किती प्रमाणांत आहे हें ओळखणं ओळखणाऱ्यांच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून असते.

११. नाना फडनविस हे धूर्त, चाणाक्ष व मनुष्यस्वभावाची पूर्ण पारख करणारे होते. त्यांनी तुळाजी पवाराला या कामी योग्य म्हणून निवडून काढलें. घाशीराम ( घाशीराम कोतवाल या नावानें पुढें इतिहासप्रसिद्ध झालेला ) नानांच्या विश्वासांतला एक कर्तबगार इसम होताच. गुन्हे करावे कसे, ते छपवावे कसे, एकाची टोपी दुसऱ्याला घालावी कशी या कामांत तो प्रवीण होता. म्हणून त्याच्या करवीं तुळाजीला वश करून हा मारण्याचा कट उभारण्याची नानांनीं योजना केली. नाना हे धरण्याच्याही कटाचे आंतून सूत्रधार असल्यामुळें धरण्याचा दिवस व वेळ त्यांनींच ठरवावयाची होती. अर्थात मारण्याच्या कटाची सिद्धता होईपर्यंत धरण्याचा दिवस त्यांना ठरवितां येण्यासारखा नव्हता. मारण्याच्या कटाची आपल्या पसंतीप्रमाणें पूर्ण तयारी झाली म्हणजेच सुमेरसिंगाला त्यांचेकडून वर्दी जाणार होती.

१२. बाळाजीपंत दामले[1] या नांवाचे नानांच्या पक्षांतील एक इसम गारद्यांच्या पलटणीवरील रिसालदार होते. ते हरिपंत फडके यांच्या हातांखालचे एक रिसालदार असून पूर्णपणें त्यांच्या पक्षाचे व त्यांच्या हुकुमाप्रमाणें काम करणारे होते. नानाचाही त्यांच्यावर विश्वास व वजन होतेंच. घाशीराम हा सर्वस्वी नानांचा एकनिष्ठ सेवक आहे हें पुण्यांतील सर्व लहान मोठ्या लोकांना माहीत झालें होतें. घाशीरामानें तुळाजी पवाराला पैशाचें आमिष दाखविलें. त्याला वाटेल तेवढा पैसा देण्याचें वचन दिलें व त्याच्याकडून आणक्रिया जी त्याला पाहिजे होती ती त्यानें करून घेतली. या कटाची गोष्ट गुप्त ठेवण्या-

१ पेशव्याची बखर पान १०४.

करतां घाशीरामानें त्याला वजावलें, असेल एवढेच नव्हे तर, ठरल्याप्रमाणें काम न झालें तर त्याचें डोकें मेखमूंखाली मारलें जाईल असा पोलीसी दंडुक्याचा त्याला धाकही घातला असेल, यांत नवल नाहीं. त्याचप्रमाणे बाळाजीपंत दामले यांनाही घाशीरामानें वश केले. त्यांना असें सांगण्यात आलें कीं, "गारदी लोकांना धरण्याची कामगिरी दिली. परंतु त्यांना शनिवारवाड्यांतील लपण्याच्या गुप्त जागा माहीत नाहींत. वाड्यांतील आपल्या पक्षाचीं माणसें कोणतीं व शत्रूच्या पक्षाचीं कोणतीं हें त्यांना माहीत नाहीं. पेशव्यांच्या बायका कोठें राहतात, कोणत्या भागांत शिरावयाचें नाहीं, याची माहिती गारद्यांना नाहीं. लूट कोणाची करावयाची, कत्तल कोणाची करावयाची, माऱ्याच्या जागा कोणत्या, लपण्याच्या जागा कोणत्या, हें त्यांपैकीं कोणाला माहीत नाहीं. त्याचप्रमाणें ज्यांना पकडावयाचे, ते नारायणराव कोणत्या वेळीं कोणत्या जागेंत असतील किंवा दंग्याच्या वेळीं कोणत्या मार्गानें ते कोठें पळून जातील, याची माहिती गारद्यांना नाहीं. दादासाहेबाची जागा, आनंदीबाईंची जागा, गच्चीवर जाण्याचे जिने, वगैरेची इत्थंभूत माहिती, जी कार्यभाग यशस्वी करावयाला पाहिजे, ती गारद्यांना नाहीं. ती नसल्यामुळे गडबडीत चोराला सोडून संन्याशाला प्रायश्चित्त मिळावयाचें व आपला सर्व कार्यनाश व्हावयाचा. ह्मणून ही सर्व माहिती असलेला एक मनुष्य आम्ही सुमेरसिंगाबरोबर देऊ. तो ज्या-प्रमाणें सुमेरसिंगाला हुकूम देईल त्याप्रमाणें शनिवारवाड्यांत गेल्यावर सुमेरसिंगानें वागावें. वाड्यात शिरल्यावर जसजसे प्रसंग येतील तसतसे ते निभावून नेण्याकरता, तो ज्या ज्या वेळीं जसजसे हुकूम देईल, त्याप्रमाणे सुमेरसिंग यानें वागावें. त्याच्या सूचनेप्रमाणें सुमेरसिंग यानें वाड्यावर हल्ला चढवावा."
या प्रमाणें बळाजीपंत दामले याच्याकडून सुमेरसिंगाला हुकूम देवविण्यांत आला व त्याची आणि तुळाजी पवार याची गांठ घालून देऊन मनसबा तयार करण्यांत आला. या मनसब्यानें तुळ्या खिदमदगार हा सुमेरसिंगासारख्या जमातदाराच्या खांद्याला खांदा भिडवून काम करणारा तुळाजी पवार ह्मणून प्रसिद्धीला आला. हलक्या लोकांच्या हातात थोडा अधिकार आला ह्मणजे ते बेफाम होतात असा सर्व साधारण नियमच आहे.

१३. आपलें अंग कोठेंच नाहीं, असें दाखवून नानांनीं आपल्या विचाराप्रमाणें धरण्याच्या व मारण्याच्या दोन्ही कटांची सिद्धता केली. आपण स्वतः कसें वागवयाचें हें त्यांनीं ठरविलेंच होतें. हरिपंत फडके यांनीं कसें वागावें याचीही कल्पना नानांनीं त्यांना दिलीच होती. सखारामबापूंनीं कसें वागावें हेंही ठरविलेंच होतें. या कटांतील सर्व लोकांनीं आपापल्या भूमिका कशा करावयाच्या याच्या सूचना घेऊन, कटाची कामगिरी कधीं करावयाची व सुमेरसिंगानें आपल्या फौजेसह वाड्याकडे कोणत्या निमित्तानें यावयाचें वगैरे सर्व गोष्टीची जय्यत तयारी झाली व त्याप्रमाणें ठरलेल्या दिवसाची ते सर्व वाट पहात बसले. नारायणरावांना धरण्याच्या कटाच्या सुरुंगांत मारण्याचाही आणखी एक सुरुंग आहे, याची वार्ता मात्र नाना व त्यांचे हस्तक यांच्या खेरीज कोणालाच नव्हती.



## प्रकरण १३ वें.

# खून कीं आत्महत्या याचें गौप्य-गोपन.

इ० स० १७७३.

१. ऐतिहासिक सगतीकरता काय करावें लागतें.—२. नारायणरावांस गारद्यांच्या दंग्यासंबंधींची माहिती केव्हां लागली याबद्दल पेशव्यांच्या बखरींतील उतारा.—३. त्यासंबंधी हरिवंशाच्या बखरीतील उतारा.—४. मराठी साम्राज्याची छोटी बखर यातील उतारा.—५. निरनिराळ्या बखरींतील निरनिराळी माहिती पहाता त्याच्यामधील विसंगतता. हरिपंत फडके कर्तव्य सोडून भोजनास का गेले ?—६. तुळाजी पवाराच्या संकेतानें गारदी शनिवारवाड्यांत कसे शिरतात यासंबंधींचा पेशव्यांच्या बखरीतील उतारा.—७ नारायणरावांच्या खुनासंबंधींचा पेशव्यांच्या बखरींतील उतारा.—८. नागपूरकर भोंसल्यांच्या बखरींतील उतारा.—९. हरिवंशाच्या बखरींतील उतारा.—१०. मराठ्यांच्या साम्राज्याच्या छोट्या बखरींतील उतारा —११. निरनिराळ्या बखरींची एकमेकींशी एकवाक्यता कशी नाही.—१२. ज्या ठिकाणीं बखरीकारांच्या माहितीची विसंगतता असणें शक्य होतें तेथेंच फक्त एकवाक्यता.—१३. सूर्यप्रकाशातील गोष्टींत बखरीकाराची विसंगतता व अंधारांतील गोष्टीत त्यांची एकवाक्यता हें गौडबंगाल कोणतें असावें ?—१४. नारायणरावाच्या वधासंबंधीं वधाचे दुसरेंच दिवशी शिवाजीपंतानें वामनराव पटवर्धन यास लिहिलेलें पत्र —१५. या पत्राशी नाना-फडनविसांचा संबंध कसा होता ? —१६ नारायणरावांच्या वधानंतर चौथे दिवशीं पुण्याहून पटवर्धनांचा कारकून शिवाजी बाबाजी याने वामनराव पटवर्धन यांस लिहिलेलें पत्र.—१७ दोन्ही पत्रांतील संबंध नाना फडनविस यांच्याशीं आहे. १८.— नारायणराव पेशवे यांच्या वधानंतर तिसऱ्या दिवशीं पुण्याहून बळवंत-राव नरगुंदकर यांचे कारभाऱ्यास लिहिलेल्या पत्रातील मजकूर विश्वसनीय का ? त्याची माहिती.—१९. पुण्याहून बळवंतराव नरगुंदकर यांचे कारभाऱ्यास लिहिलेले पत्र.—२० पटवर्धनांना गेलेलीं पहिलीं दोन पत्रे एकदेशीय माहितीची कां व कशी होतीं ?—२१. पहिलीं दोन पत्रें नाना फडनविसांनीं सांगितल्याप्रमाणेंच लिहिलीं याचा पुरावा. तिसरें पत्र विश्वसनीय कां ?—

२२. पत्र तीनच्या आधारें नारायणराव पेशव्यांच्या मृत्यूची संभाव्य हकीकत.—२३. नारायणराव पेशव्यांचा खून कीं आत्महत्या यांतील गौप्यगोपन या प्रकरणांत कां ठेवलें गेले?—२४. नारायणरावाच्या वधानंतर पुणें शहरांत व शनिवारवाड्यांत मुत्सद्दी व इतर लोक यांची उडालेली गडबड.—२५. शनिवारवाड्याची गारद्यांनी केलेली लूट. हरिपंत फडक्यांची घोडचूक.—२६ नारायणरावांची उत्तरक्रिया. आनंदीबाई गंगाबाईस सती जाऊं देत नाहींत. राघोबादादा गारद्यांच्या कैदेंत. शनिवार वाड्यावर गारद्यांचें नियंत्रण.

१. नारायणरावाचा मृत्यू भाद्रपद शु॥१३ शके १६९५ तारीख ३० आगष्ट सन १७७३ रोज सोमवारीं पुण्यास शनिवारवाड्यात झाला. यांच्या मृत्यूसंबंधीं निरनिराळ्या बखरींतून निरनिराळी माहिती मिळते. तेव्हा कोणती माहिती खरी हें ठरविणें कठीण जातें. एका बखरींत एक गोष्ट खरी वाटली तर त्यांत दुसरी विसंगत आढळते. ह्मणून एकाच बखरीच्या माहितीवर अवलंबून राहतां येत नाहीं. अर्थात् सर्व उपलब्ध माहितीचे सार काढून त्या वेळेच्या परिस्थितीशीं जी माहिती जुळेल तीच खरी आहे, असें गृहीत धरून इतिहासाची संगत लावणें प्राप्त आहे. या दृष्टीने येथे त्याचा विचार होणें योग्य आहे.

२. 'राज्यकारभार करीत असतां श्रावणमासाचा उत्साह जाहल्यानंतर गणेश चतुर्थीचे उत्साहास आरंभ झाल्यानंतर उत्साहाचे संधींत कुलाब्यास राघोजी आंग्रे यांस बोलावणे सरकारचें गेलें होतें. तेही पुण्यास निघून आले. उत्साह जहाल्यानंतर रावसाहेब (नारायणराव) आंग्र्यास भेटावयास गेले. त्यांस भेटून त्यांस राहण्याचे सांगून स्वारी सरकारची पर्वतीस देवदर्शनास जाऊन माघारी फिरली. त्या समयीं फितुराची गुणगुण समजली. वाटेनें हरिपंत फडके यांस श्रीमंत बोलले, "हें काय? हा मजकूर तुह्मीं मनास आणिला कीं नाहीं?" त्या समयीं हरिपंत यांनीं उत्तर केलें, "आतां जेऊन आल्यानंतर याचा विचार करूं". असें बोलून हरिपंत आपले घरीं गेले. श्रीमंत वाड्यांत आले. भोजनास उशीर झाला ह्मणोन वांकनीस यांस सांगितलें कीं, "उदईक गोसावी (उत्साहाचे हरिदास

बोवा ) यांस भोजनास बोलावूं." असें बोलून श्रीमंत भोजनास बसले. भोजन करते वेळेस ही गुणगुण सारी समजली. परंतु होणार तें चुकत नाहीं, तें सर्व घडून येतें. श्रीमंत भोजन करून उठल्यानंतर विडा घेऊन महालांत निजावयास गेले.' ही हकीकत पेशव्यांच्या बखरींत दिली आहे.

३. 'याप्रमाणें बंदोबस्त करून जे दिवशी मारावयाचें, तेच दिवशीं श्रीमंत गांवांतच पुणें मुक्कामीं सासुरवाडी ( कृष्णाजी हरी साठे यांचे वरीं. श्रीमंताचे श्वशूर यापूर्वीच वारले होते. सासू ताई साठे ही जिवंत होती ) होती तेथे भोजनास सहकुटुंब गेले होते. इकडे वाड्यांत नाकेबंदी होऊन तलब चढली ह्मणोन गाडदी जमा जाहले. श्रीमंत सासुरवाडीस भोजन करून विडे घेतात तों कोणीं सूचना केली की, आपण वाड्यांत जाऊं नये. कांही दंगा फितुर आहे, त्यास कृपा करून वाड्यांत जावयाचें करूं नये. तेव्हां त्याजवर रागें भरले आणि तसेंच पालखींत बसोन वाड्यांत आले. आणि तिसरे मजल्यावर खबूतरखाना होता तेथें अम्मळ उभे राहिले. ही माहिती हरिवंशाच्या बखरीत आहे.

४. 'एके दिवशीं नारायणरावसाहेब चिंचवडचे देवास भेटावयास गेले. तेथें भोजन करून वाड्यांत आले. महालांत निजावयास गेले. हरिपंत फडके व चाफाजी खिजमतगार असे बातमी गारद्यांची घेऊन वाड्यांत शिरले. चाफाजीनें सांगितलें कीं, वाड्यात गार्दी फार जाहाले. हरिपंत नारायणरावांचा निरोप घेऊन घरास आले. राव ( नारायणराव ) गार्द्यांची गर्दी पाहून फितूर असें समजून पळावयास लागले.' ही हकीकत मराठी साम्राज्याची छोटी बखर यांत दिलेली आहे.

५. याप्रमाणें निरनिराळ्या तीन बखरीत नारायणरावांच्या मृत्यूच्या दिवसाची तीन तऱ्हेची माहिती दिली आहे. एकाची माहिती नारायणराव पर्वतीस देवदर्शनाला जाऊन येऊन त्यांनीं वाड्यांत भोजन केलें. दुसऱ्याची माहिती कीं, ते सासुरवाडीला भोजनाला गेले होते. तिसऱ्याची माहिती अशी कीं

ते चिंचवडास देवदर्शनाला गेले होते व तेथेंच त्यांनीं भोजन केलें. ही माहिती नारायणराव या एकाच व्यक्तीची त्यांच्या मृत्यूच्या दिवसाच्या दुपारच्या भोजना-पुरतीच आहे. हीं भोजनाचीं स्थळें निरनिराळीं आहेत. शनिवारवाडा, पुण्यांतील साठे यांचा वाडा व चिंचवड येथील देवालय अशीं हीं तीन प्रमुख स्थानें आहेत. एकाच वेळेला तीन ठिकाणीं नारायणरावांनीं भोजन करणें शक्य नाहीं. कोठेंतरी त्यांनीं एकच ठिकाणीं भोजन करणें शक्य होतें. बरें, नारायणरावांचें भोजन हें कांहीं चोरून, कोणाला न दिसतां होणारें नव्हतें. असें असतां या उघड होणाऱ्या गोष्टीमध्यें तीन बखरीकारांची तीन प्रकारची माहिती आहे. त्याचप्रमाणें एक ह्मणतो कीं, गार्दी वाड्यांत शिरले त्यावेळीं नारायणराव तिसऱ्या मजल्यावर खबूतरखान्यांत उभे होते. दुसरा ह्मणतो कीं, ते झोंपले होते. यांतही एकमेकांचें भिन्न मत आहे. शिवाय एक ह्मणतो, पर्वतीहून येतांना फितुराची वार्ता नारायणरावांनीं हरिपंत फडक्यांना दिली व त्यांना बंदोबस्त करण्याचा हुकूम दिला. दुसरा ह्मणतो कीं, ही फितुराची वार्ता हरिपंतांनींच शनिवारवाड्यांत आणली. एकंदरींत याही माहितींत परस्परांची भिन्नताच आहे. यावरून येथें एवढेंच दर्शवावयाचें कीं, बाहेरच्या लोकांना सहज माहीत होणाऱ्या गोष्टींत इतकी भिन्नता आहे. मग एकाद्या खोलींत गुप्तपणानें घडलेल्या गोष्टींत, सत्याशी ताडून पहातां, केवढी तफावत आढळून येईल याचा विचार करावा. पण वरील गोष्टींतून एक मोठें सत्य मात्र बाहेर पडलें. तें ह्मणजे नारायणरावांनी फितुराची माहिती हरिपंत फडके यांना दिली. गार्द्यांचा बंदोबस्त करण्याचा हुकूम त्यांना दिला. पण तो हुकूम न मानतां व नारायणरावांच्या संरक्षणाची जबाबदारी आपणावर आहे याची पर्वा न करतां हरिपंतांना भोजनाचें महत्व जास्त वाटलें व ते भोजनाला गेले. धन्याच्या जिवापेक्षां भोजन जास्त नाहीं, ही जबाबदारी ओळखण्याइतके हरिपंत लष्करी शिस्तीचे व प्रामाणिक होते. पण ज्याअर्थी फितुराकडे दुर्लक्ष करून ते भोजनाच्या निमित्तानें निघून गेले, त्याअर्थी ते धरण्याच्या कटाला पूर्ण संमत होते हें स्पष्ट आहे. पटवर्धन व फडके हे एकाच पक्षांतले होते. हरिवंशाची बखर

पटवर्धनांनींच लिहिली असल्यामुळें हरिपंत फडके यांना नारायणरावांनीं फितुराची माहिती देऊन बंदोबस्त करण्याचा हुकूम दिला असतां त्यांनीं तो बंदोबस्त न करतां ते भोजनाला गेले, एवढाच मुद्याचा विषय गाळला आहे.

६. नारायणराव महालांत निजावयाला गेले. 'ही संधि राखून तुळाजी पवार खिसमतगार, निसबत दादासाहेब हा गार्दी यांस कळवावयास गेला. आणि गार्दी यांस सांगितलें कीं, "आतां तुह्मीं उशीर करूं नका. तुमचा फितूर सारा वाड्यांत समजला आहे. अशा वेळेस संधि साधेल तरच कार्य शेवटास लागेल. नाहीं तर सारे अवघे फाशांत पडाल." असें वर्तमान तुळाजीनें सांगून गारदी तयार करून हजार दोन हजार गारदी कंबरबस्त होऊन दिल्लीदरवाजावर येऊन आंत जाऊं लागले. तेव्हां चौकीदार यांनीं मनाई करतांच गारदी यांनीं दरवाज्यांत तोडातोड करून आंत नीट चालले आणि वाड्याचे तटावर गेले. त्या समयीं इच्छारामपंत ढेरे, पागाहुजुर हे जेऊन वाड्यांत येत होते. त्यांनीं गारदी पाहून "काय आहे, काय आहे" ह्मणून बोलूं लागले. तें तुळाजीनें ऐकून तुळाजी गारद्यांस बोलतो, "याला मारा. पहातां काय!" असें गारद्यांनीं ऐकून गारदी निःसंग ढेरे यांजवर चालून आले. ते इच्छारामपंत यांनीं पाहून गोशाळांत शिरले कीं, 'गाईचा आसरा केल्यानें तरी वांचेन.' परंतु ते गारदी निष्ठूर. त्यांजला दया कोठून! इच्छारामपंत गाईच्या आड पडला असतां, गाईसुद्धां गारद्यांनी इच्छारामपंतास ठार केलें. अशी मारामार करीत वाड्यांत शिरले. शिरून वाड्यांत दिवाणखान्यांत चढले. तेथें आबाजीपंत होता. तो कवाडें लावूं लागला. तें पाहून गारदी बोलले, "कवाडें लावितां? तोडीन." तें आबाजीपंत यांनीं ऐकिलें. परंतु कवाड लावूं लागला. तेव्हां गारदी धावून आबाजीपंत यास ठार केला. आणि गारदी आंत शिरले. अशी गर्दी वाड्यांत मोठी पाहून सफेलीवरती गारदी चढले आहेत हें पाहून, शहरांत मोठी हूल पडली. मोठी गडबड जाहली. लोक चोहींकडे पळूं लागले. बाजारकरी यांनीं दुकानें लाविली.'

७. 'इकडे वाड्यांत रावसाहेब निजले होते ते उठून गणपतीचे रंगमहालांतून कोठीच्या जिन्यानें चढून दादासाहेब यांजकडे चालिले. त्यासमयीं चापाजी

टिळेकर खिजमतगार व नारोबा फाटक शिष्या, असे दोघेजण बरोबर होते. त्यासुद्धां दादासाहेब यांजकडे जाऊन रावसाहेब ह्मणतात कीं, " गारद्यांनीं वाडयामध्यें मोठी धूम करून मारामारी केली. ह्मणून मी तुह्मांपाशीं आलों. तुह्मीं हा फितूर केला. ते गारदी आतां समजावून वाटेस लावावे. तुह्मांस राज्य करणें असल्यास मला कैदेंत घालून सुखें राज्य करावें." असें बोलणें बोलतात ती बातमी गारद्यांस लागतांच गारदी निःसंग होऊन दादासाहेब यांजकडे आले. तें पाहून नारायणरावसाहेब यांनीं दादासाहेब यांच्या कंबरेस मिठी घातली. हें पाहून खरगसिंग, व सुमेरसिंग व महंमद इसब हे तलवारी उपसून धांवले. त्या समयीं तुळाजीनें जाऊन श्रीमंतास ओढून आणिलें आणि तोंडानें बोलतो, " आतां कां पळतोस?" असें ह्मणून ओढिलें. तेव्हां चापाजी टिळेकर यानें गारद्यांस सांगितलें, " अरे! लहान लेंकरूं, यास मारूं नका." असें ह्मणून चापाजी श्रीमंतांचे अंगावर पडला. त्यासमयीं अगोदर चापाजीस तोडिलें. हें पाहून नारोबा फाटक जवळ उभा होता. तोही श्रीमंताचे अंगावर पडला. तेव्हां फाटक याचें डोकें उडविलें. नारायणरावसाहेब यांची शुद्धि गेली. कांहीं सुचेनासें झालें. मग गारद्यांनीं वारावर वार केले. कोथळा फुटून बाहेर पडला. अशी मारामार झाली.' याप्रमाणें माहिती पेशव्यांच्या बखरीत दिली आहे.

८. नागपूरकर भोंसले यांच्या बखरीत नारायणरावांच्या वधासंबंधीं खालीलप्रमाणें माहिती दिली आहे. ' लक्ष्मणराव काशी ( नागपूरकर मुधोजी भोंसल्यांचे पुणं दरबारचे वकील ) यानें तुळाजी खिजमतगार व त्याचा कारकून फंदांत मिळवून त्याचे हातून खडगसिंग व सुमेरसिंग व ईसफ गारदी यांचे सहा हजार माणूस सरकार वाड्याचे पहाऱ्यावर होतें. सबब तीन लक्ष रुपयांची चिठ्ठी खास दस्तुर दादासाहेबांची आणून गारदी यांस देऊन नारायणराव धरावे असा विचार केला. यांतील कांहीं एक इषारा त्या दिवशीं नारायणराव पेशवे, आंग्रे सरदार कोंकणांतील आले होते त्यांचे भेटीस जाऊन येत असतां मार्गांत पर्वतीजवळ समजलें. याजवरून हरिपंततात्यांस सुचवून बोलले कीं, " आतां आह्मांस निद्रेनें व्यापिलें. सबब आह्मीं जातों. झोंप घेऊन येतों. तों

पावेतों तुम्हीं जलदीनें येणें. म्हणजे जे या फंदांत आहेत त्यांचें पारिपत्य करण्यांत येईल." हें बोलिलें. तों तुळाजी खिसमतगार जवळ होता. त्यानें ऐकून सर्व लोकांस हुशार केलें कीं, झोंप घेऊन उठतात तंव पावेतों जलदी कार्य उगवावें. याजवरून गारदी यांनीं सर्व जमाव पांच, सहा हजार लोकांचा हजेरीचे वांटण्याचे हवेलीचे जवळ बोलावून जागजागीं नाकेबंदी करून वाडयांत आले. तों नारायणरावसाहेब यांजपाशीं नारोजी नाईक होता. तो बोलला कीं, 'नहराची (नळाची) वाट मजला ठाऊक आहे. तिकडून तुम्हांस घेऊन जातों. याचें उत्तर रावसाहेबीं केलें कीं, या सालीं पाण्यांतील सर्पभय जोतिषांनीं सांगितलें आहे. तेथें ही सल्ला चांगली नाही.' असें म्हणून नाईकाचें न ऐकतां भाऊसाहेबांची स्त्री पार्वतीबाई होती, तिजकडे जाऊन हें वर्तमान सांगितलें. तेव्हां ती बोलली कीं, हें कृत्य तुमचे पितृव्याचें आहे. त्याजकडे जावें. म्हणजे प्राण वांचेल. त्याजवरून दादासाहेबांकडे जाऊन पायावर डोई ठेवली. आणि बोलले जे 'मजला वांचवावें.' त्यासमयीं दादासाहेबांनीं उत्तर केलें कीं, 'माझे मागें कोठडी आहे त्यांत जाऊन लपावें.' तें रावसाहेबांचे विचारास न येतां गळ्यास मिठी मारली. तों गारदी येऊन पोंचले. त्यांनीं दादासाहेबांस बोलले कीं, 'सोडावें.' दादासाहेबांनीं पुढें आपला हात करून म्हणाले कीं, 'बाळ आहेत, यांजला मारूं नये, वाचवावें.' तों तुळाजी खिसमतगार यानें नारायणरावाचे पाय धरून ओढले. गारद्यांनीं कंमरेंत तेग्याचा हात चालविला. ते समयीं वार पुरा लागून कारगीर झाला. केशरीभात खाल्ला होता. तो पडला. दादासाहेबांचे हातावर वार आला. डोईसही लागलें. नारायणराव मारले गेले.'

५. नारायणरावांच्या वधासंबंधीं हरिवंशाच्या बखरीत पुढील प्रमाणें माहिती दिली आहे. त्या दिवशीं नारायणराव आपल्या सासुरवाडीला जेवणाकरतां गेले होते. तेथून ते वाड्यात आले व तिसऱ्या मजल्यावर येऊन खबुतरखान्यात उभे राहिले. 'तों उभयतां गारदी तेथें आले आणि विनंति केली, 'महाराज आमची तलब (पगार) चढली याची

वाट काय ? आमचा रोजमुरा फडशा करून द्यावा. श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, ' तिसरे प्रहरीं कचेरीस विनंति करावी. नंतर काय जी आज्ञा व्हावयाची ती होईल; गाडदी यांनीं उत्तर केलें कीं, ' आह्मांस कचेरीची काय गरज ? आपण धनी, आपण फडशा करावा. ' तों श्रीमंत तेथून खालीं येऊं लागले. तों जिना उतरतांनाच गाडदी यांनीं लगट केली कीं, आह्मांस येथें ऐवज द्यावा. नाहीं पेक्षां आह्मीं उतरूं देणार नाहीं. तों इच्छारामपंत ढेरे ह्मणून कारकून होते ते गाडद्यांस रागें भरले जे, ' असा दंगा केल्यानें ऐवज मिळतो कीं, काय ? ' असें उचलून बोलतांच त्यांनीं तरवारी ओढून इच्छारामपंतास ठार मारलें. तों श्रीमंत जिना उतरून खालीं आले. तों खालीं चौकांत पुजेच्या गाई दोन बांधल्या होत्या. त्या गारद्यांच्या नागव्या तरवारी पाहून बुजाल्या. आणि दांवीं तोडून गारद्यांच्या अंगावर आल्या. तों तेथें फुरसत सापडली. नाहीं तर तेथेंच श्रीमंतांस मारावें असें होतें. गाई आडव्या येताच गाडद्यांनीं तरवारीनें गाई ठार मारल्या. तों श्रीमंत पार्वतीबाईचे खोलींत गेले. आणि सांगितलें कीं, काकी मला गाडदी मारितात. तेव्हा पार्वतीबाई बोलली कीं ' मी तुला लपवितें. तूं कांहीं भिऊं नको आणि तुला मी पारही करते. ' असे ह्मणाली. तों श्रीमंतांनीं उत्तर केलें कीं, 'मी दादासाहेब यांजकडे जातों. ' असें म्हणून तेथून निघाले. तों गाडदी यांनीं गांठिलें. तो तेथें कुणबीण होती. ती आडवी जाहली. तिलाही ठार केली. गारद्यांस खून चढला. तों दादासाहेबांजवळ श्रीमंत जाऊन कमरेस मिठी घालून बोलले कीं, ' मला मारूं नका. किल्यावर कैद करून पांठमीठ लावून ठेवा. मारूं नका ' असें दीन वचन बोलले. तेव्हा दादासाहेबांस दया आली. तों गाडदीही तेथें आले आणि बोलले कीं, ' आतां आम्हीं यांस जिवंत सोडणार नाहीं. हा वांचल्यास आमचीं रांडापोरें ढाणकास वांटील. सर्पास दुखवून सोडतों कीं काय ? असें म्हणतांच दादासाहेब म्हणाले कीं, असें ' बाळास मारूं नका. ' असें म्हणून हात पुढें केला. तों आंत खोलीत तेथेंच आनंदीबाई होती.

तेथून दादासाहेब यांस म्हणाली की, ' आता काकणे हातांत घाल. ' असें म्हणून गाडद्यास सांगितलें कीं, ' उभयतास मारून टाका. ' तों गाडद्यांनीं एक वार टाकिला. तो दादासाहेब याच्या हातास लागला. तों तुळ्या पवार आनंदीबाईचा खिसमतगार होता, त्याने श्रीमंताचे पायास धरून दादासाहेब यांचे कंमरेपासून ओढिलें. तो चाफाजी टिळेकर, श्रीमंत माधवरावसाहेब यांचा खिसमतगार, तसाच श्रीमतावर पडला. तों गाडदी यांची तरवार चालली. तेथें कांहीं बाकी राहिली नाहीं. उभयताचे तुकडे एके ठिकाणीं जाहले. श्रीमत साखरभात भोजन करून गेले तो पोटातून तसाच पडला. हें कृत्य रघुनाथरावदादा याचेसमोर जाहलें. गर्दी जाहली. तो दिवस, शके १६९५ भाद्रपद शु॥ १४. याप्रमाणे जी गोष्ट न व्हावयाची ती जाहली.

१०. मराठी साम्राज्याची छोटी बखर यात यासंबंधीं खालीलप्रमाणें माहिती दिली आहे. ' राव ( नारायणराव ) गारद्याची गर्दी पाहून फितूर असें समजून पाळावयास लागले. मागे सुमेरसिंग व खरकासिंग व तुळाजी पवार लागले. चाफाजी आडवा जाहला. तो तेथेंच मारला. दोन गाई पुढें आल्या त्या तेथेंच मारल्या. नारायणराव दादासाहेबांच्या गळ्यांत पडले कीं, ' मजला गारदी मारतात. मजला सोडवावें. हे राज्य दौलत तुमची आहे. तुह्मीं सांभाळावें. ' असें ह्मणून गळा पडले. तेव्हा सुमेरसिंगास दादानी सांगितले कीं, ' लेंकरास मारूं नका. ' तेव्हा सुमरसिंग बोलला की, ' याची फौज बाहेर पन्नास हजार जमा झाली आहे. त्यांस सांपडलों तर आमचे प्राणांचे ग्राहिक होतील. यास्तव तुमच्याकरतां मारलें पाहिजे. ' दादा बोलले की, ' मजला मारा परंतु रायास मारूं नका. ' तेव्हा सुमरसिंग बोलला कीं ' तुह्मांस मारून नफा काय? साप दुखवून सोडून द्यावा तशी अवस्था होईल. ' असें बोलून तुळाजी पवार यानें रायाचा पाय धरून ओढिला. आणि सुमेरसिंगानें तेग्याचे हात मारिले. आणि पोटांतून केशरी भात कोंथळा बाहेर पडला. दुसरा हात मारिला तों शीर तुटून गेलें. तिसरा हात मारिला तों हात तुटून चौकांत पडला. सोप्यांत रक्ताचा प्रवाह चालला. सुमेरसिंगानें तेग्याचे हातानें

तोडून पुरा केला. शके १६९५ विजयीनाम संवत्सरे भाद्रपद शु॥ १४ सोमवारीं मारले गेले.'

११. वरीलप्रमाणें चार निरनिराळ्या बखरीतील उतारे आहेत. यांतील कांहीं बखरी कधीं लिहिल्या गेल्या याचें नक्की वर्ष जरी सांगतां येण्यासारखें नसलें तरी या बखरींतून पेशवाई बुडेपर्यंत ह्मणजे इ. स. १८१८ पर्यंत ज्याअर्थी सर्रास माहिती आहे, त्याअर्थी त्यानंतरच त्या लिहिल्या गेल्या असल्या पाहिजेत यांत संशय नाहीं. यावरून सदर बखरीतील माहिती, ' वडिलावडिलीं ऐकण्यांत आली व पाहिली ' अशा प्रकारची दिली आहे. हरिवंशाची बखर लिहून कधीं पुरी झाली याचा दिवस दिला आहे. शके १७६४ शुभकृन्नाम संवत्सरे वैशाखु शु॥ ५ इंदुवास असा आहे. ह्मणजे ही बखर इ. स. १८४३ मध्यें लिहिली गेली. अर्थात् यांतील माहिती वरीलप्रमाणें वडिलांनीं सांगितलेल्या गोष्टी ऐकून व कांहीं पाहून अशा लिहिल्या आहेत. नारायणराव पेशवे यांच्या मृत्यूच्या वेळीं या बखरीकारांपैकीं एकही इसम जिवंत नव्हता. त्यांनी स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलेली हकीकत या बखरींतून नसल्यानें ती सांगासांगीची आहे असें निश्चित ठरतें. हरिवंशाची बखर ही सामान्यतः पुरुषोत्तम दाजी यांचा केवळ पुरुषार्थ दाखविण्याकरतांच लिहिली आहे. अर्थात् ती एकदेशीय भावनेनें लिहिली आहे. पटवर्धन घराण्यातील मंडळींचा व त्यांच्या पक्षांतील मंडळींची थोरवी गाण्याकरतां ही बखर लिहिलेली आहे. अर्थात त्या बखरींत त्यांच्यांतील दोष अथवा अन्याय थांच्यावर पांघरून घालण्याचा शक्य तेवढा प्रयत्न झाला असला पाहिजे यांत संशय नाहीं. जो इसम अशी माहिती देतो तो स्वतःची अगर स्वतःच्या घराण्याची किंवा आपल्या पक्षांतील लोकाची थोरवी दाखविण्याकरतां तिला चांगलें तिखटमीठ लावूनच देतो. आपल्या पक्षांतील लोकांचें अन्यायाचें अगर अनीतीचें दिग्दर्शन होऊं नये ह्मणून त्यांतील माहितीला तो निराळेंच वळण देतो. कांहीं प्रसंगीं घडलेल्या निंद्य गोष्टीही तो सांगत नाहीं. त्या तो मुग्धच ठेवतो. भावार्थ एवढाच कीं, या बखरींतील

१. ना. भों. ब. पान. १९८

हकीकती त्या त्या पक्षाच्या हितसंबंधाप्रमाणें तसतशा रंगवून लिहिल्या आहेत. त्यामुळें त्यांतील हकीकत सर्वच खरी आहे असें धरून चालतां येत नाहीं. ह्मणून इतिहासाच्या संगतीला त्यांतून कोणती माहिती हिशेबांत बसते, तेवढीच ती घेणें व्यवहार्य ठरेल. या बखरींतून एकवाक्यता कोठें कोठें नाहीं हें खालील कांहीं गोष्टीवरून दिसून येईल.

(१) पेशव्यांच्या बखरींत इच्छारामपंत ढेरे यांच्या वधासंबंधीं जी माहिती दिली आहे ती हरिवंशाच्या बखरींतील माहितीशीं जमत नाहीं. पेशव्यांची बखर इच्छारामपंत हे गोशाळेंत मारले गेले असें सांगते तर हरिवंशाची बखर ते तिसऱ्या मजल्याला जाणाऱ्या जिन्यात मारले गेले अशी साक्ष देते.

(२) पेशव्याच्या बखरींत नारायणराव दादासाहेबांकडे गेले, त्यावेळीं त्यांच्याबरोबर चापाजी टिकेकर, खिजमतगार व नारोबा फाटक, शिष्या असे दोघेजण होते असें लिहिलें आहे. नागपूरकर भोंसल्यांच्या बखरींत नारायणराव यांजपाशीं नारोजी नाईक होता असें दाखविलें आहे.

(३) पेशव्याच्या बखरींत चापाजी टिकेकर यास अगोदर तोडलें, नंतर नारोबा फाटक याचें डोकें उडविलें, व नंतर नारायणराव यांस मारलें अशी हकीकत आहे. हरिवंशाच्या बखरींत नारायणराव व चापाजी टिकेकर या उभयतांचे एके ठिकाणीं ह्मणजे नारायणराव याच्या अंगावर चापाजी पडला असता एका वारानें दोघांचे तुकडे केले असा मजकूर आहे.

१२. एकंदरींत या बखरींत वधासंबंधीं दिलेल्या हकीकती सांगासांगीच्या असल्यामुळें त्यात बरोबर मेळ बसत नाहीं. परंतु आश्चर्याची गोष्ट ही आहे कीं, शनिवारवाड्यांतील पुष्कळ माणसांच्या समोर ज्या ज्या गोष्टी घडल्या त्यांतच तेवढा त्यांचा मतभेद आहे, पण जी गोष्ट दादासाहेबांच्या खोलींत घडली व ज्या ठिकाणीं नारायणरावांच्या खुनाविषयीं आरोप ठेवलेलेच लोक तेवढे हजर होते, त्या ठिकाणच्या माहितींत सर्व बखरीकारांची एकवाक्यता व्हावी ही होय. खरें पाहूं जातां ज्या ठिकाणीं कटवाल्यांनीं नारायणरावांचा वध केला, त्या ठिकाणच्या बातमींत विसंगतपणा असणें

जास्त संभवनीय होतें. परंतु बखरींतील हकीकतीवरून तसें दिसत नाहीं. अर्थात् नारायणरावांच्या खुनानंतर जमवून ठरविलेली ही माहिती प्रसिद्धीस आली असेंच ठरतें. नारायणरावांच्या खुनासबंधीं बखरीकारांची एकवाक्यता कशी आहे हें पुढील उताऱ्यांवरून दिसून येईल.

१३. तुळाजी पवार यानें नारायणरावांस ओढून आणलें असें पेशव्याची बखर ह्मणते. नागपूरकर भोंसल्यांची बखर ह्मणते कीं तुळाजी खिसमतगार यानें नारायणराव यांचे पाय धरून ओढले. हरिवंशाच्या बखरींत तुळया पवार याने श्रीमंतांचे (नारायणरावाचे) पायास धरून दादासाहेब यांचे कंमरेपासून ओढिले असे आहे. मराठी साम्राज्याची छोटी बखर यांतही तुळाजी पवार यानें रायाचा ( नारायणरावाचा ) पाय धरून ओढिला असा मजकूर आहे. बाकीच्या बहुतेक इतिहासांतून याचीच पुनरावृत्ति केलेली दिसते. त्याचप्रमाणें नारायणराव यांचा कोथळा बाहेर पडला त्यातून केशरीभात निघाला वगैरे बारीकसारीक माहिती देण्यांतही बखरीकारांची एकवाक्यता आहे. यावरूनही असें दिसून येईल कीं सूर्य प्रकाशात घडलेल्या गोष्टींत बखरीकारांची एकवाक्यता नसणे व अंधारात घडलेल्या गोष्टीबद्दल एकवाक्यता असणे यातच गौप्यगोपनाचे रहस्य सांठलेले आहे, यात तिळमात्र संदेह नाहीं. याकरिता सत्य कोठे दडून बसले आहे हें पहाणें जरूरीचें आहे. ते बखरींतून मिळत नाहीं, हें आता निराळें सांगावयास नको. तेव्हां सत्यच बाहेर काढावयाचे झाल्यास नारायणराव पेशव्यांचा मृत्यू झाला त्या वेळेची कांहीं पत्रें विचारात घेतल्यास त्यावरून बरेंचसे सत्य बाहेर पडेल. याकरितां त्यावेळेचीं तीन पत्रें खाली दिलीं आहेत. तीं पत्रें पहिल्यानें वाचतांना जरी संदिग्ध आहेत असें वाटतें, तरी खऱ्या घडलेल्या गोष्टींवर त्यांचा बराच प्रकाश पडतो यात शंका नाहीं.

१४. पत्र १ लें. तारीख ३१ आगष्ट सन १७७३.

साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत भाद्रपद शु॥ १३ भौम-

---

१ हें पत्र शिवाजीपंतानें वामनराव पटवर्धन यांस नारायणराव याचा वध झाला त्याचे दुसरे दिवशी पुण्याहून लिहिलें आहे. ऐ. ले. स. पान. १९९७.

वार दोडप्रहर वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल इंदुवारचा मजकूर जासुदाबरोबर लिहिला आहे त्यावरून कळेल. आज प्रातःकालापासून मजकूर तर मकारनामक ( मोरोबादादा ) लेखक यांनीं ( दादासाहेबांस ) रात्रौ सांगून पाठविलें होतें कीं, आह्मांस काय आज्ञा. त्यास निरोप आला कीं, रात्रीची रात्र आपल्या जागा स्वस्थ असा. प्रातःकाळीं सांगो तसें करावें. प्रातःकाळीं भेटीस बोलाविलें. तेव्हां त्यांचे बोलणें झालें. तेथून निघून नकारनामकाकडे ( नाना फडनविस यांचेकडे ) येऊन त्यांची भेटी केली. ते नमस्कार करून घरास आले. मकारनामक ( मोरोबादादा ) तेथेंच होते. लोकांस तमाम सरदारांस पत्रें पाठविलीं कीं गोष्ट होणें ती झाली. तुम्हीं आपापल्या जागा कायम असावें. मागाहून लिहून पाठवूं त्याप्रमाणें करणें. तेही आतून आतांच आले. ते नकारनामकाकडे गेले. आह्मीं जाऊन उभयतांची भेटी घेतली. पुढे आज्ञा काय ह्मणून पुसीलें. त्यांणीं सांगितलें कीं, तुमच्या यजमानाकडे पत्रें गेलीं जे. तुम्हीं आपले जागा कायम राहणें. या अन्वये सांगितलें आहे. स्वामींनी त्याचें उत्तर ( राघोबादादांस ) लिहावें कीं, आपण धणी आहेत. आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं. मकारनामकास मुख्यार्थ पुसीला कीं, घोडें लगामीं आहे कीं नाहीं. त्याने सांगितलें कीं, लगामींच आहे. तुम्हीं कांहीं चिंता करूं नका. हा आंतील जीव सांगितला आहे. एकदोन रोजांत कारभाराचा डौल कसा पडतो तोही समजेल. प्रस्तुत मामा व हेच आजच्या बोलण्याचालण्यांत फार करून आहेत. वृद्ध ( सखारामबापू ) बरे वाटत नाहीं ह्मणून रात्रीस निरोप घेऊन घरास गेला आहे. तो आज कांहीं आला नाहीं. चिंतो विठ्ठल, बाजीराव बर्वे, सखाराम हरी, वगैरे वळण सोरें जमा झालें. पाटणकर, निंबाळकर, घाटगे, घोरपडे, वगैरे लहान मोठे सरदारांस बोलावून चार गोष्टी दिलाशाच्या सांगितल्या. मुख्यास सारे रात्रींच भेटले. खेरीज दोन लेखक हकारनामक ( हरिपंत फडके ) माणसासुद्धां परगृहीं कोठें गेले आहेत. ते अद्याप भेटले नाहींत. उभयतां ( नाना व मोरोबा )

हे भेटले तेव्हां त्यासही आणून भेटवितील. कालचा प्रकार— दोन प्रहर तीन घटका वाजल्यावर दिवसास दंगा झाला. सुमेरसिंग व महमद इसफ यांचे सात-आठशे गाडदी होते आंत शिरले. तसेच दरवाज्यावराल लोक मारले. चोपाचाप करीत आंत गेले तों यांजवळ (नारायणरावांजवळ) कोणी माणूस नव्हतें. एक दोन पुर्बे होते, ते तेव्हांच पळाले. नारोजी नाईक व इच्छारामपंत व चाफाजी खिजमतगार व खासे इतक्यांस दिवाणखान्यांतच मारिलें. द्वाही फिरविली. शहाजण वाजलें. दोन प्रहर रात्रपर्यंत आंतील भेद न कळे. दहनास नेल्यावर ठीक कळलें. पत्नीने (सती) जाण्याचा अट्टाहास केला. मस्तक फाडून घेतलें. तेव्हां खालींत घालून कडी घातली. ब्राह्मण असामी सात आठ, दान गाई, दोन कुणबिणी. याखेरीज चौकीदार यांचा सुमार कळला नाहीं. लुट फार झाली. देवघर झाडून गेले. स्वयंपाकांतील भांडीं देखील गेलीं. बाळु ठोसर व बाळु दामला यांस चौकीस बसविलें आहेत. याउपर कोणकोणाचा भोग आहे तो कळेल. आनंदरावदादांनीं बाळाजीपंतास रात्रीचे (दादासाहेबांकडे) पाठविलें होतें. तमाम लोक भेटून नजराणे करतात. वाड्यांत तमाम चौक्या गाडद्यांच्या आहेत. व वाड्यावरूनही आहेत. जबरदस्ती प्रस्तुत गाडद्यांची आहे. राऊत नाकेबंदीनें होते म्हणून शहराचा बचाव झाला. जमादारास बक्षीस कड्या व शिरपेंच व वस्त्रे व लाख रुपये बक्षीस साऱ्या गाडद्यास मिळून दिलें. देवतार्जनाचें सामान, जडिताचे दागिने व सोन्या रुप्याचे फारच होते तें सारें लुटिलें. पितांबर आदिकरून फाडून घेतले. आपण लोकांचा जथ पाडून स्थलीं अथवा समीप केवळ असावे. येणेंप्रमाणें उभयतां लेखकांनीं लिहावयास सांगितलें. रात्रौही लिहिलें आहे, ते पत्र पावलेंच असेल. रोज भौमवार दोनप्रहर. जासूद लवकर पावला म्हणजे त्यास इनाम द्यावें. चार जासूद जोड्या सत्वर पाठवाव्या. सेवेशीं श्रुत होय, हे विज्ञापना. भकार नामक (भवानराव प्रतिनिधी) प्रतिनिधी पहिलेच त्या पक्षांत होते. ते सिद्धीस गेले. चौक्यांची गडबड त्यांचीच आहे. हे विज्ञापना.

१५. या पत्रांत कांहीं कांहीं गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. १ हें पत्र पटवर्धनांना नाना फडनविस यांच्या सांगण्याप्रमाणें लिहिलें आहे. २ वाड्यातील माहिती नानांना जशी समजली किंवा त्यांनीं जशी सांगितली तशी लिहिली आहे. ३ वाड्यांतून दादासाहेबांनीं सरदारांस पत्रें पाठविलीं त्याप्रमाणें पटवर्धन सरदारांसही त्यांचें पत्र गेलें. त्याचें पटवर्धनांनीं काय उत्तर पाठवावें हेंही सदर पत्रांत नमूद केलें आहे. याचा अर्थ एवढाच कीं, राघोबादादा जरी पेशव्यांच्या गादीचे मालक झाले असले व त्यांचे सरदार जरी पटवर्धन झाले असले तरी ते नानांच्या शब्दाप्रमाणें चालणारे होते. हरिपंत फडके जरी पळून गेले तरी त्यांचा पत्तामुद्दा नानांना माहीत होता. त्यांनीं त्यांना पाठीशीं घातलें होतें. योग्य प्रसंग आल्यास ते दादासाहेबांशीं त्यांची भेट करून देणार होते. अर्थात् नानांच्याच सल्ल्यानें ते फरारी झाले होते. ५ नानांच्या सल्ल्याप्रमाणें पटवर्धन आपल्या सैन्याचे जथ पाडणार होते व त्यांच्याच सल्ल्याप्रमाणें आपल्या सैन्याची हालचाल करणार होते. प्रसंग पडेल त्याप्रमाणे राघोबादादाविरुद्ध त्यांच्या कटाची तयारी झालेली होती. या कटाचे सूत्रधार नाना हे होते. राघोबादादा आपल्या लगामी राहिले तर कसे वागावयाचे व न राहिले तर कसें वागावयाचें याची रूपरेखा नानांनीं अगोदर आंखून ठेवली होती, व त्याप्रमाणेंच त्यांचे संदेश आपल्या पक्षांतील सरदारास जात होते. ६ बाळाजीपंत ठोसर व बाळाजीपंत दामले यांना दादासाहेबांनीं चौकीवर बसविल्यानंतर नानांचा पक्ष घाबरला. अर्थात् गुन्हेगारींत त्याचें अंग असल्यामुळेच तो घाबरला.

## पत्र २ रें.

१६. सेवेशीं[1] साष्टांग नमस्कार विनंती. तागायत गुरुवार दोन प्रहर. वर्तमान तर काल लेखकांच्या ( नाना फडनविस व मोरोबा फडनविस ) माणसां-

---

ऐ. ले. सं. पान १९८९. १ हें पत्र पुण्याहून पटवर्धनांचा कारकून शिवाजी बाबाजीनें मिरजेस वामनराव पटवर्धन यांना नारायणरावाचा मृत्यु झाला त्याच्या चौथ्या दिवशीं लिहिलें आहे.

बरोबर त्वरेनें येण्याविषयींचा प्रकार दर्शविला होता. ते समयींचा प्रकार तसाच होता व लेखकांचे विचाराप्रमाणें पत्र पाठविलें होतें. अलीकडील अर्थ—गाडद्यांचें प्राबल्य बहुतच होतें कीं, (आह्मीं) " राज्याचा खावंद मारला. होता तो मारला. आतां निम्मे राज्य वांटून देणें. " असें बहुतच पाय पसरून बोलत होते. आंत तमाम बंदोबस्त सुमेरसिंग व महंमद इसफ व खरगसिंग चौकीदार यांचा. परवानगी रसानगी त्यांची. मराठे माणूस आंत अगदीं नव्हतें. शहर लुटितात अशी धास्त बसून कोणास कोणी न पुसे. अशी अवस्था होती. गाडद्यास ह्या मनसबा सांगितला ते समयींचा करार- किल्ल्यापैकीं पुरंदर व नगर व साष्टी हे तीन किल्ले व पांच लक्ष रुपये रोख द्यावे. येणेंप्रमाणें करार असतां आडमुद्दे राज्याचे वगैरे गाडद्यांनीं मनस्वी घातले. " नाहीं तरी त्यांची गत ती यांची ! अल्ली बहादर[२] राज्यास खाविंद करूं. " असें चित्तास येईल तसें बोलत. गांवांत जितका मुसलमान होता तितक्यांनीं बंदुका घेऊन वाड्यांत जथ पाडिला. तोफखान्यांतून धाकट्या तोफा आणून बुरुजावर ठेवाव्या, असा मनसब्रा विलक्षण करून बसले. तेव्हां भकारनाम (भवानराव) प्रतिनिधी यांनीं सांगितलें कीं, " राज्य अथवा किल्ले कोणाचे ? वांटून देणार कोण ? राज्याचे चाकर आह्मीं. जतन करावें. ( हें काम आमचें ). द्यावयाचा अख-त्यार आह्मांवर नाहीं. चार रुपये अधिक आगळे मागितल्यास चिंता नाहीं, देऊं. परंतु किल्ले अथवा राज्य देणार आह्मीं कोण ? " तेव्हां रदबदली पडून पांच लक्ष रुपये द्यावेसा करार होता ते व किल्ल्याचे तीन लक्ष, एकूण आठ लक्ष रुपये द्यावे. येणेंप्रमाणें ठराव होऊन दोन तीनशें गाडदी बाहेर निघून दरवाजे मोकळे झाले. मराठे माणूस आंत दोन तीनशें हत्यारबंद जमा झाले. विचारें विचारें गाडदी बाहेर निघतील. परवानगी रसानगी दरवाज्यास गाड-द्यांची नाहीं. आंत लोक जातात येतात. असें झाल्यामुळें जरा स्वस्थ झालें आहे. कर्म झाल्यावर दुसरे दिवशीं मकारनामक लेखक (मोराबादादा) यास

---

२ बाजीराव याचा मस्तानीपासून झालेला मुलगा समशेरबहादर यांचा ह्या मुलगा.

बोलावून नेऊन ( राघोबादादांनीं ) सांगितलें कीं, नकार नामकास ( नाना-फडनविस ) घेऊन येणें. तेव्हां ते येऊन त्यास ( आंत ) घेऊन गेले. उभयतांस सांगितलें कीं, तुह्मीं फडनविसीचें कामकाज करीत जाणें. तेव्हां उत्तम ह्मणून ( त्यांनीं ) बाजीपंत व परचुरे यांस सांगितलें कीं, लिहिण्याचे जाबसाल आज्ञा होईल त्याप्रमाणें करीत जाणें ह्मणून सांगून घरास आले. उभयतां नित्य जातात. ( राघोबादादा ) सांगतात त्याप्रमाणें कागद—पत्र समजावितात. रोजमुरा गाड्यांस वगैरे देवितात त्याप्रमाणें देतात. चिकारनामक ( चिंतो विठ्ठल ) व भिडे ( हरिपंत भिडे ) उभयतां कामकाजाच्या गडबडींत आहेत. भकारनामक ( भवानराव प्रतिनिधी ) व सकारनामक ( सदाशिव रामचंद्र ) बकारनामक बर्वे ( बाजीराव गोविंद बर्वे ) व सकारनामक परभू ( सखाराम हरि ) सारा दिवस ( राघोबादादा ) जवळ असतात. चौघांपैकीं थोरले दोघे या राजकारभारांत पुरते होते असें ह्मणतात. त्यासारखें दिसून आलें. ( राघोबादादांनीं ) तमाम शागीर्द लहान मोठ्यांस तमाम बोलावू पाठविलें. चिरंजीव ( दत्तकपुत्र अमृतराव यांस वडगांवाहून ) आणविलें. बारामतीकर गृहस्थास ( बाबूजी नाईक ) तीनचार पत्रें गेलीं. ते येणार. काम कारभार त्यांच्या विचारें करावा असें मानस दिसतें. मुख्य कारभारी ( सखारामबापू ) समाधान नाहीं ह्मणून या मंत्रापूर्वीच चार दिवस दरबारास येतच नव्हते. हें झालें, गाड्यांची गोळागोळी होऊं लागली तेव्हां कोतवाल चावडीजवळ बापूंनीं सारे मुत्सद्दी जमा केले होते. राऊतांचा जथ पाडिला तों आंतून ( राघोबादादांची ) चिठ्ठी आली कीं, " गुंता उरकला. आतां बाहेर बसून खटपट काय निमित्यें करतां ? आंत येणें. " तेव्हां ( सखारामबापू ) वाड्यांत गेले. ( व ) त्यांचे ( राघोबादादांचे ) कानीं लागून सांगितलें की, " गोष्ट फटकळ झाली. फडनविस लेखणीचे धणी आहेत. त्यांस बोलावून सांगावें. लिहिण्याचें कामकाज त्यांनीं केल्याखेरीज परिणाम नाहीं. आह्मांस समाधान नाहीं. घरास जातों. " ह्मणून सांगून गेले. त्यापासून दरबारास येत नाहींत. चिकारनामक ( चिंतो विठ्ठल ) त्याजकडे ( सखारामबापूकडे ) जाऊन खलबत करून येत असतात. ( सखाराम बापू )

काल दोन प्रहरीं पळून गेले. पर्वतीजवळ माणसांस आढळले. बायकामुलें घरांतच आहेत. चार कोस गेला. मागतीं काय विचार केला न कळे. फिरून रात्रौ घरास आला. कारभार करावा असें चिकारनामक ( चिंतो विठ्ठल ) नित्य त्यांसी बोलतात. तिकार नामकही ( त्रिंबकरावमामा ) नित्य वाड्यांत जात असतात. फडके ( हरिपंत फडके ) यांजवर फारच रोष. याजकरतां त्या गडबडींत ते निघून गेले. मोरेश्वर पावेतों गेलेले आढळले. घरीं चौकी बसली आहे. त्या गडबडींत इच्छारामपंतास तीन जखमा लागल्या. दुसरे दिवशीं मृत्यू पावला. नारायणजी नाईकास सदरेस बसल्यावर मारून टाकिला. त्याप्रमाणेंच फडके ( हरिपंत फडके ) यांस करावें ह्मणून बोलिले. आणखी ब्राह्मण चार पांच व चाफाजी खिसमतगार ठार झाला. त्या गडबडींत ( नारायणराव ) थोरल्याजवळ ( राघोबादादांजवळ ) जाऊन पोंचले होते. "दादासाहेब ! वांचवावें. किल्ल्यावर घालावें, नाचण्याची भाकर द्यावी," असें ह्मणून गळां मिठी घातली तेव्हां ( राघोबादादांनीं ) लोटून दिला. तुळाजी पवार भेदला होता. त्यांनीं पायास धरून ओढिला. सुमेरसिंगानें वार टाकिला. पांच सहा वारांनीं पुरा झाला. तेथेंच चाफाजी ठार झाला. असें होतांच (राघोबादादा) सदरेस जाऊन बसले. तमाम चोपदारांस वगैरे यांस बोलावूं पाठवून बंदोबस्त करूं लागले. सुतक नाहीं. नित्य नमस्कार सूर्यास घालितात. "वैरियाचें सुतक कशास ?" ह्मणतात ! गोवध देखील वाड्यांत झाला. दोघी कुणबिणी मेल्या. बालहत्या, ब्राह्मणहत्या, गोहत्या, स्त्रीहत्या सारेंच झालें !!! गंगाबाई आनंदीबाईनें कोंडून खोलींत ठेविली. दहनास तिकडे गेल्यावर विधि उरकला. रात्रीस करूं नये पण ते समयींच गुंता उरकविला ! हें राजकारण फार दिवस घाटत होतें. त्यांत मोठमोठे होते असें आतां उद्गार निघतात. ज्यांनीं राजकारणें केलीं होतीं त्यांचे मानस ( नारायणरावांस ) कैद करावें असें होतें. परंतु करावयास गेले एक आणि झालें एक ! ईश्वराच्या चित्तास आलें तसें झालें. आतां त्राता कोणी नाहींसा झाला ! आपण येसाजीबरोबर पत्रें पाठविलीं तीं पावलीं. मजकूर कळला. पंढरपुराकडे जावयाचा प्रकार लिहिला. त्यास इकडून

पत्रें वरचेवर गेलींच आहेत. त्वरेनें येण्याविशी ( आपणास ) पत्रें गेलीं होतीं. त्यांस ( आतां ) गाड्यांचा उलगडा होतच आहे. आतां लेखकाचे व आमचे मतें तूर्त न यावें. येणेंप्रमाणें ठरून त्यांचें पत्र व आमचें पत्र लिहिलें आहे. थोडक्या फौजेनिशीं येथें येणें हेंही ठीक नाहीं. इकडे थोरल्यांनीं (राघोबा-दादांनीं ) बोलाविलेंच तर मातबरांनेंच यावें लागेल. हलके येणें ठीक नाहीं. यास्तव आह्मां तेथेंच मुक्काम करून रहावें. किल्लयापासून कोसीं असल्यास चिंता नाहीं. निकड करून फौज जमा करावी. फौजेचा जथ पाडावा. इतक्यांत येथील विचार कसा होतो हें समजतें त्याप्रमाणें लिहून पाठवितों. आह्मीं येणार होतों परंतु अशी गोष्ट झाल्यावरी येणें ठीक नाहीं. याजकरितां राहिलों. आह्मीं राहिलों हें आपल्याही चित्तास येईलच. रहिमतपुरीं दोन जासूद जोड्या ठेवाव्या. येथें चार जोड्या पाठवाव्या. येथून पत्रें रहिमतपुरास जातील. तेथून पुढें ( मिरजेस ) जलद जातील. धायगुडे येथेंच आहेत. आमच्या वाड्यांत ( सरकारांतून ) चोपदार अथवा कोणी आला नाहीं. आह्मीं होऊन त्यांजकडे गेलों नाहीं. या उपरीं लेखकाचे विचारें होईल तसें करूं. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना. ( आपण ) माघारें फिरोन किल्लयाजवळ आल्यानें बदनक्षा, याजकरिता जेथे पत्र पावेल तेथें मुक्काम करून रहावें. फौज जमा करावी. कोसीं अदकोसीं कुच नासगांवाकडे केल्यास चिंता नाहीं. मागें मात्र जाऊं नये हे विज्ञापना.

१७. हीं पत्रें नाना फडनविस यांच्या स्वतःच्या माहितीनें व त्यांच्या पक्षाचा हितसंबंध रक्षणाच्या दृष्टीनें लिहिलीं असल्यामुळें त्यांत पुष्कळशा गोष्टी सत्यास सोडून असल्या पाहिजेत. असें जरी असले अथवा सत्य गोष्टीला निराळा रंग देऊन जरी हीं पत्रें लिहिलीं असलीं तरी तीं पत्रें नारायणरावांच्या मृत्युच्या वेळचीं आहेत म्हणून ती अत्यंत महत्वाची आहेत. यांतील सत्य बाहेर निघण्याला खालील तिसरें पत्र मदतगार होईल ह्मणून तें येथें दिल्यानें त्या तीन्हीं पत्रांतील माहिती तुलनात्मक दृष्टीनें पहाण्यास सोईचें होईल. तिसरें पत्र खालीलप्रमाणें आहे.

## पत्र ३ रें

१८. हें पत्र नारायणराव यांचा मृत्यू झाला त्या दिवसाच्या तिसरे दिवशीं ह्मणजे तारीख १ माहे सप्टेंबर सन १७७३ रोजीं लिहिलें आहे. हें पत्र लिहिणारा मनुष्य कोण आहे हें जरी समजत नाहीं, तरी पत्रांतील हकीकती-वरून तें पत्र बळवंतराव नरगुंदकर यांच्या कारभाऱ्यास पुण्यांतील त्याच्या एका विश्वासाच्या इसमानें लिहिलें आहे, यांत संशय नाहीं. नरगुंद संस्थान नारायणराव पेशव्यांनीं भास्करराव यांस दिलें होतें. तें आपणांस मिळावें ह्मणून बळवंतराव यांची खटपट होती, आणि दादासाहेबांस पेशवाई मिळाली तर आपलें काम होईल असें त्यांस वाटत होतें. पटवर्धन हे भास्कररावांचे मित्र असल्यामुळें हें पत्र नरगुंदकडे रवाना झाल्यानंतर पटवर्धन मंडळींच्या हेरांकडून पकडलें गेलें असावें व त्यामुळें तें पटवर्धन यांच्या दप्तरांत राहिलें असावें असें दिसतें. हें पत्र कोणी कोणाला लिहिलें याबद्दल येथें विशेष चौकशी करण्याचें कारण नाहीं. हें पत्र नारायणरावांच्या मृत्यूनंतर लगेच लिहिलें अस-ल्यानें ते अत्यंत महत्वाचें आहे. शिवाय तें एकाद्या पक्षातर्फे लिहिलें गेलें नसून आपल्या संस्थानचें व आपल्या मालकाचें हित कशानें होणार आहे तें दाखविण्याकरतां पत्रलेखकानें सत्य गोष्टी त्यांत नमूद केल्यामुळें त्यांचे राज-कारण साधणार होतें. ह्मणून त्यांतील माहिती विशेष महत्वाची व इतिहासाची संगत लावण्यास योग्य अशी आहे. हें पत्र खालीलप्रमाणें आहे.

श्री.

१९. सांष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम भाद्रपद शु॥ १५ बुधवार दर जागा पुणे जाणून आपणाकडील क्षेम लिहून चित्त प्रमोदवीत असलें पाहिजे. विशेष. श्रीमंन राजश्री नारायणराव पेशवे यांस श्रीमंत राजश्री दादा-साहेब यांणीं आपण कैदेंत असतां बहुत कांहीं श्रमीं केलें. तें मनांत ठेऊन गाडदी तमाम फोडून छ. ११ जमादिलाखरी सोमवारीं दिवसा दोन प्रहरच्या घटका उपरांतिक भोजन करून आपण आराम करीत बसले होते. ते समयीं गाडदी लोक हजरीस ह्मणून तयार होऊन आले होते. एकास एक कजिया

करून वाड्यांत शिरले. एकदाच हजार बाराशे गाडदी जमा आत झाले. याशिवाय बाहेर पांचसात हजार जमा होते. आंत गेले ते लोक देवघर आदिकरून भरून गेले. श्रीमंत रावसाहेबांकडे ( नारायणरावाकडे ) गेले. हें वर्तमान श्रीमंतांचे शागीर्द पांच चार जवळ होते. ( त्यांनीं ) हें वर्तमान सांगितलें जे. दादासाहेबांचे गाडदी वाड्यांत शिरले. दंगा झाला. ह्मणतांच खाशांनीं ( नारायणरावांनीं ) हातचा निमचा[1] घेऊन दादासाहेबांकडे गेले. दादासाहेब नाटकशाळेंत[2] होते तेथेंच जाऊन गांठलें. रुबरू बोलिले "जे तुमचे गाडदी वाड्यांत शिरले. तुम्हीं आपला जीव सांभाळणें." ह्मणून तरवार उपसली. दादासाहेब यांणीं मिठी घालून हात धरितांच काकुळतीस आले. "जीव वांचविणें." इतक्यांत गाडदी यांनीं पाठलाग करून वार केला. ते समयीं दादासाहेब यांनी पोटाशीं घेतलें. परंतु गाडदी कहेत न राहता पाय धरून ओढून कचाकच वार केले. तेथेंच मुडदा पडला. त्या गडबडीत दादासाहेबांस कपाळावर व डाव्या हातावर दोन जखमा लागल्या. मागतीं सभोंवते गाडदी जमा होऊन दादासाहेबांची द्वाही फिरविली. शहाजणें वाजली. ही गडबड होतांच बाहेरील मुत्सद्दी घाबरे झाले. शेवटीं बापू व बजाबा पुरंदरे, आदि करून मुख्य मुख्यास चोपदार पाठवून दादासाहेबानीं बोलावून नेलें. तमाम बंदोबस्ती करणेस चिंतो विठ्ठल यास सांगितले. त्यानीं अंगीकार केला. राजश्री बापू तो सर्वत्रांस वडील दाग्वविण्यास केले आहेत. शव तीन प्रहर रात्रीस दहापांच ब्राह्मण व मशाल बरोबर देऊन दहन करविलें. दिवस उगवेतों तमाम मुसद्दी वाड्यांतच होते. दहा पंधरा ब्राह्मण मारिले गेले. व शागीर्दही मेले. पहाटेचे वेळेस एक चोपदार पाठवून सरदार बोलावून भेटून त्यांची समजूत करून आपला बंदोबस्त करीतच आहेत. वाड्याचे दरवाजे अद्याप खुले नाहींत. गाडदी तमाम भरले आहेत. पुरता बंदोबस्त झाल्यावर काढतील. काल मंगळवारी तिसरे प्रहरीं श्रीमंत राजश्री दादासाहेब यांणीं आपाजीराम

१ हातातील कृपाणाप्रमाणे चपट्या तोंडाचें लहान शस्त्र.

२ दादासाहेबास कैदेंत ठेविले होतें ती जागा पूर्वीची नाटकशाळेची होती. त्यांतील दिवाणखान्यांत.

( हैदरचा वकील ) यास बोलावण्यास बोलावणी पाठवून भेटतांना तमाम मुसद्दी कारभारी लोक होते. तितक्यांत आपण विटाळाचा ह्मणून अवघ्यापेक्षां जवळ बोलवून बोलिले जे. " आह्मांकरतां तुम्हीं फार श्रमी झालां. परंतु क्रिया सोडली नाहीं. करार केला. बरें चिंता नाहीं. इतःपर तुमचें ऊर्जित फार करूं. तुमचे धण्याचेंही बहुतच ऊर्जित करूं. बहुतां दिवसांचा त्यांचा आमचा ऋणानुबंध आहे. त्यांचा मुद्दा जो आहे तो करूं. तुम्हीं जलद ज्याप्रमाणें आपल्या धण्यास जें जें लिहिणें असेल तें बेफामीनें लिहिणें. तुमचा मुद्दा काय असेल तो सांगणें." ह्मणतांच राजश्री आपानी जाब दिला कीं, " आह्मीं सेवक उभय-पक्षींचे असों. एका संस्थानचें एका संस्थानास येणें विहितच आहे. अशामध्यें एकाचें म्हणविल्यावर एकास दुःख वाटतें. आपणांकरतां श्रमीं झालों ह्मणून आज्ञा केलीत. तर आमचा भोग होता! धण्याचा मजकूर आह्मांस येथें कैद करतांच फौजा तयार करून मुलखावर पाठविल्या. दोन मजली कुच करून आले. मागती आह्मांस सोडविल्याचें कळतांच आमचे हातचा कागदही जाऊन पावला. तेव्हां फौजा आपणाकडे महकूब केल्या आणि दुर्गावर[1] पाठविल्या आहेत. त्याचें पारिपत्य करून सावनुरकराकडे येणार. याप्रमाणें पत्रें आलीं. त्या दोघांचें पारिपत्य करणें निश्चय. तेही हेंच इच्छित होते. त्याप्रमाणें मनोगत त्यांचेंही सिद्धीस गेलें!" म्हणून कित्येक ममतेच्या गोष्टी फार कांहीं बोलिले. त्यांस फार कांहीं संतोष होऊन बोलूं लागले जे, "जखम फार दुखत आहे. शेकावी लागते. आह्मीं तुह्मास जे क्षणीं बोलावूं तेच क्षणींच येत जाणे." ह्मणून सांगून उठले. राजश्री (आपाराम) बरोबर आह्मी गेलों होतों. ही सारी गोष्ट आह्मां देखत झाली. इतकीयावर राजश्रींचें उर्जित फारच होईल असें दिसतें. सर्वत्र यांचेच हितचिंतक आहेत. धण्यासी यांचा जागा झाला आहे. अशाप्रसंगीं आपण तेथील मजकूर ज्याप्रमाणें पाहिजे त्याप्रमाणें यजमानांस सांगून कबूल करून येथील बंदोबस्ती जे जें होणें आहे तें काम हातीं घेऊन

---

१ चित्रदुर्ग संस्थानवर

लिहून पाठवावें. म्हणजे जे जे आपले मनोभाव आहेत ते सर्व घडून येतील. समय या वांचून दुसरा नाहीं. त्याचा तपशील किती म्हणून लिहावा ! येथील प्रकाशक ( नाना फडणीस ) देखील घाबरला आहे. यासी फार कांहीं गडबड करावयास चुकत नाही. राजश्रींनीं सर्व आशा टाकून आपले क्रियेस लक्ष ठेऊन तुमचे उर्जित चिंतित आहेत. तेथलि बंदोबस्ती करून येथील मजकूर व दक्षणेचें वर्तमान जें आपली मर्जी आहे त्याप्रमाणे घडोन देतील. हे समयीं हरएक गोष्टीची जीद न करता यजमानांस हातीं घेऊन काम चालीस लावणें. सर्वत्रांचें उर्जित करणें. यामध्ये इहपर दोन्हीं आहेत. फल काल परित्याग न करणें. तेथील काम हाताखालीं घेतल्यास सर्व घडून येईल. खाली घरी बसून बंदोबस्त होणे ती गोष्ट निराळीच आहे. जे गृहस्थ तुह्मा करितां झोबत आहेत त्यासी बेजार न करणें. राजश्री रविनामकही बहुत कांहीं गोड बोली बोलतात. राजश्री आकार नामक बोलतात जे या प्रमाणें शेंवट पावेतो आह्मीं वाट पहातों. परंतु राजश्रीस करावयाची उमेद दिसत नाहीं. आह्मीं होऊन कोठपावेतो वाट पहावी ! असे ह्मणतात. वडीघडी राजश्री अह्मांसी बोलतात जे. आमची शर्थ किती आहे तितकी सर्व देणे घेणें तमाम आशा सोडून गृहस्थांचे अभिमानाकरितां सोडिले. परंतु प्राप्त दिसत नाहीं. या प्रमाणें आह्मीं सोडिलें ह्मणजे उभयपक्षीं काम जाईल. खराबही होईल. ह्मणून बहुत कांहीं बोलत जातों. त्यास आम्हीं जे जे समाधान करावें तें करतों. परंतु आपण मात्र आळस न करता तेथें धण्याची मर्जी कशी आहे तसे कबूल करून काम घेणे. दोन्हीं कडील बंदोबस्त ज्या रीतीनें पाहिजे त्या रीतीनें होऊन येईल. हे काबू दुसरे समयी येणार नाहीं. आतां झालें तरी राजश्री रविनामक यास हातीं घ्यावें ह्मणून किती खुषामत करतों. परंतु आम्हीं जवळ आणोन गांठ पडों देत नाहींत. क्षणक्षणीं समाधान करीत जातों. इतकें श्रम केल्यास सार्थक करावें. त्याही वर पेशजी राजश्री आकाराकडून त्यांचे यजमानास पत्र लिहून पाठविले. भाव पेशजी

तपशीलवार आपणास कळविला होता. त्याचा भाव राजश्रीस परवाना आला व जिन्नस ( पत्र ) दाखविलें. त्यांत लिहिलें भाव-दुर्गकरावर फौजा तोफा पाठविल्या आहेत. तिकडून वकीलही आला आहे. गोष्ट उरकतांच सावनूरकरांचें काम काबू. ती सूचना लिहिली आहे ह्मणून लिहिलें आहे. व जिन्नस पत्र दाखविलें आहे. त्याची अमदानी झाल्यावर कोणासही आटोपणार नाहीं. भारी मनसबा पडेल. या गोष्टीचे निदर्शन लिहिले-प्रमाणें आलें कीं नाहीं तें पहाणे. शेवटपावेतो परीक्षा न करणें. येथील आशा सोडणें ह्मणून धण्यास सागणे. येथील मजकूर कित्येक लिहिणेस येते. एक न येते! एक भोंसले माजले आहेत. हिंदुस्थान खवळलें आहे. मोंगल खवळले आहेत. याप्रमाणें वर्तमान आहे. अशा प्रसंगीं तुह्मांस कोण विचारतो ? व्यर्थ दौलत न बुडविणें. शेवटीं माधवरायास हें वर्तमान मसलत सांगून त्यास कोणत्या रीतीने सांगावे तें सांगून अपकीर्ति न घेणें. तुह्मीं बेफाम असणें ह्मणून क्रिया देऊन एक होऊन काम काढणें. मागून जें जें मनास येईल तें करणे. येथून राजश्री रविनामकाचाही कागद करवून परभारें पाठवितों. तुमचें नांव कांहीं सांगत नाहीं. घरोब्यामध्यें दौलतेस क्षेम होय ते काम करणे ह्मणून सांगतो. तेही समजत आहेत. येथील बोलणें जैसा प्रसंग पडेल त्याप्रमाणें बोलतो. तुमचें नाव परिछिन्न घेत नाहीं. समाधान असो देणें. तपशील किती लिहावा! घोडे एक घेणें लागेल. खर्चास मात्र पाहिजे. समयावर पैसा मिळणार नाही. देवाजीस जलद पाठविणें. तपशीलवार वर्तमान लिहूं हे विनंती. राजश्री व्यंकट-रावजींस साष्टांग नमस्कार. कृपापूर्ण असली पाहिजे. एखादें अक्षर नडलें असलें तरी सुधारून पहाणें. चिरंजीव वेंके यांस आशिर्वाद. क्षेमरूप असो हे आशिर्वाद. एखादें अक्षर चुकलें असलें तरी उत्तम प्रकारें पाहून समजून घेणें. दुसऱ्याने पहावयास अवकाश पडला नाहीं. हे विनंती. राजश्री आपांची भेट दादासाहेबांस जाहली. याचा उत्साह पाहतां राज-श्रींचें ऊर्जित फारच होईल असें दिसतें. आपण मात्र माणसास पाठवा-वयास आळस न करणें. शुद्ध चतुर्दशीस कागद लिहिला तोही पाठविला आहे.

२०. वरील तीन पत्रें नारायणरावाचा मृत्यू झालेनंतर दोन तीन दिवसांच्या फरकानें लिहिलीं असल्यानें तीं फार महत्वाचीं आहेत. पहिलें व दुसरें पत्र हीं नाना फडनविस यानीं सांगितलेल्या माहितीप्रमाणें त्यांच्या पक्षांतील पटवर्धन यांस लिहिलीं आहेत. नानाचा पक्ष ह्मणजे राजपक्ष. अर्थात् तो नारायणराव याचा पक्ष मानला जात असे. त्यामुळे नारायणरावांचा अपराध तो त्यांच्या पक्षाचा अपराध ठरणारा असल्यामुळें, त्या पत्रांतील माहिती आपल्या पक्षाला सांभाळून अशी लिहिलेली असणार यांत संशय नाहीं. शिवाय राघोबादादा याचा पटवर्धन मंडळी अत्यंत द्वेष करीत होती. त्यामुळे त्यांचीं असतील नसतील तेवढीं व्यंगें काढण्यांत व त्यांच्यावर भलभलते आरोप लादून त्याची नाचक्की करण्यात पटवर्धनांना आनंद वाटत होता. नाना फडणविस याना पटवर्धन सरदाराच्या मनांत राघोबादादांविषयीं दिवसेंदिवस द्वेष वाढत जाण्यामध्ये समाधान व फायदा वाटत होता. या वाढत्या द्वेषामुळे पटवर्धन सरदार नानांच्या पक्षाला जास्त जखडून जाणार होते. ह्मणून वामनराव पटवर्धन यांना जीं पत्रें लिहिलीं आहेत तीं सर्वस्वी एकदेशीय माहितीनें भरलेलीं आहेत. नाना फडनविस हे वाड्यात नारायणराव मेल्याच्या दुसऱ्या दिवशीं गेले. त्यानीं नारायणरावाचे प्रेत पाहिले नाही किंवा ते दहनालाही ओंकारेश्वरावर गेले नाहीत. ते वाड्यात गंगाबाई, आनंदीबाई, पार्वतीबाई अगर सगुणाबाई यांनाही जाऊन भेटले नाहींत. त्यानीं जी माहिती पटवर्धन याना कळविली ती सांगासांगीची होती. अर्थात् ती तिखटमीठ लावून खोटी बनविली होती यात तिळप्राय संशय नाही. नानांना पटवर्धनाना जी माहिती लिहिली ती खोटी होती, असे ह्मणणें मोठ्या धाडसाचे होईल, असे प्रथमदर्शनीं वाटते. पण खरें पाहूं गेलें असता तें तसे नाहीं. कारण नानानीं जें दुसरें पत्र लिहिले तें नारायणराव मेल्यानंतर चवथ्या दिवशीं लिहिले आहे. यावरून वाड्यात ज्या गोष्टी घडल्या त्याची नीट चौकशी करून त्यांनीं ही हकीकत लिहिली असावी, असें अक्कदर्शनी वाटतें. परंतु नानांना

वाड्यांतील कोणतीच खरी हकीकत समजली नाही अगर त्यांनीं आपले कारस्थानी डाव खेळण्याच्या धांदलींत ती समजून घेण्याचा प्रयत्नच केला नाहीं असें ह्मटले पाहिजे. या गोष्टीचे स्पष्टीकरण एका ढोबळ गोष्टीच्या सत्यानें होण्यासारखें आहे. सदर पत्रात नारायणरावांचे शव रात्रीं दहनास नेल्यानंतर गंगाबाईचा (वपन) विधि उरकला असा मजकूर आहे. वपनविधि रात्री करूं नये, तो धर्मबाह्य आहे, असें असतां हेंही धर्मबाह्य कृत्य दादासाहेबानी करविले, अशीही मल्लीनाथी त्या पत्रात नानांनीं करून पटवर्धनाना चीड येईल असा प्रयत्न केला आहे. पण मजा ही आहे की, मुळात गंगाबाईचा वपनविधीच मुळीं झाला नाही. अर्थात् नानांनीं ही धडधडीत खोटी बातमी पटवर्धन याना लिहिली आहे. ज्या नानाना गंगाबाई ही सोंवळी झाली नसताहि ती तशी झाली अशी उलटी बातमी चार दिवसांच्या चौकशीनतर लागते, त्या नानांना नारायणरावांच्या मृत्यूसंबंधीं सर्वच उलट माहिती लागली असेल यांत नवल वाटण्याचें कारण नाहीं. याचें कारण असे होते की, त्याच्या विचाराची गति पक्षांधस्वानें उलटच वाहत होती.

२१. सदर पत्र नानानीं लिहिलें नसून ते पटवर्धनांच्या कारकुनानें लिहिलें आहे, तेव्हां त्यात नानाचा काही संबंध नाहीं, अशी कोणाला शंका येईल. पण ती चुकीची आहे. त्या पत्रांत असें स्पष्ट ह्मटलें आहे कीं, हें पत्र ह्मणजे 'त्याचें (नानाचें) पत्र व आमचें पत्र लिहिलें आहे.' यावरून या पत्राचा लेखक पटवर्धन याचा कारकून हा केवळ नाममात्र होता, हें पत्र नानाच्या सागण्याप्रमाणेंच लिहिलें होतें यांत संशय नाही. नानांनीं जशी माहिती दिली तशी त्या कारकुनानें लिहिली आहे. अर्थात् गंगाबाईचें वपन न होतां नानांनीं ती खोटी बातमी लिहविली असेंच सिद्ध होतें. या एका महत्वाच्या गोष्टीवरून दुसऱ्याही गोष्टींचा सहज उलगडा होतो. नारायणरावांनीं राघोबादादांकडे जाऊन 'वाचवावें, किल्ल्यावर घालावें, नाचण्याची भाकर द्यावी' वगैरे जी काकळुतीला येऊन विनंति

केली व त्याच्या गळ्याला घट्ट मिठी मारली वगैरे जी हकीकत सदर पत्रांत आहे, तीही वरील गोष्टींप्रमाणे धादांत खोटी आहे. या सर्व गोष्टी राघोबा-दादांविषयीं जास्त चीड उत्पन्न व्हावी, म्हणून नानांनीं स्वकपोलकल्पित लिहविल्या आहेत. त्यांत सत्याचा कोणताच अंश नाहीं. हीं दोन पत्रें नानांचीं असल्यामुळें तीं विश्वसनीय आहेत अशा समजुतीनें आजपर्यंतच्या इतिहासलेखकांनीं दुसऱ्या पत्राकडे डोळेझाक केली आहे. नाना फडनविस साडेतीन शहाण्यांपैकीं एक होते. तेव्हां त्यांच्याविरुद्ध असलेल्या पत्राकडे इतिहासकारांनीं सहज दुर्लक्ष केलें असेल यांत शंका नाहीं. परंतु ज्याला सत्य उजेडात आणावयाचें असेल त्यानें मोठ्या माणसाला गुन्हेगार कसें ठरवावें असा विचार मनांत न आणतां, साधकबाधक रीतीनेच कोणत्याही गोष्टीचा विचार केला पाहिजे. त्या दृष्टीनें पहातां तिसरें पत्र अत्यंत महत्वाचें आहे. त्याचा लेखक नारायणरावाच्या मृत्यूनंतर दुसरे दिवशीं वाड्यात प्रत्यक्ष गेला होता. त्यानें राघोबादादाच्या तोंडून जी माहिती ऐकिली, व त्या ठिकाणीं जे मोठमोठे लोक जमले होते त्यांच्या तोंडून जी खरी माहिती समजली, ती त्यानें लिहिली आहे. त्याला पक्षाभिमानाचें कारण नव्हतें. तो स्वतः कोणत्याही पक्षात नव्हता किंवा नारायणरावाना धरण्याच्या किंवा मारण्याच्या कटांतही त्याचे अंग नव्हते. तो केवळ त्रयस्थ होता; व सांप्रत उत्पन्न झालेल्या परिस्थितीचा फायदा आपल्या लोभाच्या माणसांना करून देण्यापुरताच त्याचा हितसंबंध होता. म्हणून त्यानें आपल्या पत्रांत जी माहिती दिली आहे, ती पूर्ण विश्वसनीय आहे असें धरून चालण्यास हरकत नाही. लेखकानें सदर पत्र मोठ्या गडबडीनें लिहिलें आहे. पत्र लिहिल्यानंतर ते पुन्हां वाचून पहावयालाही त्याला फुरसत मिळाली नाहीं. अर्थात त्यानें पत्रांत जी माहिती दिली आहे ती सविस्तर नसून त्रोटक आहे. ती वाचून घडलेल्या गोष्टीचा मथितार्थ वाचकाला कळावा एवढाच त्या पत्राचा हेतू आहे. तें पत्र चिकित्सक, बुद्धीनें वाचलें असतां नारायण-रावांच्या मृत्यूसंबंधीं खालीलप्रमाणें खरी हकीकत सूर्य प्रकाशात येते.

२२. पेशव्यांच्या गादीवरून नारायणरावांना काढून ती गादी आपणाला प्राप्त व्हावी या उद्देशानें राघोबादादा हैदरबरोबर मनसबा करीत होते ही गोष्ट मुद्दे पुराव्यानिशीं उघडकीस आल्यामुळें नारायणरावांनीं राघोबादादांना आपला शत्रू समजून कैदेत टाकलें होतें. त्या ठिकाणीं त्यांनीं त्यांचे अनन्वित छळ केले. त्यांची नाना प्रकारे अमर्यादा आणि अपमान त्यांनीं केले. त्यांना आठ आठ दिवस उपोषणे घातली. आनंदीबाईचीही फार अमर्यादा केली. एकंदरींत राघोबादादांना व आनदीबाईंना नारायणरावांनीं शत्रूप्रमाणे लेखून त्याचा छळ केला. नारायणरावावर दादासाहेबांचा जो धाक होता, तो या त्याच्या बंदिवासामुळें उडाला. नारायणरावांना आतां आपण पूर्ण स्वतंत्र झालो, असे वाटूं लागलें. कोणाचाच धाक नाहीं, आता आपण करूं ती पूर्व दिशा, अशी त्याची समजूत झाली. त्यांच्या सभोंवतीं तोंडपुजे लोक जमा झाले. खुषमस्कऱ्याच्या सगतींत त्यांचा काळ जाऊं लागला. त्यांना आपण पूर्ण निर्भय आहों असे वाटूं लागलें. त्यांच्या शासनपद्धतींत क्रूरपणा उत्पन्न होऊं लागला. अशा बेफाम स्थितींत त्यांचा कालक्षेप चालला असतां मुत्सद्यांच्या विचारे सखाराम बापूंना पुढारीपणा देऊन नारायणरावाना धरण्याचा कट झाला. त्या कटांत नाना फडनविस यांनीं मारण्याचा गुप्त कट निर्माण केला. त्याप्रमाणें गारदी वाड्यांत शिरले. शनिवारवाडा ताब्यांत घेण्याकरता लष्करी शिरस्त्याप्रमाणें जी कापाकापी करावी लागली, ती गारद्यांनीं सुरू केली. आपल्या कर्तव्याच्या आड जो कोणी येईल, त्याला लष्करी शिस्तीप्रमाणें देहदंडाचें शासन देत गारदी वाड्यांत घुसूं लागले. लष्करी शिस्तींत आड येणाऱ्या लोकांत स्त्री-पुरुष, मराठा-ब्राह्मण, लहान-थोर किंवा माणूस-जनावर असा कोणताच भेद मानण्यांत येत नाहीं. आडवा आल्यास कापून काढणें हा एकच ढोबळ लष्करी शिस्तीचा मार्ग आहे. त्याप्रमाणें कापाकापी सुरूं होतांच नारायणरावांकडे त्यांचे चारपांच शागीर्द गेले. त्यांनीं त्याना 'दादासाहेबांचे गारदी वाड्यांत शिरले; कापाकापी सुरूं केली असे सांगितलें.'

या बातमीमुळें नारायणरावांच्या डोळ्यापुढें त्यांच्या भावी आयुष्याचें भवितव्य चित्रपटाप्रमाणें नाचूं लागलें. आधींच दादासाहेबांबद्दल त्यांच्या मनांत द्वेषाग्नि पेटत होता. त्यांत वरील बातमीचें तेल ओतलें गेलें. त्यामुळें नारायणरावांचा राग अमर्यादित झाला. ते स्वभावतःच अविचारी असल्यामुळें अत्याचाराची कल्पना त्यांच्या डोक्याला तावडतोब झोंबली. या त्यांच्या बेताल मनस्थितीला आंवरून धरणारे हरिपंत फडके या वेळीं त्यांच्याजवळ नव्हते. पेशव्यांकडून वेडीवांकडी गोष्ट न होऊं देण्याची जबाबदारी त्यांच्यावर होती. पण ते धरण्याच्या कटाला तोंड फोडून देऊन मर्जेत पंचपक्वानाचें भोजन करण्याकरतां गेले होते. त्या वेळीं नारायणरावांजवळ हरिपंत फडके, बाळाजीपंत ठोसर किंवा बाळाजीपंत दामले यांपैकीं विवेकी असा एकही शरीरसंरक्षक हजर नसल्यामुळें, त्यांच्या अविचारी बुद्धीनें दादासाहेबांच्या खुनाची कल्पना अंगिकारिली. ‘दादासाहेबांनाच मारून टाकलें तर गारदी कोणाला गादीवर बसविणार!’ या बालिश विचाराच्या भरांत नारायणरावांनीं डाव्या हातांत लहान निमचा घेतला, उजव्या हातांत तरवार घेतली व ते राघोबादादांचा खून करण्याकरतां त्यांच्या कैदखान्याकडे चालले. त्यांच्याबरोबर नारोजी नाईक, इच्छारामपंत, चाफाजी खिजमतगार, हे होते. त्यांनीं दादासाहेबांना त्यांच्या कैदेच्या दिवाणखान्यात गांठलें. दादासाहेब कैदेंत असल्यामुळें ते निःशस्त्रच होते. त्यांना अडवून नारायणरावांनीं म्हटलें कीं, “ तुमचे गाडदी वाडयांत शिरले. तुम्ही आपला जीव सांभाळणें; ” याचा अर्थ एवढाच कीं, “ तुमचे गारदी मला कैद करण्याकरता वाडयांत शिरले आहेत. पण मी असा तसा बंदिवान होणारा नाही. माझ्याशीं गांठ आहे. आतां तुम्हीं तुमचे प्राण कसे वांचवितां हें मी पहातों. आतां अखेरचें देवाचें नांव घ्या.” असें दादासाहेबांना नारायणरावांनीं आव्हान दिलें आणि त्यांच्यावर तरवार उपसली. नारायणरावांनीं दादासाहेबांच्या डोक्यावर तरवारीचा पक्का वार केला. परंतु दादासाहेब हे जरी कैदेंतील हालअपेष्टांनीं व उपोषणांनी अशक्त झाले होते, तरी ते शस्त्रविद्येंत प्रवीण असल्यामुळें नारायणरावांनीं त्यांच्यावर वार करतांच

त्यांनीं आपला पवित्रा बदलला व एकदम बगल घेऊन ते नारायणरावांच्या पाठीवर आले. त्यांनीं आपल्या डाव्या हातानें नारायणरावांच्या छातीला आंवळून धरलें व उजव्या हातानें नारायणरावांचा तरवार धरलेला उजवा हात घट्ट धरला. त्यामुळें नारायणराव कैचींत सांपडले. राघोबादादांनीं नारायणरावांना घट्ट आंवळून धरल्यामुळें त्यांची त्यांना मारण्याची धडपड बंद पडली व ते चिरचिर करून काकुळतीस आले. नारायणरावांचे शागीर्द जवळच होते. ते दादासाहेबांच्या हातून नारायणराव यांस सोडविण्यास पुढें येतात, इतक्यांत गारदी त्या ठिकाणीं आले. त्यांनीं पहिल्यानें या शागीर्द लोकांची कत्तल केली. राघोबादादा डोक्यावर वार झाल्यानें रक्तबंबाळ झालेच होते. त्यांच्या डाव्या हातालाही जखम झालीच होती. नारायणराव राघोबादादांचा खून करीत होते, हें गारद्यांना समजतांच त्यांना जास्त त्वेष चढला. या वेळीं दादासाहेबांनीं नारायणरावांना पोटाशीं धरलें होतें. नारायणरावांच्या प्रतिक्रियेच्या हालचाली बंद पडल्यामुळें दादासाहेबांच्या मनांत अपत्यप्रेमाची दया उत्पन्न होऊं लागली होती. तोंच मारण्याच्या कटाचा मुख्य पुढारी तुळाजी पवार पुढें आला. त्यानें नारायणरावाला ओढण्याचा प्रयत्न चालविला. राघोबादादा नको नको ह्मणत असतां त्यानें पायाला धरून नारायणरावाला ओढलें. दादासाहेबांचा खून करण्याला प्रवृत्त झालेला दुष्मन् ह्मणून गारद्यांनीं त्यांच्यावर वार केले. नारायणराव तेथेंच मरून पडले. गारद्यांनी ऐन वेळेला येऊन आपलें प्राण वांचविले, असें दादासाहेबांना वाटलें. गारदी जर ऐन वेळीं आले नसते तर खात्रीनें दादासाहेब नारायणरावांच्या व त्यांच्या साथीदारांच्या तरवारीला बळी पडले असते. तुळाजी पवार व गारदी यांचे त्यामुळें आपणावर उपकार झाले असें दादासाहेबांना वाटलें.

२३. वरीलप्रमाणें नारायणरावांच्या मृत्यूची हकीकत उपलब्ध आहे. ह्या त्यांचा मृत्यू खुनानें झाला किंवा आत्महत्येनें झाला यांतील सूक्ष्म भेदाचें पृथःकरण शेवटीं एका स्वतंत्र प्रकरणांत येणार असल्यामुळें तें गौप्यगोपनच राहूं देणें येथें इष्ट आहे. म्हणून त्याचा गौप्यस्फोट करीतोंपर्यंत नारायणरावांचा वध

झाला असेंच गृहीत धरून पुढील हकीकत निवेदन करणें या ठिकाणीं प्राप्त आहे.

२४. नारायणरावांचा वध झाल्यानंतर गारद्यांनीं दादासाहेबांना सदरेला बसविलें. सर्व गारदी एकत्रित झाले. शनिवारवाड्याचा बंदोबस्त केला. पहारे बसले. शाहाजणें वाजलीं आणि गारद्यांनीं दादासाहेबांच्या नांवाची द्वाही फिरविली. त्यामुळें पुणें शहरांत मोठी हूल पडली. बाजार बंद करून लोक पळत सुटले. लुटालूट होणार ह्मणून लोक घाबरले. तेव्हां सरदार मंडळी तयारीनें बाहेर पडून कोतवाल चौकीवर येऊन दाखल झाली. सखारामबापू, आबाजी पुरंदरे, हरिपंत फडके, नाना फडनविस, भवानराव प्रतिनिधि, मोरोबादादा फडनविस, बाळाजीपंत दामले, पानशे, राघोजी आंग्रे, आनंदराव जिवाजी, त्रिंबकरावमामा पेठे, आपाजीराव पाटणकर, खंडोजी जगताप, आनंदरावर रास्ते, आपा बळवंत, गोविंदराव गायकवाड, मालोजीराव घोरपडे, मालोजी निंबाळकर वगैरे कित्येक सरदार, मुत्सद्दी, मानकरी वगैरे मोठमोठे लोक जमा झाले. गारदी शहरात लूटमार करतील ह्मणून सर्वांच्या विचारें त्यांनीं अगोदर शहराचा बंदोबस्त करण्याचें ठरविलें. ठिकठिकाणीं चौक्या बसवून त्यांनीं शहराची ताबडतोब नाकेबंदी केली. आतांपर्यंत या मंडळीला वाड्यांतील हकीकत समजली नव्हती. तेव्हां सखारामबापूंनीं हरिपंत फडके यांच्या हस्तें दादासाहेबांना चिट्टी[1] लिहविली. त्यांत वाड्यांतील काय बातमी आहे हें विचारलें. त्याचें उत्तर दादासाहेबांच्याकडून सखारामबापूंस असें आलें कीं, "आतां व्यर्थ खटपट कशास करितां? चिरंजीव राव गारद्यांच्या कटकटींत मारिले गेले. मीही गारद्यांच्या कैदेंतच आहे. तुम्हीं आंत येऊन भेटून जावें." त्याप्रमाणें सखारामबापू, बजाबा पुरंदरे वाड्यांत दादासाहेबांच्या भेटीला आले. त्याचप्रमाणें दादासाहेबांनीं चोपदार पाठवून सर्व सरदारांस व मुत्सद्यांस वाड्यांत बोलाविलें. त्याप्रमाणें एकएक सरदार व मुत्सद्दी वाड्यांत गोळा होऊं लागले.

---

१. डफकृत मराठ्यांची मराठी बखर पान २३७.

२५. गारदी नारायणरावांना धरण्याकरतां वाड्यांत शिरले त्या वेळीं त्यांच्यावर त्यांच्या अधिकाऱ्याचें नियंत्रण राहिलें नाहीं. त्यांनीं देवघरांत प्रवेश करून देवतार्जनाचीं सोन्यारुप्याचीं भांडीं, जडजवाहीर, तेथील मौल्यवान् वस्तु, सर्व कांहीं लुटून फस्त केलें. स्वयंपाकाचीं भांडींही त्यांनीं लांबविलीं. माकडाच्या हातांत कोलीत दिल्याप्रमाणें गारद्यांची अवस्था झाली. लुटीकरतां हपापलेले गारदी अशी संधि थोडीच व्यर्थ जाऊं देणार होते! या लुटींत ते मालक व शत्रू यांतील भेदभाव विसरलेले होते. त्यामुळें या वेळीं त्यांनीं मालकाचा वाडा लुटला. धरण्याच्या कटांत हरिपंत फडके होते. वाड्याचा बंदोबस्त व त्यांतील लोकांचें संरक्षण करणें हें त्यांचें काम होतें. त्यांच्याच आज्ञेंत वागणार हे गारदी होते. अर्थात् त्या प्रसंगीं हरिपंत फडके त्या ठिकाणीं हजर नसल्यामुळें वाड्यांत हा अनर्थ ओढवला. इतर बहुतेक मुत्सद्दी वाड्यांत गोळा झाले. पण शांततारक्षणाचे मुख्य जबाबदार जे हरिपंत फडके व त्यांच्या हाताखालील बाळाजीपंत दामले व बाळाजीपंत ठोसर हे वाड्यांत आले नाहींत. हरिपंत फडके वाड्यांत न येतां परागंदा झाले.

२६. नारायणरावांच्या मृत्यमुळें वाड्यांत जिकडे तिकडे आक्रोश सुरू झाला. त्यांची पत्नी गंगाबाई सती जाण्यास उद्युक्त झाली. त्यांना पुष्कळ मोठमोठ्या मंडळींनीं सती न जाण्याबद्दल विनंतीपूर्वक आग्रह केला. खुद्द दादासाहेबांनींही सांगून पाहिलें. परंतु त्यांनी कोणाचेंही न ऐकतां सती जाण्याची तयारी चालविली. आनंदीबाईंनीं गंगाबाईंना सांगितलें कीं 'तुला दिवस गेले आहेत. ह्मणून गरोदर स्त्रीला सती जातां येत नाहीं.' या गोष्टीमुळें सुद्धां त्यांची समजूत पडली नाहीं. तेव्हां आनंदीबाईंनीं गंगाबाईंना एका खोलींत कोंडून घातलें व त्यांना सती जाण्यापासून परावृत्त केलें. रात्रीच्या दोन प्रहरानंतर नारायणरावांचें शव शनिवारवाड्यांतून बाहेर काढण्यांत आलें व त्याचा यथाविधि संस्कार ओंकारेश्वरावर करण्यांत आला. वाड्यांतील इतर शवांचेही संस्कार त्याच वेळीं त्यांच्या त्यांच्या पद्ध-

तीनें झाले. दादासाहेबांना डोक्यावर एक व डाव्या हातावर एक, असे दोन वार झाले होते. अर्थात् शारीरिक व्यथा व मानसिक व्यथा यांतच ते होते. शिवाय ते गारद्यांच्या कैदेंत होते. सखारामबापू दादासाहेबांना वाड्यांत येऊन भेटल्यानंतर मध्यरात्रीला आपल्या शरीरीं स्वास्थ्य नाहीं, ह्मणून सांगून आपल्या घराला परत आले. नाना फडनविस व मोरोबादादा यांना आपल्या जागीं रात्र संपेपर्यंत स्वस्थ असावें असा निरोप आल्यानें ते वाड्यांत न जातां घरींच राहिले. बाकीचे मुत्सद्दी व राघोबादादा यांच्या पक्षांतील मंडळी रात्रभर वाडयांत दादासाहेबांच्या जवळ राहिली. गारद्यांनीं मात्र आपला पहारा शनिवारवाडयवर सक्त ठेविला.



# प्रकरण १४ वें.

# चोरांस मलिदा व अन्यास धत्तुरा.

## इ. स. १७७३ ते इ. स. १७७४.

१. पेशवाईचे कारभारी, सरदार, मुत्सद्दी वगैरे मंडळींची राघोबादादांच्या पेशवेपदावरील स्थापनेस संमती. त्याप्रमाणें नारायणरावांच्या बधानंतर दुसऱ्याच दिवशीं त्यांच्या नांवाची द्वाही.—२. गारद्यांनीं नारायणरावांचा खून करून राघोबादादांवर पर्वतप्राय उपकार केल्याचा आंव आणला. हरिपंत फडके परागंदा होतात. नारायणरावांच्या वधाबद्दल बक्षिस म्हणून निम्में राज्य गारदी मागूं लागले. अर्धे राज्य न मिळाल्यास मस्तानीचा नातू अलीबहाद्दर यांस पेशव्यांचे गादीवर बसविण्याबद्दलची गारद्यांची धमकी. मुत्सद्दी व राघोबादादा मिळून गारद्यांची आठ लक्ष रुपयांवर तोड करतात.—३. नारायणराव पेशव्यांस धरण्याऐवजीं मारण्याचें कृत्य आपणाकडून घडलें म्हणून सुमेरसिंगाला स्वतःच्या संरक्षणाची जबाबदारी जास्त वाटूं लागली. सुमेरसिंग स्वतःच्या संरक्षणाची हमी राघोबादादांकडे मागतो.—४. गारद्यांच्या कैदेंतून दादसाहेबांची कशी मुक्तता झाली.—५. पेशव्यांचें राज्य राघोबादादाविरुद्ध नाना फडनविसांनीं कसे पोंखरून ठेविलें होतें.—६. राघोबादादा व नारायणराव असे उभयतांही ठार व्हावेत, असें नाना फडनविसांच्या कारस्थानाचें स्वरूप होतें. परंतु राघोबादादा जिवंत राहिल्यानें नानांच्या नवीन कारस्थानाला पटवर्धनादि सरदाराकडे पत्रव्यवहार करून सुरवात झाली.—७. नारायणरावांच्या खुनाबद्दलची गुन्हेगारी नाना फडनविस सखारामबापूवर लादतात. सखारामबापू पेंचप्रसंगांत आल्यामुळें त्यांच्या मनाची गोंधळलेली स्थिति.—८. नारायणरावांच्या तिळांजुळीचे दिवशीं नानासाहेबांचा वंश चालवावयाचा; राघोबादादांच्या वंशास नमस्कारही करावयाचा नाहीं अशा मुत्सद्यांच्या लिंगावर पाणी सोडून आणक्रिया. नाना सखारामबापूंस आपल्या पक्षांत सामील होण्यास भाग पाडतात.—९ नानांनीं हरिपंत फडक्यास बारामतीस पळवून लावलें होतें. नानांचा विश्वासघातकी स्वभाव. हरिपंत फडके व राघोबादादा यांचा नाना समेट करतात. नानांनीं आपला पक्ष राघोबादादांकडून कसा निर्भय करून घेतला.—१० नाना फडनविस यांची राघोबादादाभोंवतीं कारस्थानी चक्रव्यूह

रचण्याची तयारी.—११ राघोबादादांनीं निजामाच्या पारिपत्याकरतां मोहिमेवर निघावें असा नानांनीं राघोबादादावर पहिला डाव टाकला.—१२. निजामास आंतून नाना फितूर झाले. राघोबादादांस निजामाशीं लढण्याकरतां मोहिमेवर काढलें. नानांनीं आपला पहिला डाव जिंकला.—१३. राघोबादादा शनिवारवाड्याची व्यवस्था करून निजामावरील स्वारीस निघतात. मार्गांत पेडगांवीं पेशवाईचीं वस्त्रें धारण करतात.—१४. नाना फडनविस व परशुरामभाऊ पटवर्धन यांची भेट.—१५. राघोबादादांवर ता. ११ अक्टोबर सन १७७३ पर्यंत नारायणरावांच्या खुनाची गुन्हेगारी लादलेली नव्हती. राज्यव्यवस्थेंत राघोबादादा ढवळाढवळ करतात ह्मणून त्यास उलटी देऊन खूळ माजविण्याचा मुत्सद्यांचा प्रयत्न.—१६. राघोबादादांना पदच्युत करण्याचें कारण राज्यांत ते घालमेल करतात ह्मणून सखारामबापूंची कल्पना. आनंदीबाई गंगाबाईचा गर्भपात करण्याच्या मार्गे आहे ह्मणून राघोबादादास पदच्युत करण्याची नानांची कल्पना देणाऱ्या परशुरामभाऊंच्या दोन पत्रांचा सारांश.—१७. मुत्सद्यांचें अंतरंग व बाह्यरंग.—१८. नाना फडनविसांनीं फैलावलेली हुल्लड.—१९. नानांच्या हुल्लडीस बळी पडलेले परशुरामभाऊ पटवर्धन.—२०. नाना फडनविसांस कर्णपिशाच्च सहाय होतें काय? परशुरामभाऊंचा भावनाप्रधान स्वभाव.—२१. गंगाबाईस राघोबादादांच्या बंदोबस्तांतून काढून आपल्या ताब्यांत घेण्याबद्दलचें मुत्सद्यांचें कारस्थान. या बाबतींत शिवाजी बाबाजी यानें वामनराव पटवर्धन यांस पाठविलेलें पत्र.—२२. गंगाबाई स्वाधीन होण्यानें नानांचा पक्ष प्रबळ होणार होता. २३. हरिपंत फडके परागंदा कां झाले होते.? 'ध' चा 'मा' कां व कोणी केला व तो कशासाठीं करावा लागला.—२४ नानांनीं 'ध' चा मा केला व त्यामुळें त्यांच्या कारस्थानाला जोर चढला.—२५. नारायणरावांस धरण्याच्या राघोबादादांच्या यादींत ध चा मा कोणी केला याविषयीं निरनिराळे तर्कवितर्क. रामशास्त्र्यांनीं राघोबादादांस देहांतप्रायश्चिताचा दंड केव्हां कोठें सांगितला या बाबतींत ऐतिहासिक मतभेद.—२६. रामशास्त्री यांनीं राघोबादादांस नारायणरावांच्या मृत्यूच्या दुसऱ्या दिवशीं शनिवारवाड्यांत देहांतप्रायश्चित सांगितलें रामशास्त्री प्रभुणे निस्पृही होते. पण ते न्यायी नव्हते.२७. रामशास्त्री प्रभुणे न्यायी असल्याबद्दलच्या भ्रमाचा भोंपळा कसा फुटला?—२८. ध चा मा केल्याचा आरोप आनंदीबाईवर हरिवंशाची बखर करते. तो धादांत खोटा कसा आहे याचीं प्रमाणें.

—२९. नारायणरावांच्या वधाच्या आरोपाच्या बाबतींत मुत्सद्यांनीं प्रसंगानुसार घेतलेल्या कोलांटी उड्या.—३०. नाना फडनविसांचे कारस्थानी वीर पुरुषोत्तम दाजी पुण्यास येतात.—३१. राघोबादादांच्या स्वारींत कोणकोण होते? राघोबादादांचा निजामाबरोबर लढाई देण्याचा निश्चय. सखारामबापू या मोहिमेवरून पुण्यास वरचेवर जात येत होते.—३२. साबाजी भोंसल्यांचा पुण्यावर स्वारी करण्याचा रोख. त्याच्यावर त्रिंबकरावमामा व रास्ते यांस राघोबादादा पाठवितात. राघोबादादा नळदुर्गचा किल्ला हस्तगत करतात. राघोबादादा निजामाचा पूर्ण मोड करतात.—३३. निजाम व राघोबादादा यांचा तह. पराभूत शत्रूबरोबर तह करण्याचा त्यांचा वीरवृत्तीचा मनोधर्म.—३४ साबाजीची तह करण्याची मागणी राघोबादादांनीं धुडकावून लाविली. हैदरबरोबर राघोबादादांचा नवीन तह. अर्काटच्या नबाबावरील राघोबादादांच्या स्वारीची तयारी.—३५. राघोबादादांच्या मोहिमेवरून सखारामबापू वगैरे मुत्सद्दी राघोबादादांना निरनिराळीं कारणें सांगून पुण्यास येऊन कसे जमूं लागले.—३६. नाना फडनविस, हरिपंत फडके वगैरे लोकांस पुण्यास परत पाठविण्याबद्दल सखारामबापूंनीं राघोबदादांविरुद्ध योजलेली विश्वासघातकी युक्ति—३७. राघोबादादांविरुद्ध बारभाईंचीं स्थापना. पेशव्याच्या गादीवर कोणास आणावें याबद्दल बारभाईपुढील तीन उमेदवार त्यांत नगरच्या किल्ल्यांतील तोतया ह्मणून प्रसिद्ध आलेले सदाशिवरावभाऊ हे एक उमेदवार होते. नाना फडनविस बारभाईंचे मेरूमणी कसे होते—३८. नानाचे हस्तक पुरुषोत्तम दाजी याचे, राघोबादादा व आनंदीबाई याचा नैतिक अधःपात झालेला लोकांना कसा दिसेल, याबद्दलचे प्रयत्न—३९. आनंदीबाईनीं तोळशर्करेच्या द्वारें आपल्यावर विष प्रयोग करण्याचा प्रयत्न केल्याचा पुरुषोत्तम दाजीचा आनंदीबाईवर आरोप. —आनंदीबाईकडून पुरुषोत्तम दाजीवर दुसरा विषप्रयोग करण्याच्या प्रयत्नाचा त्यांचा दुसरा आरोप.—४१. त्याप्रमाणें पुरुषोत्तम दाजींचा तिसरा आरोप.—४२. त्याचप्रमाणें चवथा आरोप. आनंदीबाईबद्दल गंगाबाईचें मन कलुषित करण्याचे बारभाईंचे प्रयत्न. गंगाबाईवर व पार्वतीबाईवर आनंदीबाईनीं मारेकरी घातले असा बारभाईकडून घडवून आणलेला नाटकी प्रसंग. त्याबाबतची पत्रें —४३ पेशव्यांचे राज्य गिळंकृत करण्याचा बारभाईचा स्पष्ट हेतु होता—४४. बारभाईंनीं गंगाबाई आदिकरून पेशव्यांच्या स्त्रियांस बाहेर काढून पुरंदर-

वर त्याना कसे नेऊन ठेवले ही हकीकत.—४५. पार्वतीबाई व गंगाबाई यांना शनिवारवाड्यांतून बाहेर काढण्यापुरत्याच पुरुषोत्तमदाजीच्या विषप्रयोगाच्या वगैरे बातम्या होत्या.—४६ नाना फडनविस सखारामबापूंना पुढें करून आपलें कारस्थान साधीत होते.—४७. अद्यापीही राघोबादादांचा सखारामबापूवर विश्वास.—४८. राघोबादादांचे सखारामबापूस पत्र.—४९. गंगाबाईची पेशव्याच्या राज्यावर बारभाई स्थापना करतात.

१. नारायणरावांचा वध झाला त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं दादासाहेबांनीं नाना फडनविस व मोरोबादादा फडनविस याना बोलावूं पाठवून वाड्यांत आणलें व त्यांच्याकडून पेशव्यांच्या सर्व सरदारांना नारायणरावांच्या मृत्यूबद्दल हकीकत लिहवून आपापल्या जागीं पुढील हुकूम येईतोंपर्यंत स्वस्थ असण्याबद्दल कळविलें. उभयतां फडनविसांनीं पूर्ववत् आपापलीं कामें करण्याचें कबूल केलें. त्याचप्रमाणें इतर मुत्सद्यानीं आपापलीं कामें हातीं घेतलीं. नारायणराव वारले त्यावेळेपासून दुसऱ्या दिवसापर्यंत सखारामबापू, नाना व मोरोबा फडनविस, त्रिंबकरावमामा पेठे, चिंतो विठ्ठल, भवानराव प्रतिनिधि, हरिपंत भिडे, सदाशिव रामचंद्र, सखाराम हरि, बाजीराव बर्वे, पाटणकर, घाटगे, थोरपडे, निंबाळकर वगैरे मुत्सद्दी आणि सरदारमंडळी वाड्यात येऊन दादासाहेबांना भेटून त्यांना नजराणे करून त्यांचा धनीपणा मान्य करीत होती. त्याचप्रमाणें इंग्रजांचा वकील मिस्टर मोस्तीन व हैदरचा वकील आपाराम वगैरे परराज्यांतर्फे पुण्यास असलेले वकीलही दादासाहेबाची भेट घेऊन त्यांच्या पेशवेपदाला मान्यता देत होते. राघोबादादांच्या नांवानें द्वाही फिरल्यानंतर त्यांचा पेशव्यांच्या गादीवरील धनीपणा सर्वांनीं मान्य करून त्यांच्या नांवानें राज्यकारभार चालविण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें सर्वांकडून अंमलबजावणी सुरू झाली.

२. राज्यकारभाराला सुरवात करण्यापूर्वी मुत्सद्यांना गारद्यांची समजूत घालून त्यांना शनिवारवाड्यांतून गोडीगुलाबीनें बाहेर काढून लावणें प्राप्त होतें. नारायणरावांच्या हातून दादासाहेबांचा प्राण वांचवून त्यांच्यावर हिमालयपर्वतप्राय उपकार केल्याचा गारद्यांनीं आव आणला होता. दादासाहेबांची वृत्ति शत्रूवरही उपकार करण्याची असल्यामुळें, गारद्यांच्या थोड्याशा सहाय्यानेंही

आपण त्यांचे उपकारबद्ध झालों, असें त्यांना वाटूं लागलें. त्या उपकाराची फेड दादासाहेबांनीं गारद्यांना ताबडतोब कंठ्या, शिरपेंच व एक लाख रुपये देऊन केली. त्या पारितोषकानें गारदी फुगून गेले. त्यांच्या तोंडाला, या प्रसंगीं जास्त लाभ होईल ह्मणून, पाणी सुटलें. शिवाय त्यांच्यावरील मुख्य अधिकारी हरिपंत फडके हे परागंदा झाल्याचें त्यांना समजतांच, त्यांना पूर्ण स्वातंत्र्य मिळाल्याप्रमाणें झालें. नारायणरावांना धरण्याबद्दल मुत्सद्यांनीं त्यांच्याशीं पांच लाख रुपये आणि साष्टी, नगर व पुरंदर हे तीन किल्ले कबूल केले होते. परंतु आतां त्यांनीं जास्त लांब पाय पसरण्याला सुरवात केली. त्यांचें म्हणणें असें पडूं लागलें कीं, “ राज्याचे धनी नारायणराव होते. ते आतां मेले. तेव्हां आह्मांला आतां निम्में राज्य वांटून द्यावें. ही आमची मागणी जर अमान्य होईल तर आम्हीं नारायणरावांप्रमाणें दादासाहेबांनाही मारून टाकूं व मस्तानीचा नातु अल्लिबहाद्दर यांस आणून पेशव्यांच्या गादीवर बसवूं. ” या वेळीं दादासाहेबांना गारद्यांविरुद्ध कांहींच बोलतां येण्यासारखें नव्हतें. ते नारायणरावांच्या कैदेंतून गारद्यांच्या कैदेंत पडले होते. गारद्यांची अर्ध्या राज्याची मागणी अर्थात् मुत्सद्यांना मान्य करतां येण्यासारखी नव्हती. या बाबतीत त्यांच्याकडून गारद्यांना नकार मिळाल्यामुळें पुणें शहरात जेवढा मुसलमान होता तेवढा शनिवारवाड्यावर गारद्यांनी गोळा केला. त्यांचे जथ पाडले. लहान लहान तोफाही आणून शनिवारवाड्यावर ठेविल्या. या बंदोबस्तानें दादासाहेब व मुत्सद्दी आपली मागणी कबूल करतील असें त्यांना वाटलें होतें. परंतु असल्या धमकीनें दादासाहेब व त्यांचे मुत्सद्दी भिणारे नव्हते. त्यांनींही आपली तयारी दाखविली. त्यामुळें गारदी नरम आले. भवानराव प्रतिनिधि यांनीं गारद्यांच्या बाबतींत मध्यस्ती करून आठ लाख रुपयांत त्यांचा सर्व तंटा तोडला. हे आठ लाख रुपये म्हणजे पूर्वी करारांत ठरल्याप्रमाणें पांच लाख रुपये व तीन किल्ल्याबद्दल तीन लाख रुपये मिळून आठ लाख रुपये दिले. गारदी अर्धें राज्य मागत असतांना त्याची तोड आठ लक्ष रुपयांवर झाली याबद्दल आश्चर्य वाटण्यासारखें आहे. परंतु त्यांतील खरें रहस्य पुढील गोष्टीवरून समजेल.

३. सुमेरसिंगानें नारायणरावांना धरण्याची कामगिरी मुत्सद्यांच्या शद्वा-प्रमाणें व राघोबादादांच्या अनुमतीनें अंगावर घेतली. त्या वेळीं धरण्याच्या कामगिरीला कोणत्याच पक्षाचा विरोध नाहीं असें त्याला दिसून आलें होतें. परंतु धरण्याची कामगिरी बजावतांना नारायणराव मेले यामुळें तो पेंचांत आला. म्यानांतून तरवार बाहेर आल्यानंतर लष्करी मनुष्याला मागचा पुढचा विचार राहत नाहीं. त्या वेळीं अंगांत जसें वारें शिरलें असेल त्याप्रमाणें कृति घडून येते. तुळ्या पवाराच्या ईर्षेला बळी पडून सुमेरसिंगाची तरवार नारायणरावांवर चालली. राघोबादादा नको, नको ह्मणत असतांही चालली. पण एकदां ती चालल्यानंतर माघारी येत नाहीं. व्हावयाचें कृत्य घडून गेलें. आतां मात्र सुमेरसिंगावर व त्याच्या अनुयायांवर स्वतःच्या रक्षणाची जबाबदारी आली. प्रसंगीं सुमेरसिंगाला भर देऊन धरण्याच्या कामाला ज्यांनीं त्याला उद्युक्त केलें ते स्वतः त्याच्यावरील या प्रसंगाच्या वेळीं कानावर हात ठेवून बाजूला राहणार हें सुमेरसिंगाला कळून चुकलें. ज्यांच्या आधिपत्यानें ही कामगिरी त्यानें स्वीकारली, ते हरिपंत फडके कानांवर हात ठेऊन परागंदा झाले. बाकीच्या लोकाची मदत, अर्थात् या वेळी सुमेरसिंगाला मिळण्याची आशा नव्हती. ‘ घी देखा लेकिन बडगा नहीं देखा ’ या ह्मणीप्रमाणें सुमेरसिंगाच्या डोळ्याला इनाम दिसलें, पण पुढील भयंकर दिव्य दिसलें नाहीं. आतां त्याला त्याच्या स्वतःच्या रक्षणाची काळजी वाटूं लागली. नारायणरावांना दादासाहे-बांच्या मताविरुद्ध मारून आपण गुन्हेगार झालों असें त्याला वाटूं लागलें. तुळ्या पवाराच्या ईर्षेला आपण बळी पडून चूक केली असें त्याला वाटलें. तेव्हां आपल्यासह आपल्या लोकांचा बचाव कसा होईल या दिशेनें त्याचे विचार चालू झाले. पुणें शहरासभोंवार मराठा पलटणींच्या चौक्या बसून बंदोबस्त झाला होता. तेव्हां त्या फोडून शीरसलामत जाणें सुमेरसिंगाला शक्य नव्हतें. शिवाय गुन्हेगारीचा शिक्का डोक्यावर लावून त्याला हिंदुस्थानांत लपण्यास मार्ग नव्हता. ह्मणून पहिल्यानें त्याला आपला बंदोबस्त करून घेणें भाग होतें. या दृष्टीनें त्यानें शनिवारवाड्यांत कडक बंदोबस्त ठेऊन आपल्या संरक्षणाची

धडपड चालविली होती. त्यानें मुत्सद्यांस घातलेल्या अटींतील मुख्यार्थ त्याच्या संरक्षणाचाच होता. सुमेरसिंगानें स्वतःच्या बचावाकरतां ज्या ज्या गोष्टी केल्या त्यावरून त्याला आपल्या संरक्षणाची हमी पाहिजे होती व त्याकरतांच तो इनामापेक्षां जास्त धडपडत होता हें दिसून येईल. त्यानें याच धोरणानें पुढील गोष्टी केल्या होत्या.

१. मुत्सद्यांनीं आपल्या फौजेचे जथ पाडून शहरांत चौक्या बसविल्या व शहराचा बंदोबस्त केला, त्यामुळें सुमेरसिंगाला स्वतःच्या बचावाकरतां शनिवारवाड्याचा आसरा घेऊन त्याचा कडेकोट बंदोबस्त करावा लागला. राघोबादादा जोंपर्यंत शनिवारवाड्यात आहेत, तोंपर्यंत बाहेरून मराठी सैन्याचा हल्ला होणार नाहीं व शनिवारवाड्यावर तोफाही चालणार नाहींत हें सुमेरसिंगाला कळत होतें. याकरतां सुमेरसिंगानें दादासाहेबांना आपल्या कैदेंत ठेविलें होतें. त्याचप्रमाणें पेशव्यांच्या कुटुंबांतील बायकामाणसें सुद्धां सुमेरसिंगाच्या कैदेंतच होतीं. सुमेरसिंग आपल्या संरक्षणाची हमी घेतल्याशिवाय शनिवारवाडा सोडणार नव्हता. व त्यानें शनिवारवाडा सोडल्याशिवाय कोणालाही सुमेरसिंगाचें पारिपत्य करतां येण्यासारखें नव्हतें. अशा प्रकारच्या कैचींत सुमेरसिंग व मुत्सद्दी सांपडले होते.

२. सुमेरसिंगाला स्वतःच्या रक्षणाकरता दोन गोष्टींपैकीं एक गोष्ट साध्य व्हावयाला पाहिजे होती. पहिली गोष्ट ह्मणजे स्वतःचें रक्षण करून घेण्याचें सामर्थ्य त्याला यावयाला पाहिजे होतें. ती न साधल्यास दुसरी गोष्ट ह्मणजे एका प्रामाणिक जबरदस्त शक्तीनें त्याला अभय देऊन आपल्या पाठीशीं घातलें पाहिजे होतें. या दोन गोष्टींपैकीं कोणत्याही एका गोष्टीनें त्याचें संरक्षण होणार होतें. इनामाचा प्रश्न दुय्यम प्रतीचा होता. त्याप्रमाणें सुमेरसिंगाच्या अंगीं स्वतःचें संरक्षण करण्याची पात्रता यावयाला व पेशवाईंतील त्रस्त समंधाप्रमाणें मुत्सद्यांपासून स्वतःचें रक्षण करावयाला पेशव्यांचें निम्में राज्य हस्तगत होणें जरूर होतें. तरच त्याला स्वतःचा बचाव करतां आला असता किंवा राघोबादादांना ठार करून अलीबहादराला गादीवर बसविण्याचा जरी त्याचा

विचार पार पडला असतां, तरी सुद्धां त्याचें संरक्षण झालें असतें. या बाबतींत पुण्याच्या सर्व मुसलमानांचें त्याला पाठबळ मिळणार होतें. पुण्याच्या सर्व मुसलमान लोकांचे जथ पाडून त्याने शनिवारवाड्यांत आणले याचें कारण त्याला स्वतःचें रक्षण करणें हेंच होतें. परंतु अर्धें राज्य देण्याचें मुत्सद्यांनीं नाकारलें, तेव्हां आपसांतील तंटा मिटण्याचा फक्त एकच मार्ग त्याला मोकळा राहिला होता.

३. तो मार्ग म्हणजे एका जबरदस्त शक्तीने सुमेरसिंगाला अभय देऊन त्याला पाठीशीं घालणें हें होय. भवानराव प्रतिनिधि यांच्या मध्यस्तीनें पेशवाईचे धनी राघोबादादा यानीं सुमेरसिंग गारदी, महंमद इसफ, खरकसिंग, तुळाजी पवार यांना अभय देऊन त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी स्वतःची जामीनकी देऊन आपल्या शिरावर घेतली. त्यामुळें गारद्यांचा तंटा आठ लक्ष रुपये देऊन तुटला. यावरून इनामापेक्षा त्यांना त्यांच्या संरक्षणाचा प्रश्न प्रामुख्याने सोडवून घ्यावयाचा होता हे दिसून येईल.

४. वरील गोष्टीवरून गारद्यानी दादासाहेबांना व मुत्सद्यांना कसें कैचींत पकडले होतें, व त्यानी शनिवारवाडा लुटला व दादासाहेबांच्या मर्जीविरुद्ध नारायणरावाना मारले वगैरे जे अक्षम्य अपराध केले होते, ते त्याना क्षमा करून त्याना आपल्या पाठीशीं का घालावें लागलें, हें दिसून येईल. अशा प्रकारें गारद्याचा तंटा निकालांत आला व ते आपली फौज घेऊन दादासाहेबांच्या निर्भयतेच्या छत्राखालीं पूर्ववत् आपल्या जागीं जाऊन बसले. अशा प्रकारें शनिवारवाड्यांतून गारदी बाहेर पडले. त्यामुळें दादासाहेबांची गारद्याच्या कैदेतून मुक्तता झाली व नतर मराठा पलटणींचा शनिवारवाड्यावर पहारा बसला.

५. राघोबादादा गारद्यांच्या कैदेंतून मुक्त झाल्यानंतर त्यांच्यापुढें पेशवाईच्या कारभारातील मंडळींचा प्रश्न उत्पन्न झाला. या वेळीं उत्तर हिंदुस्थान खवळलें होतें. मोंगलांची गडबड सुरू होती. नागपूरकर भोंसल्यांमध्यें रण-

संग्राम चालू होता. परभू लोक तापून गेलेले होते. हैदराची चळवळ सुरू होती. अशा परिस्थितींत पेशव्याचें राज्य कायम ठेऊन व त्याची इभ्रत सांभाळून दादासाहेबांना आपल्या कारभाराची स्थिरस्थावरता करावयाची होती. नाना फडनविस यांनीं माधवरावांच्या वेळेपासून आपल्या पक्षांतील लोकांचें उत्तम प्रकारें संघटण केले होतें. नानांच्या पक्षांतील लोकांचा राघोबादादांना नेस्तनाबूत करणें हा एकच हेतु होता. कारण त्यांच्या पक्षांतील बहुतेक लोक दादासाहेबांचा द्वेष करणारे व अन्यायानें नानांनीं मोठा दर्जा प्राप्त करून दिलेले असे होते. त्यामुळे मुत्सद्यांत किंवा सरदारांत बरोबरीं एकएक प्रतिस्पर्धी होता. राघोबादादांच्या पक्षाचा जो सरदार किंवा मुत्सद्दी असेल, त्याच्याच बरांत, त्याला प्रतिस्पर्धी असलेला नानांच्या पक्षाचा सरदार किंवा मुत्सद्दी होता. या वेळीं नानांच्या पक्षाचेच लोक अधिकारारूढ होते. दादासाहेब कैदेंत पडल्यावर त्यांची जी स्थिति झाली, तीच त्यांच्या पक्षांतील लोकांची जवळ जवळ झाली होती. त्यामुळें दादासाहेबांच्या उत्कर्षाची ते वाट पहात होते. शिंदे होळकर हे निव्वळ नानांच्या पक्षाचेच होते. दादासाहेब राज्याचे धनी झाले, असे पाहताच नाना फडनविस यांच्या कारवाईनें ज्यांना ज्याना अन्यायानें सरदाऱ्या मिळाल्या होत्या, त्या त्या हुद्याचे न्याय्य हक्कदार पुढे येऊ लागले. फत्तेसिंग गायकवाडाची सरदारी गोविंदराव गायकवाड मागूं लागला. नागपूरच्या साबाजी भोंसल्यांस मिळालेलीं सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें मुधोजी मागूं लागला. भगवंतराव प्रतिनिधीचें पद भवानराव मागूं लागला. हैदरालाही आतां आपला स्वार्थ साधेल असे वाटूं लागलें. त्याचप्रमाणें चिंतो विठ्ठल, सखाराम हरि, बाजीराव बर्वे, विठ्ठल विश्राम, गंगोबा तात्या, मानाजी फांकडे वगैरे जी जी मंडळी दादासाहेबांच्या पक्षाची होती व ज्यांना नाना फडनविस यांनीं निर्माल्यवत् करून सोडलें होतें, ती ती मंडळी आपापलें पूर्व स्थान मागूं लागली. त्याचें तें मागणें जसें न्यायाचें होतें, तसें तें त्यांना देणें दादासाहेबांचें कर्तव्य होतें. इतकें सारें करून नाना फडन-

विस, मोरोबादादा, सखारामबापू यांना दादासाहेबांच्या मनांतून दुखवावयाचें नव्हतें. दादासाहेबांना पेशव्यांच्या राज्याबाहेरील शत्रूंना ताबडतोब तोंड द्यावयाचे होतें. ह्मणून त्या प्रसंगाला अंतःकरणपूर्वक मदत करणारे त्यांच्या विश्वासाचेच सरदार त्यांना पुढें आणणें प्राप्त होतें. परंतु हें सारें नानांच्या पक्षाला न दुखवितां त्याना करावें लागणार होतें. त्याप्रमाणें दादासाहेबांनीं चिंतो विठ्ठल रायरीकर यांना दिवाणगिरी दिली. पण जमाबंदीचा कारभार त्यानीं नाना फडनविस यांच्या मतानें करावा, व इतर सर्व कारभार त्यांनीं सखारामबापूंच्या सल्ल्यानें करावा, असा त्यांना निर्बंध घालून दिला या योजनेने चिंतो विठ्ठल, नाना फडनविस व सखारामबापू हे तिघेही प्रसन्न राहतील असें दादासाहेबाना वाटले.

६. सर्व पक्षातील लोकाना कारभारांत समाविष्ट करून घेण्याच्या दृष्टीनें दादासाहेबांनीं केलेली योजना नाना फडनविस यांच्यासारख्या महत्वाकांक्षी पुरुषाला अर्थात् पसंत पडणारी नव्हती. नानांची इच्छा आपण स्वतः पेशवाईचा कारभार कुलअख्त्यारीनें करावा अशी होती. ह्मणून त्यांनीं आपल्या पक्षांतील लोकांना पत्रें पाठवून त्यांना सज्ज राहण्यास सुचविलें. पटवर्धन सरदारांना लष्करभरती करण्याबद्दल व फौजेचे जथ पाडण्याबद्दल ज्या निकडीच्या सूचना त्यांनीं दिल्या, त्या त्यांच्या पुढील कारस्थानाला पोषक अशा होत्या. नाना फडनविस यांच्या मनांत दादासाहेबांनीं पेशव्यांच्या गादीवर यावयास नको होतें. नारायणराव मेले पाहिजेत याकरतां त्यांनीं जसा तुळाजी पवाराला पुढाकार देऊन, मारण्याचा कट गुप्त रीतीनें निर्माण केला, तसाच राघोबादादांना मारण्याचा एक डाव आयत्या वेळीं त्यांनीं टाकला होता. मागील प्रकरणांतील नंबर तीनच्या पत्रांतील मजकूर वाचून या डावाची थोडी कल्पना येण्यासारखी आहे त्यांत असें ह्मटलें आहे कीं, नारायणराव पेशव्यांचे चार पांच शागीर्द त्यांच्याजवळ होते. त्यांनीं " दादासाहेबांचे गाडदी वाड्यांत शिरले. दंगा झाला " असें सांगितलें. त्याबरोबर नारायणराव हातचा निमचा

घेऊन राघोबादादांचा खून करण्याकरतां निघाले. यावेळीं नानांच्या पक्षांतील हरिपंत फडके, बाळाजीपंत दामले किंवा बाळाजीपंत ठोसर या त्रिवर्गांपैकीं कोणीही वाड्यांत नारायणरावांच्या जरळ नसणें व शागीर्दांच्या सांगण्यावरून नारायणरावांना राघोबादादांच्या खुनाची कल्पना सुचणें यांतच कटांतील कटाची उत्पत्ति आहे. नारायणरावांचे सर्व शागीर्द नानांच्या विचाराप्रमाणेंच चालणारे होते, नाना हेच नारायणरावाचे हितकर्ते हें त्यांना कळून चुकलें होते. राघोबादादा हे नारायणरावांचे शत्रू अशी त्यांची समजूत झाली होती. तेव्हा या शागीर्दांना नानांची अशी आंतून सूचना असली पाहिजे कीं, ' नारायणरावांच्या जिवावर जर प्रसंग ओढवेल तर तो केवळ राघोबादादांच्या कृतीमुळेच ओढवेल. राघोबादादांची सर्व खटपट पेशव्याच्या गादीकरतां आहे. तेव्हा तशी कांहीं गडबड दिसली तर बेलाशक त्यांचा वध करावा. ते मेल्यानतर एकतंत्री राज्य होईल व नारायणरावांना कोणी प्रतिस्पर्धी राहणार नाहीं.' असा गुरुमंत्र नारायणरावांच्या कानांवर पडल्याशिवाय ते एकदम दादासाहेबांच्या वधाला उद्युक्त झाले नसावेत. नारायणरावानीं राघोबादादांचा वध करावा व तुळ्या पवारानें नारायणरावाचा वध करावा अशी जोडगोळी नानांच्या कारस्थानाची असावी असें घडलेल्या गोष्टीवरून अनुमान निघते. नारायणरावाचा वध होऊन राघोबादादा जिवंत राहिले. आपला डाव फसला हे वर्तमान नानांना समजल्यानंतर त्याची भीतीनें जी तारंबळ उडाली व पटवर्धनांकडे त्यांचा जो तांतडीचा पत्रव्यवहार होऊं लागला, त्याचे कारण हेंच असावें असें वाटतें.

७. नारायणरावांना धरण्याच्या कटांत जे मुत्सद्दी व सरदार होते त्यांच्यावर आतां नारायणरावांच्या वधाची जबाबदारी येऊन पडली. ह्मणून जो तो त्या जबाबदारींतून युक्तीनें कसें निसटून जातां येईल, याच्या प्रयत्नाला लागला. नाना फडनविसांनीं धरण्याच्या कटांतून मारण्याचा कट सहज लीलेनें उत्पन्न केला. पण त्याचा गळफांस धरण्याच्या कटाचे पुढारी सखा-

रामबापू यांच्या गळ्याला लागला. इतके दिवस सखारामबापूसारखा धूर्त व शहाणा मुत्सद्दी कोणत्याही राजकारणांत नानांच्या बुद्धिसामर्थ्याला हार गेला नाहीं व त्यांना शरण आला नाहीं. आपलाच वरचष्मा असल्याचें ते प्रत्येक गोष्टींत दाखवीत आले. परतु नारायणरावांच्या वधाच्या बाबतीत सर्व जबाबदारी व झाल्या गोष्टीची गुन्हेगारी नानांनीं सखारामबापूंवर लादली. माधवराव पेशव्यांच्या मृत्यूसमयीं नारायणरावांच्या संरक्षणाची शपथ त्यांनीं दिली, व त्यांना मारण्याचा कटही त्यांनींच केला, अशी नैतिक व राजकीय गुन्हेगारी नानांनी सखारामबापूंवर लादली. त्याप्रमाणें त्यांनीं लोकांत त्याचा बभ्राही केला. सखारामबापू " कारभारी[1] यांनी (कारभाराचें काम) अंगानिराळें टाकलें यांत अर्थ बहुत आहेत. आजच काम करूं लागल्यास लौकिकांत होईल कीं, ' मारावयाच्या मंत्रांत होते. आतां कारभार करूं लागले. ' यास्तव तूर्त[2] अंगानिराळें टाकलें ! " असें पुण्याहून शिवाजीपंतानें मोरोपंत आबांस तारीख ६ सप्टेंबर सन १७७३ रोजीं पत्रद्वारें कळविलें आहे. अर्थात् नारायणरावांचा वध झाल्याच्या आठव्या दिवशीं हें पत्र लिहिलें आहे. तेव्हां यापूर्वीं कांहीं दिवस सखारामबापूंवर नानांनीं मारण्याच्या कटांत सामील असल्याचा गुन्हा लादला होता, हें सिद्ध होतें. नारायणरावांचा वध झाला त्याच्या तिसऱ्या दिवशीं ह्मणजे बुधवारी दोन प्रहरीं सखारामबापू पुण्यांतील आपल्या वाड्यांत बायकामुलें ठेवून पळून गेले. पर्वतीजवळ माणसांस आढळले. चार कोस गेल्यानंतर मागाहून काय विचार त्यांच्या डोक्यांत आला कोण जाणे, फिरून रात्रौ ते घरीं परत आले. अशी सखारामबापूंच्या मनाची अस्थिर वृत्ति व्हावयाला अर्थात् त्यांच्यावर नानांनीं त्या दिवशीं उघड खुनाची गुन्हेगारी लादली असेंच ठरतें. ही गुन्हेगारी अंगलट येते असें वाटून त्याचें डोकें तापलें, त्यांना स्वतःच्या जीविताची भीति वाटूं लागली, स्वतःच्या कीर्तीला राजहत्येचा डाग लागतो,

---

१. ऐ. ले. सं पान २०५०   २. ऐ. ले. सं. पान १९९१

म्हणून धास्ती वाटून त्यांची मनःस्थिति बिघडली, व त्या स्थितीत ते विचार-निमग्न होऊन घराबाहेर पडले. त्यांनी आपल्यावरील जबाबदारीचा शांतपणानें विचार केला व आपण या प्रसंगांतून शीरसलामत कसे बाहेर पडूं याचा ठाम विचार झाल्यानंतर ते घरीं परत आले.

८. या वेळीं नाना फडनविस यांनीं सखारामबापूवर असा बिनतोड डाव केला कीं त्यांत ते चारी मुंडे चित झाले. नारायणराव यांचे दहा दिवस उत्तर-कार्य झालें. ‘ दहावें दिवशीं झाडून मंडळी कारकून व मुत्सद्दी तमाम नदीवर तिळांजुळीस आले. त्या समयीं त्र्यंबकरावमामा पेठे, नाना फडनविस, सखारामबापू, हरिपंत फडके असे चौघे एकीकडे बसून वाळवेचीं लिंगें करून, परस्परें चौघांच्या आणक्रिया लिंगावर हात ठेऊन झाल्या की, “ नानासाहेब यांचा वंश चालवावयाचा. त्या वंशाशिवाय कारभार चालवावयाचा नाहीं. या वंशास ( राघोबादादांच्या ) नमस्कार करावयाचा नाही. ” असें चौघांचें बोलणें होऊन, तिळांजुळी देऊन, आपापले घरोघर गेले. ” या प्रमाणें नानांनीं सखारामबापूंचीं बोटें त्यांच्याच डोळ्यांत घालून त्यांना आपल्या पक्षांत त्यांची आणक्रिया घेऊन जखडून टाकलें. नानांनी आपल्या पुढील कारस्थानाची मुहूर्तमेढ नारायणरावांच्या तिळांजुळीच्या वेळीं नदीवर रोवली व राघोबादादां-विरुद्ध बंडाची तयारी चालविली.

९. हरिपंत फडके यांना नानांनीं पळवून लाविलें होतें. त्यांना बारामतीस बाबूजी नाईक यांच्यामागें दडण्याकरतां पाठविलें होतें. नारायणरावांचा वध, राघोबादादांच्या खुनाचा प्रयत्न आणि शनिवारवाड्यांतील लूटमार ही कृत्यें घडावयाला हरिपंत फडके कारणीभूत आहेत असें दादासाहेबांनीं ठरविल्यामुळें त्यांचे डोकें उडवावयाची भाषा रागानें ते करीत होते. म्हणून हरिपंतांना नानांनी दादासाहेबांचे व्याही बाबूजी नाईक यांच्या आश्रयाला पाठविलें होतें. दुसऱ्या दिवशीं नाना दादासाहेबांना भेटून आल्यानंतर आपल्या कारस्थानाचा सुगावा दादासाहेबांना लागलेला नाहीं व ते आपल्यावर प्रसन्न आहेत असा विश्वास त्यांना आला. नानांनीं दादासाहेबांचा धनीपणा मान्य केला व ते पूर्ववत्

आपलें काम करीत आहेत असें दादासाहेबांना दिसून आलें. त्यामुळें त्यांच्या-बद्दल त्यांनाही विश्वास आला. विश्वासघातकी माणसाचा स्वभाव असाच असतो. आपल्याबद्दल दुसऱ्याचा पहिल्यानें पूर्ण विश्वास उत्पन्न करून घ्यावयाचा व एकदम त्याचा पूर्ण घात करावयाचा. नानांचा स्वभाव तोच होता. आपल्या-बद्दल त्यांनीं जसा विश्वास उत्पन्न करून घेतला तसाच त्यांनीं आपल्या पक्षांतील पटवर्धन वगैरे सरदारांचा करून घेतला. बारामतीकर बाबूजी नाईकांना तांतडीनें भेटीला येण्याबद्दल दादासाहेबांचीं पत्रावर पत्रें गेलीं. ते रविवार तारीख ५ सप्टेंबर रोजीं हरिपंत फडक्यांना घेऊन पुण्यास आले ते पहिल्यानें वानवडीस येऊन उतरले. त्यांनीं दादासाहेबांची भेट घेतली. त्यांचा पागेपुरता लाख रुपयांचा सरंजाम चालवावयाचा ठरलें. त्यांचें व दादासाहेबांचें मन साफ झाल्यानें त्यांनी हरिपंत फडक्यांस आणून दादासाहेबांस भेटविलें. अर्थात् बाबूराव नाईकांच्या मध्यस्तीनें दादासाहेबांनीं हरिपंत फडक्यांचे अपराध पोटांत घालून त्यांच्यावर दया केली. त्याचप्रमाणें त्यांचे दुय्यम मदतगार बाळाजीपंत ठोसर व बाळाजीपंत दामले यांच्या पायांतील बेडया तोडून त्यांच्याकडून जामीन घेऊन त्यांचीही मुक्तता केली. अशा प्रकारें नानांनीं आपल्यावर शेकलें जाणाऱ्या प्रकरणाची अशा युक्तीनें वासलात लावून घेतली. त्यामुळें नानांचा पक्ष शीरसलामत वांचला. पण तोच पुढें शिरजोर होऊन बसला.

१०. यावेळीं दादासाहेब घरगुती तंटे वगैरे जे असतील ते बाजूला ठेऊन अगर त्यांत सलोख्याचा मार्ग काढून व ते मिटते घेऊन वेळ निभावून नेत होते, आणि पेशवाईवर येऊं पहाणाऱ्या परचक्राला तोंड कसें देतां येईल, याची खटपट करीत होते. नानांचा पक्ष त्याच्याविरुद्ध खटपटींत होता. त्यांना पेशवाईवरील परचक्राची यावेळीं काळजी नव्हती. त्यांना पहिल्यानें राघोबादा-दांचा नाश करावयाचा होता. दादासाहेबांचा खून करण्याचा त्यांनीं जो डाव टाकला तो फसल्यामुळें दुसरा बिनतोड डाव त्यांना खेळावयाचा होता. ह्मणून परचक्राकडे लक्ष न देतां राघोबादादांना कसें चक्रांत आणतां येईल, याचा कारस्थानी चक्रव्यूह सर्व बुद्धिमत्ता खर्च करून ते प्रामुख्यानें रचूं लागले. हा

चक्रव्यूह उभारण्याच्या बाबतींत सखारामबापूसारखा निर्ढावलेला मुत्सद्दी नानांना मिळाल्यामुळें त्यांच्या डोक्यावरील भार बराच कमी झाला होता. परंतु कोणताही नवीन डाव नानांच्या पसंती नापसंतीवर असल्यामुळें चक्रव्यूहाची प्रत्यक्ष रचना त्यांच्याच नेतृत्वाखालीं सुरू होती. या वेळीं नानांनी बापूंना नारायणरावांच्या खुनाच्या गुन्ह्यांतून वांचविल्यामुळें त्यांना नानांपुढें दबूनच वागावें लागत होतें. नाना धोरणी असल्यामुळें सखारामबापूंना पुढाकार देऊन त्यांच्याकडून आपणाला जसें पाहिजे तसें ते काम करून घेत होते.

११. नागपूरकर भोंसलेद्वय साबाजी व मुधोजी यांच्यामध्यें जो रणसंग्राम चालला होता, त्यांत मुधोजीची सरशी होत आहे असें पाहून, साबाजीनें निजामाची मदत घेतली होती. साबाजीला नाना फडनविस यांच्या पक्षाची मदत होती. नारायणराव पेशवे त्याचमुळें साबाजीकरतां ईर्षेला पडले होते. मुधोजी हा दादासाहेबांच्या पक्षाचा होता. साबाजीचा मोड होत चालला आहे व मुधोजीला यश मिळत आहे, ही बातमी ऐकून 'मनसबा[1] तोंडघशीं पडला. नारायणराव खट्टे आहेत' अशी नारायणरावांची स्थिति झाली होती. नारायणराव मेल्यानंतर मुधोजीला जोर आला. तेव्हां साबाजीनें निजामाची मदत घेतली. या कामीं राघोबादादांना मुधोजीला मदत करणें प्राप्त होतें. परंतु साबाजी निजामाच्या आड दडल्यामुळें या वेळीं निजामासह साबाजीचें पारिपत्य करण्याचा प्रसंग दादासाहेबांवर आला. त्या दृष्टीनें दादासाहेबांची मोहिमेची तयारी सुरू झाली. दादासाहेबांनी शक्य तेवढ्या लवकर पुणें सोडून मोहिमेवर जावें असा प्रयत्न नानांच्या पक्षाचा होता. कारण जास्त दिवस ते पुण्याला राहिल्यास, आपली कारस्थानें त्यांच्या कानांवर जातील ही भीति त्यांना होती. शिवाय या पक्षाच्या कारस्थानाला दादासाहेब मोहिमेला गेल्याशिवाय प्रत्यक्ष स्वरूप येणारें नव्हतें. शिवाय नारायणरावांच्या मृत्यूच्या प्रकरणाला जें ताबडतोब विकृत स्वरूप देतां येईल, त्याला दिवसगत लागल्यास, तेवढें महत्व राहणार नाहीं. म्हणून तांतडीनें दादासाहेबांनीं मोहिमेवर निघावें हा पहिला डाव नानांनीं टाकण्याला सुरवात केली.

---

१. ऐ. के. सं. पान १९८८

१२. साबाजीनें निजामाची मदत घेतली व त्याला नाना फडनविस यांच्या पक्षाचें पाठबळ होतें, म्हणून यावेळी निजाम व नानांचा पक्ष हे एक झाले. दादासाहेब निजामावर चाल करून जाणार, असें ठरल्यानंतर निजामाचा व दादासाहेबांचा विरोध आला. याचा फायदा घेऊन नाना फडनविस यांनीं सखारामबापूंच्या सहाय्यानें फितूर मांडला. निजामाच्या राज्यांत पेशव्यांचा अंमल असलेलीं बरीच ठाणीं होतीं. ती ठाणीं ताबडतोब उठवून लावण्याकरतां हैदरअल्लीला नानांच्या पक्षाची फूस मिळाली. त्याप्रमाणें त्यानें पेशव्यांचीं सर्व ठाणीं ताबडतोब उठवून[1] लाविलीं. ही बातमी दादासाहेबांना समजतांच ते मोहिमेवर जाण्याच्या तयारीला जलदीनें लागले. याप्रमाणें नानांचा पहिला डाव यशस्वी झाला.

१३. निजामअल्लीच्या या गडबडीमुळें तारीख २५ सप्टेंबर सन १७७३ रोज शनिवारीं दसऱ्याचे दिवशी रात्रौ वीस घटिकांनीं दादासाहेब संगमावर डेऱ्याला येऊन दाखल झाले. म्हणजे नारायणरावांचा मृत्यू झाल्यानंतर अवघ्या सव्वीस दिवसांनीं दादासाहेब मोहिमेकरतां पुणें सोडून बाहेर पडले. त्यांनीं पुणें सोडतेवेळी पुणें शहराचा व शनिवारवाड्याचा बंदोबस्त नारो आपाजी तुळशीबागवाले यांजकडे सोपविला होता. बाकी खासगीवाले, वांकनीस वगैरे जुने मंडळ त्यांनीं कायम ठेवलें होतें. त्याचप्रमाणें दादासाहेबांनीं आपल्या तर्फेचे आणखी कारभारी ठेविले होते. वाड्यांत सौ० पार्वतीबाई, गंगाबाई, सौ० दुर्गाबाई ( दादासाहेबांची मुलगी ) अशा होत्या. सौ० आनंदीबाईंना दादासाहेब मोहिमेवर घेऊन गेले होते. अशा प्रकारें पुण्याची व्यवस्था करून ते नाना फडनविस, मोरोबादादा, सखारामबापू, हरिपंत फडके वगैरे मुत्सद्यांना बरोबर घेऊन दसऱ्याच्या मुहूर्तानें पुणें सोडून निघाले. मुत्सद्यांनीं मोहिमेवर निघण्याला दादासाहेबांना थोडी सुद्धां फुरसत घेऊं दिली नाहीं. साताऱ्याहून पेशवाईचीं वस्त्रें आणवून तीं पुण्यास घ्यावयालाही दादासाहेबांना अवधी मिळाला नाहीं. निजामअल्लीच्या मोहिमेवर निघाल्यानंतर मार्गांत त्यांनीं अमृतराव यांच्याबरोबर

---

१. पे. बखर पान ९१

बजाबा पुरंदरे यांस साताराच्या महाराजांकडे पाठवून त्यांच्याकडून पेशव्याचीं वस्त्रें आणविलीं व तीं त्यांनीं रविवार आश्विन व० १० रोजीं पेडगांव मुक्कामीं धारण केलीं. ( तारीख १० अक्टोबर सन १७७३ इ. )

१४. पटवर्धनांना मोहिमेवर जाण्याकरतां दादासाहेबांचें पत्र गेल्याप्रमाणें परशुरामभाऊ मिरजेहून पांचशें स्वारांनिशीं निघाले, ते पुण्यावरून जेजुरीला तारीख ९ रोजीं येऊन पोंचले. त्यांनीं नानांची भेट त्याच दिवशीं घेतली. समक्ष भेटीच्या वेळीं नानांनी पुण्याची सर्व कच्ची हकीकत त्यांच्या कानावर घातली. नंतर तारीख १० रोज रविवारी नानांनीं परशुरामभाऊंना बरोबर घेऊन दादासाहेबांची भेट करून दिली. उभयतांच्या खातर-जमेच्या गोष्टी होऊन परशुरामभाऊ निघाले. त्यांनीं नंतर सखाराम-बापूंची भेट घेतली. सखारामबापूंनीं परशुरामभाऊंना आजपर्यंतची सर्व हकीकत सांगितली. या दोघांकडून कच्ची हकीकत जी समजली ती ता. ११ आक्टोबर रोजीं परशुरामभाऊंनीं जेजुरीहून मिरजेस वामनराव यांना दोन पत्रें लिहून कळविलीं. त्यांत ते लिहितात— ' सकारनामक ( सखाराम-बापू ) यांनीं मनसबा केला एक आणि जाहला एक ! इतकें असून आपणावर ( राघोबादादांची ) भक्त नाहीं. आपल्या जिवाळ्याचा कारभार भगवंतराव प्रतिनिधि व फलटणकर यांची घालमेल झाली, अशा लहान मोठ्यांच्या मायेच्या कामकाजास हिसके बसूं लागले, येणें करून यागी ( वैतागलेले ) फारच आहेत याजकरितां राजकारणें करून त्यांस ( राघोबादादांस ) उलटी द्यावी आणि खूळ माजवावें असें मनसब्यांत चालणे आहेत असें बारकाईनें वर्तमान ऐकिलें आहे. याचा शोध पुरता मनास आणून लिहून पाठवितों[1] '

१५. नाना फडनविस यांनीं सखारामबापूंना तारीख ८ सप्टेंबर रोजीं, ह्मणजे नारायणरावांच्या तिळांजुळीच्या दिवशीं, आणक्रिया करवून घेऊन दादासाहेबांना पदच्युत करण्याकरतां आपल्या पक्षाला बांधून घेतलें.

---

1 ऐ. ले. सं. पान २०६७

त्या दिवसापासून दादासाहेबांना कोणत्या मुद्यावर राज्यकारभाराला नालायक ठरवून पदच्युत करावयाचें, याचा ते विचार करीत होते. ज्या मुद्यावर त्यांच्या या कृतीला जनतेची सहानुभूति मिळेल एवढा तो मुद्दा महत्वाचा असावा, याबद्दल त्यांचा शोध चालू होता, व त्याप्रमाणें ते प्रयत्न करीत होते. नानांचा मुद्दा एक व सखारामबापूंचा एक, असा आतां फरक होण्याचें कारण नव्हतें. कारण उभयतांचें उद्दिष्ट आतां एकच होतें. असें असतां वरील पत्रांतील मजकूर वाचल्यानंतर असें दिसून येतें कीं, नारायणरावांच्या मृत्यूनंतर एक महिन्याच्या अवधींत राज्यकारभारांत सखारामबापू किंवा नाना फडनविस याच्या मर्जीविरुद्ध राघोबादादा घाल-मेल करतात; भगवंतरावांच्या ऐवजीं भवानरावाला प्रतिनिधिपद देतात किंवा साबाजी भोंसल्यांच्या ऐवजीं मुधोजीला मदत करतात यापेक्षां दादा-साहेबांचें दुसरें व्यंग त्यांना दिसलें नाही. याच त्यांच्या कारभारांतील घालमेलीमुळे नाना व सखारामबापू हे त्यांना उलटी देऊन खूळ माजविणार होते व त्याप्रमाणें त्यांचा मनसबा चालला होता हें स्पष्ट आहे. या सूर्यप्रकाशाइतक्या वरील स्पष्ट गोष्टींतून दुसरी एक स्पष्ट गोष्ट सहज प्रकाशांत येते. या वेळेपर्यंत राघोबादादा व आनंदीबाई यांनीं नारायण-रावांचा खून केला किंवा आनंदीबाईनें 'ध' चा 'मा' करून पुतण्याचा वध करविला हा जो मुद्दा पुढें बाराभाईंनीं राघोबादादांना पदच्युत करण्याकरतां प्रामुख्यानें पुढें आणला, त्याचा गंधही वरील पत्रांत नाहीं. तारीख ११ आक्टोबर १७७३ पर्यंत राघोबादादांना पदच्युत करण्याचा मनसबा ठरला होता व त्याला कारण ह्मणजे ते राज्यकारभारांत नाना व सखारामबापू यांच्या मर्जीविरुद्ध घालमेल करतात एवढेंच होतें; ही गोष्ट लक्षांत ठेवण्या-सारखी आहे.

१६. या वेळीं दादासाहेबांना पदच्युत करण्याकरतां आणखी एक मह-त्वाची गोष्ट नानांच्या पक्षानें पुढें आणली. ती ह्मणजे 'श्रीमंत मातुश्री गंगा-बाईस गर्भ आहे यांत संशय नाहीं. त्यास सौभाग्यवती आनंदीबाई गर्भ-

पात व्हावयाचीं साधनें फारच करितात तीं पत्रीं लिहितां पुरवत नाहींत! गर्भपात न झाल्यास मारावी, ती गोष्ट न झाल्यास पुत्र कदाचित झाल्यास त्यास अपाय करावा या साधनांत आहेत. " हें पत्रही तारीख ११ आक्टोबरचें परशुरामभाऊ यांनीं मिरजेस वामनराव यांना लिहिलेलें आहे. हीं दोन पत्रें एकाच दिवशीं निरनिराळ्या वेळीं लिहिलेलीं आहेत. त्याचें कारण असें कीं, परशुरामभाऊंनीं पहिल्यानें नानांची भेट घेतली व त्यांच्या मुलाखतींत त्यांना जी गोष्ट समजली ती पत्रद्वारें लिहिल्यानंतर मग त्यांनीं सखारामबापूंची भेट घेतली; आणि त्यांच्या मुलाखतींत जी माहिती समजली ती लगेंच दुसरें पत्र लिहून त्यांनीं मिरजेस कळविली. दुसरें पत्र नानांच्या मुलाखतीप्रमाणें पहिल्यानें लिहिलें आहे व सखारामबापूंच्या भेटींतील हकीकत पहिल्या पत्राप्रमाणें नंतर लिहिलेली आहे. यावरून दादासाहेब कारभारांत घाल्मेल करतात ह्मणून त्यांना पदच्युत करण्याची कल्पना सखारामबापूंची आहे, व गंगाबाईंचा गर्भपात करण्याच्या मागें आनंदीबाई आहे ह्मणून राघोबादादांना पदच्युत करण्याची कल्पना नानांची आहे हें उघड ठरतें.

१७. दादासाहेबांना पदच्युत करण्याबद्दलच्या दोन शहाण्या मुत्सद्यांच्या वरील नवीन दोन कल्पना ह्मणजे मुंबईच्या शेअर बाजारांतील तेर्जामंदीचा भाव निघण्याच्या वेळेची निव्वळ हुल्लड आहे असें ह्मणावें लागतें. नारायणरावांचा वध झाला त्यावेळीं शनिवारवाड्यांत पहिल्यानें राघोबादादांनीं सखारामबापूंना बोलाविलें. त्यांना कारभार करण्याबद्दल दादासाहेबांनीं पहिल्यानें सांगितलें. पण आपण आतां वृद्ध झालों, तेव्हां कारभाराचा भार आपणाला सोसत नाही असें त्यांना बापूंनीं सांगितलें. आमची जी जहागीर आहे ती चालवावी व ज्यावेळीं सल्लामसलतीची जरूरी लागेल त्यावेळीं बोलवावें असें त्यांनींच दादासाहेबांना सांगितलें. त्याप्रमाणें चिंतो विठ्ठला कारभारी नेमलें. सखारामबापूंचा सल्ला विचारून ते कारभार करीत होते. असें सर्व

---

१ ऐ. ले. सं. पान २०६६

चालू असतां नारायणरावांच्या तिळांजुळीच्या वेळीं दादासाहेबांना पदच्युत करण्यापुरत्याच नव्हेत तर त्यांच्या वंशालाही नमस्कार न करण्याच्या शपथा नाना, सखारामबापू वगैरे बारभाईंतील मंडळी घेतात व नारायणरावांचाच वंश चालविण्याची प्रतिज्ञा करतात. अर्थात् दादासाहेबांना पदच्युत करण्यापुरतेंच त्यांचें राजकारण नसून एक नामधारी बाहुलें गादीवर बसविल्याप्रमाणें करून पेशवाई आपण गिळंकृत करावी असा त्यांचा स्पष्ट हेतु होता हें 'नारायणरावाचा वंश चालवावयाचा' यांतील रहस्य होतें. तिळांजुळीच्या दिवसानंतर या उभय मुत्सद्यांनी निजामाच्या राज्यातील मराठ्यांचीं ठाणीं हैदराकडून उठवून लावण्याला व दादासाहेबांविरुद्ध फितूर करून पहिल्यानें खूळ माजविण्याला सुरवात केली. असें असतां सखारामबापू परशुरामभाऊंना भगवंतराव प्रतिनिधींचें किंवा फलटणकरांचें कारण पुढें करून दादासाहेबांना पदच्युत करण्याचा आपला मनसबा सांगतात, ही निव्वळ शेअर बाजारांतील हुल्लड नव्हे असें कोण ह्मणेल? मुत्सद्यांना दोन प्रकारचे दांत असतात. एक दाखवावयाचे व एक प्रत्यक्ष खाण्याचे. त्यांना दोन प्रकारचीं काळजें असतात. एक दुसऱ्याकरतां व एक स्वतः करतां! आपलें स्वतःचें उद्दिष्ट साधण्यकरतां लोकांना वाटेल त्या थापा देऊन आपल्या विचाराप्रमाणें त्यांना कार्यक्षम करणें हाच त्यांचा अंतिम उद्देश असतो. ह्मणून अशा मुत्सद्यांना दुरूनच पहिला नमस्कार करण्याची सज्जन लोकांत प्रथा पडली आहे.

१८. आनंदीबाई गंगाबाईवर विषप्रयोग करणार आहे, तिचा गर्भपात करणार आहे, वगैरे उठविलेली दुसरी शेअरबाजारी हुल्लड दुसरे शहाणे मुत्सद्दी नाना फडनविस यांची आहे. अशा हुल्लडी विवेकी लोकांना पटण्यासारख्या नसतात परंतु समाजांत तसे विवेकी फार कमी असतात. शेअर बाजारांत ज्याप्रमाणें अमेरिकेची तार आली, विलायतीची तार आली, कलकत्त्याची तार आली, वगैरे सांगून सट्टेवाल्यांचा बुद्धिभ्रंश होईल असा ज्याप्रमाणें शेअर ब्रोकर प्रयत्न करतात व ते सट्टेवाले एकदां

तेजीमंदीच्या ईर्षेला चढले म्हणजे जसा आपला स्वार्थ साधून घेतात, त्याचप्रमाणें पटवर्धनांनीं ईर्षेला पडावें व आपला कार्यभाग साधावा या हेतूनेंच नानांनीं परशुरामभाऊंना गंगाबाईबद्दल हकीकत सांगितली. परशुरामभाऊ हे जसे पराक्रमी, तसेच ते अंतःकरणाचे शुद्ध होते. त्यांच्या जवळ डावपेच नव्हते. एकाची इमाने इतबारें नोकरी करणें हा त्यांचा लष्करी धोपट मार्ग होता. मुत्सद्यांचें कुटिल अंतःकरण त्यांना नव्हतें. म्हणून ते गंगाबाईसंबंधीच्या हकीकतीने क्रोधवश होऊन विवेकाला पारखे झाले. त्यांना नानाकडून एकदेशीयच माहिती मिळाली व त्यावरच त्यांनीं आपल्या कर्तव्याची रूपरेखा आंखली.

१९. गंगाबाईला दिवस गेले आहेत ही माहिती पहिल्याने आनंदीबाईनीं दिली. गंगाबाई सती जाण्याकरतां आतुर होती. तिनें त्याकरतां आपलें मस्तकही फोडून घेतले होते. दादासाहेब, सखारामबापू वगैरे मोठमोठ्या लोकांनीं व पार्वतीबाई वगैरे स्त्रियांनीं तिला सती न जाण्याबद्दल उपदेश केला असतानासुद्धां तिनें आपला निश्चय कायम ठेवला. अशा वेळीं आनंदीबाईने तिला दिवस गेल्याचें सांगून व तिच्या मनाविरुद्ध तिला धरून खोलींत घालून, सती जाण्यापासून तिला परावृत्त केलें. या एकाच ठळक गोष्टीवरून आनंदीबाई गंगाबाईला विषप्रयोग करील किंवा नाहीं, अथवा तिचा गर्भपात करावयाला उद्युक्त होईल किंवा नाहीं, याचा निवाडा होतो. आनंदीबाई जर इतक्या पापी हृदयाची स्त्री असती, व तिला जर आपला स्वार्थ साधावयाचा असता तर सती जाणे हे हिंदुधर्म शास्त्रपद्धतीनें पुण्याचें कृत्य आहे असाच उठाव देऊन गंगाबाईला तिनें सती घालविलें असतें. हा सरळ व सोपा आणि उघड दिसून येणारा स्त्रियांच्या पुण्य कर्तव्याचा राजमार्ग सोडून पुढें एक महिन्याच्याच आंत ती गंगाबाईच्या गर्भपतनाचा निंद्य मार्ग स्वीकारील एवढें तिचें नैतिक अधःपतन होणें खात्रीनें शक्य नव्हतें. आनंदीबाई ही तेजस्वी, करारी व पवित्र स्त्री होती. म्हणूनच सती रमाबाई, पवित्र पार्वतीबाई, सगुणाबाई,

व गंगाबाई त्यांच्यावर प्रेम करीत होत्या. तथापि असे असतां गंगाबाईवर भलतेच प्रयोग करावयाला त्या तयार होतील कीं नाहीं याची खरी हकीकत परशुरामभाऊंना न समजल्यामुळे व नानाच्या बातमीवर त्यांचा विश्वास असल्यामुळें त्यांना विवेक राहिला नाहीं.

२०. ज्या नाना फडनविसाना गंगाबाई सोंवळी झाली की नाहीं हें आठान् आठ दिवस समजले नाही, उलट ती सोंवळी झाली असेच ज्यांना समजतें, त्या नानांना नारायणराव मेल्यानतर केवळ सव्वीस दिवसांच्या अवधींत ( नारायणराव मेल्यानंतर आनंदीबाई फक्त पुण्यास सव्वीस दिवसच होती. ती दादासाहेबाबरोबर नतर मोहिमेवर गेली. ) गंगाबाईचा गर्भपात करण्याच्या खटपटींत आनंदीबाई आहे, गर्भपात न झाल्यास तिला या विषप्रयोग करणार आहेत, आणि ते न साधल्यास व मुलगा झाल्यास, त्याचा वध करणार आहेत या आनंदीबाईच्या डोक्यांतील कल्पना कशा समजल्या असतील ? नानांना कर्णपिशाच साध्य आहे कीं नानाच स्वतः कर्णपिशाच्च आहेत या विचारांनासुद्धां पक्षांधत्वामुळें परशुरामभाऊ यांनीं स्वतःच्या बुद्धीला ताण दिला नाहीं. ह्मणून गंगाबाईच्या शोचनीय स्थितीबद्दल परशुरामभाऊंच्या मनांत विपरीत कल्पनाचें वादळ उत्पन्न होऊं लागलें आणि त्याचें प्रतिबिंब त्यांनीं लिहिलेल्या वामनरावांच्या पत्रांत प्रत्यक्ष उमटलें आहे. पराक्रमी असे लष्करी बाण्याचे वीर पुरुष सामान्यतः भावनाप्रधान असतात. परशुरामभाऊ हे त्याला अपवाद नव्हते. गंगाबाईची ही शोचनीय स्थिति ऐकून त्यांच्या भावनांना धक्का बसला व त्या झटक्यांत त्यांना एकदम परमेश्वर आठवला. ते त्याच पत्रांत वामनरावांना लिहितात: ‘ गर्भाचे संरक्षणार्थ कांहीं पांच सात ब्राह्मण जरूर ( अनुष्ठानास ) घालवावे श्री कृपा करील. ’ यावरून परशुरामभाऊसारखा वीर योद्धा नाना फडनविसांनीं सांगितलेल्या माहितीनें किती भेदरून गेला होता हें लक्षांत येईल.

२१. नाना फडनविस, सखारामबापू, हरिपंत फडके व त्रिंबकरावमामा पेठे या चौकडीच्या कारस्थानाची दिवसेंदिवस जसजशी वाढ होऊं लागली

तसतसा गर्भपाताच्या प्रश्नाला रंग चढूं लागला. मुत्सद्यांच्या कारस्थानाचें पहिलें साध्य गंगाबाईला हस्तगत करून आपल्या स्वाधीन ठेवणें हें होतें. गंगाबाई हस्तगत झाली म्हणजे पूर्वींप्रमाणें माधवरावांचा किंवा नारायणरावांचा जो राजपक्ष नानांनीं अंगिकारिला होता त्याचें पुनरुज्जीवन होऊन उघड रीतीनें दादासाहेबांचा पक्ष निर्बल ठरेल, आणि तशांत गंगाबाई ही गरोदर असल्यानें भावी कालाबद्दल प्रत्येकाला आशा वाटूं लागून सर्वांची सहानभूति मिळेल, अशा कल्पनानुसार काय वाटेल तें करून गंगाबाईला दादासाहेबांच्या ताब्यांतून बाहेर काढून आपल्या कबजांत घेणें हें पहिले काम होय असें त्यांना वाटलें. या पहिल्या विजयावर पुढील सर्व विजयांची मदार होती, ह्मणून गंगाबाईला घराबाहेर काढण्याच्या युक्त्या मुत्सद्दी डोक्यांतून निरनिराळ्या पद्धतीनें निघूं लागल्या. गंगाबाई नानांच्या केवळ थापांना भुलून एकदम दादासाहेबांचा पक्ष सोडून घराबाहेर निघणारी नव्हती. ह्मणून तिनें आत्मरक्षणार्थ व गर्भरक्षणार्थ बाहेर पडावें या हेतूनें तिला भीति घालण्याचे प्रयत्न आनंदीबाईचा बागुलबावा पुढें करून मुत्सद्दी करूं लागले, हें पुढील पत्रावरून दिसून येईल. खालील पत्र तारीख १५ नोव्हेंबर रोजीं शिवाजी बाबाजीनें मिरजेस वामनराव पटवर्धन यांस मंगळवेढ्यांतून पाठविलें आहे. त्यांतील मजकूर असा-' श्रीमंत नारायणराव कैलासवासी झाल्यावरी आह्मीं सुष्टदुष्टाशीं साऱ्यांशींच राजकारणें, घरास जाणें येणें योग्यतेनुसार केले. त्यास सकारनामक (सखारामबापू) फारच निखालसतेचें बोलणें चालणे व कोणत्या विचारें कसें करावें हेही प्रकार अकृत्रिमपणें शपथपूर्वक बोलत आले. तदोत्तर तेथील निखालसता लेखक (नाना फडनविस) मुखें रुबरू वगैरे दिसून आल्यावर आपणाकडे पत्रें पाठविलीं. आपण श्रीमंत भाऊसाहेबांची रवानगी केली ते येऊन पोंचले. सकारनामक यांची भेटी राजेवाडीजवळ झाली. तेव्हां त्यांच्या चित्तात आलें कीं, (हे) श्रीमंतांचे एकनिष्ठपणें चाकर आहेत. याप्रसंगीं श्रीमंत मातोश्री गंगाबाईच्या बचावाचा प्रकार करूं लागल्यास आमच्या मनसब्यांत येतील व रास्तेही

१. ऐ. ले. सं. २०८९

येतील. नकारनामक नाना लेखकही येतील. देशस्थ मंडळीही सर्व आपल्या लगामींच आहेत. मनसबा केल्यास गर्भाचें संरक्षण होईल. दैवेंकरून पुत्र झाल्यास उत्तम. नाहींतर पुत्र त्यांच्या (पेशव्यांच्या) दायजांचा घ्यावा. असें चित्तांत येऊन राजकारणें करूं लागले. आह्मीं बोलून आणक्रिया केली कीं, "गंगाबाईंच्या बचावाविषयीं व श्रीमंतांचे दौलतेविषयीं तुह्मीं आह्मीं एक असावें." येणेंप्रमाणें परस्परें खातरजमा झाली. श्रीमंत भाऊंच्या मते गंगाबाईस चोरून काढून (गंगाबाईला शनिवारवाड्यांतून चोरून बाहेर काढून) हरएक आपल्या स्थळास न्यावी असें ह्मणत होते. ती गोष्ट आमच्या कोणाच्या विचारास आली नाहीं. सारेच बोंब आमच्या पाठीस लागेल. ही गोष्ट करूं नये. असे झाल्यावरी सकारनामकाचें राजकारण लागल्यावरी (भाऊंनी ती) गोष्ट टाकली सकारनामकांनीं गंगाबाईस कृष्णाजी हरी (हे गंगाबाईंचे वडील. यांच्या पुण्यांतील वाड्यात.) यांच्या घरीं यावयाचा राबता घालविला. लष्कर लांबले ह्मणजे सप्तऋषीस आणावी. आणि साऱ्यांनीं मिळून मंडळ एक करून बंदोबस्त करावा. मोंगल भोंसले यांशीं राजकारण करावें. (असा बेत ठरला.) सप्तऋषीचा किल्ला नकारनामक (नाना) लेखक यांचे स्वाधीन. त्यांनीं सांगितलें कीं, गंगाबाई येथें येतांच किल्ल्यावर घ्यावी हें आह्माकडे. वरकड हकारनामक (हरिपंत फडके) त्यांत आहेत. आह्मीं मेणवलीस राहूं. तुह्मांत आहों असें समजावे. याप्रमाणें झाल्यावरी सकारनामक उद्योगास लागले. आणि समाधान नाहीं ह्मणोन पेडगांवापासून मागें निरोप घेऊन राहिले. मनसब्याच्या साधनांत आहेत. राजकारण कच्चे पक्कें समजेल तसें करावें लागेल. तुह्मांसही पुरतें समजलें पाहिजे, यास्तव आम्हीं आलों आहों. उदईक त्या गृहस्थाकडे जातो. जर करून साधून पुढें परिणाम लागेसा असल्यास त्यासी बोलून चालून लष्करास संज्ञापूर्वक लिहिणे ते लिहूं. कागदीपत्रीं लिहावयाचें नाहीं. राजश्री हरिपंत घरचे आले. पत्र आपणांस पोंचेल असे जाणोन व याप्रमाणें आपणांकडे

लिहावयास सांगितलें त्याप्रमाणें लिहिलें आहे. सविस्तर आमची भेटी झाल्यावरी विनंती करीन. पक्के झाल्यास सर्वांच्या विचारास आल्यास बरें आहेसें दिसतें. घडतां अवघडच आहे! त्यांचे अन्नानें वाढल्यास होईल त्यास चुकूं नये इतका प्रकार आहे घडेल तें खरें. आपण पत्र वाचून लखोटा करून वाडीस पाठवून त्यांणीं (मोरो बल्लाळ हे नरसोबाच्या वाडीस होते.) वाचून पाहून विसर्जन करावें. संकलित पर्याय हकारनामकास सुचविले आहेत.'

२२. या पत्रावरून स्पष्ट होतें कीं, नानांचा पक्ष गंगाबाईच्या कबजामुळें बळकट होणार होता व त्याच्या सिद्धीकरतां विषप्रयोग, गर्भपात, वगैरे हुल्लडी त्यांजकडून उठवण्यांत येत होत्या. या हुल्लडीमुळें परशुरामभाऊही गंगाबाईंना चोरून पळवून नेण्यास उद्युक्त झाले होते. एकंदरींत कारस्थानी मंडळीला गंगाबाईचें हरण करावयाला पाहिजे होतें. पण ती त्यांच्या तावडींत सहसा सांपडत नव्हती. गंगाबाईचा माहेरीं साठे यांच्या वाड्यांत येण्याचा राबता सखारामबापूंनीं पाहून तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण तोही त्यांचा साध्य होईना. याकरतां गंगाबाई बिनतोड आपल्या हस्तगत होईल असे त्याचे नवीन प्रयत्न सुरू झाले. नवीन कल्पना निघूं लागल्या. नवीन कारस्थानें घाटूं लागलीं. या कारस्थानांतून गंगाबाईच्या मनावर जबरदस्त परिणाम होईल असें एक राजकारण उत्पन्न झालें व तें निर्माण करण्याचें बुद्धिकौशल्य नानांनीं दाखविलें हें पुढील गोष्टीवरून दिसून येईल.

२३. मागें सांगितल्याप्रमाणें नारायणरावांना धरण्याच्या यादीवर दादासाहेबांची सही होती. तो धरण्याचा हुकूम सुमेरसिंगानें पाहिल्यानंतर तो नारायणरावांना धरण्याच्या कामगिरीला उद्युक्त झाला होता. सुमेरसिंगावरचे अधिकारी ह्मणजे बाळाजीपंत दामले हे रिसालदार होते व त्यांच्यावरचे अधिकारी ह्मणजे हरिपंत फडके हे सरदार होते. हरिपंत फडके हे धरण्याच्या कटांत असल्यामुळें त्यांच्या परवानगीनेंच सुमेरसिंग यानें ही काम-

गिरी आपल्या हातीं घेतली होती. नारायणराव मेल्याची हकीकत कानावर पडतांच हरिपंत फडके जीव घेऊन जे परागंदा झाले त्याचें कारण, नारायणरावांच्या खुनाचा गुन्हा त्याच्यावर लादला जाईल, याची धास्ती त्यांना वाटत होती. ह्मणूनच त्यांनीं पळ काढला होता. पुढें बाबूजी नाईकांनीं मध्यस्ती करून दादासाहेबांना जरी त्याच्यावर दया करावयाला लाविलें होतें, तरी त्यामुळें त्यांच्या नांवाला लागलेले गालबोट पुसलें जाणारें नव्हतें. तेव्हां ती एक हुरहुर हरिपंतांच्या मनाला होतीच. दादासाहेबांच्या विरुद्ध, ते लोकांच्या मनांतून साफ उतरून जाण्याकरितां नाना फडनविस यांना, एकाद्या जबरदस्त पुराव्याची जरूरी होती. तेव्हां ते त्याच विचारांत व कल्पना लढविण्यात होते. हरिपंत फडके यांच्याजवळ नारायणराव पेशव्यांना धरावा हा दादासाहेबाचा अस्सल हुकूम होता. तेव्हां त्याचा राघोबादादांना पूर्ण गुन्हेगार ठरविण्यात उपयोग होईल कीं नाहीं हाही विचार त्यांच्यापुढें होताच. तेव्हा त्यांत थोडी अदलाबदल केल्यानें राघोबादादा लोकदृष्टीनें गुन्हेगार ठरून, त्यांना पदच्युत करण्याच्या आपल्या खटपटीला जोर येतो असे पाहून, त्या हुकुमातील अक्षरामध्यें त्यांनीं थोडका फरक करविला. त्या फरकामुळे नानाच्या पक्षाच्या कारस्थानाला फारच मोठा जोर आला. तो फरक ह्मणजे 'धरावा' यातील 'ध' च्या ठिकाणीं फक्त 'मा' अक्षर घातले, एवढाच तो फरक होता. या कलमबाज कारकुनाच्या अल्पशा फरकाच्या कामगिरीनें राज्यक्रांतिसारखें अवाढव्य कार्य घडवून आणलें, इतकी शक्ति त्या अल्प फरकाच्या बींजांत होती.

२४. या हुकमाच्या यादीवर जो 'ध' चा 'मा' झाला तो पूर्ण तऱ्हेनें स्पष्ट असा झालेला होता. त्यांत खोडाखोडीचा असा कांहींच प्रकार नव्हता. ही अस्सल यादी रामशास्त्री प्रभुणे याच्या हातीं दीड महिन्यांनीं आली. तेव्हां त्यांत मारावा अशीं स्पष्ट अक्षरे होतीं. अर्थात् 'ध' च्या ठिकाणीं जो 'मा' झाला तो अत्यंत काळजीपूर्वक केला असला पाहिजे यांत संशय नाहीं. त्यावेळीं ज्या याद्या लिहिल्या जात होत्या. त्या सर्व मोडींत होत्या.

मोडी लिपींत ' ज ' च्या ठिकाणीं ' न ' करणें; ' ला ' च्या ठिकाणीं ' क ' करणें, ' प ' च्या ठिकाणीं ' द ' करणें किंवा अशाच प्रमाणें एकादी मात्रा वाढविणें किंवा एकादा अनुस्वार देणें हें सहज होण्यासारखें असतें. परंतु ' ध ' हें अक्षर थोड्याशा फरकानें 'मा' होण्यासारखें नव्हतें. ' ध' हें अक्षर अजिबात काढून टाकून त्या ठिकाणीं 'मा' हें अक्षर लिहूनच 'ध' चा 'मा' होणार होता. तेव्हां तसाच एकादा शहाणा मनुष्य युक्तीनें 'ध' हें अक्षर कागद न फाटूं देतां, किंवा बाजूच्या अक्षरांना धक्का न लागूं देतां त्याची शाई पाण्यानें अगर अन्य औषधी द्रव्यानें पुसून तशीच शाई पैदा करून तशाच वळणाचें 'मा' अक्षर काढूं शकता. नाना स्वतः कलमबहाद्दर असल्यामुळें व त्यांना सर्व अनुकूलता होती म्हणून त्यांनीं हा 'ध'चा 'मा' केला; व आपण उभारलेल्या कारस्थानाला त्यामुळें जोर चढविला असें दिसून येतें.

२५. 'ध'चा 'मा' कोणी व केव्हां केला हा मोठा वादग्रस्त प्रश्न गणिला जातो. आतांपर्यंतचे बखरीकार व इतिहासकार 'ध'चा 'मा' आनंदीबाई यांनीं केला असावा असा तर्क करतात. हरिवंशाच्या बखरींत पुढीलप्रमाणें मजकूर आहे. ' श्रीमंत रघुनाथराव दादासाहेब यांनीं दस्तऐवज करून दिला जे, नारायणराव यांस धरावें, नंतर तुह्मांस अमुक बक्षिस देऊं. असें नानाप्रकारें लिहून दिलें. तों आनंदीबाई, रघुनाथरावदादा यांची पत्नी, तिनें गारद्यांस बोलावून सांगितलें जे, तुह्मांस धरावें असें लिहून दिलें; त्यास धरिलें असतां पुढें कांहीं लोक तिकडे, कांहीं इकडे, असें होऊन राजकारण उभें राहील. त्यास मारून टाकवें हेंच बरें, ह्मणजे एकछत्री जाहलें. असेंच करावें. नंतर गारदी यांनीं उत्तर केलें कीं; आपण ' धरावें ' असें लिहून दिलें आणि मारावें कसें ? तेव्हां आनंदीबाईनीं सांगितलें कीं, तुह्मांस मारावें असें लिहून देतें. तुमचा कागद कोठें आहे तो आणवावा. नंतर त्यांनीं तो कागद आणून दिला. तेथें ' धरावा ' जें होतें तें तेथेंच ' मारावा ' असें करून दिलें. ' या माहितीप्रमाणें 'ध'चा

'मा' आनंदीबाईनीं सुमेरसिंगाच्या समोर केला व तो नारायणरावांचा वध करण्यापूर्वी केला असें या बखरींत स्पष्टपणें दर्शविलें आहे. या बाबतींत ग्रांट डफनें आपल्या मराठ्यांच्या बखरींत पुढीलप्रमाणें मजकूर दिला आहे.[1] " नंतर सर्व कारभारी लोकांचे मतें असें ठरलें कीं, नारायणरावांस रघुनाथरावानेंच मारविलें असेल ! परंतु त्याचा निश्चय होत नाहीं ! त्यास इलीं याला ' पेशवेपदवी प्राप्त झाली ती त्यानें भोगावी. ' या विचारास समशास्त्रीही अनुमोदन देता झाला. परंतु तो बहुत युक्तीनें गुप्तपणें त्याचा आंतून बारीक शोध काढूं लागला. त्यावर दीड महिन्यानें त्यास पुरतेपणें तें सर्व विदित झालें. तेव्हां रामशास्त्री रघुनाथरावाशीं जाऊन बोलिला कीं, हें अकर्म तुह्मीच करविलें, मी त्याचा पुरतेपणी शोध करून तुह्मांकडे आलों. ' असें त्याचें भाषण ऐकून रघुनाथराव यानें इतकेंच मान्य केलें कीं ' मी त्यास धरावा असे मात्र पत्र दिलें होतें. ' हें वर्तमान खरेंच असेल, कां कीं, पुढें तो रघुनाथरावाच्या हातचा अस्सल कागद रामशास्त्री यांस सांपडला. त्यांतील लेखांत मुळचा ' धरावे ' असा शब्द होता. त्या ' ध ' कारावर कोणी आणीक शाई घालून मारावे असें केलें होते. तें कृत्य आनंदीबाईचें असेल असें सर्वांच्या मनांत आलें. नंतर रघुनाथरावानें त्यास धरण्याविषयीं पत्र लिहिलें हा अन्याय आपणापासून घडला असें मान्य करून, रामशास्त्री यास विचारलें कीं, या दोषास प्रायश्चित्त काय करावें ? त्यावर त्यानें उत्तर केलें कीं, ' यास देहांतप्रायश्चित्त पाहिजे. कां कीं, तुमचे बाकी उरलें जें आयुष्य त्यांत तुह्मांपासून सद्वर्तन होणार नाहीं. ' ........इतकें बोलून तो शास्त्री तेथून निघून वाई क्षेत्राजवळ एका लहानशा गांवीं राहून कालक्षेप करतां झाला." रामशास्त्रयांनी दादासाहेबांस जें प्रायश्चित्त सांगितलें तें नारायणरावांचा वध झाल्यानतर दीड महिन्यानें सांगितलें व नंतर ते पुणे सोडून निघून गेले असे आहे. त्या बाबतींत हरिवंशाची बखर पुढीलप्रमाणें हकीकत देते.[2] नारायणराव यांचा वध

---

१ डफकृत म. बखर पान. २३७. २ हरिवंशाची बखर पान ४३.

झाल्यानंतर ' दुसरे दिवशीं गांवांतील शिष्ट ब्राह्मण बोलावून विचार आरंभिला जे, कांहीं प्रायश्चित्त करावें, ह्मणून जमा करून रामशास्त्री यास बोलावून आणिलें. तों हें वर्तमान होताच शास्त्रीबावा यांनीं आपलीं मुलें माणसें माहुलीस रवाना करून आपण हातांत पंचपात्र घेऊन सोंवळयांनीं वाड्यांत आले. तों रघुनाथरावदादा कचेरीस बसले आहेत. तों शास्त्रीबावा येतांच श्रीमंतानीं नमस्कार केला. तेव्हां शास्त्री बोलले कीं, नमस्कार न करणें. तुह्मांस अशौच आहे. असें बोलतांच वरकड पंडीत ह्मणाले कीं, शास्त्रीबावा आपणास यजमान यांनीं बोलाविलें जे, गारदी यांचे हातून हें कर्म जाहलें. परंतु शब्द दोष श्रीमंतावर आला, त्यास कांहीं प्रायश्चित्त करावें. यामुळें आपणांस बोलाविलें. तेव्हा शास्त्रीबावा ह्मणाले कीं प्रायश्चित्त कशाचें करता व कोणास देतां ? ब्रह्महत्या, गोहत्या, स्त्रीहत्या, बालहत्या जेथें जाहल्या तेथें कोणतें प्रायश्चित्त ? पुस्तकांत लिहिलें आहे एक प्रायश्चित्त. यास देहांत प्रायश्चित्त करावें ! शिसें तापवून प्राशन करावें. किंवा दर्भाचें गृह करून आंत बसावें आणि अग्निसंस्कार करावा. यांतून वांचल्यास पुढें प्रायश्चित्त करावें. असें ह्मणतांच सारे पंडीत बोलले जे, शास्त्रीबावा, आपण असे काय ह्मणून बोलता ! हे बोलले कीं, मला यांचे राज्यांत कांहीं राहावयाचें नाहीं. तुह्मांस राहावयाचें असेल ह्मणून तुह्मी ग्रंथाखेरीज भाषण करतां ! मी मुलें माणसें रवाना करून सोंवळयानेच आलों. मी असाच निघणार ! काल्पासून जलस्पर्श देखील नाहीं केला ! मी जीवित्वास उदार जाहलों. मर्जी असल्यास आणखी एक ब्रह्महत्या करावी ! याप्रमाणें शास्त्रीबावा बोलतांच कोणीएक बोलनासे जाहले शास्त्रीबावा तसेच निघून माहुलीस आले. नंतर अन्नव्यवहार केला. मागें ( रघुनाथरावांनीं ) कांहीं प्रायश्चित्त केलें नाहीं. '

२६. वर दाखविल्याप्रमाणें हरिवंशाच्या बखरींत नारायणरावांचा वध झाला त्याच्या दुसऱ्या दिवशीं वाड्यांत रामशास्त्री आले असें आहे. वाड्यांत हत्या झाल्या, ह्मणून त्याची शांति व शुद्धि दुसऱ्या दिवशीं करण्याकरतां

ब्राह्मण येणें शक्य होतें. त्या वेळीं दादासाहेबांनींही प्रायश्चित घ्यावें, असें ब्राह्मणांच्या मनांत येणेंही संभवनीय होतें, व त्याकरतां दादासाहेबांनीं रामशास्त्री यांना बोलाविलें व त्या प्रमाणें ते वाड्यांत आले असें गृहित धरून चालवयास हरकत नाहीं. या बखरींतील वरील वृत्तांतावरून या प्रसंगीं ह्मणजे नारायणरावांच्या मृत्यूच्या दुसऱ्याच दिवशीं रामशास्त्र्यांनीं राघोबादादांना गुन्हेगार ठरवून त्यांना देहांतप्रायश्चित सांगितलें असें दिसतें. रामशास्त्री हे पंडित होते. ते धर्मशास्त्रांत पारंगत होते. कोणत्या पातकाबद्दल कोणतें प्रायश्चित आहे हें त्यांना तोंडपाठ येत होतें. ते न्यायाचा निवाडा करतांना लहान मोठा हा भेदभाव मनांत न आणता निस्पृहपणानें न्याय देत होते. त्यामुळें ते निस्पृह आहेत अशी लोकांत बोलवा होती. राघोबादादांना त्यांनीं त्यांच्या तोंडावर भीडभाड न ठेवतां अगर आपल्या जिवाची पर्वा अगर नोकरीची पर्वा न बाळगतां देहांतप्रायश्चित सांगितलें, यावरून ते कोणत्या दर्जाचे निस्पृही होते, हें सांगण्याचें कारण नाहीं. परंतु सर्वच अव्वल दर्जाचीं निस्पृही माणसें न्यायी असूं शकतात असा मात्र सिद्धांत असूं शकत नाही. न्यायी होण्याला निस्पृहतेची मात्र आवश्यकता असते. केवळ निस्पृहतेनें मनुष्य न्यायी होऊं शकत नाहीं. न्याय देण्याला जशी निस्पृहतेची आवश्यकता आहे त्याचप्रमाणें मनाची समतोलता, उभयपक्षीं पुढे आलेले पुरावे पाहून निःपक्षपात-बुद्धीनें न्याय करण्याची मनाची प्रवृत्ति, व मन विकारवश न होऊं देण्याचा स्वभावधर्म या गोष्टींचीही जरूरी असते. रामशास्त्री यांच्याजवळ निस्पृहता एवढाच एक गुण होता. न्यायी होण्याकरतां बाकीचे जे गुण असावे लागतात ते दुर्दैवानें त्यांच्या अंगीं नव्हते. त्यांनीं या वेळीं राघोबादादांची काय बाजू आहे, हें समजूनही घेतलें नाहीं. राघोबादादांविरुद्ध ज्या पुराव्यावर मुत्सद्यांची व रामशास्त्र्यांची मदार होती, तो 'ध' चा 'मा' झालेला दस्तऐवज रामशास्त्र्यांच्या हातीं शिक्षा सांगितल्यानंतर दीड महिन्यांनीं आला. ह्मणजे आधीं शिक्षा व नंतर पुरावा ही पद्धत न्यायाची द्योतक आहे असें ठरूं शकत नाहीं. ही कुटिल कारस्थानी लोकांची पद्धत असूं शकेल. अगोदर काय करावयाचें हें

ठरवून नंतर त्याला लागणारी उपकरणें तयार करावयाचीं हा नीतिधर्म कारस्थानी लोकांचा आहे. अगोदर शिक्षा देऊन नंतर दीड महिन्यांनीं पुराव्याचा कागद पुढें आणावयाचा किंवा राघोबादादांना पदच्युत करण्याचें ठरवून व त्यांच्या वंशालासुद्धां नमस्कार करावयाचा नाहीं अशा आणक्रिया करून, नंतर त्याचा पुरावा पुढें आणावयाचा, ही न्याय देण्याची तऱ्हा रामशास्त्री यांच्या न्यायमूर्तीलाच शोभते. या वेळीं रामशास्त्री हे नारायणरावांच्या मृत्यूच्या बातमीनें शोकाकुल झाले होते. माधवराव हे त्यांचे अन्नदाते व वैभवदाते होते. नारायणरावांना अर्थात् रामशास्त्री हे माधवरावांच्या जागीं मानीत होते. आपला धनी, आपला अन्नदाता व आपला संरक्षणकर्ता मेला, यामुळें रामशास्त्र्यांना अपार दुःख झालें असेल यांत शंका नाहीं. अशा स्थितींत त्यांनीं पाण्यालाही स्पर्श न केल्यामुळें त्यांचा जठराग्नि प्रदीप्त झालेला, तशांतही 'भरींत भर' या न्यायानें नानांच्या एकतर्फी माहितीनें मनांत भडका उडवून सोडलेला. अशा मनःस्थितींत येऊन चवताळलेल्या वाघाप्रमाणें किंवा विवेकबुद्धि टाकलेल्या एकाद्या मद्यपी मनुष्याप्रमाणें राघोबादादांना रामशास्त्र्यांनीं देहांतप्रायश्चित्ताची शिक्षा सांगितली होती. या शिक्षेला एकाद्या पिसाट ब्राह्मणाच्या भरमसाट वल्गनेपेक्षां जास्त महत्व देतां येणार नाहीं.

२७. रामशास्त्री याच दिवशी डोक्यांत राख घालून माहुलीस निघून गेले ही गोष्ट मात्र सत्य आहे. त्यांच्या या आततायी व अविचारी वागणुकीमुळें ते न्यायी होते असें मात्र ठरत नाहीं. या बाबतींत डफसाहेबांची चूक झाली आहे. त्यांची समजूत अशी झाली कीं, रामशास्त्री एवढा मोठा न्यायाधीश, तो हातांत पुरावा सांपडल्याशिवाय दादासाहेबांना कसें प्रायश्चित्त सांगेल ? या त्यांच्या मोठेपणाच्या भ्रमावर 'ध' चा 'मा' केलेला दस्तऐवज दीड महिन्यानंतर सांपडला व त्यानंतर स्वतःची खात्री करून घेऊन रामशास्त्र्यांनीं दादासाहेबांना प्रायश्चित सांगितलें असलें पाहिजे असा तर्क डफनें लढविला आहे. परंतु नारायणराव मेल्यानंतर फक्त सव्वीस दिवसच दादासाहेब पुण्यांत होते. नारायणराव मेल्याला दीड महिना आक्टोबरच्या १३ तारखेला येतो.

त्या वेळीं ते सिद्धटेकाजवळ होते.[1] राघोबादादांनीं तारीख १० आक्टोबर रोजीं पेडगांवीं[2] पेशव्यांचीं वस्त्रें धारण केली. तेथून ते सिद्धटेकाला यावेळीं गेले होते. रामशास्त्री हे कांहीं राघोबादादांना देहांतप्रायश्चित्त सांगण्याकरतां सिद्धटेकाला गेले नव्हते. यावरून 'ध' चा 'मा' केलेला कागद रामशास्त्री यांच्या हातीं दादासाहेब सिद्धटेकाला पोंचल्यानंतर पडला. अर्थात् रामशास्त्री यांनीं दादासाहेबांना जें प्रायश्चित्त सांगितलें तें हरिवंशाच्या बखरीप्रमाणें नारायणरावांच्या मृत्यूच्या दुसऱ्या दिवशींच, कोणताही पुरावा हातीं नसतांना सांगितलें असेंच ठरतें.

२८. हरिवंशाच्या बखरींत आनंदीबाईनें 'ध' चा 'मा' केला व तो सुमेरसिंगाच्या समोर केला असें धडधडीत विधान केलें आहे, त्यांत किती खरेपणा आहे, हेंही येथें पहाणें अवश्य आहे. आनंदीबाई व राघोबादादा हे शनिवार वाड्यांत किती पक्क्या बंदोबस्तांत होते याची माहिती मागें दिलीच आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं बाहेरचें चिटपांखरूंही जाणें शक्य नाहीं, त्या ठिकाणीं सुमेरसिंग गेला होता, हें हरिवंशाच्या बखरीकाराचें विधान मुळांतच चुकीचें आहे. सखारामबापूंनीं धरण्याच्या यादीवर दादासाहेबांची सही घेतली व ती यादी सुमेरसिंगाला दाखविली, त्यामुळें सुमेरसिंगाची खात्री झाली व तो धरण्याच्या कृत्याला प्रवृत्त झाला, अशी मूळ हकीकत असल्यानें, हरिवंशाच्या बखरीकारांचें विधान अर्थात् खोटें आहे. दादासाहेबांची व सुमेरसिंगाची, ते कैदेंत पडल्यानंतर प्रत्यक्ष गांठभेट झाली नाही व त्यामुळें आनंदीबाईचीही झाली नाहीं. असें असतां 'ध' चा 'मा' कसा झाला व तो आनंदीबाईनें कसा केला ? मुत्सद्यांनीं सुमेरसिंगाबरोबर धरण्याचा व्यवहार ठरविला. त्याबद्दल पांच लाख रुपये व तीन किल्ले हें त्याचें इनामही ठरलें. असें असतां त्याच्या हातांत अचानक जर मारण्याचा हुकूम पडला असतां, तर तें काम करण्याला तो खात्रीनें उद्युक्त झाला नसता. तो जाणून बुजून गारदी मनुष्य. दक्षिणेंत पोट भरण्या-

---

१. ऐ. ले. सं. पान २०७७. २. पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद भाग ५ पान ६.

करतां तो आलेला होता. जो पैसा देईल त्याची इमानें इतबारें नोकरी करण्याचा त्याचा पेशा. पैसा द्यावा व त्याबद्दल नोकरी घ्यावी हा त्याचा व्यावहारिक रिवाज. असें असतां त्याच्याबरोबर धरण्याचा सौदा ठरतो व त्याच सौद्यांत मारण्याची कामगिरी दिली जाते एवढें समजण्यासारखें व्यवहारिक ज्ञान सुमेरसिंगाला होतें. एकादें मूल बाजारांत पैशाची भाजी घेण्याकरतां गेलें तर तें चार ठिकाणीं जाऊन चौकशी करून भाजी घेत असतें. आपल्या एका पैशाचा मोबदला बरोबर पदरांत पडतो कीं नाहीं हें नीट निरखून तें मूल पाहत असतें. 'धरणें' अगर 'मारणें' हा व्यवहार लाखों रुपये किंमतीचा होता. शिवाय धरण्याच्या कामगिरीपेक्षां पेशव्यांना मारण्याची कामगिरी किती पटीनें मोठी होती हें सुमेरसिंगाला दुसऱ्यानें सांगण्याइतका तो खात्रीनें अप्रबुद्ध नव्हता. पेशव्यांना मारण्याच्या कामगिरीबद्दल त्याला अर्धे राज्य जरी कोणी देऊं केलें असतें, तरी तो तयार झाला असता असेंच केवळ ह्मणतां येणार नाहीं. तो गारदी झाला तरी त्याला नीति—अनीति कीर्ति—अपकीर्ति यांतील भेदाभेद समजत होते. केवळ पैसा ह्मणजेच परमेश्वर असें समजणारा मूढ तो खात्रीनें नव्हता. असें असतां त्याच्याबरोबर ज्याअर्थी मारण्याच्या इनामाचा व्यवहार ठरला नाहीं त्याअर्थी त्याला ज्या वेळीं हुकूम दाखविला त्या वेळीं त्या हुकमांत धरावा असाच मजकूर असला पाहिजे. केवळ धरण्याच्या कामगिरीबद्दल जो सुमेरसिंग दादासाहेबांचा लेखी हुकूम मागतो तो 'ध' अक्षरावर थोडी शाई टाकून 'मा' बनविलेल्या अक्षराप्रमाणें कृति करील हें अशक्यांतलें अशक्य आहे. सुमेरसिंगानें मारण्याबद्दलचें इनाम अगोदर ठरविलें नाहीं किंवा नारायणरावांचा वध झाल्यानंतर त्यानें मारण्याबद्दलच्या कामगिरीचें इनाम मागितलें नाहीं. यावरून त्याला जो हुकूम दाखविला, तो धरण्याबाबतचाच होता यांत तिळमात्र शंका राहत नाहीं. स्वतः राघोबादादाही आपण धरण्याचा हुकूम दिला होता ही गोष्ट कबूल करतात.

२९. यावरून आनंदीबाईवर जो 'ध' चा 'मा' केल्याचा आरोप लादण्यांत येतो तो धादांत खोटा ठरतो. जसजशी वेळ येत गेली तसतसे याच्यावरून

त्याच्यावर आरोप उड्या घेऊं लागले. आनंदीबाईनें 'ध'चा 'मा' करून गारद्यांच्या हस्तें नारायणरावांचा खून केला असा पहिला आरोप आहे. पण बाराभाईंच्या वेळीं तो आरोप उडी मारून प्रत्यक्ष राघोबादादांच्या डोक्यावर बसला. तारीख २९ जुलै सन १७७५ रोजीं सखारामबापूंनीं गव्हरनर जनरल वॉरन् हेस्टिंग्ज यांना जें पत्र पाठविलें त्यांत पुढीलप्रमाणें मजकूर आहे: 'इतक्यांत दुर्दैवानें श्रीमंत नारायणराव यांस रघुनाथरावानें ठार मारिलें, ती हकीगत जगजाहीरच आहे' यावरून बाराभाईंचें कारस्थान पुढें राघोबादादांनीं नारायणरावांचा खून केला या पायावर उभारलें गेलें. पहिल्यानें दादासाहेब कारभारांत ढवळाढवळ करूं लागले व मुत्सद्यांच्या विचाराप्रमाणें चालेनात म्हणून त्यांना पदच्युत करण्याचें कारस्थान सुरू झालें; त्यानंतर आनंदीबाई गंगाबाईचा गर्भपात करणार आहे म्हणून गर्भाच्या बचावाकरतां पहिल्या कारस्थानानें कोलांटी खाल्ली; त्यानंतर राघोबादादांनीं नारायणरावांचा स्वतःच्या हातानें खून केला अशी पलटी मारली; एकदरींत ज्या ज्या वेळेला जें जें सोईस्कर असें वाटलें तें तें कारस्थानी मुत्सद्यांनीं अंगिकारलें असें स्पष्ट होतें.

३०. परशुरामभाऊ नारायणरावांच्या मृत्यूनंतर दीड महिन्यांनीं पुण्याला आले. ते येईतोंपर्यंत नानांच्या कारस्थानाला प्रत्यक्ष असें तोंड फुटूं शकलें नाहीं. पटवर्धन हे राघोबादादाचे पूर्ण शत्रू असल्यामुळें दादासाहेब व आनंदीबाई यांच्याविरुद्ध वातावरण उत्पन्न करण्याच्या व पुण्यांत त्यांच्या विरुद्ध खळबळ माजविण्याच्या कार्याला जोरानें सुरवात झाली. या नवीन कारस्थानांत सर्व पटवर्धनांची एकवाक्यता झाल्यानें पुढें परशुरामभाऊ जरी दादासाहेबांच्या बरोबर मोहिमेला गेले, तरी त्यांची कामगिरी पत्रद्वारें पार पाडणारे दुसरे पटवर्धन पुण्याला होतेच. त्यांतील महाकारस्थानी व पराक्रमी जे पुरुषोत्तम दाजी, ते पुण्याला येऊन बसले. त्यांनीं पटवर्धन मंडळीचा पुढाकार घेऊन कुटिल कारस्थानाचा गाडा पुण्यापासून पुरंदराकडे हांकण्यास सुरवात केली. त्यामुळें नाना जरी मोहिमेवर होते तरी पुण्याचा व्यूह त्यांना तेथूनच उत्तम प्रकारें रचतां आला.

२१. इकडे दादासाहेब फौज जमा करीत जेजुरीहून पेडगांव, सिद्धटेक, निरानरसिंगपुर अशी मजल करीत भीमेच्या तीरातीरानें जात जात निंबाळकरांच्या जहागिरींत शिरले. सखारामबापू व हरिपंत फडके मधून मधून पुण्यास जाऊन पुन्हां स्वारीबरोबर हजर राहत होते. विसाजीपंत बिनीवाले, त्रिंबकमामा, रामचंद्र गणेश, आपा बळवंत, बाजीपंत अण्णा, भवानराव प्रतिनिधि, रास्ते, धायगुडे, बाबूजी नाईक, भिमराव पानसे, सुमेरसिंग, महमद इसफ, चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र, सखाराम हरी, वगैरे दुसरे लहान मोठे सरदार आपापल्या फौजेसह या स्वारींत हजर होते. परशुरामभाऊ हेही स्वारीबरोबर होते. वाटेंत वामनराव व रघुनाथराव नीलकंठ हेही येऊन मिळाले. दादासाहेबांचें पत्र गेल्याप्रमाणें नागपुराहून दर्याबाई व रघोजी यांना घेऊन मुधोजी भोंसले आले. त्यावेळीं दादासाहेबांनीं रघोजीला पुन्हां सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें दिलीं. त्यानंतर दर्याबाई रघोजीला घेऊन नागपुरास रवाना झाल्या. मुधोजी मात्र आपल्या पांच हजार फौजेसह दादासाहेबांच्या स्वारींत राहिला. या वेळीं मराठ्यांची फौज चाळीस हजार, गारदी पांच हजार व दोनशें तोफा एवढा लवाजमा दादासाहेबांचा झाला. निजामअल्लीचे वकील दादासाहेबांकडे आले. त्यांस दादासाहेबांनीं सांगितलें कीं, साबाजी भोंसल्यास तुह्मीं आमच्या स्वाधीन करावें, निदान त्यांना तुह्मीं हांकलून तरी लावावें. तसें केल्यास तुमचें आमचें सख्य राहील. नाहींतर आह्मीं तुमचें पारिपत्य करूं. त्यावरून वकिलांनीं सांगितलें कीं, पूर्वीं तुमच्या पुणें दरबारकडून वरचेवर आह्मांला सांगणें आलें होतें कीं, तुह्मीं साबाजीला मदत करावी. त्याप्रमाणें आह्मीं मदत केली आहे. आतां आह्मीं एकदां एक पक्ष उचलल्यानंतर त्याला घालवून लावावें किंवा त्याला तुमच्या स्वाधीन करावें हें विश्वासघाताचें काम आमच्या हातून होणार नाहीं. त्याला आमच्या हातीं घेऊन भोंसल्यांच्या राज्यांत अगर पेशव्यांच्या राज्यांत गडबड करावी असा आमचा बिलकुल हेतु नाहीं. तो आमच्या आश्रयास

१. ऐ. ले. सं. पा. २०७३

हील. परंतु वकीलाच्या या सांगण्यांत दादासाहेबांना तथ्य दिसलें नाहीं. व्हां निजामाबरोबर लढाई करण्याचा दादासाहेबांचा विचार कायम ठरला.

३२. साबाजी भोंसले दहा हजार फौज घेऊन पैठण व आंबेड या परगण्यांत येऊन लूटमार करूं लागला. त्याच्याबरोबर पुण्याच्या कारस्थानी लोकांनीं मनसबा चालविलाच होता. यावेळीं दादासाहेब नळदुर्गाच्या बाजूला असल्यामुळें साबाजीनें पुण्यावर स्वारी करून पुणें हस्तगत करण्याचा पुकारा केला. कारस्थानी लोकांचा प्रयत्न साबाजीनें पुण्यावर चाल करून यावें असाच होता. साबाजी पुण्याच्या रोखानें हालचाली करतो आहे असें दादासाहेबांना दिसतांच त्यांनीं त्रिंबकराव मामा पेठे व आनंदराव रास्ते यांच्याबरोबर दहा हजार फौज देऊन त्यांना साबाजीवर पाठविलें; व आपण निजामावर स्वारी करण्याकरतां नळदुर्गाकडे रवाना झाले. ही वार्ता निजामाला समजतांच तो आपली फौज घेऊन भागानगराहून निघाला. त्याच्याजवळ त्यावेळीं पंचेवीस हजार स्वार, कित्येक हजार गारदी, पन्नास तोफा व दोन हजार जेजाला होत्या. शिवाय रुकनुद्दौला व इब्राहीमखान धौंशा यांचीही फौज बरीच होती. मोंगलाईंतले मराठे सरदार निंबाळकर, जाधव व पांढरे वगैरे होते, ते सर्व मोंगलांस येऊन मिळाले. दादासाहेब नळदुर्गाचा किल्ला सर करून आवसें परगण्यांतून भालकीस आले. मोंगल बेदराकडे येत असल्याचें ऐकून त्यांनीं तिकडे मोर्चा वळविला. मोंगल बेदरच्या किल्ल्याचा आसरा घेऊन लढाईला तोंड देण्याच्या तयारीला लागले. दादासाहेबांनीं मोंगलांच्या सैन्यावर तोफा रोंखून लाविल्या. मोंगलांच्या सैन्याला त्यांनीं कोंडींत धरलें. बेदरच्या आसपास पंधरा कोसपर्यंत शेतें, गवत, उंसाचे फड वगैरे सर्व होतें, तें जाळून टाकलें. मोंगलांची कही बंद करून त्यांना दाणावैरणीचा दुष्काळ पाडला. तोफांच्या माऱ्यानें निजामच्या सैन्याची दाणादाण उडवून देऊन त्यांना दे माय धरणीं ठाव करून सोडलें. या वेळीं दादासाहेबांच्या सैन्यापेक्षां निजामाचें सैन्य अफाट होतें. निजामाला बेदरच्या किल्ल्याचा आसरा होता. या सर्व गोष्टी निजामाला जय मिळण्याला अनुकूल होत्या. उलट

दादासाहेबांचें सैन्य कमी होतें. त्यांना स्वतःच्या फौजेला आड दडण्यासारखी मजबूत जागा नव्हती. शिवाय अत्यंत वाईट गोष्ट ह्मणजे, त्यांच्या फौजेंत निजामाला जय मिळावा अशी कारस्थानें करणारे घरभेदे सरदार व मुत्सद्दी होते. अशा सर्व बाजूंनीं प्रतिकूळ परिस्थितींत दादासाहेबांना जो जय मिळाला तो केवळ त्यांच्या पराक्रमामुळें व युद्धकौशल्यामुळेंच होता, यांत शंका नाहीं. दादासाहेबांनीं सर्व बाजूंनीं निजामाची नांगी आंवळून टाकली. त्यामुळें तो हतबल झाला व त्यानें त्यांच्याबरोबर तहाचें बोलणें लाविलें. दादासाहेब शरण आलेल्याला मरण देत नसत, किंवा शरण आल्यानंतर भलतेंच ओझें लादून त्याला गुलाम बनवीत नसत. या वेळीं तहाचें बोलणें करण्याकरतां निजामानें दिवाण रुकनुद्दौला याला पाठविलें होतें. रुकनुद्दौला दादासाहेबांकडे आला. त्यानें आपला शिक्कामोर्तब दादासाहेबांपुढें ठेविला आणि थोडक्यांत सांगितलें कीं 'तहाच्या वाटतील त्या अटी घाला. तुह्मांला पाहिजे तेवढ्या मुलखाच्या सनदा घ्या. आह्मांला त्या मान्य आहेत.' यावरून या वेळीं निजामाला दादासाहेबांनीं कसें जर्जर केलें होतें हें लक्षांत येईल.

३३. निजाम इतका मेटाकुटीला आला असता दादासाहेबांनीं त्याच्यावर वाटेल त्या अटी घातल्या नाहींत. निजामानें स्वतः भेटीस यावें, साबाजी भोंसल्यास आश्रय देऊं नये, वगैरे जेवढे योग्य व जरूरीचे मुद्दे होते तेवढे दादासाहेबांनीं पुढें ठेवले. ते सर्व निजामानें कबूल केले. त्यांत अशीहि एक शर्त घातली होती कीं, ज्यावेळीं मोठेंसें काम पडेल त्या वेळीं निजामानें दादासाहेबांना कुमक करावी. याप्रमाणें आपल्या वीरवृत्तीला शोभेल असा दादासाहेबांनीं निजामाबरोबर तह ठरविला व आपल्या मोठेपणाला शोभेल अशीं वस्त्रें, हत्ती, घोडें, शिरपेंच, तुरा व मोत्याची माळ वगैरे निजामाला देऊन त्यांनीं त्याची रवानगी केली. दादासाहेब प्रत्यक्ष आपल्या शत्रूबरोबर केवढ्या मोठ्या अंतःकरणानें व उदार मनानें वागत होते, तें निजामाच्या या प्रसंगावरून चांगलें लक्षांत येईल. पण दादासाहेबांच्या या उदारवृत्तीबद्दल कारस्थानी मंडळींच्या अंतःकरणाचा तिळपाप उडाला असेल हें निराळें सांगणेंचें कारण नाहीं.

३४. मोंगलांचा व दादासाहेबांचा तह झाला, व त्यामुळें आतां आपणाला दडण्याला मार्ग राहिला नाही असें पाहून साबाजीनें त्रिंबकरावमामा पेठे यांच्याकडे तहाची वाटाघाट करण्याचा घाट घातला; परंतु साबाजीबरोबर तह करूं नये, आपण त्याचें पारिपत्यच करण्याचा निश्चय केला आहे. असें दादासाहेबांनीं त्यांना कळविलें; व त्यांच्या मदतीला आणखी कांहीं सैन्य पाठविलें. भोंसल्यांवरील मोहीम संपल्यावर गोविंदराव गायकवाड, मुधोजी भोंसले व बाबूजी नाईक यांनीं परत आपल्या मुलखास जावें असें ठरलें. नंतर दादासाहेब गदवाल, सुरापुर या संस्थानिकांपासून खंडणी घेऊन निवृत्ति-संगमावर कृष्णा उतरून रायदुर्गच्या रोखानें चालले. या पूर्वीं हैदराकडील वकील आपाजीराम येऊन तहाचीं कलमें ठरवून गेला होता. त्यामुळें हैदराचें आक्रमण पेशव्याच्या मुलखावर आतां होण्याची धास्ती दादासाहेबांना राहिली नव्हती. नंतर दादासाहेबांनीं हैदरची मदत घेऊन अर्काटच्या नबाबावर स्वारी करण्याचें ठरविलें.

३५. नारायणरावांच्या मृत्यूनंतर दीड महिन्यांनी ज्या वेळेस दादासाहेबांचा मुक्काम पेडगांवाला होता त्यावेळीं सखारामबापूंनीं आजारीपणाचा बहाणा करून त्यांचा निरोप घेऊन कारस्थान ढवळण्याकरतां ते पुण्यास आले होते. कृष्णा-नदी उतरून कर्नाटकात जाईपर्यंत दादासाहेब सिद्धटेकाला होते. तेथून ते सासवडास जाऊन नंतर पुण्याला आले. दादासाहेबांच्या लष्करांतून सखारामबापूप्रमाणें निरनिराळीं कारणें सांगून नाना, हरिपंत फडके वगैरे त्यांच्या पक्षांतील लोक पुण्याला परत येऊं लागले. पुण्याला एका एका माणसाची भर पडत चालल्यामुळें दादासाहेबांना पदच्युत करण्याच्या त्यांच्या कारस्थानाला जोर चढूं लागला व सदर कारस्थान प्रत्यक्ष कृतींत आणण्याच्या प्रयत्नाला ते लागले. त्यांचा पहिला प्रयत्न गंगाबाईंना वाड्यांतून काढून सुस्थळीं आपल्या ताब्यांत त्यांना नेऊन ठेवणेंचा होता. त्या उद्योगाला ते लागले; त्याप्रमाणें त्यांच्या कारस्थानी चळवळीला सुरवात झाली.

३६. सखारामबापूंनीं दादासाहेबांच्या लष्करांतून नाना, हरिपंत फडके वगैरे मंडळींना कसें पुण्यास आणले याचीहीं येथें थोडी माहिती देणें योग्य आहे. सरळ वृत्तीच्या सिंहाला हे कपटी कोल्हे कसे पदोपदीं फसवीत होते, याची कल्पना या गोष्टीवरून येईल. एके दिवशीं सखारामबापूंनीं आपणाला हवा मानवत नाहीं असें ढोंग केले, आणि आपणाला पुण्याला जाण्याची दादासाहेबांच्या जवळ परवानगी मागितली. दादासाहेबांनीं त्यांच्या प्रकृतीची तक्रार असल्यामुळें सरळ बुद्धीनें त्यांना जाण्याची परवानगी दिली.[1] नंतर सखारामबापू आपल्या राहुटीस परत आले; आणि त्यांनीं नाना वगैरे सर्व मंडळीस राहुटींत बोलाविले. नाना, हरिपंत वगैरे मंडळीस, आपल्याला पुण्यास जाण्याची दादासाहेबाची आज्ञा झाली असें त्यांनीं सांगितलें आणि विचारलें कीं, तुह्मास पुण्यास यावयाचें आहे किंवा नाहीं? हा प्रश्न ऐकून नाना व हरिपंत ह्मणाले कीं, 'आम्हीं स्वाधीन आहों की काय! आह्मांस निरोप कसा होतो?' यावर बापू ह्मणाले, 'तुह्मांस निरोप देवविला तर तुह्मी याल?' यावर त्यांनीं अर्थात् रुकार दिला. त्यांनाहि पुण्याला नेण्याच्या प्रयत्नाला सखारामबापू लागले. त्यांनीं दादासाहेबाचे कारभारी चिंतो विठ्ठल यांना गाठलें, आणि त्यांना अशी थाप दिली कीं, 'तुह्मीं कारभार करतां पण तुम्हांस कारभाराचे धोरण अगदीं नाहीं.' तेव्हां ते म्हणाले 'कसें नाहीं तें सांगावें.' तेव्हां बापू म्हणाले. 'नाना फडनविस व हरिपंत फडके वगैरे मंडळी तुम्हीं कैद करून समागमें चालविली आहे; हे तुह्मांस कोणे ठिकाणीं कोणे वेळेस घालवितील याचा नेम कळावयाचा नाहीं. यासाठीं तुम्हीं श्रीमंतांस विनति करून सर्व मंडळी पुण्यास पोंचती करावी. ज्याचे त्याचे घरीं ठेऊन दरवाजावर चौकी पहारा ठेऊन आपापले घरीं राहतील. सरकारचे परवानगीशिवाय बाहेर जाऊं नये असें करणें मला चांगलें दिसतें. हे बरोबर असल्यानें जशी खिशांत आग बाळगावी तसें आहे. इतक्यावर सरकारांची मर्जी. मी मजकूर बोललों हा मजकूर श्रीमंताचे

१. मराठ्यांची बखर पान ९१.

कानांवर तुम्हीं घालावा. काय उत्तर होतें तें मला कळवावें.' हा मजकूर चिंतो विठ्ठल यांनीं राघोबादादांना कळविला. सखारामबापू याच्यावर राघोबादादांचा विश्वास. ते अशा प्रकारें आपला विश्वासघात करीत असतील याची कल्पना दादासाहेबांना बिलकुल आली नाहीं. त्यांनीं सखारामबापूंच्या सल्ल्याला मान दिला. सर्व मंडळींस पुण्यास बंदोबस्तानें नेण्याचें काम दादासाहेबानीं त्याच्यावरच सोंपविलें. त्याच्याजवळ हजार बाराशें स्वार घरचे होते. त्याशिवाय एक हजार स्वार व एक हजार गारदी निराळे सखारामबापू यांच्या स्वाधीन करून या सर्व कारस्थानी मंडळींस बापूंच्या ताब्यांत देऊन त्यांची राघोबादादांनीं पुण्यास रवानगी केली. या कृतीनें राघोबादादांनीं चोराच्या हातांतच जामदारखान्याच्या किल्ल्या दिल्या. त्या किल्ल्या घेऊन या कारस्थानी लोकांनीं विश्वासघातानें पेशव्यांचा खजिना लुटला. पेशव्यांचें राज्य गिळंकृत केलें.

३७. ही कारस्थानी मंडळी पुण्यास आल्यानंतर त्यांनीं आपला पुढील कार्यभाग साधण्याकरता एक बारा इसमाचें मंडळ स्थापन केलें. त्यांनीं जें कारस्थान केलें तें 'बारभाईचें कारस्थान' या नांवानें इतिहासप्रसिद्ध झालें. सखारामबापू, त्रिंबकरावमामा, नाना फडनविस, मोरोबा फडनविस, बजाबा पुरंदरे, आनंदराव जिवाजी, हरिपंत फडके, बाबूजी नाईक बारामतीकर, वगैरे प्रमुख बारा मंडळी या कारभारांत होती. प्रथम गंगाबाईस साताऱ्यास नेऊन छत्रपतीचें नांव पुढे करून त्यांच्या अंगत्वानें[1] कारस्थान करावे असा सखारामबापूंचा बेत होता. तसें झालें असतें तर 'आपले हस्तक हरिपंत फडके यास तुमच्या मसलतीच्या कामावर नेमून देऊन आपण स्वस्थ मेणवलीस राहूं' असें नाना ह्मणत होते. नानांनीं ही गोष्ट अंगाबाहेर टाकली असं पाहून तो विचार अर्थात् बदलावा लागला. दुसरी एक गोष्ट अशी विचारांत आली कीं, नगरच्या किल्ल्यावर सदोबा ( सदाशिवरावभाऊ ) आहेत, त्यांना आणून त्यांच्या नांवानें राज्यकारभार चालवावा. परंतु हीही मसलत अर्थात् सर्व बारभाईंना आवडली

१ अधिकारयोग पान ११

नाहीं. पुढें तोही बेत फिरून गंगाबाईस पुरंदर किल्ल्यांत नेऊन ठेऊन त्यांच्या नांवानें सखारामबापू व नाना फडनविस यांनीं अनुक्रमें मुख्य व दुय्यम कारभारी या नात्यानें पेशवाईचा कारभार चालवावा असा बेत ठरला. यावरून हें दिसून येईल कीं, नाना फडनविस साताराच्या महाराजांचें नांव अगर सदाशिवरावभाऊंचें नांव पुढें करण्याला सुद्धां तयार नव्हते. याचा अर्थ एवढाच कीं, त्यांना कुलअख्त्यारीनें पेशवाईचा कारभार करावयाला पाहिजे होता असेंच ठरतें. सखारामबापू हे केवळ नवीन कारस्थान रचण्यापुरतेच होते. नाना हेच या कारस्थानाचे मेरुमणी झाले होते.

३८. या बारा भाईनीं गंगाबाईना पुरंदरास नेण्याचे ठरविले, परंतु त्या गोष्टीला स्वत: गंगाबाई एकट्या तयार होईनात. पार्वतीबाई आल्या तरच त्या येणार होत्या. शिवाय एकट्या गंगाबाईंना वाड्यातून बाहेर काढणें हें बरें दिसेना. गंगाबाईंना असें वाटत होते कीं, आपण एकदां वाड्यांतून बाहेर निघाल्यावर, राघोबादादा व आनंदीबाई यांच्याशीं उघडपणें विरुद्ध झालों असें जगजाहीर होईल; व नंतर ते आपला राग करतील. तेव्हां नाना फडनविस यांच्या पक्षाकडून त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न सुरू झाला. नानांचें एक महा शस्त्र, पुरुषोत्तम दाजी पटवर्धन, हे दादासाहेबांच्या मोहिमेवर होते. तेव्हां त्याच्याकडून राघोबादादा व आनंदीबाई यांच्या वागणुकीसंबंधीं आपल्या नांवानें पत्रें मागवून त्या पत्रव्यवहाराच्या द्वारें गगाबाई व पार्वतीबाई यांचीं मनें या कार्याला प्रवृत्त होतील असा प्रयत्न त्यांनीं चालविला. या पत्रांतील माहितीच्या द्वारें या उभय स्त्रियांचीं मनें दादासाहेब व आनंदीबाइ यांच्याविषयीं निरनिराळ्या गोष्टी ऐकवून कलुषित करण्याचा प्रयत्न नानांनीं चालविला. या गोष्टी येथें देणें जरूर आहे. त्या गोष्टी बायकानांच सांगण्यासारख्या आहेत. कारण त्या वस्तुस्थितीला सोडून आहेत. बायकांना त्याच्या खरेखोटेपणाबद्दल कोठून कल्पना असणार! पुरुषोत्तम दाजी कशाला खोटें लिहितील या विश्वासावरच त्या जाणार! या

गोष्टी हरिवंशाच्या बखरींत दिल्या आहेत. या गोष्टी इ. स. १७७३ च्या सप्टेंबर महिन्यापासून १७७४ च्या मार्च महिन्यापर्यंत घडलेल्या आहेत. ह्मणजे नारायणराव यांचा मृत्यू झाल्यानंतर राघोबादादा निजामावर मोहिमेला गेल्या वेळेच्या आहेत तो काळ ह्मणजे मोहिमेवरून कारस्थानी मंडळी पुण्याला परत येईपर्यंतचा काळ होय. राघोबादादा मोहिमेवर सप्टेंबर महिन्याच्या २५ तारखेस निघाले होते.

३९. एके [1]दिवशी मकर संक्रमण आले. ते दिवशीं तिळगुळाचा समारंभ जाहला. सर्वांनीं सरकारास तिळशर्करा दिली. पुरुषोत्तमराव दाजी आनंदीबाईकडे तिळशर्करा द्यावयास गेले. तो आनंदीबाई बोलल्या जे. 'या पुरुषोत्तमराव,' असें ह्मणून बसावयास पाट दिला. यांनीं नमस्कार करून तिळशर्करा दिली. नंतर त्यांनीं रुप्याचे तबकात तिळशर्करा–सोनेरी वर्ख लावलेली व केशरी असा नाना प्रकारचा हलवा त्याचें तबक भरून आणून आपल्या हाताने तबक उचललें. तो दाजींनीं शेला पुढें पसरला. तो तबक शेल्यांत सारें ओतलें. आणि बोलल्या कीं, तिळशर्करा घेणे. नंतर यांनीं विड्याप्रमाणेंच विनंती केली आणि आपले लष्करात तिळशर्करा घेऊन आले. आणि सर्वांस सांगितलें जे. सरकारची तिळशर्करा आली. ही भक्षण करतां कीं काय? चांगली आहे. सोनेरी वर्ख लाविले आहेत. ज्यास मरावयाचें असेल त्यानें खावी! असें ह्मणून कुत्रीं लष्करांत होतीं त्यास आणून त्याजपुढें टाकिली. त्यांनी खातांच तत्काळ गरगर फिरून लागलींच मेलीं. हे सर्वांनीं पाहिले. नंतर सर्वांची खातरजमा जाहाले जे. दाजी सांगतात हें खरें.' या गोष्टीवरून आनंदीबाईंनी मोहिमेवर लोकांना विषप्रयोग करून मारण्याचा खाटिकखानाच उघडला होता असें वाटण्यासारखें आहे. जालीम विषाचा हलवा तयार करणारीं माणसें तो करतांनाच कशीं मेलीं नाहींत हीच आश्चर्याची गोष्ट आहे. शिवाय तिळगुळांत इतकें जालीम विष आहे हें पुरुषोत्तम दाजींना तो खाल्याशिवाय केवळ

---

१. हरिवंशाची बखर पान ४७.

वरूनच पाहून कसें खात्रीलायक समजलें ही एक अद्भुतरम्य गोष्ट आहे. त्यांनीं आपल्या लष्करांत येण्यापूर्वी कोणावर त्याचा प्रयोग करून पाहिल्याचें सांगितलें नाहीं. तसा प्रयोग केल्याची मुद्याची गोष्ट या गोष्टींत घुसडून देण्याचें ते विसरले असावें असें वाटतें.

४०. ' एके दिवशीं दरबारास दाजी गेले तों अस्तमान झाला तेव्हां आनंदीबाईनें सांगितलें कीं, पुरुषोत्तमराव आज येथेंच संध्या करणें. त्यांनीं ' आज्ञा ' ह्मणाले. तों सूचनेप्रमाणें शिष्यांनीं संध्येस मांडलें. पाय धुवावयास पाणी दिलें. हे पाय धुऊन आले. तों समयीजवळ येऊन पाट मांडून आनंदीबाई आपण जवळ बसली. तो त्यांनीं विनंति केली, कीं, ' महाराज माझे डोळ्यांस आजार आहे. डोळे फार दुखतात. त्यांस दिवा अगदीं सोसत नाहीं. यामुळें समयी जवळ कामाची नाहीं.' असें सांगून भांडीं आपणच घेऊन समयीपासून लांब गेले आणि तेथें जाऊन तोंडांत पाणी न घेतां ताम्रनपात्र भरलें. आणि पळी संध्येची वाजविली. या प्रमाणें करून निरोप घेऊन लष्करात आले. आणि सांगितलें कीं, आज बाईसाहेबांनीं संध्येस ठेऊन घेतलें. संध्या करून आलों. सर्वांनीं विचारलें कीं, आचमनाचें कसे केलें ? नंतर वर्तमान जाहलें तें सांगितलें. या प्रमाणें बाईसाहेब हर इलाज करीत. परंतु त्यांजवर ईश्वराची कृपा आणि श्रीमंतांचे पायाशीं निष्ठा ह्मणून सारीं विघ्नें टळत' या गोष्टीवरून संध्येच्या पाण्यात विष कालवून देणे ही एक अजब गोष्ट दिसून येते. शिवाय आनंदीबाईनीं हें विष कालवून देण्याचें काम शिष्याकडून ह्मणजे खटपट्या माणसाकडून सर्व नोकराना शिकवून ठेऊन त्यांना तरबेज केलें होतें असें या गोष्टीवरून ध्वनित होतें. शिवाय पदोपदीं लागणाऱ्या असल्या विषाचा संग्रहही त्या नोकराजवळ त्यांनीं करून ठेवला होता असेंही ठरतें. एकंदरींत आनंदीबाईचें घर ह्मणजे जहाल विषाचें एक कोठारच होतें अशी समजूत करून देण्याचा दाजीनीं या गोष्टीमुळें प्रयत्न केलेला दिसतो. शिवाय सदर गोष्टीच्या शेवटीं ' श्रीमंतांचे पायाशीं निष्ठा ह्मणून सारीं

विघ्नें टळत' यांतील अर्थ लक्षांत घेतला ह्मणजे 'श्रीमत' हा शब्दप्रयोग गंगाबाईबद्दल केला आहे असें दिसतें. कारण दुसरे दाजींच्या वतीनें श्रीमंत त्यावेळीं कोणी जिवंत नव्हते. सवाईमाधवराव त्यावेळीं जन्माला आले नव्हते. तेव्हां यावरून पुरुषोत्तम दाजी अशा गोष्टी गंगागाबाई यांचें मन वळविण्याकरतां व आनंदीबाई यांच्याविषयीं त्यांचें मन कलुषित करून त्यांना भीति उत्पन्न करण्याकरतां पुण्यास लिहित होते असें ठरतें.

४१. 'एके दिवशीं आनंदीबाईजवळ चार दुष्ट मिळून मसलत दिली कीं, पटवर्धन यांचा विश्वास धरितां नये. त्यांस हरतऱ्हा करून दगा करावा. प्रथम पुरुषोत्तमराव यांस मारावें, नंतर मग साऱ्यांचे कांहीं कठीण नाहीं. पुरुषोत्तमराव हे फार सावध. यास दगा करावा असें सांगून दादासाहेब यांसही मजकूर सांगून मसलत सिद्ध करविली. भोजनास बोलावून विषप्रयोग करावा तो पटवर्धन यानीं त्याचा बंदोबस्त पूर्वीच केला होता जे. आह्मीं कोंकणांत कुलदेवतेस जाण्याचा नवस केला होता तों सरकारचें पत्र आल्यावरून आलों. त्यास एक अडत केली आहे जे. दर्शन घेतल्याखेरीज कोठे भोजनास जावयाचें नाही. याप्रमाणें बोललों आहों. असें ह्मणून भोजनास जाण्याचा बंदोबस्त प्रथमच पुढील अंदेश मनांत आणून हें बोलून ठेविलें. त्यास भोजनास बोलवावयाचें राहिलें.' या गोष्टीनें राघोबादादा व आनंदीबाई हीं दोघेंही दगलबाज आहेत, विषप्रयोग करून मारणारीं आहेत, चार दुष्ट माणसें त्यांच्या भोंवतीं गोळा झालेलीं आहेत अशा प्रकारचा परिणाम गंगाबाईच्या मनावर होईल असा अर्थ या गोष्टींत ध्वनित केलेला आहे हें दिसून येईल.

४२. 'पुरुषोत्तमराव दाजी यांचा नेम सरकारचे विडे जरी आले तरी ते आपले गोटास आणून पुरून टाकावे. याप्रमाणें प्रत्यही नेम. एखादे वेळेस विडा खावा अशी त्यांनीं आज्ञा केली तरी दाजींनीं विनंती करावयाची जे. 'महाराज, आमचा सांप्रदाय सरकारचें काय जें येईल तें सर्वांस दिल्याखेरीज आह्मांस खातां नये. याप्रमाणें रामचंद्रपंत आपा यांजपासून चाल आहे. आमचे

मानकरी आहेत, त्यांस दिल्याखेरीज आह्मांला खातां नये. खाल्लें असें त्यांस समजल्यास ते प्रसंगास दगा करतील. त्यामुळें त्यांची मर्जी रक्षण करणें प्राप्त. असें सांगून तेथें विडे खाण्याचा बंदोबस्त केला.' विड्यांतूनही विष देण्याचा आनंदीबाईचा प्रयत्न चालू आहे असा यांत ध्वनि उत्पन्न केला आहे. अशा आणखीही गोष्टी आहेत. पण त्यांतील मुख्य सार हें आहे कीं, या साऱ्या गोष्टी त्या दोन तीन महिन्याच्या आंत घडल्या, कीं ज्यावेळीं गंगाबाईचें मन राघोबादादा व आनंदीबाई यांच्याविषयीं कलुषित करून तिला वाड्याबाहेर काढण्याचें काम चाललें होतें. ही गोष्ट साध्य झाल्यानंतर या विषप्रयोगाच्या गोष्टी एकदम बंद झाल्या. अर्थात् या गोष्टी गंगाबाईचें मन कलुषित करण्यापुरत्याच होत्या हें सिद्ध होतें. परंतु या सर्व गोष्टींवरूनही गंगाबाई यांचें मन वाडा सोडून सर्वस्वी कारस्थानी लोकांच्या हस्तगत व्हावयाला तयार होईना. ह्मणून पुढील एक नाटकी प्रयोग मोठ्या प्रमाणांत कारस्थानाच्या रंगभूमीवर आणण्यांत आला. त्या प्रकारामुळें गंगाबाई व पार्वतीबाई यांना वाडा सोडून कारस्थानी लोकांच्या छत्राखालीं जावें लागलें. पहिल्या प्रथम या कारस्थानी लोकांच्या मनांत पुण्याच्या वाड्यामधून फक्त गंगाबाईना एकटीलाच काढावें असें होतें. परंतु गंगाबाईच्या मनाला एकटें बाहेर पडणें प्रशस्त वाटेना. गंगाबाईच्या माहेरच्या मंडळीचाही विचार त्यांनीं एकटें बाहेर पडावें असा नव्हता. वाड्यांत वडील पार्वतीबाई आहेत, त्या जर पुरंदराला येत असतील, तर आपल्याला जाण्यास हरकत नाहीं अशा प्रकारें शेवटीं गंगाबाईचें मत पडलें असावें असें दिसतें. यावरून पार्वतीबाईनाही वाड्यांतून कसें बाहेर काढावें याबद्दल कारभाऱ्यांची मसलत सुरू झाली. पूर्वी एकट्या गंगाबाईवर पायखान्यांत मारेकरी घालण्याचा फार्स झाला होता. या पुढील कारस्थान या लोकांनीं पार्वतीबाई व गंगाबाई या उभयतांवर रचिलें आहे. यावरून हें कृत्य आनंदीबाई यांच्या प्रेरणेनें न होतां कारस्थानी लोकांनीं या दोघां बायांना वाड्यांतून बाहेर काढण्याकरतां या साऱ्या युक्त्या केल्या होत्या हें स्पष्ट होतें. या बाबतींत त्रिंबकरावमामा पेठे यांच्या बायकोनें आपल्या आईला पत्र लिहिलें आहे. ( त्रिंबकरावमामांची बायको वेणुबाई ही इचलकरंजीकर अनुबाई घोरपडे

यांची कन्या. पहिल्या बाजीराव पेशव्यांची अनुबाई ही सख्खी धाकटी बहीण होती ) हें पत्र वेणुबाईनें आपल्या आईला फेब्रुवारी सन १७७४ मध्यें पुण्याहून लिहिलें आहे. " राजेश्री सखारामबापू व नाना फडनविस व राजेश्री हरिपंत फडके पुरंदरास आहेत. पुण्यांत राजेश्री नारो आपाजी पुरंदराहून आज्ञा येते, त्याप्रमाणें कारभार करितात. सरकारच्या वाड्यांतून देखील वस्तभाव कोठींतील जिन्नस समेत पुरंदरास नेला. जव्हाहीरखाना सिंहगडास नेला. इतकें व्हावयास कारण काय ह्मणाल तरी मुख्यत्वें करून सौ० पार्वतीबाई व गंगाबाई यांस मारून टाकावें असे मारेकरी सांपडले. त्यांनीं नांवेंही सौ० आनंदीबाई व * यांचीं घेतली. हा प्रकार कळल्यापूर्वी वाड्याच्या बंदोबस्ताकरितां ( आलें ) ह्मणून सांगत होते. मागें जाहल्या कार्याचा सूड घ्यावा हें कारभारी यांच्या अंतर्यामीं होतेंच. इतक्यांत हेही निमित्य या गोष्टीस अनुकूल झालें. राजेश्री सखारामपंतबापू व नाना फडनविस व हरिपंत फडके इतक्यांनीं उभारणी करून दोन अडीच हजार राबतांनिशीं राहून मुल्की बंदोबस्त करितात. गंगाबाईच्या नांवाच्या सनदा, पत्रें व नारायणराव यांच्या नांवाचे शिक्के करतात. चहुंकडे फौजांसही बोलावणी गेलीं आहेत. पुण्यांतील अवध्या सावकारांस बोलावून नेलें होतें. त्यांस ( कारभारी यांनीं ) धीर भरंवसा दिला. त्यांनीं सखारामबापूचे नांवचीं खतें घ्यावीं, व लागेल तितका पैका द्यावा असें कबूल केलें. कारभाऱ्यांनीं सर्वस्व आपल्या भरीस घालावें, पण दादासाहेबांचें पुरतें पारिपत्य करावें असें चित्तावर धरलें आहे. "

४३. हें पत्र त्रिंबकरावमामा यांच्या बायकोनें लिहिलें आहे. त्रिंबकरावमामा हे बारा भाईपैकी एक भाई होते. त्यांच्या बायकोनें लिहिलेलें पत्र म्हणजे तें विश्वसनीय माहितीचें पत्र आहे यांत संशय नाहीं. शिवाय तिनें आपल्या आईला लिहिलें आहे, तेव्हां या पत्रामागें कांहीं कृष्ण कारस्थान होतें असेंही ह्मणावयास जागा नाहीं. दुसरें एक कारण ह्मणजे सदर पत्रांतील एकच

* ही जागा अस्सल पत्रांत कसरीनें खाल्ली आहे. त्या ठिकाणी दादासाहेब असें नांव असावें.

पान पटवर्धनांच्या दप्तरांत सांपडतें हें एक नवल आहे. पुण्याहून इचलकरंजीला लिहिलेलें पत्र मिरजेच्या दप्तरांत कां यावें ? अर्थात् हें पटवर्धन यांच्या हेरांकडून पकडलें जाऊन तें त्या दप्तरांत राहिलें असें मानण्यास हरकत नाहीं. पटवर्धन हे कारस्थानी मंडळींपैकीं एक होते. तेव्हां त्यांच्या कारस्थानाच्या बातम्या बाहेर न फुटाव्या या दृष्टीनें त्यांनीं हें पत्र जप्त केलें असावें असें दिसतें. या पत्रावरून अगदीं स्पष्ट असा बोध होतो कीं, कारस्थानी लोकांनीं आपलें सर्वस्व खर्च करून राघोबादादांना पदच्युत करण्याचा संकल्प केला होता. त्या संकल्पाला गंगाबाई पुण्यांत राहिल्यानें खरा जोर येणार नव्हता. त्यांना पुण्यांतच वाड्यांत कैदेंत ठेवल्याप्रमाणें ठेवतां येण्यासारखें नव्हतें. शिवाय त्या पुण्यांत राहिल्यानें त्यांना कोणी फंद देतील ही भीति. तेव्हां त्यांच्याकडून राघोबादादांच्या विरुद्ध एकदां कारस्थान करावयाला लावलें, म्हणजे त्यांना या बारभाईशिवाय सत ना गत असें होईल. याकरतां त्यांना वाड्याबाहेर काढण्याच्या त्यांच्या पराकाष्ठेच्या युक्त्या चालल्या होत्या. गंगाबाई ही पार्वतीबाईखेरीज वाड्याबाहेर निघावयाला तयार नव्हती. तेव्हां पार्वतीबाईंच्याही मनांत मृत्यूची भीति उत्पन्न केल्याशिवाय त्या बाहेर पडणार नाहींत, म्हणून त्यांना ती भीति उत्पन्न करण्याकरतां कारस्थानी लोकांनीं उभय स्त्रियांवर मारेकरी घातल्याचा नाटकी फार्स केला. सदर पत्रांत "मुख्यत्वें करून सौ. पार्वतीबाई व गंगाबाई यांस मारून टाकावें असे मारेकरी सांपडले. त्यांनीं नांवेंही आनंदीबाई ( व दादासाहेब ) यांची घेतली." यावरून दोघी स्त्रियांना मारून टाकण्याचा आनंदीबाई व दादासाहेब यांचा कट दाखविला म्हणजे त्या बाहेर पडतील, या हेतूनेंच ही नाटकाची बतावणी कारस्थानी लोकांनीं केली होती. यावेळीं गंगाबाईंवर तिच्या गर्भाचा नाश करण्याच्या बुद्धीनें मारेकरी घातलें होते असें म्हणणें एका दृष्टीनें व्यवहार्य ठरलें असतें. परंतु पार्वतीबाईवर ते कां घालण्यांत आले व ते अगदी ऐनवेळीं म्हणजे पुरंदरास गंगाबाईंची उचलबांगडी करण्याचेच वेळेस कां घातले याचेंही कारण स्पष्ट आहे. पार्वतीबाई या कांहीं गरोदर नव्हत्या. त्यांना मुलगा होऊन तो पेशव्यांच्या राज्याचा वांटेकरी होईल अशी आनंदीबाईंना भीति

वाटण्याचें कारण नव्हतें. त्या कदाचित् दत्तक घेऊन पेशव्यांच्या गादीला प्रतिस्पर्धी निर्माण करतील असाही त्यावेळीं संभव नव्हता. दुसरें त्या वाड्यांत पार्वतीबाईप्रमाणें त्यांची दुसरी जाऊ सगुणाबाई या होत्या. तिलाही दत्तक घेतां आलें असतें. मग तिला कां मारेकरी घातले नाहींत? एकंदरींत विचार करतां पार्वतीबाई वडील ह्मणून तिला बाहेर काढलें, ह्मणजे तिच्या बरोबर आपण बाहेर पडल्यास आपण जबाबदार राहणार नाहीं असेंच धोरण गंगाबाईनीं ठेवल्यामुळें ती गोष्ट घडवून आणण्याकरतां पार्वतीबाईवरही मारेकरी घालण्याचा फार्स दाखविण्यांत आला हें उघड आहे. येथें आणखी एक गोष्ट नमूद करणें इष्ट आहे. कारस्थानी लोकांच्या मनांत गंगाबाईचा गर्भ वांचवावा एवढाच जर त्यांचा हेतू असता, तर त्यांना केवळ गंगाबाईना बाहेर काढून परशुरामभाऊंच्या मताप्रमाणें एकाद्या अज्ञात अशा ठिकाणीं त्यांना नेऊन ठेवल्यामुळें त्यांच्या गर्भाचें सहज रक्षण झालें असतें. परंतु त्यांनीं तसें केलें नाहीं. सर्व जवाहीरखाना, खजिना त्यांनीं सिंहगडावर पाठविला व गंगाबाईच्या नांवानें सनदा पत्रें देऊं लागले वगैरे त्यांनीं जें कारस्थान या वेळीं केलें त्यावरून कारस्थानी लोकांचा हेतू स्पष्ट होतो. दादासाहेबांना पदच्युत करून पेशव्यांचें राज्य बारा भाईना गिळंकृत करावयाचें होतें हें त्यांचें साध्य ठरतें व गंगाबाईचा गर्भ वांचविण्याचा त्यांचा उद्देश व त्याकरतां केलेली खटपट हें निःसंशय त्याचें साधन ठरतें.

४४. अशा प्रकारें या कारस्थानी सोनेरी टोळीनें निरनिराळे कट व निरनिराळीं कारस्थानें निर्माण करून पेशव्यांच्या घरांतील पवित्र व कुलशील स्त्रियांना तारीख ३० जानेवारी सन १७७४ रोजीं शनिवारवाड्यांतून बाहेर काढलें. सखारामबापू व नाना फडनविस यांच्या हुकमानें नारो आपाजी तुळशीबागवाले यांनीं पुण्याच्या कोतवालास कैद करून शहर ताब्यांत घेतलें व सखारामबापू व नाना यांनीं शनिवारवाड्यांत घुसून सौ. पार्वतीबाई, गंगाबाई, सगुणाबाई व दुर्गाबाई अशा स्त्रियांना आपल्या देखत गर्दी करून बाहेर काढलें व त्यांना पुरंदर किल्ल्यावर बंदोबस्तानें पाठविलें.

पुरंदर किल्ल्यावर ही मंडळी कैद्यांप्रमाणेंच होती. मुत्सद्यांच्या विश्वासाच्या माणसांव्यतिरिक्त त्या ठिकाणीं दुसऱ्या कोणाचाही शिरकाव होण्याचा संभव नव्हता. गंगाबाई हातीं आल्यानें पुढील कारस्थानाला जोर आला. मारेकऱ्यांच्या योजनेनें गंगाबाई गर्भाच्या व स्वतःच्या नाशाच्या कल्पनेनें घाबरून आत्मरक्षणार्थ मुत्सद्यांच्या आधीन झाली. हा कारस्थानी लोकांचा पहिला विजय झाला. शिवाय राघोबादादा व आनंदीबाई यांच्या निंद्य व क्रूर कृतीबद्दल सर्व लोकांचीं मनें प्रक्षुब्ध झालीं. नारायणरावांचा खून केला तो केला, आणि आतां सौ. पार्वतीबाई व गंगाबाई यांचाही खून करण्याचा ते प्रयत्न करीत आहेत या बातमीमुळें त्यांच्याबद्दल लोकांत द्वेष उत्पन्न झाला. कारभारी मंडळी अशा संकटांतून गर्भवती स्त्रीचा जिवावर उदार होऊन बचाव करीत आहेत ह्मणून त्यांच्याबद्दल लोकांच्या मनांत आदर व सहानुभूतीही पण उत्पन्न झाली. परंतु ' अंदरकी बात राम जाने. ' कसेंही असो ! परशुरामभाऊंनीं आपल्या तारीख ११ अक्टोबर सन १७७३ इ. च्या पत्रांत दर्शविल्याप्रमाणें पुढें ही मारेकरी यांची योजना झाली. अर्थात कारस्थानी लोकांच्या शिरस्त्याप्रमाणें पुढें होणाऱ्या गोष्टींची अगोदर हुल्लड उठवून नंतर ती गोष्ट खरी ठरविण्याकरतां पुरावा निर्माण करावयाचा ही गोष्ट मारेकरी यांच्या योजनेवरून दिसून येईल. याप्रमाणें नानांच्या कारस्थानांतील राघोबादादांना बाहेर घालवून आपला पक्ष म्हणजे राजपक्ष हा कायम ठेवण्याचा त्यांचा जो हेतू होता व जो त्यांना नारायणरावांचा खून करून साधावयाचा होता, तो त्यांनीं अशा प्रकारें साधून घेतला.

४५. बारा भाईंनी सौ. पार्वतीबाई व गंगाबाई यांना तारीख ३० जानेवारी रोजीं वाड्यांतून बाहेर काढलें. संक्रांत ही सर्व साधारणतः जानेवारी महिन्याच्या तेरा चौदा तारखेला येते. अर्थात् पुरुषोत्तम दाजींच्या ह्मणण्याप्रमाणें त्यांना संक्रांतीच्या दिवशीं आनंदीबाईंनीं जालीम विष घालून जी तिळशर्करा दिली ती याच एखाद्या तारखेच्या दिवशी दिली असली पाहिजे यांत संशय नाहीं. ही बातमी पुण्याला येऊन त्यानंतर गंगाबाई व पार्वतीबाई यांना ती समजलेली आहे. अर्थात् या विषप्रयोगाच्या घडामोडी व मारेकऱ्यांच्या

बतावण्या ज्या झाल्या, त्या गंगाबाईंना वाड्यांतून काढण्याच्या पूर्वीं केवळ दहा–पंधरा दिवसांच्या आंत घडल्या असेंच ठरतें. यावरून गंगाबाईसारख्या चौदा वर्षांच्या अज्ञान मुलीला व सदाशिवराभाऊ यांच्या दुःखामुळें व्याकूळ असलेल्या पार्वतीबाईंना वाड्यांतून काढून नेण्यापूर्वीं दहा–बारा दिवस कसकशा बातम्या देऊन व कसकसे भलभलते प्रयोग करून बारभाई भीतीनें गांगरून सोडीत होते हें निराळें सांगण्याचें आतां कारण उरलें नाहीं. यावरून आनंदीबाई व राघोबादादा यांच्यावर विषप्रयोग करणें, गर्भनाशाचा प्रयत्न करणें, किंवा मारेकरी घालून गंगाबाई व पार्वतीबाई यांचा खून करण्याचा प्रयत्न करणें वगैरे निर्माण केलेल्या गोष्टी गंगाबाईला घराबाहेर काढण्यापुरत्याच नाटकी व खोट्या रचिल्या होत्या, त्यांत आनंदीबाई किंवा राघोबादादा यांचा कोणताच संबंध नव्हता, हें स्पष्ट दिसून येईल.

४६. हें बारा भाईंचें कारस्थान मूळपासून नानांचें होतें. त्याचे उत्पादक, त्याचे खरे भोक्ते व त्याचे आधारस्तंभ नानाच होते. परंतु या कारस्थानामध्यें सखारामबापूंचें नांव पुढें केलें होतें. याचें कारण नानाइतके बापू हे कानफाटे नव्हते हें होय. लोकांना नानांचा विश्वास नव्हता. त्यांना बापूंचा विश्वास वाटत होता. एवढ्याकरतां बापूंना पुढें करून नाना आपला कार्यभाग साधून घेत होते. बारा भाईंचें कारस्थान सुरू झालें त्यावेळीं, 'अवघ्या सावकारांस बलावून नेलें होतें. त्यांस धीर भरंवसा दिला. त्यांनीं सखारामबापूंचे नांवचीं खतें घ्यावीं व लागेल तितका पैका द्यावा असें कबूल ' केलें.' या वेणुबाईंच्या मागील पत्राप्रमाणें सावकारांचा बापूवर विश्वास होता, नानांवर विश्वास नव्हता, हें नक्की होतें. सखारामबापूंना पुढाकार दिल्याचें जें दाखविण्यांत आलें, त्याचा हेतु हाच होता. पुढें बारा भाईंचें कारस्थान आटोक्यांत आलेलें दिसल्यानंतर नानांनीं सखारामबापूंवर कशी कुरघोडी केली हें पुढें क्रमाक्रमानें दिसून येईलच.

४७. दादासाहेब मोहिमेवर राहिले. सखारामबापू आपल्या विश्वासाचे कारभारी ह्मणून त्यांनीं कारस्थानी लोकांना त्यांच्या संरक्षणाखालीं व त्यांच्या

---

१. ऐ. ले. सं. पान २११५.

सांगण्याप्रमाणें त्यांच्या स्वाधीन करून त्यांची रवानगी पुण्यास केली. सखाराम-बापू हे विश्वासघात करून आपला गळा कांपतील असें दादासाहेबांना बिलकुल वाटलें नाहीं. ते त्यांच्यावर विश्वास ठेऊन मोहिमेवरील आपलें व पेशव्यांच्या राज्याचें कर्तव्य बजावण्यांत एकचित्त होते. आपल्यामागें पुण्याला हे कारस्थानी लोक 'चोरांस मलिदा व धन्यास धत्तुरा' असें कारस्थान रचतील याची गंधवार्ताही त्यांना नव्हती. दादासाहेब सरळ व्यवहाराचे असल्यानें त्यांना कपट, विश्वासघात, असत्य, निंदा, लबाडी याचें बिलकुल वारेंहि नव्हतें. उलट बारा भाई हे या सर्व गोष्टींत निढावलेल्या दरवडेखोराप्रमाणें प्रवीण होते. त्यामुळें पुण्यांतील राज्यक्रांतीची ह्मणजे गंगाबाईंना तारीख ३० जानेवारी सन १७७४ रोजीं पुरंदरावर पळवून नेऊन त्यांच्या नांवानें पेशव्यांचें राज्य सुरू केलें याची, दादासाहेबांना तिळमात्र कल्पना नव्हती. त्यांनीं मोहिमेवरून तारीख ५ माहे फेब्रुवारी सन १७७४ रोजीं स्वतःच्या हस्ताक्षरानें सखाराम-बापूंना पुण्यास पत्र पाठविलें आहे [1] तें खालीलप्रमाणें आहे.

४८. 'राजश्री सखाराम भगवंत यांस विनंती उपरी. बहुत दिवस तुह्मां-कडून पत्र न आलें. वर्तमान कळलें नाहीं. तरी ऐसे न करणें. आपले शरीराचे व मनसुब्याचे प्रकार आढळतील सुचतील ते लिहित जावे. सांप्रत बहुत दिवस घरीं आहां; औषध उपाय करून आरोग्य जाहालाच असाल. यास्तव लौकर दिवस चांगला पाहून येणें. तुह्मी मातबर शहाणे जवळ असावे हे आमचे मानस; व तुह्मांसही उचित. तरी लौकर यावें. सविस्तर अर्थ येविषयींचे रा० विष्णु नरहर यांचे जबानी कळतील. जाणिजे. छ. २४ जिल्काद. बहुत काय लिहिणें हे विनंती.'

४९. या पत्रांतील मजकूर वाचल्यानंतर अशी खात्री होईल कीं तारीख ५ फेब्रुवारीपर्यंत दादासाहेबांना पुण्याच्या कारस्थानाची कोणतीच वार्ता नव्हती व दादासाहेबांचा बापूंवर पूर्ण विश्वास होता. असें असतां अशा शूर व निष्पाप दादासाहेबांचा सखारामबापूंनीं केंसानें गळा कापून विश्वासघात केला.

---

1. पेशवे दप्तर भाग ५ पान ६.

# प्रकरण १५ वें.

# बारभाईंच्या कारस्थानाचा उदय.

## इ० स० १७७४

१. बारभाईनीं राघोबादादांना पदच्युत करून पुरंदरास गंगाबाईंच्या नांवानें राज्यकारभार चालविला. बारभाईंनीं गर्भवाशी श्रीमंत सवाईमाधवराव यांच्या नांवाचे शिक्के केले. साताऱ्याच्या छत्रपतीकडून त्यानी वस्त्रें आणलीं.—२. बारभाईच्या तावडींत छत्रपती पुनः जास्त सापडूं नयेत ह्मणून त्यांस त्यांच्या मंत्रिमंडळानें साताऱ्याच्या किल्ल्यात बंदोबस्तानें ठेवले. मोहिमेवरून राघोबादादांचें साताऱ्यास नागोजी शिंदे यांस पत्र.—३. बारभाईंनी राघोबादादाच्या पक्षातील सरदाराचा व त्याच्या लोकाच्या मालमत्तेचा वगैरे कसा धुव्वा उडविला याची माहिती.—४. राघोबादादा पुढील मोहिमेचे काम मोडून परत फिरतात. बारभाईंच्या प्रेरणेनें राघोबादादांच्या सैन्यात फितूर. फितुरी सरदार राघोबादादांना विश्वरूप दाखविण्याचा प्रयत्न करतात, पण तो फसतो.—५. राघोबादादांच्या सैन्यांतील फितुरी सरदार पुण्यास येऊन दाखल होऊं लागले.—६. राघोबादादांचा व हैदरचा स्नेहभावाचा नवीन तह.—७. राघोबादादा आपल्या सैन्यातील फितूर मोडतात. ते पुण्याच्या रोखानें परत येऊं लागल्यामुळे बारभाईंच्या सरदाराची तारांबळ. त्रिंबकरावमामा, साबाजी भोसले व निजाम राघोबादादाबरोबर सामना देण्याकरता येतात. कासेगावची लढाई. त्रिंबकरावमामाचा मृत्यु.—८. राघोबादादानी कांसेगावची लढाई जिंकल्यामुळे भोसले, पटवर्धन आदिकरून सरदार याचे धाबे दणाणले. त्रिंबकरावमामाच्या मृत्युमुळे नाना फडनविसांच्या तोंडचे पाणी पळाले.—९. कासेगांवच्या लढाईमुळे नाना फडनविसांची स्थिति कशी झाली होती याची माहिती.—१०. पेशवाई गिळंकृत करण्याच्या प्रयत्नात बारभाई आहेत असें राघोबादादांना स्पष्ट दिसून येतें.—११. राघोबादादांची परमेश्वरावर अढळ निष्ठा. पंढरपूरची महासंतीण बडीबया हिची राघोबादादांस कांसेगांवच्या लढाईत झालेली मदत.—१२ पवित्र लोकांनाच साधुसंतांचे कसें अधिष्ठान मिळतें.—१३. त्रिंबकरावमामाच्या मृत्युसंबंधीं राघोबादादा व आनंदीबाई यांच्याविषयीं बारभाईंनीं विपरीत वार्ता

पसरविण्याचा केलेला प्रयत्न.—१४ त्रिंबकरावमामाबद्दल बारभाईनीं पसरविलेली विपरीत वार्ता कशी खोटी होती —१५. कांसेगांवच्या लढाईपासून राजशाही कीं लोकशाही या वादास प्रत्यक्ष प्रारंभ झाला.—१६ राघोबादादांनीं पंढरपुरास आपल्या सैन्याची नवीन जुळवाजुळव केली व ते पुण्याचे रोंखानें निघाले. —१७. भोंसले व निजाम याची वाट न पहाता त्रिंबकरावमामांनीं राघोबादादाबरोबर कासेगांवची लढाई तातडीनें का दिली, यांचे खरें कारण.—१८. पुरंदरास गंगाबाईच्या प्रसूतीकडे सर्वांचे डोळे का लागले होते.—१९. पुरंदरीं सखारामबापू व नाना फडनविस यांचे आपापल्या धोरणाप्रमाणे निरनिराळे प्रयत्न —२०. गंगाबाईस मुलगाच झाला पाहिजे असा नाना फडनविसांचा तोडगा —२१. गंगाबाईच्या प्रसूतीकालाची नानानी केलेली पूर्वतयारी. सखारामबापू व नाना फडनविस यांच्या मुत्सद्दी धोरणाची रूपरेषा.—२२. गंगाबाई प्रसूत होण्याचे अगोदर राघोबादादानीं मराठी राज्याच्या रक्षणाच्या दृष्टीनें स्वतः नमतें घेऊन बारभाईबरोबर चालविलेला समेटाचा प्रयत्न.—२३. श्रीमंत सवाईमाधवराव यांचा जन्म.

१. मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें बारा भाईनीं गंगाबाईंना पुरंदर किल्ल्यांत नेऊन ठेऊन त्यांच्या नावानें पेशवाईचा कारभार चालविला. सखारामबापू व नाना फडनविस हे साताऱ्यास महाराजांकडे गेले. त्यांनीं महाराजांवर आपला अधिकार गाजविला; आणि त्यांच्या मनाविरुद्ध त्यांनीं राघोबादादा यांना पदच्युत करवून गंगाबाईच्या नांवानें पेशवाईचीं वस्त्रें घेतलीं व आपणां उभयतांकरतांही कारभाऱ्याचीं वस्त्रें घेतलीं. साताऱ्याच्या महाराजांना आतां स्वतःची इच्छा राहिलेली नव्हती. ते यावेळीं बारा भाईच्या कैदेंतच होते. तेव्हां आपणास जें पाहिजे तें त्यांच्याकडून ते बारा भाई जबरदस्तीनें करवून घेत होते. बारा भाईनीं साताऱ्याहून वस्त्रें आणून गंगाबाईच्या नांवानें राज्यकारभार चालविला. पण त्यांत एक मोठी मजा त्यांनीं केली. गंगाबाईंना पुढें पुत्रच झाला पाहिजे या भविष्यावर "गर्भवासी[1] श्रीमंत सवाई माधवराव" या नांवाचे शिक्के करून राज्यकारभार चालविला. यावरून गर्भवती गंगाबाईंना मुलगाच होणार,

---

१ जिवबादादा बक्षी याचें चरित्र पा. ७८. महादजी शिंदे याचें चरित्र, नातूकृत पान ११८.

तेव्हां त्याचें नांव अगोदरच ठेऊन त्याच्या नावाचे शिक्के करून बारा भाईंनीं राज्यकारभार चालविला. यावेळीं बारा भाईंचें सामर्थ्य ब्रह्मदेवापेक्षांही वरचढ झालें होतें असें समजण्यास हरकत नाहीं. बारा भाईंचें कारस्थान जसें अद्भुत तसाच त्यांचा कारभारही अद्भुत होता. गंगाबाईच्या पोटांत चार पांच महिन्याचा गर्भ असतांनाच गर्भाचें 'सवाईमाधवराव' असें नामकरण करून त्यांनीं शिक्के केले व राज्यकारभार चालविला. अर्थात् तोही तसाच अद्भुतरम्य असला पाहिजे यांत नवल नाहीं.

२. बारा भाईंनीं सातारच्या महाराजांवर जबरदस्ती करून त्यांच्याकडून गंगाबाईंच्या नांवानें वस्त्रें नेलीं. यामुळें तेथील त्याच्या मंत्रिमंडळाला वाईट वाटलें. हे बारा भाई आणखी काय काय गोष्टी महाराजांच्या हातून करवून घेणार आहेत याची त्यांना भीति पडली. ह्मणून त्यांनीं महाराजांना ताबडतोब साताऱ्याहून काढून किल्ल्यांत नेऊन बंदोबस्तानें ठेवलें, आणि त्याप्रमाणें त्यांनीं मोहिमेवर दादासाहेबांना कळविलें. त्याचें उत्तर दादासाहेबांनीं तारीख १० फेब्रुवारी सन १७७४ चें राजश्री नागोजी शिंदे यांना पाठविलें. 'पुण्यांतील[1] वगैरे कितेकांनीं फितुर करून बदरहा वर्तणुक करूं लागले, हें जाणून राजश्री (सातारचे महाराज) त्याचे हातीं न चढावे या अर्थे तुह्मीं सातारयाचे किल्ल्यावरी राजश्रींस नेऊन ठेविलें. बंदोबस्त येथील मर्जीस येईसारखा केलात ह्मणून ऐकिल्यांत आलें. तेण्हेंकरून तुह्मांवर मर्जी बहुतच संतोष जहाली असे. फार उत्तम केलें. हरामखोर आपले ढंगास प्रवर्तले. तशा समयांत दूर देशीं मनांत आणून खावंद चाकरीवर द्रुष्ट (दृष्टि) देऊन मनसुब्याची गोष्ट केलीत. शाबास, तुमची तारीफ पत्रीं काये लिहावी. या उपरही बहुत सावध रहाणें, तुह्मांकडे ते पैगाम तऱ्हेतऱ्हेनें लावतील. ते तुह्मीं चित्तांत आणणार नाहीं हे खातरजमाच आहे. तथापि सूचना लिहिली आहे. तरी राजश्रींस किल्ल्यावरच ठेऊन फितवेखोराचे हातीं न लागत ते गोष्ट करणें. खासा स्वारीही माघारी फिरली. दरमजल येऊन पोंचत आहे. तोंपावेतों तुह्मीं सावधगिरीनें राहून,

१ पेशवे दप्तर भाग ५ पान १५.

हुत बंदोबस्त करणें. ये विषयींचे बंदोबस्तास हुजुरून रा।। रामचंद्र नारायणही यांच रवाना केले आहेत. तें पावलेच असतील. ते व तुह्मी येक विचारें बंदोबस्त करणें. जाणिजे.' याप्रमाणें दादासाहेबांनीं नागोजी शिंदे यांना पत्र पाठविलें. परंतु तें त्यांना पोंचलें किंवा नाहीं याबद्दल शंकाच आहे. कारण सदर पत्र पेशव्यांच्या दप्तरांत सांपडलें आहे. खरें पाहूं जातां तें साताऱ्च्या दप्तरांत पाहिजे होतें. तें ज्या अर्थी पेशव्यांच्या दप्तरांत आलें त्या अर्थी तें बारभाईंच्या लोकांनीं मध्येंच पकडलें असावें असें दिसतें.

३. बारभाईंनीं गंगाबाईंच्या नांवानें राज्यकारभार चालविल्यानंतर दादासाहेबांच्या लष्करांत जे लोक होते त्यांनीं दादासाहेबांना सोडून परत यावें ह्मणून त्याच्या घरीं चौक्या बसविल्या. दादासाहेबांच्या पक्षाचे जेवढे लोक होते त्यांची सर्व मालमत्ता त्यांनीं जप्त केली. त्यांचीं बायकामुलें यांनीं कैदेंत टाकलीं. त्याचप्रमाणें दादासाहेबांच्या वतींचीं माणसें पेशव्यांच्या राज्यांत जेथें जेथें होतीं त्या त्या ठिकाणच्या कमावीसदाराना याद्या पाठवून त्यांची मालमत्ता जप्त करण्याबद्दल व बायका पोरें कैद करण्याबद्दल हुकूम पाठविले. त्याचप्रमाणें शिंदे, होळकर, फत्तेसिंग गायकवाड वगैरे आपल्या पक्षांतील लोकांना पत्रें व कारकून पाठवून आपल्या पुण्याच्या बारभाईंच्या कारस्थानाची त्यांना माहिती कळविली. रुकनुद्दौलाचा माधवराव पेशव्यांशीं स्नेह होता. त्याच्या द्वारें बापू व नाना यांनीं निजामअल्लीस कांहीं जहागीर देऊन आपल्या पक्षाला अनुकूल करून घेतलें. साबाजी भोंसले हा नानांच्याच पक्षाचा होता. आता त्रिंबकरावमामा, रास्ते व बाबूजी नाईक हे सर्व एक झाले. त्यामुळें रघोजी भोंसल्यांचें 'सेनासाहेब सुभ्याचें' पद काढून घेऊन तें साबाजीला दिलें. त्यांच्याजवळ यावेळीं वीस हजार फौज झाली. त्याशिवाय हरिपंत फडके पुण्यास फौजेंत जास्त लोक ठेवीतच होते.

४. या बातम्या दादासाहेबांना समजतांच ते कर्नाटकाची मोहीम सोडून पुण्याकडे येण्याकरतां माघारें फिरले. त्यांच्या लष्करांत नानांचा हस्तक कृष्णराव काळे हा होता. त्यानें बारभाईंच्या संकेताप्रमाणें फितूर

करून दादासाहेबांच्या लष्करांत पोंखरून ठेवलें होतें, याचा या वेळेपर्यंत दादासाहेबांना पत्ता नव्हता. पण हैदरअल्लीकडून 'तुमच्या लष्करांत फितूर झाला आहे' अशी धोक्याची सूचना दादासाहेबांना आली होती. दादासाहेबांना आतां त्याप्रमाणें सर्व अनुभवाला येऊं लागलें होतें. भवानराव प्रतिनिधीबद्दल त्यांना पहिल्यानें फार संशय आला. हयग्रीव नदीच्या तीरीं रायदुर्ग तालुक्यांत कनेकल ह्मणून गांव आहे, तेथें लष्कराचा तळ पडला असतां, दादासाहेबांनीं भवानरावाला हुकूम केला कीं, तुह्मीं आतांच्या आता, तुमच्या फौजेस निरोप द्यावा. तसे करणे बारभाईंच्या कारस्थानाला धोक्याचें असल्यामुळे भवानरावाने ते नाकबूल केले. तेव्हां दादासाहेबांस राग आला व त्यानी मुरारराव घोरपडे यांस भवानरावावर हल्ला करून त्याचा गोट लुटण्याचा हुकूम केला. मुरारराव हाही बारभाईंना फितूर झाला होता. त्यामुळे त्यानें उत्तर दिलें कीं, 'आमच्या पेशवाईचा कोण शत्रू असेल, त्याचें पारिपत्य मी हौसेनें करीन; पण हा घरगुती खटला! यांत आपण पडणार नाहीं.' इतर सरदारांना या प्रमाणेंच दादासाहेबांनीं हुकुम केला, परंतु त्यानींही याचप्रमाणे त्यांना जबाब दिला. हे सरदारही मुराररावाप्रमाणें फितूर झालेच होते. या मोहिमेवरच सर्व सरदारांनीं मिळून दादासाहेबांना धोक्याचें 'विश्वरूप' दाखवावे, असा त्यांचा कट चालला होता. परंतु त्यापूर्वीं ही हकीकत दादासाहेबांना समजल्यामुळ तेथेंच त्यांना 'विश्वरूप' दाखविण्याचा त्यांचा प्रयत्न फसला. आपल्या लष्करांत सर्वत्र फितूर झाला आहे असें त्याना दिसून आल्यामुळें त्यांनीं त्या दृष्टीनें आपल्या फौजेची रचना चालविली. त्यांनीं आपली हुजुरात व गारद्यांच्या पलटणी भवानरावांच्या गोटाभोंवतीं जागोजाग उभ्या केल्या. लष्करांत पांच सहा दिवस याप्रमाणे गडबड चालली होती. भवानरावांबरोबर समेट करण्याकरता दादासाहेबांनीं मध्यस्थही पाठविले होते; परंतु कांही केल्या ते वठणीवर येईनात. शेवटीं एके रात्रीं त्यांनीं प्रतिनिधींचा गोट लुटण्याकरतां व त्याला कैद करण्याकरतां आपल्या हुजुरातीला हुकूम केला, आणि आपले गारदीही या कामावर पाठविले. परंतु प्रतिनिधाच्या स्वारांनी शपथ वाहिली कीं, आह्मीं मरून जाऊं पण आमच्या धन्याच्या केसालाही धक्का लागूं

देणार नाहीं. भवानरावानेंही प्रतिज्ञा केली कीं, प्राण गेला तरी बेहेत्तर, पण दादासाहेबांस शरण जाणार नाहीं. त्यानें आपल्या बायकोला आपल्या घोड्यावर बांधून घेऊन दादासाहेबांच्या चढाईला सामना देण्याची तयारी केली होती. ही वार्ता दादासाहेबांना समजताच आतां भवानरावाची जास्त परीक्षा पहाणें ठीक नाहीं, असें पाहून त्यांनीं हुजुरात व गारदी यांना परत बोलाविलें. नंतर दादासाहेबांनीं मध्यस्थांच्या करवीं भवानरावांना सांगून पाठविलें कीं, तुह्मास अभय आहे. फौजेस निरोप देण्याबद्दल आमची तुह्मांवर सक्ती नाहीं. तुह्मीं स्वस्थ आपल्या गोटांत रहावें

५. दादासाहेबांच्या लष्करापासून दोन कोसावर पटवर्धन सरदारांची फौज पाण्याच्या सोईसाठी ह्मणून उतरलेली होती. दादासाहेबांनीं भवानरावांच्या गोटावर हल्ला करण्याचा हुकूम केला, असें वर्तमान त्यांना समजतांच, दादासाहेबाबरोबर लढण्याच्या तयारीनें पटवर्धनानी आपली फौज तयार करून आणली. त्यांची फौज दादासाहेबांच्या आघाडीला येऊन पोंचली. परशुरामभाऊ आपल्या बाराशे स्वारानिशीं दादासाहेबांच्या गोटापुढे येऊन लढाईला सज्ज झाले. तेव्हां वामनराव यांना समजलें कीं, दादासाहेबांचा व भवानरावाचा तह झाला. भवानरावाच्या कुमकेला धांवत येऊन शेवटीं आपण तोंडघशीं पडलों असे वामनरावांना वाटलें. कारण कीं, येथ रहावें तर भवानराव मदतीला होता, तो आता स्वस्थ बसणार. मागें जावें तर तीही पंचाईतच होती. करिता इतका वैरभाव दाखविल्यामुळें, या लष्करांत मिसळून न राहता, यापुढे नेहमीं निराळे फटकून सावधपणानें राहिलें पाहिजे, असें त्यानीं ठरविले. पटवर्धनांची फौज एकदम पुढें येऊन उभी राहिली हें पाहून, दादासाहेबांनीं वामनरावांना विचारावयास पाठविलें कीं, तुह्मीं कां आला ? त्यावर त्यांनीं असें उत्तर सांगून पाठविलें कीं, आपली फौज तयार झाल्याची बातमी आमच्या कारकुनानें आह्मास दिली. त्यावरून आह्मीही तयार होऊन आलो. प्रतिनिधींची समजूत झाली हें उत्तम झालें. आतां सरकारची जशी आज्ञा होईल तसें करूं. दादासाहेबांनीं

यावर हुकूम केला कीं, तुम्हीं आमच्या गोटाच्या पिछाडीस अथवा ज्या बाजूस नेहमीं उतरतां त्या बाजूस जाऊन उतरावें. त्यांनीं असा हुकूम दिला तरी दहा घटिका दिवस येईपर्यंत पटवर्धनांची फौज तेथेंच उभी होती. दादासाहेबांकडून वारंवार निरोप येत कीं, अजून का जात नाहीं? लवकर चला. शेवटीं ही फौज आघाडीला होती, तेथून निघून लष्कराच्या पिछाडीस डाव्या बाजूस दीड कोसावर जाऊन उतरली. तरी त्यांच्या पोटांत दादासाहेब आपणावर केव्हां हल्ला करतील याची भीति होती, ह्मणून सायंकाळपर्यंत घोड्यावर जिनें ठेऊन ती फौज तशीच उभी होती. नंतर त्रिंबको विठ्ठल व बजाबा पुरंदरे हे पटवर्धनांकडे आले, आणि आठ दिवसपर्यंत तुमच्यावर दादासाहेब कोणत्याही प्रकारें हल्ला वगैरे करणार नाहींत अशी हमी त्यांनीं त्यांना दिली. याप्रमाणें इमानप्रमाण झाल्यावर पटवर्धनांनीं घोड्यावरील जिनें उतरविण्यास हुकूम केला. त्या दिवशीं सारे लोक उपाशी होते. दोन घटिका रात्रीस जेवणे झालीं. प्रहर रात्रीस दादासाहेबांकडून पुरुषोत्तमराव पटवर्धन याना बोलावणें आलें. त्याप्रमाणें ते त्यांच्या भेटीस गेले. मुरारराव घोरपड्यांच्या मध्यस्थीनें दादासाहेबांनीं कित्तूरची खंडणी वसूल करण्याकरता तिकडे जाण्याबद्दल पटवर्धनांना आज्ञा दिली. नंतर तेथून पटवर्धनानीं दुसऱ्या दिवशीं कूच केलें व कित्तूरकडे न जातां पुण्यास परत येण्याकरतां ते निघाले. विसाजीपंत बिनीवाले हेही आधींच आले होते. पटवर्धन लष्कर सोडून आल्यावर नरसिंगराव धायगुडे हेही निघून आले. याप्रमाणे फितूर मंडळी दादासाहेबांना सोडून एकएक पुरंदराला येऊं लागली.

६. आपल्या सैन्यांत अशा प्रकारें फितूर झाला असें पाहून व तिकडे तांतडीनें आपणाला जाणे प्राप्त आहे, असें मनांत योजून, दादासाहेबांनीं हैदरबरोबर कल्याणदुर्ग येथें तह केला. या तहांत हैदरानें दादासाहेबांचा पेशवेपदावरील हक्क कबूल करून त्यांना सहा लक्ष रुपये खंडणी देण्याचें कबूल केलें. त्यांच्याबरोबर कायम स्नेह राखण्याचें व वेळोवेळीं फौजेची

कुमक करण्याचेंही त्यानें कबूल केलें. त्याप्रमाणें त्यानें आपल्या अटी शेवटपर्यंत पाळल्या. या तहांत दादासाहेबांकडून जो मुलुख हैदराला मेळाला त्या मुलखांत रास्ते, पटवर्धन, नरगुंदकर भावे, गजेंद्रगडचे घोरपडे, यांना जहागीर ह्मणून दिलेला मुलुखही होता. सावनूरच्या नबाबाचें राज्यही याच मुलखांत होतें. या सर्व मुलुखाचा या नवीन तहाप्रमाणें हैदरअल्ली मालक झाला. रास्ते, पटवर्धन वगैरे जहागीरदार दादासाहेबांच्या प्रतिपक्षास मिळाले असल्यामुळें त्यांचें पारिपत्य त्यांना करावयाचें होतें. ह्मणून यांनीं या जहागीरदाराची व हैदराची अशा प्रकारच्या तहानें गांठ घालून दिली.

७. दादासाहेब तेथून परत फिरले ते फाल्गुनाच्या प्रारंभीं कपाट संगमावर कृष्णा उतरावयास आले. तेथून त्यांनीं मुराराव घोरपड्यास गुत्तीस परत जाण्याचा निरोप दिला. कारभाऱ्यांशीं समेटाचें बोलणें करण्याकरतां गोपाळ नाईक तांबवेकर व भिमराव पावसे यांची रवानगी केली. कृष्णा नदी उतरल्यापासून त्यांनीं रास्ते व पटवर्धन यांच्या जहागिरींचा नाश करण्याचा व फितुरी लोकांचें पारिपत्य करण्याचा संकल्प केला. पटवर्धन वगैरे फौजबद फितुरी सरदार आपापल्या फौजेनिशीं लष्करातून निघून गेल्यानंतर त्यांच्या राहिलेल्या लष्करावर दादासाहेबांचा वचक बसू लागला. संधि साधून दादासाहेबानीं भवानरावांवर जबरदस्ती चालविली व त्यांना त्यांच्या फौजेला रजा देण्यास भाग पाडलें. नंतर त्यांना व रामचंद्र गणेश या दोन फितुरांना त्यांनीं नजरकैदेंत ठेवलें. विसाजीपंत बिनीवाले हे फितूरच झाले होते. त्यांच्या मुलाकडून दीड लाख रुपये घेऊन त्यांनाही नजरकैदेंत ठेविलें. कांहीं फितुरी सरदार निघून गेले; कांहींना दादासाहेबांनीं युक्तीनें किंवा सक्तीनें घालवून दिलें व कांहींचीं वरीलप्रमाणें पारिपत्यें केलीं. तेव्हां राहिलेल्या फौजेतील फितूर मोडला जाऊन दादासाहेबांस आपल्या फौजेचा विश्वास उत्पन्न झाला. त्यामुळें त्यांचें मन थोडें स्वस्थ झालें. नंतर ते रास्त्यांच्या जहागिरींत शिरले.

जीं मोठमोठीं ठाणीं होतीं त्यांच्या वाटेस न जातां तालिकोट व बागलकोट या परगण्यांतला जितका मुलुख होता तितका त्यांनीं जाळून लुटून ओस पाडला. बागलकोटास मोर्चे लावावयाचा त्यांचा विचार होता, पण तितक्यांत त्रिंबकरावमामा, साबाजी भोंसले व रुकनुद्दौला हे एकत्र होऊन पन्नास हजार फौजेनिशीं त्यांच्यावर चालून आले. उभय पक्षांच्या सैन्याची गांठ पडून थोडी चकमक उडाली. तेव्हां बागलकोट घेण्याचा नाद सोडून गलगलें, तेरदाळ, जमखंडी, वगैरे पटवर्धनी जहागिरींत त्यांनीं आपलें लष्कर पसरविलें. या पटवर्धनांच्या जहागिरीचीही त्यांनीं रास्त्यांच्या जहागिरीप्रमाणें दशा केली. ते मिरजेस वेढा घालणार अशीही बातमी पसरली होती. त्यामुळें वामनराव पटवर्धन कर्नाटकांतून लांब लांब मजली करीत कंपली व हणमंतसागर या गावावरून बागलकोटाला आले. मामा व पटवर्धन तेथें एकत्र झाले. हरिपंत फडकेही पुण्याहून साताऱ्यास तीनचार हजार फौजेसह आले होते. ते तेथून निघून मामास येऊन मिळाले. मामा, फडके, रास्ते व पटवर्धन या सर्वांचा वीस हजारावर फौजेचा जमाव झाला. ती फौज भोंसले व मोंगल यांच्यापासून निराळी होऊन दादासाहेबाचा निकरानें पाठलाग करूं लागली. तें पहाताच दादासाहेब मिरजेचा रोख सोडून शूर्पालावरून विजापुराकडे गेले, व तेथें ठाणें घालून सांगोल्यावरून पंढरपुराकडे गेले. त्यांच्या पाठीवर मामांची फौज होतीच. शिवाय साबाजी भोंसले व रुकनुद्दौला ईशान्येकडून आणि खासा निजामअल्ली हे पूर्वेकडून त्यांच्यावर चालून येत होते. दादासाहेब पंढरपुरावरून पुढें जाणार अशी बातमी होती; पण मामांची फौज सांगोल्याच्या पुढें कासेगांवाजवळ आलेली ऐकून दादासाहेबांनीं पुढें कूच करणें तहकूब करून मामांच्या फौजेशीं लढाई देण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें ते सिद्ध होऊन लढाईला आले. त्यांनीं कासेगांवच्या माळावर मामांच्या फौजेवर हल्ला चढविला. दादासाहेबांनीं या वेळीं आपल्या सैन्याच्या तीन टोळ्या केल्या होत्या. आघाडीच्या मध्यभागीं तोफा व गारदी ठेऊन त्या मागें

ते स्वत: उभे राहिले; आणि हुजुरातीच्या दोन टोळ्या दोन बाजूला उभ्या केल्या. मामांनींही तीन टोळ्या केल्या. उजवे बाजूस नारो शंकर विंचुरकर व रास्ते यांचीं पथकें, डावे बाजूस पटवर्धन सरदार व मध्यें हुजुरातीसह स्वत: आपण, याप्रमाणें मामा उभे राहिले. दादासाहेबांच्या फौजेनें प्रथम पटवर्धनांवर हल्ला केला. पण त्यांनीं तो मागें परतविला. पुन्हां हल्ला आला, तोही त्यांनीं मागें परतविला. नंतर दादासाहेबांची फौज मामांच्या हुजुरातीवर येऊन तुटून पडली. तेव्हां त्या ठिकाणीं मोठें तुंबळ युद्ध होऊन मामांच्या हुजुरातीनें पळ काढला. त्याबरोबर विंचुरकर, नारो शंकर व रास्ते यांच्या पथकांनींही पळ काढला. परशुरामभाऊंच्याही सैन्याची दाणादाण उडाली. परशुरामभाऊ मात्र पंधरावीस स्वारांनिशीं निसटून पळाले. मामांच्या हुजुरातीचा अगदीं मोड झाल्यामुळें, दादासाहेबांच्या फौजेने राहिलेल्या मामांच्या फौजेवर हल्ला चढविला. त्या हल्ल्यांतून त्रिंबकरावमामा निसटून पळत होते. परंतु त्यांच्यावर बरेच वार झाले होते. तोंडावरही वार बसले होते. ते पळून जात असतां लढाईच्या जागेपासून अर्ध्या कोसावर घोड्यावरून खालीं पडले. त्यांच्या सैन्याची सर्व बाजूंनीं दुर्दशा झाल्यानतर त्रिंबकरावमामाना पकडून दादासाहेबांच्या फौजेनें आणलें. ते दुसऱ्या दिवशीं[१] म्हणजे तारीख २७ माहे मार्च सन १७७४ रोजीं मृत्यू पावले. अशा प्रकारें कासेगांवच्या लढाईंत राघोबादादा यांच्या जवळ थोडी फौज असताही त्यानी त्रिंबकरावमामांच्या मोठ्या फौजेबरोबर लढाई देऊन त्यांचा पूर्ण पराभव केला. परशुरामभाऊ आदिकरून पटवर्धन-सरदार, रास्ते, विंचुरकर, नारो शंकर वगैरे शूर व लढवय्ये सरदारांना समरांगण सोडून दादसाहेबांनीं पळावयास लाविलें. यावरून दादासाहेब हे कोणत्या प्रतीचे युद्धकलाकुशल वीरपुरुष होते हें सहज लक्षांत येईल.

८. या लढाईंत एक विशेष गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. कासेगांवच्या लढाईंत मोड झाल्यानंतर पटवर्धन सरदार व इतर सरदार त्याच दिवशीं रात्रीं,

---

[१] ऐ. टे. सं. पान २०१५.

तेथून चारपांच कोसांवर, साबाजी भोंसल्यांच्या लष्कराचा मुक्काम होता, तेथें जाऊन पोंचले. साबाजीजवळ त्या वेळीं सुमारें दहा हजार फौज होती. या सर्व सरदारांची जिवंत राहिलेलीही फौज तेथें आली. पटवर्धन सरदार वगैरे मंडळी नांवाजलेली असतांना, त्यांना पुन्हां दुसरे दिवशीं दादासाहेबांच्यावर हल्ला करण्याची छाती झाली नाहीं. त्या ठिकाणीं मामांच्याबद्दल दादासाहेबांचा सूड घेण्याकरतां ती मंडळी पुन्हां त्यांच्यावर ज्याअर्थी हल्ला करण्याला प्रवृत्त झाली नाहीं, त्याअर्थी दादासाहेबांच्या पराक्रमापुढें त्यांचें कांहींही चालण्यासारखें नव्हतें हें उघड होतें. दादासाहेब शूर लढवय्ये होते व या सर्व सरदारांना ते भारी होते, ह्मणूनच साबाजी भोंसल्यांसह या सर्व सरदारांनीं आपल्या नांग्या टाकल्या व त्यांच्याबरोबर सामना देण्याचा विचार निजाम व हरिपंत फडके आल्यानंतर करावा असें त्यांनीं ठरविलें. मामा लढाईंत पडले, ही वार्ता पुरंदराला नाना फडनविस यांना समजली. ती ऐकून नानांच्या अंतःकरणावर वज्राघात झाला. त्यांच्या डोळ्यापुढें हिरव्या पिवळ्या रेघा दिसूं लागल्या. त्यांच्या तोंडचें पाणी पळालें.

९. कांसेगांवच्या लढाईची खबर नाना फडनविस यांना समजल्यानंतर त्यांची काय अवस्था झाली याची कल्पना हरिवंशाच्या बखरींत खालीलप्रमाणें दिली आहे. 'इकडील वर्तमान त्रिंबकरावमामा धरले गेले हें वर्तमान सांडणी स्वारासमागमें पुरंदरास नाना फडनविस व सखारामबापू यांस लिहून पाठविलें. ते उभयतां पुरंदरास श्रीमंत गंगाबाईसाहेब यांजवळ होते. ही सारी मसलत पुरंदर मुक्कामीं राहून केली. श्रीमंत गर्भवासांतच होते. तों लष्कराहून सांडणी-स्वार आला. उभयतां कारभारी पुरंदरचे दरवाजावर लहानसा बंगला आहे तेथें बसले होते. तों सखारामबापू यांनीं दुर्भाण लावून पाहिलें आणि सांगितलें जे. लष्करांतून सांडणीस्वार येतो आहे. परंतु मसलत बिघडलीशी दिसते! असें सांगतात तों सांडणीस्वार येऊन दाखल जहाला. पत्रें लखोटे फोडून पाहिलीं. त्यांत त्रिंबकरावमामा धरले. फौज उधळली, हें वाचलें. अगोदर सांडणीस्वार यास सखारामबापूंनीं विचारलें जे. हरिपंत जिवंत आहे कीं मेला. असें ह्मणतांच

सुतर स्वार यांनीं सांगितलें जे. हरिपंत शाबूत आहे. असें ह्मणतांच कांहीं चिंता नाहीं असें बोलून नंतर लखोटे फोडिले. वर्तमान ऐकून नाना फडनविस यांची कंबर बसली. आणि बोलिले जे. प्रथमग्रासीं मक्षिकापात जहाला. असें बोलून स्तब्ध राहिले. तों दोन प्रहर दिवस आला. नाना भोजनास उठेनात. तेव्हां सखारामबापू याणीं धैर्य दिलें. "नाना, हें राजकारण आहे, असे तरंग किती उठतील. आपण इतक्यांतच दम टाकल्यास पुढें कसें कराल ? तुह्मांस एक सांगतों. ज्यापेक्षां हरिपंत जिवंत आहे, त्यापेक्षां मसलत बिघडत नाहीं. तो पुन्हां राजकारण उभें करील ''. याप्रमाणें बोलून नानास भोजनास उठविलें '. याप्रमाणें नाना फडनविस यांची कांसेगांवच्या लढाईची हकीकत ऐकून स्थिति झाली होती.

१०. या कांसेगांवच्या लढाईमुळें बारभाईंच्या कारस्थानाचें स्वरूप दादासाहेबांच्या पुरतेपणीं लक्षांत आलें. इतके दिवस त्यांना वाटत होतें कीं, पेशव्यांच्या राज्यांतील हुद्यांच्या मोठमोठ्या जागांकरतां हे लोक आपला स्वतंत्र पक्ष निर्माण करीत होते. परंतु सखारामबापूंसह सर्व मुत्सद्दी ज्याअर्थी या बंडांत सामील झाले, त्याअर्थी यांच्या मनांतून पेशवाई गिळंकृत करावयाची आहे; आणि तेवढ्याकरतां यांचे हे प्रयत्न सुरू आहेत, याबद्दल दादासाहेबांची खात्री झाली. राज्यरक्षणाकरतां मुत्सद्दी व सरदार यांची जरूरी असते. शेताच्या रक्षणाकरतां कुंपणाची आवश्यकता असते. मुत्सद्दी व सरदार यांनींच राज्य गिळंकृत करणें किंवा कुंपणानेंच शेत खाऊन टाकणें म्हणजे पर्यायानें उभयतांचा नाश करून घेणें, हेंच सार यांतून निघतें. राघोबादादा हे जन्मजात पेशवेपदाचे अधिकारी होते. पेशवेपद चालविण्याला हिम्मत, शौर्य, धाडस, मनाचा मोठेपणा वगैरे जे गुण लागतात ते त्यांच्या अंगीं होते. पेशवे घराण्याच्या इभ्रतीचा त्यांना अभिमान होता. ह्मणूनच या सर्व गोष्टी संभाळून यापुढें त्यांना बारभाईंच्या घरबुडवेगिरीच्या बंडाला तोंड द्यावयाचें होतें. बारभाईंचें हें नवीन कारस्थान फांसेपारध्याच्या जाळ्यापेक्षां खात्रीनें प्राणघातक होतें यांत संशय नाहीं. याही प्रसंगांतून परमेश्वर पेशवाईचें रक्षण करील या

दृढ विश्वासावर राघोबादादा आपल्या पुढील प्रयत्नाला लागले. वीरपुरुष कर्तव्य-कर्माचा गुलाम असतो. यापुढें बारभाईच्या मगरमिठींतून पेशव्यांचें राज्य सोडविणें हें एकच आद्य कर्तव्य त्यांच्यापुढें यावेळीं उभे राहिलें. राघोबा-दादांची परमेश्वरावर फार निष्ठा होती.

११. राघोबादादा यांनीं बरींच अनुष्ठानें केलीं. जप, तप वगैरे साधनें, देवपूजा, दानधर्म वगैरे धर्मकृत्यें ते आचरीत असत, हें लोकविश्रुत आहे. साधु, संत, यांवरही त्यांची मोठी भक्ति व विश्वास होता. कांसेगांवच्या लढाईंतही त्यांच्या साधु-संतांवरील दृढ विश्वासासंबंधीं व देवभोळेपणासंबंधीं एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. ती अशी कीं-" राघोबाच्या[1] फौजेचा मुक्काम पंढरपुरास आला. त्याच्या पाठीवर मामा व पटवर्धन यांची फौज होती, व बरोबरच्या सरदारांचाही त्यास भरंवसा नव्हताच. ह्मणून राघोबा जयाविषयीं उदासीन झाला होता. त्यावेळीं पंढरपुरांत कोणी 'बडीबया' ह्मणून भगवद्भक्त निर्माण झाली होती. तिचे दाखले व अनुभव पुष्कळांस आले होते. तिची लोकांत मान्यता झाली होती. राघोबादादाच्या हितचिंतकांनीं तिला बोलावून आणिलें, आणि ह्या लढाईंत यश येईल किंवा कसें हा प्रश्न केला. 'आज लढाई कराल तर खास यश येईल' असें तिनें सांगितलें. त्यावरून राघोबास व त्याच्या हितचिंतकांस मोठी हुशारी आली. त्यांनीं त्याच दिवशीं लढाईचा बेत निश्चित केला, व शत्रूवर चालून गेले. या लढाईंत बडीबया गजारूढ होऊन सैन्याच्या अग्राभागीं होती, आणि राघोबाच्या सैन्यास 'काय पहातां, चला चालून, आज मात आहे' असें उत्तेजन देत होती." भगवद्भक्त बडीबया हिच्या आशिर्वादानें राघोबादादांना या लढाईंत विजय मिळाला हें वर आलेंच आहे.

१२. वरील गोष्टीवरून राघोबादादांचा भाविकपणा किती श्रेष्ठ प्रतीचा होता हें उघड दिसतें. परंतु याशिवाय आणखी एक गोष्ट वरील प्रसंगानें उजेडांत येते. सर्व साधारणपणें विचार करतां जे कपटी, दुष्कर्मी, खुनी,

---

१ परशुरामपंतभाऊ पटवर्धन यांचे चरित्र पान ३७

कारस्थानी लोक असतात, त्याचा परमेश्वरापेक्षां स्वतःच्या बुद्धीवर जास्त विश्वास असतो. ते भावनाप्रधान नसतात. त्यांच्या मनाला परमेश्वराच्या भक्तीशीं समरस होतां येत नाहीं. त्यांना मनाचें पावित्र्य लाभत नसल्यामुळें परमेश्वराच्या भक्तीकडे त्यांचा लय लागत नाहीं. अर्थात् साधु-संत त्यांचें अधिष्ठान होऊं शकत नाहींत. परमेश्वरी प्रसाद अशांना लाभत नाहीं. राघोबादादा हे पुतण्याचा खून करणारे, दुष्कर्मी, पापी आहेत असा बारभाईंनीं सर्व जगभर त्यांचा डांगोरा पिटविला होता. पंढरपुरांतील भगवद्भक्त बडीबया यांच्या कानांतही तो सर्वांपेक्षां जास्त घुमला असेल यांत शंका नाहीं. असें असतां ती त्रिकालज्ञानी भगवद्भक्त बडीबया राघोबादादांचा पक्ष धरते, त्यांना विजय मिळावा ह्मणून त्यांच्या सैन्याच्या अग्रभागीं जातीनें येऊन सैनिकांना उत्तेजन देते, व शेवटीं राघोबादादांना विजय प्राप्त करून देते याचा अर्थ काय ? परमेश्वराच्या नामस्मरणांत निमग्न राहणारी बडीबया राघोबादादांच्या दुष्कर्माला मदत करण्याकरतां का समरांगणावर आली ? असेच त्यांनीं आपल्या पुतण्याचे खून करावे ह्मणूनच का या संतिणीनें त्यांचा पक्ष धरला ? याचें उत्तर अस्तिपक्षी कोणासही देतां येणार नाहीं. दिल्यास तें खात्रीनें योग्य ठरणार नाहीं. राघोबादादा पवित्र होते, ह्मणूनच त्यांना साधुसंतांचें अधिष्टान मिळालें हें निराळें सांगावयास नको.

१३. बारभाईंनी राघोबादादा व आनंदीबाई यांचा नैतिक ऱ्हास करण्याचा जो विश्वप्रयत्न केला, त्यांत कासेगांवच्या लढाईनेंही थोडी भर टाकण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. त्रिंबकरावमामा बारभाईपैकीं एक होते. त्यांचें वजन, त्यांची कर्तबगारी, यांचा उपयोग बारभाईंना अद्यापि पाहिजे होता. पेशवे घराण्यांतील स्त्रियांना मामांचा मोठा आधार होता. अनुबाई घोरपडे यांचे हे जामात असल्यानें, राघोबादादांविरुद्ध ह्मणजे आपल्या भाचाविरुद्ध अनुबाईला बारभाईंचा पक्ष घ्यावा लागला. एकंदरींत पेशव्यांच्या आप्तवर्ग सरदारांत त्रिंबकरावमामांचें वजन होतें. याचा फायदा घेऊन राघोबादादा व आनंदीबाई यांच्याबद्दल सर्व लोकांत द्वेष उत्पन्न करण्याकरतां मामांच्या मृत्यूसंबंधीं

विपरीत बातम्या पसरविण्यांत आल्या. त्रिंबकराव पेठे हे सदाशिव चिमणाजी ( सदाशिवरावभाऊ ) यांचे मामा. कांसेगांवच्या 'लढाईंत'[1] कैद केल्यावर आनंदीबाई ही त्यांस नेहेमीं फटके मारवी, व "आतां कसें! मेले चालले मसलती करून राज्यांत बखेडे घालायाला !!" असें त्यांस टोंचून बोले. त्यावेळचें या निधड्या शूराचें उत्तर लक्षांत ठेवण्याजोगें आहे. तो तिला खडखडीत जाबसाल करी कीं, "दुष्टे, मी एक मेलों तरी हरकत नाहीं तुझे दुसरे××× ( या तीन फुल्ल्याच्या ठिकाणीं धगड शब्दाचा प्रयोग करण्याचा लेखकाचा उद्देश आहे ) पुण्यास पुष्कळ बसले आहेत. ते तुझ्या हातीं कधीं राज्य लागूं देणार नाहींत."

१४. वरील माहिती वाचली असतां त्रिंबकरावमामा हे राघोबादादांच्या कैदेंत कमींतकमी चारदोन महिने तरी असले पाहिजेत असा बोध होतो. 'लढाईंत कैद केल्यावर आनंदीबाई ही त्यांस नेहमीं फटके मारवी.' या वाक्यावरून खात्रीनें दीर्घ कालाचा बोध होतो. मामा गोळी लागून लढाईंत पडले[2] असें कोणी ह्मणतात. मामांना अंगावर बरेच वार लागले व तोंडावरही वार लागले आणि ते रणक्षेत्रापासून अर्ध कोसावर घोड्यावरून खालीं पडले. नंतर त्यांस उचलून दादासाहेबांच्या सैन्यांत नेलें व तेथें ते दुसऱ्या दिवशीं निवर्तले अशीं पत्रें सांपडतात. मामा बेशुद्ध स्थितींत होते व त्याच स्थितींत ते दुसऱ्या दिवशीं मेले अशी वस्तुस्थिति असतां आनंदीबाई त्यांना फटके मारवीत असे वगैरे वरील बातमी निव्वळ खोटी व बनावट आहे यांत शंका नाहीं. आनंदीबाई ही पार्वतीबाईप्रमाणें त्रिंबकरावमामा यांची भाचेसून होते. अशा स्थितींत आनंदीबाईनें त्यांचे अनन्वित छळ केले असे जरी गृहीत धरून चाललें तरी थोर व वृद्ध अशा सासऱ्याकडून आपल्या सुनेविषयीं असे फाल्गुन मासी उद्गार काढले जातील, हें अगदीं अशक्य आहे. हें भाष्य मत्सरानें पेटलेल्या व सूड वृत्तीनें बेताल झालेल्या भ्याड पण कपटी कारस्थानी माणसाचें आहे हें सर्वसाधारण मनोधर्म समजणाऱ्यांना निराळें सांगावयास नको.

---

१ पेशव्यांची बखर पान ९६ स्फूट नोट. २. पे ब पान ९६.

१५. पेशव्यांचें राज्य बुडण्याला जीं कारणें झालीं त्यांतील प्रत्यक्ष पहिलें कारण ह्मणजे कासेगांवची लढाई हें होय. बारभाईंनीं राघोबादादांविरुद्ध बंड पुकारलें तरी समोरासमोर प्रत्यक्ष सामना या लढाईंतच पहिल्यानें झाला. राघोबादादा हे पेशव्यांच्या गादीचे हक्कदार होते, ही गोष्ट कोणालाच अमान्य करतां येण्यासारखी नव्हती. त्यांनीं पेशव्यांचीं वस्त्रें सर्वांनुमतेंच धारण केलीं होतीं. पेशवाईच्या उत्कर्षाकरता त्यानीं आजपर्यंत मोठमोठ्या लढाया मारून विजय संपादन केला होता. त्याचप्रमाणें त्रिंबकरावमामा यांनींही पेशवाईची आपल्या मनोभावनेप्रमाणें इमानें नोकरी बजावली होती. असें असतां पेशव्यांविरुद्ध त्यांच्या सरदारांनीं परस्परात लढावें ही गोष्ट पेशवाईच्या खात्रीनें नाशाची होती. थोरले माधवराव पेशवे असतांना त्याची व दादासाहेबांची जरी एक दोन वेळां चकमक झडली होती, तरी ती परस्परानीं पेशवाईचें नुकसान न होऊं देतां मोठया शहाणपणानें मिटती घेतली होती. परंतु या वेळीं बारभाई व दादासाहेब ह्मणजे सरदार व पेशवे याचा संबंध येणार होता. हा लढा नोकर व मालक यांमधील होता. या वेळीं बारभाईंनी जरी गंगाबाईंना हाताशीं धरलें होतें तरी तें केवळ त्यांच्या कारस्थानाला पोषक होण्यापुरतेंच होतें. भाऊबंदी तंटे हे व्यक्तिगत असल्यानें ते कालांतरानें उभय पक्षांतील कोणाच्या तरी एकाच्या मृत्यूनें आपोआप लोप पावण्याचा संभव असतो. परंतु नोकर व मालक यांतील तंटा मात्र तसा नाही. तो सर्वस्वाचा नाश केल्याशिवाय शांत होत नाहीं. राघोबादादा हे जरी मुत्सद्दी नव्हते, तरी त्यांना व्यवहार उत्तम प्रकारें समजत होता. त्रिंबकरावमामा हे त्यांच्या मागें लागले, तेव्हा परस्परांची लढाई होणें ह्मणजे पेशवाईचेंच नुकसान होतें, ही जाणीव त्रिंबकरावमामांपेक्षां दादासाहेबांनाच जास्त होती. ह्मणून हा लढाईचा प्रसंग न येतां परस्परांनीं मिटतें ध्यावें असा दादासाहेबांचा विचार होता. त्यांनीं त्रिंबकरावमामांच्या सैन्यांतील तोफखान्यावरील कृष्णराव पानसे यांच्या 'नांवची[1] चिट्टी पाठविली कीं, संधान केल्यास उभयपक्षीं बरें.' परंतु दादासाहेबांच्या या चिट्टीचा विचार न करतां 'रघुनाथराव[2] मोठा शूर आहे त्यास जिंकले

१ ऐ. ले. सं. ११३५ २ डफकृत मराठ्याची बखर पान २४१

असतां आपली मोठी कीर्ति होईल' या अभिमानानें मामांनीं त्यांच्यावर चाल केली. अर्थात् 'अंगावर आल्यानंतर शिंगावर घेणें हा नीतिधर्मच आहे.' त्याप्रमाणें दादासाहेबांना कांसेगांवची लढाई करावी लागली. या लढाईमुळें "पेशवाईचे मालक बारभाई कीं राघोबादादा?" या नवीन लढ्याला प्रत्यक्ष सुरवात झाली.

१६. कांसेगांवच्या लढाईंत विजय मिळल्यानंतर दादासाहेबांनीं पंढरपुराला आपला तळ दिला. तेथील खंडणी त्यांनीं घेतली. विसाजी कृष्णानें हिंदुस्थानांतून जवाहीर आणलें होतें तें त्यांनी पंढरपुरास विकलें व पुढील मोहिमेस लागणारा पैसा त्यांनीं तयार केला. त्यांनीं आपल्या सैन्यांत भरती सुरू केली. या ठिकाणीं दादासाहेबांचें सुमारें चाळीस हजार सैन्य तयार झाल्यावर त्यांनीं पुण्यावर स्वारी करण्याचें ठरविलें व त्या रोंखानें ते मजल दर मजल करीत चालले. पुरंदरास ही हकीकत समजतांच बारभाईंनीं हरिपंत फडके यांची मामांच्या जागीं नेमणूक केली व ते दादासाहेबांना सामना देण्याकरतां निघाले. साबाजी भोंसले व निजामअल्लीही त्यांना मिळाले. राघोबादादा हे पेशवाईचे खरे मालक आहेत, व ते पुण्यावर चाल करून येत आहेत, यामुळें पुरंदरच्या कारभाऱ्यांची पांचावर धारण बसली. त्यांना कसा शह द्यावा, याबद्दल बारभाईंचीं डोकीं चालूं लागली. 'साताराच्या राजाना मुक्त करून त्यांचे मुख्यत्वें रघुनाथरावांचा पराभव करावा[1]' अशींही कारस्थानें सुरू झालीं. राघोबादादा कांसेगांवच्या लढाईंत विजयी झाले आहेत व ते पेशवाईचे खरेखुरे हक्कदार आहेत, असें वाटून दादासाहेबांच्या विजयाचीं चिन्हें भोंसले व निजाम यांना दिसतांच ते केव्हां त्यांच्या पक्षाला जाऊन मिळतील याचा विश्वास बारभाईंना नव्हता. शिवाय या वेळीं गंगाबाई अगदीं दिवसांत होती. तिला मुलगा न होतां मुलगी झाली, व हें वर्तमान भोंसले व निजाम यांना समजलें तर ते दादांच्या पक्षाला मिळतील ही भीति त्यांना होती. म्हणून त्यांनीं साताराच्या राजांना बंधमुक्त करून त्यांना सेनेचें आधिपत्य देण्याचें कारस्थान चालविलें

१ डफ यांची मराठ्यांची बखर पान २४२.

होतें. ही मसलत साधण्याकरतां खुद्द हरिपंत फडके साताऱ्यास गेले होते. साताऱ्याचे महाराज[1] या मसलतीला अनमान करीत होते. एकंदरीत गंगाबाईंना मुलगा होतो किंवा मुलगी होते याच्यावर बारभाईंच्या पुढील यशापयशाची व त्यांच्या अस्तित्वाची सर्व मदार होती. म्हणून सर्व लोकांचे डोळे या वेळीं पुरंदर किल्ल्याकडे लागले होते.

१७. राघोबादादा यांचा पाठलाग करून त्यांचा मोड त्वरित करण्यांत बारभाईंचा एक हेतु साध्य होणार होता. दादासाहेबांचा मोड होऊन ते बारभाईंच्या स्वाधीन झाले व नंतर गंगाबाईंना जरी मुलगी झाली तरी गंगाबाईंच्या मांडीवर दत्तक देऊन त्याच्या नांवानें पेशवाईचा कारभार चालवितां येईल असें त्यांना वाटत होतें. परंतु भोंसले व निजाम यांना ही गोष्ट मान्य नसल्यामुळें ते दादासाहेबांबरोबर इतक्या तातडीनें लढाई देण्याला तयार नव्हते. ते गंगाबाईंच्या प्रसूतीची वाट पहात होते व त्या करतां ते दादासाहेबांवर चाल करून जाण्याला दिरंगाई करीत होते. त्रिंबकरावमामा व पटवर्धन ह्यांनाच फक्त आपलें कारस्थान लवकर साध्य करून घेण्याची घाई होती. म्हणून त्यांनीं भोंसले व निजाम यांचा नाद सोडून राघोबादादांवर ताबडतोब हल्ला केला व कांसेगांवची लढाई देऊन त्यांत ते पराभूत झाल्यामुळें त्यांची मसलत फसली. मराठ्यांच्या बखरींत म्हटल्याप्रमाणेंच केवळ त्रिंबकरावमामा आपली कीर्ति होण्याच्या बुद्धीनें, राघोबादादांवर चाल करून गेले नाहींत. त्यांना आपलें बारभाईंचे कारस्थान साधावयाचें होतें.

१८. कांसेगांवच्या लढाईमुळें भोंसले व निजाम याचें धोरण काय असावें हें दादासाहेबांच्या लक्षांत जरी आलें असलें तरी ताबडतोब त्यांनीं पुरंदरावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला नाही. गंगाबाई गरोदर आहे, तव्हां त्या गोष्टीचा सोक्षमोक्ष होईपर्यंत वाट पहाणें त्यांना इष्ट वाटत होतें. शिवाय आपणाबरोबर सातारचे महाराज सामना देण्याकरतां येणार या बातमीनेंही त्यांच्या चित्तांत खळबळ उडून दिली असेल यांत शंका नाहीं. इतके दिवस दादासाहेबांच्या लष्करांत प्रतिनिधि व मुरारराव घोरपडे होते. परंतु सातारचे महाराज

१. ऐ. ले. सं. पान २१२४.

बारभाईंकडे गेले या बातमीमुळे ते दादासाहेबांना सोडून गेले. या सर्व परिस्थितीमुळें राघोबादादांनाही आपल्या लष्कराच्या हालचाली दिरंगाईनें कराव्या लागत होत्या. एकंदरींत गंगाबाईंना मुलगा होतो किंवा मुलगी होते या गोष्टीवरून पुढील राजकारण लढविलें जाणार होतें व त्याचीच मार्गप्रतीक्षा उभय पक्ष करीत बसले होते.

१९. पुरंदर किल्ल्यावर नाना फडनविस व सखारामबापू असे दीडशहाणे तळ देऊन बसले होते· व तेथूनच ते आपल्या कारस्थानाचे डाव टाकीत होते. सखारामबापू मुत्सद्दी खरे, परंतु ते थोडे धर्मभोळे होते. त्यामुळें जगाला पटतील अशीं नवीन कारस्थानें ते निर्माण करीत, पण ती विशेष परिश्रमाची व खर्चाची होत. त्यांची विचारसरणी दूरदर्शीपणाची होती. गंगाबाईंना मुलगा न झाला तर पुढें आपलें राजकारण बिघडूं नये ह्मणून त्यांनीं आपल्या विचाराप्रमाणें कारस्थानाची पुढील दिशा आंखून ठेविली होती. ' १ प्रसंग पडल्यास साताराच्या राजांना पुढें करून त्यांच्या नांवानें राज्य चालविणें. त्या प्रमाणें त्यांनीं हरिपंत फडक्याना साताऱ्याला पाठवून त्याना हाताशीं धरलें होतें. २ अहमदनगरच्या किल्ल्यावर सदाशिवरावभाऊ याना तोतया ह्मणून कैदेंत ठेविलें होतें. त्यांची मुक्तता करून त्यांच्या नांवानें राज्यकारभार चालविणें. ३ ह्या दोन्ही युक्त्या फसल्या तर शेवटीं गंगाबाईंच्या मांडीवर दत्तक देऊन त्याच्या नांवानें राज्य चालविणें. अशा प्रकारें त्यांनीं मसलती योजून ठेवल्या होत्या. पण सर्वांत अव्वल दर्जाचा विजय ह्मणजे गंगाबाईंना पुत्र होणें हा होता. पण ही गोष्ट मानवी शक्तीच्या बाहेरील आहे असें त्यांना वाटल्यामुळें त्यांनीं ठिकठिकाणच्या जागृत मंदिरांत ब्राह्मण बसवून अनुष्ठानें सुरू केली. सखारामबापूंनीं यावेळीं मानवी व दैवी जे उपाय सुचले ते सर्व करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं.

२०. नाना फडनविस यांच्या कारस्थानाचा मार्ग मात्र भिन्न होता. त्यांचा दैवावर, देवावर अगर त्यांच्या सहकारी लोकांवर विश्वास नव्हता. त्यांचा सर्व विश्वास स्वत:च्या बुद्धिचातुर्यावर होता. गंगाबाईंना मुलगा झाला तरच आपलें

कारस्थान यशस्वी ठरतें. नाहींतर आपल्यासह सर्व बारभाईंच्या गळ्याला तात लागते, असा त्यांचा ठाम कयास होता. तेव्हां गंगाबाईंना मुलगाच झाला पाहिजे असा तोडगा त्यांनीं निर्माण करावयाचें ठरविलें. फक्त नानांच्याच जवळ असले अनत तोडगे होते. त्याचा पराक्रम एवढा जबरदस्त होता कीं, ते स्वतः अर्धे शहाणे असूनही त्यांनीं बाकीच्या तीन शहाण्यांवर मात केली व शेवटीं आपण स्वतःच साडेतीन शहाणे बनले. नानांचें कारस्थान गुप्त स्वरूपाचे, पाताळयंत्री व भरीव असे. त्यांच्या कारस्थानाला बहुतेक तोड मिळाली नाहीं. त्यांनीं या वेळीं पुरंदर किल्ल्याचा बंदोबस्त आपल्या नेतृत्वाखाली ठेवला होता. सखारामबापू जरी मुख्य कारभारी होते, तरी व्यवहारांत व दिमाख्यात नानाच मुख्य होते. हरिवंशाच्या बखरींत या कारणाकरतांच नानांना मुख्य कारभारी ह्मटलें आहे.[1] सखारामबापूंनीं खर्चाला लागणारें कर्ज उभारावें, सरदारात फूट पाडावी, परराष्ट्रांशीं मसलती कराव्या, लढाईचे डावपेंच लढवावे वगैरे कामे त्यांना करावी लागत. नानांची कामगिरी दिसावयाला दुय्यम पण असावयाला अव्वल अशीच होती. ह्मणूनच पुरंदरचा बदोबस्त त्यांच्या ताब्यांत होता. जानोजी आप्पा हे नानाचे विश्वासु इसम असून त्याच्या ताब्यांत पुरंदरचा किल्ला होता. तेव्हा त्या किल्ल्यावरील कोणतेंही कारस्थान बिनबोभाट पार पडणारें होतें. गंगाबाईंना मुलगाच झाला पाहिजे, याची पूर्वतयारी नानांनीं मोठ्या गुप्त तऱ्हेनें किल्ल्यावर चालविली. त्या ठिकाणीं पार्वतीबाई सगुणाबाई, दुर्गाबाई किंवा स्वतः गंगाबाई यानासुद्धां आपल्या तोडग्याचा मागमूस लागूं नये, एवढी रामबाण ती पूर्वतयारी होती. दैववशात् गंगाबाईंना मुलगा झाला. पण मूल पाच वर्षाचें होईपर्यंत त्याला अनेक विकार होतात. गोवर, देवी, बालग्रह, माकडखोकला, मुडदूस ह्मणजे पदर पडणें वगैरे रोगांतून मूल शीरसलामत वांचणें मोठ्या कष्टाचें असतें. ह्मणून गंगाबाईंना मुलगा होणें हें जसें या प्रसंगीं अवश्य होतें, तितकेंच किंबहुना जास्त

---

१ पान ५१

तो जन्मल्यावर जगणें हें अवश्य होतें. ह्मणून नानांची पूर्वतयारी अत्यंत नाजुक स्वरूपाची व अत्यंत महत्वाची अशी होती.

२१. नाना फडनविस यांनीं गंगाबाईच्या बाळंतपणाची जी पूर्वतयारी केली त्यांत त्यांनी अशा कित्येक गर्भवती स्त्रिया पुरदर किल्ल्यावर गुप्तपणानें आणून ठेविल्या कीं ज्या स्त्रियाचा व गंगाबाईचा प्रसूतीकाल एकच होता. त्याचप्रमाणे गंगाबाईचें बाळतपण करणाऱ्या सुईणीही आपल्या पूर्ण विश्वासांतल्या अशाच आणून ठेवल्या. प्रसंगविशेषीं गंगाबाईना मुलगी झाली तर ती गुप्तपणानें उचलून त्या ठिकाणीं दुसऱ्या बाईला झालेला मुलगा आणून ठेवावयाचा. इतक्या धोरणाची ती अत्यंत गुप्त व्यवस्था होती. या गरोदर स्त्रिया आणून ठेवण्यात दुसराही एक हेतु होता. गंगाबाईचें हें पहिले बाळंतपण होतें. शिवाय किल्ल्यावरील सर्द हवा; चांगल्या प्रकृतीचीं माणसेसुद्धां तेथें आजारी पडत तेव्हां न जाणो कोणत्या वेळीं काय अनर्थ ओढवेल हें सांगता येणें अशक्य होते. तेव्हां नगाला नग हातीं कायम असावा हाही त्यांत हेतु होताच. शिवाय इतकें करून गंगाबाईना मुलगा झाला, पण तो मुलगा पांच वर्षाचा होईपर्यंत बालरोगांनी अगर किल्ल्याच्या सर्द हवेनें त्याचें बरें वाईट झालें तरीसुद्धां त्याच्या जागीं कायम करण्याकरतां त्याच्याच वयाचीं चार दोन मुलें आपल्या जवळ शिलकींत असूं देणे हेंही त्यांत पुढील धोरण होतेंच. या करतां नानांनीं आपल्या वर्गांतल्या अशा कित्येक स्त्रिया पुरंदरावर आणून पोसल्या होत्या. गंगाबाईच्या करमणुकीकरतां या स्त्रिया आणल्या आहेत असें वरपांगी किल्ल्यांतील लोकांना सांगण्यांत येत होतें. गंगाबाईच्या डोहाळ्यांच्या सोहाळ्याबरोबर याही गरोदर स्त्रियांचे सोहाळे आपोआप होत असत. कोणतेंही कारस्थान उगीच साधलें जात नाहीं. त्याचीं पाळेंमुळें पूर्वींपासून फार खोल जावीं लागतात नानांच्या या पूर्वतयारीवरून ते केवढे पाताळयंत्री व श्रेष्ठ दर्जाचे कारस्थानी होते हे दिसून येईल. खरे कारस्थानी पुरुष देवावर अगर दैवावर भरंवसा ठेवीत नाहींत. त्यांचा खरा

विश्वास त्यांच्या बुद्धिमत्तेवर असतो. सखारामबापू व नाना फडनविस यांच्या कारस्थानाच्या दिशा निरनिराळ्या होत्या हें यावरून स्पष्ट दिसून येईल. नानांचें कारस्थान कमी खर्चाचें व विशेष स्वावलंबी असे. म्हणूनच तें लोकदृष्टीने यशस्वी होत गेल्याप्रमाणें दिसलें. नानांच्या कारस्थानाचें जाळें अशा प्रकारें पुरंदर किल्ल्यावर पसरलें होतें.

२२. राघोबादादांनीं पुरंदर किल्ल्यावरील बारभाईच्या कारस्थानाची थोडीफार जी माहिती मिळविली त्यावरून त्यांना असें दिसून आलें कीं, हें निव्वळ कारभाऱ्यांचें बंड आहे. या बंडामुळे पेशव्यांच्या गादीला धक्का पोंचतो. तो न पोंचावा म्हणून आपणाकडे कमीपणा घेऊन त्यांनीं कारभाऱ्यांबरोबर समेट करण्याकरता आपल्या वतीने बाबूजी नाईक बारामतीकर यांस पुरंदरास कारभाऱ्यांकडे पाठविलें. बाबूजी नाईक बारामतीकर हे बारामतीहून पुरंदरास तारीख १३ एप्रिल सन १७७४ रोजीं आले. या वेळीं गंगाबाई प्रसूत व्हावयाच्या होत्या. बाबूजी नाईकांनीं राघोबादादांच्या अटी बापू व नाना या उभय कारभाऱ्यांस कळविल्या, त्या अशाः— १ दादासाहेबांचा ' धणीपणा राखून सर्वही काम कारभार करावा. २ ' नाहीं तरी पहिली जहागीर व किल्ले श्रीमंत कैलासवासी रावसाहेबांनीं ( माधवराव पेशव्यांनीं ) दिले होते त्या प्रमाणे[१] द्यावें. ' या दादासाहेबांच्या अटी गैर होत्या, असें कोणालाच म्हणतां येणार नाहीं. पेशवाईचा कारभार स्वतः आटोपून घेण्याची इच्छा कारभाऱ्यांची आहे, हें जाणून त्यांनीं पहिली अट घातली होती. पेशव्यांच्या राज्यकारभारात एक अवाक्षरही काढावयाचें नाहीं व आपण स्वस्थ पुण्यास राहूं असे दादासाहेबांनीं कबूल केलें होतें. आपला नामधारी पेशवाईवरील धनीपणाचा हक्क जर कारभाऱ्यांना मान्य नसेल तर माधवराव पेशव्यानीं त्यांना देऊं केलेली तेरा लक्षाची जहागीर व कांहीं किल्ले कारभाऱ्यांनीं त्यांना द्यावे. दादासाहेब कारभाऱ्यांबरोबर इतकें नमतें घेऊन समेट करावयाला तयार झाले होते. परंतु कारभाऱ्यांनीं गंगा-

१. ऐ. ले. सं. पान २१४.

बाईंना मुलगाच होणार अशी टोलेजंग कामगिरी करून ठेवल्यामुळें त्यांनीं दादासाहेबांच्या अटी फोल टरपलाप्रमाणें उडवून लाविल्या. बापू व नाना यांच्या मनांत दादासाहेबांच्या या सामान्य अटी सुद्धां ऐकून घ्यावयाच्या नव्हत्या. 'त्यांचा दम कोठपावेतों आहे तेथपावेतों फिरतील. काय चिंता आहे?' असा कारभाऱ्यांना या वेळीं दम चढला होता. त्यांनीं दादासाहेबांच्या अटी फेंटाळून लावल्या, एवढेंच नव्हे तर, त्यांच्या पक्षांतील जे सरदार व जे लोक दादासाहेबांच्या लष्करांत होते, त्यांचीं सर्व घरें, जीं पेशव्यांच्या राज्यांत होतीं, तीं जप्त करण्याचे हुकूमही त्यांनीं पुरंदराहून निरनिराळ्या कमावीसदारांना पाठविले. यावरून गंगाबाई प्रसूत होण्यापूर्वीं सुद्धां, दादासाहेबांची मनोवृत्ति किती शुद्ध व सरळ होती आणि कारभारी मंडळी किती द्वेषबुद्धीनें प्रेरित झाली होती हें दिसून येईल.

२३. अशा प्रकारें कारभाऱ्यांचें कारस्थान चालू असतां तारीख १८ माहे एप्रिल सन १७७४ रोजीं गंगाबाई प्रसूत होऊन तिला कारभाऱ्यांच्या पूर्व संकेताप्रमाणें पुत्र झाला व त्याचें नांव पूर्व योजनेप्रमाणें सवाई-माधवराव असें ठेवण्यांत आलें.



# प्रकरण १९ वें.

## पेशव्यांचें राज्य पोंखरणारे बारा भुंगे.

### इ. स. १७७४ ते इ. स. १७७५.

१ पेशव्यांच्या राज्याचे खरे मालक सवाईमाधवराव जन्माला आले ह्मणून राघोबादादा यांना राज्याची जबाबदारी अंशतः कमी वाटली. राघोबादादांचे त्या बाबतींतील नवीन धोरण.—२ सवाईमाधवरावांचे जन्मानंतर राघोबादादा दुसऱ्यांदा नमतें घेऊन संधानाकरतां आपले लोक पुरंदरास पाठवितात.—३ दादासाहेबांनी देवधर्माकरता दोन लक्ष रुपये घेऊन आनंदवल्लीस राहावें ही एकच शर्त बारभाईनीं सुचविली.—४ बारभाईबरोबरील संधानाचें राघोबादादांचे तीनही प्रयत्न निष्फळ होतात.—५. बारभाईनी एकतीस लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलुख निजामास देऊं करून राघोबादादाविरुद्ध त्याला आपल्या पक्षांत ओढलें. राघोबादादा बऱ्हाणपुराच्या दिशेनें कूच करतात —.६ शिंदे व होळकर हे स्वतःच्या स्वार्थाकरता पूर्ण दक्ष होते —७. निजाम, साबाजी भोंसले, हरिपंत फडके, पटवर्धन वगैरे सरदार आपल्या पन्नास हजार फौजेसह राघोबादादांचा पाठलाग करतात नर्मदापार होण्याच्यापूर्वी राघोबादादाच्या सैन्यांतील बरेच सरदार आपापल्या सैन्यासह त्यांना सोडून जातात. दादासाहेब इंदुरास जातात. तुकोजी होळकर त्याचें स्वागत करतो. महादजी शिंदे तेथेच येऊन भेटतात.—८. शिंद्याचा व होळकराचा बारभाईच्या कारस्थानातून सुटण्याचा व्यर्थ डाव.—९ हरिपंत फडके नर्मदा उतरून राघोबादादांचा पाठलाग करणार, ही हकीकत शिंद्यास कळताच ते हरिपंतास तसें न करण्याबद्दल तंबी देतात. बारभाई व राघोबादादा यांच्यामधील संधानाचे महादजी शिंदे हे मध्यस्थ.—१० बारभाईचें लक्ष राघोबादादाच्या बंदोबस्ताकडे लागल्यामुळें हैदरास कर्नाटक प्रातांचें मोकळें रान मिळालें.—११ सखारामबापू व नाना फडनविस यांच्याशीं मोरोबादादाचा बेबनाव. राघोबादादाच्या पारिपत्याची बारभाईकडून पुन्हां तयारी. महादजीकडून राघोबादादाच्या तहासंबंधीच्या अटी. महादजी शिंद्यांची मध्यस्थीची दलाली.—१२ बारभाई व शिंदे यांचेमधील राघोबादादाविषयीं तहाच्या वाटाघाटीस दिरंगाई होते ह्मणून पुरंदराहून उभय कारभारी

मोठें सैन्य घेऊन हिंदुस्थानकडे निघतात. राघोबादादास या सर्वांच्या कारस्थानाचा संशय येतो. ते अचानक शिंद्यांच्या तावडींतून निसटून जातात. धारेस आनंदीबाई गरोदर असल्यानें त्यांना तेथें बंदोबस्तानें ते ठेवतात.—१३ इंग्रज साष्टीस वेढा देतात. राघोबादादांच्या पाठलागाचें काम हरिपंतांवर सोंपवून उभय कारभारी पुरंदरास येतात —१४ राघोबादादा अखेरचा प्रयत्न ह्मणून इंग्रजांची मदत घेण्याकरतां गुजराथेकडे जातात.—१५ राघोबादादा गोविंदराव गायकवाडाची मदत घेण्याकरतां बडोद्यास जातात. गायकवाड घराण्यांतील भाऊबंदी तंट्यासंबंधीचा पूर्वेतिहास. गोविंदराव गायकवाडाची राघोबादादांस मदत.—१६ हरिपंत फडके व शिंदे यांचा बेबनाव. पुन्हां परस्परांत समेट. राघोबादादा व हरिपंत फडके यांचा महीनदीवरील रणसंग्राम. राघोबादादांचा पूर्ण मोड होतो. त्यांचे सर्व प्रयत्न निष्फळ झाल्यामुळें ते शेवटीं सुरतेस येऊन इंग्रजांचा आश्रय घेतात.—१७ इंग्रजांचा आश्रय घेण्यांत राघोबादादांकडून कोणतीच चूक अगर अपराध झालेला नाहीं. त्याचा सर्व दोष बारभाईवरच आहे.—१८ बारभाईकडून राघोबादादा बंडखोर असल्याबद्दलचा जाहीरनामा.—१९ राघोबादादा बंडखोर आहेत हें दाखविणारें जाहीरनाम्यांतील कारण बारभाईच्या कारस्थानाला कसें विसंगत आहे!—२० आत्मरक्षणाकरता कोणतेंही दिव्य करण्याचा जन्मजात हक्क—२१ इंग्रज न्यायी होते ह्मणूनच त्यांनीं राघोबादादाना आश्रय दिला.—२२ बारभाईचे सेनापती हरिपंत फडके निजामाचे लांगुलचालन कसें करीत होते याचा मासला.—२३ उभयतां कारभारी राघोबादादांबरोबर वरोपांगी समेट करण्याकरतां पुरंदराहून निघाले, त्यावेळी त्याचा राघोबादादांस कैद करण्याचा मनसुबा होता.—२४ सवाईमाधवराव हे विष्णुचा अवतार. त्याच्या रक्षणाची जबाबदारी पुरुषोत्तम दाजीवर पडते. आनंदीबाई व राघोबादादा यांनीं पुरंदरगडावर सवाईमाधवरावाचा खून करण्याचा केलेला (!) कट पुरुषोत्तमदाजी प्रकाशांत आणतात या कारस्थानी नाटकाच्या प्रयोगाचे पुरुषोत्तम दाजी सूत्रधार.—२५ पुरुषोत्तम दाजीच्या नाटकाची दुःखपर्यवसायी परिसमाप्ती.—२६ पुरुषोत्तम दाजीच्या एकांकी नाटकांतील अद्भुतरम्य गोष्टी.

१. मागील प्रकरणीं सांगितल्याप्रमाणें गंगाबाईना पुत्र झाला. पेशव्यांच्या राज्याला दादासाहेबांपेक्षां वरच्या दर्जाचा वारस जन्माला आला. त्यामुळें बार-

भाईंच्या कारस्थानाला परमेश्वराचें अधिष्ठान आहे, असें लोकांना वाटूं लागलें. बारभाईंच्या उद्योगाला नवजीवन आलें. गंगाबाई यांना पुण्यांतून पुरंदर किल्ल्यावर जाण्याच्या वेळीं जरी अतिशय दुःख व भीति वाटली होती तरी त्यांना पुत्र झाल्याबरोबर बारभाई हे आपले खरे हितकर्ते आहेत, असें वाटूं लागलें व दादासाहेब आणि आनंदीबाई यांच्याबद्दल त्यांच्या मनांतील भीतिही कमी झाली. कांसेगांवच्या लढाईंत त्रिंबकरावमामा पडले या वार्तेमुळें नाना फडनविस यांची जी कंबर खचली होती, ती सवाईमाधवरावांच्या जन्मामुळें पुन्हां ताठ झाली व त्यांना पुढील कारस्थानाचे खेळ खेळावयाला जोम चढला. बारभाईंचे सूत्रधार ह्मणविणारे सखारामबापू यांना तर दोनच बोटें स्वर्ग उरला. अशा प्रकारें पुरंदर किल्ल्यावर कारस्थानी पेशवाईचा उदय झाला तर दुसरीकडे भारतवर्षांत सर्वत्र दुमदुमलेल्या पेशवाईच्या प्रखर समशेरीचा अस्त होऊं लागला. दादासाहेबांना पुरंदर किल्ल्यावरील वर्तमान समजलें. राज्याला खरा वारस झाला, तेव्हां पेशव्यांच्या राज्याकरतां धडपड करण्याची त्यांच्यावरील जबाबदारी अंशतः कमी झाली. परंतु खरा वारस पेशवाई गिळंकृत करणाऱ्या चोरांच्या हातीं आहे ही त्यांची भीति मात्र दुणावली. पेशवाईच्या वारसदारांचा हात अशा प्रकारें बारभाईंच्या कारस्थानी दगडाखालीं कायमचा सांपडला गेला, तरी अशा स्थितींतही तो हात तुटूं नये, व तसाच सांपडलेलाही राहूं नये, या दृष्टीनें दादासाहेबावर विचार करण्याचा पेंचप्रसंग आला. त्याप्रमाणें त्यांनी आपल्या पुढील कार्याचें धोरण ठरविलें.

२. पेशवाईच्या गादीला वारस झाला, तेव्हां यापुढील जे लढाईचे प्रसंग येतील ते उभय वारसदारांच्या भाऊबंदी तंट्यामुळें झाले, असें सर्वांना वाटेल व त्यामुळें आपल्या नांवाला कमीपणा येईल; शिवाय आपसांतील दुही ही पेशवाईच्या सर्वनाशाला कारणीभूत होईल ह्मणून दादासाहेबांनीं बारभाईंच्या पुढें दुसऱ्यांदा नमतें घेतलें. त्यांनीं लगेच चिंतो विठ्ठल व विसाजी केशव या उभयतांना बारभाईंबरोबर संधान करण्याकरतां पुरंदर किल्ल्यावर पाठविलें. [१]

१ ऐ. ले. सं. भाग २१४६.

हे दोघे दादासाहेबांच्या लष्करांतून निघून एप्रिल महिन्याच्या अखेरीस म्हणजे सवाईमाधवरावांच्या जन्मानंतर दहा बारा दिवसांनीं पुरंदरीं आले. त्यावेळीं किल्ल्यावर सवाई माधवरावांच्या बारशाचा सोहाळा चालला होता. बारभाईंच्या कपट—जालाचा फांसा दादासाहेबांकडील या दोघां मध्यस्थांवर टाकण्यांत आला. चिंतो विठ्ठल याची पूर्वी दादासाहेब यांनीं केलेली तैनात पंधरा हजाराची होती. तेव्हां त्याला तीस हजाराची तैनात बारभाईंनीं देण्याचें वचनप्रमाण केलें. विसाजी केशव याला बारभाईंनीं कोंकण तालुक्याचें आमिष दाखविलें व त्याला दादासाहेबांच्या पक्षांतून फोडलें. त्यांनीं या दोघांना पुरंदर किल्ल्यावर ठेऊन घेतलें व दादासाहेबांकडे पत्रें पाठवून संधानाच्या शर्ती त्यांना कळविल्या.

३. सवाईमाधवरावांचा जन्म ह्मणजे बारभाईंच्या कृष्णकारस्थानाच्या इमारतीचा कळस होता. ह्मणून त्याचा उदोउदो करण्याकरतां 'साक्षात् विष्णूनें अवतार राज्यरक्षाणार्थ घेतला'[1] असा डंका वाजविण्यास त्यांनीं सुरवात केली. राघोबादादा हे अर्थात् सवाईमाधवरावांचे म्हणजे विष्णूच्या अवताराचे शत्रू ह्मणून त्यांचा निःपात करण्याकरतां एकवचनी व एकबाणी संधानाची एकच रामबाण शर्त ठरविण्यांत आली. दादासाहेबांनीं 'दोन लाख रुपये दानधर्मास घेऊन आनंदवल्लीस रहावें' या एकाच अटीवर बारभाई दादासाहेबांच्या बरोबर संधान करण्यास तयार झाले. ही शर्त दादासाहेबांनीं मान्य केल्यास त्यांच्याजवळ आपला विश्वासू माणूस ठेऊन त्यांचा बंदोबस्त चांगला करावा अशी त्यांची भाषा होती. बारभाईंची वरील एक शर्त म्हणजे दादासाहेबांची सर्व पाळेंमुळें खणलीं जाऊन त्यांचा सर्वनाश होईल अशी ती रामबाण मात्राच होती. देवधर्माकरतां दोन लक्ष रुपये घ्यावे ह्मणजे १ राघोबादादांनीं आपला पेशवाईवरील कारभारीपणाचा हक्क सोडावा. २. आपल्या सर्व सरदारांचा परित्याग करून त्यांना बारभाईंच्या डोंगरी किल्ल्यावर तुरुंगांत नेऊन ठेवण्यास भाग पाडावें, ३. आपल्या सर्व भैयास रजा द्यावी, ४ आपलें स्वातंत्र्य बारभाईस विकून त्यांच्या कैदेंत आजन्म रहावें, ५ देवधर्माव्यतिरिक्त दादा-

---

१. ऐ. ले. सं. पान २१४९.

साहेबांनीं दोन लक्ष रुपयांतील एकही कपर्दिका खर्च करूं नये व तोंडांतून अन्य शब्द बाहेर काढूं नये; वगैरे वगैरे त्या शर्तीचा अर्थ होता. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे सवाईमाधवराव हा विष्णूचा अवताररूपी सूर्य उगवल्यानंतर दादासाहेबांनीं दिवाभीताप्रमाणें शक्य तर जगावें नाहींपेक्षां त्यांनीं उघड उघड मरावें हाच त्या शर्तीचा अर्थ होता.

४. दादासाहेबांना सवाईमाधवरावांचा जन्म झाल्याची वार्ता समजल्यानंतर ब्ऱ्हाणपुराच्या रोंखानें त्यांनीं कूच करण्यास सुरवात केली होती. त्यांच्यामागें हरिपंत फडके, पटवर्धन सरदार, साबाजी भोंसले व निजाम ही मंडळी लागली होती. दादासाहेबांनीं पुरंदरास ज्याप्रमाणें संधान करण्याकरतां दोन मध्यस्थी सरदार रवाना केले होते, त्याचप्रमाणें त्यांच्यामागें लागलेल्या फडके-पटवर्धना-कडेही त्यांनीं आपाजीराव पाटणकर व वंगोजी नाईक यांना रवाना केलें होतें. त्यांनाही फडके-पटवर्धन यांनीं भेदनीतीनें फोडलें. दादासाहेबांच्या सैन्यांतही फितूर केला. राघोबापू, भगवंतराव बेडेकर व बाजीपंत अण्णा हेही दादासाहे-बांना सोडून फडके-पटवर्धन यांच्या लष्करांत येऊन दाखल झाले. बारभाई अपापाचा माल गपापाला चालूं लागल्यामुळें, दिवसेंदिवस दादासाहेबांचा पक्ष कमी होऊं लागला. माधवराव पेशव्यांच्या वेळीं दादासाहेबांना जी तेरा लाखांची जहागीर व कांहीं किल्ले देण्याचा आपसांनींत करार ठरला होता, तेवढें घेऊन ते संधान करण्यास तयार होते. राघोबादादांना आपल्याप्रमाणेंच आपल्या सर-दारांचेंही जीविन रक्षण करावयाचे होतें. सखाराम हरी, सदाशिव रामचंद्र, मानाजी फांकडे, मालोजी घोरपडे, बाबूराव पाटणकर वगैरे सरदारांनीं दादा-साहेबांचा जो पक्ष धरला होता, त्या सरदारांसही दादासाहेबांना जगवावयाचें होतें. ह्मणून संधानासंबंधींची अत्यंत मानहानिकारक शर्त ज्यावेळीं बारभाई-कडून त्यांना समजली, त्यावेळीं आपल्या पक्षाचें रक्षण कोणत्या दृष्टीनें होईल, याचा विचार करूनच योग्य ते प्रयत्न करण्याचें त्यांना ठरवावें लागलें, व त्याप्रमाणें त्यांच्या पुढील हालचाली सुरूं झाल्या. बारभाईनीं दादासाहेबांचा सर्व बाजूंनीं फडशा करण्याचा विडा उचलिला. दादासाहेबांना आत्मरक्षणाकरतां

धडपड करण्याव्यतिरिक्त दुसरा कोणताही मार्ग आतां मोकळा राहिला नाहीं. बारभाईकडून संधान करण्याचे दादासाहेबांचे तीनही प्रयत्न निष्फळ झाले.

५. दादासाहेबांचा निःपात करण्याकरतां बारभाईनीं जे प्रयत्न केले, त्यांत निजामअल्लीला आपल्या पक्षाला ओढून घेणें हा मुख्य प्रयत्न होता. निजामअल्ली हा पेशव्यांचा मोठा शत्रू होता. माधवराव पेशव्यांच्या वेळीं राक्षसभुवनच्या लढाईंत त्याचें पारिपत्य करावयाला केवढा त्रास पडला हें मागें आलेंच आहे. त्यानंतर राघोबादादांनीं मोठ्या पराक्रमानें निजामाचा बेदरच्या लढाईंत पराभव करून त्याच्याबरोबर तह केला. असें असतां बारभाईनीं पेशव्यांच्या शत्रूला तेरा लक्ष रुपये खंडणीचा मुलुख देण्याचें ठरवून राघोबादादांविरुद्ध आपल्या पक्षाला ओढलें. या तेरा लक्ष उत्पन्नाच्या मुलुखानें निजामअल्ली संतोषित झाला नाहीं, ह्मणून दुसरे वेळीं त्याला अठरा लक्ष उत्पन्नाचा मुलुख देण्याचा करार केला. याप्रमाणें निजामाला आपल्या पक्षांत घेतलें ह्मणून साबाजी भोंसले याला धीर आला व तो बारभाईच्या पक्षाला जास्त चिकटला. गंगाबाईंना पुत्र होतांच दादा-साहेब हे पेशव्यांच्या राज्यात बंडखोर ठरलेच होते. तेव्हां त्या प्रदेशांत त्यांना राहतां येणें शक्यच नव्हतें. यांतून निजामअल्ली व साबाजी भोंसले हे राघोबा-दादांचे शत्रू बनल्यामुळें त्यांच्याही राज्यांत त्यांना आश्रय मिळण्याची शक्यता राहिली नाहीं. असें पाहून पेशव्यांचे जे दुसरे सरदार ते तरी यावेळीं आपणाला मदत करतात किंवा कसें हें पहाण्याकरतां राघोबादादा टोंक्यावरून ब्ऱ्हाण-पुराकडे चालले. आपणाला शिंदे, होळकर किंवा गायकवाड हे मदत करतील व त्यांच्या मध्यस्थीनें माधवराव पेशव्यांच्या वेळीं ठरलेली आपली जहागीर आपणाला मिळेल व नंतर आपण हरि हरि ह्मणत स्वस्थ बसूं असें त्यांना वाटत होतें. ह्मणून त्यांनीं उत्तर हिंदुस्थानाचा मार्ग धरला.

६. उत्तर हिंदुस्थानांतील पेशव्यांच्या साम्राज्याचे मुख्य आधारस्तंभ ह्मणजे शिंदे व होळकर हे सरदार होत. त्यांच्या दरबारींही पुण्याच्या दरबाराप्रमाणें मुत्सद्दी लोक होतेच. महादजी शिंदे हेही स्वतः चांगलेच मुत्सद्दी होते. साताऱ्याची हिंदुपदपादशाही पेशव्यांनीं कशी लाटली हा इतिहास त्यांना

कांहीं जुना झाला नव्हता. हिंदुपदपादशाहींतून पेशव्यांना जर स्वतंत्र होतां येतें तर त्यांचे सरदार जे शिंदे, होळकर, नागपूरकर भोंसले, गायकवाड वगैरे सरदार यांनाही स्वतंत्र होतां येईल, हा स्वार्थ त्यांच्या लक्षांत सहज येण्यासारखा होता. महादजी शिंदे स्वतः नाना फडनविस यांच्या तालमींतच तयार झाले असल्यामुळें आलेली संधि ते दवडण्याइतके खात्रीनें अप्रबुद्ध नव्हते. यावेळीं पुरंदरचें बारभाई-मंडळ आपल्या डावांत आहे. राघोबादादा मुत्सद्यांच्या पेंचांतून कसें शिरसलामत निसटून जातां येईल या विवंचनेंत आहेत, अशा घरगुती तंट्यांत आपला स्वार्थ कसा साधतां येईल एवढेंच या वेळीं शिंदे व होळकर यांना पहावयाचें होतें. उत्तर हिंदुस्थानांत मराठी सत्ता प्रस्थापित करण्यामध्यें व ती कायम राखण्यामध्यें शिंदे व होळकर यांना एकजीव होऊनच राहणें प्राप्त होतें. त्यामुळें शिंदे व होळकर यांचें पुणें दरबाराशीं एकच स्वरूपाचें राजकारण होत होतें. या प्रसंगीं बारभाईंना शिंदे व होळकर आपल्या पक्षाला असावे असें वाटत होतें, तर दादासाहेबांनाही आपल्याच पक्षाला या उभयतांनीं मदत करावी असें वाटत होतें. अर्थात् आपल्याशिवाय बारभाई व दादासाहेब यांचें आतां कोणत्याच प्रकारें चालत नाहीं असें पाहून त्यांनीं आपल्या राजकारणाचे डाव खेळण्यास सुरवात केली. राघोबादादा हे जसे आपले धनी, तसेच सवाईमाधवराव हेही आपले धनी. ह्मणून उभय धन्यांत तंटे नसावे व ते मिटविण्याचे आपण शिकस्तीचे प्रयत्न करीत आहोंत असा शिंदे व होळकर यांनीं पहिल्या प्रथम मध्यस्थी करण्याचा आंव आणला.

७. त्रिंबकरावमामा मेल्यानंतर त्यांच्या जागीं बारभाईंनीं हरिपंत फडके यांची योजना केली. त्यामुळें ते दादासाहेबांचा पाठलाग करूं लागले. दादासाहेब[1] ब्ऱ्हाणपुरास पोंचतात तों त्यांच्या पाठीवर हरिपंत फडके येत होते तेही पांच सहा मजलीच्या अंतरावर येऊन पोंचले. फडके यांच्याबरोबर पटवर्धन व रास्ते वगैरे सरदार असून शिवाय साबाजी भोंसले व पायदळ तोफखान्याच्या जय्यत तयारीनिशी खासा निजामअलीही होता. एकंदर फौज

१ ऐ. ले. स. पान २१६७.

पन्नास हजारावर जमली होती. एवढी फौज एकदिलाची असती तर दादासाहेबांचा बंदोबस्त करणेंच काय, पण दुसरी कोणतीही अवघड मसलत तिला सहज पार पाडतां आली असती. पण या फौजेंत निम्में बळ निजामअल्लीचें होतें. मराठ्यांना लुबाडण्याचा हा खासा हंगाम आला आहे; या वेळीं पुणें दरबाराकडून मुलखाचा व द्रव्याचा चांगलाच लाभ आपणास करून घेतला पाहिजे; व त्यासाठीं दादासाहेबांची मसलत जितकी लांबणीवर पडेल तितकें पुणें दरबारास आपलें जास्त अगत्य वाटेल, असें समजून तो कांहीं तरी निमित्त काढून मुक्काम करी व हळूं हळूं चाले. त्यामुळें या फौजेंत व दादासाहेबांच्या फौजेंत पन्नास साठ कोसांचें अंतर पडलें. साबाजी भोंसले तर मुधोजीस कह्यांत आणण्यापुरता पुणें दरबारास मिळाला होता. त्यापेक्षां त्या दरबारच्या मसलतींत अधिक मन घालण्याचें त्याला कारण नव्हतें. तोही निजामअल्लीप्रमाणेंच अनास्थेनें वागत असे. या दोघांस मागें टाकून दादासाहेबांचा निकडीनें पाठलाग आपल्या फौजेनिशींच हरिपंत फडक्यांनीं करावा तर शत्रूशीं गांठ पडून, त्रिंबकरावमामाप्रमाणेंच आपली दशा झाली तर कसें होईल, हें त्यास भय होतें. शिवाय मागें टाकल्यामुळें रुसून मोंगल व भोंसले परपक्षास मिळाले तर तिकडूनही मोठीच अडचण पडली असती. यामुळें मोंगल व भोंसले यांस बरोबर घेऊनच पाठलागाचें काम जसें चालेल तसें तें चालूं देणें हरिपंतास भाग पडलें. किती झालें तरी ही फौज मोठी व नामांकित सरदारांच्या हाताखालीं होती. तिच्याशीं गांठ पडली तर आपली धडगत नाहीं हें जाणून दादासाहेब बऱ्हाणपुरास गेल्यावर नर्मदा उतरून शिंदे होळकरांकडे जाण्याचा विचार करूं लागले. तेव्हां त्यांची फौज विस्कटण्यास प्रारंभ झाला. सात हजार फौजेनिशीं मुधोजी भोंसले दादासाहेबांस सोडून नागपुराकडे निघून गेले. महमद इसफ दोन हजार गारद्यांनिशीं मुधोजी भोंसल्याबरोबर निघून गेला. खरकसिंग हा तोरखेडें येथील सरंजामदार बडे आडनांवाचे होते त्यांच्या आश्रयास गेला. आणखीं हजारों लोक जिकडे जिकडे वाट फुटेल तिकडे तिकडे चालते झाले. भवानराव प्रतिनिधि, धायगुडे व दुसरे

कांहीं सरदार आधींच निघून गेले होते. दादासाहेब नर्मदा उतरूं लागले तेव्हां 'आमच्यानें यापुढें तुह्मांबरोबर पळवत नाहीं,' असें सांगून बजाबा पुरंदरे, आपा बळवंत, आनंदराव गोपाळ, शहाजी भापकर, खंडेराव दरेकर इत्यादि सरदार पंधरा हजार फौजेसह निघून हरिपंत फडके यांच्या लष्करास येऊन मिळाले. राहतां बाकी दादासाहेबाच्या तळावर, सखाराम हरी, मानाजी फांकडे, सदाशिव रामचंद्र, मालोजी घोरपडे, बाबुराव पाटणकर हे सरदार, दोन हजार स्वार, एक हजार गारदी, तीन चारशे उंट व पंचेवीस हत्ती एवढेच कायतें सामान दादासाहेबांच्याकडे राहिलें. तेव्हां ते भयभीत होऊन लांब लांब मजली मारून कसे तरी इंदुरास जाऊन पोंचले. तुकोजी होळकर तीन कोस सामोरा येऊन मोठ्या आदरानें त्यांना शहरात घेऊन गेला. महादजी शिंदे उज्जयनीस होता. तोही लगेंच त्यांस येऊन भेटला.

८. महादजी शिंदे व तुकोजी होळकर यांस माधवराव पेशव्यांनीं सरदाऱ्या दिलेल्या होत्या. त्या त्यांस न देण्याविषयीं दादासाहेबांचा अत्यंत आग्रह होता. त्यामुळे माधवरावाशीं त्याचे वितुष्ट वाढून उभयतांत लढाई होऊन पराजित झाल्यामुळें दादासाहेबांस कारागृहवास भोगावा लागला होता. या पूर्वपीठिकेवरून पहातां शिंदेहोळकरांनीं पुणेदरबारास सर्वथा अनुकूल असावे व दादासाहेबास प्रतिकूल असावें, हेच योग्य होतें, व वस्तुस्थितीही तशीच होती. परंतु तो राज्यक्रांतीचा काळ असल्यामुळें शिंदे व होळकरांची वागणूक पुणेदरबाराशीं किंवा दादासाहेबांशीं सरळ-पणाची नव्हती. अशी सरळपणाची वागणूक त्यांजकडून या प्रसंगीं न घडण्याचें कारण ह्मणजे कांहीं भय व कांहीं आपमतलबीपणा हें होय. भय असें कीं, सखारामबापू व नाना फडनविस यांनी सर्व सरदाराचें एकचित्त करून व मोंगलांशीं सख्य करून हें बारभाईचें कारस्थान उभारलें आहे. गंगाबाईना पुत्र झाल्यामुळें या मसलतीस विशेषच तेजी आली आहे. पण केवळ या भरावर जाऊन आजच्या प्रसंगीं आपण दादासाहेबांशीं शत्रुत्वानें वागलों आणि उद्यां मोंगल बिथरल्यामुळें, किंवा कोणी सरदार फितुर

झाल्यामुळें, अथवा कोणा जबरदस्ताचें दादासाहेबांस पाठबळ मिळाल्यामुळें, हें सर्व पारडें फिरलें आणि दादासाहेबांची सरशी झाली, तर आपली गत कशी होईल हें कोडें त्यांना पडलें. हैदरअल्ली, सुजाउद्दवला, रोहिले, इंग्रज या सर्वांशीं दादासाहेबांचीं हल्लीं राजकारणें घाटत आहेत. रास्ते पटवर्धन या खेरीज प्रतिपक्षाकडील बहुतेक सरदारांशीं त्यांचे पत्रव्यवहार होत आहेत. खुद्द पुण्यांतसुद्धां मुत्सद्याच्या नाना प्रकारच्या मसलती होत आहेत व खलबतें घाटत आहेत. अशा प्रसंगीं उद्यां काय होईल याचा नेम कोणी सांगावा? या करतां पुणेंदरबारची आज्ञा मान्य केल्यासारखें दाखवावें. व इकडे दादासाहेबांशीही गोड असावें. या प्रमाणें शिंदे-होळकरांचे या वेळीं विचार होते. व त्यास अनुसरून त्यांनीं वर्तन केलें. या वर्तनास आपमतलबीपणाची बाजू अशी होती कीं, 'जेथें धन्याच्या घरांत दुफळी तेथें चाकरांची चंगाळी.' हा न्याय सर्वत्र आहे. शिंदे-होळकरांस दादासाहेब नको होते हें खरें, पण राज्य निर्वैर होऊन लढाया व दंगेधोपे बंद झाल्यावर मग लढाऊ लोकांची मातबारी व अगत्य राहत नाहीं, हें त्यांस चांगलें कळत होतें. शिवाय शांतता झाल्यावर आपल्या ताब्यांत जहागिरीचा मुलुख आहे त्याचा हिशेब कारभारी मागूं लागतील हें त्यांस भय होतेंच. या करतां दादासाहेबांचें खूळ हें असेंच चालू रहावें, व त्यांचा बंदोबस्त करण्याच्या निमित्तानें पुणेंदरबारास वारंवार नडवून व हुलकावण्या दाखवून अधिक जहागीर उकळावी व आपलें स्तोम माजवावें, आणि कारभाऱ्यांस आपली पायधरणी करावयास लावावें असेंही त्यांचें धोरण होतें. मिळून दादासाहेबाचा पक्ष प्रबळ झाला तरी त्यांचें नुकसान नव्हतें; आणि तसे झालें नसतें तरी यांचा फायदाच होता.

९. श्रीमंत दादासाहेब नर्मदापार झाल्याची बातमी लागतांच हरिपंतांनीं पटवर्धन, रास्ते, विंचूरकर, नारो शंकर, घायगुडे, आपा बळवंत यांचीं पथकें मिळून वीस हजार फौज वामनराव पटवर्धनाबरोबर फार त्वरेनें आघाडीस पाठविली. ती नर्मदेवर पोहोंचते तोंच तिकडून महादजी शिंद्याची वामन

रावांस व हरिपंतास पत्रें आलीं कीं, श्रीमंत येथें आले आहेत. तुह्मी नर्मदा उतरून इकडे आल्यानें आमचा मुलुख खराब होईल व श्रीमंतांसही भय उत्पन्न होऊन ते भलतीकडे भकतील. या करितां तुह्मी आहां तेथेंच असावें. तुह्मी येथें आल्यानें जें काम व्हावयाचें तें आह्मी करीतच आहों. लवकरच श्रीमंतांची समजूत करून त्यांस देशीं घेऊन येतों. या लिहिण्यावर हरिपंतांचा फारसा भरंवसा नव्हता. कारण कीं, यापूर्वीं दादासाहेबांनीं माळव्याकडे येण्याचा रोंख धरिलेला पहातांच शिंदेहोळकरांनीं हरिपंतांस लिहिलें होतें कीं, श्रीमंतास इकडे येण्यास मार्ग दोन. एक हंड्याचा घाट किंवा बडव्याचा घाट. पैकीं हंड्याच्या घाटाचा बंदोबस्त आमच्या हातून होणार नाहीं. तो तुह्मीं फार जलद करावा. बडव्याच्या घाटाचा बंदोबस्त मात्र आह्मीं चांगला केला आहे. त्या मार्गानें आह्मी श्रीमंतांस येऊं देत नाहीं. पण त्याप्रमाणें हरिपंतांनें केलें असतां श्रीमंत बडव्यांच्याच घाटानें कांही एक आडकाठी न येतां खुशाल निघून गेले. तेव्हां मागच्या प्रमाणें ही देखील थाप नसेल कशावरून असें हरिपंतांस वाटणे साहजिकच होतें. पण एवढे थोर सरदार सांगत आहेत त्या अर्थी चार दिवस दम खावा व गोडीगुलाबीनें काय होईल तें पहावें असें मनांत आणून हरिपंत व वामनराव आपापल्या जागीं मुक्काम करून राहिले. शिंद्यांचें ह्मणणें कीं, दादासाहेबांवर हल्ला करून त्यांच्या सैन्याची दाणादाण करणें अवघड नाहीं. कारण त्यांच्याजवळ सैन्य अगदीं थोडकें आहे. पण अशी बळजबरी केल्यास 'अस्सल वैर व सरकारी काम हीं दोन्ही होत नाहीत.' ह्मणजे ते जिवावर उदार होऊन लढणार. त्यामुळें ते जिवंत हातीं लागावे व त्यांची फौज तर मोडली जावी हीं दोन्हीं कामें अर्थात होणार नाहींत. या करितां सामोपचारानेंच त्यांस वळवून ताळ्यावर आणितों. यानंतर इकडून तिकडे व तिकडून इकडे पत्रें व निरोप कित्येकदां आले गेले. उभय पक्षीं वकिलांचे हेलपाटेही झाले. आणा शपथा, चर्चा व घासाघासही बहुत झाली. याप्रमाणें महिना लोटून गेला तरी कांहीं होईना, असें पाहून वामनराव

नर्मदा उतरून एक मजल पुढें आला व हरिपंतानेंही तळ हालवून कूच केलें. तों शिंद्यांची पत्रें तांतडीचीं आलीं कीं, आतां उतावळी कराल तर मसलत बिघडेल. श्रीमंतांचा आमचा करार ठरला आहे कीं, 'आपणांस फौजेचें देणें पांच सात लक्ष रुपये झालें आहे. तेवढें कारभाऱ्यानीं वारावें व उभयतां सरदारांनीं ( शिंदे व होळकरांनीं ) आपणास देशीं घेऊन जावें व आपले मार्फतीनें आमचा बंदोबस्त करून द्यावा. कारभाऱ्यांवर आमचा विश्वास नाहीं. पण उभयतां सरदार त्यांशीं बोलून आमची जी सोय करून देतील ती आह्मांस मान्य आहे. तेव्हां शिंद्यांच्या लिहिण्याप्रमाणें हरिपंतांनीं शिंद्याकडे तात्काळ रुपये पटविले. हे रुपये हातीं पडतांच दादा-साहेब देशीं येण्याकरतां निघाले. त्यांच्या पाठीवर शिंदे व होळकर एक मजलीच्या अंतरानें होते. हें वर्तमान इ. स. १७७४ च्या जून महिन्यांत झाले.

१०. इकडे दक्षिणेंत काय काय वर्तमानें घडत होती,हेंही सांगितलें पाहिजे. बारभाईच्या कारस्थानामुळें दादासाहेब कर्नाटकांतून देशी आले, तेव्हां मुराररराव घोरपड्यानें आपली फौज तयार करून मे महिन्यांत तुंगभद्रेवर येऊन तळ दिला. दादासाहेबांच्या मसलतींत सर्व कार्यभाग तुह्मींच पतकरिला, आमचें स्मरण देखील केलें नाहीं, असा त्यानें वामनरावांस एका पत्रांत टोमणा मारला. त्यावरून या स्वारीच्या मनांत चालू असलेल्या राज्यक्रांतींत आपल्या वाटणीस कारभाऱ्यांनीं कांहीं मातब्बर काम घालावें व त्यापासून आपला फायदा करून घ्यावा असें होतें. पण तसा कांहींच योग न जुळल्यामुळें तो अनागोंदी व कनकगिरी येथील संस्थानापासून व डंबळच्या देसायापासून खंडणी घेऊन लुटालूट करीत चित्रदुर्गोपर्यंत जाऊन आगष्ट महिन्यांत परत गुत्तीस गेला. सर्व मराठी फौजा उत्तरेकडे गुंतल्या आहेत व कर्नाटक मोकळें पडलें आहे, हें पाहून बसालत जंगासही मुलूखगिरी करण्याचा हुरूप आला. तो अदवानींतून बाहेर पडून मुलूख लुटीत, जाळीत बागलकोटापर्यंत आला. हरिपंत फडके वेरुळाजवळ फौजेची छावणी करून राहिले होते. त्यास पुरंदराहून कारभाऱ्यांनीं पत्र लिहिलें कीं, बसालत जंगाचें पारिपत्य करण्यासाठीं आनंदराव रास्ते आणि

वामनराव व परशुरामभाऊ पटवर्धन यांस त्यांच्या फौजेसह इकडे पाठवून द्यावें. त्यावरून हरिपंतांनी त्याप्रमाणें त्या सरदारांची रवानगी केली. ते पुण्याच्या जवळपास येतात न येतात तों बसालतजंग घाई घाईनें अदवानीस परत गेला. यामुळें आषाढापासून पावसाळा संपेपर्यंत पटवर्धनांची फौज पुण्याच्या आसपास छावणी करून राहिली. माधवराव पेशव्यांनीं घेतलेला कर्नाटकांतील सर्व मुलुख दादासाहेबांनीं कल्याणदुर्गाच्या तहांत हैदरास देऊन टाकिला हें मागें आलेंच आहे. तो मुलुख ताब्यांत घेण्याचें काम हैदरानें या पावसाळ्यांत निर्वेधपणानें पार पाडलें. या मोहिमेवर त्यानें टिपूस नेमलें होतें. टिपूस चेनरायदुर्ग व गुरमकोंडा हीं ठाणीं घेण्यास मात्र थोडीबहुत लढाई करावी लागली. बाकीचीं शिरें, होसकोटें, बाळापूर, मदगिरी, वगैरे ठाणीं त्यानें जरब दाखवूनच काबीज केलीं. हा मुलुख सांभाळण्यास पुणें दरबारानें फौज पाठवावी तर त्याचें सर्व लक्ष दादासाहेबांचा बंदोबस्त करण्यांत गुंतून गेल्यामुळें तसें कांहीं एक घडून आलें नाहीं. दरबाराकडून कुमक न आल्यामुळें हीं ठाणीं शत्रूशीं मुळींच झुंजलीं नाहींत यांत आश्चर्य नव्हतें.

११. सवाईमाधवरावांचे कारभारी ह्मणून सखारामबापू व नाना फडनविस सर्व राज्याचा कारभार चालवात होते. ही गोष्ट मोरोबादादास अगदीं खपत नव्हती. त्यांचे मनांत राघोबादादा याना पुन्हां गादीवर बसवूनच आपण राज्यकारभार करावा असें होतें. श्रीमंत सवाईमाधवराव व त्यांची आई गंगाबाई आणि सखारामबापू व नाना फडनविस ही मंडळी पावसाळा सुरू झाल्यामुळें पुरंदर किल्ल्यावरील हवा वाईट ह्मणून खाली सासवडास येऊन राहिली होती; व तेथेंच सारा राज्यकारभार चालला होता. असें असतां आपणांस चौघांसही धरण्याची तयारी मोरोबादादांनीं केली आहे अशी त्यांस खात्रीलायक बातमी जून महिन्याचे अखेरीस एके दिवशीं कळल्यावरून ते मुलास व बाईस घेऊन पडत्या पावसाळ्यांत अतीशय धादलीनें पुरंदरास पळून गेले. एवढ्या धाडसाचा बेत मोरोबानें केला, तेव्हां दुसरे आणखी कोणकोण मुत्सद्दी या फितुरांत मिळाले आहेत व कोणती कोणती फौज त्यानें वश केली

आहे याबद्दल बापू व नाना यांना काळजी उत्पन्न झाली. जुलैच्या प्रारंभीं दादासाहेब नर्मदा उतरून आले, तेव्हां त्यांच्या इशाऱ्यावरून तेथील फितुरी लोक आणखी कोणतें संकट उत्पन्न करतील याचा नेम नाहीं, याकरतां आपल्या विश्वासाची कांहीं फौज आपणाजवळ पाहिजे असें मनांत आणून त्यांनीं पटवर्धनांची फौज पुण्याजवळ ठेऊन घेतली. दादासाहेब इकडे येत आहेत खरें. परंतु त्यांचें लक्षण वगैरे ठीक दिसत नाहीं असें समजून त्यांनीं पावसाळ्यांत बहुत आस्थेनें आपलीं राजकारणें पक्कीं केलीं व नवीन फौज चाकरीस ठेवण्याची तरतूद केली. आगष्ट महिन्यात दादासाहेब तापी नदी उतरून जों जों जवळ येऊं लागले तों तों कारभाऱ्यांच्या मनसव्यास अधिकाधिक रंग चढत चालला. खासा निजामअली व त्याचा सरदार घौशा हे जय्यत तयारी करून औरंगाबादेस छावणी करून होते. कारभाऱ्यांचा निरोप येण्याबरोबर त्यांनीं स्वारीस निघण्याची सिद्धता केली होती. नागपुराहून साबाजी भोंसलेही बाहेर निघण्याची सिद्धता करीत होता. नवीन ठेवलेली फौज पुण्यास जमा होत होती. हरिपंत फडके देऊळघाटासमीप तयारीनेंच राहिले होते. अशा स्थितींत दादासाहेबाचा काय बंदोबस्त करून द्यावयाचा हें ठरविण्यासाठीं शिंदे होळकराचे वकील पुरंदरास आले. त्यांनी सांगितलें कीं, दरसाल दहा लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलुख व मध्यंतरींचे दोन किल्ले दादासाहेबांस द्यावे, व त्यांवर देखरेख शिंदे होळकर यांची असावी. पुणें दरबारनें यासंबंधीं कोणतीही पंचाईत करूं नये. हें ह्मणणें कारभाऱ्यानीं तत्काळ मान्य केलें व शिंदे होळकरांच्या कांहीं बारीकसारीक मागण्या होत्या त्याही कबूल केल्या. आजपर्यंत शिंद्यांनीं कारभाऱ्यांकडून दादासाहेबांस पंधरा लक्ष रुपये मध्यस्थीचें ढोंग करून फौजेच्या देण्याबद्दल ह्मणून देवविले; आपणही लाख पन्नास हजार घेतले, शिंदखेड वगैरे किरकोळ ठाणीं घेतलीं. वर लिहिल्याप्रमाणें दादासाहेबांस जहागीर व किल्ले नेमून घेऊन त्यांच्या सर्व बंदोबस्तीचा मामला आपणाकडे करून घेतला व शेवटीं दगाबाजी करावयाची ती केलीच.

१२. भर पावसाळ्यांत दादासाहेब लष्करासह कूच करून येत होते. वाटेंत तापी व नर्मदा या महानद्या व इतर नदी नाले भरलेले असल्यामुळें हळूं

चालण्यास ही योग्य सबब त्यांस होतीच. शिंदे व होळकर यांचें बारभाई-बरोबर कशा प्रकारचें राजकारण चाललें आहे याचा सुगावा त्यांना होताच. आपण व बारभाई यांच्यांत ते जरी मध्यस्थ झाले होते होते तरी त्यांच्यापासून योग्य मध्यस्थी न होतां ते आपला स्वार्थ साधण्याकरतां लफंडावीचा मार्ग करीत आहेत असें त्यांना दिसून आलें. शिवाय शिंदे होळकर हे आपणाला स्वतःच्या हातचें एक बाहुलें निर्माण करून ठेवण्याच्या बेतांत आहेत, अशीही शंका त्यांना आली. तेव्हां स्वतः कांहीतरी धडपड केल्याशिवाय निभाव लागणार नाहीं, ह्मणून त्यांनीं बऱ्हाणपुराजवळ अशीरगड नांवाचा बळकट किल्ला आहे तो घेण्याचा प्रयत्न केला. परंतु तेथील किल्लेदार सावध असल्यामुळें दादासाहेबांचें कांहीं चाललें नाहीं. मानाजी फांकडे मात्र जखमी होऊन परत आले. वाटेंत जेथें जेथें खंडणी घेतां येईल तेथें तेथें ती वसूल करीत दादासाहेब पुढें येऊं लागले. या स्थितींत भाद्रपदाचे महिन्यांत जेव्हां शिंदे व होळकरांनीं वर लिहिल्याप्रमाणें आपल्या कबजांत दादासाहेबांनीं रहावें अशाबद्दलचा करार पुणे दरबाराशीं ठरविला तेव्हां शिंदहोळकरांचा डाव दादासाहेबानीं पूर्णपणें ओळखला व तो मान्य करण्यास ते अळंटळं करूं लागले. त्यांना एका बाजूला आग व दुसऱ्या बाजूला फोंपाटा असें झालें. दादासाहेब ही गोष्ट दिरंगाईवर टाकीत आहेत हें कारभाऱ्यांना समजलें. त्यांची दादासाहेबांचा सूड घेण्याची सर्व सिद्धता होतीच. ह्मणून त्यांनी शिंदे होळकरांना असा निरोप पाठविला कीं, ' तुमच्या ह्मणण्याप्रमाणें प्रत्येक गोष्ट मान्य केली असतां तुमच्यानें निभावणी होत नाहीं तर दादासाहेबांस वाटेल तें करूं करूं द्यावें. ते व आम्ही पाहून घेऊं.' त्यानंतर सरदारानीं कारभाऱ्याना लिहिलें कीं, आह्मीं दादासाहेबांबरोबर बोलणें करीत आहों. त्याचीं उत्तरें आपणास कळवून आपलीं त्यांस कळविण्यांत उगीच दिवस व्यर्थ जातात. याकरतां आपण पुरंदराहून निघून समीप यावें. ह्मणजे निकाल त्वरित होईल. तेंही ह्मणणें मान्य करून पुरंदरचें व श्रीमंत सवाईमाधवराव यांचें संरक्षण करण्याचें काम पुरुषोत्तमराव पटवर्धन यांजवर सोंपवून उभयतां कारभारी बाहेर निघाले. पण ते रिकामे आले नाहींत.

त्यांजबरोबर पंचवीस हजार फौज होती. शिवाय ते निघाल्या बरोबर मोंगल व साबाजी भोंसलेही त्यांस मिळण्याकरतां त्वरेनें येऊं लागले. हरिपंत फडकेही तळ हालवून दादासाहेबांच्या रोंखानें चार मजली कूच करून आले. या जय्यत तयारीनें शिंदे-होळकर यांच्या मनास संतोष वाटला नाहीं. सांप्रत त्यांनीं तीस हजार फौज जमा केली होती व त्यांस अशी आशा होती कीं, या फौजेच्या जरबेवर कारभाऱ्याशीं गरम नरम बोलून दादासाहेबांस देशीं परत घेऊन आल्याविषयींचें उपकाराचें ओझें त्यांच्या शिरावर लादून या प्रसंगीं आपले मागील हिशोब होणें आहेत ते फडशा करून घ्यावे व हिंदुस्थानच्या मोहिमेची तयारी आपणाकडे सोंपवून घ्यावी. अशा मसलतींत ते होते. परंतु बारभाईंची जबरदस्त तयारी पाहून त्यास काळजी वाटली कीं, आपण इतकें करून यश पदरांत पडत नाहीं. आता दादासाहेबांस जाऊं द्यावें तर कारभाऱ्यांचा राग होणार; धरून द्यावें तरी पंचाईत. अशी विवंचना त्यांना पडली. एकंदरींत हे सरदार कारभाऱ्यांविषयीं बाह्यात्कारी उत्सुक पण मनांतून उदासीन होते. दादासाहेबांनीं शिंदे होळकर यांचा डाव पूर्वीपासून ओळखल्यामुळें व पुरंदराहून फौज त्यांच्या रोंखानें येत असल्यामुळें आपण दगाबाजीनें उभयतांच्या कोंडींत सांपडूं असें त्यांना खात्रीनें वाटलें, ह्मणून ते शिंदे-होळकर यांना चुकवून पहिल्याच दिवशीं वीस कोसाची मजल मारून तापीवर गेले. तेथें ताल्नेरास बुंनगे व जड सामान टाकून देऊन ते नर्मदेवर गेले. तेथें आनंदीबाई होती. तीस घेऊन सेंधवेच्या घाटानें मावळ्यांत शिरून धारेस गेले. आनंदीबाई गरोदर होती. तिला पळण्याचे श्रम सोसेनात. सबब तिला धारेस ठेऊन आपण उज्जयनीस गेले. तों मागून शिंदे होळकर व हरिपंत यांच्या फौजा समीप आल्या.

१३. उभयतां कारभारी व नबाब मागून येत होते ते नर्मदेपर्यंत आले. या पुढें पाठलागास आपण जाण्यांत काहीं विशेष आहे असें नाहीं; कारण तें काम हरिपंत करीतच आहेत; शिवाय इंग्रजांनीं साष्टीस वेढा घातल्याची खबर आली आहे, तिकडेही कुमक पाठविणें जरूर आहे असें

मनांत आणून कारभारी परत पुरंदरास आले. येतांना त्यांनीं नबाबास आपल्या स्थळास जाण्यास निरोप दिला, व स्वत बरोबरची बहुतेक फौज हरिपंतांकडे पाठवून दिली.

१४. इकडे दादासाहेबांचा पळण्याचा व समेटाचें बोलणें करण्याचा क्रम एकाच वेळीं चालू होता. त्या कामीं मध्यस्थीकरतां ह्मणून त्यांजकडून मालोजी घोरपडे, बाबूराव पाटणकर व यशवंतराव माने हे सरदार शिंदे होळकर यांच्याकडे आले होते. ते परत दादासाहेबांकडे जाण्यास कंटाळून इकडेच राहिले. दादासाहेबांच्या मनांत पुढील तीन राजकारणांपैकीं कोणतें तरी एक साधावयाचे होतें. १ सुजाउद्दवल्याकडे जावें. तें न होईल तर २ हैदरअल्लीकडे जावें. हीं दोन्हीं न होतील तर ३ इंग्रजांकडे जावें. शिंदे, होळकर व हरिपंत हे एकत्र झाल्याची खबर येतांच आता सुजाउद्दवल्याकडे किंवा हैदराकडे जावें, तर पल्ला फार लांबीचा असल्यामुळें सुरक्षितपणे जाऊन पोंचणें दुरापास्त आहे, असे जाणून त्यानीं सुरत व भडोच येथील इंग्रजांच्या आश्रयास जाण्याकरतां व गोविंदराव गायकवाड यांचे सहाय्य मिळविण्याकरिता गुजराथेकडे पळ काढला. त्यांच्या पाठोपाठ हरिपंत फडके वगैरेंच्याही फौजा निघाल्या.

१५. दादासाहेब ता. ३ जानेवारी सन १७७५ रोजीं बडोद्यास येऊन पोंचले. बडोद्यास येण्याचा त्यांचा हेतु एवढाच होता की, गोविंदराव गायकवाडांचें सहाय्य घेऊन आलेल्या प्रसंगांतून मुक्त व्हावें. इंग्रज हे परकी आहेत. त्यांची मदत मागणें ही अखेरची व निर्वाणीची गोष्ट त्यांना वाटत होती. नानासाहेब पेशव्यांनीं इंग्रजांची मदत आंग्रयांच्या बाबतींत घेतली होती. त्यामुळें पेशवाईचें किती नुकसान झालें होतें हें त्यांना माहीत होतें. ह्मणून पहिल्यानें स्वकीय लोकांकडे मदत मागावी व ती निष्फळ झाली तर, केवळ जिवावर बेतलें ह्मणून शिंगावर घ्यावयाचें या न्यायानें, इंग्रजांची मदत शेवटीं मागावयाची असें त्यांनीं ठरविलें. या वेळीं बडोद्यास गोविंदराव गायकवाड व फत्तेसिंग गायकवाड या सावत्र

बंधूंत युद्ध चाललें होतें. दमाजी गायकवाड हा राघोबादादांच्या पक्षाचा होता. इ. स. १७६८ मध्यें राघोबादादा व माधवराव यांच्यांत जें युद्ध झालें, त्या वेळीं दमाजी गायकवाडानें आपला मुलगा गोविंदराव यास दादासाहेबांच्या मदतीस पाठविलें होते. त्या प्रसंगीं माधवरावांनीं दादासाहेबांस जिंकलें व त्यांना कारागृहवासाची शिक्षा दिली. नंतर थोड्याच दिवसांनीं दमाजी गायकवाड मृत्यू पावला. दमाजीला तीन स्त्रिया व चार पुत्र होते. पहिल्या स्त्रीपासून गोविंदराव, दुसऱ्या स्त्रीपासून सयाजी व तिसऱ्या स्त्रीपासून माणिकजी आणि फत्तेसिंग असे चार पुत्र झाले. सयाजीराव हा दुसऱ्या स्त्रीपासून जरी झाला होता तरी ता वयानें गोविंदरावांपेक्षा वडील होता, परंतु तो वेडसर होता. गोविंदराव हा वडील स्त्रीचा मुलगा असल्यानें, जहागिरीचा तोच खरा वारस असून चागला कर्तृत्ववानही होता. परंतु ज्या वेळीं दमाजी मृत्यू पावला, त्या वेळीं गोविंदराव हा राघोबादादांबरोबर त्यांच्या पक्षाचा म्हणून पुण्यास कैदेंतच होता. दमाजी मेल्यानंतर त्याची गादी व त्याची 'सेना खासखेल' ही पदवी यांचा गोविंदराव हा खरा वारस होता. त्या वेळीं त्याला कोणी प्रतिस्पर्धी नव्हता. गोविंदराव हा राघोबादादांच्या पक्षाचा होता, एवढेंच माधवरावांच्या दृष्टीनें त्याला गालबोट लागलें होतें. माधवराव पेशवे व त्यांचे सर्वाधिकारी कारभारी नाना यांना राघोबादादांचा पक्ष नामशेष करावयाचा होता. त्यांनीं मानाजी फांकडे याच्या जागीं आपल्या पक्षाचे महादजी शिंदे आणले; होळकरांच्या गादीला त्रयस्थ असा तुकोजीराव उभा करून त्याला आपल्या पक्षांत ओढलें; मुधोजी भोंसले यांच्या जागी साबाजीला उभा करून त्यालाही आपल्या पक्षांत सामील केलें. आता फक्त राहिला गायकवाडाचा प्रश्न. तोही या वेळीं नाना फडनविसांना सोडवून घ्यावयाचा होता. राघोबादादांचें पाठबळ नेहमीं सत्पक्षालाच असे. पण अन्यायानें खऱ्या वारसाला काढून टाकून बेवारसाला वारस करून त्याला जन्माचा मिंधा बनविणें ही नानांची हातोटी होती. म्हणून

गोविंदरावाऐवजीं त्याच्या सावत्र भावाला आपल्या बगलेंत मारण्याचा प्रयत्न पुणें दरबारकडून झाला परंतु त्या वेळीं गायकवाडांत गृहकलहाला तोंड फुटलें नव्हतें. ह्मणून गोविंदरावाकडूनच दादासाहेबांचा पक्ष धरल्याबद्दल भरभक्कम गुन्हेगारी घेऊन त्याना गायकवाडांच्या गादीचे मालक केलें. माधवरावानीं गरीब दादाचा पक्ष धरल्याबद्दल गोविंदरावांकडून तेवीस लक्ष रुपये गुन्हेगारीचे व एकवीस लक्ष रुपये नजराणा आणि साडेसहा लक्ष रुपये न सांगण्यासारख्या आणखीं कांहीं कारणाकरतां असे मिळून साडेपन्नास लक्ष रुपये रोख घेतले. शिवाय प्रतिवर्षीं सात लक्ष रुपये खंडणी व तीन हजार स्वारानिशी गोविंदरावाच्या सरदारानीं पुण्यास निरंतर चाकरी करावी व मोहिमेचे ज्या वेळीं काम पडेल त्या वेळीं चार हजार स्वारांनिशी चाकरी करावी असें मान्य करून घेऊन गोविंदरावांस 'सेनाखासखेल' ही पदवी व बडोद्याची गादी दिली. इतकें झालें तरी गोविंदराव हा दादासाहेबाच्या पक्षाचा ह्मणून त्याला शांततेनें त्याच्या गादीचा उपभोग घेऊं देण्याचें माधवराव व नाना यांच्या मनांत नव्हतें. ह्मणून त्यांनीं तेथें गृहकलह उत्पन्न करविला. सयाजीराव वयानें वडील पण वेडसर होता. त्याचा मुतालिक फत्तेसिंग बनला व तो गोविंदरावांबरोबर कलह करूं लागला. त्याला अर्थात् पुणें दरबाराची फूस असल्यामुळें गोविंदराव व फत्तेसिंग यांच्यामध्यें युद्धाच्या कटकटी उत्पन्न होऊं लागल्यानंतर फत्तेसिंग हा पुण्यास आला. त्यानें पेशव्यांशीं बोलणें लाविलें कीं, आपण गोविंदरावानें देणें असलेल्या सर्व रकमेचा निर्गम करून देतो आपणास सरदारी द्यावी. गोविंदराव[1] हा दादासाहेबांचा अभिमानी असल्यामुळें त्याच्याकडे पेशव्यांचा ओढा विशेष असा नव्हताच. त्यांतून फत्तेसिंगानें पुणें दरबारचे मुत्सद्दी अनुकूल करून घेतले असल्यामुळें ते त्यासच सरदारी द्यावी, असें ह्मणूं लागले. नजराण्याची वगैरे सर्व रक्कम देऊन मामूल वहिवाटीप्रमाणें पेशवे सरकारची फौजेनिशीं चाकरी

---

१ ग्रँ. डे. पान ३२६१.

करण्याचीही फत्तेसिंगानें कबुली दिली. तेव्हां सरदारीचीं वस्त्रें फत्तेसिंगास देण्यावांचून माधवराव पेशव्यांस गत्यंतर राहिलें नाहीं. परंतु पूर्वी आपणच केलेलें आपणच कसें फिरवावें असें मनांत आणून श्रीमंतांनीं त्यांतल्या त्यांत दुफळी पाडण्याकरतां असें केलें कीं, गोविंदरावांकडे सरदारीचा धनीपणा व सेनाखासखेल हें पद पूर्वीप्रमाणेंच असावें, व त्यांनीं आपल्या खर्चापुरती तीन लक्षांची जहागीर तोडून घेऊन पुण्याजवळ दावडी येथें रहावें असें ठरविलें. फत्तेसिंगास सेनाकर्ते असें नवीन पद देऊन गायकवाडांचा मुलुख व फौज त्याचे हवालीं केली. फत्तेसिंगानें सरकारांत रक्कम भरली व हैदरअल्लीवरच्या तिसऱ्या स्वारीत चार हजार फौज कर्नाटक प्रांतीं चाकरीस पाठविली. माधवराव पेशवे जिवत असेपर्यंत गोविंदराव हे निर्माल्यवत् होऊन दावडीस बसले होते. पुढें नारायणरावांचे मृत्यूनंतर दादासाहेबांनीं गोविंदरावासंबंधीं माधवरावांनीं केलेला अन्याय दूर करून त्यांना पुन्हां बडोद्याची सरदारकी दिली. त्यामुळें फत्तेसिंग व गोविंदराव यांच्या युद्धाच्या कटकटी पुन्हां सुरू झाल्या. पुढें बारभाईंनीं दादासाहेबांस पदच्युत केल्यानंतर फत्तेसिंगाच्या मदतीकरतां त्यांनी पुण्याहून पांच हजार सैन्य नारो आनंदराव या नांवाच्या सरदाराबरोबर पाठविलें. गोविंदरावांनीं प्रांतांत ठाणीं बसवून फत्तेसिंग बडोद्यांत होता तेथें त्यास वेढिलें होतें. त्याच्या कुमकेस पुण्याहून गेलेली फौज सोनगडापर्यंत जाते न जाते, तों खुद्द दादासाहेबांची स्वारीच तिकडे गेली. त्यामुळें ती फौज सोनगडासच थबकून राहिली व हरिपंत फडके वगैरे पाठलाग करीत तिकडे आले तेव्हां त्यास सामील झाली.

१६. गोविंदरावांस दादासाहेब येऊन सामील झाल्यानंतर उभयतांच्या फौजा बडोद्याजवळ पंधरा दिवसपर्यंत स्वस्थपणें होत्या. त्यानंतर शिंदे-होळकरांस बरोबर घेऊन हरिपंत फडके सर्व फौजेसह बारा कोसांच्या अंतरावर येऊन ठेपले. ही बातमी कळतांच दादासाहेब व गोविंदराव बडोद्याहून तळ हालवून अहमदाबादेस जाण्याच्या उद्देशानें मही नदीच्या रोखें

चालले. फत्तेसिंग हरिपंतांस सामील झाल्यावर तें लष्करही दादासाहेबांचा पाठलाग करीत आलें. तेव्हां उभयपक्षीं थोडीशी झटपट होऊन इकडे तिकडे शेंदोनशें लोक जायाजखमी झाले. मानाजी फांकडे व गोविंदराव हे तोंडावर होते त्याशीच ही झटपट झाली. दादासाहेब चार कोस दूर गेले होते. फडक्यांच्या लष्करांत शिंदे-होळकर होते. त्यांचें दादासाहेबांकडे फितुरीचें सूत्र असल्यामुळें इकडील वित्तंबातमी तिकडे जात असे. परंतु तिकडील बेत काय आहेत हें मात्र इकडे कळण्यास मुष्कील पडे. शिवाय आपल्या बाजूच्या सरदारांत फितुर असल्याचें माहीत असल्यामुळें आपापसांत आशंका उत्पन्न होऊन कोणीही सरदार पुढें होऊन मेहनत करण्यास धजत नसे. याचा परिणाम असा झाला कीं, दादासाहेब कांहीं एक अडथळा न येतां बाजार बुणग्यासह खुशालपणें महीनदी उतरून गेले. पलीकडे जातांच त्यांनीं तोफा, पायदळ व पंधरा हजार स्वार अशी फौज नदीचा उतार रोंखून उभी केली. मागून हरिपंतांचें लष्कर आलें. त्यास घाट रोंखल्याची बातमी आगाऊ समजली नव्हती. आघाडीस पटवर्धन होते. त्यांचें पांच सहाशें माणूस नदी पार झालें व आणखीही कोणी कोणी पलीकडे गेले. तों तिकडून एकदम मारा सुरू झाल्यामुळें ते सर्व लोक माघारे नदी उतरून आले. मागून आणखी फौज पलीकडे जाण्याचा एल्गार करीत होती. पण जागा अवघड असल्यामुळें या फौजेचा काट चालेनासा झाला. उभय पक्षीं चार घटिका तोफातोफी मात्र झाली. पण तींत विशेष असें कांहीं निष्पन्न झालें नाहीं. शेवटीं नदी उतरण्याचें काम दुसरे दिवसावर टाकून सायंकाळीं फडक्यांचें लष्कर परत तळावर आलें. दुसऱ्या दिवशीं निघण्याची तयारी होते न होते तोंच दादासाहेबांकडून सल्ल्याचें बोलणें करण्याकरतां वकील आले. ते वकील शिंदे-होळकर यांच्या मध्यस्थीनें बोलत होते. दोन्हीं लष्करें सतरा दिवस महीनदीच्या पलीकडे व अलीकडे अशीं राहिलीं होतीं. समेटाचीं नित्य नवीं बोलणीं होत होतीं. शेवटीं शिंद्यांनीं दादासाहेबांच्या वतीनें हरिपंत फडक्यांस शेवटचीं-निर्वाणीचीं कलमें कळविलीं. दादासाहेबांस फौजेचें देणें

बत्तीस लक्ष रुपये झालें आहे तें सरकारांतून त्यांस द्यावें. व जातीच्या खर्चाकरतां दरसाल दहा लक्ष रुपये उत्पन्नाची जहागीर त्यांस द्यावी. हें बोलणें ऐकतांच हरिपंतांनीं शिंदे व होळकर यांस रागानें उत्तर दिलें कीं, 'गुदस्तांपासून तुह्मीं या समेटाच्या मध्यस्थींत पडून सरकारांतून दादासाहेबांस मनस्वी रुपये देवविले व आणखीही द्यावे ह्मणून आतां ह्मणतच आहां. मी फडणिशीकडचा यःकश्चित् कारकून. सरकारचे बत्तीस लक्ष रुपये दादासाहेबांस आपल्या जबाबदारीवर देण्याची माझी योग्यता नाहीं. दादासाहेब व तुह्मीं काय पाहिजे तें ठरवा व करा. आह्मांस येथें राहाण्याचें कारण नाहीं.' याप्रमाणें बोलून हरिपंततात्या तात्काळ फौजेसह कूच करून परत बडोद्यास आले. त्यांचे मागोमाग शिंदे-होळकरांनीं येऊन त्यांची समजूत केली कीं, दादासाहेबांबरोबर लढाई करण्यांत आह्मी पुढाकार घेतों ह्मणजे तुमच्या संशयास कारणच राहिलें नाहीं. तुह्मीं सडे होऊन आमच्यामागें मात्र असावें. याप्रमाणें बोलणें झाल्यावर हरिपंत सडे स्वारीनें पुन्हां दादासाहेबांवर गेले. पण पुढें तारीख १७ फेब्रुवारी सन १७७५ रोजीं दादासाहेबांशीं जी महीनदीच्या पैलतीरीं मोठी लढाई झाली तींत शिंदे होळकर यांनीं विशेष पुढाकार घेतल्याचें कोठेंच नमूद झालेलें नाहीं. फत्तेसिंगानें मात्र त्या प्रसंगी उत्तम प्रकारें मेहनत केली. या लढाईत दादासाहेबांचा पूर्ण पराभव होऊन त्यांच्या फौजेची दाणादाण झाली. असा पराजय होण्याचें कारण दादासाहेबांच्या सांगण्यांत असें आलें कीं, 'फौजे'च्या मध्यभागीं चार हजार स्वार व दहा हजार अरब पायदळांनिशीं आपण उभे होतों. पंचेवीस हजार फौजेनिशीं हरिपंतानें मुद्दाम मध्यभागावरच हल्ला केला. तेव्हां आयत्या वेळीं ते अरब लढण्याचें नाकारून निघून गेले. मग चार हजार स्वारांनिशीं उभें राहून पंचेवीस हजार फौजेचा मारा सोसणें होईना. सबब आपणास लढाईतून त्वरेनें निघून जावें लागलें.' याप्रमाणें दादासाहेबांचा पूर्ण पराभव झाला. या वेळीं दादासाहेबांच्या तोफा, हत्ती, निशाणें व बाबूराव पाटणकर, गणेश विठ्ठल हे सरदार हरिपंतांच्या हातीं लागले. लढाई सायंकाळच्या प्रहर

1 Selections from State Papers Bombay page 218.

दिवसापासून काळोख पडेपर्यंत चालून तिचा असा परिणाम झाल्यावर थोड्याशा फौजेनिशीं दादासाहेब खंबायतकडे पळून गेले. गोविंदराव व खंडेराव गायकवाड, मानाजी फांकडे, सदाशिव रामचंद्र, आबाजी महादेव, सखाराम हरी, वगैरे बाकीचे सरदार जी काय फौज व सामान राहिलें तें घेऊन नडियादकडे पळाले. हरिपंतांची फौज रात्रभर लढाईच्या जागीं राहिली. उजाडल्यावर त्या फौजेच्या दोन टोळ्या झाल्या. एक टोळी दादासाहेबांच्या पाठलागाकरतां वामनराव पटवर्धनाबरोबर खंबायतकडे रवाना करून दुसरी टोळी स्वतः घेऊन हरिपंत नडियादकडे गेले. दादासाहेब खंबायतास पोंचतात तोंच पाठोपाठ पटवर्धन येत असल्याचीं वर्दी आली. तेव्हां दादासाहेबांनीं खंबायतच्या नबाबास सांगून पाठविलें की, आह्मांस तुमच्या किल्ल्यांत आश्रय द्यावा; पण किल्ल्याकडे येऊं देण्याचें त्यानें साफ नाकारल्यामुळें दादासाहेबांनीं तेथें इंग्रजांची वखार होती तिजवरील अंमलदारास सांगितलें कीं, तूं कसेंही करून आह्मांस सुरतेस पोंचवून दे. त्यानें उत्तर केलें कीं, आमचीं जहाजें भावनगरच्या बंदरांत आहेत. तेथें आपण जावें ह्मणजे जहाजवाले आपणांस सुरतेस नेतील. त्याप्रमाणें ते भावनगरास गेले. बरोबर फारशी फौज नव्हती. तेथें जहाजांत बसून ते सुरतेस इंग्रजांच्या आश्रयाला सुखरूपपणें जाऊन पोंचले. ही गोष्ट तारीख २३ फेब्रुवारी सन १७७५ रोजीं झाली. इंग्रजांनी शेवटीं दादासाहेबांस आश्रय दिला.

१७. कित्येक इतिहासकार दादासाहेब इंग्रजांच्या आश्रयाला गेले ह्मणून त्यांना दूषण देतात. परंतु त्यांनीं दादासाहेबांच्या परिस्थितीचा बिलकूल विचार केला नाहीं, असें मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें. परकीय लोकांकडे मदतीची याचना करावयाची नाहीं व घरगुती तंटा घरांतच मिटवावयाचा, याबद्दल दादासाहेबांनी पहिल्यापासून संधानाचे कसे प्रयत्न केले हें वेळोवेळीं मागें आलेंच आहे. त्यावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, दादासाहेबांना इंग्रजांचा आश्रय घेण्यास बारभाई कारभाऱ्यांनींच भाग पाडलें. वाघाच्या शिकारींत हांकेमारी सुरूं असतांना तीन

बाजूंनीं वेढा देऊन हांक्याला सुरवात होते. त्यामुळें जो एक मार्ग मोकळा राहतो त्या मार्गानेंच वाघ पळूं लागतो. बारभाईंनीं दादासाहेबांची तीच गत केली होती. निजामअल्लीस भरमसाट मुलुख देऊन त्याला आपलासा केला. साबाजी भोसले त्यांच्याच पक्षाचा होता. त्यामुळें दादासाहेबांस उत्तरेकडे शिंदेहोळ्करांकडे जावें लागलें. त्यांच्या मदतीची त्यांनीं अपेक्षा केली तर ते मध्यस्थीमध्यें घरच खाण्याच्या बेतांत दिसले. तेव्हां त्यांच्या कोंडींतून त्यांना सुटतां सुटतां नाकीं नऊ आले. नंतर त्यांनीं गोविंदराव गायकवाडाचा आश्रय केला; परंतु त्याचेंही घर बारभाईंनीं फत्तेसिंगाला प्रतिस्पर्धी निर्माण करून पोखरून ठेवलें होतें. त्यामुळें गोविंदरावांच्या मदतीचा उपयोग न होतां मध्यस्थ शिंदे व होळकर यांच्या मदतीनें त्यांचा पराभव झाला. नंतर ते खंबायतकडे पळत सुटले असतां त्यांच्यामागें पटवर्धनांचा ससेमिरा लागला. अशा प्रकारें दादासाहेबांना फक्त समुद्राची दिशा पळण्याकरतां बारभाईंनीं मोकळी ठेवली. तेव्हां दादासाहेब इंग्रजांच्या आश्रयाला न जातां आपल्याबरोबर असलेल्या लोकांनिशीं त्यांनीं समुद्रांत जलसमाधी कां घेतली नाहीं अगर माळव्यांतून येतांना अफूच्या गाड्या भरून आणून ती खाऊन आत्मनाश कां करून घेतला नाहीं, असेंच दादासाहेबांना दूषण देणाऱ्या इतिहासकारांचें म्हणणें असेल तर त्याबद्दल आम्हांस कांहींच बोलावयाचें नाहीं. पण मानवी धर्म जाणून जर विचार करावयाचा असेल तर मात्र दादासाहेबांवर इतिहासकारांना कोणताच अपराध लादता येणार नाहीं. दादासाहेबांना पेशव्यांच्या इभ्रतीची जेवढी चाड होती त्याच्या शतांशसुद्धां या आपमतलबी स्वार्थसाधू बारभाईंना नव्हती. जो तो पेशवाईचीं शकलें पाडून आपल्या पोळीवर तूप ओढण्याकरतां एकत्र झाला होता. दादासाहेबांचें रक्त अस्सल पेशव्यांचें होतें. त्यांनीं आपलें रक्त पेशव्यांची इभ्रत, पेशव्यांचें राज्य व पेशव्यांची कीर्ति वाढविण्याकरतां खर्च केलें होतें. ते जन्मजात पेशवे होते व त्यांना पेशवे म्हणूनच मरावयाचें होतें. अशा स्थितींत त्यांच्या अंगांत रक्ताचा एक बिंदु असेपर्यंत ते आपल्या जन्मजात

हक्काकरतां भांडतील किंबहुना मरतीलही. हा स्वभावधर्म पराक्रमी पुरुषाचा आहे. जातीवंत वीराचा आहे. तो मनुष्यस्वभाव आहे. राघोबा-दादा माणूस होते. मनुष्याच्या हातून जेवढें नमतें घेऊन आपसातींत करावयाचें तेवढें सर्व त्यांनीं केलें होतें. गंगाबाई प्रसूत होण्यापूर्वींच व पेशवाईच्या नावलौकिकाचा बोजवारा उडण्यापूर्वी त्यांनीं समेटाच्या शर्ती अगदीं कमींत कमीं दिल्या होत्या. माधवराव पेशव्यांनीं ठरविलेली जहा-गीर घेऊन स्वस्थ बसण्यास ते तयार होते. त्यावेळीं बारभाईंनीं आपला चढलेला पारा जर थोडा उतरविला असतां तर सर्वच गोष्टी गुलदस्तांत राहिल्या असत्या. परंतु दादासाहेबांचा नाश केल्याशिवाय बारभाईंना चरावयाला रान मोकळें मिळणार नसल्यानें त्यांनीं दादासाहेबांच्या नाशाची तयारी केली. अशी सर्व वस्तुस्थिति असतां त्या मालिकेंत जर सांप्रतचे इतिहासकारही जाऊं लागले व दादासाहेबांना दूषणें देऊं लागले तर सरळ वृत्तीच्या वीर पुरुषाला जगांत जगण्याचा अधिकारच नाहीं असें मोठ्या दुःखानें ह्मणावे लागेल.

१८. बारभाईंनीं पुरंदराहून राघोबादादांचा बंदोबस्त करण्याकरतां व सर्व तऱ्हेनें ते नादार झाले आहेत हे सर्व हिंदुस्थानभर कळण्याकरतां त्यांनीं एक फर्मान काढलें. त्या फर्मानातील आशय असा—"आतां[1] रघु-नाथ बाजीराव अशी पत्रें येतील तीं कोणी मानूं नये. रघुनाथ बाजीराव बंड आहेत. त्यांजकडे कोणी गेलें असतां व कोणी सामील झाला असतां त्याचा बंदोबस्त सरकारातून केला जाईल." बुंदेलखंड, झाशीं, गुजराथ व काठेवाड येथें व हिंदुस्थान येथें विसाजी कृष्ण बिनीवाले होते त्यांस व शिंदे, होळकर, भोंसले व गायकवाड यांना व कर्नाटक प्रांतीं सर्वांस अशींच पत्रें गेलीं कीं, "रघुनाथ बाजीराव बंड आहेत, त्यांस कोणी मदत करूं नये." परराज्यांतील टिपु सुलतान व नबाब निजाम अल्लीखां यांस पत्रें पाठविलीं कीं, रघुनाथ बाजीराव बंड आहेत. त्यांस कोणी

१ पेशव्यांची बखर पान ९४.

आपण सामील होऊं नये. याचप्रमाणें हिंदुस्थानांत राजेरजवाडे, संस्थानी, पाळेगार वगैरे सर्वांस फर्मानें गेलीं. राघोबादादांचा सर्व बाजूंनीं कोंडमारा केला. सवाईमाधवराव चाळीस दिवसाचे झाल्यानंतर त्यांना पेशव्याचीं वस्त्रें देण्यांत आलीं व त्यांच्या नांवें ह्मणजे माधवराव नारायण प्रधान यांच्या शिक्या मोर्तबाने ही फर्मानें निघालीं. हें फर्मान वाचलें ह्मणजे रघुनाथ बाजीराव हे बंड कां तर सवाईमाधवराव हे गादीवर बसले व ते खरे गादीचे मालक असल्यानें रघुनाथ बाजीराव हे बंड झाले, एवढाच या फर्मानाचा अर्थ होतो. याशिवाय दादासाहेब हे बंड होण्याला जर दुसरें कारण असतें तर सदर फर्मानांत त्या कारणाचा नामनिर्देश केला असता. परंतु तो ज्या अर्थीं या फर्मानांत नाहीं त्या अर्थीं सदर फर्मानांत गादीच्या वारसा हक्काच्या अभावी रघुनाथ बाजीराव हे बंड ठरले असें ह्मणण्याचाच हेतू स्पष्ट दिसून येतो.

१९. सवाईमाधवराव यांच्या या फर्मानानें दादासाहेब बंड ठरले. परंतु त्या पूर्वी सुमारे सात आठ महिने बारभाईनीं गर्भवासी सवाईमाधवराव यांच्या नांवानें जो दादासाहेबाच्या विरुद्ध राज्यकारभार केला तो बारभाई बंड ह्मणून केला असें वरील फर्मानानें सिद्ध होत नाहीं काय ? शिवाय बारभाईची सत्ता ज्या मुद्यावर प्रस्थापित झाली तो मुदाच या फर्मानांत अजिबात वगळला आहे. तो मुद्दा असा, ‘रघुनाथ बाजीराव व त्यांची स्त्री आनंदीबाई ही खुनी आहेत. त्यांनीं आपल्या बाळपुतण्याचा ह्मणजे नारायणराव पेशवे यांचा राज्यलोभास्तव खून केला आहे. सबब हे पापी, अधम, चांडाळ असल्यानें त्यांना हिंदुधर्मातून बहिष्कृत करून व त्यांना राज्यपदाला अनधिकारी ठरवून पुण्याच्या बारभाईसभेनें त्यांना राजहत्येच्या पातकाबद्दल देहांत शिक्षा फर्माविली आहे. सबब रघुनाथ बाजीराव व त्यांची खुनी स्त्री व मुलें हीं ज्यांना जेथें सांपडतील त्यांनीं त्यांना तेथेंच देहदंड द्यावा. किंवा तसें त्यांच्या हातून होत नसल्यास त्यांना त्वरित बारभाईच्या स्वाधीन करावें. ह्मणजे बारभाई शक्य त्या क्रूरपणाच्या मार्गानें

त्यांचा वध करण्यांत आपलें कर्तव्य मानून घेतील.' असा मजकूर किंवा याहीपेक्षां भडक मजकूर सदर फर्मानांत घातला असतां तर बारभाई-वरील पूर्वीच्या बंडगिरीचा आरोप जाऊन त्यांनीं जें बारभाईचें कारस्थान उभारिलें तें न्याय्य होतें असा पुरस्कार केल्याचें जाहीर झालें असतें. परंतु नारायणरावांच्या खुनाचा आरोप जो राघोबादादांवर केला गेला, तो फक्त बारभाईच्या कारस्थानाला रंग चढण्याकरतां उसना असल्यामुळें, तें कार्य संपतांच त्याची विस्मृति बारभाईंना पडली. ह्मणूनच या फर्मानात सहजच तो विषय गाळला गेला हें निर्विवाद ठरतें.

२०. पुरंदरच्या बारभाई दरबारानें सवाईमाधवराव पेशवे यांच्या नांवानें फर्मान काढून दादासाहेबांची मोठमोठ्या राजापासून सामान्य शिपायां-पर्यंत बेअब्रू केली. त्यांच्या सहकारी सरदारांना व शिपायांना गुन्हेगार ठरवून त्यांचीं घरेंदारें जप्त केलीं. सर्वांना हद्दपार करून देशोधडीला लावलें. आपला पक्ष बळकट करून घेण्याकरतां व दादासाहेबांना मदत न करण्याकरतां पेशव्यांच्या मुलखाची व पैशाची खैरात वाटली. असा सर्व नंगानाच बारभाईंनीं सर्व हिंदुस्थानभर घातला असतां व दादासाहे-बाच्या मागें सारखा पाठलाग सुरू ठेवला असतां त्यांनीं इंग्रजांचा आश्रय घेतला यात कोणतें पाप त्यांनीं केलें हेंच समजत नाहीं. दादासाहेबांची स्त्री अशा 'सळो कां पळो'च्या प्रसंगीं धारेस तारीख १० जानेवारी सन १७७५ रोजीं प्रसूत झाली व तिला बाजीराव हा पुत्र झाला. ही बातमी पुरंदराला समजली. त्या वेळीं त्यास पत्रद्वारें अशी सूचना आली कीं, 'कोणीकडून' दादासाहेब यांस हस्तगत करून घ्यावें.' याचा अर्थ एवढाच कीं पेशव्यांचा मुलूख वाटेल तेवढा जावो, वाटेल तेवढा पैसा खर्च होवो, वाटेल तेवढे सरदार व शिपाई मरोत, त्याची फिकीर करूं नका; पण दादासाहेबांना पकडा. दादासाहेबांना तेरा लक्षाची जहागीर द्यावयाची नाहीं. त्यांना पकडण्याकरतां मन मानेल तेवढी दौलत, श्रम

पे. ब. पान ९८.

व माणसें खर्ची घालावयाचीं. याचा अर्थ एवढाच कीं राघोबादादांना इतःपर जिवंत ठेवण्याची बारभाईची इच्छा नव्हती ही बारभाईची मनोवृत्ति असतांना आत्मरक्षणाकरतां कोणतेंहि दिव्य कोणालाही करण्याचा जन्मसिद्ध हक्क असल्यामुळें त्याप्रमाणे दादासाहेबांनीं इंग्रजांचा आश्रय घेण्यांत शेवटचा मार्ग धरला.

२१. त्यावेळीं इंग्रज पराक्रमी होते. त्यांच्याजवळ कवाईत शिकलेल्या पलटणी होत्या. चांगल्या दूरवरच्या माऱ्याच्या तोफा होत्या. त्यांना इंग्लंडसारख्या राष्ट्राचें पाठबळ होतें. अशा लोकांचा आश्रय घेतल्यानें कांहींतरी निभाव लागेल ह्मणूनच दादासाहेबांना त्यांच्याकडे जाण्याची बुद्धि झाली. त्यावेळीं इंग्रज लोक नीतीमत्तेनें भ्रष्ट झाले होते असें दाखविण्याला मार्ग नव्हता. त्यांनीं आपल्या प्रजेला छळण्याकरतां जिझाई कर बसविला नव्हता. त्यांनीं हिंदूंचीं देवालये भ्रष्ट केलीं नव्हती किंवा हिंदूंच्या बायका पळवून त्यांनीं आपल्या जनानखान्यांत नेऊन ठेवल्या नव्हत्या. उलट बारभाईच्या नेत्यांनीं इंग्रजांना ‘ते न्यायी आहेत, त्यांच्या राज्यांत अन्याय होत नाहीं.’ असें शिफारसपत्र दिलें आहे. तेव्हां त्या वेळच्या अशा न्यायी इंग्रजांचा दादासाहेबांनीं आश्रय घेतला यांत कांहीं इतिहासकारांना काय वावगें वाटलें? पुढें इंग्रज लोक हिंदुस्थान जिंकतील, हिंदी लोकांना ते मेंढराप्रमाणें वागवितील असें भविष्य पूर्वीच वर्तवून त्यांचा आश्रय करावयाचा नव्हता असें त्यांचें ह्मणणें असेल तर त्या बाबतींत आह्मांस काहींच बोलावयाचें नाहीं. त्याचा बोल कोणास द्यावयाचा हें कोणालाही समर्पक सांगतां येणार नाहीं. ह्मणून त्या बाबतींत येथें काहीं लिहिणेही इष्ट नाहीं. परंतु येथें एवढी गोष्ट मात्र नमूद करून ठेवणें प्राप्त आहे, ती ही कीं, त्यावेळीं इंग्रज हे न्यायी होते व त्यांनीं दादासाहेबांना ज्याअर्थी आश्रय दिला त्याअर्थीं दादासाहेबांचा पक्ष हा सत्पक्ष होता हें मात्र उघड पुराव्यानें सिद्ध होतें. दादासाहेब जर अपराधी, गुन्हेगार असते तर न्यायी इंग्रजांनीं त्यांना खात्रीनें आश्रय दिला नसता व मदतही केली नसती हें उघड आहे.

जगांत स्वार्थ कोणाच्या मागें लागला नाहीं? जे अन्यायानें व कुमार्गानें स्वार्थ साधतात ते दुष्ट लोक ह्मणून त्यांची उपेक्षा करणें न्यायाचें होईल. पण जे बुद्धीनें व अंगमेहनतीनें आपला मोबदला देऊन स्वार्थ साधूं पहातील त्यांना केव्हांही बोल लावतां येणार नाहीं. इंग्रजांचा त्या वेळेचा मार्ग अगदीं असाच होता; ह्मणूनच त्यांना न्यायी ह्मटलें जात असे. आतां दादासाहेबांना त्यांच्या प्रारब्धानें पुढें गोता दिला ह्मणून त्यांचा पक्ष खोटा होता, असें ह्मणणें मात्र न्यायबुद्धीला पटण्यासारखें नाहीं.

२२. राघोबादादांचा कांटा काढण्याकरतां बारभाईनीं जे विश्वप्रयत्न केले, त्यांत निजामअल्लीची किती व कशी पायधरणी केली हेंही येथें देणें प्राप्त आहे. निजामअल्ली हा पेशव्यांचा शत्रू. राघोबादादांनीं त्याचा राक्षसभुवन व बेदर या दोन लढायांत पराभव करून त्याला वठणीवर आणलें होतें. सदाशिवरावभाऊ, विश्वासराव, नानासाहेब, राघोबादादा यांनीं इ. स. १७६० मध्यें उदगीरच्या लढाईंत त्याचा पुरा मोड करून त्याला नरम केलें होतें. असें असतां, प्रसंग येईल त्यावेळीं वर डोकें काढून पेशवाई खाण्याकरतां टपून बसलेला निजामअल्ली, बारभाईच्या कारस्थानानें चढून बसला. त्याच्यावर राघोबादादांचा दरारा होता. अर्थात् ते असेपर्यंत पेशव्यांच्या मुलखाचें खाद्य त्याला पचण्यासारखें नव्हतें. परंतु प्रत्यक्ष बारभाइ दादासाहेबांवर उठल्यामुळें त्याला तेजी आली. तथापि तो दादासाहेबांवर चाल करून जाण्यांत अळमटळम् करूं लागला. हरिपंतांस निरनिराळीं कारणें दाखवून तो विनाकारण दिवसगत करूं लागला. हें हरिपंतांच्या लक्षांत आल्यामुळें एके दिवशीं ते स्वतः निजामाच्या लष्करांत गेले. रुकनुद्दौला हा निजामअल्लीचा कारभारी होता. हरिपंत रात्रीं त्याच्या डेऱ्यांत गेले. ते 'नाना'[1]प्रकारें कारभारी यांसी बोलले जे. आह्मीं दरकूच लक्ष रुपये देऊन तुह्मांस कुमकेस आणिलें. असें असतां आज फेर गोष्ट सांगणें हें चांगलें कीं काय? असें नाना प्रकारें सांगितलें. शेवटीं फार रात्र झाली तेव्हां कारभारी बोलले कीं, हरिपंत, तुह्मीं निजावयास जावें.

---

१ हरिवंशाची बखर पान. ५५

उदईक पहातां येईल. हरिपंत बोलले कीं, मी जाऊन काय करूं? आज पंधरा दिवस जाहले, तुह्मीं कबूल केल्याप्रमाणें काय जाहलें? असें ह्मणतात तों रुकनुद्दौला यांस झोंप येऊं लागली. ते आपले पलंगावर निजले. हरिपंत तेथेंच पलंगाचे खुरास टेंकून निजले. तों मध्यान्ह उलटली. कारभारी जागे होऊन पहातात तों हरिपंत आपले पलंगाशीं टेंकून निजले आहेत. तेव्हां हांक मारून जागें केलें. आणि बोलले कीं, तुह्मीं अद्यापी गेला नाहीं हें काय? यांनीं उत्तर केलें कीं, मी विनंती केली ती आपण मान्य केली ह्मणजे मी निघालों. असें ह्मणतांच कारभारी यांनीं पारशी अक्षरांची चिठ्ठी लिहून खोजा बोलावून आणविला. आणि त्याचें हातीं चिठ्ठी देऊन नबाबाकडे लावून दिली. ती जनानखान्यांत चिठ्ठी गेली. तेव्हां नबावांनीं मेणबत्ती धरवून चिठ्ठी वाचून पाहिली. त्यांत लिहिलें होतें जे. हरिपंत आले आहेत. त्यांचें ह्मणणें उदईक आपलें कूच जाहलेखेरीज मी उठत नाहीं. त्यांस मी हरतऱ्हेनें सांगितलें. शेवटीं कंटाळून निजलों. तरी ते पलंगास टेंकून बसले. त्यास खावंदांनीं मेहेरबानी करून उदईक प्रातःकाळीं कूच होण्याच्या हुकुमाचा शेरा या अर्जीवर आला पाहिजे. अशी चिठ्ठी वाचतांच नबाबास हरिपंत यांची काम करण्याची तारीफ वाटून कारभारी यांचे चिठ्ठीवर शेरा पारशी अक्षरांचा जाहला जे. 'हरिपंत के खातर छे कोसका कूच करना.' याप्रमाणें हरिपंतांवर उपकारांचे हिमालयीन ओझें लादून निजामअल्ली कूच करूं लागला. त्याला दरकूच एक लक्ष रुपये व अठरा लक्ष उत्पन्नाचा मुलुख देऊन हरिपंत वरीलप्रमाणें त्यांचें लांगुलचालन करीत होते. या वेळी ते पेशव्यांचे बारभाईतर्फे सेनापती होते. पूर्वीं माधवराव पेशव्यांचे ते उजवा हात होते. नारायणराव पेशव्यांचे ते देहसंरक्षक होते. असें असतां खुद्द नारायणरावांनीं त्यांना गारदी वाड्यांत दंगा करणार आहेत, तरी बंदोबस्त करा असा हुकूम दिला असतां, मजेंत मिष्टान्न भोजन करण्याकरतां ते गेले होते. त्यांना नारायणरावांच्या जीविताबद्दल त्या वेळीं कसलीच कदर वाटली नाहीं. पण या वेळीं त्यांच्यावर कोणता पर्वत कोसळला होता ह्मणून, दादासाहेबांपुढें दांतीं तृण धरून शरण येणाऱ्या निजामअल्लीच्या कारभाऱ्याच्या

दारीं, भिक्षा मागण्याकरतां हात पसरून सत्याग्रहाऐवजीं दुराग्रहाचें स्तोम त्यांनीं माजविलें? पण यांत काय रहस्य आहे हें वरवर इतिहास चाळणाऱ्यांना दिसणार नाहीं. उलट हरिपंतांची स्वराज्याकरतां केवढी तळमळ होती याची ते तारीफ करतील. पण वस्तुस्थितीच्या आंत घुसल्यावर त्यांना अगदीं उलट अनुभव आल्याशिवाय राहणार नाहीं. प्रत्यक्ष मालकाच्या—नारायणराव पेशव्यांच्या—हुकुमापेक्षां ज्या हरिपंतांना भोजन महत्वाचें वाटलें त्या सरदार सेनापतीला एकाद्या ऋणकऱ्याप्रमाणें पेशव्यांच्या शत्रूची वरीलप्रमाणें पायधरणी करतांना शरम वाटली नाहीं किंवा रुकार मिळेपर्यंत त्यांच्या डोळ्याला झोंप शिवली नाहीं, ही आत्मीय भावनेची तळमळ हरिपंतांच्या मनांत कां उत्पन्न झाली? त्या वेळीं पेशव्यांचें स्वराज्यच होतें. पण त्या स्वराज्यात हरिपंतांचा नोकरीचा पेशा होता. या वेळीं बारभाईंच्या स्वराज्यांत हरिपंत हे एक स्वराज्याचे मालक बनले होते. बारभाईंनीं पेशवाई लुटली त्यांतील हरिपंत हे एक लुटारू मालक होते. या वेळेची त्यांची तळमळ पेशव्यांच्या स्वराज्याची नसून स्वतःच्या स्वराज्याची होती. एवढाच काय तो फरक होता.

२३. हरिपंतांनीं दादासाहेबांविरुद्ध लढण्याकरतां निजामअलीला मैदानांत आणल्यानंतर शिंदे-होळकर यांच्या संकेताप्रमाणें सखारामबापू व नाना फडनविस यांनीं ससैन्य मोहिमेवर जाण्याचें ठरविलें. या त्यांच्या येण्याचा हेतु शिंदे होळकर यांनीं दादासाहेबास असा समजावून सांगितला होता कीं, आम्ही उभयतांतील मध्यस्थ. तुमचें बोलणें त्यांना पुरंदरला कळवून त्यांचें ह्मणणें तुह्मांला कळविण्यांत विनाकारण दिरंगाई होते. तेव्हां त्यांनाच मोहिमेवर बोलविलें ह्मणजे जवळच्या जवळ सर्व गोष्टींचा उलगडा तावडतोब होईल. याप्रमाणें दादासाहेबांची समजूत करण्यांत आली होती. पुरंदर किल्ल्यावरील लोकांची समजूत बापू व नाना यांनीं अशी करून दिली होती कीं नबाब निजामअल्ली आपल्या पक्षाला मिळाला. तेव्हां त्याचा गौरव करण्याकरतां आह्मीं त्याला मोहिमेवर जाऊन एक मेजवानी[1] देणार आहोंत. परंतु पुरंदर किल्ला

१ हरिवंशाची बखर पान ५७

सोडतांना त्यांनीं नबाबांच्या मेजवानीकरतां बकऱ्यांचा कळप बरोबर न नेतां पंचेवीस हजार फौज बरोबर नेली. ही बातमी राघोबादादांना समजतांच ते समजले कीं मुत्सद्यांचा हा डाव आहे. मध्यस्थी करतो ह्मणून शिंदे-होळकर आपल्याला ठेऊन घेणार व नंतर बापू व नाना येऊन पकडणार आणि शिंदे होळकर नामानिराळे राहणार. हा गनिमी कावा पाहून दादासाहेब तावडतोब परागंदा झाले. हा इतिहास मागें आलाच आहे. ज्या वेळीं बापू व नाना हे पुरंदर सोडून या मोहिमेवर गेले, त्या वेळीं त्यांनीं पुरुषोत्तम दाजी पटवर्धन हे आपल्या पूर्ण विश्वासांतले ह्मणून सवाईमाधवरावांच्या रक्षणाचा व पुरंदर किल्ल्याचा सर्व बंदोबस्त आपण परत येईपर्यंत कुलअखत्यारीनें त्यांचेकडे दिला होता.

२४. अशा प्रसंगीं पुरुषोत्तम दाजींवर सवाईमाधवरावांच्या रक्षणाची—अर्थात् साक्षात् विष्णूच्या अवताराच्या रक्षणाची—भयंकर मोठी जबाबदारी येऊन पडली. शिवाय हा अवतार राघोबा-दैत्याचें निर्दलन करण्याकरतां व बारभाईंच्या स्वराज्याचें रक्षण करण्याकरतां असल्यामुळें ती जबाबदारी केवढी नाजूक व किती विशाल स्वरूपाची होती हें सांगण्याची जरूरी नाहीं. शिवाय पुरंदर किल्ल्याच्या संरक्षणाचीही जबाबदारी होतीच. पुरुषोत्तम दाजी हे मोठे शूर, लढवय्ये, खात्रीचे आणि प्रामाणिक असल्यामुळें आपली अमोल कामगिरी दाखवून बारभाईंना संतोषित करणें हें त्यांचें आद्य कर्तव्य होतें. ह्मणून डोळ्यांत तेल घालून व दिवसाची रात्र करून त्यांना आपली जबाबदारी पार पाडून न्यावी लागे. याप्रमाणें विष्णूच्या अवताराचें रक्षण चाललें असतां सवाई-माधवरावांचा खून करण्याचा भयंकर फितूर झाला. त्या प्रसंगीं पुरुषोत्तम दाजी होते ह्मणूनच श्री विष्णूचा अवतार वांचला आणि बारभाईंचें स्वराज्यरक्षणाचें अवतारकार्य पार पडलें. यासंबंधीं हरिवंशाच्या बखरींत पुरुषोत्तम दाजी यांची अद्भुत साहसाची कामगिरी पुढीलप्रमाणें दिली आहे. 'एके दिवशीं दोन प्रहरीं दाजी खोलींचे दारांत निजले होते. तों कुणबीण नित्य आंत जाणार तीच जात होती. तों याची चाल कीं, नित्य माणसें आंत जाणार त्यांचा झाडा

घेऊन नंतर आंत जाऊं द्यावी. याप्रमाणें नित्य कृत्याची शिस्त होती. तों कुणबीण आंत चालली. ती दाजींनीं पाहिली आणि बोलले जे, रांड फितुरी आहे, धरा! असें ह्मणतांच धरून झाडा घेतला. तों कांहीं निघालें नाहीं. दुसऱ्या कुणबिणी आणून अगदीं लुगड्यासुद्धां झाडा घेतला, व नंतर वेणी सोडली तों बुचड्यांत सुरी निघाली! आणि चौकशी केली तों फितुरी असें खास जाहलें. नंतर भोतांत घालून कडेलोट करून दिला. याप्रमाणें दाजींची धूर्तता बहुत होती.'

२५. पुरुषोत्तम दाजींच्या पुरुषार्थाचें कुतूहल आनंदीबाईंच्या विषप्रयोगाच्या गोष्टींतून व मारेकऱ्यांच्या प्रहसनांतून मागें दिसून आलेंच आहे. या वेळीं त्यांनीं स्वतःच्या करमणुकीकरतां व लोकांच्या मनांत राघोबादादा व आनंदीबाई यांच्याविषयीं जास्त द्वेष व सूडाची भावना उत्पन्न करण्याकरतां या एकांकी नाटकाचा प्रयोग केला. असलें नाटक या प्रसंगीं पाहिजेच होतें. बापू व नाना हे उभयतां पाताळयंत्री मुत्सद्दी ज्या अर्थीं दादासाहेबांना पकडण्याकरतां गेले आहेत, त्या अर्थीं ते त्यांच्या हस्तगत होऊन पुरंदरास बंदिवान होऊन येणार असें भविष्य पुरुषोत्तम दाजींनीं केलेंच होतें. तेव्हां ते येथें आल्यावर त्यांचा योग्य सन्मान करण्याकरतां हें फितुराचें नाटक रचून प्रत्यक्ष विष्णूच्या अवताराचा खून करण्याचा प्रयत्न करविल्याबद्दल कडेलोटाच्या पूर्वतयारीची सिद्धताच त्यांनीं करून ठेवली होती. परंतु दाजींच्या दुर्दैवानें राघोबादादा परागंदा झाले व कारभाऱ्यांना हात हालवीत परत यावें लागलें. शेवटीं दाजींनीं रचलेल्या नाटकाची पूर्तता कोणाला तरी कडेलोट केल्याशिवाय होणारी नव्हती. ह्मणून फितुरीबाईचा कडेलोट दाखविण्याकरतां तिला भोतांत ह्मणजे पोत्यांत घालून कडेलोट केल्याचा फार्स केला. पोत्यांत कुणबिणीला घातली पण तेंच पोतें कड्यावरून नाटकांत थोडेंच टाकावयाचें असतें! तसेंच एकादें पोतें दगड-गवत घालून कड्यावरून टाकून शिक्षेची पूर्तता करतां येते. तसाच प्रकार पुरुषोत्तम दाजींच्या सदर नाटकाचा झाला असेल यांत शंका नाहीं.

२६. हरिवंशांतील सदर गोष्ट केवळ पूर्वीच्या भोळया भावड्या बायकांना सांगण्यापुरतीच आहे. कुणबिणीनें बुचड्यांत सुरी लपविली ही कल्पना अगदीं नवीन व अद्भुत आहे. बाळंतिणीच्या खोलींत जाण्याच्या मार्गावर दरवाजांत दोन प्रहरीं दाजींनीं झोंपणें, रोजच्या कुणबिणीस पहातांच ती फितुर ह्मणून ओरडणें, तिचें लुगडें फेडून तिची झडती घेणें, सुरी लपविण्याची जागा बुचडा ही मिळणें, वगैरे अद्भुतरम्य प्रसंग दाजींच्या नाटकांत प्रेक्षकांच्या हृदयाला गदगदा हालविणारे होते यांत संशय नाहीं. त्यांतील कांहीं मजकूर बखर लेखकाच्या नजरचुकीनें लिहिण्याचा राहिला असावा असें अनुमान केल्यास तें खोटें ठरणार नाहीं. किंवा त्या गोष्टीची वरचेवर द्विरुक्ति होते ह्मणून ती मुद्दाम बखरकारानें लिहिण्याचें टाळलें असावें असाही तर्क काढण्यास जागा आहे. ती गोष्ट ह्मणजे त्या कुणबिणीच्या चौकशीच्या वेळीं "बालराजांचा व गंगाबाईसाहेबांचा खून करण्याची कामगिरी आनंदीबाईनें मला दिली. दादासाहेबांनीं बुचड्यांत मावेल अशी सुरी तयार करून पाठविली, बरोबर हें पत्र दिलें व कार्यभाग होतांच तीन किल्ले व सात लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलुख जहागीर ह्मणून देऊं असा दस्तऐवज दिला," ही बातमी देण्याची राहिली. कारण ती कुणबीण एकटी होती. तिला त्यावेळीं गारद्यांचें पाठबळ नव्हतें. असें असतां पुरुषोत्तम दाजीसारखा कृतांत काळ दिवसाढवळया बाळंतिणीच्या खोलीच्या दारांत पडला असतां, सुमेरसिंगापेक्षां अतिशय शूर व वीर असलेली स्त्री पेशव्यांचा, प्रत्यक्ष विष्णूच्या अवताराचा, व त्याच्या मातेचा खून करण्याचें भयंकर साहस करते त्या स्त्रीलाही तसेंच मोठें पारितोषिक असणें स्वाभाविक होतें. परंतु हा पुरावा निर्माण करण्यांत दाजींनीं कच तरी खाल्ली असावी किंवा दादासाहेब मिळाले नाहींत, ते पळून गेले ह्मणून तो पुरावा तयार करण्याची जरूरीच राहिली नाहीं असेंच त्यांना वाटलें असावें. एकंदरींत या पुरंदरच्या कपटजालांतून दादासाहेब इंग्रजांच्या आश्रयाला गेले हें त्यांचें दैव कीं बारभाईंचें दुर्दैव हें पुढें पहाणें इष्ट आहे.

---

# प्रकरण १७ वें.

## इंग्रजांची बारभाईंवर मात.

### इ. स. १७७५ ते इ. स. १७७६.

१ मूळ तत्वांत क्रांति घडून आल्यानें राज्यांत माजणारी अनास्था.—२ इंग्रजांच्या शहाणपणाच्या धोरणानें साष्टी बेट त्यांच्या हातीं कसें पडलें?—३ साष्टी बेटाबद्दल राघोबादादा व इंग्रज यांचा खटका कां उडाला?—४ राघोबादादा व इंग्रज यांमधील सुरतेचा सोळाकलमी तह.—५ हरिपंत फडके व राघोबादादा यांमधील होणाऱ्या लढाईची परस्परांची तयारी.—६ राघोबादादांनीं इंग्रजांच्या सहाय्यानें हरिपंत फडक्याबरोबर नापारची व आरासची अशा दोन लढाया देऊन त्याचा मोड केला, व त्यास नर्मदेपलीकडे पिटाळून लाविलें.—७ मुधोजी भोंसले व साबाजी भोंसले यांमधील रणसंग्राम. साबाजी मारला जातो. बारभाईकडून रघोजीस सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें बारभाईंचें "किसका फाटे और किसका तुटे" असें वर्तन.—८ करवीरकर इचलकरंजीकरांविरुद्ध आगळीक सुरू करतात. पेशवे दरबाराशी करवीरकरांचा बेबनाव.—९ कित्तूरचा देसाई बारभाईचा शत्रु होऊन धडाळी सुरू करतो.—१० करवीरकरांच्या बाबतींत बारभाईंनी तह करून हात दाखविण्याऐवजीं अवलक्षण मात्र पदरीं घेतलें.—११ बारभाईंचा कित्तूरच्या देसायाबरोबर अपमानास्पद तह.—१२ बारभाईंचा हा कमकुवतपणा पाहून हैदरनें हरीहर व कल्याळ हीं ठाणीं घेतलीं.—१३ धारच्या किल्यात आनंदीबाई प्रसूत होऊन तिला बाजीराव हा पुत्र होतो. आनंदीबाईस शिंदे-होळकर फितूर असल्याबद्दल बारभाईंनी ओरड.—१४ राघोबादादाबरोबर बारभाईंनीं समेट न केल्यामुळें पेशव्याच्या राज्यांत अंदाधुंदी कशी माजली व त्याची झळ रावापासून रंकापर्यंत कशी लागली?—१५ यावेळीं अंदाधुंदी माजल्याचीं आणखीं उदाहरणें.—१६ जमिनीवरील सरशीप्रमाणेच बारभाईवर इंग्रजांची समुद्रावरही सरशी.—१७ बारभाईच्या कारभारांतील बेबंदशाही.—१८ राघोबादादाकडून साष्टीची सोडचिठ्ठी इंग्रजानीं घेतली होती तशीच ते बारभाईकडून घेण्याच्या खटपटीस लागले.—१९ इंग्रज दोन्हीं डगरीवर हात ठेऊन आपला स्वार्थ कसा साधून घेत होते?—२० मुंबईकरांस राघोबादादांच्या पक्षांतून फोडण्याकरता बारभाई कलकत्तेकर इंग्रजांना सामील करून घेतात. या बाब-

तींत सखारामबापूंचे कलकत्तेकरांना खलितावजा पत्र.—२१ याच पत्रांतील पुढील मजकूर. यांत नानांचेंही कलकत्तेकरांस निराळें पत्र गेलें होतें, असें ह्मटलें आहे.—२२ सखारामबापूंच्या या खलित्यांतील मुद्दे व त्याचें स्पष्टीकरण.—२३ बारभाई इंग्रजांस साष्टीची सोडचिठ्ठी देतात. "राघोबाच्या हातून हत्या घडली नाहीं" अशी मुंबईकर इंग्रजांची खात्री.—२४ पुरंदरचा तह.—२५ रेग्युलेटिंग ॲक्टचें बुजगावणें कशा करतां होतें?—२६ इंग्रज राघोबादादांस पेन्शन देऊन आपल्या आश्रयास ठेवतात.

१. राघोबादादा हे तारीख २३ फेब्रुवारी सन १७७५ रोजीं इंग्रजांच्या आश्रयाला गेले, हा इतिहास मागें आलाच आहे. परंतु या वेळीं पेशवाईंतील मालक व नोकर यांच्यांतील दुहीमुळें हिंदुस्थानांतील राजकारणाची परिस्थिति कसकशी बदलली होती, हें पहाणें जरूर आहे. थोरले माधवराव पेशवे कैलासवासी झाल्यानंतर नारायणराव गादीवर बसले. राघोबादादा कारभार पाहूं लागले. पहिल्यानें या चुलत्या-पुतण्यांचें अगदीं एकदिल होतें. त्यांत विष कालवून, गोपिकाबाईची चिथावणी पुढें करून, नाना फडनविस यांच्या पक्षानें राघोबादादांना त्यांच्या कारभारांत विरोध आणला. हा विरोध इतका जबरदस्त झाला कीं, नारायणरावांना नाममात्र पुढें करून त्यांनीं दादासाहेबांना कैदेंत टाकलें. या वेळेपासून घरचा भाऊबंदी तंटा पुन्हां मैदानांत आला. माधवराव पेशव्यांच्या वेळीं जरी राघोबादादांना कैदेंत टाकण्याचा प्रसंग आला होता, तरी त्या वेळीं कोणत्याही प्रसंगाला तोंड द्यावयाला माधवराव स्वतः समर्थ होते. त्यांनीं एकदां नानांच्या पक्षाला वाहून घेतलें तें मरेपर्यंत. त्यांत त्यांनीं नीतिअनीतीचा निराळा विचार केला नाहीं. त्यांचें करणें योग्य कीं अयोग्य हा प्रश्न निराळा. पण ते एका पक्षाच्या राजकारणाच्या चाकोरींतून गेले ही गोष्ट मात्र सत्य आहे. यामुळें पेशव्यांचा रज्याकारभार, राघोबादादांच्या विरुद्ध कां असेना, पण तो एका चाकोरींतून गेला. अर्थात् त्यामुळें पेशव्यांच्या राज्यांत अगर परकी राज्यांत पेशव्यांच्या कारभाराचें वजन कमी झालें नाहीं. त्यांचा दाब कायम राहिला. परंतु नारायणराव हे बाळवृत्तीचे होते. ह्मणून माधवरावांचा हुद्दा जरी त्यांना प्राप्त झाला, तरी त्यामुळें त्यांची कर्तबगारी मात्र

वाढली नाहीं. राघोबादादांना कैदेंत टाकावयाला त्यांचा पेशवेपदाचा अधिकार उपयोगी पडला. परंतु त्यामुळें जी अनास्था झाली, ती पार पाडण्याला त्यांची कर्तबगारी मात्र अपात्र ठरली. दादासाहेबांना कैद करण्याच्या वेळीं नाना फडनविस, हरिपंत फडके, त्रिंबकरावमामा, पटवर्धन, रास्ते, वगैरे मंडळींच्या मनांत पुढील राजकारणाचें धोरण आलें नसेल असें मात्र बिलकुल ह्मणतां येणार नाहीं. ते खंदे मुत्सद्दी व पूर्ण धोरणी होते. असें असतां त्यांनीं जी क्रांति घडवून आणली, त्या क्रांतीचा उगम 'मुत्सद्यांच्या ताब्यांत पेशव्यानें बाहुल्याप्रमाणें नाममात्र असावें' असा होता. या तत्वाचा उगम नवीन नव्हता. नानासाहेब पेशव्यांनीं जें तत्व अंमलांत आणलें, त्यांतूनच याचा उगम झाला होता. नानासाहेब पेशव्यांनीं छत्रपतींना बाहुलें करून क्रांति घडवून आणली, त्याचीच पुनरावृत्ति या प्रसंगीं त्याच पेशव्यांच्या मुलाला मुत्सद्यांनीं बाहुलें करून केली होती. छत्रपतींना बाहुलें बनविण्याच्या पेशव्यांच्या हेतूच्या आड ताराबाई आल्या, ह्मणून त्यांना आपलें सत्व व तत्व यांच्या पालनाकरतां कारागृहवास, मानहानि, अप्रतिष्ठा व हाल सोसावे लागले. छत्रपती रामराजे यांच्या जागीं जसे नारायणराव पेशवे आले, तसेंच ताराबाईंच्या ठिकाणीं या क्रांतीच्या वेळीं राघोबादादा आले. चांगल्या तत्वांतून चांगलें असें एकच तत्व निर्माण होतें. पण जें तत्व पूर्ण स्वार्थी व आपमतलबीपणाचें असतें त्याला मात्र अनंत तोंडें फुटत असतात. अशीं अनंत तोंडे फुटण्यांतच त्या मूळ तत्वाचा व त्याच्या विस्ताराचा सर्वस्वी नाश असतो. ह्मणून अशीं तोंडें न फुटण्याकरतां जें सत्य तत्व असतें तें अबाधित मार्गानें चालविण्याची प्रवृत्ति ठेवावी लागते. मुत्सद्यांच्या तत्वाच्या आड राघोबादादा आले, हें आतां सांगितलेंच आहे. ताराबाईप्रमाणें राघोबादादांचें तत्व निदान त्यांच्या शाखेपुरतें तरी सत्य होतें. परंतु मुत्सद्यांचें तत्व मात्र असत्याचें असल्यामुळें त्याला अनंत तोंडें फुटलीं व त्यांतच त्याचा लय कसा झाला, हा इतिहास पुढें ओघानें येणार आहे, त्यावरून सहज दिसेल. येथें या तत्वप्रतिपादनाचा हेतु एवढाच आहे, कीं मुत्सद्यांनीं नारायण-रावांस पुढें करून राघोबादादांना कैद केलें व बंदींत टाकलें येथेंच क्रांतिकारक नवीन तत्वाची सुरवात झाली. माधवरावांनीं राघोबादादांना जसी

बंदींत टाकलें होतें, तरी मरतेसमयीं त्यांनीं आपली चूक सुधारून घेऊन नंतर ते मरण पावले. त्यामुळें मुत्सद्यांच्या कारस्थानाचा उघड उदय झाला नाहीं. परंतु आतां मात्र त्याला उघड स्वरूप आलें व त्याचें किळसवाणें चित्र नारायणरावांच्या मृत्यूमुळें सर्व जगाला दिसलें. त्याप्रमाणें जो तो आपल्या राजकारणाचे डाव खेळूं लागला. पुढें उघडच मालक (दादासाहेब) व नोकर (मुत्सद्दी) यांच्यांत राजकारणें घाटून त्याचें दृश्य जसजसें लोक-निदर्शनाला येऊं लागले, तसतशी पेशव्यांच्या राज्यांतील सरदारांत व परकीय राज्यांत त्याला अनुलक्षून राजकारणें घडूं लागलीं व तीं सर्व पेशव्यांच्या सत्तेच्या व राज्यकारभाराच्या दृष्टीनें विघातक झालीं.

२. या वेळीं इंग्रजांची सत्ता वाढत्या प्रमाणांत होती. जबरदस्ताशीं नमतें घेऊन जें साध्य होईल तें पदरांत घ्यावयाचें व फायद्याची परिस्थिति आपोआप निर्माण झाली असतां ती दवडूं द्यावयाची नाहीं, ही वृत्ति त्या वेळीं इंग्रजांची होती. राघोबादादा त्यांच्याकडे आश्रयाकरतां आले व त्यांनीं त्यांना आश्रय दिला यालाही थोडा कार्यकारणभाव आहे. इ. स. १७३९ त साष्टी व वसई हा टापू गोंव्याच्या फिरंगी लोकांपासून चिमणाजी आपानें घेतला. तेव्हांपासून तो पेशव्यांच्याच ताब्यांत होता. तो परत घेण्याकरतां फिरंग्यांचे प्रयत्न चालले होते. मुंबईच्या इंग्रजांना हा टापू महत्वाचा वाटत असल्यानें त्यावर त्यांची दृष्टि होती. राघोबादादा व बारभाई यांच्यामध्यें रणसंग्राम सुरू झाल्यामुळें फिरंगी लोक साष्टीवर स्वारी करण्याची झपाट्यानें तयारी करूं लागले. ही बातमी मुंबईच्या इंग्रजांस समजतांच त्यांनीं फिरंगी लोकांऐवजीं आपणच साष्टीवर हल्ला करण्याचें ठरविलें. तुळाजी आंग्र्यांचा पेशवे व इंग्रज यांनीं मिळून पराभव केला व आंग्र्यांचें आरमार रसातळाला नेलें. त्यामुळें दर्यावर दिवसेंदिवस पेशव्यांची सत्ता उतारास लागून इंग्रजांचें प्राबल्य वाढत जाऊं लागलें. त्यांत साष्टी हा मजबूत किल्ला इंग्रजांच्या ताब्यांत आल्यानें विशेष भर पडणार होती. ह्मणून कांहीं तरी निमित्त काढून त्यांना साष्टी व त्याच्या भोंवताលचा प्रदेश घ्यावयाचा होता. राघोबादादा यांना बारभाईनीं घराबाहेर

काढलें व ते स्वसंरक्षणार्थ दुसऱ्या लोकांची मदत घेण्याच्या विवंचनेंत आहेत, हेंही इंग्रजांना माहीत होतें. गोविंदराव गायकवाडाकडून मदत मिळेल या कल्पनेनें दादासाहेब बडोद्यास आले. गोविंदराव गायकवाडा-जवळ मदत करण्यासारखें काय आहे हेंही इंग्रजांना माहीत होते. गोविंद-राव गायकवाडाची मदत जरी दादासाहेबांना मिळाली तरी बारभाईंच्या जबरदस्त सामर्थ्यापुढें त्या उभयतांचा टिकाव लागणार नाहीं हेंही इंग्रज जाणून होते. अशा स्थितींत साष्टीसंबंधीं कलह उत्पन्न केल्यास कदाचित् पेशव्यांच्या घरगुती तंट्याचा फायदा आपणांस मिळेल व साष्टी घेतल्यास तो मुलुख आपणांला पचेल या दृष्टीनें इंग्रजांनीं साष्टीवर चढाई केली. किल्ल्यास वेढा घालून तोफांचा भडिमार सुरू केला व तटबंदी पाडून आंत प्रवेश करून किल्ला हस्तगत केला. त्या वेळीं किल्लेदारास पेशव्यांकडून मदत न आल्यामुळें किल्ला इंग्रजांच्या हस्तगत झाला. शिवाय उरण, वरसोवें वगैरे टापू साष्टीखालीं होता तोही इंग्रजांच्या हातीं लागला.

३. इंग्रजांची मदत आपणांस मागेंपुढें घ्यावी लागणार म्हणून दादा-साहेबांचा व इंग्रजांचा पत्रव्यवहार सुरू होता. त्यावरून पुढील गोष्टी दिसून येतात. दादासाहेबांनीं फौजेच्या खर्चाकरतां पंधरा ते वीस लक्ष रुपयांपर्यंत रकम इंग्रजांस रोख द्यावी व बारभाईंचे बंड मोडल्यानंतर त्यांनीं इंग्रजांना साष्टी व वसई इनाम म्हणून द्यावी. या करारावर इंग्रज तोफांसुद्धां अडीच हजार पायदळाची कुमक दादासाहेबांस करण्यास तयार होते. परंतु, दादासाहेब साष्टी व वसई इंग्रजांस देण्यास तयार होईनात. परंतु, त्या मुलुखाऐवजीं गुजराथेंत तेवढ्याच उत्पन्नाचा मुलुख म्हणजे सुमारें ११ लक्ष उत्पन्नाचा मुलुख दादासाहेब इंग्रजांस देण्यास तयार होते व त्याबद्दल एक हजार गोरे व दोन हजार काळे शिपाई व पंधरा तोफा मदतीकरतां इंग्रजांनीं द्याव्या असें दादासाहेबांचें म्हणणें होतें. परंतु, दादासाहेबांच्या मनांत साष्टी द्यावयाची नाहीं व इंग्रजांना तर साष्टी पाहिजे अशी परि-स्थिति उत्पन्न झाल्यामुळें दादासाहेबांनीं इंग्रजांची मदत घेतली नाहीं.

म्हणून इंग्रजांना साष्टीवर हल्ला करून साष्टी हस्तगत करून घ्यावी लागली. पुढें गोविंदराव गायकवाड व दादासाहेब असे मिळून गुजराथेंत शिरले व त्यांच्याबरोबर महीनदीचे कांठीं फत्तेसिंग गायकवाड, शिंदे, होळकर, हरिपंत फडके, पटवर्धन या सर्वांचा सामना होऊन दादासाहेबांचा पराभव झाला व ते सुरतेस पळून गेले. हा इतिहास मागें आलाच आहे.

४. आत्मरक्षणाचा दुसरा कोणताही तरणोपाय नाहीं असें पाहून निराश्रित स्थितींत दादासाहेबांनीं इंग्रजाबरोबर ता. ६ मार्च सन १७७५ रोजीं सुरतेचा तह केला. या तहाची सोळा कलमें असून त्यांतील मुख्य कलमें अशी आहेत कीं, इंग्रजांनीं काळे व गोरे शिपाई व गोलंदाज कामाठी वगैरे तोफांसह असे एकंदर तीन हजार सैन्य दादासाहेबांच्या कुमकेकरतां पाठवून द्यावें व आपली गादीवर पुन्हां स्थापना होईपर्यंत तें सैन्य त्यांचेजवळ ठेवावें. त्या सैन्याच्या खर्चाबद्दल दादासाहेबांनीं त्यांस दरमहा दीड लाख रुपये द्यावे. या रकमेची नियमानें वेळचे वेळीं पोंच होत जावी. यासाठीं तूर्त गुजराथेंतील चार तालुके त्यांच्या ताब्यांत द्यावे. दादासाहेबांची गादीवर स्थापना झाल्यावर आपणाला कुमक केल्याबद्दल बक्षिस म्हणून त्यांनीं साष्टी, वसई व गुजराथेंतील आणखी कांहीं महाल मिळून सव्वा एकोणीस लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलुख इंग्रजांस कायमचा द्यावा.[1] यावेळीं असा तह केल्याशिवाय दादासाहेबांना गत्यंतर नव्हतें. या तहाप्रमाणें दादासाहेबांच्या मदतीकरता मुंबईहून सुरतेस फौज आली. ती फौज व सुरत, भडोच येथील कांहीं फौज मिळून काळे, गोरे, कवाईती तीन हजार माणूस व पंधरावीस तोफा अशी फौज घेऊन दादासाहेब सुरतेहून खंबायतास आले. यावेळीं इंग्रजांच्या फौजेवर किटिंगसाहेब हा मुख्य होता.

५. वामनराव पटवर्धन हे दादासाहेबांच्या मागें लागले होते. पण दादासाहेब इंग्रजांच्या आश्रयाला मेलेले पाहून ते काठेवाडांतच भटकत

१ ऐ. ले. सं. पान २२३९

फिरत होते. हरिपंत फडके हे नडियादकडे गोविंदराव गायकवाड वगैरे सरदारांच्या मागें लागले होते. ते त्यांचा पाठलाग करीत जातच होते. या सरदारांत गोविंदराव गायकवाड यांचेजवळ सहा हजार, व आबाजी महादेव, सदाशिव रामचंद्र, सखाराम हरी व मानाजी फांकडे यांच्याजवळ जरीपटक्यासुद्धां दादासाहेबांची चार हजार फौज होती. अशी दहा हजार फौज गुजराथेंत हरिपंत फडक्यांशीं गनिमी काव्यानें स्वसंरक्षण करीत होती. दादासाहेब खंबायतास आल्याची वार्ता समजतांच ही सर्व फौज त्यांस जाऊन मिळाली. त्याचप्रमाणें वामनराव पटवर्धन हे काठेवाडांतून बडोद्यास फत्तेसिंगास येऊन मिळाले आणि वामनराव व फत्तेसिंग असे उभयतां मिळून हरिपंत फडक्यास गुजराथेंत येऊन मिळाले. शिंदे व होळकर हे मात्र हरिपंतांच्या लष्करांतून निरोप घेऊन परत आपल्या ठिकाणीं गेले. तरी त्या वेळीं हरिपंताजवळ सखारामबापू व नाना फडनविस यांचीं पथकें, पटवर्धन, रास्ते, पानसे व हुजुरातीची कांहीं नामांकित पथकें मिळून सतरा अठरा हजार फौज व इतर चौदा पंधरा हजार फौज अशी तीस पस्तीस हजार फौज होती.

६. अशा प्रकारें उभय पक्षांच्या सैन्यांची तयारी होऊन परस्परांना सामना देण्याकरतां ता. १८ मे सन १७७५ रोजीं इंग्रज व दादासाहेब नापार येथून निघून महीनदीच्या रोखानें कूच करून चालले असतां सुमारें एक कोसावर जातात न जातात तों त्यांच्या पिछाडीवर एका झाडींतून हरिपंत फडके यांच्या फौजेनें तोफांचा भडिमार सुरू केला. हें पहातांच कर्नल कीटिंग यानें आपलें लष्कर थांबवून आपल्या तोफा आणवून हरि-पंतांच्या तोफांस उलट जबाब देण्यास सुरवात केली. इंग्रजांच्या तोफांच्या माऱ्यापुढें हरिपंतांच्या तोफांचे कांहीं चालेना, त्या बंद पडल्या व त्या तोफा तेथून काढून परत घेऊन जाऊं लागले. परंतु त्या अवजड असल्यामुळें परत नेतां येईनात. म्हणून कान्यांतून खिळे मारून त्या निरुपयोगी करून टाकल्या. इतक्यांत इंग्रजांनीं बंदुकांचा व तोफांचा पराकाष्ठेचा मारा केला व मराठ्यांस हुसकून लाविलें. या लढाईत हरिपंतांकडील फौजेचें फारच

नुकसान झालें. त्यांच्याकडील सरदारांपैकीं जखमी व ठार झालेल्यांची संख्या बरीच होती. मालोजी घोरपडे मुधोळकर जखमी झाले. त्यास गोळीची एक व तरवारीची एक अशा दोन जखमा झाल्या. त्याचे बंधू राणोजी घोरपडे हे ठार झाले. जयवंतराव पानसे व आनंदराव गोपाळ आणि त्यांचा मुलगा यांस गोळ्यांच्या जखमा लागल्या. जानोजी सुभेदार व बळवंतराव दीक्षित यांस तरवारीच्या व संगिनीच्या जखमा झाल्या. सय्यद हुसेन या नांवाचा एक उत्तम गोलंदाज हरिपंताच्या तोफांवर अमलदार होता. तोही ठार झाला. ही नापारची लढाई भयंकर निकराची अशी झाली. उभय पक्षांकडील तोफा बंद पडल्यानंतर हातोहातीचीही लढाई झाली. या लढाईंत इंग्रजांकडील तीनशेपर्यंत माणूस ठार झालें. त्यांत चांगले चागले गोरे ऑफीसरही होते. ही हानि इंग्रजांस फार जड [1]भासली. दादासाहेबांकडील जें सैन्य मारलें गेलें त्यांत अरब पुष्कळ होते. याप्रमाणें नापारच्या लढाईंत हरिपंतांचा पराभव होऊन तें सैन्य पळत सुटलें. त्यांचे मागें दादासाहेब व इंग्रज लागलेच होते. पुढें आरासजवळही एक लढाई झाली. त्यांतही हरिपतांचा पराभव झाला. पुढें हरिपंत पळत पळत नर्मदेच्या कांठीं आले. तेथें त्यांनीं तोफा वगैरे आपलें अवजड सामान नर्मदेंत बुडविलें व आपण राहिलेल्या सैन्यासह नर्मदा पार झाले. कांहीं हत्ती, उंट वगैरे सामान दादासाहेबांच्या हातीं लागलें. याप्रमाणे हरिपंत फडके पराभूत होऊन स्वदेशास येण्याकरतां निघाले. हें वर्तमान ता. ८ जून सन १७७५ इ. रोजी घडलें. त्या वेळीं पावसाळा सुरू झाल्यामुळें हरिपंतांचा पाठलाग करणें अशक्य झाल्याने इंग्रजांनीं आपलें सैन्य बडोद्याकडे आणलें. इंग्रजांनीं आपली छावणी बडोद्यापासून दहा कोसावर डभई मुक्कामीं केली. दादासाहेबांनी बडोदे व डभई याचे दरम्यान भिलापूर म्हणून गांव आहे तेथें केली.

७. इकडे नागपूर—वऱ्हाडप्रांतीं साबाजी व मुधोजी यांच्यांत लढाई होऊन त्या लढाईंत साबाजी मारला गेला. त्यामुळें मुधोजीच्या हातीं

---

१ ऐ. ले. सं. पान २२४३

राज्याचा अधिकार आला. बारभाईच्या पक्षाचा साबाजी होता. त्याचा नाश झाल्यामुळें व दादासाहेबांच्या पक्षांतील मुधोजी याच्या हातीं अधिकार आल्यामुळें बारभाईंवर हा एक दुसरा पेंचप्रसंग आला. त्यांनी मुधोजीस तंबी देण्याकरतां निजामअल्लीस लिहिलें. निजामअल्लीनें या वेळीं आपला स्वार्थ साधतो ह्मणून नागपुरावर स्वारी केली. मुधोजीचा दिवाण दिवाकरपंत हा होता. तो पेशवाईंतील साडेतीन शहाण्यापैकीं एक शहाणा होता. त्याच्या सल्ल्याप्रमाणें मुधोजीनें निजामअल्लीबरोबर परस्पर तह केला. त्यास मुधोजीनें बारा लक्ष रुपयांचा मलिदा चारला. या पूर्वीच मुधोजीचा मुलगा रघोजी यांस जानोजी भोंसल्याची बायको दर्याबाई हिनें दत्तक घेतलें होतें. त्यासच दादासाहेबांनीं सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें देऊन मुधोजीस त्याचा पालक नेमिलें होतें. मध्यंतरीं बारभाईंनीं साबाजीस वस्त्रें देऊन त्यास मुधोजीशीं भांडण्यास उभें केलें होतें. पण आतां साबाजी मेला तेव्हां पुन्हां पूर्वीप्रमाणें रघोजीच्या नांवें सेनासाहेब सुभ्यांची वस्त्रें द्यावीं ह्मणून मुधोजीनें निजामअल्लीमार्फत नाना व सखाराम-बापू यांचेकडे बोलणें लाविलें. अर्थात् निजामअल्लीच्या वकीलीमुळें नाना व बापू यांस रघोजींस पुन्हा वस्त्रें देणें भाग पडलें. मुधोजीनें प्रत्यक्ष भावाचा खून केला असतांही त्याचा अपराध या वेळीं बारभाईंनीं बिनशर्त माफ करून त्याच्या मुलास सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रे दिलीं व त्याला पालक नेमलें ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. निजामअल्लीस बारभाईंना सामील होण्यांत जो लाभ झाला होता, त्यात नागपूरकर भोंसल्याकडून मिळालेल्या या बारा लाखांची जास्त भर पडली. शिवाय निजामअल्लीस बारभाईकडून निराळी दलाली द्यावयाची होतीच. नागपुराकडील कामगिरी आटोपून तो औरंगाबादेस आला. "तेथें आपणास नेहमीं तुमच्या कामाकरतां फौजेसह छावणी करून राहिलें पाहिजे. परंतु शेजारीं दौलताबादचा किल्ला तुमच्या ताब्यांत आहे. तेथील माणसांच्या आमच्या माणसाशीं हरहमेशा गांठी पडून नेहमीं कलागती होणार हें चांगलें नाहीं; या करतां तो किल्ला आह्मांस द्यावा" असा निजामअल्लीनें

आग्रह धरल्यावरून सखारामबापू व नाना यांनीं दौलताबादचा किल्ला रिकामा करून त्याच्या स्वाधीन केला. हीच नागपूरकर भोंसल्यांच्या बाबतींत बारभाईकडून निजामअल्लीस मिळालेली दलाली होती. ह्या नाक्याचा किल्ला निजामअल्लीकडे गेल्यामुळें पेशव्यांच्या राज्याचें किती नुकसान झालें हें निराळें सांगावयास नको. "किसका फाटे और किसका तुटे" ह्या म्हणीप्रमाणें पेशव्यांचा किल्ला निजामअल्लीला दिला. बारभाईंना त्यांत विषाद वाटण्यासारखा नव्हता. हलवायाच्या दुकानावर ब्रह्मार्पण करण्याचें व्रत त्यांनीं राघोबादादांस घराबाहेर काढल्यानंतर चालविलेंच होतें.

८. इ. स. १७७५ सालाच्या प्रारंभापासून करवीरकरमहाराज व इचलकरंजीकर यांची धूसफूस सुरू होऊन हातघाईवर प्रसंग गुदरला होता. इचलकरंजीकरांचे पटवर्धन हे उपाध्ये असल्यामुळें व त्यांचें घराणें यांच्याच आश्रयानें ऊर्जितावस्थेस आल्यामुळें पटवर्धनांनीं इचलकरंजीकरांस सहाय्य केलें. यामुळें करवीरकरांस राग येऊन त्यांनीं इचलकरंजीस वेढा घातला व पटवर्धनांचीं कांहीं गांवें लुटलीं. ही हकीकत पुरंदरास समजतांच कारभाऱ्यांकडून करवीरकरांस तंबीचीं पत्रें आलीं. परंतु त्यांस त्यांनीं भीक घातली नाहीं. उलट पेशव्यांच्या मुलुखासही त्यांनी उपद्रव देण्यास सुरवात केली.

९. या सुमारास कित्तुरकर देसायाच्या दंग्यास सुरवात झाली. त्यानें बेळगांव व धारवाड जिल्ह्याखालीं असलेला मुलुख लुटून फस्त केला. त्यानें नवलगुंद तालुका घेतला. कलघटगींत ठाणें बसविलें. धारवाड व गदग यांवर स्वारी करण्याची तयारी केली. धारवाडच्या मामलेदाराचा पराभव करून त्याच्या तोफा हिसकावून घेतल्या. इकडे थेट गोकाकपर्यंत बहुतेक ठाणीं बसविलीं. पंधरा हजार पायदळ, दीड हजार स्वार, शिवाय कांहीं तोफा इतकें सैन्य व सामान त्यानें जमविलें. हैदरअल्ली, करवीरकरमहाराज व शंकराजी घोरपडे मुधोळकर या तिघांकडे त्यानें आपलें सूत्र बांधलें. त्यामुळें कित्तुरचा साधा देसाई बारभाईंना जबरदस्त शत्रू वाटण्याजोगा सरदार बनला.

१०. करवीरकर व कित्तुरकर या उभयतांचा बंदोबस्त करण्याकरतां पांच
जार फौज देऊन कोन्हेरराव पटवर्धनांची त्या कामावर नेमणूक केली
ली. त्याच्या मदतीला मागाहून दोन हजार फौज देऊन रामचंद्र गणेश
ानडे व कृष्णराव पानशे यांना रवाना केलें. आपल्या एक हजार स्वार व एक
जार पायदळ अशा फौजेसह पांडुरंगराव पटवर्धन कोन्हेररावास मिरजेस
ाल्यावर मिळाले. या सैन्याची व करवीरकरांच्या सैन्याची एक दोन
ेकाणीं थोडीबहुत चकमक झाली. त्यांत पटवर्धनाकडे जयाचा झुकता कांटा
ता. पुढें त्यांनीं आळत्याचें ठाणें घेतलें व शिरोळास वेढा घातला. इतक्यांत
रवीरकरांची फौज एके रात्रीं अकस्मात् येऊन तिनें पटवर्धनांच्या फौजेस न
मानतां त्या ठाण्यांत दारू गोळा वगैरे सामान व नवे लोक आणून घातले.
ोफांचा भडिमार करून पटवर्धनांचा तळ उध्वस्त केला. दुसऱ्या दिवशीं
ारोळचेही मोर्चे पटवर्धनांस उठविणें भाग पडलें. पांडुरंगराव फौजेसह परत
रजेस आले. करवीरकरांच्या फक्त तीन साडेतीन हजार फौजेपुढें पटवर्ध-
ांच्या सात हजार फौजेनें माघार खाल्ली व त्यामुळें पटवर्धनांची फटफजीति
ाली. ही करवीरकरांबरोबर पटवर्धनांची चाललेली लढाई रेंगाळत जात आहे
त्यांत आपल्या इच्छेप्रमाणें यश मिळत नाहीं असें नाना व सखारामबापू
ांनीं पाहून त्यांनीं करवीरकरांबरोबर कशीबशी तहाच्या अटीची याद लिहून
वढ्यापुरतें प्रकरण मिटतें घेतलें. या कामीं या कारभाऱ्यांनीं करवीरकरांस
ात दाखविण्याऐवजीं अवलक्षण मात्र पदरीं बांधून घेतलें.

११. करवीरकरांबरोबर हा तात्पुरता समेट झाल्यानंतर कोन्हेरराव
टवर्धन कित्तुरवर चाल करून गेला. उभयतांच्या एक दोन ठिकाणीं चकमकी
ाऊन त्याच्याबरोबरही पुणें दरबारास तह करावा लागला. याचें कारण हैदर-
ल्लीची फौज तुंगभद्रेपर्यंत आली होती. या तहांत कित्तुरच्या देसायानें चालू
ालची खंडणी रुपये दोन लक्ष व बाकी काय राहिली असेल ती द्यावी,

एवढ्या अटीवरच तह करून घेण्यांत आला. कित्तुरकर देसायाच्या अपराधाच्या मानानें, पुणें दरबारला, त्याला कांहींच प्रायश्चित देतां आलें नाहीं, असें ह्मणणें भाग पडतें.

१२. हैदरअल्लीनें दादासाहेबांचा पक्ष स्वीकारला होता व त्यांजकडून तुंगभद्रा व मलप्रभा या नद्यांमधील मुलुख दरसाल सहा लक्ष खंडणी देण्याच्या शर्तीवर मिळविला होता. परंतु हा मुलुख अद्यापि त्याच्या हातीं आला नव्हता. पटवर्धन, पेशवे व रास्ते यांजकडे मुख्यत्वें हा टापू होता. उत्तरेकडे काय काय धामधुमी होतात इकडे त्याचें लक्ष होतें. संधि साधेल तेव्हां हा मुलुख घ्यावा व तेथपर्यंत आपल्या राज्याची बळकटी व अंतर्व्यवस्था करीत राहावें हें त्याचें धोरण होतें. अदवानीचा नबाब व निजामअल्लीचा भाऊ बसालतजंग यानें बल्लारीस वेढा घातल्यामुळें तेथील संस्थानिकानें हैदराजवळ कुमक मागितली. त्यानें श्रीरंगपट्टणाहून पांच दिवसांत बल्लारीस येऊन बसालतजंगावर छापा घातला व त्याच्या फौजेचा विध्वंस करून बसालतजंगापासून एक लाख रुपये घेऊन त्यास सोडून दिलें, आणि शेवटीं बल्लारीही आपणच घेतली. पुणें दरबारास इंग्रजांवर जय मिळवितां आला नाहीं; करवीरकर व कित्तुरकर यांचे दंगे मोडण्यांत पुणें दरबारचें शैथिल्य दिसून आलें; असें पाहून पेशव्यांची कुरापत काढण्याचें हैदरनें मनांत आणलें. त्याप्रमाणें सातआठ हजार फौज तिकडे पाठवून त्यानें धारवाड प्रांतावर स्वारी करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें त्या सैन्यानें हरीहर व हल्याळ हीं ठाणीं घेतली.

१३. दादासाहेब गुजराथेकडे पळून जात असतां आनंदीबाई गरोदर असल्यामुळें तिला दूर दूरच्या मजली घेतां येईनात, ह्मणून दादासाहेबांनीं तिला धारच्या किल्ल्यांत बंदोबस्तानें ठेविलें होतें, हें मागें आलेंच आहे. तेथें ती प्रसूत होऊन तिला तारीख १० जानेवारी सन १७७५ इसवी रोजीं बाजीराव हा पुत्र झाला. आनंदीबाईनें तेथून पुरंदरास नाना फडनविस यांस पुत्रोत्स-

ाच्या आनंदाची, अशा बिकट परिस्थितींतही, साखर पाठविली होती. या ाखरेचा हेतू " परिणामीं गोड, तें सारेंच गोड " हें तत्व नानांच्या निदर्श-ास आणण्याचा असावा. ती बाळंतपणांतून उठल्यावर तिनें भिल्ल व गारदी ाकरीस ठेऊन आपल्या संरक्षणाचा बंदोबस्त करण्यास प्रारंभ केला. त्यामुळें तेला शिंदे व होळकर खर्चास पुरवितात ह्मणून बारभाईंनीं पुण्यास ओरड ुरू केली. उलटपक्षीं महादजी शिंद्यानें अशी ओरड सुरू केली कीं, आनंदी-ाईनें भगीरथराव शिंद्यास फितूर करून घेऊन त्यास शिंद्याची जहागीर देते ाणून सांगितलें व त्यास आपल्याविरुद्ध भांडावयास उभें केलें.

१४. याप्रमाणें पेशव्यांच्या राज्यात बारभाईंनी राघोबादादांस घराबाहेर ाढल्यामुळें व माधवराव पेशव्यांनीं देऊं केलली तुटपुंजी जहागीरही देण्याचें ाकबूल केल्यामुळें जिकडे तिकडे बंडें, धामधुमी, बखेडे वगैरे सुरू झाले ोते व कित्येक नवीनही होऊं पहात होते. मुलुखांतून वसूल निर्विघ्नपणें ईना. जो येई तो फौजेच्या खर्चासही पुरेना. ह्मणून राज्यांतून अधिक पैसा सूल करण्याकरतां कारभाऱ्यांनीं हक्क, रुसूम व दहकपट्टी हे एक वर्षापुरते नवीन कर प्रजेवर बसविले व वसूल केले. जमीनबाबीचा वसूल दरशेंकड्यास ़हा रुपयेप्रमाणे जास्ती वाढविले. गावगऱ्याचे पाटील कुलकर्णी, चौगुले, शेट्ये, ाहाजन यांच्या हक्कमुशाहिऱ्याचें उत्पन्न एक वर्षाचें पुरें घेतलें. इनामदारांच्या ़नामांचें उत्पन्नही त्याचप्रमाणें एक वर्षाचें घेतलें. त्याचप्रमाणें सर्व सरदार, ़रकदार, तैनातदार यांच्या एक वर्षाच्या तैनातीही घेतल्या. वाणी, उदमी ़गैरे लोकांच्या प्राप्तीवर शेंकडा एक रुपयाप्रमाणें कर बसवून तोही वसूल ़ला. याप्रमाणें बारभाईंच्या कारस्थानाची झळ सामान्य मनुष्यापासून तों थेट ़ोठमोठ्या सरदारापर्यंत सर्वांनाच लागली.

१५. या वेळीं रत्नागिरीस सदाशिवरावभाऊ यांनींही बारभाईविरुद्ध शस्त्र ़भारलें होतें. तें ' तोतयाचें बंड ' या स्वतंत्र प्रकरणांत पुढें यावयाचें असल्या-

मुळें त्याचा येथें केवळ उल्लेख केला आहे. याशिवाय जुन्नर, भीमाशंकर, व त्र्यंबकेश्वर यांच्या आसपास घाट बंधारीस कोळी लोकांनीं कित्येक किल्ले घेऊन फार पुंडावा आरंभिला होता. त्रिंबक सूर्याजी परभू हा दादासाहेबांचा अनुयायी होता. त्यानें फौज जमवून सप्तशृंगीचा डोंगर घेतला व तो धरून बसला. त्याच्या दंग्यानें प्रांत ओस पडत चालला. हे दंगे मोडण्यासाठीं, करवीरच्या स्वारींतून रामचंद्र गणेश कानडे हे परत आले होते, त्यांजबरोबर तीन हजार स्वार व एक हजार गारदी देऊन, नाशकाकडे त्यांची पुन्हां रवानगी करावी लागली.

१६. जमिनीवर ज्याप्रमाणें इंग्रजांनीं पेशव्यांवर सरशी केली होती, त्याचप्रमाणें समुद्रांतील लढाईमध्येंही त्यांनीं पहिल्यापासून सरशी मिळविली होती. इंग्रजांच्या आरमारानें वसई बंदराचा वारा कित्येक महिनेपर्यंत अडविला होता. परंतु त्यास तेथून हांकलून लावणें पेशव्यांच्या आरमाराकडून झालें नाहीं. उलटपक्षीं इंग्रजी आरमारच, पेशव्यांचें आरमार जेथें दृष्टीस पडेल तेथें त्याचा पाठलाग करीत असे. 'पाण्यातील कामास इंग्रज सध्या अधिक आहे,' हें हरिपंत फडक्यानेंसुद्धां कबूल केलें होतें. एके प्रसंगीं इंग्रजाच्या आरमारानें पेशव्यांच्या आरमाराचा पाठलाग करतां करतां त्यापैकीं एका गलबतास गाठून चढाई करून त्याचा नाश केला. त्या वेळीं त्यावरचे बहुतेक लोक प्राणांस मुकले. त्यावेळीं[1] मराठ्यांचीं पांच गलबतें होतीं. त्यांत तीन अनुक्रमें शेचाळीस, अडतीस व बत्तीस तोफांचीं होतीं. दोन तेवीस तेवीस तोफांचीं होती. इंग्रजाचीं गलबतें 'रिव्हेंज,' व 'बाँबे,' या नांवाचीं दोनच होतीं. पेशव्याचें आरमार दिसण्यांत प्रचंड होतें. तरी इंग्रजी गलबतांस पाहिल्याबरोबर तें पळूं लागलें. तेव्हां इंग्रजी गलबतानें निकड करून सर्वांत मोठें जें 'समशेरजंग,' नांवाचें शेचाळीस तोफांचें गलबत होतें तें गांठलें व त्यास लढाई करण्यास भाग पाडलें. तीन तास लढाई होऊन 'समशेरजंग,' आंतील दारूगोळ्याच्या कोठारास

---

१. ग्रांटडफ

आग लागून जळून गेलें. याप्रमाणें समुद्रावरही इंग्रजांची सरशी होऊन बार-भाईंची मानखंडना होत होती.

१७. इतका वेळपर्यंत निजामअल्ली, हैदरअल्ली, नागपूरकर भोंसले, गायकवाड, शिंदे, होळकर, कोल्हापूरकर, कित्तुरकर इत्यादिकांच्या वागणुकीचा झोंक बारभाईबरोबर कसा होता हें मागें आलेंच आहे. सुरापुरकरांचा दगा, साष्टीवर इंग्रजांचें आक्रमण व पेशव्यांची पिछेहाट, बुंदेलखंड प्रांतांत जाट व गोसावी यांचा दंगा व मोड, अशा कांहीं किरकोळ गोष्टी चालल्याच होत्या. ज्यानें यावें त्यानें रयतेस चेपावें, खंडणी घ्यावी, लुटावें व खुशाल निघून जावें, या प्रकारें बारभाईंच्या राज्यांत बेबंदशाही सुरू होती. हें सर्व कां? तर खऱ्या पेशव्याला नामधारी बनवून त्याची सत्ता व मत्ता गिळंकृत करण्याकरतां हें बारभाईंचें कारस्थान होतें. पण या बारभाईंना शेवटीं स्वतःचें घरही राखतां आलें नाहीं, एवढेंच नव्हे तर पुढें ते अधिकाराच्या जागेकरतां एकमेकांतहि भांडले व झगडले. त्यांनीं खऱ्या पेशव्यांना जमीनदोस्त केलें. सर्व सरदारांत दुफळी पाडून त्यांची शकलें शकलें केलीं. प्रजेला 'त्राहि भगवन्' करून सोडलें. शेवटी तुला नको व मला नको असें करून सर्वस्वाचा नाश करून घेतला. या सर्व कृत्याला जबाबदार कोण? बारभाई कीं राघोबादादा? याचें उत्तर क्रमशः पुढें येईलच. परंतु, येथें एवढें मात्र पुन्हां नमूद करून ठेवावेंसें वाटतें कीं, दादासाहेबांना माधवराव पेशव्यांनीं पूर्वी कबूल केलेली छोटीशीं जहागीर जर बारभाईंनीं त्याच वेळीं कबूल केली असती तर हे पुढील सर्व अनर्थ खात्रीनें टळले गेले असते व पेशव्याचे, पेशवाईचे व बारभाईचे निघालेले धिंडवडे खात्रीनें टळले असते.

१८. मागें सांगितल्याप्रमाणें इंग्रज व राघोबादादा हरिपंतावर मात करून बडोद्याजवळ येऊन पावसाळ्यानिमित्त छावणी करून राहिले. इंग्रजांना जरी या प्रसंगीं जय मिळाला होता, तरी त्यांचे बरेच गोरे आफीसर व

सोल्जर मेल्यामुळें ती हानि त्यांच्या मनांत सारखी डिंवचत होती. इंग्रजांनीं राघोबादादांना आश्रय देण्यापूर्वी पेशव्यांबरोबर इतके दिवस त्यांचे सलोख्याचे असलेले संबंध मोडून साष्टीवर हल्ला करून त्यानीं ती घेतली होती. ही कलागत दादासाहेबांमुळें इंग्रजांनीं केली नसून ती त्यांनीं स्वयंप्रेरणेनेंच केली होती. अर्थात्, इंग्रजांना साष्टी पाहिजे होती ती त्यांनीं अगोदर घेतली व कलागत उत्पन्न केल्याचें पाप माथीं न बसवून घेतां ती आपणास कशी पचवितां येईल याबद्दलचे डावपेंच लढवून त्यांना आपलें माथें उजळ करून घ्यावयाचें होतें. या दृष्टीनें पहातां जोंपर्यंत दादासाहेबांनीं साष्टीची सोडचिट्टी देण्याचें कबूल केलें नव्हतें, तोंपर्यंत त्यांनीं दादासाहेबांस आश्रय दिला नाहीं, ही गोष्ट मुद्याची आहे. इंग्रजांनीं पहिल्यानें दादासाहेबांबरोबर जो तह केला, त्यांत त्यांनीं साष्टी आपल्याकडे ठेवण्याबद्दल अट घालून घेतली. अर्थात् दादासाहेबां-कडून साष्टीची सोडचिट्टी इंग्रजांस मिळाली. आतां त्यांना बारभाईकडूनही तशीच सोडचिट्टी घेणें प्राप्त होतें. कारण, केवळ दादासाहेबांच्या सोडचिट्टीनें इंग्रजांचा माथा उजळ होणारा नव्हता. ह्मणून पहिल्यानें बारभाईकडून तशी सोडचिट्टी हातीं पडण्याकरतां इंग्रजांस पुरंदरच्या कारभारी मुत्सद्यांना व पाताळ-यंत्री कारस्थानी पुरुषांना दिङ्मूढ करतां येण्यासारखें कारस्थान रचावें लागलें व हें कारस्थान रचण्यास पावसाळ्याची उमदी संधि इंग्रजांस लाभली हें त्यांचें भाग्य होय.

१९. पोर्तुगीज लोकांच्या विलायतेंतील बादशहाकडून साष्टी वगैरे स्थानें हिंदु लोकांपासून माघारी घ्यावयास गोमांतकीं फौज आली हें पाहून मुंबईकर इंग्रज सरकारांनी असें ठरविलें कीं, 'ठाणें नामा साष्टीचा किल्ला तो आपण न घेतल्यास पोर्तुगीज घेतील यास्तव त्वरा करून तें ठाणें आपण घ्यावें.' तेव्हां सहाशे गोरे लोक व एक हजार पलटणी शिपाई तोफासुद्धां त्या कामावर नेमले. ते ता १२ डिसेंबर सन १७७४ रोजीं साष्टी घेण्याकरतां मुंबईहून निघाले[1] ते तेथ पोंचल्यापासून सातवे दिवशीं

---

१. मराठ्याची बखर इफकुत पान २४४

त्यांनीं ठाणें घेतलें व थोडक्याच दिवसांत संपूर्ण साष्टी आणि उरणटापू हीं ठिकाणें हस्तगत केलीं. ता. ६ मार्च सन १७७५ रोजीं दादासाहेबांबरोबर इंग्रजांचा सुरतेचा तह झाला. या तहांत इंग्रजांनीं साष्टी वगैरे टापू जो पेशव्यांशीं निष्कारण कलह करून घेतला होता, त्याचा अंतर्भाव करून घेतला. नंतर ता. ८ जून सन १७७५ रोजीं इंग्रज व राघोबादादा यांनीं सुरतेच्या तहान्वयें पेशव्यांच्या ह्मणजे बारभाईंच्या सैन्याचा मोड करून त्यास नर्मदेपार हुसकून लाविलें. व गुजराथेंतील ठाणीं हस्तगत करून बडोद्याजवळ येऊन छावणीस राहिले. पुरंदरच्या दरबारी लोकां-विरुद्ध कलागत करून साष्टी बेट इंग्रजांनीं घेणें काय किंवा राघोबादादांना मदत करून घेणें काय, या दोन्ही गोष्टी करणें ह्मणजे बारभाईंच्या विरुद्ध इंग्रजांनीं पूर्वींचे स्नेहाचे संबंध तोडून वागणें असेंच ठरतें. परंतु प्रथम साष्टी घेण्यांत जी पुणें दरबाराशीं नवीन कलागत इंग्रजांनीं उकरून काढली त्यांत आपला केवळ स्वार्थ साधण्याचेंच त्यांचे धोरण होते हें सिद्ध होतें. परंतु राघोबादादास आश्रय देण्याचे बाबतींत निखालसपणें तसेंच तें स्वार्थाचें होतें, असे ह्मणता येणार नाहीं. कारण, राघोबादादा हे पेशवाईचे एक वारसदारच होते. राघोबादादांबरोबर तह केल्यानें व त्यांना मदत केल्यानें सर्व पुणें दरबाराशीं वैमनस्य उत्पन्न करण्यासारखें होत नव्हते. या वेळीं पेशवे दरबारीं राघोबाचा पक्ष व बारभाईंचा पक्ष असे दोनच पक्ष होते. साष्टी घेणें ह्मणजे या दोन्ही पक्षांबरोबर विरुद्ध होण्यासारखें होतें. पण राघोबादादांना मदत करणें ह्मणजे फक्त बारभाईंविरुद्ध मदत करणें एवढेंच होतें. असें असतां पुढें कलकत्याच्या गव्हर्नर जनरलनें रेग्युलेटिंग अॅक्टचें बुजगावणें पुढें करून मुंबई सरकारनें राघोबादादांस मदत करण्यांत हिमालयन चूक केली व ती आपल्या अधिकाराबाहेर वरिष्ठ अधिकाऱ्यांची संमती न घेतां केली ह्मणून राघोबादादाबरोबर सुरतेचा केलेला तह रद्दबातल ठरवून त्याला निराश्रित करून त्याचा पक्ष सोडण्यांत

त आपल्या न्यायप्रियतेचें व अधिकारपरत्वें राजकारणाचें स्तोम माजविलें त्यावरून पहातां अंतर्यामीं एक व दाखवावयाचें भलतेंच असा स्पष्ट ध्वनि त्यांच्या पुढील वागणुकींतून बाहेर पडल्याशिवाय राहात नाहीं.

२०. मुंबई सरकारनें आपल्या अधिकाराबाहेर कलकत्ता सरकारची आज्ञा न घेतां पुणें दरबारशीं कलागत केली हें कलकत्ता सरकारला गेल्या पांच सहा महिन्यांपासून ज्या घडामोडी घडल्या त्यावरून पुरतेपणीं माहीत होतें हें निराळें सांगावयास नको. इकडे पुरंदरास इंग्रजांच्या साहाय्यानें राघोबादादांनीं हरिपंत फडके यांचा पराभव केला ही बातमी आली. त्या वेळीं इंग्रजांना दादासाहेबांच्या पक्षांतून फोडल्याशिवाय आपला तरणोपाय नाहीं असें नाना व बापू या पाताळयंत्री मुत्सद्यांस वाटलें. तेव्हां त्यावर त्यांनीं तोड अशी काढली कीं, मुंबई सरकारास गप्प बसविण्याकरतां कलकत्तेकर सरकाराचें अस्त्र उपयोगी पडेल. ह्मणून त्यांनीं कलकत्तेकर सरकाराकडे धांव घेतली. सखारामबापूंनें ता० २९ जुलई सन १७७५ रोजीं गव्हर्नर जनरल यांचेकडे खालील खलीता पाठविला. त्यांतील मुख्य आशय पुढीलप्रमाणें आहे. सदर खलीता जो पाठविला त्याचें इंग्रजी भाषांतर " Secret Committee's Fifth, Report ( page 80)" या पुस्तकांत दिलें आहे. त्यांतील काहीं भागाचें भाषांतर पुढीलप्रमाणें आहे.[1]

ता० २९ जुलै सन १७७५

" तुमचें शहाणपण, धूर्तता व बुद्धिमत्ता ह्यांचीं अनेक उदाहरणें माझ्या ऐकण्यांत आल्यावरून तुमचा स्नेह जोडावा अशी माझी फार दिवसांपासून इच्छा होती. परंतु, अद्याप योग आला नव्हता. कोणतीही गोष्ट तिची वेळ आल्याशिवाय घडून येत नसते. असो. ईश्वरकृपेनें याच-प्रसंगीं माझ्या इच्छेनुरूप आपलें पत्रही आल्यामुळें हा योग जुळून आला आहे. आपलें पत्र वाचून आपल्या स्नेहाविषयीं खात्री झाली व संतोष

---

१. नातूकृत महादजी शिंद्याचें चरित्र पान २८०.

वाटला. सदर पत्रामध्यें तुह्मी मुंबईचे सरदारांस राघोबांस मदत न देण्याविषयीं लिहिलें. तसेंच कंपनीच्या हुकुमावांचून त्याला दिलेली कुमक परत घ्यावी व श्रीमंत रावांच्या राज्यास उपद्रव देऊं नये असा हुकुम पाठविला असेंही लिहिलेलें वाचून संतोष झाला. ×××× पूर्वापार संबंध असा आहे कीं, मुंबईचे सरदार व पेशवे यांचेमध्यें स्नेह असून तो स्नेह अनेक तह व करारांनीं बळकट झालेला होता. इतक्यांत दुर्दैवानें श्रीमत नारायणराव यांस रघुनाथरावानें ठार मारलें ही हकीकत जगजाहीरच आहे. तथापि त्यांना पुत्र झाला असून त्याच्या आश्रयाखालीं आह्मी राहात आहों. हा पुत्र झाल्यापासून सर्वांस उल्हास व उमेद आली व त्याला मसनदीवर स्थापन करण्यांत आलें. +++ कैलासवासी रावांच्या वेळीं मी व नाना कारभार पहात होतों. व त्याचप्रमाणें आतां सुद्धां गादीची मनःपूर्वक चाकरी आम्ही करीत आहों व करण्यास तयार आहों. याबद्दल एकंदर आबालवृद्ध संतोषित आहेत. त्याचप्रमाणें नबाब उल्मुल्क यांचीही आह्मांबरोबर पूर्वीप्रमाणें दोस्ती आहे.

२१. "ही हकीकत होतांच रघुनाथराव हिंदुस्थानाकडे पळाले व त्यांच्या पाठीवर सरकारचीही फौज गेली. इतक्यांत मुंबईचे सरदारांनीं या सरकारबरोबर असलेला पुरातन स्नेह व निरनिराळे तह एकीकडे ठेऊन, लबाडीनें या सरकारच्या साष्टी वगैरे जागा घेतल्या व सरकारच्या फौजेबरोबर लढाई करीत परागंदा झालेल्या रघुनाथरावाबरोबर तह केला. तुमच्या देशांत तहनामे पाळण्याविषयीं कडक नियम आहेत. ज्यांच्यामध्यें तह ठरतात ते त्याविरुद्ध मरेपर्यंत वागत नाहींत. असें असतां मुंबई सरदारांनीं स्नेहाचा संबंध तोडून असें वर्तन चालविलेलें पाहून मला फार आश्चर्य वाटलें! या वर्तनाबद्दल त्यांचा बंदोबस्त करणें जरूर पडल्यावरून आमची फौज मोठ्या तयारीनिशीं त्यांच्यावर पाठविली आहे. ×××× माझा हेतू आपल्या

धन्याचा अधिकार बळकट करावा, प्रजेचें कल्याण करावें व तिला सुख द्यावें आणि मातबर लोकांतील तंटेबखेडे मोडून ऐक्य करावें असा आहे. त्याचप्रमाणें तुमचीही इच्छा आहेच. ××× बाळाजीपंतांनीं आपणांस वेगळे लिहिलेंच आहे. पत्राचें उत्तर पाठवून दोस्ती कायम ठेवावी."

२२. ह्या सखारामबापूंच्या खलित्यांतील मजकुरावरून पुढील विधानें प्रामुख्यानें दिसून येतात. १ इंग्रजसरकाराबरोबर तहनामा करून स्नेह जोडण्याची बारभाईंची आतुर इच्छा होती २ राघोबादादा हे पुतण्याचा खून करणारे ह्मणून रावांच्या ( पेशव्यांच्या ) राज्याचे अपराधी व राजद्रोही होते. ३ सखारामबापू व नाना हेच पूर्वापार चालत आलेले प्रजाहितदक्ष, राजहितदक्ष व प्रामाणिक असे रावांच्या राज्यांतील कारभारी होते. ४ बारभाई सनदशीर मार्गाचे अनुयायी असतां इंग्रजांनीं साष्टी घेऊन व दादासाहेबांना मदत करून रावांच्या राज्याबरोबरचे हितसंबंध तोडले. ५ नाना व बापू असे कारभारी एकदिलाचे होते. राज्याचें रक्षण उत्तम प्रकारें चालूं होतें. प्रजा आनंदांत होती. हे पांच मुद्दे वरील पत्रांत विषद केले आहेत. शिवाय या पत्रांत इंग्रजांनीं पुरंदरास मुंबईकरांनीं घेतलेल्या चढाईच्या धोरणाबद्दल दुःख प्रदर्शित करून आपली झालेली चूक सुधारून घेतल्याबद्दलही दर्शविलें आहे. सदर इंग्रजासंबंधींच्या खलित्यांतील पत्राचा आशय दुसऱ्या माहितीशीं ताडून पहातां इंग्रजांना काय साधावयाचें होतें याचा स्पष्ट खुलासा होतो. डफ यांच्या मराठ्यांच्या बखरींत यासंबंधीं पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे. "मुंबई सरकारानें मराठे यांशीं संबंध करून कांहीं मुलुख संपादिला," त्यावरून त्यांनी असें सांगितलें कीं, "तुम्हीं हें काम सरकार हुकुमाखेरीज केलें, त्यांस तें लवकर टाकून द्या, आणि जें लष्कर मराठ्यांच्या कुमकेस पाठविलें आहे तें माघारें आपल्या कंपनीच्या मर्यादेमध्यें आणवा आणि साष्टी व वसई मात्र आपणाकडे ठेवा." गव्हर्नर जनरलचा हुकूम मुंबई सरकारला जो गेला त्यांतील स्पष्ट हेतु यांत आहे. ह्मणजे साष्टी व वसई हीं

ठिकाणें मुंबईकरांनीं कलागत करून जीं मिळविलीं तीं सोडण्यास गव्हर्नर जनरल तयार नव्हते. कारण त्या ठाण्यामुळें इंग्रजांचें दर्यावरील बळ वाढणार होतें व उलटपक्षीं पेशव्यांचें दर्यावरील महत्त्व नामशेष होणार होतें. यावरून साष्टी व वसई ही ठाणीं इंग्रजांना लढाईचे प्रसंग टाळून पचवावयाचीं होतीं हेंच सिद्ध होतें. पुरंदरच्या कारभाऱ्यांनीं साष्टी परत घेण्याकरतां सैन्य पाठविलें हें गव्हर्नर जनरलास समजतांच त्यानें लढाई न करतां साष्टी व वसई हीं ठाणीं पचविण्याचा हा डाव मुत्सद्यांवर टाकला व तो त्यांच्या मर्मस्थानीं चांगला बसला. दादासाहेब आतां आपणांस सोडून कोठें जाऊं शकत नाहींत व आम्ही जें मागूं तें दिल्याशिवाय बारभाई दादासाहेबांच्या पेंचप्रसंगांतून मुक्त होऊं शकत नाहींत या परिस्थितीमुळें लढाई न करतां केवळ आपण स्वस्थ बसल्यानें साष्टी व वसई हीं ठाणीं आपणांस पचतील, म्हणून गव्हर्नर जनरलनें रेग्युलेटिंग ॲक्टाचें बुजगावणें पुढें केलें व आपला वकील ॲपटन साहेब यास तह करण्याकरतां पुरंदरास पाठविला. हा तह ता. १ मार्च सन १७७६ रोजीं झाला. त्यांतील पहिलें कलम साष्टी बेट इंग्रजांनीं घेतलें तें त्यांच्याकडेच राहावें, हें आहे. यावरून साष्टी बेट लढाई न करतां पचविण्याची रामबाण युक्ति गव्हर्नर जनरलनें काढली असेंच ठरत नाहीं काय? यासंबंधीं आणखी एक महत्वाची गोष्ट दाखविण्यासारखी आहे. ॲपटन साहेब पुरंदरास आले व कारभारी मंडळींच्याबरोबर त्यांच्या तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्या. त्या वेळीं कारभाऱ्यांचा आग्रह असा होता कीं, साष्टीसुद्धां घेतलेला सर्व मुलुख इंग्रजांनीं परत करावा. परंतु, इंग्रजांचा वकील या गोष्टीस कबूल होईना म्हणून तहाचें बोलणें मोडल्यासारखेंच झालें व ता० ७ मार्च सन १७७६ रोजीं कलकत्तेकरांनीं मराठयांशीं फिरून युद्ध सुरू करण्यास मुंबईकरांस परवानगी देण्याचें ठरविलें.[1]

---

१. मराठे व इंग्रज पान ६६.

२३. या एकंदर प्रकारावरून साष्टी लढाईशिवाय आपल्या तोंडांत टाकण्याकरतां इंग्रजांनीं कसे डावपेंच रचले व ती अचानक कशी गिळंकृत केली हें दिसून येतें. अशा प्रकारें शेरास सव्वाशेर कारस्थान करून बारभाईकडून इंग्रजांनीं साष्टीची सोडचिट्टी घेतली. ही सोडचिट्टी अशा प्रकारें घेण्यांत इंग्रजांनीं आपल्या न्यायनीतीचे गांठोडें बांधून तें वेशीवर टांगलें असें दादासाहेबांस वाटलें. अॅपटन साहेबानें बारभाईबरोबर केलेल्या या पुरंदरच्या तहामुळें दादासाहेबांच्या बाबतींत केवढा मोठा अन्याय झाला याची जाणीव त्यांना नव्हती असें म्हणण्यापेक्षां स्वार्थसाधनार्थ कलकत्तेकर इंग्रजांनीं या कामीं न्यायअन्यायाची उपेक्षा केली असें म्हणणें जास्त खरें ठरतें. सखारामबापूंच्या पत्राप्रमाणें राघोबादादा हत्या करणारा, सबब तो अयोग्य आहे म्हणून त्याचा पक्ष धरणें नीट नव्हे असें गव्हर्नर जनरल म्हणतो. परंतु मुंबई सरकारानें राघोबादादांना आपण दिलेला आश्रय किती न्यायाचा व सत्याचा आहे हें दाखविण्याकरतां गव्हर्नरजनरलास जें कळविलें त्यांत ते लिहितातः "राघोबांच्या हातून हत्या घडली नाहीं असें आम्हांस पुरतेपणीं ठाऊक आहे[१]" यावरून पहाता मुबईच्या गव्हर्नरानें आपल्या वरिष्ठ अंमलदारांस माहिती देतांना राघोबादादा पूर्ण निर्दोषी आहेत याची त्यानें पूर्ण चौकशी केली, म्हणूनच आपल्या स्वतःच्या डोक्यावर त्यानें जबाबदारी घेऊन, राघोबादादानीं हत्या केली नाहीं हें आपणाला पूर्णपणें ठाऊक आहे असें त्यांना कळविलें. गव्हर्नर जनरलच्या एकांगी माहितीपेक्षां मुंबई सरकारची या बाबतींतील माहिती खात्रीनें विश्वसनीय आहे यांत शंका नाहीं.

२४. गव्हर्नर जनरलच्या पुरंदर प्रकरणीं घडलेल्या डावपेंची धोरणामुळें मुंबई सरकार तोंडघशीं पडलें व त्यामुळें दादासाहेबांचा सत्यानाश झाला. पुरंदरच्या तहामध्यें दादासाहेबांना आपल्या स्वाधीन करण्याचें बारभाईचें

---

१. डफकृत मराठ्यांची बखर पान २५३

मुख्य कलम होतें. आपणच दादासाहेबांना आश्रय द्यावयाचा व आपण होऊन त्यांना बारभाईच्या ताब्यांत द्यावयाचें एवढा अनीतीचा मार्ग पत्करण्यास मुंबई सरकार तयार होईना. ह्मणून शेवटीं, पुरंदरच्या तहांतील अटी पाळतांना इंग्रजसरकारांनीं दादासाहेबांच्या बाबतींतील ही अट पाळली नाहीं पुरंदरच्या तहांतील अटी खालीलप्रमाणें होत्या: साष्टी इंग्रजांकडे राहावी. ती परत देण्यास इंग्रज कधीकाळीं कबूल झालेच तर त्यांना पेशव्यांनीं त्याच्या मोबदला तीन लक्षांचा मुलुख द्यावा. भडोच शहर व भोंवतालचा मुलुख पेशव्यांचे ताब्यांत होता. तो ह्मणजे सुमारे तीन लक्षांचा मुलुख पेशव्यांनीं इंग्रजांस द्यावा. इंग्रजांनीं राघोबांचा पक्ष सोडून आपलें सैन्य काढून न्यावें. आणि राघोबांनींही आपल्या फौजेस फांटा देऊन महिना पंचवीस हजार रुपये घेऊन गोदातीरीं कोपरगांवीं राहावें. या तहामुळें इंग्रजांस मधल्या मध्यें साष्टीसहीत सहा लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलुख मिळाला.

२५. हा तह गव्हर्नर जनरलचा खास वकील अपटनसाहेब व बारभाईंचे मुख्य अखत्यार नाना व बापू यांचेमध्यें ठरला होता. असें असतां तो तह होऊन त्या तहनाम्यावर उभय पक्षांच्या सह्या झाल्यानंतर त्या तहांतील अटी आपणांस मान्य नाहींत, असें कोणत्याहि पक्षानें ह्मणणें हें अन्यायाचें होतें. हा नीतिधर्म समजण्याइतका कलकत्त्याचा गव्हर्नर जनरल खात्रीनें शहाणा होता. परंतु ज्याअर्थी साष्टी व त्या खालील मुलुख व गुजराथेंतील मुलुख मिळून सहा लक्ष उत्पन्नाच्या मुलुखाकरतां तंटा न राहता फक्त दादासाहेबांना बारभाईच्या ताब्यांत देण्यापुरताच तंटा पुढें निघाला, त्याअर्थी इंग्रजांनीं आपल्या कारस्थानाप्रमाणें साष्टीची सोडचिठ्ठी बारभाईंकडून घेतली व आपण प्रथमतः उत्पन्न केलेल्या कलहाच्या गुन्ह्यांतून उजळ माथ्यानें ते बाहेर पडले. ही हकीकत पाहिली, ह्मणजे रेग्युलेटिंग ॲक्टचें बुजगावणें पुढें करून जें न्यायी राजकारणाचें अवडंबर इंग्रजांनीं दाखविलें, तें केवळ साष्टी अपहार केल्याच्या गुन्ह्यावर न्यायाचा शिक्का मारलेला दिसावा एवढ्यापुरतेंच होतें.

२६. हें इंग्रजांचें उद्दिष्ट साध्य झाल्यानंतर त्यांचा राघोबादादासंबंधीं कायदेशीर तक्रार करण्याचा व त्यांच्यासंबंधीं होत असलेल्या अन्यायाबद्दल सहानुभूति दर्शविण्याचा मार्ग मोकळा झाला. त्यामुळें पुन्हां इंग्रजांनीं राघोबादादांना महिना दहा हजार रुपये आपल्या पदरचे पेन्शन ठरवून कोपरगांवीं बारभाईंच्या ताब्यांत न पाठवितां आपल्याजवळ मुंबईंतच ठेऊन घेतलें. बारभाईंबरोबर पुढील राजकारण कसें लढवावें, याचा गव्हर्नर जनरल व मुंबईचे गव्हर्नर या उभयतांच्या संमतीनें विचार होऊं लागला. एकंदरींत, राघोबादादा मागत असलेली तुटपुंजी जहागीर त्यांना न देण्याचा दुराग्रह बारभाईंनीं धरल्यामुळें मराठयांच्या राज्याचें कसें व किती नुकसान होत गेलें हें दिसून येईल.



# प्रकरण १८ वें.

# तोतयाचें बंड.

## इ. स. १७६१ ते इ. स. १७७६ अखेर.

१ पानिपतच्या लढाईत सदाशिवरावभाऊ गर्दीत मिसळून दिसेनासे झाले अशी माहिती देणाऱ्या निरनिराळ्या बखरींतील हकीकत.—२ सदाशिवरावभाऊंनीं विसाजी कृष्ण जोगदंड यास पार्वतीबाईच्या रक्षणासंबंधीं दिलेली आज्ञा. पार्वतीबाई दिल्लीच्या रोखानें पळ काढतात.—३ सदाशिवरावभाऊबद्दल पार्वतीबाईस जेवढी माहिती होती तेवढी इतरांस नव्हती. पार्वतीबाई दिल्लीस येऊन पोचेतोंपर्यंत कसकशी हकीकत घडली—४ पानिपतच्या लढाईतून भाऊसाहेब शेवटीं पळून गेले हीच भावना पार्वतीबाईची असल्यामुळें त्यांनीं त्यांच्या शोधार्थ बैरागी पाठविले.—५ काशीराय पंडीत हे सदाशिवरावभाउंच्या मृत्युबद्दल माहिती देतात.—६ सदाशिवरावभाऊंच्या मृत्युसंबंधीं दुराणीची कैफियत.—७ दुराणीची कैफियत कशी खोटी व बनावट आहे हें दाखविणाऱ्या दोन अद्भुतरम्य गोष्टी.—८ दुराणीच्या कैफियतींतील तिसरी अद्भुतरम्य गोष्ट.—९ यांतील चौथी अद्भुतरम्य गोष्ट.—१० त्यातील पांचवी अद्भुतरम्य गोष्ट.—११ त्यातील सहावी अद्भुतरम्य गोष्ट.—१२ लढाईंतील सामान्य सैनिकांच्या कैफियती का खोट्या असूं शकतात?—१३ भाऊसाहेबांच्या शिरासारखें शीर दिसणें या गोष्टीवरून लढाईत भाऊसाहेब मेले असाच निर्णय ठरत नाहीं.—१४ पानिपतच्या लढाईंत सदाशिवराव मेले अगर ते पळून गेले या संबंधी मिळणारे दोन्ही ऐतिहासिक पुरावे निर्णयाच्या दृष्टीने लंगडे आहेत.—१५ संशयाचा फायदा घेणारे निरनिराळे ढोंगी तोतये—१६ तोतयाची भूमिका करण्यास लागणाऱ्या गोष्टी.—१७ मीच सदाशिवरावभाऊ आहे असें म्हणणारे तीन इसम. काशीस बंड करणारा नं० १ चा तोतया—१८ झांशी प्रांतांत प्रकट झालेला दुसरा तोतया—१९. नरवर मुक्कामीं पहिल्यानें खरे सदाशिवरावभाऊ प्रकट झाले—२०. नारो शंकर राजेबहादूर यांचा पुतण्या विश्वासराव सदाशिवरावभाऊंस सन्मानानें करेराच्या किल्ल्यावर घेऊन जातो. ते बराच नवीन फौज फांटा तयार करतात—२१. सदाशिवरावभाऊ खरे असल्याबद्दलचीं पत्रें व

निरोप पुणें दरबारीं येतात. माणसेंही तींच माहिती आणतात. विरुद्धपक्षाकडून भाऊसाहेबांवर मारेकरी घातले जातात. पेशवे दरबारकडून भाऊसाहेबांची उपेक्षा केली जाते—२२. माधवराव पेशवे कर्नाटकच्या स्वारीवर असतां ते सदाशिवरावभाऊंच्या खरेखोटेपणाबद्दल चौकशी करीत होते. मल्हारराव होळकर सदाशिवरावभाऊंचा मोड करतात व त्यांस कैद करतात. सदाशिवरावभाऊंस माधवराव पुण्यास आणवितात. व त्यास पर्वतीवर ठेऊन त्यांचेबरोबर करारमदार करण्याची खटपट चालवितात व शेवटीं त्यास तोतया ठरवून धनगड मुक्कामीं प्रतिबंधांत ठेवतात—२३. खऱ्या सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविल्याबद्दल पार्वतीबाई व अनुबाई याचा विरोध. या गोष्टीची पुन्हां शहानिशा करण्याबद्दल त्यांचा नवीन तगादा. माधवराव पेशवे सदाशिवरावभाऊंस पुन्हां पुण्यास आणवितात—२४. अनुबाई इचलकरंजीकर यांचा पेशवे घराण्याशीं संबंध व त्यांची धर्मश्रद्धा—२५. अनुबाई पेशव्याच्या मदतीनें राजकारण करणाऱ्या व व्यवहारकुशल होत्या—२६. सदाशिवरावभाऊ यांस त्यांची आप्तमंडळी ते खरे आहेत असें ह्मणत होती. पण खुद्द पेशवे व त्याचे मुत्सद्दी हे त्यांना तोतया ह्मणत होते. —२७. नं. १ च्या तोतयाची हकीकत—२८. नं. २ च्या तोतयाची वरचेवर चौकशी व त्याचें वरचेवर होत असलेले स्थलांतर हें त्याचें वैशिष्ट्य होतें—२९. पेशवे सरकारकडून सदाशिवरावभाऊंस तोतये ठरविण्यात कसें पाणी मुरत होतें याची हकीकत. दुर्गाबाईच्या लग्नाचें वेळीं पार्वतीबाईस गोवळी करून घेण्याचा प्रश्न. धर्ममार्तंडांची धार्मिक पिछेहाट—३०. सदाशिवरावभाऊंस दौलताबादच्या किल्लयावरून काढून मिरजेच्या किल्लयावर ठेवलें. मागील दहा वर्षांत सदाशिवरावभाऊंच्या बंधविमोचनाबद्दल प्रयत्न करणें कां अशक्य झालें—३१. पार्वतीबाई पुरंदर किल्लयावर असतां पुरुषोत्तम दाजी यांस दौलताबादच्या किल्लयावर सदाशिवरावभाऊंच्या चौकशीकरता पाठवितात—३२. पुरुषोत्तमदाजीनें केलेली चौकशी. कशी व कां खोटी होती—३३. ताराबाई छत्रपती शाहूंना तोतया ह्मणत होती तसाच प्रकार पेशवे दरबारकडून सदाशिवरावभाऊंबद्दल होत होता—३४ मिरजेच्या किल्ल्यावर सदाशिवरावभाऊ आल्यानंतर त्यांची बंधमुक्तता करण्याबद्दल अनुबाईची पुन्हां खटपट. त्यास मिरजेच्या किल्ल्यातून काढून दुसऱ्या ठिकाणीं नेऊन ठेवण्याबद्दल पटवर्धनांचा नाना फडनविसास तगादा—३५. पार्वतीबाई पुरंदरच्या किल्ल्यावरील सर्द हवेनें आजारी पडतात. सदाशिवरावभाऊंस बंधमुक्त

करण्याबद्दल त्यांचा अखेरचा प्रयत्न. या बाबतीत पुरुषोत्तम दाजीचें मिरजेस पांडुरंगराव पटवर्धन यांस दुसरें पत्र. पुरुषोत्तमराव दाजी यांचे पुरंदरहून पांडुरंगराव पटवर्धन यांस तिसरें पत्र—३६. या सर्व पत्रांवरून पुरुषोत्तम दाजी पार्वतीबाईस थापा देऊन कसें फसवीत होतें याचें दिग्दर्शन—३७ पुरुषोत्तम दाजींच्या पत्रांचा निष्कर्ष—३८. दाजींच्या या पत्रातील मथितार्थ कसा खोटा होता?—३९ मृत्युच्या द्वारांत तळमळत असलेल्या पार्वतीबाईस पुरुषोत्तम दाजी कारभाऱ्यांच्या प्रेरणेनें कसें फसवीत होते ? यास आधार— ४०. पार्वतीबाईचा गोसावी हा एक पुरावा. जो खातो त्याला खवखवतें— ४१. मिरजेपेक्षां रत्नागिरी हा किल्ला तोतयास फितूर होणे कठीण असे वाटल्यावरून कारभारी तोतयाची रवानगी रत्नागिरीस करतात—४२. रत्नागिरीचे किल्लेदार रामचंद्र नाईक याचेवर नाना फडनविसांचा विश्वास कसा व का होता—४३. रामचंद्र नाईक हे पेशव्यांचे आप्तसंबंधी. सदाशिवरावभाऊ व रामचंद्रपंत यांचा संबंध कसा होता ? रामचंद्रपंतांची व त्यांच्या कुटुंबाची सदाशिवरावभाऊ खरे असल्याबद्दलची खात्री—४४ रामचंद्रपंतांची बायको अन्नपूर्णाबाई यांचीं पुरंदरास सदाशिवरावभाऊंच्या बाबतींत कारभाऱ्याना पाठविलेलीं पत्रें. कारभाऱ्यांनीं सदाशिवरावभाऊंस तोतया ठरवून बंदिवासांत टाकल्याबद्दल अन्नपूर्णाबाईचा संताप.—४५ रामचंद्रपंत नाईकांनीं सदाशिवरावभाऊंच्या सर्व आप्तमंडळींस पत्रें पाठवून रत्नागिरीस बोलावून घेतलें. सर्व आप्तमंडळीनी सदाशिवरावभाऊंस ते तोतया नसून खरे असल्याचे ठरविलें. कारभाऱ्यांविरुद्ध सदाशिवरावभाऊंची सर्व आप्तमंडळी एक होते व ते त्यांची बेडी तोडून मुक्तता करतात. या बाबतींतील पांडुरंगराव पटवर्धन यांचें पत्र. या बाबतींतील परशुरामभाऊ पटवर्धन याच्या आईनें त्यास कर्नाटकच्या स्वारीवर पाठविलेलें पत्र.—४६ परशुरामभाऊंच्या आईच्या पत्रांतील सदाशिवरावभाऊ खरे असल्याबद्दलच्या महत्वाच्या प्रमाणांचा गोषवारा.—४७ सदाशिवरावभाऊ खरे असल्याबद्दल मुंबई सरकारची खात्री.—४८ माधवराव पेशव्यानीं सदाशिवरावभाऊंस १७६५ सालीं तोतया ठरविलें त्यांतील रहस्य कोणते होतें ?—४९ सदाशिवरावभाऊ हे तोतया अगर खरे होते यासंबंधी कारभारीमंडळ व भाऊंचे आप्तमंडळ यांच्या वादविवादांतून निर्णयाकरतां निघणारे तीन मुद्दे.—५० मुद्दा नं. १ वरील विवेचन. सदाशिवरावभाऊ खरे म्हणण्यात पार्वतीबाईचा कोणताच निंद्य स्वार्थ नव्हता.—५१ सदाशिव-

रावभाऊंच्या आत्या अनुबाई यांची त्यांना खरे ह्मणण्यांत कोणतीच स्वार्थबुद्धि नव्हती.-५२ अनुबाईची सदाशिवरावभाऊंच्या बाबतींतील परीक्षा सर्वापेक्षां अव्वल दर्जाची कां ?—५३ अनुबाईची परीक्षा अव्वल दर्जाची होती हें दाखविणारीं दुसरीं प्रमाणे —५४ पार्वतीबाईचे बंधू रघुनाथराव कोल्हटकर यांची सदाशिवरावभाऊंच्या बाबतची परीक्षा शंभर टक्के खरी होती.—५५ राजेबहाद्दर नारो शंकर यांची सदाशिवरावभाऊ खरे असल्याबद्दलची चौकशी पूर्ण निःस्वार्थी व श्रेष्ठ दर्जाची होती.—५६ परशुरामभाऊंची आई जानकीबाई यांचा सदाशिवरावभाऊंना खरे ह्मणण्यांत कोणताही स्वार्थ नव्हता.—५७ सदाशिवरावभाऊंना खरे ह्मणण्यांत इतर अनेक निःस्वार्थी लोकाची प्रमाणे.—५८ रामचंद्रपंत नाईकांची पूर्वीची निःस्वार्थी वागणूक.—५९ सदाशिवरावभाऊंना खरे ह्मणण्यांत या लोकांचा रक्ताचा जिव्हाळा, अन्यायाचा तिटकारा आणि सत्याची चाड हीं दिसून येतात.—६० मुद्दा नं० २ वरील विवेचन.—६१ सदाशिवरावभाऊबद्दल गोपिकाबाईच्या मनांत किती द्वेष होता ?—६२ माधवराव पेशव्यांचा कारभार गोपिकाबाईच्या तंत्रानें चालत होता.—६३ सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्यांत गोपिकाबाई व माधवराव पेशवे याचा स्वार्थ सर्वस्वी निगडित होता.—६४ गोपिकाबाई व माधवराव यांचे सदाशिवरावभाऊ हितशत्रु कसे व का होते ?—६५ सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्यांत नानादि मुत्सद्याचा स्वार्थ कसा होता?—६६ सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्यातच माधवराव पेशव्यांच्या कारभाराची घडी कशी कायम राहणार होती.—६७ सदाशिवरावभाऊ जर तोतया होते तर त्यांना पर्वतीवर ठेवून त्यांच्याबरोबर माधवराव पेशव्यांना कारारमदार करण्याचें कोणतें कारण होतें ?-६८ मुत्सद्दी बेलभंडाऱ्याच्या अद्भुत सामर्थ्यानें लोकांची कशी दिशाभूल करीत होते ?—६९ मुत्सद्यांकडून सदाशिवरावभाऊ तोतया असल्याबद्दल कोणताच सबळ पुरावा पुढें आलेला नाहीं. —७० सदाशिवरावभाऊंचा तोतया सुखनिधान होता. तो कनोजा ब्राह्मण होता. त्याचें राहण्याचें ठिकाण व त्याच्या आईबापाचीं नांवें हीं माधवराव पेशव्यांना कळलीं असतां त्यांना आणून माधवराव पेशव्यांनीं सर्वांची खात्री कां केली नाहीं ?—७१. सदाशिवरावभाऊ हे खरे असल्याबद्दल एक जबरदस्त पुरावा—७२. सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्यांत माधवराव पेशवे व मुत्सद्दी यांचा वैयक्तिक व राजकीय स्वार्थ होता. —७३. मुद्दा नं. ३ वरील निर्णय.—७४. शाहुमहाराज यांना ताराबाई

तोतया ह्मणत होत्या. ते तोतया नसल्याबद्दल बापूजी भोंसले यांनीं निर्णय दिला होता. त्यानंतर शाहुमहाराज खरे वारसदार व ताराबाई या बंड असें ठरलें. तोच प्रकार सदाशिवरावभाऊ खरे वारसदार व मुत्सद्दी हे बंड असें या वेळीं ठरलें.—७५ सदाशिवरावभाऊ सनदशीर हक्कदार व मुत्सद्दी हे बंडखोर कसे ? —७६. रत्नागिरीस सदाशिवरावभाऊंची बंदींतून मुक्तता केली व त्यांच्या नांवानें ग्वाही फिरली. त्यांच्या पक्षास बऱ्याच सरदारांची मदत मिळाली, त्यामुळें त्यांची प्रगति होत चालली.—७७, सदाशिवरावभाऊ राजमाची किल्ल्यावर येऊन तळ देतात. नाना फडनविस पानशे यांजबरोबर सैन्य देऊन त्यांचेवर पाठवितात. नानांची महादजी शिंद्यांना त्वरित येण्याबद्दल पत्रें जातात. त्याप्रमाणें शिंदे येतात. सदाशिवरावभाऊंचा मोड करण्याकरतां नानांकडून शिंद्यांची राजमाचीकडे रवानगी.—७८ सदाशिवरावभाऊबरोबर मुत्सद्यांची तह करण्याची लबाडीची वाटाघाट. सदाशिवरावभाऊंस तह ठरण्याचें आमिष दाखवून त्याना मुत्सद्दी बेसावध ठेवतात. अशा स्थितींत शिंदे त्यांचेवर अकल्पित छापा घालतात. सदाशिवरावभाऊचा मोड होऊन ते पळ काढतात. ते गलबतांतून मुंबईकडे समुद्रांतून जात असतां रघोजी आंग्रे त्यांना पकडतो. तो व शिंदे दोघे मिळून भाऊंना पुण्यास आणतात.—७९ सदाशिवरावभाऊंस आपल्या ताब्यांत देण्याबद्दल मुंबई सरकारकडून रघोजी आंग्र्यास निर्वाणीचा खलिता. त्यामुळें मुत्सद्यांना पडलेला पेंचप्रसंग.—८० नाना फडनविस यांच्या कारस्थानाचा चक्रव्यूह. —८१ सदाशिवरावभाऊंची पुन्हा चौकशी करण्याचें नाना फडनविस कबूल करीतोंपर्यंत रघोजी आंग्रे त्यांना नानाच्या ताब्यांत द्यावयाला कबूल नव्हते. नानांनीं सदाशिवरावभाऊंच्या चौकशीकरतां पंचकमिटी स्थापन केली. ती इंग्रजांस पसंत पडली व त्या कमिटीवर देखरेख करण्याकरता मुंबई सरकारनें कर्नल ॲप्टनची नेमणूक केली.—८२ सदाशिवरावभाऊंच्या चौकशीच्या पंचकमिटींत २७ जण होते. या कामीं रामशास्त्री प्रभुणे हे न्यायाधीश होते. या कमिटीतील सभासदांची निवड नानांनी केली होती.—८३ नाना फडनविसांकडून चौकशी कमिटीपुढें ज्या तोतयास उभें करावयाचें त्याची रंगी तालीम चालू असल्याबद्दलचें पुण्याहून शिवाजी बाबाजीकडून मिरजेस गंगाधरराव पटवर्धन यांस पाठविलेलें पत्र.—८४ नाना फडनविस तोतयाकडून चौकशीच्या आधीं लेखी कागद व बेलभंडार घेतात, यांतील रहस्य काय होतें ?—८५ हरि गोविंद पटवर्धन यांनीं पुण्याहून मिरजेस

गोविंद हरी यांस तोतयाच्या पूर्वीच्या चौकशीबाबत लिहिलेलें पत्र.—८६ नानांनीं शिकवून तयार केलेल्या तोतयास पंच कमिटीपुढें उभें केलें. पंचकमिटीची पांच दिवस सतत बैठक. तोतया असल्याबद्दल पंचकमिटीचा एकमुखी निर्णय. तोतयाचा वध.—८७ सुखलाल कनोजा ब्राह्मण या नांवानें गाजत असलेला तोतया पंच-कमिटीच्या चौकशींत बाजी गोविंद या नांवाचा सोनार निघतो, या अद्भुतरम्य कार्तीत नाना फडनविसांच्या कारस्थानाचें मूळ.—८८ तोतयाच्या बाबतींत इतिहास कारांची एकवाक्यता कशांत आहे व कशांत नाहीं.—८९ या बाबतींतील ग्रँट डफचें मत. पेशव्यांच्या बखरींतलि माहिती. पटवर्धनांचे दप्तरातून खरेशास्त्र्यांनी गोळा केलेली माहिती. तोतयाच्या मृत्यूची तीन निरनिराळीं स्थानें. अहमदनगर, पुणें व सिंहगड असा इतिहासकारांच्या माहितींतील फरक. तोतयाच्या देहांतशिक्षेंतील हत्तींच्या पायांखालीं मारणें, मेखसूखालीं मारणें व उपोषणें घालून मारणें अशा तीन निरनिराळ्या तऱ्हा. यांतच नानांच्या कारस्थानाचें बीज.—९० तोतया पतित म्हणून त्याच्या पंक्तीला जे जे ब्राम्हण जेवले त्यांना प्रायश्चित्त देण्याबद्दल रामशास्त्र्यांची आज्ञा.—९१ या बाबतींत पेशवे सरकारचें निघालेलें फर्मान.—९२ या फर्मानांतलि कलमें.—९३ या बाबतींतलि गुन्हेगारीबद्दलचा उल्लेख.—९४ या प्रायश्चित्तास मनुस्मृतीचा धार्मिक आधार.—९५ मनुस्मृतीचा आधारभूत श्लोक. —९६ महाराष्ट्रांतील ब्राह्मणांच्या मागें काळभैरवाचा प्रायश्चित्ताचा दंडुका.—९७ तोतयाच्या पंक्तीस प्रत्यक्ष जेवलेल्या ब्राम्हणांना दिलेलीं जबरदस्त प्रायश्चित्तें.—९८ चांद्रायण प्रायश्चित्ताचें लक्षण.—९९ व्यंकटराव इचलकरंजीकर यांना दिलेलें प्राणांतिक अर्से घनघोर प्रायश्चित्त.—१०० प्रायश्चित्त देणाऱ्या अधिकाऱ्यांस प्रायश्चित्त घेणाऱ्या लोकांवर वाटेल तसा वरवंटा फिरविण्याबद्दल रामशास्त्री व नाना यांचेकडून मिळालेली मुभा.—१०१ कनोजा ब्राम्हणाच्या पंक्तीला जेवल्यानें कोणी संसर्ग-दोषाला धर्मशास्त्राप्रमाणें पात्र होत नाहीं. तोतया कनोजा ब्राह्मण नसून तो चौकशी-पंचकमिटींत अन्य हीन जातीचा निघाल्यामुळें हें प्रायश्चित्ताचें खूळ निघालें.—१०२ या बाबतींतील इतिहासकार खरेशास्त्री यांची शंका.—१०३ तोतया राजद्रोही म्हणून पतित अशी खरेशास्त्र्यांची शंका.—१०४ तोतया हा राजद्रोही म्हणून पतित अशी खरेशास्त्र्यांची शंका कां व कशी खोटी आहे ? तोतया चौकशी कमिटींत सोनार ठरला म्हणूनच हें ब्राम्हणांस प्रायश्चित्ताचें सरकारी फर्मान निघालें. —१०५ माधवराव पेशव्यांनीं सुखनिधान म्हणून कनोजा ब्राह्मण ठरविलेला. तोतया

दहा बारा वर्षांच्या कालानंतर शेवटच्या पंचकमिटीपुढें तो बाजी गोविंद या नांवाचा सोनार निघतो, यांतच नानांच्या पाताळयंत्री कारस्थानाची गुरुकिल्ली आहे.—१०६ अदलाबदल करून कार्य साधून घेण्याचा नानांचा स्वभाव व त्यांची हातोटी. नानांनीं खऱ्या सदाशिवरावभाऊंच्या ऐवजीं नगरच्या किल्ल्यांतील न. ३ चा तोतया पंचकमिटीपुढें उभा करून सर्वांवर मात केली.—१०७ माधवराव पेशव्यांनीं सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्याचे वेळीं त्यांचें सुखनिधान कनोजा ब्राम्हण हे नामकरण कां व कशाकरतां केलें ?—१०८ तोतयाची अदलाबदल मारण्याचे वेळीं केली हें डफसाहेबाचें विधान कसें खोटं आहे ?—१०९ नानांच्या कारस्थानी जादूगिरीची मूल.—११० नानांच्या कारस्थानी परिणामाची विविधता.—१११ नानांनीं मुंबई सरकारची नाचक्की करून त्यांचेवर मात केली.—११२ सदाशिवरावभाऊंच्या सर्व आप्तमंडळीवर नानांनीं केलेली मात.—११३ राघोबादादाप्रमाणें पेशवाईचे वारसदार सदाशिवरावभाऊ यांचा नाश करून आपला कारभारीपणाचा अधिकार नानांनी चिरंजीव केला.—११४ नानांनीं आपला खजिना भरला.—११५ पेशवाई म्हणजे नाना फडनविस असे स्थान नानांना मिळविलें.—११६ आपली दहशत बसविण्याकरतां नानांनी सदाशिवरावभाऊंच्या पक्षांतील लोकांची उडविलेली कत्तल.—११७ नाना फडनविसांनी सदाशिवरावभाऊंच्या पक्षांतील सरदारांचे कसकसे अमानुष हाल केले ?—११८ रामचंद्रपंत नाईक व त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाई यांच्या शिक्षेंत नानांनीं दाखविलेली क्रूर व निंद्य वृत्ति. त्यांच्या पाशवी कृत्यांनीं लोकांत उत्पन्न झालेली नानाबद्दलची दहशत.—११९ सदाशिवरावभाऊंच्या सरदारांकडून नानांनीं परमावधीची गुन्हेगारी घेऊन त्यांना कायमचे मृतवत् केले.—१२० ब्राह्मणांचें धार्मिक दडपण उठविण्याकरतां नानांनी प्रायश्चित्ताचें होमकुंड पेटवून महाराष्ट्रांतील ब्राम्हणांस होरपळून काढलें, व त्यांच्या नाकांत कायमच्या गुन्हेगारीच्या वेसणी अडकविल्या.—१२१ तोतयाच्या बंडानें व त्यांच्याच स्वतःच्या अगाध कारस्थानी चातुर्यानें नानांच्या गळ्यांत पडणारी विजयाची माळ.

१. इ. स. १७६१ सालीं पानिपत येथें जो घोर रणसंग्राम झाला ।ांत विश्वासराव गोळी लागून पडल्यामुळें, आतां दक्षिणेंत जाऊन नाना।हेबांना कसें तोंड दाखवावें या कल्पनेनें, सदाशिवरावभाऊ घोड्यावर ।ार होऊन गिलच्यांच्या सैन्यांत कापाकापी करीत घुसले आणि गर्दीत

मिळाले. तेव्हांपासून भाऊसाहेब लढाईंत मेले, किंवा शत्रूची फळी फोडून पार निघून गेले, अगर कोठें अदृश्य झाले, याचा पत्ता कोणालाच लागला नाहीं. "गायफ जाले, किंवा अस्मानांत गेले, कीं पृथ्वींत गेले, हें ईश्वरी कौतुक ब्रह्मादिकांस न कळे. तेथें मानवियांस काय कळेल[1] ?" असें भाऊसाहेबांची बखर ह्मणते. "तों विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं[2] घालून उभेच राहिले. तों पठाण पाय उतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊ लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघड्याचे धनी देखील पूर्वींच पळाले. उजवे बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघाले. दोनतीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनातसे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धी दिली. माघारे फिरलों.[3]" ही माहिती नाना फडनविस आपल्या स्वहस्तलिखित आत्मचरित्रांत देतात. भाऊसाहेब गर्दींत दिसेनासे होईपर्यंत नाना फडनविस स्वतः रणभूमीवर होते. नंतर ते मागें फिरले. "शेवटीं विश्वासरावसाहेब यांस अंबारींत गोळी कोणी दुष्टानें मारली. त्यानें ते ठार झाले. ते सदाशिवपंतभाऊ यांणीं पाहून अगदीं निदान केलें. आतां दक्षिणेंत जाऊन काय तोंड दाखवावें ? असा निश्चय करून राहिले सैन्य समागमें घेऊन मल्हारराव होळकर दहा हजार फौजेनिशीं होते. त्यांस भाऊसाहेब यांणीं सांगितलें कीं, "आतां तुह्मीं सर्वांचे काबिले घेऊन, बाजारबुणगे संभाळून माघारें दक्षिणेंत जावें." तेव्हां नाना फडनविस वगैरे मंडळी होती ती माघारी फिरली व भाऊसाहेब यांणीं युद्धास आरंभ करून आपण जातीनें तीन हजार स्वारांनिशीं गिलच्यांचे फौजेंत मिसळून गेले. त्या समयीं युद्ध मोठें घनचक्र झालें. शके १६८२ पौष शुद्ध ८ मीस भाऊसाहेब गर्दींत मिळाले[4]." पेशव्यांची बखर याप्रमाणें हकीकत देते. "यानंतर अडीच प्रहर दिवसाचे सुमारें विश्वासराव यांस

---

१ भाऊसाहेबांची बखर पान १५३. २ सदाशिवरावभाऊंनीं ३ काव्येतिहास-संग्रह पत्रें, यादी, वगैरे ५३ पान ३८. ४ पेशव्यांची बखर पान ६२—६३

जबर जखम लागली, तें पाहून सदाशिवरावभाऊनें आपल्या हत्तीवरून खालीं उतरून होळकरास निरोप पाठविला कीं, 'मीं तुह्मांस पहिलें जें सांगितलें होतें, तें आतां करावें.' याप्रमाणें सांगून पाठविल्यावर मग तो भाऊसाहेब आपल्या घोड्यावर बसून युद्धाच्या गर्दींत शिरला, तो पाहतां पाहतां लोकांस दिसेनासा झाला.[1] " ही माहिती मराठ्यांची बखर देते. 'शहाआलम' या फ्रांकलीन् साहेबाच्या ग्रंथांत 'सदाशिवरावानें पराभव झाला असें पाहून बायकांस विष दिलें व नरनाळ्याच्या रस्त्यानें आपला दक्षिणेचा मार्ग धरिला' असें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें भाऊसाहेबांची कैफियत, पानिपतची बखर वगैरे ग्रंथांतून भाऊसाहेब गर्दींत दिसेनासे झाले, पुढें त्यांचें काय झालें हें कोणाला समजलें नाहीं, एवढाच इतिहास आहे.

२. सदाशिवरावभाऊ यांची पत्नी 'पार्वतीबाई यांच्या बंदोबस्ताला विसाजी कृष्ण जोगदंड यास पांचशे धनगर नेमून देऊन रखवालीस बरोबर ठेविले होते. त्यास आज्ञा केली होती कीं, "आह्मीं झुंजून पार निघालों असें कळलें तरि तुह्मीं यांस घेऊन दिल्लीचे रोखें आमचे मागें पिछाडीस घेऊन यावें आणि रणांत पडलों असें वर्तमान ऐकल्यावर यांस तुम्हीं जिवें मारून निघोन जावें. गिलच्यांचे हातीं भाऊसाहेब यांची स्त्री जिवंत सांपडली, असा लौकिक मात्र न होईल तें करावें." असें निश्चयरूप सांगून त्यास रखवालीस ठेविलें होतें. तों मोड झाला, लोक पळों लागले. ते समयीं विसाजी कृष्ण व लोक यांणीं धास्त खाऊन, बाईची आस्था सोडून आपले जीव वाचविले. कोणीकडे गेले त्याचें ठिकाण नाहीं. भाऊसाहेबांनीं सांगितलें होतें त्याप्रमाणे कांहींच घडलें नाहीं. तों एक घटिका दिवस राहिला. ते समयीं पार्वतीबाई अंबारींत होती. तिनें हत्ती बसवून, पाय उतारा होऊन, बुणगियाचे रोखें पळू लागली.[2] '

---

१ मराठ्यांची बखर पान २११. २ भाऊसाहेबाची बखर पान १५४.

३. पार्वतीबाई पानिपतच्या रणमैदानावरून सर्व सरदार व बुणगे पळून गेल्यानंतर परत फिरली. तेव्हां सदाशिवरावभाऊंविषयीं जितकें निश्चयात्मक त्यांना माहीत होतें तितकें दुसऱ्या कोणाला नव्हतें. अशा परिस्थितींत घरचा पोरगा कोतवाल, जानु भिताड्या खिसमतगार व बारवेकर ह्मणून मातबर मनुष्य होता, यांच्या सहाय्यानें त्या मोठमोठया संकटांना तोंड देऊन दिल्लीला येऊन पोंचल्या. त्या ठिकाणीं त्यांनीं सदाशिवरावभाऊ परत येतील ह्मणून वाट पाहिली. पार्वतीबाईंचे चित्तांत कीं, भ्रतार दिल्लीस आला असेल.[१] " परंतु ते तेथें आले नसल्यानें त्यांची निराशा झाली. तेथून त्यांना शत्रू पाठीवर असल्यानें पळ काढावा लागला. दिल्लीहून चार पांच मजला गेल्यानंतर होळकरांची व पार्वती-बाईंची गांठ पडली. होळकरांबरोबर नाना पुरंदरे हेही अगोदरच पळाले होते. तेथून ग्वालेरीस आल्यानंतर नाना पुरंदरे यांनीं सदाशिवरावभाऊ यांच्या शोधाकरतां बैरागी रवाना केले.[२]

४. येथपर्यंत सदाशिवरावभाऊंच्या मृत्यूबद्दल कोणाला माहिती नाहीं. ते लढाईच्या गर्दीत दिसेनासे झाले व ते पळ काढलेल्या लोकांतून निघून गेले असतील या कल्पनेनें त्यांच्या शोधार्थ बैरागी पाठ-विण्यांत आले. पार्वतीबाईंची भावना हीच होती कीं, आज नाहीं उद्यां भाऊसाहेब परत येतील. कित्येक लोकांचीही तीच भावना होती. बहुतेक सर्व इतिहासकार, बखरीकार याच कल्पनेवर विश्वास ठेवणारे झाले.

५. आतां याच्या विरुद्ध पुरावा ह्मणजे सुजाउद्दौल्ला याचा कारभारी काशीराय पंडीत हा पानिपतच्या लढाईंत जातीने होता. त्यानें पानिपतच्या लढाईची इत्थंभूत हकीकत लिहून ठेविली आहे. त्यात तो सदाशिवरावभाऊ लढाईंत मारले गेले असें लिहितो: ' लढाईच्या दुसरे दिवशीं सर्व कैदी-लोकांची क्रूर रीतीनें शत्रूंनीं कत्तल केली. विश्वासरावांचें प्रेत सुजाउद्दौ-ल्याचे हातीं सांपडलें होतें. उमरावगीर गोसावी व सुजाउद्दौला यांचे खटपटीनें त्यास हिंदुधर्माप्रमाणें अंत्याग्नि मिळाला. भाऊंचें धड सांपडलें

१. भाऊसाहेबाची बखर पान १५९. २. भाऊसाहेबाची बखर पान १६२.

होतें व एका दुराणीनें त्याचें शीर नेलें होतें. तेंही आणून दिल्यावर त्या प्रेताचेंही यथाविधि दहन केलें[1] '

६. दुराण्यानें भाऊसाहेबांचें जें शीर नेलें होतें, त्यानें तें अबदल्लीस आणून देतेवेळीं आपली कैफियत दिली ती अशी:—' लढाई चालली असतां कित्येक वेळां या मनुष्यास मी पाहिलें. तो उत्तम घोड्यावर बसला असून लढाईंत त्याच्या खालचे दोन घोडे मारले गेले, आणि खुद्द त्यास कित्येक जखमा लागल्या. त्यामुळें तो आपल्या तिसऱ्या घोड्यावरून खालीं उतरला. त्याच सुमारास मराठ्यांच्या सैन्यांत जिकडेतिकडे पळापळ सुरू झाली. तथापि त्यानें धैर्य सोडलें नाहीं असे दिसतें. तो आपल्या लोकांस धीर देत होता; त्याचा पोषाख फार उंची असून अंगावर मौल्यवान् दागिने होते. निःशंकपणाने तो लढाईंत निमग्न होता. अखेर त्यापाशीं कोणी मनुष्य राहिलें नाहीं; असें पाहून मी आणि माझ्या सोबत्यांनीं त्यास घेरलें. आमचा उद्देश त्याचे मौल्यवान् दागिने घ्यावाचा होता; ह्मणून आह्मीं त्यास विचारलें ' आपण कोण आहां? कोणी सरदार किंवा खुद्द भाऊ-साहेब आहां? तुम्ही भिऊं नका. आम्हीं तुम्हांस उपद्रव देणार नाहीं. सांगाल तेथें तुह्मांस घेऊन जाऊं. ' या प्रश्नाचा जबाब त्या मानी पुरुषानें दिला नाहीं. हें पाहून माझ्या एका सोबत्यास फार संताप येऊन त्यानें त्यास भाला मारला. त्यावर त्या पुरुषाने माझ्या सोबत्यास उलट भाला मारला. तेव्हां आह्मी सर्वांनीं मिळून एकदम त्यावर हल्ला केला. त्यांत आह्मांपैकीं तिघांस त्यानें भाल्यानें जखमी केलें. परंतु शेवटीं आम्हीं त्यास मारून त्याचें शीर तोडलें.[2] ''

७. सदाशिवरावभाऊ पानिपतच्या लढाईंत मेले याला पुरावा असा वरील दोन गोष्टींचा आहे. याशिवाय दुसरा कोणचाही पुरावा आढळत नाहीं. तेव्हां या पुराव्याची छाननी येथें करणें इष्ट आहे. ज्या दुराण्यानें

१. महादजी शिंदे यांचें चरित्र, नातूकृत पान ८०. २. देवकृत नाना फडनविस यांचे चरित्र पान १३

भाऊसाहेबांचें शीर कापून नेलें होतें, त्याची कैफियत महत्वाची आहे. तो म्हणतो ' लढाई चालली असतां कित्येक वेळां या मनुष्यास मी पाहिलें. ' पानिपतची लढाई फक्त एका दिवसांत आटोपली. सदाशिवरावभाऊ हे विश्वासरावाला गोळी लागेपर्यंत हत्तीवर होते. त्या वेळीं लढाईंतील परिस्थिति अशी होती: ' ते समयीं स्वकीय किंवा परकीय असें त्या उभयपक्षीं लोकांस समजेना, आणि धूळ उडाली तेणेंकरून त्या गर्दीत कांहीं दिसेना असें झालें. तेव्हां मराठे व मुसलमान हातघाई करून संपूर्ण एकत्र होऊन आपआपल्यांसच मारूं लागले. ते समयीं कोणी कोणास वळखीना असें झालें, तेव्हा त्यांतील खूण इतकीच कीं, मराठ्यांकडील ' हर हर महादेव ' आणि मुसलमानांकडील ' दीन दीन ' असा शब्द होई, तेणेंकरून मात्र वळखून मारीत, पण कोणाचें तोंड कोणास दिसेना.[1] ' पानिपतच्या रणक्षेत्रावर या दिवशीं सुमारें दोन्हीं पक्षाचें सैन्य मिळून जवळ जवळ पांच लाख सैन्य गोळा झालें होतें. त्या वेळीं या रणक्षेत्राला मुंग्यांच्या वारुळाची स्थिति प्राप्त झाली होती. मुसलमानांच्या सैन्याच्या फळीमधून हिंदूंच्या सैन्यांतील माणसांच्या हालचाली व चेहरे दिसण्यासारखी परिस्थिति नव्हती. तुंबळ युद्ध सुरू असतां युद्धाच्या गर्दीत एका विवक्षित मनुष्याला दुसरा एक विवक्षित मनुष्य कित्येक वेळां पहाण्यास मिळणें अगदीं अशक्य. त्यांतून हा दुराणी हत्तीवर बसून लढाईचें निरीक्षण करीत नव्हता किंवा लढाई सोडून भाऊसाहेबांवरच केवळ नजर ठेवण्याचे हेराचें कामही करीत नव्हता. तो दुराणी लढाईंतील एक सामान्य सैनिक होता. त्या दिवसापूर्वीं कधीं त्यानें भाऊसाहेबांना पाहिलेलेंही नव्हते. लढाईच्या गर्दीमुळे धुरळा उडून जवळचें मनुष्यसुद्धां एकदम ओळखतां येण्यासारखी परिस्थिति नसतां तो दुराणी ज्याअर्थीं भाऊसाहेबांना कित्येक वेळां पाहिल्याचें सांगतो त्याअर्थीं तो लढाईच्या मारामारींत व कापाकापींत अगदीं भाऊसाहेबांच्या

---

1. मराठ्यांची बखर पान २१०.

सान्निध्यांत असला पाहिजे होता. शिवाय त्याचें लक्ष आपल्याबरोबर लढणाऱ्या प्रतिस्पर्ध्याच्या तरवारीच्या वाराकडे न राहतां भाऊसाहेबांकडे पहाण्यांत वेधलें पाहिजे होतें. भाऊसाहेबांची पत्नी पार्वतीबाई यांचें आपल्या पतीच्या ठिकाणीं अव्यभिचारी प्रेम होतें. ते घोड्यावर बसून लढाईच्या गर्दींत शिरले हें त्या पहात होत्या. त्या हत्तीवर बसून भाऊसाहेबांच्या हालचाली लक्षपूर्वक पहात होत्या. परंतु भाऊसाहेब गर्दींत शिरल्यानंतर पांच पन्नास कदमापलीकडे त्यांना ते दिसूं शकले नाहींत. एवढेंच नव्हे तर अस्तमानाला एक घटिका वेळ राहिला तोंपर्यंतही ते फिरून त्यांच्या दृष्टीला पडले नाहींत. ही वस्तुस्थिति जिव्हाळ्याच्या तीक्ष्ण नजरेच्या आणि अंबारींत उंच ठिकाणीं बसून केवळ पतीचें दर्शन व्हावें या इच्छेनें पहात असणाऱ्या पार्वतीबाईची होती. परतु तिला गर्दींत शिरलेले भाऊ-साहेब पुन्हां दिसले नाहींत. असें असतां या दुराणीला भाऊसाहेब कित्येक वेळां दिसले ही एक अद्‌भुतरम्य गोष्ट आहे. एवढ्यावरच त्या दुराण्याची मजल गेली नाहीं. तर तो पुढे सांगतो: "तो उत्तम घोड्यावर बसला असून लढाईत त्याच्या खालचे दोन घोडे मारले गेले, आणि खुद्द त्यास कित्येक जखमा लागल्या. त्यामुळे तो आपल्या तिसऱ्या घोड्यावरून खालीं उतरला." या दुराण्यानें भाऊसाहेबांना कित्यक वेळां पाहिले, एवढेंच नव्हे तर, लढाईच्या गर्दींत त्यांचे दोन घोडे मारले गेले, हेंही त्यानें पाहिलें होतें. भाऊसाहेब जिवंत राहून त्यांची या बाबतींत प्रत्यक्ष जबानी घेतली असती, तर लढाईच्या गर्दींत त्यांनीं कितीदां आपलीं हत्यारें बदलली, कितीदां घोडे बदलले, किती जखमा कोणीं केल्या व त्या कशा झाल्या, हें खुद्द त्यांनाही खास सांगतां आलें नसते. परंतु लढाईंतील एक सामान्य दुराणी मनुष्य अशा हातोहातीच्या घनघोर युद्धांत भाऊसाहेबांचे घोडे किती मारले गेले हें सांगतो ही दुसरी अद्‌भुतरम्य गोष्ट आहे.

८. ज्या युद्धांत हिंदु कोण व मुसलमान कोण हें ओळखतां येत नव्हतें, अशा प्रसंगीं एक दुराणी एखाद्याच्या बारीकसारीक चळवळीवर नजर ठेवतो, पण आपण कोणत्या माणसावर नजर ठेवीत आहोंत, तो

मनुष्य कोण आहे, तो सामान्य सरदार आहे किंवा ज्याचा वध केला असतां हें महायुद्ध जिंकल्याचें श्रेय मिळणार होतें, असा तो मुख्य सेनापती भाऊसाहेब आहे याची मात्र त्याला खबर नव्हती, किंवा त्या गडबडींत त्यानें ती करून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं. शिवाय त्या मनुष्याची चौकशी केल्याशिवाय तो त्याच्यावर बारीक नजर ठेवीत होता. दोन घोडे मारले गेले व बऱ्याच जखमा झाल्यामुळें ते तिसऱ्या घोड्यावरून उतरले ही हकीकत त्या पुरुषाकडून समजली म्हणावें तर त्याला त्या दुराण्यानें जेव्हां ‘ आपण कोण आहां ? कोणी सरदार किंवा खुद्द भाऊसाहेब आहां ! तुम्हीं भिऊं नका. आम्हीं तुम्हांस उपद्रव देणार नाहीं. सांगाल तेथें तुम्हांस घेऊन जाऊं ’ असे प्रश्न विचारले व त्या प्रश्नांचीं उत्तरेंही त्या मानी पुरुषानें दिलीं नाहींत, त्याअर्थीं त्यानें आपले दोन घोडे मारले गेल्याची हकीकत त्या दुराण्याला खात्रीनें सांगितली नाहीं हेंच खरें ठरतें. असें असतां जो दुराणी त्या पुरुषावर एवढी नजर ठेवितो त्याला त्याचें नांव व त्याचा अधिकार माहीत नसावा आणि शत्रुपक्षाच्या मुख्य सेनापतीला त्यानें न ओळखावें ही तिसरी अद्भुतरम्य गोष्ट आहे.

९. त्या दुराण्यानें भाऊसाहेबांना लढाईच्या गर्दीत कित्येक वेळां पाहिलें व त्यांचे किती घोडे मारले गेले यांवर लक्ष ठेविलें. हें सारें कशाकरतां होतें ? तर त्यांच्या अंगाखांद्यावर जे मौल्यवान् दागिने होते त्यांच्या लोभाकरतां होतें. यावरून हा दुराणी लढवय्या शिपाई नसून तो केवळ डाकूचें काम करण्याकरतां सैन्यांत घुसला असावा असें अनुमान निघतें. परंतु डाकू लोकांना अशा लढवय्या पुरुषांच्या अंगावरील अलंकार मिळविण्याकरतां आपलें सर्व बल खर्ची घालण्यापेक्षां पार्वतीबाई, नाना फडनविसांची आई, बायको वगैरे अनेक स्त्रिया अलंकारांनीं युक्त असलेल्यांवर नजर ठेऊन दागिने लुटण्याचें काम करणें लढाईच्या गर्दीत फार सोपें गेलें असतें. ज्याअर्थीं त्यानें तसें केलें नाहीं, त्याअर्थीं तो डाकू होता असें ठरत नाहीं. तो लढाई खेळणारा एक

शिपाई गडीच होता असें ठरतें. परंतु तो ह्मणतो ' अखेर त्यापाशी कोणी मनुष्य राहिलें नाहीं असें पाहून मी आणि माझ्या सोबत्यांनीं त्यास घेरलें. आमचा उद्देश त्याचे मौल्यवान् दागिने घेण्याचा होता. जो दुराणी त्या इसमाला तूं कोण सरदार आहेस, कीं खुद्द भाऊसाहेब आहेस असा प्रश्न विचारतो, त्याचा उद्देश केवळ त्याचे मौल्यवान् दागिने घेण्याचा होता हें तो स्पष्ट सांगतो. असें असतां लढाईंत शत्रुपक्षाच्या सरदाराला किंवा सेनापतीला पकडून कैद करण्यापेक्षां किंवा तो जिवंत हस्तगत होत नसेल तर त्याला ठार मारण्यापेक्षां त्याच्या अंगावरील मौल्यवान् दागिन्याची किंमत जास्त मानणारा हा एकटाच दुराणी इतिहासप्रसिद्ध दिसतो. या दुराण्याच्या कैफियतींत त्याचा उद्देश केवळ मौल्यवान् दागिने घेण्याचा होता ही चौथी अद्‌भुतरम्य गोष्ट आहे.

१०. त्या दुराण्याचा उद्देश त्या इसमाचे मौल्यवान् दागिने जर घेण्याचा होता तर त्याच्यावर हल्ला करून त्याचें शीर तोडून घेऊन जाण्याचें त्याला काय कारण होतें? त्याला मारल्यानंतर त्याचे अलंकार काढून घेण्यानें त्याचा उद्देश सफल झाला होता. असें असतां त्याचें फक्त शीर तो जें घेऊन गेला तें कशाकरतां? त्याला हे भाऊसाहेब असतील अशी शंका आली होती ह्मणावें तर त्यानें त्यांचें प्रेतच घेऊन जाणें जास्त संभवनीय व महत्वाचें होतें. किंवा अबदल्लीकडून जर मोठीं निरनिराळीं दोन इनामें मिळवावयाचीं असें त्याच्या मनांत येतें, तर त्यांचेपैकीं एकानें शीर न्यावयाचें व दुसऱ्यानें धड न्यावयाचें अशी युक्ति त्यांना करतां आली असती. परंतु तसें न करतां त्यांनीं फक्त शीर तोडून नेलें. मौल्यवान् दागिने मिळून त्यांचा उद्देश सफल झाला असतांही दागिन्याबरोबर केवळ शीर तोडून नेण्याचें त्यांचें हें कृत्य ही पांचवी अद्‌भुत-रम्य गोष्ट आहे.

११. अबदल्लीला या दुराण्यानें आपली कैफियत सादर केली, त्या वेळीं तें शीर पाहून तेंच भाऊसाहेबांचें असें तेथील लोकांनीं ओळखिलें. परंतु त्या वेळीं भाऊसाहेबांच्या अंगावरील मौल्यवान् दागिने अबदल्लीनें पहाण्याकरतां मागितले नाहींत किंवा दुराण्यानें ते त्यांना दाखविले नाहीत. काशिराय पंडित

हे इतिहासलेखक जर लढाईच्या वेळीं हजर असते तर त्यांनीं भाऊसाहेबांच्या अंगावरील मौल्यवान् दागिने त्यांच्या ओळखीच्या लोकांना दाखवून जास्त खात्री करून घेतली असती व त्यांनीं तसा उल्लेख आपल्या बखरींत नमूद करून ठेवला असता. पण तसा उल्लेख त्यांत नाहीं. अबदल्लीनें दुराण्याकडून शीर तेवढें मागून घेतलें. पण शत्रूच्या सेनापतीचे मौल्यवान् दागिने मागितले नाहींत किंबहुना स्वतःच्या डोळ्यांनीं ते पाहण्याची सुद्धां तसदी घेतली नाहीं, ही सहावी अद्भुतरम्य गोष्ट आहे.

१२. या दुराण्याच्या कैफियतींतील वरील सहा अद्भुतरम्य गोष्टी विचारांत घेतल्या ह्मणजे त्यांत सत्य किती प्रमाणांत आहे याची शंका आल्यावांचून राहत नाहीं. त्या दुराण्यानें अबदल्लीकडे एक शीर नेऊन दिलें ही गोष्ट सत्य असूं शकेल. पण तें शीर कसें आणलें हा जो इतिहास त्यानें दिला, तो मात्र निव्वळ बनावट आहे यांत शंका नाहीं. आपल्या सेनापतीला आपला पराक्रम दाखवून त्याचें पारितोषिक उपटण्याची ही केवळ क्लृप्ति आहे. जय मिळालेल्या पक्षाकडून पराजित पक्षाच्या थोर लोकांबद्दल कित्येक वेळां अशाच प्रकारच्या गोष्टी घडलेल्या ऐकिवांत येतात. कित्येक वेळां पराजित पक्षाची मुद्दाम नाचक्की करण्याच्याही हेतूनें अशा बनावट गोष्टी घडवून आणीत असतात. अशा गोष्टींत सत्याचा पूर्ण अभाव असतो.

१३. ' मग त्या रणभूमीच्या एके बाजूस एक शीर कापलेलें धड सांपडलें. तें सदाशिवरावाच्या आकृतीप्रमाणेंच दिसत होतें. त्या समयीं हेंच भाऊचें शरीर असेल असें ह्मणूं लागले. याशिवाय त्या भाऊचें विशेष कांहीं वर्तमान नाहीं '' हें मराठयांच्या बखरींतील विधान बरोबर आहे. एका धडाच्या आकृतीप्रमाणें दुसरीं धडेंही असूं शकतील. रणमैदानावरील लाखों लोकांच्या मुडद्यांतून एक धड निवडून काढणें व तें भाऊसाहेबांचेंच ठरविणें हें बुद्धीला पटण्यासारखें नाहीं. धडापासून शीर कापलें गेल्यामुळें त्यांतून रक्तप्रवाह गेला म्हणजे मूळ धडामध्येंही बराच फरक पडतो. शिरामध्येंही दहा पंधरा

१. मराठ्यांची बखर २१२.

तासानंतर पुष्कळ फरक पडतो. मनुष्याची ओळख तोंडवळयाच्या चेहेरेपट्टीपेक्षां डोळ्यांतील बाहुलीच्या किरणामध्यें जास्त असते. मृत शिराची यामुळें विश्वसनीय ओळख सांगतां येणार नाहीं. सारखेपणामुळें अंदाज सांगतां येईल. अंदाज नेहमीं संशयित असतो. अब्दल्लीपुढें भाऊसाहेबांच्या धडासारखें धड येणें किंवा त्यांच्या शिराप्रमाणें शीर येणें अगदीं शक्य होतें. दोन तीन लाख मुडद्यांमध्यें कित्येक धडें व कित्येक शिरें जवळ जवळ सारख्या आकृतीचीं दिसूं शकतील. भाऊसाहेबांच्या धडाच्या आकाराप्रमाणें इतक्या मुडद्यांत एकादें धड खास मिळूं शकेल व त्याचप्रमाणें शीरही मिळूं शकेल. अशा धडास किंवा शिरास तें भाऊसाहेबांचें असावें म्हणून हिंदुधर्माप्रमाणें त्याचा अंत्यविधि झाला हें योग्यच झालें. तें धड भाऊसाहेबांचें नसतां त्याला अग्निसंस्कार झाला म्हणून कांहीं बिघडत नव्हतें. परंतु एकादे वेळीं तेंच खरें भाऊसाहेबांचें धड होतें असें ठरलें असतें व इतर सामान्य प्रेताप्रमाणें त्याची वासलात लागली गेली असें झालें असतें तर मात्र सर्व हिंदुसमाजाला बोल लागला असता. एवढ्याच हेतूनें त्या धडाला अग्निसंस्कार करण्यांत आला. परंतु या प्रकारामुळें भाऊसाहेब पानिपतच्या लढाईंत मेले हें मात्र खरें ठरत नाहीं.

१४. एकंदरींत सदाशिवरावभाऊसाहेब पानिपतच्या लढाईंत मेले असें ह्मणणाऱ्या पक्षाचा पुरावा निर्णयाकरतां लंगडा व अगदी अपुरा असून तो जसा विश्वसनीय मानतां येत नाहीं, त्याचप्रमाणें सदाशिवरावभाऊसाहेब गर्दींत शिरल्यानंतर शत्रूची फळी फोडून शिरसलामत बाहेर पडले व ते खात्रीनें मेले नाहींत, असेंही दुसऱ्या पक्षाच्या पुराव्यावरून ठरवितां येत नाहीं. ते लढाईंत मेले असें विश्वसनीय पुराव्यानें ज्याअर्थी ठरवितां येत नाहीं, त्याअर्थीं खात्रीलायख पुराव्याच्या अभावीं ते जिवंतच असले पाहिजेत असें ह्मणणेंही अयोग्य आहे. एकंदरींत पानिपतच्या लढाईच्या वेळीं पुढें आलेला साधक बाधक पुरावा भाऊसाहेब मेले किंवा ते जिवंत आहेत, हें ठरविण्याला अगदीं अपुरा आहे. आतां त्यानंतर तोतयाच्या बंडाच्या वेळीं जे पुरावे पुढें आले त्यांतून कांहीं निष्पन्न होतें कीं काय हें येथें पहाणें इष्ट आहे.

१५. एकाद्या मनुष्याच्या मृत्यूबद्दल निर्णयात्मक गोष्ट ठरली नसली ह्मणजे त्याचा फायदा घेणारे लुच्चे, लफंगे लोक समाजांत पुष्कळ असतात. पानिपतच्या गर्दीत नाहींसा झालेला हरिपंत फडक्यांचा भाऊ मीच आहे असें एक लुच्चा पुणें प्रांतीं सांगत हिंडत होता. त्या युद्धांत मरण पावलेला प्रख्यात सरदार जनकोजी शिंदे मीच आहे असें ह्मणणाऱ्या दुसऱ्या एका लफंग्यानें महाराष्ट्रांत खळबळ उडवून दिली होती व शिंद्यांच्या घरच्या माणसांना कित्येक दिवस बुचकळ्यांत पाडलें होतें. बाजीरावाच्या कारकीर्दीत एका डोंगरी किल्ल्यावर मरण पावलेला चतुरसिंग राजे भोंसले मीच आहे असें ह्मणणारा एक ढोंगी प्रकट झाला होता. इंग्रजी अमदानींत पुण्यास एक बाई आली होती. ती सांगे कीं, मी सवाईमाधवराव यांची बायको यशोदाबाई आहे. पुरंदरावर पेशवे सरकारचें द्रव्य कोठें पुरलेलें आहे तें मला माहीत आहे. याप्रमाणें थापा देऊन तिनें पुण्यांतील कित्येक खानदानी कुटुंबातील माणसांना कांहीं दिवस भुरळ घातली होती. एकंदरींत अशा प्रकारच्या बऱ्याच गोष्टी इतिहासांत सांपडूं शकतात. वरील निरनिराळ्या तोतयांचीं त्या त्या प्रसंगीं चौकशी होऊन चौकशीअंतीं त्यांचीं पारिपत्यें झालीं ह्मणून लोकांचा भ्रम दूर झाला.

१६. समाजांतील प्रत्येक लुच्चाला तोतयाची भूमिका रंगवून लोकांना फसवितां येत नाहीं. त्याच्या लबाडी करण्याच्या बुद्धिमत्तेबरोबर आणखी पुष्कळ गोष्टींची जोड त्याला तोतया बनावयाला लागत असते. १ ज्या इसमाचा तो तोतया बनतो त्याचे व त्याचे चेहऱ्यात व शरीराच्या आकारांत बरीच साम्यता असावी लागते. २ ज्या इसमाचा तो तोतया बनतो त्याच्या आप्तइष्टांची संपूर्ण माहिती त्याला असावी लागते. ३ खरा पुरुष राजकारणी असेल तर त्याच्या कारभाराची माहिती त्याला असणें जरूर असतें. ४ एकादा थोर पुरुष असेल तर त्याच्या नांवाची मुद्रा, आंगठी किंवा अंगावर नेहमीं वापरण्यांत असलेला अलंकार, हातांतील नेहमींची काठी अगर तरवार, नेहमीं लोकांनीं पाहिलेलीं वस्त्रें वगैरे जिन्नस, जे दाखविले असतां सहज त्या थोर इसमाची ओळख पटेल, असे जिन्नस मिळविणें. ५ हस्ताक्षरांत सारखेपणा

असणें. ६ चालण्याची, पहाण्याची, बोलण्याची अगर हंसण्याची लकब अंगीं असणें किंवा एकाद्या विशिष्ट गुणामध्यें साम्यता असणें. ७ बाह्य आकृतीमध्यें सारखेपणा असूनही अशा एकाद्या गुप्त रहस्याची माहिती असणें कीं ज्याची ओळख दिली असतां त्या माणसाची सहज ओळख पटूं शकेल. ८ एकाद्या विशिष्ट कलेचें किंवा विद्येचें ज्ञान असणें, वगैरे वगैरे गोष्टींची जरूरी लागते. परंतु बाकीच्या सर्व गोष्टी जरी साध्य नसल्या तरी शरीराच्या ठेवणींतील साम्यता हा गुण मात्र अवश्य असलाच पाहिजे. तो असून बाकीचे जितके गुण त्याच्या अंगीं जास्त असतील, तितके जास्त दिवस तो लोकांना फसवूं शकतो. त्याच्या अंगच्या फसविण्याच्या कलेवर तो सामान्य अगर थोर मनुष्याचा तोतया बनूं शकतो. सदाशिवरावभाऊंचे जे तोतये झाले त्यांच्यांत वरील गुण कमीजास्त प्रमाणांत होते यांत संशय नाहीं.

१७. मीच सदाशिवरावभाऊ आहे असें ह्मणणारे तीन पुरुष निरनिराळ्या ठिकाणीं उदयाला आले. पानिपतचें महायुद्ध आटोपल्यानंतर सुमारें वर्ष दीड वर्षाचे आंत इ. स. १७६२-६३ मध्यें एका पुरुषानें मीच भाऊसाहेब आहे असें प्रसिद्ध करून व लोक जमवून काशी येथें दंगा मांडला[1]. महाराष्ट्रापासून श्री काशी क्षेत्र फ़ार दूर असल्यानें व भाऊसाहेब पानिपतच्या गर्दींत नाहींसे झाले या भ्रमांत लोक असल्यानें या पुरुषाला हें बंड करण्याला अवकाश मिळाला. भाऊसाहेबांच्या काहींतरी खुणा व त्यांच्याबद्दल भ्रम उत्पन्न होईल अशा काहीं गोष्टींच्या भांडवलाच्या जोरावर त्यानें काशींच्या लोकांना भुरळ घातली. भाऊसाहेबाना प्रत्यक्ष पाहिलेले लोक अर्थात् त्या ठिकाणीं विरळाच असल्यामुळें या बंडाला प्रथमतः चांगलें स्वरूप येणें शक्य होतें. परंतु जें धादांत खोटें असतें तें फार दिवस टिकूं शकत नाहीं. पुढें [2] शिंद्यांस ही बातमी लागल्यावरून जिवबादादांनीं काशींस जाऊन त्याला पकडलें व तो तोतया आहे असें ठरवून त्याला चुनारच्या किल्ल्यात कैदेंत टाकलें. पुढें तो तो गोरखपूर येथें मेला. हा नंबर १ चा तोतया होय.

1. Elliot Vol viii pages 282-284. २. जिवबादादा बक्षी यांचें चरित्र पान ७९.

१८. यानंतर थोड्याच दिवसांनीं मीच सदाशिवरावभाऊ ह्मणून दुसरा पुरुष प्रथम झांशी प्रांतांत प्रकट झाला[1]. या इसमासंबंधीं ऐतिहासिक[2] लेखसंग्रहांत बरीच माहिती सांपडते, ती अशी: हा इसम पहिल्यानें झांशी प्रांतांत नरवर ह्मणून एक गांव आहे, त्या गांवीं सदाशिवरावभाऊ ह्मणून प्रसिद्धीस आला. तो गोसाव्याच्या वेषांत प्रवास करीत करीत येत असतां, त्याला नरवर हें गांव लागलें. वाटेच्या प्रवासानें थकल्यामुळें तो एका वाण्याच्या दुकानाजवळ घटकाभर विश्रांति घेण्याकरतां बसला. तेथें तो बसला असतां दोन तीन दक्षिणी इसम तेथें आले. त्यांनीं त्याला सदाशिवरावभाऊ म्हणून ओळखिलें. त्या शहरांत शंभुपुरीपंथाच्या गोसाव्यांचा मठ होता, त्या मठांत ते जाऊन उतरले. पानिपतच्या युद्धांत भाऊसाहेब नाहींसे झाले होते, ते नरवरास गोसाव्यांच्या मठांत प्रकट झाले आहेत ही वार्ता हां हां म्हणतां चोहोंकडे पसरली. या गोसाव्यांच्या मठांतील महंत व त्यांचे चेले भाऊसाहेबांना अनुकूल झाले व तेथें त्यांची प्रसिद्धी सुरू झाली.

१९. नरवरापासून जवळच करेरा किल्ला आहे. तेथें नारो शंकर राजेबहाद्दर याचा पुतण्या विश्वासराव हा राहत होता. नारो शंकराकडे झांशी प्रांत होता, व तिकडील बंदोबस्त राखण्याकरतां त्यानें आपल्या पुतण्यास फौजेसह नेहमीं करेऱ्यास ठेविलें होतें. त्या विश्वासरावास भाऊसाहेब प्रकट झाल्याची बातमी लागतांच त्यानें नरवरास कारकून व स्वार पाठविले. त्यांनीं भाऊसाहेबांस ओळखून त्यांच्या खरेपणाबद्दल विश्वासरावास लिहून कळविलें. तथापि आणखी चौकशी करण्याकरतां त्यानें चारशें स्वार बरोबर देऊन एक सामान्य प्रतीचा सरदार पाठविला. त्या सरदाराचीही भाऊसाहेब खरे असल्याबद्दल खात्री झाली. त्या सरदाराबरोबर भाऊसाहेबांनीं विश्वासरावास सांगून पाठविलें कीं, लवकरच आमची स्वारी करेऱ्यास येणार आहे. त्या वेळीं तुम्हीं आम्हांस तीन कोस सामोरें येऊन किल्ल्यावर घेऊन जावें. त्याप्रमाणें आश्विन वद्य द्वितीयेस सदाशिवरावभाऊ यांची स्वारी करेऱ्यास गेली. तेव्हां विश्वासरावानें सामोरें येऊन समारंभानें त्यांस किल्यावर नेलें. हिंदुस्थानांतील प्रांतोप्रांतीं

---

१. नावुक्कत महादजी शिंदे यांचे चरित्र पान २८१. २. पृष्ठ १२५२ ते ५४.

'भाऊसाहेब' प्रकट झाल्याचें वर्तमान हां हां ह्मणतां पसरलें. महालोंमहालींचे कमाविसदार येऊन भेटले. ग्वाल्हेरीहून शिवाजीपंत मुजुमदार व आबाजीपंत चिटणीस व आणखी कांहीं गृहस्थ पन्नास स्वार घेऊन भेटीस आले. त्यांजपासून पैका घेऊन या भाऊसाहेबांनीं ती फौज चाकरीस ठेविली. ग्वाल्हेरी, झांशी, भेलसें इत्यादि परगण्यांतील लोकास हे खरे भाऊसाहेब असल्याविषयीं शंका राहिली नाहीं. करेऱ्याहून निघून ते दक्षिणेकडे येऊं लागले, त्यावेळीं त्यांच्याबरोबर पेशव्याप्रमाणें फौज, तोफा, गारदी, डेरे, राहुट्या, हत्ती, पालख्या, नौबती, निशाणें, बाजार वगैरे सारा थाटमाट होता. एवढा खर्च चालवयास जो पैसा लागे, तो पैसा ते वाटेनें जें गांव लागे तेथून खंडणी वसूल करून मिळवीत.

२०. समशेरबहादराच्या मेहुण्यानें हिंदुस्थानांतून पेशव्यांचे बंधु नारायणराव यांस फारशी पत्र पाठविलें होतें. त्यांत भाऊसाहेब खरे असल्याविषयींचा मजकूर होता. एकानें लिहिलें होतें कीं, आपण भाऊसाहेबांच्या स्वारींत वीस दिवस होतो. ते खरोखरी भाऊसाहेब आहेत याविषयीं आपली खात्री झाली. हिंदुस्थानांतून आणखींही कित्येक पत्रें आलीं. त्यांत "भाऊसाहेबांच्या तोंडावर जखम आहे. त्र्यंबकेश्वरास येऊन डोईचे केंस काढावे, गोसाव्याचा वेष टाकून द्यावा असा त्यांचा बेत आहे. समागमें फौज गोसावी दोन हजार व धोंडाजी पवार दोन हजार व भिल्ल कोळी दोन हजार याप्रमाणें आहे. देशची बोली बोलत नव्हते तीही बोलूं लागले" असा मजकूर होता. दोघा भिक्षुकांनीं खुद्द पार्वतीबाईस पत्र पाठविलें होतें कीं, "भाऊसाहेब खरे. लवकरच येतील. आम्हीं समागमेंच आहों." हिंदुस्थानात जावयाची पागा होती. शिवाय नारो शंकर, विंचुरकर, व होळकर यांच्या फौजा तिकडे होत्या. त्या त्या सर्व फौजांतून दक्षिणेंत अशाच अर्थाचीं पत्रें येत होतीं. या पत्रांमुळें व उत्तरेकडून भाऊसाहेबांच्या गांठीभेटी घेऊन येणाऱ्या लोकाच्या सांगण्यावरून पेशवे दरबारीं व त्यांच्या आप्तइष्ट सरदार लोकांत बरीच खळबळ उडाली होती. वेदमूर्ति धोंडभट्ट दात्ये उत्तरेकडून पेशव्यांच्या लष्करांतून मिरजेस तारीख २३

जानेवारी सन १७६५ इ. रोजीं आले.[1] ते गोविंद हरी पटवर्धन यांस सांगत होते कीं, " श्रीमंत भाऊसाहेब खरे. परंतु दरबारीं कोणास तिकडील अगत्यच नाहीं. खबर कोणें सांगितली तर लटकी होते. त्यास दगा झाला होता. परंतु खैर जाली. करेऱ्याहून ते मागती नरवरास गेले." या दात्ये भटजींच्या माहितीप्रमाणें पेशवे दरबाराला भाऊसाहेबांचें अगत्यच नव्हतें. उलट ते खरे आहेत असें कोणीं सांगितलें तर ती गोष्ट खोटी असें ते धरून चालत. 'भाऊसाहेबांना करेऱ्याला दगा झाला. त्यांतून ते बचावले.' या गोष्टीवरूनही त्यांचा विरुद्ध पक्ष त्यांना मारून टाकण्याकरतां खटपट करीत होता हें स्पष्ट होतें. यावरून पेशवे दरबाराला भाऊसाहेब नको होते हें दरबारी धोरणावरून लोकांना कळूं लागलें होतें असें दिसतें.

२२. वेदमूर्ति धोंडभट्ट दात्ये उत्तरेकडून पेशव्यांच्या लष्करांतून दक्षिणेंत मिरजेस आले. त्यांना तेथून निघाल्यापासून दक्षिणेंत येण्यास दोनचार महिने लागले. तेवढ्या अवधींत भाऊसाहेब फौज जमवून करेऱ्याहून निघाले व मजल दर मजल करीत ते खानदेशांत उतरले. ही बातमी कर्नाटकांत हैदरवरील पहिल्या स्वारींत माधवराव पेशवे गुंतले असतां त्यांना समजली. तेव्हां त्यांनीं नाशकास गोपिकाबाई यांचा कारकून रा. रामचंद्र नारायण गोरे यांस तारीख १४ जानेवारी सन १७६५ इ. रोजीं तुंगभद्रा तीरावरील होनहळ्ळी मुक्कामाहून पत्र[2] पाठविलें. त्यांत ते लिहितात, " तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब याचें नांव करून खानदेशात खूळ माजलें आहे. त्यास कितेक कागद लोकांस लोकांचे येतात. त्यात भाऊसाहेब खरे असें ह्मणतात. कुफराणा[3] तर खराच. भाऊसाहेबांची रीत अशी यावयाची वाटत नाहीं. व मागेंही एकदोन प्रकार लबाड जाहले यामुळें भरंवसा पुरत नाहीं. तथापि खऱ्या लटक्याचा शोध करवून या अर्थे लिहिलें असे. तरी शाहणा माणूस दाट ओळख्या पाठवून बारीक शोध करवून लिहून पाठवणें." या पत्रावरून माधवराव पेशवे जरी मोहिमेवर होते

१. ऐ. ले. सं. पान ९८४ नं ५४४ २. ऐ. ले. सं. पान ९८५ नं० ५४५.
३. लबाड

तरी भाऊसाहेबांविषयीं ते कसून चौकशी करीत होते असें दिसतें. पुढें मल्हारराव[1] होळकर यांनीं भाऊसाहेबांवर हल्ला करून त्यांच्या सैन्याचा मोड केला व त्यांस पकडून त्यांनीं नाशकास आणलें. माधवराव पेशवे या वेळीं कर्नाटकची मोहीम संपवून ता. ८ जून सन १७६५ रोजीं पुण्यास आले. ( जेष्ठ वद्य १३[2] शके १६८७ ) त्यांनीं नाशिकहून भाऊसाहेबांस पुण्यास आणण्याकरतां माणसें रवाना केलीं. त्याप्रमाणें तो पुण्यास आला. तेव्हां शनिवारवाड्यांत मुख्य मुत्सद्दी व माधवराव यांच्यांत असें ठरलें कीं, भाऊसाहेब यांजबरोबर पर्वतीवर जाऊन करारमदार करून टाकावा.[3] नाशिकहून पुण्यास भाऊसाहेबांस आणल्यानंतर त्यांस पर्वतीवरील गोशाळेंत ठेवण्यांत आलें होतें. कार्तिक शु० प्रतिपदा शके १६८७ रोज मंगळवार तारीख १५ आक्टोबर सन १७६५ इ. रोजीं ठरल्याप्रमाणें थोरले मुत्सद्दी व शास्त्री मिळून पर्वतीवर गेले. त्यांच्याबरोबर करारमदार कांहींएक न करतां त्यास त्यांनीं तोतया ठरविलें. तोतया ठरवितांना त्याची माहिती अशी दिली कीं, तो परिछिन्न कनोजा ब्राह्मण. बुंदेलखंडांतील छत्रपूरचा वतनदार. त्याचें नांव सुखलाल, बापाचें नांव रामानंद, आईचें अन्नपूर्णा, आजीचें मन्मथा. याप्रमाणें भाऊसाहेबांस कनोजा ब्राह्मण ठरवून त्यांस धनगड किल्ल्यावर रवाना केलें व तेथें कैदेंत ठेवलें.

२३. माधवराव पेशवे व त्यांचे मुत्सद्दी यांनीं जरी भाऊसाहेबांना तोतया ठरविलें व त्याला धनगडाच्या डोंगरी किल्ल्यावर रवाना केलें तरी त्यांचें तें करणें पार्वतीबाई, अनुबाई व इतर आप्तमंडळी यांस रुचलें नाहीं. त्यांनीं माधवरावांच्या मागें त्यांची पुरी शहानिशा करण्याबद्दल टुमणें लावलें. माधवराव पेशवे शक्यतों हा प्रश्न लांबणीवर टाकीत होते. शेवटीं जून इ. स. १७६६ मध्यें माधवरावांनीं धनगड किल्ल्यावरील भाऊसाहेबांच्या समाचाराकरतां पुण्याहून वेदमूर्ति राजश्री गंगाधरभट्ट कर्वे व नागोराम, व गोपाळपंत देशपांडे

---

१. नातुकृत महादाजी शिंदे याचे चरित्र पान २८१. २ चंद्रचूड दप्तर पा. १० ले. १६
३ ऐ. ले. सं. पान १०२७ नं. ५७९.

यांना रवाना[1] केलें. याप्रमाणें पार्वतीबाई व अनुबाई यांच्या मनाच्या समाधानाकरतां ते भाऊसाहेबांकडे माणसें रवाना करीत व शक्य तेवढी चाल ढकल चालवीत. शेवटीं त्यांचा निरुपाय होऊन दीड वर्षाच्या कालानंतर ह्मणजे तारीख ९ माहे डिसेंबर सन १७६७ मध्यें पुन्हां चौकशीकरतां भाऊसाहेबांना धनगड किल्ल्यावरून पुण्यास आणलें.[2] त्या वेळीं अनुबाई या पुण्यास होत्या.

२४. अनुबाई ही बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची सर्वांत लहान मुलगी व बाजीराव आणि चिमणाजीअप्पा यांची धाकटी बहीण होती. त्यांच्या वयाला सात वर्षे झालीं, तेव्हां इचलकरंजीकर व्यंकटराव नारायण घोरपडे यांचेबरोबर इ. स. १७१३ मध्यें त्यांचें लग्न झालें. इ. स. १७४५ मध्यें व्यंकटराव निवर्तले. तेव्हांपासून इचलकरंजी संस्थानचा कारभार त्यांनींच मरेपर्यंत चालविला. यांना जरी इचलकरंजीला दिलें होतें तरी पुण्यास यांचे भाऊ बाजीराव व चिमणाजीअप्पा हे राहत असल्यामुळें त्यांचें तेथेंही बरेंच दिवस राहणें पडत असे. बाजीराव यांनीं आपली यावनी रक्षा मस्तानी हिचा मुलगा समशेरबहादूर याची मुंज करण्याचा ज्या वेळीं संकल्प केला, त्या वेळीं अशा धर्मबाह्य कृत्यापासून त्यांना कोणीहि परावृत्त करण्यास धजेना; तेव्हां तें काम अनुबाई यांनीं मोठ्या चातुर्यानें केलें. त्या मोठ्या धर्मनिष्ठ व बुद्धिवान् होत्या.

२६. बाजीराव व चिमणाजीअप्पा निवर्तल्यावर नानासाहेब पेशवे यांना वडील असें घरचें माणूस याच अनुबाई होत्या. घरगुती बाबतींत अगर राजकारणांतही यांच्या सल्ल्याचा उपयोग त्यांना वारंवार होत असे. शनिवार-वाड्याजवळ इचलकरंजीकरांचा वाडा आहे. त्या ठिकाणीं त्या राहत असत. राघोबादादा व सदाशिवराभाऊ यांचाही आपल्या आत्यावर विशेष लोभ होता. नानासाहेबांबरोबर या स्वारींत जात असत. त्यांनीं इचलकरंजी संस्थानचा कारभार आपल्या भाचांच्या पराक्रमावर व वशिल्यावर चालविला होता.

---

१ ऐ. ले. सं. पा. १०३६ नं. ५८९. २ ऐ. ले. सं. पा. १२९३ नं. ७४९

अनुबाईंचे पती व्यंकटराव निवर्तल्यावर त्यांना मुख्य आधार ह्मणजे नानासाहेब यांचाच होता. करवीर, सातारा, हैदर किंवा पेशवे या दरबारांतील इचलकरंजी संस्थानचें कोणतेंही राजकारण अनुबाईंच्याच नजरेखालीं होई. एकंदरींत अनुबाई या राज्यकारभार जाणणाऱ्या, प्रत्येक दरबारांतील मुत्सद्यांचीं धोरणें संभाळणाऱ्या, आपली इभ्रत, मान, प्रतिष्ठा, त्याचप्रमाणें आपल्या माहेरच्या पेशवेघराण्याचा नांवलौकिक ओळखणाऱ्या अशा बुद्धिवान् व व्यवहारकुशल होत्या.

२६. इ. स. १७६७ च्या डिसेंबर महिन्यांत माधवराव पेशव्यांनीं तोतयाची चौकशी सुरू केली. त्या वेळी अनुबाईंचें वय ६० वर्षांचें होतें. इतकें वय झालें तरी त्या आपल्या जहागिरीचा कारभार आपणच पहात होत्या. तो तोतया नसून खरा भाऊसाहेबच असावा असें अनुबाईंचें मत होतें व त्यांची भ्रांति दूर करण्यासाठीं पेशव्यांनीं त्या तोतयास अनुबाईंच्या वाड्यांत कांहीं दिवस ठेविलें[1] होतें. परंतु त्यांची भ्रांति शेवटपर्यंत दूर झाली नाहीं ती नाहींच. तो तोतया नसून खरा भाऊसाहेब आहे असें त्या लबाडीनेंच ह्मणत होत्या असें कोणी पाहिजे तर ह्मणावें. परंतु त्यांच्यासंबंधानें इतकें सांगणें वाजवी आहे कीं, महाराष्ट्रांत त्या वेळी त्यांच्या मताप्रमाणें पुष्कळांचें मत होतें. खुद्द भाऊसाहेबांची बायको पार्वतीबाई हिलाही तो आपला नवरा आहे असें वाटत होतें. रामचंद्र गणेश कानडे, रामचंद्र नाईक परांजपे, भास्कर हरी पटवर्धन वगैरे कांहीं वडवडे लोक यांचेंही मत असेंच होतें. '**पेशवे व त्यांचे कारभारी यांच्या दहशतीमुळें कोणी तसें स्पष्ट बोलून दाखवीत नसत इतकेंच**[2] !' ही हकीकत खरेशास्त्र्यांनीं लिहिलेल्या इचलकरंजी संस्थानच्या इतिहासांत दिली आहे. यावरून हा तोतया नसून खरा सदाशिवरावभाऊ आहे असें त्यांच्या जवळच्या नात्यांतील लोकांना वाटत होतें. परंतु तसें स्पष्ट सांगितल्यानें खुद्द माधवराव पेशवे व त्यांचे कार-

१ ऐ. ले. सं. पा. १२९४ नं. ७४९. २. खरेकृत इचलकरंजी संस्थानचा इतिहास पान १२४.

भारी आपणावर कोणतें तरी भयंकर संकट आणतील अशी त्यांना भीति वाटत होती, ह्मणून त्यावेळीं जो तो मूग गिळून गप्प बसला होता. माधवराव पेशवे यांनीं त्याला तोतया ठरविलें व त्याचें नांव सुखनिधान असें असून तो जातीनें कनोजा ब्राह्मण आहे असा निकाल देऊन त्याला दौलताबादेच्या[१] किल्ल्यावर पाठवून कैदेंत ठेविलें. हा नंबर दोनचा तोतया होय.

२७. इ. स. १७६९ मध्यें मीच सदाशिवरावभाऊ आहे असें ह्मणणारा तिसरा पुरुष कर्नाटकांत प्रसिद्धीला आला. त्याला हैदरअल्लीनें मोठ्या थटामाटानें कांहीं दिवस आपल्या दरबारीं बाळगिले होतें.[२] नंतर तो तेथून निघून महाराष्ट्रांत आला. 'त्यानें मोठें सैन्य जमवून बंडाळी माजविली. तें बंड नानांनीं मोडाविलें आणि त्या तोतया भाऊस देहांत शासन देवविलें.'[३] या तोतयास नानांनीं जरी देहांत शासन दिलें, तरी त्याचा वध न करता त्याला नगरच्या किल्ल्यांत कैदेंत ठेवलें. हा नंबर तीनचा तोतया होय.

२८. अशा प्रकारें सदाशिवरावभाऊ ह्मणणारे तीन पुरुष पुढें आले. त्यांपैकीं काशीला बंड केलेला पुरुष मरण पावल्यानें त्याचा विषय संपला. आतां नगरच्या किल्ल्यांतील व दौलताबादेच्या किल्ल्यांतील असे दोन पुरुष शिल्लक राहिले. त्याचा इतिहास पुढें क्रमशः येईल. परंतु येथे एवढेंच नमूद करून ठेवणें इष्ट वाटतें कीं माधवराव पेशव्यांनी कैदेंत टाकलेल्या नंबर दोनच्या तोतयास एका किल्ल्यांत फार दिवस ठेवीत नसत. याविषयीं मराठ्यांच्या बखरींत पुढीलप्रमाणे मजकूर आहे. 'माधवरावानें त्याची[४] चौकशी करून तो खोटा असें ठरविलें, आणि त्यास बदींत घातलें होतें. त्यास एके ठिकाणीं ठेवीत नसत. त्याचें स्थानांतर करतां करतां तो रत्नागिरीस ठेविला.' शिवाय एकदां माधवरावांनीं तोतया ह्मणून ठरविल्यानंतरसुद्धां या तोतयाची पुनः पुनः चौकशी होत होती हें या तोतयांत विशेष आहे.

---

१ ऐ. ले. सं. पा. १३०५ नं. ७५५. २. खरेकृत अधिकारयोग पान ४२.
३ देवकृत नाना फडनविस यांचें चरित्र पान १९. ४. तोतयाची.

२९. माधवराव पेशव्यांनीं मीच सदाशिवरावभाऊ ह्मणणाऱ्या पुरुषास तोतया ठरविल्यावर त्याला किल्ल्यावर पाठविलें. पुढें माधवराव कालवश झाले आणि नारायणराव हे गादीवर बसले. नंतर थोड्याच दिवसांनीं रघुनाथरावदादा यांची मुलगी दुर्गाबाई हिचा विवाह बाबूजी नाईक बारामतीकर यांचा मुलगा पांडुरंगराव याच्याबरोबर ठरला. याच वेळीं सदाशिवरावभाऊंना पानिपतच्या गर्दींत मिसळून बारा वर्षें पुरीं झालीं होतीं. हिंदुधर्मशास्त्रपद्धति अशी आहे कीं, हरवलेल्या अगर बेपत्ता झालेल्या मनुष्याचा बारा वर्षेपर्यंत जर पत्ता लागला नाहीं, तर तो मेला असे समजून त्याची क्रिया करावी. याला अनुसरून पहिल्यानें सदाशिवरावभाऊ यांची क्रिया करावी असे दादासाहेबांच्या मनांत होतें. ही क्रिया केल्याशिवाय दुर्गाबाईचें लग्न धर्मशास्त्राप्रमाणें करतां येत नाही असें शास्त्री लोकांचें म्हणणें पडलें. भाऊसाहेबांची क्रिया करावयाची म्हणजे त्या वेळीं पार्वतीबाईचें वपन करून त्यांना सोंवळी करून घेणें प्राप्त होतें. या बाबतींत पार्वतीबाईची अर्थात् इच्छा विचारण्यात आली. त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, "पर्वतवासी (किल्ल्यावर कैदेंत ठेवलेले सदाशिवरावभाऊ) आणून फडशा करून टाकणें. मग विधि उरकून टाकावा[1]" या पार्वतीबाईच्या उत्तरानें राघोबादादा व सखारामबापू यांना 'बाप दाखव नाहीतर श्राद्ध कर' या ह्मणीप्रमाणें झालें. किल्यावरून तोतयाला आणून त्याचा शिरच्छेद करण्याचें त्यांना धाडस होईना त्याला ठार केल्याशिवाय वपन करून घ्यावयाला पार्वतीबाई तयार होईना. पार्वतीबाईचें वपन झाल्याशिवाय दुर्गाबाईचें लग्न करण्यास धर्मशास्त्र परवानगी देईना. अशा स्थितींत सखारामबापूंच्या मनांत पार्वतीबाईचा बळजबरीनें वपनविधि उरकून घ्यावा असें होतें. परंतु या गोष्टीला राघोबादादा व नारायणराव पेशवे हे कबूल नव्हते. तेव्हां सर्व बाजूंनीं पेंच पडला. तेव्हां अशा स्थितींत दुर्गाबाईच्या लग्नाकरतां धर्मशास्त्रानें आपली पडती बाजू घेतली व त्यांत कांहीं पर्याय

---

१. इतिहास ले. सं. नं. १२४३.

काढून पार्वतीबाईचा वपनविधि रद्द करण्यांत आला. दुर्गाबाईचें लग्नही त्यानंतर झालें. पार्वतीबाई या प्रकरणानंतरही आपणाला सौभाग्यवती असें उपपद लावून घेत असे. सौभाग्य-अलंकारही ती धारण करीत असे. इतर सरदार मानकरी वगैरे प्रतिष्ठित लोकही पार्वतीबाईंना 'सौभाग्यवती पार्वती-बाई' असें संबोधीत असत. आप्त इष्टांच्या बायकांचीं पत्रें वगैरे त्यांना सौभाग्यवती अशा संबोधनांनींच येत असत. सर्व सुवासिनी स्त्रियांकडून त्यांची ओटीभरणें, हळद कुंकूं लावणें वगैरे प्रकार नित्य चालू असत. आणि या सर्व गोष्टी धर्माचे अधिकारी, न्यायदेवतेचे स्वामी, धर्ममार्तंड रामशास्त्री यांच्या डोळ्यांसमक्ष व धर्मरक्षक पेशवेसरकार यांच्या प्रत्यक्ष राहत्या वाड्यांत होत होत्या, हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. माधवराव पेशव्यांनीं कैदेंत ठेवलेला इसम जर खरा तोतया असतां तर वरील सर्व धर्मबाह्य प्रकार घडवून आणण्याचें व डोळ्यांनीं पहाण्याचें मरण धर्म-मार्तंडांना कधींच आलें नसतें. परंतु त्या इसमास तोतया ठरविण्याच्या बाबतींत बरेंच पाणी मुरत होतें ह्मणूनच हे पर्यायाचे मार्ग धरावे लागले.

३०. माधवराव पेशव्यांनी तोतया ठरविलेल्या पुरुषास दौलताबादेच्या किल्ल्यावर इ. स. १७६६ मध्यें नेऊन ठेवलें. पुढें इ. स. १७७४ मध्यें राघोबादादांचा बंदोबस्त करण्याच्या कामीं हरिपंत फडके यांची पुरंदरच्या कारभाऱ्यांकडून योजना झाली. त्या वेळीं हरिपंतांनीं आपल्याला मदत मिळावी म्हणून निजामअल्लीबरोबर तह केला. त्या तहांत दौलताबादेचा किल्ला निजामा-कडे गेला म्हणून तो रिकामा करून देण्याच्या वेळीं तोतयास तेथून काढून मिरजेच्या किल्ल्यांत आणून ठेवलें. या सुमारें सात आठ वर्षांच्या अवधींतील या तोतयासंबंधींची माहिती उपलब्ध नाहीं. शिवाय दौलताबाद हा किल्ला पेश-व्यांच्या राज्याच्या एका दिशेची सीमा असल्यामुळें व तो पुण्यापासून बराच दूर असल्यानें अनुबाई किंवा पार्वतीबाई यांना तो तोतया नसून ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत अशी खात्री असून सुद्धां त्यांना त्यांच्या बंधविमो-चनाबद्दल कांहीं खटपट करतां आली नसावी असें दिसतें. दुसरें कारण असें

कीं, माधवराव पेशव्यांचा स्वभाव फार तापट. एकदां एक गोष्ट मनांत घेतल
ह्मणजे त्याच्या विरुद्ध बोलण्याची कोणाची छाती होत नसे. शिवाय माधवरा
यांच्या मागें दुसरीं राजकारणेंही हात धुवून लागलीं होतीं. हैदर, नागपूरक
भोंसले यांच्यावर स्वाऱ्या करून त्यांचा बंदोबस्त करणें व उत्तर हिंदुस्थानांती
राजकारणें साधणें यांतच त्यांचीं दोन तीन वर्षे गेलीं. तोंच त्यांचा राघोब
दादांबरोबर गृह-कलह सुरू झाला राघोबादादांचा बंदोबस्त करून मोकळे
होतात न होतात तों त्यांना पुन्हां हैदरवर स्वारी करण्याचा प्रसंग आला
परंतु स्वतःच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें मोहीम अर्धवट सोडून त्यांना पर
यावें लागलें. पुढें त्यांचें दुखणें अनावर होऊन शेवटीं ते थेऊर मुक्कामीं १७७
मध्यें वारले. नंतर नारायणराव गादीवर बसले. त्यांची सुमारें दहा महिन्यांच
कारकीर्द मोठ्या धामधुमीची गेली. नंतर राघोबादादा गादीवर आले. परं
त्यांच्यावर कारभारी मंडळींनीं पुतण्याच्या खुनाचा आरोप ठेऊन त्यांच्या बायक
मुलांसह त्यांना देशोधडीला लावलें. नारायणरावांची बायको गंगाबाई,
पार्वतीबाई यांना पुरंदर किल्ल्यावर त्यांच्या संरक्षणाकरतां कारभारी मंडळीं
नेवून ठेवलें. तेथें ही मंडळी 'परस्वाधीन जिणें आणि पुस्तकी विद्या'
ह्मणीप्रमाणें बहुतेक कैदेंतच होती. पुढें सवाईमाधवराव यांचा जन्म होऊ
राज्याला धनी झाला हें पाहून राघोबादादांचे प्रयत्न ढिले पडले व त्यांच
बंदोबस्त कोपरगांवीं झाला. त्या वेळीं बारभाई मुत्सद्दी मंडळींचें आसन थो
स्थिरावलें. या सर्व गोष्टी व्हावयाला माधवराव मेल्यानंतर सुमारें तीन वर्षांच
काळ लोटला.

३१. पार्वतीबाई पुरंदरच्या किल्ल्यावर कारभारी मंडळींच्या बंदीं
असतांना भाऊसाहेबांबद्दल तिच्या मनाची तळमळ सारखी सुरूच होत
तेथें तिच्या वशिल्याचें माणूस ह्मणजे फक्त गंगाबाई या एकट्याच होत्य
त्यांच्यामागें पार्वतीबाईचें टुमणें सारखें हातच. कारभारी मंडळींनाही गंग
बाईकरतां पार्वतीबाईची जरूरी होतीच. तेव्हां या बायकांचें समाधा
करण्याकरतां नाना फडनविस व सखारामबापू या कारभाऱ्यांनीं पुरुषोत्त

दाजी यांना तोतयाची चौकशी करण्याकरतां दौलताबादेच्या किल्ल्यावर पाठविलें. याविषयीं हरिवंशाच्या बखरींत खालीलप्रमाणें मजकूर आहे. [१]

" तोतया प्रथम दौलताबादेस होता, तेव्हां कारभारी यांनीं मला परीक्षेस पाठविलें. तेव्हां मी सांगितलें जे, आझे समागमें कोणी विश्वासूक कारकून द्यावा. तेव्हां बाजीपंत अण्णास बरोबर दिलें. नंतर दौलताबादेस गेलों. तेथें त्याची चार वेळ गांठ घेतली, ती बाजीपंतास बरोबर घेऊन घेतली. त्यास विचारलें जे, श्रीमंत भाऊसाहेब यांची व आमची बहुत वेळ गांठ पडून बोलणीं चालणीं खुणेच्या गोष्टी पुष्कळ जाहल्या आहेत, त्यांतून एक गोष्ट तुह्मी सांगा म्हणजे खरे. असें ह्मणतांच तो बोलला. त्यांतील कांहीं एक गोष्ट खरी जाहली नाहीं. तेव्हां मी त्याचे तोंडावर बोललों जे, तूं × × × लबाड आहेस. थोरांचे नांवास बट्टा लावावयास आलास. असें ह्मणून निघून आलों. "

३२. वरील प्रमाणें पुरुषोत्तम दाजींनीं तोतयाची परीक्षा केल्याची हकीकत वाचली ह्मणजे ते पार्वतीबाईकरतां, आपल्या पतीविषयीं तळमळणाऱ्या त्यांच्या जीवाचें समाधान करण्याकरतां गेले होते किंवा कारभाऱ्यांतर्फे केवळ तोतयाच्या परीक्षेचा फार्स करण्याकरतां गेले होते याची शंका येते. पुरंदर किल्ल्यापासून दौलताबाद कांहीं जवळ नाहीं. तो बऱ्याच दूरचा प्रवास आहे. असें असतां तेथें जाऊन त्यांनीं जी परीक्षा केली ती ह्मणजे चार वेळ भेट घेतली व त्याना परस्परांच्या बोलण्या चालण्यांतील खुणेच्या गोष्टी विचारल्या. त्या त्यांना पटल्या नाहींत. यामुळे ते त्याला लबाड ह्मणाले आणि निघून आले. दाजींची परीक्षा येथेंच संपली. या परीक्षेंत पुरुषोत्तम दाजींचा जिव्हाळा कोठेंच दिसला नाहीं. त्याच्यावर पार्वतीबाईंचा विश्वास नव्हता हें ते जाणून होते. सदाशिवरावभाऊ व पटवर्धन यांचें वैमनस्य होतें. पानिपतच्या लढाईवर जाण्याच्या वेळीं जेथें भाऊ तेथें पटवर्धन नाहींत व जेथें पटवर्धन तेथें भाऊ नाहींत एवढें वैमनस्य उत्पन्न झालेलें होतें. अशा स्थितींत दाजींना त्याची परीक्षा करण्याकरता कार-

---

[१] पान ८७.

भारी पाठवितात हें पार्वतीबाईंना रुचणें शक्य नव्हते. ह्मणून ते ह्मणाले: ' माझे समागमें कोणी विश्वासूक कारकून द्यावा. ' पार्वतीबाईंचा ज्या कारकुनावर विश्वास होता असा दार्जीपंत बरोबर दिला. चार वेळ भेट घेतली. परंतु भाऊसाहेबांच्या वयांत, त्यांच्या बोलण्या चालण्याच्या रीतिरिवाजात, त्यांच्या आवाजात, त्याच्या चेहेऱ्यांत त्यांना कोठेंच फरक दिसून आला नाहीं. तेव्हां त्यांनीं तोतयाला प्रश्न विचारले. त्या प्रश्नांचीं उत्तरें पार्वतीबाईंचा ज्या मनुष्यावर विश्वास नव्हता, अशा पुरुषोत्तम दाजींना पटलीं नाहींत. निदान असें ते म्हणाले. म्हणून तो तोतया व म्हणून ते खरे सदाशिवरावभाऊ नाहींत असें ठरविण्यात आलें. याशिवाय पुरुषोत्तम दाजींनी त्याचें हस्ताक्षर, किंवा त्याना वेदाचें ज्ञान होतें किंवा नाहीं तें, अगर त्यांच्या आप्तमंडळींची किंवा राज्यकारभारांतील त्यांच्या कामाची वगैरे कोणतीच विचारपूस केली नाहीं. अर्थात् ही त्यांची चौकशी म्हणजे पार्वतीबाईंचें समाधान करण्यापुरतीच होती यांत संशय नाहीं मागील प्रकरणांतून पुरुषोत्तम दाजीच्या रम्य लीलाच्या ज्या गोष्टी आल्या होत्या त्यापैकींच ही एक तोतयाच्या चौकशीची होती, यापेक्षा याला जास्त महत्व नाहीं.

३३. या ठिकाणीं दुसरी एक गोष्ट नमूद करून ठेवणें अवश्य आहे. मनुष्याच्या परिस्थितींत जमीनअस्मानाचा फरक झाला ह्मणजे त्याचा परिणाम त्याच्या बुद्धीवरही होत असतो. जे सदाशिवरावभाऊ पानिपतच्या लढाईचे वेळीं दोनतीन लाख सैन्याचे मुख्य सेनापती होते, ज्यांच्या हाताखालीं दोनदोन कोटी उत्पन्नाचे सरदार होते, ज्यांनीं पेशवाईचा सर्व कारभार चालविला, निजामअल्लीसारख्या शत्रूला ज्यांनीं दांतीं तृण धरून शरण यावयाला भाग पाडलें, त्या भाऊसाहेबांना कर्मवशात् भिक्षा मागण्याचा प्रसंग यावा, बैरागी वेशात भटकण्याचा प्रसंग ओढवावा किंवा सतत सात आठ वर्षे स्वकीय लोकांच्या कारागृहवासांत हाल अपेष्टा भोगण्याची पाळी यावी यापेक्षां मनुष्यमात्रावर दुसरा दुर्धर प्रसंग कोणता येऊं शकेल?

स्वतःची पत्नी आपल्या भेटीकरतां झुरत चालली असता तिचें दर्शनही असाध्य व्हावें, तिच्या पत्रांना किंवा निरोपांना मज्जाव व्हावा, स्वतःच्या मरणामुळें ज्याप्रमाणें आप्तइष्ट, सोयरेधायरे यांची शेवटची ताटातूट व्हावी, त्याप्रमाणें जर त्यांना परिस्थिति प्राप्त झाली तर त्यांच्या मनाची स्थिति काय होईल ? सिंह सांपळ्यांत सांपडल्यानंतर त्याला वाटेल त्यानें यावें व टोंचावें अशी त्याची अवहेलना अगदीं लहान मुलें सुद्धां करूं लागतात. त्याप्रमाणें किल्ल्यावरील सामान्य केर काढणाऱ्या मनुष्याकडून तोतया म्हणून जर यांची कुचेष्टा होऊं लागली तर त्या मनुष्याच्या अंतःकरणाची काय स्थिति होईल? ज्या माणसांची ज्या पुरुषापुढें हात जोडून उभें राहण्याचीही लायकी नाहीं त्या माणसांनीं जर त्यांची हलक्या शब्दांनीं निर्भत्सना केली तर त्या वेळीं आधींच निरनिराळ्या दुःखद प्रसंगांनीं होरपळून गेलेल्या त्या पुरुषाच्या मनावर केवढा भयंकर आघात होईल ? अशा प्रसंगांनीं एकादा विरागी पुरुषही वेडा होईल, मग भाऊसाहेबांसारख्या संसारिक मनुष्याला बुद्धिभ्रम होऊन कांहीं गत गोष्टींचें विस्मरण पडलें असलें तर त्यांत नवल कोणतें ? शिवाय त्यांच्या डोक्यावर जर एकादा भयंकर वार होऊन त्यांच्या मेंदूला धक्का बसला असला तर त्यामुळेंही त्यांना विस्मरण होत असण्याचा संभव होता. या परिस्थितीचा पुरुषोत्तम दाजी यांनीं कोणत्याच प्रकारें विचार न करतां, आपला निर्णय चुटकीसरशीं प्रकट केला, त्याअर्थीं पार्वतीबाईविषयीं अगर भाऊसाहेबाविषयीं त्याच्या अंतःकरणांत जिव्हाळ्याचा कळवळा नव्हता हेंच खरें. ताराबाई शाहुमहाराजांना तोतया म्हणत होती त्याप्रमाणें तिचा जय होऊन जर शाहुमहाराजांना बंदिवासांत आयुष्य कंठावें लागलें असतें, तर त्यांची जी स्थिति झाली असती तीच खऱ्या सदाशिवरावभाऊंची अशा प्रसंगीं झाली होती यांत संदेह नाहीं.

३४. दौलताबादेच्या किल्ल्यावरून तोतया मिरजेच्या किल्ल्यावर आल्यानंतर तो आपल्या मुलखांत आला म्हणून पार्वतीबाई, अनुबाई यांना या वेळीं आपण खटपट केल्यास त्याची बंधमुक्तता होईल अशी आशा वाटूं लागली.

त्याप्रमाणें अनुबाई यांचें मिरजेच्या किल्ल्यावर दळणवळणही चालू झालें. पटवर्धन हे पहिल्यापासून इचलकरंजीकरांचे उपाध्ये व त्यांच्याच आश्रयानें ते पुढें आलेले, अर्थात् पटवर्धनांवर त्यांचें वजन होतें. परंतु कारभाऱ्यांनीं तोतयाला पटवर्धनांच्या ताब्यांत दिल्यामुळें त्यांच्यावर त्याची जबाबदारी होती. पांडुरंगराव पटवर्धन यांना असें वाटूं लागलें कीं याउपर येथें तोतयाला ठेवणें ह्मणजे केव्हां किल्ला फितुर होईल हें सांगतां येणार नाहीं. म्हणून त्यांनीं मिरजेच्या किल्ल्यांतून दुसऱ्या किल्ल्यावर त्याची रवानगी करावी, असा पुरंदरच्या कारभारी लोकांना तगादा लाविला. प्रत्यक्ष परशुरामभाऊ पटवर्धन यांची आईही तोतयाला खरे सदाशिवरावभाऊ ह्मणून म्हणणारी होती. त्याचप्रमाणें हरबाणाचे चिरंजीव भास्करपंत पटवर्धन हेही त्यांना खरे म्हणणारेच होते. त्यामुळें पांडुरंगराव यांस भीति उत्पन्न झाली व ही तोतयाची ब्याद दुसऱ्या किल्ल्यावर जाऊन आपण कारभाऱ्यांच्या जबाबदारींतून केव्हां मुक्त होतों असें त्यांना झालें.

३५. अलीकडे वर्ष सहा महिन्यांपासून पार्वतीबाईंची प्रकृती पुरंदरकिल्ल्यावरील थंड हवा, काळजी आणि यातायात यामुळें बिघडून त्यांना क्षयाचा विकार जडला होता. त्यामुळें त्या पुरंदराहून पुण्यास वाड्यांत राहण्याकरतां आल्या. या क्षयाच्या दुखण्यांतून त्या आतां फार दिवस वांचत नाहींत असे जवळ जवळ ठरल्यासारखें झाले होतें. अशा स्थितींत तोतयास पटवर्धनाच्या तगाद्यामुळें कारभारी मिरजेच्या किल्ल्यांतून बाहेर काढणार व त्याला दुसऱ्या किल्ल्यावर पाठविणार हें वर्तमान तिला समजलें. तेव्हां पुण्याहून त्या पुरंदरास पुरुषोत्तम दाजी यांना निकडीचे निरोप पाठवूं लागल्या. त्या बाबतींत ऐतिहासिक लेख संग्रहामध्यें नं. १५२०, १५२१, १५२२ आणि १५२३ अशीं चार पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. तीं महत्वाचीं असलेनें येथें जशीच्या तशी व अनुक्रमानें दिलीं आहेत.

## पत्र १ लें.

नं. १५२० आश्विन शु. ६ तारीख ३० माहे सप्टेंबर सन १७७५ इसवी.

पुरुषोत्तमराव दाजींचें पुरंदराहून मिरजेस पांडुरंगराव पटवर्धन यांस पाठविलेलें पत्र. ४ साबान घटका रात्र अवशीची.

" घटका दिवस असतां पुण्याहून नागोराम आले. श्रीमंत सौ॥ पार्वती-बाई यांचा निरोप आला, आपणांस लिहिणें म्हणून; त्याजवरून हें पत्र हेच वेळेस लिहिलें आहे. त्यांचें मानस 'तीन चार दिवस मजवर दृष्ट देऊन ठेवणें. परंतु रवाना न करणें. आपली वाट जाहली पाहिजे जाव-याची परलोकांस' यास्तव त्यांचें मानस 'आपणांस पत्र लिहिणें' त्यावरून लिहिलें. त्यांनीं सांगितलें त्याजवरून लिहिलें आहे याचें उत्तर आपण समजून लिहावें. त्यांनीं इतकें सांगून पाठविलें आहे. यास्तव लिहिणें तें त्यांस कडुपण न वाटे असें लिहिणें. तोतयास चार दिवस ठेऊन द्यावें यांत उत्तम आहे. यांस कांहींच लिहूं नये आपण ठेवतों असें लिहिलें म्हणजे श्रीमंत नानाजवळ उत्तर करून आपणास पत्र पाठवीन. हें पत्र मी कांही लटकाच प्रकार चित्तांत चवघे सांगतात त्यावरून लिहिलें नाहीं. त्यांचा निरोप आला म्हणून लिहिलें. तीर्थरूप कैलासवासी यांच्या पायाची शपथ असे. अन्यथा लिहिलें नाहीं. त्यांचे निरोपावरून लिहिलें आहे. अन्यत्र पाठविण्यास बाहेर काढिला असला तरी ठेवणें."

## पत्र २ रें.

नं. १५२१ आश्विन वद्य. आक्टोबर महिन्यांतील दुसरा आठवडा.

मिरजेहून पांडुरंगरावाचें परशुरामभाऊ पटवर्धन यास पत्र.

" तोतयाचा मजकूर राजश्री गोविंदपंत अभ्यंकर यांणीं सविस्तर सांगितल्या-वरून कळला. त्याजवरून अन्यत्र स्थलास पाठविण्याविशीं राजश्री नानांस लिहिलें आहे. बन्यांची मुले माणसें सुवर्णदुर्गास पाठविण्याचीं पत्रें पेशजी पाठविली असतां लावून दिलीं नाहींत. तरी तोतया व बन्यांची माणसें लावून द्यावीं म्हणून लिहिलें, ऐशास तोतयाविशीं आपण पुरंदरांस लिहिलें व आम्हींही दर पत्रीं पुरंदरास लिहितच गेलों. त्यावरून तोतयाची रवानगी रत्नागिरीस केली. वडिलांस कळावें. बन्यांची मुलें

माणसें लावून द्यावीं. त्यास त्याचा मूल होता तो देवी येऊन मृत्यु पावला. दोघी बायका आहेत त्यांस नेऊं लागल्यास बहुतच श्रमी होऊन फारच कष्टू लागल्या. यास्तव रवानगी न केली. तोतया लावून दिल्यावर दोनचार पत्रें दाजींचीं आलीं कीं, लावून न द्यावा. ठेवून घ्यावा. श्रीमंत सौभाग्यवती पार्वतीबाईनीं सांगितलें आहे. परंतु गेला. मग काय करावें ? आह्मीं चौकशी करण्याची हद्द केली. आमचे जातीचाच नव्हे. तथापि सर्वत्रांस भ्रम आहे. थोर आहेत. आमची निशा पुर्ती झाली. कोणाचे तोंडास हात लावितां येत नाहीं. हरप्रकारें बोलतात. भेटीअंतीं सर्व कळेल."

## पत्र ३ रें.

नं. १५२२ कार्तिक शु. ५ तारीख २९ आक्टोबर सन १७७५ इ.
पुरुषोत्तम दाजी यांचें पुरंदराहून मिरजेस पांडुरंगराव यास पत्र ४ रमजानचें.

"काल आपणास पत्र पाठविलें आहे. त्यास त्या गृहस्थाची रवानगी न करावी. मजला पत्र त्यास हगवण लागली आहे ह्मणून लिहावें. आज रामचंद्रभट वैद्य आले त्यांजबरोबर आपणांस लिहिणें ह्मणोन निरोप आला. त्या गृहस्थाची तयारी केली असेल तरी ठेवावें. मागाहून सविस्तर लिहितो. पुण्यास मजला बोलाविलें आहे. जाऊन आल्यावर विस्तारें लिहितों."

## पत्र ४ थें

नं. १५२३ कार्तिक शु. १२ तारीख ४ नवंबर सन १७७५ इ.
पुरुषोत्तम दाजी यांचें पुरंदराहून मिरजेस पांडुरंगराव यास पत्र १९ रमजानचें.

"शुद्ध नवमीस पुण्यास श्रीमंत सौ।। मातुश्रीबाईनीं बोलाविले होतें. बैरागीपणाचीं सोंगें घेऊन हिंडतात. त्यांतून एक ब्राह्मण आला. त्याची माझी भेट झाली. त्याची रवानगी आपणाकडे करून देतों. तट्टू, दोन माणसेंसह रवानगी करितों. त्याची भेट आठ दिवस दोघांचीच खोलींत होय असें करावें. तिसरा कोणी कारकून अथवा माणूस न बसवावा.

याप्रमाणें त्यांनीं सांगितलेंवरून लिहिलें आहे. स्थापना चार दिवस करावी. श्रीमंत नाना पुण्यास गेले आहेत. कपी तेथेंच आहेत."

या चार पत्रांपैकीं पहिलें, तिसरें व चवथें हीं तीन पत्रें पुरुषोत्तम दाजी यांनीं पुरंदराहून मिरजेला पांडुरंगराव यांना लिहिलीं आहेत. या वेळीं मिरज किल्ल्याची सर्व जबाबदारी पांडुरंगराव यांच्यावर होती. पटवर्धनांचीं मुलेंमाणसें, त्यांची सर्व चीजवस्त मिरज किल्ल्यावर होती. पांडुरंगरावांना तोतया तेथें असल्यामुळें केव्हां फितुरी होईल याचा नेम नाहीं, अशी धास्ती उत्पन्न झाली व ह्मणूनच तेथून तोतयाला त्वरित काढण्याबद्दल कारभाऱ्यांशीं त्यांचा पत्रव्यवहार सुरू झाला. पांडुरंगरावांनीं जर तोतया तेथें ठेऊन घेतला असतां तर कारभाऱ्यांची त्याला कोणतीच हरकत नव्हती. एवढ्याचकरतां पार्वतीबाईनीं पुरुषोत्तम दाजी आपल्या वतीचे आहेत अशा विश्वासानें त्याचा वशिला पांडुरंगराव यांना लावण्याचा प्रयत्न केला. पार्वतीबाईचें काम आपण मोठ्या कळकळीनें करतों असें पुरुषोत्तम दाजी पार्वतीबाईना भासवीतच होते. दाजींच्या अंतःकरणांत पार्वतीबाईबद्दल अंशतः तरी कळकळ होती किंवा नाहीं, अगर ते तिला निव्वळ थापा देऊन फसवीत होते, हें रहस्य या पत्रावरून समजण्या-सारखें आहे. ह्मणून त्याचा उलगडा येथें करणें जरूर आहे.

३७. नं. १५२१ चें पत्र २ रें हें पांडुरंगरावांनीं परशुरामभाऊंना लिहिलें आहे. हें आश्विन वद्यांत ह्मणजे आक्टोबरच्या दुसऱ्या पंधरवड्यांत लिहिलें आहे. या पत्रांत ते लिहितात "तोतया लावून दिल्यावर दोनचार पत्रें दाजींचीं आलीं कीं, लावून न द्यावा. ठेवून घ्यावा. श्रीमंत सौभाग्यवती पार्वती-बाईनीं सांगितलें आहे. परंतु गेला. मग काय करावें?" अर्थात् पुरुषो-त्तम दाजींनीं जीं पत्रें पाठविलीं तीं तोतयाची रवानगी झाल्यानंतर पाठविलीं, हें वरील मजकुरावरून दिसून येईल. शिवाय या पत्रांप्रमाणेंच आक्टोबरच्या दुसऱ्या पंधरवड्याच्या अगोदर दाजींचीं दोनचार पत्रें पांडुरंगरावांना पोंचलीं होतीं. त्यांपैकींच दाजींनीं तारीख १० सप्टेंबरचें

पाठविलेलें हें एक पत्र आहे. यावरून ता. ३० सप्टेंबरच्या अगोदर तोतयाची रवानगी रत्नागिरीस झाली होती हें निश्चित ठरतें. खरे-शास्त्रयांनीं आपल्या अधिकारयोग या पुस्तकांत[1] इ. स. १७७५ च्या आगष्ट महिन्यांत तोतयाची मिरजेहून रत्नागिरीला रवानगी केली असें लिहिलें आहे. वरील ता. ३० सप्टेंबरचें पत्र पाहतां त्याच्या अगोदर ह्मणजे. आगष्ट महिन्याच्या शेवटीं शेवटीं त्याला पाठविलें असावें असें दिसतें. यावरून शास्त्रीबुवांचें वरील विधान बरोबर दिसतें. कारण तारीख ३० सप्टेंबरचें पत्र हें पहिलें आहे किंवा चवथें आहे हें समजण्याला मार्ग नाहीं. तें जर चवथें असेल तर त्या पूर्वीचीं तीन पत्रें सप्टेंबर महिन्याच्या सुरवातीपासून सुरू केलीं असण्याचा संभव आहे. एकंदरींत आगष्ट महिन्यांत तोतया रत्नागिरीला पाठविला ही गोष्ट शास्त्रीबुवांच्या वरील विधानावरून खरी मानण्यास हरकत नाहीं. अशी परिस्थिति असतां पुरुषोत्तम दाजी हे नवंबरच्या चार तारखेपर्यंत पांडुरंगरावांना तोतयाची रवानगी करूं नये, त्याला ठेऊन घ्यावा, अशीं पत्रें लिहितात यांतील गूढार्थ काय असावा ?

३८. बरें, आक्टोबर महिन्याच्या दुसऱ्या पंधरवड्यापर्यंत दाजींचीं दोन-चार पत्रें पांडुरंगराव यांना गेलीं व त्यानंतर तारीख २९ आक्टोबरचें व तारीख ४ नवबरचें अशीं दोन पत्रें गेलीं. परंतु त्या पत्रांत पांडुरगरावांचें उत्तर येऊन पोंचल्याबद्दल किंवा पांच पत्रें पाठविलीं त्याचा कांहींच जबाब नाहीं, अशी तक्रार एकाही पत्रांत दाजींनीं केल्याबद्दल उल्लेख नाहीं. तेव्हां त्यांतील गूढार्थ महत्वाचा होता हें स्पष्ट दिसतें. पांच सहा पत्रें पाठ-विलीं तरी त्याचा जबाब नाहीं, यावरून दाजी हे पांडुरंगराव यांच्या दृष्टीनें तावडतोब उत्तरें पाठविण्याच्या लायकीचे पुरुष नव्हते, अशी कोणी शंका घेतल्यास ती अगदीं चुकीची ठरेल. दाजी यांनींच परशुरामभाऊ व पांडुरंगराव यांचा सांभाळ करून त्यांना योग्यतेला आणलें होतें. हे दोघे

[1] पान ४२.

दाजींना वडिलांच्या ठिकाणी मानीत होते. शिवाय पटवर्धनांच्या तर्फे किंवा त्यांच्या वशिल्याचीं जीं कामें पुरंदरीं होत, तीं सारीं दाजींच्या वाशिल्यानेंच होत होतीं. नाना व सखारामबापू हे कारभारी दाजींना आपल्या सल्ल्यांत घेऊन काम करीत. दाजींचें गंगाबाईवरही चांगलें वजन होतें. पेशव्यांच्या गादीचे मालक—कीं ज्यांच्या जिवावर बारभाईचीं कारस्थानें व त्यांच्या इच्छा फलद्रूप होणार होत्या, ते सवाईमाधवराव—कारभाऱ्यांचा प्रत्यक्ष प्राण—दाजींच्या ताब्यात होते. असा दाजींचा अधिकार असतां त्यांना पांडुरंगराव तावडतोब पत्राचीं उत्तरें पाठविणार नाहींत हें खरें ठरत नाहीं. तेव्हां आगष्ट महिन्यांत मिरजेस घडलेली गोष्ट नवंबर महिन्याच्या ४ तारखेपर्यंत दाजींना माहीत नसणें हें निव्वळ खोटें व अशक्य आहे.

३९. तोतयाला मिरजेहून काढून दुसऱ्या ठिकाणीं पाठविण्याबद्दल प्रत्येक पत्रांत पांडुरंगराव नानांना तसदी लावतात, परशुरामभाऊही तसेंच नानांना लिहितात. अशी परिस्थिति असतां, पुरुषोत्तम दाजींचा सल्ला घेतल्याशिवाय तोतयाची रवानगी मिरजेहून म्हणजे पटवर्धनांच्या बालीकोट किल्ल्यांतून होणें शक्य नव्हतें. रत्नागिरीस तोतयाची रवानगी करण्याचा नानांचा हुकूम दाजींच्या सल्ल्यानेंच झाला यांत संशय नाहीं. यासंबंधीं हरिवंशाच्या बखरींत स्पष्ट उल्लेख आहे. ' पांडुरंगरावतात्या यांनीं वरचेवर दाजींस पत्रें पाठविलीं जे, तोतया तेथून काढून आणखी कोठे ठेवावा. येथील मंडळी त्याजकडे येतात संचरतात. सरकारी एकादा पेंच येईल. असें लिहिलेवर दाजींनीं सरकारात विनंति करून कोंकणांत रत्नागिरीस किल्ला आहे तेथें पाठविला.'[1] यावरून दाजींना तोतया रत्नागिरीस पोंचल्याचें पूर्णपणें ठाऊक होतें हें स्पष्ट आहे. या सूर्यप्रकाशाइतक्या स्पष्ट गोष्टीवरून दाजींची भूमिका बारभाईंच्या कारस्थानांत कोणती होती हें लक्षांत येईल. तसेंच दाजींनीं जीं पांडुरंगराव यांना पत्रें लिहिलीं तीं तोतया रत्नागिरीला पोंचल्याचें त्यांना पूर्ण समजल्यानंतरच लिहिलीं

---

१. पान ८१.

होतीं, हेंही स्पष्टपणें दिसून येईल. हीं पत्रें पाठविण्यांत पार्वतीबाईंना आपण त्यांच्या पक्षाचे व त्यांच्या कळकळीचे आहोंत हें दाखविण्याचा त्यांचा हेतू असावा. सूक्ष्मदृष्टीनें इतिहासाचें अवलोकन केलें असतां, दार्जी हे नाना व बापू यांच्याबरोबर एकजीव झाले होते असें दिसून येतें. राजकीय कुटुंबांतील माणसांबरोबर गोड गोड वागून किंवा बोलून, आपण त्यांच्या पक्षाचे व त्यांचे हितकर्ते आहोंत असें दाखवावयाचें, व त्यांच्या पोटांतील मतलब काढून घेऊन तो नाना व बापू यांना सांगावयाचा, हा हेराचा धंदा दाजी करीत होते. नाना व बापू दाजींचा मान उगाच ठेवीत नव्हते ! पार्वती-बाई ही पतीच्या दर्शनाकरतां व इहलोकची यात्रा सफल करून घेण्याचा मार्गांत तळमळत असतां, दाजी हे कपटाचे खेळ खेळत असतील याची तिला काय कल्पना येणार ! बिचारी भोळी भाबडी प्रसंगांत सांपड-लेली शीलसंपन्न अबला ! ती दाजींना पत्रें लिहा म्हणून सांगत होती व दाजी पत्रें लिहित होते. पण दाजींच्या मनाला, आपण एका सत्वशील राजस्त्रीला फसवीत आहोंत, याचें कांहींच कसें वाटलें नसेल ? जरी तसें कांहीं वाटलें असलें तरी आपण पेशव्यांच्या गादीचे चालक जे नाना फडनविस, त्यांची एकनिष्ठपणें सेवा करीत आहोंत, या भावनेच्या जोरावर त्यांनीं आपल्या या निंद्य वर्तनाची क्षीति मुळींच बाळगली नाहीं असें दिसतें.

४०. वरील पत्रांवरून पार्वतीबाईच्या मनाची स्थिति मात्र पूर्ण समजण्या-सारखी आहे. या वेळीं भाऊसाहेब नाहींसे होऊन पंधरा वर्षे झालीं होतीं. हीं वर्षें ज्यांच्या सहवासांत त्यांचीं गेलीं तीं सर्व माणसें यांना खरे वाटत असलेल्या सदाशिवरावभाऊंना तोतया म्हणणारीं होतीं. शिवाय याच वेळीं जरी त्यांची क्षयाच्या रोगानें प्रकृति अस्वस्थ झाली होती, तरी पार्वतीबाई पुण्याहून नागोराम, रामचंद्रभट्ट वगैरे मंडळींना पुरंदरावर पाठवून दाजींच्या मागें सारखें टुमणें लावीत होत्या, यावरून त्यांच्या मनाची कशी तळमळ चालली होती, याची कल्पना येते. शिवाय बैराग्याचीं सोंगें घेऊन हिंडतात, त्यांतून एका ब्राह्मणाला त्या मिरजेस पाठविणार होत्या. त्या इसमास आठ

दिवस तोतयाच्या सहवासांत ठेवणेबद्दल व दुसरा कारकून किंवा इतर कोणीही मनुष्य त्या ठिकाणीं न जाणेबद्दल ज्याअर्थीं पार्वतीबाई सांगत होत्या, त्याअर्थीं तो ब्राह्मण गोसावी पार्वतीबाईचा एक जबरदस्त पुरावा होता, असें मानण्यास हरकत नाहीं. ती या पुराव्यावरच आपल्या आयुष्याचा सोक्षमोक्ष करून घेणार होती. पुरुषोत्तम दाजींच्या नं. ४ च्या पत्राप्रमाणें तो बैरागी ब्राह्मण त्यांना भेटला होता. तो एक तट्टू व दोन माणसें घेऊन मिरजेस जाण्यास तयार होता. त्याचा प्रवासखर्च पेशव्यांच्या तिजोरीवर न पडतां पार्वतीबाई स्वतः करण्यास तयार होती. अशा स्थितींत तोतया रत्नागिरीस गेला असला तरी त्याची भेट करून देऊन, पार्वतीबाईंनीं सांगितल्याप्रमाणें त्याचेकडून तोतयाची परीक्षा कां करविली नाहीं ? त्या बैरागी ब्राह्मणाची व तोतयाची गांठ घालून दिल्यामुळें कोणताही अनर्थ ओढविण्याची धास्ती नव्हती. जेथें अनुबाई तोतयाला हे खरे भाऊसाहेब आहेत असें सांगत असतां माधवराव पेशव्यांनीं त्यांना कैदेंत टाकलें, तेथें जरी या बैरागी ब्राह्मणानें ते खरे भाऊसाहेब आहेत असें ह्मटलें असतें, तरी तेवढ्यावरच कैदेंतून मोकळें होऊन भाऊसाहेबांनीं बंड करणें शक्य नव्हतें. मग एवढ्या थोर बाईची शेवटची इच्छा मान्य न करण्यासारखें त्यांत कोणतें गूढ रहस्य होतें ? पण 'जो खातो त्याला खवखवतें' या ह्मणीप्रमाणें कारभाऱ्यांना होत होतें, असेंच यांतून अनुमान निघतें, हें उघड आहे.

४१. नाना फडनविस यांच्या हुकमाप्रमाणें मिरजेहून तोतयास रत्नागिरीला पाठविण्यांत आलें. मिरजेहून त्याला काढण्याचें कारण पांडुरंगराव यांनीं परशुरामभाऊ यांस लिहिलेल्या वरील दुसऱ्या पत्रांत स्पष्ट आहे. 'तथापि सर्वत्रांस भ्रम आहे' या एका वाक्यांत सर्व अर्थ आहे. पांडुरंगरावखेरीज करून सर्वत्रांना ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत असें वाटत होतें. आणि त्या ठिकाणीं जास्त दिवस ठेऊन घेतल्यामुळें जास्त शहानिशा होऊन जर ते खरे ठरते, तर मिरज किल्ला फितूर होऊन आपल्या सर्वस्वाचा नाश होईल, अशी धास्ती पांडुरंगराव व परशुरामभाऊ यांना वाटत होती. कारण

ते पूर्ण तऱ्हेनें कारभाऱ्यांच्या पक्षाचे होते. हा तोतया नसून हे खरे सदाशिवरावभाऊ आहेत असें ठरल्यास नाना फडनविस वगैरे बारभाईंची व त्यांना अनुकूल असलेल्या परिवाराची काय स्थिति होईल याचें चित्र नानांच्यापुढें होतेंच. तेव्हां अशा स्थितींत ज्या ठिकाणीं फितुरी होण्याचा अगदीं संभव नाहीं, अशा ठिकाणीं तोतयाची स्थापना करण्याइतके नाना शहाणे होते, यांत कोणाचा मतभेद होण्याचें कारण नाहीं. नानांना रत्नागिरी हें स्थळ त्या योग्यतेचें व त्यांच्या खात्रीचें असें वाटलें. ह्मणूनच त्यांनीं त्याची रवानगी तिकडे केली.

४२. रत्नागिरीचा किल्ला रामचंद्रपंत नाईक परांजपे यांच्या ताब्यांत होता. ते त्या प्रांताचे मामलेदार असून पटवर्धनाप्रमाणें तेही फौजबंद होते. दर्याकिनाऱ्यावरील आरमारावर त्यांची देखरेख होती. शिवाय ते पेशव्यांचे सावकार होते. एवढा त्यांचा दर्जा असून मुख्य गोष्ट ही होती कीं, ते नाना फडनविसांचे अर्ध्या वचनांत वागणारे व त्यांच्या पूर्ण विश्वासांतले होते. माधवराव पेशवे ज्या वेळीं आसन्नमरण झाले व आपण केलेल्या कर्जाचा बोजा आपल्या डोक्यावर असल्यामुळें तो फेडण्याची आपली इच्छा अतृप्त राहणार ह्मणून त्यांचे प्राण घुटमळूं लागले, त्या वेळीं 'नाना यांनीं रामचंद्र नाईक परांजपे यांस जवळ बोलावून सांगितलें कीं, "नाईक तुह्मीं सावकारांचे पंचवीस लक्षांचे हवाले घेऊन तुह्मीं आपले नांवाचे चिठ्ठे देऊन श्रीमंतांचे नांवाचीं खतें आहेत, तीं आणून श्रीमंतांपुढें ठेवावीं." असें नानांनीं सांगतांच, परांजपे यांनीं सर्व सावकार यांजकडे जाऊन, सरकारचे कर्जाचे हवाले घेऊन, आपल्या नांवाच्या चिठ्या देऊन, सरकारच्या नांवाचीं खतें होतीं तीं माघारीं आणलीं, आणि श्रीमंतांपुढें ठेविलीं. तीं खतें पाहून श्रीमंतांची मर्जी प्रसन्न[1] झाली.' हें रामचंद्रपंत नाईकांचें थोर कृत्य, पेशव्यांच्या गादीविषयीं त्यांची श्रद्धा, माधवराव पेशव्यांबद्दल त्यांच्या मनांतील आदर व नाना फडनविसांचा शब्द झेलून धरण्याची त्यांच्या मनाची उत्कंठा, यांचें द्योतक आहे. त्या वेळीं

१ पेशव्यांची बखर पान ८३.

माधवराव पेशव्यांनीं रामचंद्रपंतांवर कृपावंत होऊन त्यांना पालखीचीं वस्त्रें दिलीं. या गोष्टीला या वेळीं तीनच वर्षें लोटलीं असल्यामुळें व नानांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास व खात्री असल्यामुळें त्यांनीं तोतयास रत्नागिरीस पाठवून दिलें.

४३. 'रामचंद्र नाईक परांजपे ह्मणून पेशवाईंत एक मोठा सावकार होता. त्याचा पेशव्यांच्या घराण्याशीं व इतर बडे घराण्यांशीं कांहीं आप्तपणाचा निकट संबंधही होता.'[1] तोतया रत्नागिरीस आल्यानंतर तो त्यांच्याच ताब्यांत राहिला असल्यानें, अर्थात् त्यांच्याबरोबर त्याचा प्रत्यक्ष संबंध आला. रामचंद्र नाईक हे पेशव्यांचे निकट आप्तसंबंधीं असल्यामुळें सदाशिवरावभाऊंचा व त्यांचा बरेच वर्षांचा प्रत्यक्ष परिचय होता. वरचेवर गांठीभेटी होणें, एकमेकांच्या घराण्याबद्दल एकमेकांना आदरबुद्धि असणें, अनेक प्रसंगीं एके ठिकाणीं राहून परस्परांबद्दलच्या स्वभावाची पारख होणें, बोलण्याचालण्याचा दाट परिचय, आप्त घराण्याच्या चालीरीतींची माहिती, आप्त माणसांच्या ओळखी, त्यांच्यावर वेळोंवेळीं आलेले विविध प्रसंग, यामुळें रामचंद्र नाईक हे रत्नागिरीस पाठविलेला मनुष्य खरा भाऊसाहेब आहे किंवा तोतया आहे हें ओळखण्याला लायक व विश्वसनीय पुरुष होते. भाऊसाहेब हे पेशवाईचा कारभार पहात असल्यामुळें व रामचंद्र नाईक पेशव्यांचे सावकार असल्यामुळें पैशाची देवघेव अनेक प्रसंगीं त्यांच्यांत झालेली होती. शिवाय त्यांचा निकट आप्तसंबंध असल्यामुळें रामचंद्र नाईकांची पत्नी अन्नपूर्णाबाई यांचाही अनुबाईप्रमाणें त्यांच्याशीं दाट परिचय होता. या सर्व गोष्टी व आप्तांशीं आणि कळकळीच्या माणसांशीं प्रत्यक्ष संबंध रत्नागिरी किल्ल्यावर जमून आल्यानें त्या तोतयाची रामचंद्र नाईक व त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाई यांनीं मोठ्या चौकसपणानें सर्व बाजूंनीं चौकशी केली; व ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत अशी त्यांची खात्री झाली.

४४. ते खरे सदाशिवरावभाऊ असतां, गेलीं पंधरा वर्षें त्यांना तोतया ह्मणून कारागृहवास भोगावा लागला, व त्यामुळें एका थोर साध्वी स्त्रीला

---

१ अधिकारयोग पान ७४.

वियोगदुःखानें तडफडत पडावें लागलें. या सर्व गोष्टी अन्नपूर्णाबाईंच्या डोळ्यांपुढें येऊन उभ्या राहिल्या. त्यांना कारभाऱ्यांच्या या अन्यायी कारभाराची चीड आली. आपलें सर्वस्व गेलें तरी इतःपर असा अन्याय होऊं द्यावयाचा नाहीं, असा त्यांनीं संकल्प केला व त्याप्रमाणें त्यांनीं पुरंदरावर पुरुषोत्तम दाजी यांना पत्रें पाठविण्यास सुरवात केली पार्वतीबाईप्रमाणें अन्नपूर्णाबाईंसही पुरुषोत्तम दाजी हे आपल्या वशिल्याचे गृहस्थ पेशव्यांच्या कारभारीमंडळाच्या दरबारांत पुरंदरीं आहेत, असा विश्वास होता. ह्मणून त्या त्यांना पत्रें लिहित होत्या. 'रामचंद्र नाईक परांजपे याची स्त्री अन्नपूर्णाबाई हिचीं पत्रें मला येत कीं, तुह्मीं येथपर्यंत येऊन[1] जावें.' दौलताबादेच्या किल्ल्यावर हे दाजी तोतयाच्या परीक्षेला गेले होते व तेथून ते त्याला लबाड ठरवून आले होते. ही गोष्ट अन्नपूर्णाबाईंना माहीत असल्यामुळें त्यांचा संशय दूर करण्याकरता वरचेवर पत्रें लिहून त्या रत्नागिरीस त्यांना बोलावीत होत्या. परंतु दाजी रत्नागिरीस गेले नाहींत. अन्नपूर्णाबाईंचीं पत्रें त्यांनीं नाना फडनविस यांस दाखविलीं. नानांनींही त्यांना या महत्वाच्या बाबतींत रत्नागिरीस पाठविण्याची तसदी घेतली नाहीं. रामचंद्र नाईकांनीं त्या वेळीं तोतयास बंधमुक्त केले नव्हतें. तोतया म्हणून संशय मानणाऱ्या लोकांची ते खात्री करीत होते. पण अशा महत्वाच्या वेळी रत्नागिरीस जाण्याचें धैर्य दाजींनीं स्वतः दाखविलें नाहीं व नाना फडनविस यांनींही त्यांना पाठविण्याचें आपलें कारभाऱ्याचें कर्तव्य केलें नाहीं. ही अन्नपूर्णाबाईंची महत्वाचीं पत्रें नाना फडनविसांच्या समोर फाडण्यांत[2] आलीं, एवढाच त्यांच्या पत्रांतील विनंतीला कारभारी मंडळीनें मान दिला.

४५. पुरंदरास दाजींना ज्याप्रमाणें पत्रें गेलीं त्याचप्रमाणें सदाशिवरावभाऊंचे जे अगदीं निकट असे आप्त होते, त्यांनाही रामचंद्रपंतांनीं पत्रें पाठविलीं व रत्नागिरीस येण्याची त्यांना विनंति केली. त्या

---

१ हरिवंश बखर पान ८७ २. हरिवंश बखर पान ८७.

प्रमाणें पार्वतीबाईंचा सख्खा भाऊ रघुनाथराव कोल्हटकर, सवाईमाधवराव पेशवे यांची आई गंगाबाई यांचा सख्खा मामा नारोशंकर, अनुबाईंचा नातू व्यंकटराव इचलकरंजीकर, परशुरामभाऊ पटवर्धन यांचा चुलतभाऊ हरबाअण्णा ही सर्व आप्तमंडळी रत्नागिरीस येऊन दाखल झाली. राघोबादादांचा दत्तक मुलगा अमृतराव[1] हाही खुद्द येऊन मिळाला. हरिपंत फडके यांचा पुतण्या सुवर्णदुर्गास होता तोही आला. याप्रमाणें आप्तमंडळी सर्व रत्नागिरीस जमली. कारभाऱ्यांनीं तोतया ठरविलेल्या त्या पुरुषास ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत असें नानाप्रकारें ताऊन सुलाखून परीक्षा करून सर्वांनीं ठरविलें. त्यांची बेडी तोडली व तुरुंगांत पडून कर्मलोप झाल्याबद्दल ब्राह्मण बोलावून यथाविधि त्यांना प्रायश्चित्त दिलें. ही गोष्ट मार्चमध्यें सन १७७६ च्या सुरवातीस झाली. नंतर रामचंद्रपंतांनीं सर्वांच्या अनुमतीनें सदाशिवरावभाऊ पेशवे यांच्या नांवानें द्वाही फिरविली व त्यांच्या ताब्यांत रत्नागिरीचा किल्ला व सुभा दिला. त्यांच्या आज्ञेनें पुढील कारभार चालविण्याच्या आणाशपथा सर्वांनीं घेतल्या. या बाबतींत पुढील पत्रें महत्वाचीं आहेत, म्हणून दिलीं आहेत.

इतिहास संग्रह नं. १८३० मार्च सन १७७६ दुसरा आठवडा

पांडुरंगराव पटवर्धन यांचें पत्र (पै॥ छ १२ सफर सीत सबैन चैत्र मास)

'तोतयाच्या मजकुराचें पत्र बजाजीपंतांच्या तीर्थरूपांचें आलेलें तुम्हीं पाठविलें होतें. त्यावरून सविस्तर अर्थ कळलाच होता. रामचंद्र नाईकाकडील कारकून रत्नागिरीहून कालरोजीं रविवारीं लष्करांत आला. त्याच्या बोलण्यांत भाव कीं, तोतया खरा जाला ...... ... ची बिडी तोडली प्रायश्चित घेतलें, सर्व ब्राह्मण पंक्तीस जेऊं लागले. याउपर कांही बाकी राहिली नाहीं. बरें श्रीसत्ता प्रमाण! रामचंद्र नाईकावर पेंच भारी पडला. भाऊ तेथें प्रत्यक्ष असतां × × × × × पण केले. नवीन संकट जाहलें.

---

१ नातूकृत महादजी शिंदे यांचें चरित्र पान १२६.

घांट दोन तीन बंद केले. चार चारशें माणूस घाटीं पाठविलें. स्वारीही बाहेर निघते. आज्ञा श्रीमंतांची. श्रीमंतांचे रोखें असें जालें आहे. नाईकही लौकरच जाणार.

परशुरामभाऊ पटवर्धन यांची आई जानकीबाई या अनुबाईप्रमाणेंच ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत असें ह्मणणाऱ्या होत्या. खालील पत्र त्यांनीं परशुरामभाऊंस, ते कर्नाटकच्या मोहिमेवर असतांना पाठविलें आहे.

ऐ. ले. सं. नं. १८४८. ३ जून सन १७७६.

श्री

'श्रियासह चिरंजीव राजश्री भाऊ यांसी प्रती जानकीबाई आशीर्वाद उपरी. येथील क्षेम तागायत छ० १५ रबिलाखर. वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण मिरजकर सांडणीस्वार याजबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कळों आला. आमचें शरीरीं समाधान आहे. चिंता न करावी. तुह्मीं सत्वर यावयाचें करावें. वाटेनें नदीनाल्यांतून बहुत खबरदारीने यावें. चिरंजीव मुलांस देवी येऊन उत्तम प्रकारें आरोग्य झालें. चिंता न करावी. रामचंद्रभट उत्तुरकर देवाज्ञा पावले. चिरंजीव वयास ईश्वरें वाईट केलें. होणारास यत्न काय? चिरंजीव दाजी व बळवंतराव येथें आले होते. आह्मास भेटून गेले. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद. कोंकणात भाऊसाहेब खरे जाहले. कारभारी होय नव्हे करितील. त्यांत तुह्मीं सहसा न पडावे. सर्वांचे मते खरेच जाहले. तेथे जवळ दादंभट व बापूभट आपटे व शेंडे हरभट्ट याचे सर्व, रघुनाथ दिक्षीत मनोहर यांणीं खरे केले. विजयदुर्ग व रत्नागिरी त्यांजकडे जाहली. बराबर दहा हजार पायदळ आहे. प्रस्तुत राजापुरीं आहेत. देवरुखास छावणी होणार. पत्र आपण वाचून पहावें, दुसऱ्यास न दाखवावें. हे आशिर्वाद.'

४६. या परशुरामभाऊंच्या आईच्या पत्रावरून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होतो. पुरुषोत्तम दाजी व बळवंतराव पटवर्धन यांच्या भेटी झाल्या, त्यावेळीं त्यांचे

बरोबरही तोतयासंबंधी त्यांचा विचारविनिमय झाला असला पाहिजे, यांत शंका नाहीं. त्यानंतर हें पत्र त्यांनीं भाऊंना लिहिलें आहे. या पत्रावरून तोतयाची परीक्षा वेदशास्त्रसंपन्न भट्टवर्गाकडूनही झाली असें दिसून येतें. दादाभट, बापूभट आपटे, शेंडे हरभट्ट यांचे सर्व म्हणजे यांचे सर्व भट्ट ब्रह्मवृंद यांच्याकडूनही परीक्षा झाली. ही भट्टांची परीक्षा म्हणजे पूर्वी भाऊसाहेबांना पाहिलेल्या ओळखीवरून इतर आप्तइष्ट माणसांप्रमाणें झाली नसावी. त्यांत कांहीं विशेष हेतु होता. सदाशिवरावभाऊ हे ऋग्वेदी ब्राह्मण होते. त्या वेळीं ब्राम्हणांनीं जरी शस्त्र हातीं धरलें होतें तरी उपनयन होतांच त्यांना संध्या, रुद्र, पुरुषसूक्त, ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव, त्रिसुपर्ण, पुजा एवढें तरी आलेंच पाहिजे असा प्रबंध असे. भाऊसाहेब यांची आख्यायिका अशी होती कीं, ते पट्टीला बसून वेद म्हणणारे होते. अर्थात् वैदिक ब्राह्मणांनीं त्यांची परीक्षा करून व त्यांना कारस्थानी मंडळींनीं सुखनिधान म्हणून कनोजा ब्राम्हण ठरविला असतांही तो कनोजा नव्हे, ते खरे सदाशिवरावभाऊच आहेत असें छातीठोकपणें सांगून ते ज्याअर्थी त्यांच्या पंक्तिला जेऊं लागले त्याअर्थी त्या भट्ट मंडळींनीं त्यांची वेदपठणाची परीक्षा घेऊनच ते खरे असल्याचें जाहीर केलें यांत शंका नाहीं. शिवाय ज्या ब्राम्हणांनीं त्यांना खरें म्हटलें ते परशुरामभाऊंच्या आईच्या परिचयाचे व विश्वासाचे होते हें वरील पत्रावरूनच ठरतें. शिवाय त्या लिहितात ‘ कारभारी होय नव्हे करितील त्यांत तुम्हीं सहसा न पडावें. सर्वांचें मतें खरे जाहले ’ या वाक्यावरून असा स्पष्ट बोध होतो कीं, भाऊ हे सर्वस्वी कारभाऱ्यांच्या पक्षाचे आहेत असें जरी होतें, तरी या बाबतींत त्यांनीं त्यांच्या तंत्राप्रमाणें वागूं नये असा इषारा त्यांचे आईनें त्यांना दिला आहे. या पत्रांत शेवटीं दुसराही इषारा तिनें दिला आहे. ‘ पत्र आपण वाचून पहावें, दुसऱ्यास न दाखवावें ’ याचा अर्थही स्पष्ट आहे. कारभारी मंडळींचा या सरदारांवर एवढा धाक होता कीं त्यांना त्यांच्या विरुद्ध कांहींच करतां किंवा बोलतां येत नव्हतें. कारभाऱ्यांनीं पश्चिमेला सूर्य उगवला म्हटलें कीं, तें सरदारांनीं व लोकांनीं प्रमाण मानलें पाहिजे. त्यांनीं तसें न मानलें तर किल्याची अंधारकोठडी

किंवा मेखसूखालीं प्राणदान अशी त्यांची जरब होती. म्हणून त्यांच्या भीतीनें त्यांनीं तोतया म्हणून ठरविलेल्या इसमास खरे सदाशिवरावभाऊ म्हणून म्हणण्यास लोक भीत होते. परशुरामभाऊसाहेबांसारख्या फौजबंद पराक्रमी सरदाराला त्याच्या आईनें इषारा देण्याइतकी जर कारभाऱ्यांची दहशत होती, तर इतरांची काय कथा? खऱ्या सदाशिवरावभाऊंना कारभारी तोतया म्हणतात, अर्थात् ते तोतया आहेत असेंच त्यांच्या सरदारांनीं म्हटलें पाहिजे. तसें ते न ह्मणतील तर ते राजद्रोही, गुन्हेगार व बंडखोर होते, याच न्यायानें कारभाऱ्यांचा कारभार चालू होता. परंतु जे आप्त होते व ज्यांना हा अन्याय सहन होत नव्हता, तेवढेच धारिष्टानें पुढें आले व आपलें शीर तळहातावर घेऊन सदाशिवरावभाऊंना येऊन मिळाले व ते कारभाऱ्यांच्या कारस्थानाविरुद्ध त्यांना खरे सदाशिवरावभाऊ असें म्हणूं लागले. एकंदरींत या पत्रावरून सर्वांच्या विचारानें व परीक्षेनें सदाशिवरावभाऊ खरे ठरले होते असें स्पष्ट दिसतें.

४७. सदाशिवरावभाऊ यांच्या नांवाची द्वाही फिरल्याची हकीकत मुंबई सरकारास समजल्यानंतर त्यांनीं आपलीं माणसें रत्नागिरीस पाठवून त्यांची चौकशी केली. चौकशीअंतीं ते खरे सदाशिवरावभाऊ असल्याची त्यांची खात्री झाल्यामुळें त्यांनीं रत्नागिरीस आपल्या वकील पाठवून सदाशिवरावभाऊंचा मोठा सन्मान[1] केला. अशा प्रकारें मुंबई सरकारच्या परीक्षेनेंही ते खरे ठरले.

४८. सर्वसाधारण असा नियम आहे कीं, जी वस्तु अस्सल किंवा खरी असते ती सकृत्-दर्शनीं जरी बनावट किंवा खोटी वाटली तरी ती जसजशी कसोटीला लागत जाईल अगर तिची जितके वेळां जास्त परीक्षा होत राहील, तितकी ती जास्त जास्तच खरी ठरूं लागते. सदाशिवरावभाऊ यांची अशीच स्थिति झाली. त्यांना तोतया तोतया ह्मणतां ह्मणतां, त्यांची जसजशी जास्त परीक्षा होऊं लागली, तसतसे ते प्रत्येक परीक्षेंत जास्त खरे ठरूं लागले. ते

---

१. मराठ्यांची बखर पान २५५.

रत्नागिरीच्या परीक्षेंत शेवटीं सर्वांनुमतें खरे ठरले. ह्मणूनच त्यांच्या नांवाची द्वाही फिरविण्यांत आली. माधवराव पेशवे यांनीं सदाशिवरावभाऊंना इ. स. १७६५ मध्यें कनोजा ब्राह्मण ठरविलें होतें. तें त्यांनीं आपल्या कांहीं धोरणामुळें ठरविलें असलें पाहिजे. परंतु पुढें दहा वर्षांनीं तोच सुखलाल कनोजा ब्राह्मण सदाशिवरावभाऊंच्या सर्व आप्त, इष्टमित्र वगैरे लोकांकडून परीक्षा होऊन खरा सदाशिवरावभाऊ ठरतो यांतील रहस्य येथें पहाणें अवश्य आहे.

४९. भाऊसाहेबांच्या आप्त मंडळींपैकीं जीं माणसें ते खरे भाऊसाहेब आहेत ह्मणून त्यांच्या पक्षाला गेलीं, त्या माणसांचा तसें ह्मणण्यांत कांहीं व्यक्तिविषयक स्वार्थ अगर त्यांचें कांहीं गंभीर राजकारण होतें किंवा कसें? उलट-पक्षीं कारभारी व खुद्द माधवराव पेशवे त्यांना तोतया ह्मणत होते त्यांचा तसें ह्मणण्यांत कांहीं स्वार्थ अगर गूढ राजकारण होतें कीं काय हें ठरविण्याचे कामीं खालील मुद्दे निघतात.

१ तोतयाला खरे सदाशिवरावभाऊ ठरविण्यामध्यें त्यांच्या आप्त व इष्टमित्र मंडळींचा कांहीं वैयक्तिक, जातिविशिष्ट अगर राजकीय स्वार्थ होता किंवा काय?

२ माधवराव पेशवे व त्यांचे कारभारी यांनीं खऱ्या सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्यांत त्यांचा वैयक्तिक अगर राजकीय स्वार्थ होता किंवा काय?

३ निर्णय काय ठरतो.

वरील तीन मुद्दे खऱ्या खोट्याचा निवाडा करावयास या स्थळीं पुरे होतील.

## मुद्दा १ ला.

५०. (१) सदाशिवरावभाऊ यांची पत्नी पार्वतीबाई या त्यांना ते आपले पति असावे असें मानणाऱ्या होत्या. परंतु त्यांना प्रत्यक्ष पाहून खात्री करून घेतल्याशिवाय मात्र त्या आपलें तसें स्पष्ट मत देण्यास तयार नव्हत्या. माधव-राव पेशव्यांनीं अगर कारभारी मंडळींनीं या वेळपर्यंत तोतयाला त्यांच्या नजरे-खालीं घातलें नव्हतें. किंवा त्यांच्या विश्वासाच्या माणसांची अगर त्यांची प्रत्यक्ष

भेट घेऊं दिली नव्हती. जर तो खरोखर तोतया होता व पार्वतीबाई ही अजाण, अज्ञान स्त्री नव्हती, किंवा परपुरुषाला तिचें मुखावलोकन न होण्या-सारखी ती पडद्यांतील स्त्री नव्हती, तर माधवराव पेशव्यांनीं तोतयाला पार्वती-बाईच्या पुढें उभा करून सहज त्यांची भ्रांति दूर करतां आली असती. तोत-याला प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पहावें अशी पार्वतीबाईची सारखी धडपड चालली असतां माधवरावांनीं अगर कारभारी मंडळींनीं त्याला त्यांना दाखविण्याची तसदी घेतली नाहीं. उलट ते असें ह्मणत कीं तोतयाला पार्वतीबाईनें पाहिलें आणि तिनें तो तोतया आहे असें ह्मटलें तर ठीक. आणि जर कां ती गोंधळून हे सदाशिवरावभाऊच आहेत असें ह्मणाली, तर सर्वच गोंधळ माजेल. याकरतां तो तिला दाखविण्यांत आला नाहीं. तो तिच्या दृष्टीला पडूं द्यावयाचा नाहीं असाच कारभारी मंडळींचा संकल्प होता. भावार्थ एवढाच कीं पार्वतीबाईनें तोतयाला प्रत्यक्ष पाहिलें नव्हतें. तिला तिच्या जिव्हाळ्याच्या आप्त मंडळींनीं सांगितल्यावरून अगर कारभाऱ्यांच्या नजरेला न येईल अशा पत्रव्यवहारावरून अगर अगदीं खासगी अशा कांहीं गोष्टींची खूण पार्वतीबाईंना तोतयाकडून मिळाल्यावरून अगर त्यांच्या समोर तोतयाला आणावयाला कारभारी तयार नाहींत या कारणांवरून तिला तो तोतया नसून खरे सदाशिवरावभाऊ आहेत असें वाटत होतें. 'तो खोटा असेल असें पार्वतीबाईस मुळींच वाटत नव्हतें.'[1] आपल्या तारुण्याच्या भरांत पार्वतीबाई भलत्याच पुरुषाला आपला पति आहे असें ह्मणेल इतकी कामांध वृत्ति तिची झाली होती असेंही विरुद्ध पक्षाचे लोक तिच्यावर बिलकुल आरोप करीत नाहींत. उलट ती सत्वशील पवित्र आहे असेच त्यांचे तिच्याबद्दल उद्गार आहेत. शिवाय तिला राज्यतृष्णा होती असेंही तिजवर कोणाचे आजपर्यंत आरोप नाहींत. नाना, सखारामबापू आदि-करून कारभाऱ्यांशीं तिचा द्वेष अगर मत्सरही नव्हता. उलट ती कारभाऱ्यां-च्याच तंत्रानें व त्यांच्याच हुकमतींत वागत होती. एकंदरींत तोतयास खरे सदाशिवरावभाऊ ह्मणण्यांत तिचा कोणताही निंद्य स्वार्थ नव्हता हेंच खरें ठरतें.

---

१ ऐ. ले. संग्रह पान १९५०.

५१. (२) अनुबाई या सदाशिवरावभाऊंच्या सख्या आत्या. त्यांनीं भाऊंना लहानपणापासून कडे-खांद्यावर खेळविलें होतें. भाऊंची मुंज, त्यांचें लग्न त्यांच्या समोरच झालेलें होतें. त्यांचें सासर जरी इचलकरंजीला होतें, तरी लग्न झाल्यापासून अखेरपर्यंत त्यांचे पुण्याच्या त्यांच्या स्वतःच्या वाड्यांत राहणें बंद झालें नव्हतें. बाजीराव व चिमणाजीआप्पा निवर्तल्यानंतर नानासाहेब, सदाशिवरावभाऊ, रघुनाथराव यांना अगर यांच्या बायकामंडळींना, सल्ला मसलत घेण्याच्या बाबतींत जिव्हाळ्याचें, पोक्त, सुबुद्ध आणि वडील असें माणूस ह्मणजे अनुबाईच होत्या. त्या धर्मशील, कुलशील होत्या. त्यांचे पति मरण पावल्यानंतर पेशव्यांच्याच मदतीनें अनुबाईंनीं आपल्या संस्थानचा कारभार चालविला. अर्थात् भाऊसाहेब इ. स. १७६१ मध्यें पानिपतच्या लढाईला जाईतोंपर्यंत अनुबाईंचा व त्यांचा सहवास होता व लेंकराप्रमाणें त्यांच्यावर त्यांची मायाही होती. आईचें प्रेम मुलावर फार असतें. ह्मणून ती दुसऱ्या एकाद्या मुलाला आपलें मूल जसें ह्मणणार नाहीं, तसेंच अनुबाई या दुसऱ्याच एकाद्या इसमाला आपला भाचा ह्मणून संबोधणार नाहींत.

५२. तोतयाला सदाशिवरावभाऊ ठरवून घेऊन त्यांच्या हस्तें आपल्या संस्थानाकरतां त्यांना कांहीं सनदा घ्यावयाच्या होत्या असाही त्यांच्यावर आरोप नाहीं. किंवा तसें ठरवून घेण्यांत दुसरें कोणतें राजकारण त्यांना साधावयाचें होतें असेंही कोणीं म्हटलेलें नाहीं; तेव्हां त्या आपला कोणता तरी स्वार्थ साधण्याकरतां असें म्हणत होत्या असाही त्यांच्यावर आरोप करतां येत नाहीं. परंतु कांहीं इतिहासकार त्यांच्यावर 'साठी आणि बुद्धि नाठी' हा दोष लादूं पाहतात. माधवराव पेशव्यांनीं पहिल्यानें १७६५ मध्यें ज्या वेळीं चौकशी केली त्या वेळीं अनुबाईंचें वय ६० वर्षांचें होतें. त्यांनीं त्यावेळीं आपल्या वाड्यांत तोतयाला ठेऊन घेऊन त्याची सर्व बाजूंनीं परीक्षा करून व माधवरावांनीं तो तोतया आहे याचीं दर्शविलेलीं कारणें लक्षांत घेऊन आणि त्यावर विचार करूनच त्यांनीं तो तोतया नसून खरा भाऊ आहे असें सांगितलें. पुढें दहा वर्षांनीं म्हणजे इ. स. १७७६ मध्यें रत्नागिरीस

तोतयाचा खरा भाऊ ठरला या अवधीला दहा वर्षे झाली. अनुबाईंनीं दहा वर्षांपूर्वी सांगितलेली गोष्ट पुन्हां जास्त चोकशीनें खरी ठरते व अनुबाईंचेंही मत दहा वर्षांच्या मरजूर कालानें बदलत नाहीं, उलट तें जास्त पक्कें बनतें व सत्ताधारी कारभाऱ्यांविरुद्ध मत देऊन धनदौलतीवरही त्या लाथ मारण्यास तयार होतात, यावरून त्यांची बुद्धि भ्रमिष्ट झाली नव्हती, हें सिद्ध होतें. अर्थात् माधवरावांच्या चौकशीपेक्षा अनुबाई याची परीक्षा जास्त खरी होती. शिवाय दुसरी महत्वाची गोष्ट ही कीं, पेशव्याच्या बळावर व कृपेवर इचलकरंजी संस्थानची व्यवस्था सुरळीत चालत होती. माधवराव पेशव्यांच्या मनाविरुद्ध गोष्ट सांगून त्यांची अवकृपा झाल्यानें त्यांच्या संस्थानावरही संकट ओढवण्याचा संभव होता. पण याची जाणीव असण्याइतकी अनुबाई राजकारणकुशल असता, ज्याअर्थी त्यांनीं पेशव्याच्या विरुद्ध असलेला आपला प्रामाणिक अभिप्राय दिला, त्याअर्थी तो निःस्वार्थ बुद्धीचा होता, यात कोणतीच शंका घेण्याचें कारण राहत नाहीं. या दृष्टीनें अनुबाईंची चौकशी व परीक्षा सर्वांपेक्षां अव्वल दर्जाची ठरते.

५३. (२) दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे एक कनोजा ब्राम्हण खरे भाऊसाहेब ठरल्यामुळें त्याच्या हातीं राज्यकारभार येईल एवढाच संबंध येऊन भागण्यासारखें नव्हतें. तर तो पेशवेघराण्याचा पुरुष ठरून पार्वतीबाईसारखी धर्मशील व सत्वशील स्त्री त्याच्या बरोबर पत्नीत्वाच्या संबंधानें वागली असती. त्या वेळीं देशस्थ कोंकणस्थांचे विवाहसुद्धा सर्वमान्य व रूढ नव्हते. मग कनोजा ब्राह्मण व कोंकणस्थ ब्राह्मण यांच्या संबंधाचा प्रश्नच राहत नव्हता. त्या वेळीं पुनर्विवाह त्याज्य होता. अशा स्थितींत तोतया म्हटल्या जाणाऱ्या पुरुषाबद्दल थोडी जरी शंका अनुबाईंना वाटली असती, तरी त्यांनीं माधवरावांच्या विरुद्ध आपलें मत खास दिलें नसतें. पार्वतीबाईंच्या पातिव्रत्याविषयींचा अत्यंत नाजूक प्रश्न त्यांच्या पुढें होता. तेव्हां अशा स्थितींत चौकशीच्या कामी त्यांची केंसभर सुद्धां हयगय होणारी नव्हती व निर्णयांत तिळमात्र संशय राहण्याचें कारण नव्हतें. या सर्व गोष्टींचा त्यांनीं जबाबदारीनें विचार केला, म्हणूनच त्यांचा कोणताही

स्वार्थ तोतयाला तो खरा सदाशिवरावभाऊ आहे असें सांगण्यांत निगडित झालेला नव्हता, असें मुक्त कंठानें सांगतां येईल.

५४. (३) एक कनोजा ब्राम्हण खरे भाऊसाहेब ठरल्यामुळें त्यांचा मोठा स्वार्थ साधणार होता असा विरुद्ध बाजूचा कोणताच पुरावा पार्वतीबाईंचा सख्खा भाऊ रघुनाथराव कोल्हटकर यांच्यावर नाहीं. भाऊसाहेब हे त्यांचे मेहुणे. खऱ्या कनोजाला बनावट भाऊसाहेब बनविणें त्यांना नको होतें. त्यांना भाऊसाहेब खरे असले तरच ते पाहिजे होते. भाऊसाहेबांच्या हातीं कारभार आला असता तर कोल्हटकरांचा दर्जा वाढला असता, हा त्यांचा त्यांत जरी स्वार्थ होता तरी खोट्या भाऊसाहेबाचें बुजगावणें पुढें करून स्वतःच्या जातीचा, धर्माचा व स्वतःच्या बहिणीच्या पातिव्रत्याचा नाश करावयाला ते उद्युक्त होतील इतकी अधम व पातकी स्वभाववृत्ति त्यांची होती, असें दाखविणारा विरुद्ध पक्षाचा पुरावा नाहीं. पतीबरोबर पत्नीनें सती जाण्याचा तो काल होता. पतिप्रेमाकरतां बंधुप्रेम विसरून जाऊन आनंदानें सती जाते वेळीं बहिणीला भावानें कष्टानें निरोप द्यावा लागत होता. अशा उज्ज्वल धर्मभावनेनें प्रेरित असलेले त्यावेळचे भाऊ पूर्ण परीक्षा केल्याशिवाय व स्वतःची शंका निवारण केल्याशिवाय, एकाद्या त्रयस्थाला प्राण गेला तरी आपला मेहुणा ह्मणणार नाहींत. अर्थात् रघुनाथराव कोल्हटकर यांची परीक्षाही शंभर टक्के बरोबर होती यांत संशय नाहीं. ते खरे भाऊसाहेब होते म्हणूनच कारभारी लोकांच्या धाकाला न जुमानतां व आपल्या जिवाची अगर दौलतीची पर्वा न करतां रघुनाथराव सदाशिवरावभाऊंकडे गेले. यांत त्यांचा कोणताही निंद्य स्वार्थ साधण्याचा हेतु नव्हता, हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे.

५५. (४) नारायणराव पेशव्यांची पत्नी गंगाबाई यांचे मामा नारो शंकर, हे रत्नागिरीस सदाशिवरावभाऊंना जाऊन मिळाले. सदाशिवरावभाऊ यांनीं इ. स. १७६० मध्यें दिल्ली हस्तगत केल्यानंतर त्यांना राजेबहाद्दर हा किताब देऊन व त्यांच्या हाताखालीं पांच हजार फौज देऊन त्यांना दिल्लीच्या रक्षणाकरतां ठेविलें आणि ते स्वतः पानिपताकडे गेले. भाऊसाहेबांचा त्यांच्यावर

लोभ होता व त्यांचा पराक्रम ते जाणून होते. यामुळें नारो शंकर यांची भाऊसाहेबांच्या ठिकाणीं मोठी भक्ति व श्रद्धा होती. अधिकारारूढ कारभारी मंडळीबद्दल त्यांच्या मनांत द्वेष उत्पन्न झाला होता, म्हणून कारभाऱ्यांचा सूड घेण्याकरतां तोतयाच्या बंडाची संधि मिळावी या हेतूनें ते तोतयाच्या पक्षाला गेले, असा त्यांजवर कोणीही आरोप केलेला नाहीं. उलटपक्षीं आपली भाची कारभाऱ्यांच्या ताब्यांत आहे, तिला झालेला मुलगा सवाईमाधवराव यांच्या नांवानें कारभार चालू असून तेही कारभाऱ्यांच्या ताब्यांत आहेत, अशा स्थितींत नारो शंकर भाचीची अगर नातवाची पर्वा न करतां आणि कारभाऱ्यांच्या सर्वाधिकाराला न जुमानतां रत्नागिरीला गेले व भाऊसाहेबांचा पक्ष कारभारी लोकांच्या विशाल सामर्थ्याच्या मानानें अगदीं पंगू आहे अशी खात्री असूनही ते त्यांना मिळाले, ते कांहीं त्यांची पूर्ण परीक्षा केल्याशिवाय खास मिळाले नाहींत. नारो शंकर यांना स्वतःचें हिताहित समजत होतें. भाऊसाहेब हे निकटचे आप्त कीं गंगाबाई व सवाईमाधवराव निकटचे आप्त हें समजण्याइतकी त्यांना बुद्धि होती. त्यांचा दर्जा ते जाणत होते. अशा स्थितींत निकट आप्ताचा प्रबळ पक्ष सोडून, कोणता शहाणा मनुष्य जाणूनबुजून दूरच्या आप्ताच्या निर्बळ पक्षाला जाऊन मिळेल? स्वार्थी मनुष्य असें धोरण ठेवणार नाहीं. परंतु ज्या अर्थी नारो शंकर यांनीं स्वार्थाकरितां असें धोरण ठेवलें, त्या अर्थी कोणत्या तरी तत्वाकरतां अगर उघड होणारा अन्याय सहन न होऊन त्यांनीं हें धाडस केलें असेंच म्हणावें लागतें. थोर माणसें सत्याकरतां मरतात. वीर पुरुष सत्याकरतां आत्मयज्ञ करतात. नारो शंकर त्याचपैकीं एक गृहस्थ होते. तोतयास खरे भाऊसाहेब म्हणण्यांत त्यांचा कोणताच स्वार्थ नव्हता.

५६. (५) परशुरामभाऊ पटवर्धन यांची आई जानकीबाई यांचा पुरावाही अत्यंत महत्वाचा आहे. सदाशिवरावभाऊ व पटवर्धन मंडळी यांचें बरें नव्हतें, हें मागें आलेंच आहे. असें असतां या तोतयाच्या प्रकरणांत जानकीबाईंना पडण्याचें कारण नव्हतें. शिवाय परशुरामभाऊ हे हरिपंत

फडक्यांप्रमाणें फौज बंद सरदार व नानांच्या पूर्ण विश्वासांतले बारभाईंचे आधारस्तंभ होते, हें जानकीबाई जाणत होत्या. नाना फडनविसांच्या कृपेवर परशुरामभाऊंचा मोठेपणा अवलंबून होता. अर्थात् त्यांच्या अवकृपेवर त्यांचा नाशही होणार होता ही जाणीव जानकीबाईंना होती. असें असतां त्या आपल्या मुलाला बजावून लिहितात: 'कारभारी होय नव्हे करतील. त्यांत तुह्मीं सहसा न पडावें.' ह्मणजे या बाबतींत तुह्मी कारभाऱ्यांचें ऐकूं नये असा त्यांतून स्पष्ट अर्थ निघतो. 'सर्वांचे मतें खरेच जाहले' यांतही गर्भित अर्थ आहे. सर्वांच्या मतांमध्यें त्यांचें स्वत:चेंही मत आहे, हें त्यांनीं त्या पत्रांत दिग्दर्शित केलें आहे. यावरून जानकीबाईंनाही ते खरे सदाशिवरावभाऊ वाटत होते, व तसें वाटण्यांत त्यांचा कोणताच स्वार्थ दिसून येत नव्हता.

५७. (६) त्याचप्रमाणें नारो शंकरचा पुतण्या विश्वासराव यांनीं भाऊसाहेबांची सर्व बाजूंनीं चौकशी करून आपली खात्री झाल्यावर त्यांनीं त्यांस सहाय्य केलें. ग्वाल्हेरी, झांशी, भेलसें इत्यादि परगण्यांतील बहुतेक लोकांची भाऊसाहेबांबद्दल खात्री झाली, म्हणूनच त्यांनीं त्यांना सहाय्य दिलें. ग्वाल्हेरीहून जिवाजीपंत मुजुमदार व आबाजीपंत चिटणीस यांचीही खात्री होऊन त्यांनीं त्यांना मदत केली. समशेरबहादुराचा मेहुणा यानेंही नारायणराव पेशवे यांस पत्र लिहून ते भाऊसाहेब खरे असल्याबद्दल आपलें मत प्रकट केलें. त्याचप्रमाणें वेदमूर्ति धोंडभट्ट दात्ये, हरबाणा पटवर्धन, रामचंद्र गणेश कानडे, ठिकाठिकाणचे ब्रम्हवृंद या सर्वांनीं भाऊसाहेबांना ओळखून व त्यांची पूर्ण परीक्षा करून त्यांना खरे ठरविलें होतें. असें ठरविण्यांत त्यांचें कोणतेंही राजकारण अगर कोणताही स्वार्थ असल्याबद्दल कोणी ग्वाही देत नाहींत. उलट, पुण्याच्या पेशवेदरबाराकडून अन्याय होत आहे असेंच हे लोक प्रतिपादन करीत आहेत. म्हणून सदाशिवरावभाऊंना खरे म्हणण्यांत त्यांचा कोणताच स्वार्थ दिसून येत नाहीं.

५८. (७) रामचंद्र नाईक व त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाई यांच्यावर कांहीं इतिहासकार सावकार बच्चा पैशाच्या मोहाला व अधिकार मिळेल या आशेला

वळीं पडून त्यांनीं हें साहस केलें असा आरोप करतात. ज्यांना रामचंद्र नाईकांचा पूर्वेतिहास माहीत नाहीं, त्यांनीं पाहिजे तर तसें ह्मणावें. पण रामचंद्र नाईकांना एक वेळ स्वार्थी ठरविलें तर पूर्वीच्या बड्या बड्या मंडळीची काय वाट? रामचंद्र नाईकांच्या निःस्वार्थ बुद्धीचा उज्ज्वल पुरावा इ. स. १७६५ पासूनचा इतिहास हाच आहे. तो वाचला ह्मणजे रामचंद्र नाईकांना स्वार्थी ह्मणण्याची कोणाचीच छाती होणार नाहीं.

५९. या एकंदर पुराव्यावरून भाऊसाहेबांना खरे ह्मणण्यांत कोणाचाच स्वार्थ दिसून येत नाहीं व तसा दाखवितांही येणार नाहीं. अशा स्थितींत पेशव्यांच्या दरबाराविरुद्ध वरील लोकांनीं जें वर्तन केलें त्यांत त्यांचा रक्ताचा जिव्हाळा, अन्यायाचा तिटकारा, आणि सत्याची चाड यामुळेंच त्यांनीं तें साहस केलें असें ठरतें. यावरून तोतयास खरे सदाशिवरावभाऊ ठरविण्यामध्यें त्यांच्या आप्त व इष्टमित्र मंडळींचा कांहीं वैयक्तिक, जातिविशिष्ट अगर राजकीय स्वार्थ नव्हता असेंच ठरतें.

६०. मुद्दा नं. २—माधवराव पेशवे व त्याचे कारभारी यांनीं खऱ्या सदाशिवरावभाऊंना तोतया ठरविण्यांत त्यांचा वैयक्तिक अगर राजकीय स्वार्थ होता किंवा काय असा दुसरा मुद्दा आहे. या मुद्याचा विचार करण्याकरतां या वेळीं जी ठळक ठळक मुत्सद्दी मंडळी होती त्यांचें वैयक्तिक मत भाऊसाहेबांबद्दल कसें होतें, हें पहाणें जरूर आहे. ह्मणून त्या दृष्टीनें येथें विवेचन करणें योग्य होईल.

६१. (१) पेशव्यांची आई गोपिकाबाई ही जरी नाशकास राहत होती, तरी राजकारणांत तिच्याच तंत्रानें उलाढाली होत असत. तिचें व भाऊसाहेबांचें पूर्वीपासून बरें नव्हतें. त्या त्यांना नेहमीं पाण्यांत पहात. नानासाहेब पेशवे हे पुण्याच्या गादीवर बसल्यानंतर त्यांनीं बरेच दिवस भाऊंना साताऱ्याहून पुण्यास बोलाविलें नाहीं. ते साताऱ्यास शाहुमहाराजांच्या जवळ राहिले. आज उद्यां नानासाहेब भाऊंना पुण्याला बोलावतील ह्मणून शाहुमहाराज वाट पहात होते. परंतु त्यांचें लक्षण भाऊंना बोलावून घेण्याकडे

दिसेना, असें पाहून एकदां नानासाहेब साताऱ्यास भेटीला आले असतां शाहुमहाराजांनीं पुण्यास भाऊंना नेण्याचा प्रश्न काढला. तेव्हां निरुपायानें भाऊंना घेऊन ते पुण्यास आले. त्या[1] वेळीं नानासाहेबांची बायको गोपिकाबाई यांची मर्जी रुष्ट झाली. त्या नानासाहेबांस ह्मणाल्या 'असे भाऊबंद जवळ आणून आपले पोरास ठिकाण नाहीं असें करतील.' माधवराव पेशवे राजकारणांत आपल्या आईच्या तंत्रानें बरेच वागत. गोपिकाबाईंची मनोवृत्ति सदाशिवरावभाऊ यांच्याबद्दल कशी होती हें त्यांच्या तोंडच्या वरील वाक्यावरून दिसून येईल. गोपिकाबाईंना जवळचे भाऊबंद दुष्टाप्रमाणें वाटत होते. ह्मणून त्या त्यांना शक्य तेवढया दूर ठेवण्याचा मनापासून प्रयत्न करीत असत. गोपिकाबाईंचा असा स्वभाव असल्यामुळें नानासाहेबांनीं भाऊंच्या हातीं कोणताच अधिकार न देतां, केवळ पंक्तीला जेवावें व कचेरींत खर्डे घासावे अशा स्थितींत त्यांना ठेवलें. पुढें रामचंद्रबाबा शेणवी यांच्या शिक्षणानें आणि युक्तीनें ते राज्यकारभारांत शिरले हा प्रश्न निराळा. पण गोपिकाबाईंना स्वतःचे भाऊबंद जवळ नको होते, एवढी मात्र गोष्ट खरी. भाऊसाहेब राज्याकारभार पहात असतां त्यांच्यावर मारेकरी घालून त्यांचा खून करण्याचा मुजफरखान यानें जो प्रयत्न केला, त्या बाबतींत 'नानासाहेब पेशव्यांची[2] बायको गोपिकाबाई ही फार दुष्ट असून तिच्या मनांतून सदाशिवरावभाऊंविषयीं फार द्वेष होता; व नानासाहेबांनीं या प्रकरणीं सदाशिवराभाऊ यांच्यावर मारेकरी घालून त्यांचा खून करण्याचा प्रयत्न केल्याची चौकशी केली नाहीं. आणि ज्याअर्थी गोपिकाबाईंच्या मनांत भाऊ आपल्याजवळ असूं नये असें वाटत होतें, त्याअर्थी हा कलह त्याच बाईनें केला असावा, व भाऊसाहेबांवर त्यांनींच मारेकरी घातले असावे अशी लोकांना शंका येत होती.' यावरून गोपिकाबाईंच्या मनांत भाऊसाहेबांबद्दल किती द्वेष वसत होता हें दिसून येतें.

६२. माधवरावांना पेशव्यांचीं वस्त्रें मिळाल्यानंतर ते अल्पवयी असल्यामुळें त्यांचा कारभार राघोबादादा व त्यांचे दिवाण सखारामबापू हे पाहूं लागले.

---

१. पे. ब. पा. ४८. २. अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें वाकसकरकृत पान ८९.

पण ही गोष्ट गोपिकाबाई यांना आवडली नाहीं. राज्याचा सर्व कारभार आपणच आटोपून माझ्या मुलास हे दोघे भिकेस लावितील हें तिला भय होतें. म्हणून या दोघांनीं आपल्या कारभाराचे राजीनामे दिले व ते घरीं स्वस्थ बसले.[1] आपला सख्खा दीर राघोबादादा यांच्याविषयीं गोपिकाबाईंचें हें मत होतें, मग चुलत दीर जे भाऊसाहेब त्यांच्याविषयीं तें किती प्रतिकूल असेल हें सांगणें नकोच. त्याचप्रमाणें माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत मुंबईच्या गव्हर्नरांकडून कांहीं नजराणा माधवराव पेशव्यांना देण्याकरतां मॉस्टीनसाहेब मुंबईहून पुण्याला आले. माधवराव पेशव्यांना नजराणा दिल्यानंतर त्यांनीं ता. ६।१२।१७६७ रोजीं पुण्याहून गव्हर्नरसाहेबांना पत्र[2] लिहिलें. त्यांत असा मजकूर होता कीं, 'गोपिकाबाईंच्या चिथावणीवरून राघोबाला समक्ष भेटींत कैद करण्याचा माधवरावांचा विचार होता. पण सखारामबापूंच्या मध्यस्तीनें चुलत्या पुतण्यांचा तूर्तातूर्त तह ठरला.' गोपिकाबाईंच्या चिथावणीवरून माधवराव पेशवे आपल्या चुलत्याला समक्ष कैद करावयाला प्रवृत्त झाले, यावरून माधवरावांवर त्यांच्या आईचें केवढें वजन होतें, हें दिसून येतें. त्याचप्रमाणें गोपिकाबाईंच्या आवडीनिवडीवर पेशव्यांच्या राज्यकारभाराचीं सूत्रें हालत होतीं, हेंही राघोबादादा व सखारामबापू यांच्या कारभारीपणाच्या राजीनामे देण्यावरून सहज दिसून येतें. माधवराव पेशव्यांचा कारभार विशेषतः गोपिकाबाईंच्या तंत्रानें चालत होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

६३. राज्यकारभाराच्या दृष्टीनें काय किंवा स्वार्थाच्या दृष्टीनें काय, गोपिकाबाई व माधवराव पेशवे एकच होते. जो स्वार्थ गोपिकाबाईंचा तोच माधवरावांचा. जें हित गोपिकाबाईंचें तेंच माधवराव पेशव्यांचें. आपलें कुटुंब या दृष्टीनें गोपिकाबाई व त्यांचा मुलगा माधवराव पेशवे यांची अशी स्थिति होती. त्यामुळें सदाशिवरावभाऊ किंवा राघोबादादा हे त्यांना आपले हितशत्रू असें वाटत होतें. हैदरअल्लीवरील पहिली स्वारी करून राघोबादादा व माधवराव पुण्यास तारीख ८ जून सन १७६५ रोजीं आले. पुढें आठ दिवस झाले नाहींत तोंच

---

१. अधिकारयोग पा. ३. २. मराठे व इंग्रज पा. ४७.

चुलते पुतणे यांच्यामध्यें पुनः तंटा उपस्थित झाला. त्यांत राघोबादादांचें ह्मणणें असें होतें कीं, राज्यावर आपला व माधवरावांचा सारखा हक्क आहे. तेव्हां निम्में राज्य आपणांस द्यावें. माधवराव यांच्या मनांत राघोबादादांना कांहीच द्यावयाचें नव्हतें. सर्व राज्य आपलें आहे, दादांचा त्यांत कांहीं वांटा नाहीं, असें माधवराव यांचें मत होतें. हे घरगुती तंटे सुमारें सहा सात महिने चालले होते. राघोबादादांना कांहीं एक न देतां त्यांना कैद करावें असेंही माधवरावांचे प्रयत्न चालू होते. परंतु शेवटीं राघोबादादांनी वांटणीचा आग्रह सोडला म्हणून या वेळेपुरती तरी त्यांची कैद वांचली. हा तंटा जूनपासून डिसेंबर महिन्यापर्यंत झाला. या अवधींतच ह्मणजे आक्टोबर महिन्यांत भाऊसाहेबांस पुण्यास आणलें होतें. राघोबादादा राज्याचा निम्मा वांटा मागतात आणि सदाशिवरावभाऊ खरे ठरले तर तेही राज्याचा वांटा मागतील अशी परिस्थिति निर्माण झाली. अशा स्थितींत पर्वतीवर त्यांच्याबरोबर करारमदार करण्याची माधवरावांची इच्छा होती. परंतु ती भाऊसाहेबांनीं नाकबूल केल्यामुळें त्यांना तोतया ठरविण्याचें कारस्थान करावें लागलें. सख्या चुलत्याला जो वांटा देण्यास तयार नाहीं तो चुलत चुलत्याची काय डाळ शिजूं देणार ! अशा स्थितीत भाऊसाहेबांना तोतया ठरविण्यांत गोपिकाबाई व माधवराव यांचा भरभक्कम वैयक्तिक स्वार्थ होता.

६४. याशिवाय सदाशिवरावभाऊंबद्दल गोपिकाबाई व माधवराव यांच्या मनांत द्वेष व तेढ जास्त प्रमाणांत उत्पन्न व्हावयाला कारण म्हणजे पानिपतच्या लढाईत भाऊसाहेबांच्या मूर्खपणामुळें व उद्दामपणामुळे अपयश आलें असें त्यांना वाटत होतें. गोपिकाबाईंचा वडील मुलगा विश्वासराव हा भाऊसाहेबांच्या कृतीमुळें मारला गेला. नानासाहेब या लढाईतील अपयशानें व पुत्रशोकानें हाय खाऊन मरण पावले, महाराष्ट्रांतील कित्येक घराणी बुडालीं, खजिना मोकळा पडला, कर्जाचा बोजा बसला, राज्यव्यवस्था बिघडली. या सर्वांला सदाशिवरावभाऊ कारणीभूत झालें हें दुःख गोपिकाबाई व माधवराव यांना विसरतां येण्यासारखें नव्हतें. शिवाय राज्याची अशी वाईट स्थिति झाली असतां

माधवरावांनीं आपल्या शहाणपणानें त्याची घडी बसविली हें पाहून सदाशि-
वरावभाऊंनीं आतां प्रकट होऊन राज्यावर अगर कारभारावर आपला हक्क सांगणें ही गोष्ट गोपिकाबाई व माधवराव यांना पूर्णपणें अनिष्ट होती. तेव्हा आपल्या नाशाला कारणीभूत झालेला व पुढें राज्याचा हिस्सा मागणारा सदाशिवरावभाऊ गोपिकाबाई व माधवराव यांना हितशत्रू वाटावा हें मानवं स्वभावाला अनुसरूनच होतें. शाहुमहाराजांना तोतया म्हणण्यांत पूर्वी ताराबाईंचा हाच स्वार्थ होता. तसाच भाऊसाहेबांना तोतया ठरविण्यांत गोपिकाबाई व माधवराव यांचा पूर्ण स्वार्थ होता हें उघड आहे.

६५. आतां मुत्सद्यांविषयीं विचार करावयाचा म्हणजे त्यांच्यामध्यें नाना फडनविस, हरिपंत फडके, पटवर्धन मंडळी, वगैरे जी मंडळी होती ते चालू असलेल्या राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें विचार करणारी अशी होती. शिवाय चालू राज्याची घडी जोंपर्यंत बसलेली आहे तोंपर्यंतच राज्यकारभारांत सध्य असलेल्या मुत्सद्यांचें अस्तित्व टिकणार होतें हेही सर्व ते जाणून होते. माधवराव पेशवे गादीवर होते तोंपर्यंत त्याच्या विश्वासाचें मुत्सद्दी—कारभारी—मंडळ होतें. राघोबादादा कारभारात आले तर त्याचे निराळेंच मंडळ किंवा सदाशिवरावभाऊ आले तर त्याचेंही निराळें कारभारी मंडळ होणार यांत संदेह नव्हता. अर्थात् चालू राज्यकारभारांत कोणत्याही कारणानें फरक पडणें हें त्या मुत्सद्दी मंडळाला बाधक होतें, यांत कोणाचेंच दुमत होण्यासारखें नाहीं. अर्थात् त्या दृष्टीनें सदाशिवरावभाऊ खरे ठरणें म्हणजे ते कारभारांत येणे होय आणि ते कारभारात आले म्हणजे त्याचें कारभारीमंडळ निराळें होणें होय. अर्थात् सध्यांच्या मुत्सद्दी मंडळाचें अस्तित्व नष्ट होणें हें ठरल्याप्रमाणेंच होतें. यामुळें मुत्सद्दी मंडळींना सदाशिवरावभाऊ खरे किंवा खोटे ठरविण्यांत आपल्या स्वतःच्या अस्तित्वाचा पहिल्यानें विचार करणें भाग होतें. अनुबाईप्रमाणें त्यांच्या ठिकाणीं आंतड्याच्या मायेचा कळवळा नव्हता कीं ज्याच्यापुढें स्वतःच्या अधिकाराचा त्यांना विसर पडूं शकेल; किंवा पार्वतीबाईप्रमाणे त्याच्या ठिकाणी भाऊसाहेबांविषयीं जिव्हाळयाचें प्रेम नांदत नव्हते, कीं ज्यामुळें त्यांनीं आपली अधिकारलालसा सोडावी.

राजनीतीला किंवा राजमंडळाच्या धोरणाला राज्यव्यवस्थेंत क्रांति घडवून न आणतां राज्याचा स्वार्थ सांभाळावा लागतो. राजाचें समाधान राखून राजनीति न्यायी दाखवावी लागते. अर्थात् अशा एकाद्या नाजूक प्रसंगीं सत्याला असत्य ठरवून, हेंच सत्य व तोच खरा न्याय असें जगाला दाखवावें लागतें व त्यांतच मुत्सद्दीपणाचें खरें रहस्य दडून बसलेलें असतें. पेशवाईच्या वेळीं काय किंवा सध्यांच्या स्थितींत काय, मुत्सद्दीपणाचें लक्षण एकच असतें. कालमानाप्रमाणें पर्याय निराळे एवढाच काय तो भेद.

६६. कारभार पहाणाऱ्या मंडळींच्या अदलाबदलीबरोबर राज्यांतील इतर सरदार, आणि त्यांचें कारभारी मंडळ यांतही त्याप्रमाणेच फेरबदल आपोआप होणार होता. राघोबादादा कारभारात येते तर त्यांना महादजी शिंदे नको होते. त्यांच्या जागीं मानाजी फांकडे आले असते. नागपूरकर भोंसले यांच्यापैकीं राघोबादादांचें मुधोजीला पाठबळ होतें, परंतु माधवराव पेशव्यांना तो नको होता. माधवराव पेशवे व त्याचे मुत्सद्दी नाना फडनविस वगैरे यांना साबाजी भोंसले हा पाहिजे होता. एकंदरींत माधवराव पेशवे व त्यांचा राजपक्ष ह्मणून समजून चालणारे मुत्सद्दी यांच्या प्रेमांतले सरदार निराळे, त्यांचे मंत्री निराळे, अशी परिस्थिति जशी पेशव्यांची त्याचप्रमाणें राघोबादादांची होती. राघोबादादांच्या विश्वासाचे सरदार व मंत्री यांना राजपक्षाची मंडळी नेहमीं पाण्यांत पहात असत. राजपक्षाच्या बळावर व सत्तेवर राघोबादादांचा पक्ष दिवसेंदिवस कमकुंवत करण्यांत येत होता. या कामीं माधवराव पेशवे व त्यांचे मंत्री यांची बरीच बुद्धि खर्ची पडली होती आणि त्यांचा बंदोबस्त करणें हेंही मोठ्या खर्चाचें व अवाढव्य लष्करी सामर्थ्याचें काम होऊन बसलें होतें. अशा स्थितींत सदाशिवरावभाऊ खरे ठरते तर ते कारभारांत आले असते. पेशवाईचा कारभार त्यांच्या हातून न्याय्य मार्गानें काढून घेतां आला नसता कारण त्यांना पेशव्यांच्या नायब दिवाणाचीं वस्त्रें छत्रपती शाहुमहाराज यांच्याकडून पूर्वींच मिळालीं होतीं. त्या दृष्टीनें त्यांचा कारभारीपणाचा हक्क

कायम होता. भाऊ कारभारांत आले असते तर पटवर्धन मंडळी आणि भाऊसाहेब यांचें वैमनस्य असल्यामुळें ते अलग राहिले असते. माधवराव पेशव्यांना पटवर्धन मंडळी पाहिजे होती. मल्हारराव होळकर व भाऊसाहेब यांचेंही वैमनस्य होतें. पानिपतच्या लढाईच्या वेळीं होळकरांनीं व दुसऱ्या इतर सरदारांनीं जो आगचोरपणा केला व ज्यामुळें अपयश येऊन राज्याचें कधीं भरून न येणारें नुकसान झालें, त्यांच्यावर गुन्हेगारी लादून त्यांचीं पारिपत्यें झालीं असतीं. त्यांत कोणकोणत्या सरदारांच्या व मुत्सद्यांच्या आहुती पडल्या असत्या याची भीति सर्वांनाच होती. भाऊसाहेब प्रकट झाल्यापासून या वेळपर्यंत त्यांना तोतया ह्मणण्यांत ज्यांनीं ज्यांनी पुढाकार घेतला तेही गुन्हेगार ठरून कडक शासनाला पात्र ठरते. या गुन्हेगारींत प्रत्यक्ष माधवराव पेशवे, गोपिकाबाई वगैरे खाशी मंडळीही सांपडण्याचा संभव होता. एकंदरींत राघोबादादा पुरवले, पण भाऊसाहेब नकोत अशी खुद्द पेशव्यांची व त्या वेळेच्या त्यांच्या राज्याच्या आधारस्तंभांची भावना होती. या सर्व भावी दिव्यांतून शीरसलामत पार पडण्याला भाऊसाहेबांना तोतया ठरविणें हा एकच मार्ग होता. या मार्गामुळें भाऊसाहेबांच्या आप्त मंडळींचा रोष माधवराव पेशव्यांवर व मुत्सद्यांवर होणार होता. पण तो त्या दिव्यापेक्षा किती तरी पटीने कमी त्रासाचा होता यांत शंका नाहीं.

६७. सदाशिवरावभाऊ खरे ठरविल्यानें सध्यांचे पेशवे व त्यांचे मुत्सद्दी याच्या दृष्टीने राज्यकारभारांत व पेशव्यांच्या घरगुती व्यवहारांत जी भयंकर आपत्ति ओढवणार होती ती सामोपचारानें टाळण्याची शनिवारवाड्यांत वाटाघाट झाली. या संबंधीं ऐतिहासिक लेखसंग्रह पान १०१७ पत्र नं. ५७९ यांत उल्लेख आहे. "मग सर्वांनीं इत्यर्थ केला कीं, पर्वतीस जाऊन (तोतयाशीं) करारमदार करून टाकावा. असा करारमदार वाडियांत झाला." यावरून माधवराव पेशवे यांच्या मनांत भाऊसाहेबांबरोबर कांहीं करारमदार करावयाचे होते हें स्पष्ट दिसतें. अर्थात् हे करारमदार ह्मणजे त्यांनीं कारभारांत पडूं नये, राघोबादादांप्रमाणें

कोठें तरी निवांत स्थान पाहून देव देव करीत बसावें या अर्थाचेच असूं शकणार. ते खरे भाऊसाहेब नसते व तो कोणी तरी एकादा लुच्चा व खरोखरीचा तोतया असता, तर त्याच्या बरोबर करारमदार करण्याचें माधवरावांना कांहींही कारण नव्हतें. त्याला गुन्हेगार ठरवून हत्तीच्या पायाखालीं देण्यास किंवा डोंगरी किल्ल्याची हवा खाण्यास माधवराव यांनीं पाठविलें असतें. परंतु तसें न करतां तोतयाबरोबर 'करारमदार' करावे असें वाड्यांत माधवराव ठरवितात व आपण स्वतः पर्वतीवर त्याच्यापुढें न जातां मुत्सद्यांवर ती कामगिरी सोंपवितात, या सर्व गोष्टीवरून भाऊसाहेबांनीं मुत्सद्यांचे करारमदार मान्य केले नाहींत, ह्मणूनच त्यांनीं त्यांना तोतया ठरविलें हें उघड उघड दिसतें. या पुराव्यापेक्षां उघड उघड दुसरा पुरावा पत्रोपत्रीं मिळणें शक्य नाहीं, त्या वेळेच्या परिस्थितीवरूनच या गोष्टी ठरवाव्या लागतात. उलट पक्षीं ते खरे भाऊसाहेब असल्याबद्दल जबरदस्त पुरावा आहे. ते भाऊसाहेब नसल्याबद्दल जो राजपक्षाकडील पुरावा इतिहासांतून सांपडतो, तो भोळयाभाबड्या लोकांना फसविण्याच्या योग्यतेचाच आहे. पर्वतीवर मुत्सद्दी गेल्यानंतर त्यांनीं तेथील गोशाळेंत तोतयाला ठेवलें होतें. तेथून देवळांत आणलें. ते खरे सदाशिवरावभाऊ नसते व तो कोणी खराच तोतया असतां तर त्याला माधवराव पेशव्यांनीं पर्वतीवर उतरविलेंच नसतें पुढें त्याला देवळांत आणल्यानंतर त्याला मुत्सद्दी ह्मणाले 'तूं भाऊ तो नव्हेस. परतु न कळे! त्यास तूं काय असेल तें खरें बोल.' मग बेलभंडार त्याचे पुढें ठेविला. तेव्हां त्यानें साफ सांगितलें कीं, 'मी परिछिन्न कनोजा ब्राह्मण.' असें त्याने सांगितल्याबरोबर सर्वांची खात्री झाली. मुत्सद्यांनी या जबरदस्त (!) पुराव्यावर त्याला तोतया ठरविलें.

६८. गेलीं दोन वर्षें ज्या इसमानें नरवरापासून खानदेशांत येईपर्यंत भाऊसाहेब ह्मणवून घेऊन हजारों लोकांना फसविले, कित्येकांकडून खंडण्या घेतल्या, मोठमोठ्या सरदारांकडून मानमरातब उपभोगला, तो इसम बेलभंडार पुढें ठेवतांच त्यांतील जादुमंत्रानें अगदीं भारून गेला व

मुत्सद्दी जें विचारतील तें खरें खरें सांगूं लागला. मुत्सद्यांच्या बेलभंडाऱ्यानें इतक्या दिवसांची त्याची तपश्चर्या नष्ट झाली व तो कनोजा ब्राह्मण ठरून सदाशिवरावभाऊंचा तोतया बनला. हजारों माणसांना फसविणारा बदमाष तोतया बेलभंडाऱ्याच्या दर्शनानें जर सत्य ओकूं लागला तर त्यांत अलौकिक सामर्थ्य होतें हें कोणीही कबूल करील. अशी सत्य कथन करावयाला लावणारी अलौकिक आणि अमोलिक वस्तु पेशवेसरकार हातावेगळी होऊं देणार नाहीं. असें असतां नारायणराव पेशव्यांचा खून ज्या वेळीं झाला व तो खून राघोबादादा व आनंदीबाई यांनीं करविला असा जो गुन्हा त्यांच्यावर मुत्सद्यानीं लादला, त्या वेळीं त्यांनीं या बेलभंडाऱ्याचा कां उपयोग केला नाहीं ? या खुनाशीं आपला संबंध नाहीं असें राघोबादादा व आनंदीबाई शेवटपर्यंत सांगत असतां ती गोष्ट असत्य आहे असें जर मुत्सद्यांना वाटत होतें, तर त्यांनीं या बेलभंडाऱ्याचा खात्रीनें उपयोग केला असतां व त्यांच्या तोंडातूनच मुत्सद्यांना इष्ट असलेलें जें सत्य ते तावडतोब बाहेर आलें असतें. भाऊसाहेबांना तोतया ठरविणारे जे मुत्सद्दी होते तेच नारायणरावांच्या वधाच्या वेळीं होते. त्यांच्यापैकीं एकही कमी झालेला नव्हता; तेव्हां 'ध' चा 'मा' कोणी केला आणि राज्याच्या लोभामुळें राघोबादादांनीं व आनंदीबाईनीं हें अघोर कृत्य केलें किंवा काय, याचा कबुलीजबाब त्यांच्याकडून या बेलभंडाऱ्याच्या साधनानें अनायासेंच मिळाला असता. पण त्या वेळीं हा सोपा मार्ग ज्याअर्थी मुत्सद्यांनीं अवलंबिला नाहीं आणि या वेळीं फक्त भाऊसाहेबांना तोतया ठरविण्यापुरताच तो अवलंबिला त्याअर्थी लोकांची फसगत करण्यापुरताच हा बेलभंडाऱ्याचा फार्स होता हें निश्चित ठरतें. बेलभंडाऱ्यांतील दैविक सामर्थ्यापेक्षां अमक्याला अमुक बनवावें असें मुत्सद्यांना ज्यावेळीं वाटेल त्या वेळीं ते त्याला आपल्या बुद्धिसामर्थ्यावर तसें बनवूं शकत होते. ही अद्भुत जादू त्यांनीं हस्तगत केली होती ही गोष्ट मात्र खरी यांत शंका नाहीं.

६९. यावरून तोतया ठरविण्याकरतां जो राजपक्षाकडून पुरावा बाहेर आला तो निव्वळ खोटा व बनावट असाच आहे, असे स्पष्ट दिसून येतें. हा राजपक्षाचा पुरावा विरुद्ध बाजूच्या भरभक्कम प्रत्यक्ष पुराव्यापुढें, समंजस मनुष्याच्या बुद्धीला थोडा तरी ताण पडण्याइतकासुद्धां महत्वाचा नाहीं. त्यांच्या पुराव्यांत भाऊसाहेबांचें हस्तअक्षर जमत नाहीं, स्वरूपांत फरक आहे, आवाजांत बदल आहे, वयांत साम्यता नाहीं, डोळ्यांत सारखेपणा नाहीं, शरीरबांधा निराळा आहे, किंवा बुद्धींत, माहितींत, राजकारणांत, चालचलणुकींत अमुक अमुक फरक, उघड उघड डोळ्याला दिसतो व मनाला पटतो असा कोणताच पुरावा पुढे आलेला नाहीं. शिवाय सर्व लोक त्यांना खरे भाऊसाहेब ह्मणत आहेत हें दरबारी लोकांना माहीत असूनही त्यांनीं अमुक एका गोष्टीमुळें लोकांचें ह्मणणें खोटें आहे, असें दाखविणारा कोणताच महत्वाचा पुरावा पुढें आणला नाहीं. अशा तऱ्हेचा पुरावा लोकांपुढे मांडणें त्यांचें कर्तव्य होतें. तो न मांडतां त्यांनीं बेलभंडाऱ्याचा पुरावा पुढें आणला यावरूनच दुसरा कोणताही पुरावा त्यांच्याजवळ नव्हता, हेच सत्य ठरतें.

७०. माधवराव पेशव्याच्या अमदानींत एकाच वेळेला या इसमाची चौकशी झाली नाहीं. वर्ष वर्ष, दोनदोन वर्षांच्या फरकानें वेळोंवेळीं त्याची चौकशी झाली. असें असतां जर तो कनोजा ब्राह्मण होता, व त्याच्या बापाचें नांव, आजीचें नांव, व त्याचे राहण्याचें ठिकाण वगैरे सर्व पत्ता-मुद्दा दरबारच्या अधिकारी लोकांना समजला होता, तर त्यांनी छत्रपुराहून त्याच्या आईबापांना आणविलें असतें आणि अनुबाई व पार्वतीबाई यांना ते दाखवून त्यांची खात्री करून दिली असती. परंतु हा सोपा व सरळ मार्गही या दरबारी मंडळींनीं व पेशव्यांनीं अंगिकारिला नाहीं. यावरूनही तोतया ठरविण्यांत त्यांचें कांहीं गूढ कारस्थान होतें हें उघड दिसतें.

७१. याशिवाय बारभाईंच्या पुराव्याविरुद्ध दुसरी एक गोष्ट अशी आहे, कीं, ती दृष्टिआड करतां येण्यासारखी नाहीं. बारभाईंच्या कारस्थानाला ज्या वेळीं पुण्यास सुरवात झाली, त्या वेळीं कोणाच्या नांवानें राज्यकारभार चालवावा हा महत्वाचा प्रश्न होता. ज्या इसमाच्या नांवानें तो चालेल त्याच्या न्याय्य हक्कावरून राघोबादादांविरुद्ध राज्याची स्थिरस्थावरता बारभाईंना करावी लागणार होती. बारभाईंनीं राघोबादादांवर पुतण्याच्या खुनाचा आरोप लादून व लोकमतानें गुन्हेगार ठरवून त्यांना गादीला अपात्र ठरविलें. पण गादीवर योग्य इसम कोण आणावा कीं, जो आला असतां राघोबादादांचा पक्ष आपोआप ढिला पडेल, हा विचार बारभाईंच्या डोळ्यांपुढें नाचत होता. हे बारभाई म्हणजे सामान्य इसम नव्हते. राघोबादादासारख्या पराक्रमी पुरुषाला गादीवरून हांकलून लावून आपली सत्ता प्रस्थापित करतां येईल अशा लष्करी सामर्थ्याचे व बुद्धिचातुर्याचे असे ते होते. गादीवर कोणाला आणावें व कोणाच्या नांवानें राज्यकारभार चालवावा याचा विचारविनिमय ज्या वेळीं या बारभाईंमध्यें चालला त्या वेळीं प्रामुख्यानें सदाशिवरावभाऊंचें नांव पुढें आलें. राघोबादादांच्या छावणींतून प्रमुख प्रधान एका मागून एक असे पुण्याला ज्या वेळीं परत येऊं लागले, त्यावेळीं काहीं तरी राज्यक्रांति होणार असें लोक अनुमान करीत होते. हें अनुमान म्हणजे मुत्सद्यांच्या खलबतांतून बाहेर पडणारेंसारच होते. "कोणी म्हणत[1] कीं, सदोबा म्हणून जो नगरच्या किल्ल्यांत कैदेंत आहे, त्याला मुक्त करून पेशव्यांचे गादीवर बसविणार कोणी म्हणत कीं, सातारच्या राजाला मुक्त करणार.' या म्हणण्यांत किती तरी अर्थ आहे. कित्येक लोकांना व बारभाईंतील कांहीं लोकांनाही सदाशिवरावभाऊंबद्दल अन्याय होतो असें वाटत असल्यामुळें तो दूर करावा या दृष्टीनें त्यांना पेशव्यांच्या गादीवर आणावें अशी त्यांची खटपट चालू होती. सदाशिवरावभाऊंपेक्षां सातारच्या महाराजांविषयीं जास्त

---

१. परशुरामभाऊंचें चरित्र पान नं. ३४.

अन्याय झाला आहे, तेव्हां त्याचे परिमार्जन व्हावें म्हणून त्यांना मुक्त करून गादीवर आणावें, असें दुसऱ्या पक्षाच्या लोकाना वाटत होतें. परंतु या गोष्टींचा पुढें जरी बारभाईंनीं पुरस्कार केला नाहीं, तरी यांतून एक गोष्ट मात्र सत्य ती बाहेर येते. ती म्हणजे नगरच्या किल्ल्यावरील सदोबास पेशव्यांच्या गादीवर बसवावें ही होय. खरे पाहिलें तर ते खरे सदाशिवरावभाऊ नसते व ते जर कनोजा ब्राम्हण असतां तर त्याला गादीवर बसविण्याचा प्रश्नच उपस्थित झाला नसता. ते खरे सदाशिवरावभाऊ होते म्हणूनच ह्या प्रश्नाची चर्चा झाली. आतां ते गादीवर येण्यानें फायदा होईल किंवा मुत्सद्यांना हानिकारक होईल हा प्रश्न निराळा. पण ते खरे भाऊ होते म्हणूनच पेशव्यांच्या गादीचे हक्कदार होते, असाच निष्कर्ष निघतो. या गोष्टीवरूनही ते खरे सदाशिवरावभाऊ होते, पण त्याना मुत्सद्दी मंडळी काहीं गूढ राजकारणाकरतां उजेडांत आणीत नव्हती, हेंच खरें ठरतें.

७२. ही एकंदर परिस्थिति पहाता कारभारी मुत्सद्यांना राज्याच्या कारभाराच्या दृष्टीनें व घरगुती तंटेबखेडे निभावून नेण्याच्या दृष्टीनें खऱ्या सदाशिवरावभाऊंना तोतया ठरवावे लागले. यावरून तोतया ठरविण्यांत माधवराव पेशवे व त्यांचे कारभारी यांचा वैयक्तिक व राजकीय स्वार्थ होता हें उघड आहे.

७३. माधवराव पेशवे व त्याचे मुत्सद्दी यांनीं तोतया ठरविलेला इसम कनोजा ब्राम्हण नसून ते खरे सदाशिवरावभाऊ होते असाच निर्णय मुद्दा नंबर तीनवर निःशंकपणे द्यावा लागतो. मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांनीं त्रयस्थ या दृष्टीनें जी चौकशी इ. स. १७७६ मध्ये केली त्या वेळींसुद्धां त्याचा निर्णय ते खरे सदाशिवरावभाऊ आहेत असाच होता. इतका वेळपर्यंत पेशवेदरबार मानीत असलेल्या तोतयाला जर न्यायाच्या कांट्यावर उभें केलें तर तो तोतया नाहीं, ते खरे भाऊसाहेब आहेत, असाच न्यायदेवता आपला कौल देईल.

७४. येथपर्यंत तोतयाच्या बंडाची मीमांसा झाली. या पुढें या इतिहासाला निराळें वळण लागलें. दिल्लीहून शाहुमहाराज दक्षिणेंत आले. त्यांना परसोजी भोंसले यांनीं पहिल्यानें मदत दिली. तेथून ते गंगाथडीला आले. तोंपर्यंत राणी ताराबाई व त्यांचा राजपक्ष त्यांना तोतयाच म्हणत होता. अर्थात् त्या वेळपर्यंत शाहुमहाराजांनीं ज्या हालचाली केल्या, त्या तोतयाच्या बंडाच्याच होत्या. परंतु गंगाथडीस ज्या वेळीं बापूजी भोंसले यांनी त्यांची चौकशी केली व ते खरे असल्याबद्दल आपला निर्णय जाहीर केला, त्या वेळीं बंडाचें स्वरूप पालटलें. हिंदुपदपादशाहीचे कायदेशीर व सनदशीर खरे वारस ते आहेत असें ठरल्यामुळें त्यांना विरोध करणाऱ्या ताराबाई व त्यांचा पक्ष बंड ठरला. सनदशीर मार्गानें छत्रपतीकडून वस्त्रें घेऊन राघोबादादा पेशवेपदावर असतांना ते मुलुखगिरीवर गेले आहेत असें पाहून, गंगाबाईंना गरोदरपणीं पुरंदर किल्ल्यावर नेऊन ठेऊन त्यांच्या नांवानें बारभाईंनीं जो राज्यकारभार चालविला, तें बारभाईंचें बंडच होतें; परंतु शेवटीं गंगाबाईंना पुत्र झाला व तो राज्याचा खरा वारस असल्यानें त्या बंडाचें स्वरूप पालटलें. तसाच प्रकार सदर तोतयाच्या बंडाचा आहे. पूर्वींचे प्रकार गादीच्या वारसाहक्कासंबंधीं होते. परंतु पेशव्यांच्या गादीचे खरे मालक सवाईमाधवराव जन्माला आले असल्यामुळें गादीबद्दल प्रश्नच शिल्लक नव्हता. फक्त राज्यकारभार कोणी करावा या बद्दल तंटा राहिला. हा तंटा सामोपचारानें मिटण्यासारखा नव्हता. तो जेत्या पक्षाच्याच हातीं राहणार होता. परंतु न्याय अगर अन्याय हा नीतिशास्त्राचा स्वतंत्र विषय असल्यानें व विजयी पक्ष नेहमींच न्यायी असतो असें नसल्यानें, न्यायी पक्ष कोणाचा व अन्यायी पक्ष कोणाचा हें येथें पहाणें जरूर आहे.

७५. सदाशिवरावभाऊ खरे ठरून त्यांच्या नांवाची ज्या वेळीं द्वाही फिरली, त्या वेळीं असें प्रसिद्ध करण्यांत आलें कीं, ते आतां मुक्त होऊन 'पूर्वींप्रमाणें राज्यकारभार' पाहूं लागले.' हें वर्तमान चोहींकडे समजल्यानंतर हजारों अनुयायी त्यांच्या भोंवतीं गोळा झाले. हे लोक गोळा होण्यांत

१ ऐ. ले. सं. पान २४६४

पेशव्याच्या राज्यांत कलह उत्पन्न करून तें राज्य आपण लुबाडावयाचें असा ध्वनि उत्पन्न होत नाहीं. यांतील हेतू स्पष्ट आहे. भाऊसाहेब हे पेशव्यांची गादी अगर पेशव्यांचें राज्य भाऊबंदी तंटे उत्पन्न करून गिळंकृत करणार नव्हते, तर ते प्रकट झाल्यानंतर आपला जो सनदशीर हक्क तो ते संपादन करूं पहात होते. त्यांचा पूर्वीपासूनचा हक्क ह्मणजे पेशव्यांचा कारभार पहाणें. गादीला मालक सवाईमाधवराव झालेच होते. त्यांचे कारभारी म्हणून ते राज्यकारभारांत येऊं पहात होते व हेंच त्यांचें येणें पुण्याच्या सध्यांचा मुत्सद्यांना नको होतें. भाऊसाहेब प्रकट झाल्यानंतर एकच प्रश्न शिल्लक राहिला. तो हा कीं पेशवाईचा कारभार सदाशिवरावभाऊंनीं पहावा किंवा नाना फडनविस यांनीं पहावा ? नानांना आपला अधिकार जावयाला नको होता. भाऊंना आपला अधिकार प्राप्त करून घ्यावयाचा होता. अर्थात् कारभाराच्या अधिकाराबद्दल भाऊ व नाना यांच्यांत् कलह लागला. शाहुमहाराज प्रकट झाल्यानंतर त्यांचा अधिकार त्यांना मिळणें रास्त होतें. परंतु अधिकारलालसा जशी ताराबाईंना चिकटून राहिली व शाहु हा तोतया आहे असें शेवटपर्यंत त्यांनीं ह्मटलें, त्याचप्रमाणें नानांनीं सदाशिवरावभाऊंना म्हटलें. तथापि आपला न्याय्य व सनदशीर हक्क मागणारा व त्याप्रमाणें प्रयत्न करणारा इसम बंडखोर होत नाहीं, तर त्याचे अधिकार न सोडणारेच न्यायदेवतेच्या मंदिरांत बंडखोर ठरतात. तोच प्रकार यापुढें येथें होणारा असल्यामुळें या पुढील इतिहास तोतयाचा बंडाचा नसून तो धर्मयुद्धाचा आहे

७६. सदाशिवरावभाऊ प्रकट होऊन त्यांनीं पेशवाईचा कारभार हातीं घेण्याचें जाहीर केल्यानंतर त्यांना व्यंकटराव घोरपडे वगैरे कित्येक मोठमोठे सरदार आपल्या सैन्यानिशीं रत्नागिरीस येऊन मिळाले. त्यांनीं नवीन फौज चाकरीला ठेवली व कोंकण प्रांत काबीज करण्याला सुरवात केली. त्यांनीं विजयदुर्ग व देवगड हे किल्ले हस्तगत केले. कोंकणपट्टीच्या समुद्रांत पेशव्यांचें आरमार होतें. त्यावर धुळप हा सरदार होता. त्यानें

आपलें आरमार भाऊसाहेबांच्या स्वाधीन केलें. नंतर त्यांनीं अंजनवेल व गोवळकोट हे किल्ले घेतले. भाऊसाहेबांनीं एकामागून एक असे किल्ले आपल्या अंमलाखालीं आणण्याचा सपाटा सुरू केला. ही बातमी पुरंदरास नाना फडनविस यांना समजतांच त्याच्याबरोबर युद्ध करण्याची त्यांची तयारी सुरू झाली. त्यांनीं शिंदे होळकर यांना फौज बंद येण्याचे हुकूम सोडले; व ते येईतोंपर्यंत भाऊसाहेबांच्या हालचालींना प्रतिबंध करण्याकरतां एका परभु सरदाराच्या हाताखालीं दोन हजार गारदी व आरब देऊन नानांनीं त्यांना भाऊंवर पाठविलें. ते अंजनवेलीच्या आसपास येतात तोंच लढाईला सुरवात होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. परंतु त्यांना भाऊसाहेबांनीं आपल्या पक्षाला सामील करून घेतलें. भाऊसाहेब जो किल्ला घेण्याकरता जात तेथें त्याच्या पुढें किल्लेदार हात जोडून येई व त्यांच्या स्वाधीन किल्ला करी. अशी परिस्थिति होऊं लागली. सुवर्णदुर्गाचा किल्ला हरिपंत फडके याच्या पुतण्याच्या स्वाधीन होता व सुवर्णदुर्ग तालुक्याची मामलत बचाजीपंत बर्वे यांजकडे होती. सदाशिवरावभाऊंस हे दोघे सरदार अनुकूल झाले व त्यांच्या स्वाधीन तो प्रांत त्यांनीं केला. त्याचप्रमाणे भाऊंनीं देवरूखचें ठाणें घेऊन आंबाघांटावर चढून मलकापूरही हस्तगत केलें. नंतर उत्तर कोंकणावर स्वारी करून सर्व उत्तर कोंकण आपल्या अंमलाखालीं आणलें. त्या प्रांतांतील माणकर व सुर्वे हे सरदारही भाऊसाहेबांना मिळाले. पटवर्धन सरदारांपैकी हरबाणा हेही त्यांच्या पक्षाला आले. मुंबईचे इंग्रज, करवीरकर व हैदर यांचीही सहानुभूति भाऊसाहेबांना मिळाली. राघोबादादांचा दत्तक पुत्र अमृतराव हा आपल्या सैन्यानिशीं भाऊसाहेबांकडे येऊन त्यांना मिळाला. राघोबादादांचेंही सदाशिवरावभाऊंना उत्तेजन[1] होतें. या वेळीं त्यांच्याजवळ वीस हजार फौज झाली. सिंहगडही अनुकूल होण्याचा रंग दिसूं लागला. तेव्हां बोरघाट चढून त्यांनी राजमाचीचा किल्ला हस्तगत केला व तेथून

१. महादजी शिंदे यांचें चरित्र पान १२६.

पुण्यावर चाल करून जाण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला. ही हकीकत इ. स. १७७६ च्या आक्टोबर महिन्याच्या सुमारास झाली.

७७. सदाशिवरावभाऊ खरे असून त्यांनीं पेशव्यांच्या राज्याचा कारभार हातीं घेतला आहे, अशी रत्नागिरीस इ. स. १७७६ च्या मार्च महिन्याच्या सुरवातीला द्वाही फिरली व तेव्हांपासून आक्टोबर महिन्यापर्यंत सुमारें सहा सात महिन्यांच्या अवधींत सदाशिवरावभाऊंनीं सर्व कोंकण प्रांत आपल्या अंमलाखालीं आणून इंग्रज, हैदर, वगैरे स्वतंत्र सरकाराशीं स्नेह जोडले आणि पुण्यावर चाल करून जाण्याइतकी आपली तयारी केली. इतकी सर्व परिस्थिति निर्माण होईतोंपर्यंत नाना फडनविस गप्प बसले. त्यांनीं हें तोतयाचें बंड ताबडतोब मोडण्याचा जोराचा प्रयत्न केला नाहीं, यांतही एक मोठा मुत्सद्देगिरीचा डाव होता. हें बंड मोडण्याकरतां महाराष्ट्रांतल्या एकाद्या सरदाराची योजना केली असती व त्याच्यावरच विसंबून राहिलें तर कदाचित् आपली फसगत होईल अशी नानांना शंका होती. तो सरदार खऱ्या भाऊसाहेबांना पाहून त्यांना फितुर होईल अशीं धास्ती नानांना वाटत होती. या बाबतींत नाना आपल्या पक्षांतील पटवर्धन, हरिपंत फडके वगैरे सरदारांवरही विश्वास ठेवण्याला तयार नव्हते. त्यांना आपल्या पूर्ण विश्वासातला सरदार पाहिजे होता. नानांची होळकरांपेक्षां महादजी शिंद्यांवर जास्त भिस्त होती. परंतु राघोबादादांच्या बाबतींत शिंदे—होळकरांचें डळमळीत धोरण नानांना दिसून आलें. त्यामुळें ते विवंचनेंत होते. महादजीच्या पराक्रमाबद्दल व युद्धसामर्थ्याबद्दल नानांना कोणतीच शंका नव्हती. त्यांनीं आपल्या मनानें कामगिरी हातीं घेतली म्हणजे त्यांत हटकून यश येणार ही त्यांची बालंबाल खात्री होती. यामुळें ते त्या गोष्टीला तयार होईपर्यंत नाना काळजींतच होते; म्हणून त्यांनीं हें सदाशिवरावभाऊंचें बंड मोडण्याकरतां त्वरित दक्षिणेंत येण्याबद्दल शिंद्यांना पत्रें लिहिलीं व त्याचप्रमाणें होळकरांनाही लिहिलीं. परंतु ते येईतोंपर्यंत सदाशिवरावभाऊंच्या बंदोबस्ताकरतां नानांनीं कांहीं पायदळ व तोफा देऊन

भिवराव पानशे यांस रवाना केलें. दसऱ्याच्या सुमारास शिंदे व होळकर यांच्या स्वाऱ्या पुरंदरास येऊन दाखल झाल्या. नानांनीं महादजींचा रुसवा काढून टाकला, तेव्हां सदाशिवरावभाऊंवरील मोहिमेचा सर्व भार त्यांनीं आपल्या शिरावर घेतला; व तेथून ते पानशे यांच्या मदतीस राजमाची किल्ल्याकडे रवाना झाले.

७८. सदाशिवरावभाऊ हे नाइलाजानें युद्धाला प्रवृत्त झाले होते. ह्यांची युद्धाची तयारी कारभाऱ्यांविरुद्ध होती. कारभाऱ्यांचें बंड मोडण्याकरतां त्यांना आपसांत लढणें प्राप्त झालें होतें. युद्ध न होतां पेशवाईचा कारभार त्यांच्या हातीं आला असतां तर त्यांना तो पाहिजे होता. ही भाऊसाहेबांची मन:स्थिति समजण्याइतके कारभारी धूर्त होते. महादजी शिंदे राजमाचीला आपल्या सैन्यासह जाऊन पोहोंचेपर्यंत - सदाशिवरावभाऊंनीं पुण्यावर येऊं नये, याकरतां नानांचें गुप्त कारस्थान सुरू होतें. सदाशिवरावभाऊ 'राजमाचीस असतां पुरंदरच्या कारभारी लोकांनीं तो तेथें कांहींसा ठरावयाकरितां भुलथापीनें तहाचें बोलणें लाविलें.[१] ' या तहाच्या वाटाघाटीवर भाऊंचा विश्वास बसला. लढाई न करतां पेशवाईचा कारभार आपल्या हातीं जर येईल तर तो त्यांना प्रिय होता. इकडे तहाचें बोलणें लावून विश्वासघातानें आपलेच कारभारी आपल्यावर हल्ला करतील एवढे अंत:करणशून्य व नीतिमत्ता कोळून प्यालेले हीन वृत्तीचे ते असतील याची कल्पना त्यांना आली नाहीं. कारभाऱ्यांनीं तहाचें बोलणें लाविलें, त्याअर्थीं आपसांतील लढाई टळून अधिकाराच्या बाबतींत तडजोड होईल अशी स्थिति दिसून येऊं लागली, तेव्हां भाऊसाहेबांकडील सैन्य बेसावध राहिलें. एवढ्या अवधींत शिंद्यांचें सैन्य राजमाचीला आलें. भाऊसाहेब यांना लढाई करण्याच्या पूर्ण अज्ञानावस्थेंत व बेसावध स्थितींत ठेऊन शिंद्यांनीं त्यांच्यावर अकल्पित हल्ला केला. त्यामुळें भाऊसाहेबांचें सैन्य व सरदार गांगरून गेले व ते कोंकणांत पळाले. राजमाचीच्या पायथ्याला भाऊसाहेबांचा गोट होता त्यावर शिंद्यांनीं हल्ला केला व शेंकडों लोकांची कत्तल केली. त्यामुळें सर्व लोक सैरावैरां पळत सुटले. एकाएकीं विश्वासघातानें

१. मराठ्यांची बखर ग्रँट डफकृत पान २५५.

केलेल्या हल्ल्यामुळें भाऊसाहेब हताश झाले व तेथून त्यांनीं पळ काढला. ते शिंद्यांच्या सैन्याच्या कोंड्या चुकवीत चुकवीत बेलापुरास आले. तेथून गलबतांत बसून ते मुंबईस इंग्रजांच्या आश्रयास जात असतां मार्गांत रघोजी आंग्रे यांनीं तें गलबत पकडलें, तेव्हां भाऊसाहेब व त्यांच्या समागमें असलेले लोक त्यांच्या स्वाधीन झाले. नंतर त्यांना घेऊन आंग्रे पुण्यास निघाले त्या वेळीं भाऊसाहेबांनीं आपली चौकशी झाल्याशिवाय आपणास शासन होऊं नये असें वचन आंग्रे यांचेकडून घेतलें. त्या वेळीं त्यांच्याबरोबर व्यंकटराव घोरपडे व हरबाण्णा हे होते. त्यांना आंग्रे यांनीं सोडून दिलें. सदाशिवरावभाऊंना पुण्यास आणीत असतां वाटेंत महादजी शिंदे भेटले व त्या उभयतांनीं त्यांना पुण्यास आणलें.

७९. भाऊसाहेब यांना आपल्या हद्दींतून पकडून आंग्रे यांनीं पुण्यास नेलें हें वर्तमान मुंबईच्या गव्हर्नराना समजल्याबरोबर त्यांनीं आंग्र्यांना खलिता लिहिला. त्यांत 'सदाशिवरावभाऊंना आमच्या स्वाधीन करावें व तसें न केल्यास आह्मीं तुमचेवर स्वारी[1] करूं' असा मजकूर होता. अर्थात् या इंग्रजांच्या चढाईच्या धोरणामुळें कारभाऱ्यांस मोठा पेंच पडला. या सदाशिवरावभाऊंच्या बंडांत मुंबई सरकार भाग घेईल असें कारभारी मंडळींना वाटत नव्हतें. कारण तारीख १ मार्च सन १७७६ रोजीं कारभारी व गव्हर्नरजनरल यांच्यामध्यें जो पुरंदरचा तह झाला, त्या तहामुळें मुंबई सरकाराला पेशवाईच्या कारभारांत ढवळाढवळ करतां येणार नाहीं, अशी कारभाऱ्यांची समजूत होती. कारण पुरंदरच्या तहामुळें इंग्रज सरकाराला सहा लक्षांच्या उत्पन्नाचा मुलुख पेशवेसरकारकडून मिळाला होता; व त्यात ज्या अटी होत्या त्यांत 'राघोबादादा किंवा पेशवेसरकारचे राज्यांतील कोणत्याही बंडखोर किंवा फितुर इसमास इंग्रजांनीं मदत देऊं नये' असें एक कलम होतें. अर्थात सदाशिवरावभाऊ यांना कारभारी तोतया ह्मणतात, ह्मणून ते पेशवेसरकारचे बंडखोर, तेव्हां इंग्रजांना या तहाविरुद्ध त्यांना मदत करतां येणार नाहीं असें कारभाऱ्यांना वाटणें स्वाभाविक होतें. परंतु मुंबई सरकारची सदाशिवराव-

---

१ मराठे व इंग्रज पान ७८

भाऊ खरे असल्याबद्दल खात्री झाल्यामुळें व ते खुद्द पेशवे असल्यामुळें, पेशवे-सरकारचे ते बंडखोर ठरत नाहींत, उलट कारभारी हेच बंडखोर ठरतात म्हणून पुरंदरच्या तहानें मिळालेल्या सहा लक्ष उत्पन्नाच्या मुलखाची पर्वा न करतां, कारभारी अन्याय करीत आहेत असें पाहून, मुंबईच्या गव्हर्नरानें आंग्र्यांना तंत्री दिली व लढाईविषयीं उचल खाल्ली. ह्या प्रकार पाहून पुरंदरच्या कारभाऱ्यांना हें एक नवीन संकट उत्पन्न झालें असें वाटलें.

८०. महादजी शिंद्यानें आपल्या तरवारीच्या बळावर सदाशिवरावभाऊंचा पराभव केला व त्यांना पकडून पुण्यास आणलें, तेव्हां पराक्रमी पुरुषाच्या तरवारीचें काम संपलें होतें. आतां यापुढें नानांच्या मुत्सद्देगिरीचा पराक्रम किती जहाल आहे हें या पुढील कारस्थानी लढाईच्या यशावर ठरणार होतें. नानांना स्वतःचें डोकें वांचवावयाचें होतें. आपल्या साथीदारांना सांभाळावयाचें होतें. अधिकार जाऊं द्यावयाचा नव्हता. मुंबई सरकार लढाईला उद्युक्त झाल्यामुळें त्याचें नाक कापावयाचें होतें. व इतकें सर्व सांभाळून आंग्रे यांनीं भाऊसाहेबांना दिलेलें वचन पूर्ण पाळलें हें दाखवावयाचें होतें. या सर्व दिव्यांतून शीरसलामत निभावून जाण्याचा मार्ग नानांना काढावयाचा होता. त्याच्या यशावरच त्यांचें भवितव्य अवलंबून होतें. या दृष्टीनें नानांनीं आपल्या कारस्थानी चक्रव्यूहाची रचना चालविली.

८१. आंग्र्यांनीं सदाशिवरावभाऊंना तारीख १ नोव्हेंबर[१] रोजीं पकडलें. शिंद्यांची व आंग्र्यांची खालापुरीं तारीख १३ रोजीं गांठ पडली. दोन तीन दिवसांत ते पुण्याला पोंचतील असा त्यावेळीं अंदाज होता.[२] परंतु शिंदे व आंग्रे यांना पुण्यास येण्यास पांच सात दिवसांचा जास्त काल लागला. ते ता. २३ [३] रोजीं पुण्याजवळ संगमावर आले. आंग्रे व शिंदे यांना पुण्यास यावयाला दिवसगत लागले. यास्तव 'तोतयास घेऊन आंग्रे येत नाहींत' म्हणून पुण्यांत नाना प्रकारचीं मनस्वी वर्तमानें उठूं लागलीं होतीं. यावरून सदाशिवरावभाऊंच्या पंधरा वीस दिवसांच्या सहवासानें आंग्र्यांचें मन बद-

१ ऐ. ले. सं. पत्र नं. १९१०. २ पत्र नं. १९१३. ३ पत्र नं. १९१९.

ल्लें होतें व आपल्या वचनाप्रमाणें कारभारी वागतील किंवा नाहीं याची त्यांना शंका वाटत होती असें दिसतें. परंतु आंग्रे पुण्यास येण्यापूर्वीच त्यांच्या वचनाप्रमाणें तोतयाची पुन्हां चौकशी करण्याचें ज्याअर्थी पुण्याच्या कारभारी मंडळींत ठरलें [१] त्याअर्थी योग्य चौकशीची व्यवस्था झाल्याशिवाय व त्या बाबतींत मुंबई सरकारचें समाधान झाल्याशिवाय आंग्रे सदाशिवरावभाऊंना कारभाऱ्यांच्या ताब्यांत द्यावयाला तयार नव्हते असें दिसतें. मुंबई सरकारानें आंग्र्यांना तंबी दिली होती व सदाशिवरावभाऊंना आपल्या ताब्यांत देण्याची त्यांची मागणी होती. अर्थात् ती मागणी त्यांनीं मागें घेतल्याशिवाय जर भाऊसाहेबांना कारभाऱ्यांच्या ताब्यांत आंग्र्यांनीं दिलें असतें तर ते पुढील युद्धप्रसंगाला जबाबदार झाले असते. म्हणून ती आपत्ति टाळण्याकरतां नानाकडून मुंबई सरकारची समजूत होणें जरूर होतें. त्या वेळीं कलकत्ता सरकारचे वकील व पुरंदरचा तह घडवून आणणारे कर्नल अॅप्टन साहेब पुण्यास होते. त्यांनीं सदाशिवरावभाऊंची योग्य प्रकारें चौकशी केली जाईल अशी मुंबई सरकाराला हमी दिल्यानंतर व त्यांनीं ती मान्य केल्याचें समजल्यानंतर रघोजी आंग्र्यांनीं सदाशिवरावभाऊंना नानांच्या स्वाधीन केलें असावें असें स्पष्ट दिसतें. पुण्यास येण्याला दिवसगत लागले याचें कारण हें आहे. सदाशिवरावभाऊ पुण्याला येण्यापूर्वी मुंबई सरकारला पसंत पडेल अशी चौकशी कमिटी नेमली गेली होती व त्या कमिटीचें काम योग्य रीतीनें होते किंवा नाही, हें पहाण्याकरतां त्यावर कर्नल अॅप्टन ह्यांची योजना [२] झाली होती.

८२. सदाशिवरावभाऊ यांना तोतया ठरविण्याच्या चौकशी कमिटींत सत्तावीस पंचांची निवड झाली होती. त्यांत रामशास्त्री प्रभुणे न्यायाधीश, गोपीनाथ दिक्षीत, हरिपंत फडके, बाबूजी नाईक बारामतीकर वगैरे बडी बडी मंडळी होती. हे लोक चालू पेशवेसरकारचे आधारस्तंभच होते. ज्यांच्या निर्णयावर कोणालाही शंका घेतां येणार नाहीं एवढी थोर थोर मंडळी या चौकशी कमिटींत होती. या चौकशी कमिटींत जे लोक होते

१. ऐ. ले सं. पत्र नं. १९१४, २. महादजी शिंदे यांचें चरित्र पा. १२७.

त्यांना निवडण्याच्या बाबतींत नानांनीं आपलें कौशल्य खर्च केलें होतें. माधवराव पेशव्यांनीं सदाशिवरावभाऊंना इ. स. १७६६ मध्यें तोतया ठरविल्यानंतर सांप्रतच्या चौकशी कमिटीच्या वेळेपर्यंत ज्यांनीं त्यांना पाहिलें नव्हतें असेच पंच पसंत करण्यांत आले होते. याचा हेतू एवढाच दर्शविण्यांत आला होता कीं मध्यंतरीं ज्यांनीं तोतयास पाहिलें असेल व ज्यांचा परिचय झाला असेल त्यांचें न्याय देतांना कोणत्यातरी कारणानें मन संशयित राहील व त्यांना न्यायाचा निकाल खरा सांगतां येणार नाहीं. अनुबाई, रामचंद्र नाईक, कोल्हटकर, हरबा अण्णा पटवर्धन, ही मंडळी तर तोतयास मदत केल्याबद्दल गुन्हेगारच ठरली होती. तेव्हां त्यांचा शिरकाव या चौकशी कमिटींत होणेंच शक्य नव्हतें. या चौकशी कमिटीचें काम तारीख १२ डिसेंबर पासून कर्नल अप्टन यांच्या समक्ष रीतसर सुरूं झालें. दरम्यान् या चौकशी कमिटीच्या परीक्षेचीं उत्तरें तोतयाकडून तोंडपाठ होण्याकरतां व तोतया ठरविण्याबाबत कागदपत्रांचे पुरावे हजर करण्याकरता कारभाऱ्यांनीं तोतयाची रंगी तालीम घेण्याला सुरवात केली.

८३. याविषयीं पटवर्धन यांचा पुण्यांतील कारकून शिवाजी बाबाजी यानें तारीख ८ डिसेंबर रोजीं गंगाधरराव पटवर्धन यांस मिरजेस पत्र[1] पाठविलें त्यांतील मजकूर पुढें लिहिल्याप्रमाणें आहे. "तोतयाचा मजकूर लिहून पाठवावा ह्मणोन लिहिलें, त्यास तोतया पुण्याजवळ आल्यावर चौकशी होत होती. राजेश्री बापोजी नाईक बारामतीहून अद्यापि आले नाहींत. राजश्री धोंडोबा अप्पा पुरंधरे आले आहेत. ते व वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामशास्त्री व गोपीनाथ दिक्षीत व आपल्या मातबर आसाम्या जुने जुने पाहून नांवनिशी लिहून त्यांत राजश्री हरिपंत तात्या, व महादजीपंत गुरुजी वगैरे सत्तावीस असामी नेमणूक होती व शिवाय बहुतच होते. बेलभंडार घेऊन गेले होते. त्यास इमान प्रमाण दिलें. "तुम्ही सत्य असेल तें सांगणें. भाऊसाहेब असल्यास सर्वांस पाहिजेत. आम्ही इमान देतों. तिळमात्र वांकडी गोष्ट होणार नाहीं." येणेंप्रमाणें बोलून चालून इमानप्रमाण दिलें. आणि त्याच्या डोईवर बेल भंडार

---

१. ऐ. ले. सं. पत्र नं. १९३२.

घातला कीं, सत्य असेल तें सांगणें. त्यानें स्पष्ट सांगितलें व लिहून दिलें जे, छत्रपुराजवळ कनोल गांव आहे. तेथील आपण. आपलें नांव सुकलाल. बापाचें नांव रामनन्दा, आईचें नांव मन्मथा. जात कनुजा. येणेंप्रमाणें लिहून दिलें व खातरजमा जाहली. आतां कांहीं संशय राहिला नाहीं. आज अथवा उद्यां शहरांत फिरवून अप्रतिष्ठा करून पारपत्य करणार. ”

८४. तोतयाकडून वरीलप्रमाणें कनोजा ब्राह्मण असल्याबद्दल यावेळीं तोंडी जबाब व लेखी कागद बेलभंडाऱ्याच्या साधनानें घेतला. ही हकीकत इ. स. १७७६ च्या डिसेंबर महिन्याच्या ७ तारखेस घडली. परंतु इ. स. १७६५ च्या आक्टोबर महिन्याच्या १५ तारखेस कारभाऱ्यांनीं बेलभंडाऱ्याचा चौकशी-करतां जो फार्स केला होता त्याची ही अकरा वर्षांनंतर पुनरावृत्तीच होती. ती कशाकरतां होती व त्यांत त्यांना काय साधावयाचें होतें हें पुढें येईलच. परंतु येथें पूर्वीच्या चौकशीच्या फार्साची माहिती असलेलें पत्र तुलनात्मक दृष्टीनें पहाण्याकरतां येथें देणें प्राप्त आहे. हें पत्र तारीख १७ आक्टोबर सन १७६५ रोज गुरुवारीं पुण्याहून हरी गोविंद यांनीं मिरजेस गोविंद हरी यांस लिहिलेलें आहे.

८५. “ नाशिकाचें खूळ[1] पुण्यास आलें. चार पांच रोज लोकांनीं पाहिलें. परंतु कोणासही ओळख पुरेना. भवति न भवति करितां करितां कोणासच थांग न लागे. मग सर्वांनीं इत्यर्थ केला कीं, पर्वतीस जाऊन करारमदार करून टाकावा. असा करारमदार वाडियांत झाला. मग शु. १ स मंगळवारीं थोरले मुत्सद्दी व शास्त्री मिळोन गेले. पर्वतीस देवळांत जाऊन मग त्या गृहस्थास गोशाळेंतून आणिला. देवापुढें बसवून रामशास्त्री वगैरे यांनीं बोलाविला कीं, ‘तूं भाऊ तो नव्हेस. परंतु न कळे! त्यास तूं काय असेल ते खरें बोल.’ मग बेलभंडार त्याचे पुढें ठेविला. तेव्हां त्यानें साफ सांगितलें कीं, ‘ मी परिच्छिन्न कनोजा ब्राह्मण. तिकडील वतनदार. भाऊ वतनाचे कजिये करूं लागले तेव्हां मी घरांतून रुसून निघालों तो नरवरास वाणियाचे दुकानीं बसलों. तेथें

1 तोतया.

एक दोन अदमी आले त्यांनीं भाऊसारिखा दिसतोस असें बोलून मजला धरून हे नाना प्रकार केले.' मग सर्वांची निशा शपथेवरून झाली."

८६. याप्रमाणें तोतयाची रंगी तालीम कारभारी घेत होते. अशा प्रकारें तालीम देऊन तयार केलेला तोतया ता. ११ डिसेंबर सन १७७६ इ. रोजीं पंच कमिटीपुढें ठेवण्यांत आला. कमिटीनें पांच दिवसपर्यंत तोतयाची चौकशी केली. अर्थात् सत्तावीस इसमांची ती चौकशी असल्यामुळें त्यांतील प्रश्नोत्तरें भाऊसाहेबांच्या वेळच्या विविध प्रसंगासंबंधीं असतील यांत संदेह नाहीं. तारीख १७ डिसेंबर रोजीं सर्व पंच कमिटींतील पंचांची एकवाक्यता झाली व शेवटीं तो खरा तोतया ठरून त्याला पंच कमिटीनें देहांत शिक्षा ठेठावली. पार्वतीबाईंनाहीं तो दाखविण्यांत आला. त्यांनींही तो तोतया असल्याचें सांगितलें. ज्यांना ज्यांना संशय होता, त्यांना त्यांना तो दाखविण्यांत आला. दुसरें दिवशीं ह्मणजे ता. १८ डिसेंबर रोजीं सकाळीं तोतयाला गाढ्यावर घालून बाजारांतून फिरविला.[1] आणि चार घटिका दिवसास मेखसूनें डोकें फोडून मारिला. अशा प्रकारें तोतयाचा अंत झाला.

८७. पंच कमिटीच्या चौकशींत तोतयासंबंधीं एक अद्भुतरम्य गोष्ट प्रकाशांत आली. ती ह्मणजे पूर्वींच्या सर्व चौकशींत सुखलाल कनोजा ब्राह्मण ह्मणून जो ठरलेला व इतके दिवस गाजलेला जो तोतया तो बाजी[2] गोविंद या नांवाचा निघाला. ऐन चौकशीच्या शेवटीं सुखलाल या ऐवजीं बाजी गोविंद या नांवांत जी क्रांति झाली त्यांतच तोतयाच्या बंडाचें आणि नाना फडनविसांच्या अलौकिक बुद्धिमत्तेचें व चातुर्याचें रहस्य सांठलेलें आहे. ज्याप्रमाणें नांवांत फरक झाला त्याप्रमाणें जातींत व राहण्याच्या मूळ गावांत फरक पडला. एक सुखलाल कनोजा ब्राह्मण ह्मणून उत्तरेला बुंदेलखंडांत राहणारा, तर बाजी गोविंद हा सोनार जातीचा दक्षिणेंत महाराष्ट्रांत राहणारा. असा उत्तर-दक्षिणेइतका जो फरक पडला त्याच्या मुळाशीं कांहीं तरी एक खोल

---

१ ऐ. ले. सं. पान २७२०. २ नातुकृत महादजी शिंदे यांचें चरित्र

राजकारण असलें पाहिजे असा तर्क केल्यास तो अयोग्य ठरणार नाहीं. म्हणून त्यासंबंधीं दुसरे इतिहासकार व बखरीकार काय काय म्हणतात हें पहाणें इष्ट आहे.

८८. तोतयासंबंधीं सध्यां जी माहिती उपलब्ध आहे ती सर्व एकत्रित करून वाचल्यास असें दिसून येतें कीं, तोतयाच्या बंडाचा प्रारंभ रत्नागिरी-पासून झाला. त्याच्याबरोबर पेशवे दरबारनें नियोजित केलेल्या महादजी शिंद्यांनीं लढाई दिली. त्यामुळें तो पळून गेला. त्याला रघोजी आंग्र्यानें कुलाब्याजवळ जहाजांत पकडलें. तेथून त्याला पुण्यास आणलें. त्याची तेथें पंच कमिटीपुढें चौकशी झाली. चौकशींत तो तोतया ठरला व त्याला देहांत शिक्षा झाली. येथपर्यंत सर्व इतिहासकारांची एकवाक्यता आहे. परंतु तोतया हा खरा कोणत्या जातीचा होता, त्याचें खरें नांव काय होतें; त्याला देहांत शिक्षा दिली, परंतु ती कोणत्या प्रकारची होती; कोणत्या गांवीं देहांत पारि-पत्यानें त्याचा अंत करण्यांत आला; या मुख्य व महत्त्वाच्या मुद्यावर मात्र इतिहासकारांची एकवाक्यता नाहीं.

८९. या बाबतींत ग्रँट डफसाहेब आपल्या मराठ्यांच्या बखरींत[1] म्हणतात "मारिला तो ब्राह्मण होता. यास्तव पुण्यांतील ब्राम्हण आपल्या-कडे ब्रम्हहत्येचा दोष न यावा म्हणून कोणी म्हणत कीं, 'तो सोनार होता.' कोणी म्हणत कीं, 'तो ब्राम्हण होता यास्तव तो हत्तीच्या पायीं दिला नाहीं,' परंतु त्या अन्यायाची शिक्षा लोकांत दाखवावयासाठीं अहमदनगरच्या किल्ल्यांत त्यास पाठवून उपोषणादि दुःख देऊन मारिला; आणि तेथें कोणी एक सोनार महा अपराधी होता त्यास जिवें मारावें अशी आज्ञा झाली होती, तो त्या सदोबाबद्दल मारिला." या माहितीप्रमाणें ब्राम्हण तोतयास पुण्यास मारलें नाहीं. त्याच्या ऐवजीं एका सोनारास नगरच्या किल्ल्यांतून आणून पुण्यास हत्तीच्या पायाखालीं देऊन मारलें असें डफसाहेबांचें म्हणणें आहे. खऱ्या तोतयास नगरच्या किल्ल्यावर

१ मराठ्यांची बखर पान २५५.

उपोषणादि दुःख देऊन मारलें. पेशव्यांच्या[1] बखरींत निराळीच माहिती आहे. 'कोणाची ओळख भाऊसाहेब म्हणून पुरली नाहीं. असें झालें. नंतर तोतयास कैद करून पायांत बिडी ठोकून किल्ले सिंहगड येथें पोंचविलें. त्याच्या अगोदर सखारामबापू त्याच किल्लयावर होते. तेथें तोतयास पोंचविलें. तोतयाचा अंत किल्लयावर झाला.' या माहितीवरून तोतया सिंहगडावर मेला असें होतें. खरे शास्त्रयांनीं प्रसिद्ध केलेलें पटवर्धनांचें दप्तर पाहिलें तर त्यांत तोतयास पुण्यास मेखसूखालीं ठार मारलें असें आहे. अर्थात् डफच्या माहितीप्रमाणें हत्तीच्या पायाखाली दिलेलें नाहीं. एकंदरींत तोतयाच्या मृत्यूची ठिकाणें पुणें, अहमदनगर व सिंहगड हीं जशीं तीन दाखविण्यांत येतात त्याचप्रमाणें हत्तीच्या पायाखालीं देऊन मारलें, मेखसूखालीं डोकें फोडून मारलें व उपोषणादि दुःख देऊन मारलें अशा तीन प्रकारच्या तोतयाच्या पारिपत्याच्या शिक्षा दिसतात. वस्तुतः ज्या ठिकाणीं मतभेद होण्याचा संभव नाहीं त्या ठिकाणींच बरोबर मतभेद आहे. अर्थात् राजकारणी मुत्सद्यांच्या कारस्थानाचीं मुळें त्याच ठिकाणीं आहेत हें उघड दिसतें.

९०. तोतयाला देहांत शिक्षा दिल्यानंतर लगेच एक दोन दिवसांत 'तोतया पतित ह्मणून त्याच्या पंक्तीला जे जे ब्राम्हण जेवले त्यांना त्यांना प्रायश्चित्तें देण्याचें फर्मान त्या वेळेचे धर्ममार्तंड रामशास्त्री प्रभुणे यांनीं काढलें. तीं प्रायश्चित्तें किती भयंकर स्वरूपाचीं होतीं हें खालील तपशिलावरून दिसून येईल. हीं प्रायश्चित्तें पेशवे सरकाराच्या वट हुकुमान्वयें देण्यांत आलीं होतीं. परशुरामभाऊ पटवर्धन यांना जो हुकूम[2] गेला तो खालीलप्रमाणें आहे.

श्री.

(मार्ग, शु. ११–२१ डिसेंबर १७७६)

९१. राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री परशुराम रामचंद्र स्वामी गोसावी यांसीः— पोष्य माधवराव नारायण प्रधान. नमस्कार विनंति

---

१. पेशव्यांची बखर पान १०६. २ ऐ. ले. सं. नं. १९५१.

उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें. विशेष. सुखनिधान तोतया पतित जंजिरे रत्नागिरीस अटकेंत होता. त्यास तेथील कमाविसदारकडील कारकून शिवाजी अपाजी वगैरे ब्राम्हण मिळून तोतयाची बेडी तोडून कोंकणांत दंगा माडिला. त्याजवरून हुजरून फौज पाठऊन तोतयास व त्याचे मिलाफी शिवाजी आपाजी वगैरे होते, ते धरून आणून त्याचे पारिपत्य केलें. परंतु तोतयाकडे कोंकणांतील व देशांतील जागा जागांचें ब्राम्हण गेले होते त्यांचा शोध लावून ज्यांणीं तोतयाचे पंक्तीस प्रत्यक्ष अन्नव्यवहार केले असतील त्याजला व तोतयाची श्रावणी ज्या ब्राम्हणांनीं केली ते व श्राद्ध पक्षाचा क्षण ज्यानीं घेतला असेल त्या ब्राम्हणांस तूर्त प्रायश्चित्त द्यावयाचें नाहीं त्यांणीं कोणाचे पंक्तीस व त्याचे पंक्तीस कोणी अन्नव्यवहार करूं नये. त्याचे पंक्तीस ज्यांणीं अन्नव्यवहार केले असतील त्यांस व त्यांचे संसर्गीयांस यथोक्त प्रायश्चित्त मार्गशीर्ष कृ० १४ स देऊन शुद्ध करावें. याप्रमाणें निश्चय करून हें पत्र तुह्मांस लिहिलें असे. तरी येविशींचा शोध लष्करांत करून ज्यांनीं पतित तोतयाचें पंक्तीस प्रत्यक्ष अन्नव्यवहार केले असतील त्यांणीं व तोतयाची श्रावणी ज्या ब्राम्हणानें केली व श्राद्धपक्षाचा क्षण ज्यांनीं घेतला त्या ब्राम्हणांनीं कोणाचे पंक्तीस व कोणी त्याचे पंक्तीस ते शुद्ध होत तोंपर्यंत अन्नव्यवहार करूं नये. याप्रमाणें ताकीद करून वरकड संसर्गी यांसी मार्गशीर्ष व॥ १४ स प्रायश्चित्त द्यावयाचीं कलमें

९२, वीं तपशील:—

पतितपंक्तीस प्रत्यक्ष जेविले त्यांचे पंक्तीस ज्यांणीं अन्नव्यवहार केले असतील त्यांस.

एक वेळ केला असेल त्यांस अर्ध प्राजापत्य व बहुत वेळां केला असेल त्यांस प्राजापात्य प्रायश्चित्त. मुंडणपूर्वक प्राजापत्य प्रायश्चित्त. कलम १.

पतितपंक्तीस जेविले त्यांचे पंक्तीस ज्यांणीं अन्नव्यवहार केला त्यांची पंगत ज्यांस जाहली असेल त्यांस.

एक वेळ पंगत जाहली त्यांची पंक्ती ज्यांस एकच वेळ झाली असेल त्यांजला उपोषणपूर्वक पंचगव्य व बहुत वेळ जाहली असेल त्यांस पाद प्राजापत्य प्रायश्चित्त कलम १

बहुत वेळ पंक्ती जाहली त्यांची पंक्ती एक वेळ ज्यांस झाली असेल त्यांस पाद प्राजापत्य प्रायश्चित्त. बहुत वेळ जाहली असेल त्यांस अर्ध प्राजापत्य प्रायश्चित्त कलम १

सदरहुचे संसर्गी असतील त्यांस पंचगव्य. कलम १

९३. येणेंप्रमाणें यथाशक्ति प्रायश्चित्त देऊन शुद्ध करणें आणि शुद्ध केल्याचें वर्तमान व या खेरीज ज्यांकडे दोष बहुत असोन थोडका असें मिथ्या बोलून पंचगव्य घेतलें असें ह्मणेल अगर याप्रमाणें बोलून घेईल त्याजपासोन गुन्हेगारी घेऊन त्याची नांवनिशी हुजूर लिहून पाठविणें. सर्वत्र प्रायश्चित्त एकच दिवशीं सदरहु तिथीस द्यावयाचा निश्चय केला असे. तरी सदरहु लिहिल्या तिथीसच प्रायश्चित्त देवविणें. जाणिजे छ. ९ जिलकाद सुरु सन सब्बा सैबन. मय्या व अलुफ बहुत काय लिहिणें हे विनंती.

९४. पेशवे सरकारच्या वरील हुकुमाप्रमाणें तोतया–पतिताच्या प्रत्यक्ष पंक्तीला भोजन केलेले, श्राद्ध पक्षाचे क्षण घेतलेले ब्राम्हण खेरीज करून त्यांचे संसर्गी, संसर्ग्यांचे संसर्गी वगैरे ब्राम्हणांना मार्गशीर्ष व॥ १४ रोजीं ठिकठिकाणच्या क्षेत्राच्या जागी गोळा करून सक्तीनें प्रायश्चित्तें देण्यांत आलीं. तोतया पतित याच्या पंक्तीला ज्या ब्राम्हणांनीं अन्नव्यवहार केला असेल अशा ब्राम्हणांच्या पंक्तीला जे ब्राम्हण अनेक वेळां जेवले असतील त्यांना मुंडणपूर्वक प्राजापत्य प्रायश्चित्त देण्यांत आलें. या प्रायश्चित्ताचें लक्षण मनुस्मृतींत देण्यांत आलें आहे तें असें:[1]

९५. त्र्यहं प्रातस्त्र्यहं सायं त्र्यहमद्यादयाचितं ॥
त्र्यहं परं च नाश्नीयात्प्राजापत्यं चरन् द्विजः ॥

---

१. मनुस्मृती प्राकृत भाषांतरासहित पान ४०४ श्लोक २११

प्राजापत्य प्रायश्चित्ताचें लक्षण—प्राजापत्य कृच्छ्र करणारा जो द्विज त्यानें तीन दिवस प्रातःकाळीं, तीन दिवस सायंकाळीं भोजन करावें; तीन दिवस अयाचित्त भोजन करावें; आणि शेवटीं तीन दिवस उपवास करावा. ग्रासांची संख्या व प्रमाण सांगतो— सव्वीस ग्रास प्रातःकाळीं बत्तीस ग्रास सायंकाळीं, अयाचिताचें ठायीं चोवीस. ग्रास कुक्कुटांडप्रमाण, अथवा जेवढा मुखांत जाईल तेवढा ग्रास घ्यावा, हविष्यान्न भोजन करावें. इतर पदार्थ भक्षण करूं नये.

९६. याप्रमाणें बारा दिवसांचें मुंडणपूर्वक प्रायश्चित्त ब्राम्हणांना देण्यांत आलें. अर्धप्राजापत्य व पाद प्राजापत्य हें प्राजापत्याच्या विभागाप्रमाणें होतें. परंतु सरकारी ताकीदपत्रांत तोतयाचें अन्न खाऊन माजलेल्या ब्रम्हणांची चरबी आंटविणारें प्रत्यक्ष काळभैरवाच्या सोट्याप्रमाणें एक कलम होतें. तें ह्मणजे ‘ ज्यांकडे दोष बहोत असोन थोडका असें मिथ्या बोलोन पंचगव्य घेतलें असें म्हणेल अगर त्याप्रमाणें बोलोन घेईल त्याजपासोन गुन्हेगारी घेऊन त्याची नांवनिशी हुजुर लिहून पाठविणें. ’ अर्थात् हें कलम गुन्हेगारीचें असल्यामुळें केव्हां कोणत्या ब्राम्हणावर कोणत्या अधिकाऱ्याची कशी गदा पडेल, याची भीति प्रत्येक ब्राम्हणास वाटत असल्यामुळें अल्प गुन्हा असून सुद्धां बिचाऱ्या ब्राम्हणांना पुढील आपत्ति टाळण्याकरतां मोठ्या गुन्ह्याबद्दलचें प्रायश्चित्त घ्यावें लागलें असेल यांत शंका नाहीं. एकंदरींत या प्रायश्चित्ताच्या द्वारें कां होईना नाना फडनविसांनीं महाराष्ट्रांतल्या ब्राम्हणांची यथास्थित चरबी पातळ केली यात शंका नाहीं.

९७. तोतयाच्या पंक्तीस ज्यांनीं ज्यांनीं प्रत्यक्ष अन्नव्यवहार केला होता व तोतयाची श्रावणी ज्या ब्राम्हणांनीं केली होती आणि ज्यांनीं श्राद्ध पक्षाचा क्षण घेतला होता, त्या ब्राम्हणांना तूर्त प्रायश्चित्तें न देतां कित्येक दिवस बहिष्कारांत गटगळ्या खात टाकण्यांत आलें होतें. या अव्वल दर्जाच्या आरोपींना ज्या वेळीं प्रायश्चित्तें दिलीं त्या वेळीं तीं जबरच दिलीं

यांत शंका नाहीं. कारण कीं, व्यंकटराव घोरपडे यांस तोतयाचा अव्वल दर्जाचा संसर्ग घडल्याची जरी खात्री नव्हती, तरी सुद्धां त्यांना तीन चांद्रायणें सुवर्णप्रत्याम्नायें बाराशें रुपयांचें प्रायश्चित्त नेमून तें कृष्णातीरीं क्षेत्र खिद्रापूर येथें घेण्याबद्दल रामशास्त्री यांनीं आज्ञा केली होती. चांद्रायण प्रायश्चित्ताचें लक्षण खालीं दिल्याप्रमाणें आहे:—

९८. एकैकं ऱ्हासयेत्पिंडं कृष्णे शुक्ले च वर्धयेत् ।
उपस्पृशंस्त्रिषवणमेतच्चाद्रायणं स्मृतम् ॥ १ ॥ मनुस्मृति.

चांद्रायणाचें लक्षण—त्रिकाल स्नान करून दररोज एकेक ग्रास कृष्णपक्षांत कमी करावा. आणि शुक्लपक्षांत दररोज एकेक ग्रास वृद्धिंगत करावा. म्हणजे शुक्लपक्षाच्या पौर्णिमच्या दिवशीं पंधरा ग्रास भोजन करावें, आणि कृष्णपक्षी प्रतिपदेपासून एक एक ग्रास कमी करावा. याप्रमाणें चतुर्दशीचे दिवशीं एक ग्रास भोजन करावें, व आमावास्येच्या दिवशीं उपोषण करावें. शुक्ल प्रतिपदेपासून एकेक ग्रास वृद्धिंगत करावा, पौर्णिमेच्या दिवशीं पंधरा ग्रास भोजन करावें. ह्याला पिपीलिका मध्य चाद्रायण ह्मणतात. पिपीलिका (मुंगी) जशी मागेंपुढें मोठी व मध्यें सूक्ष्म असते तद्वत् हें व्रत आहे.

९९. वरील प्रमाणें चांद्रायण प्रायश्चित्त एक महिन्याचें आहे. व्यंकटराव घोरपडे यांना अशीं तीन चाद्रायणें सांगितली. एका चांद्रायणाचा महिन्याच्या अन्नाचा आढावा काढला तर एका महिन्यात दोनशें पंचेवीस ग्रास अन्न देण्यांत येतें. म्हणजे एका दिवसाला सरसकट साडेसात घास अन्न मिळतें. याप्रमाणें तीन महिने व्यंकटराव घोरपडे याना रोज साडेसात घांस अन्नावर ठेवण्यात आलें होतें. शिवाय रोज त्रिकाळ स्नान. सरदी, खोकला, पडसें, ताप वगैरे विकारांतही त्रिकाळ स्नानाला बंदी नाहीं. अशा घोर व प्राणांतिक प्रायश्चित्तांतून आयुष्याची दोरी बळकट असेल तरच मनुष्य जगावयाचा. सध्यांच्या खुनी किंवा दरवडेखोर आरोपींनासुद्धां इतक्या कडक रीतीनें व निर्दयपणानें वागविण्यांत येत नाहीं. इतकें घनघोर शासन जर पेशव्यांचे जे निकट संबंधी, आप्त, जहागीरदार व बडे सरदार, त्या व्यंकटरावांना दिलें तर

इतराना किती भयंकर स्वरूपाची शिक्षा दिली गेली असेल हें कल्पनेनेंच ओळखलेलें बरें.

१००. प्रायश्चित्ताच्या ताकीदपत्रांत एका गोष्टीचा खुलासा नसल्यामुळें प्रायश्चित्ताची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांना त्याचा वाटेल तो अर्थ करून सांवळागोंधळ घालता येण्यासारखा होता. तोतया—पतित याच्या संसर्गाचे संसर्गी जे असतील त्यांना मुंडणपूर्वक प्राजापत्य प्रायश्चित्त देण्याचा हुकूम होता. अर्थात् या संसर्गी ब्राम्हणांत त्यांच्या बायकाही होत्या. बायकांकरतां निराळें प्रायश्चित्ताचें कलम नाही. तेव्हा पुरुषांबरोबर त्यांच्या सुवासिनी बायकांचेंहि मुंडण करण्यांत आले किंवा काय ही शंका राहतेच. अशा स्थितींत प्रायश्चित्त देणाऱ्या अंमलदारांनी काय काय अनर्थ घडवून आणले असतील, ते फक्त परमेश्वरालाच माहीत. ताकीदपत्राचा मसुदा रामशास्त्र्यांच्या हातचा होता. त्याची अंमलबजावणी लष्करी अधिकाऱ्यांकडून होणार होती, हें ते जाणून होते. लष्करी अधिकारी हे धर्मशास्त्र जाणणार धर्ममार्तंड नव्हते, हेंही त्यांना माहीत होतें. हातांत पडलेल्या हुकुमाचा सरळ अर्थ करून शब्दशः त्याची अंमलबजावणी करणें, हेंच लष्करी अधिकाऱ्यांचें काम. तेव्हा संसर्गी ब्राम्हणांबरोबर त्याच्या स्त्रियांनाही मुंडणपूर्वक प्रायश्चित्तें देण्यात आली असल्यास नवल वाटण्यासारखें नाही. एकंदरींत अशा भयंकर प्रायश्चित्तांचा वरवंटा बृहन्महाराष्ट्रातील ब्राह्मणांवर नानानीं फिरविला व त्याची हाडं खिळखिळीं केलीं एवढी गोष्ट मात्र सत्य आहे.

१०१. पण हीं प्रायश्चित्तें का? तोतया हा जर कनोजा ब्राम्हण होता, तर त्याची पंगत झाल्यामुळें कोणतें पातक घडलें? पंक्तीला न जेवतां येण्यासारखा तोतया पतित कसा? ब्राम्हणानें ब्राम्हणाच्या पंक्तीला जेवणें हें कांहीं महापातक नव्हे. रामशास्त्रीही काशीला वेदशास्त्राचें अध्ययन करण्याकरतां होतेच. त्याना कनोजा ब्राम्हणाचा सहवास झाला असला पाहिजे यांत शंका नाहीं. नाना फडनविस यांना तर कनोजा ब्राम्हणाचा सहवास त्यांच्या राहत्या वाड्यातच चौवीस तास होता. घाशीराम कोतवाल हा कनोजा ब्राम्हणच. तो

नानांचा कंठमणी. नानांचा वाडा हें त्याचें मुख्य वसतिस्थान. त्याचा बालेकोट किल्ला म्हणजे नानांचा वाडा. घाशीरामाची मुलगी ललितागौरी ही नाना फडनविसांची प्रेमसंबंधाची राणी होती. तेव्हां कनोजा ब्राम्हणाचा संसर्ग इतर ब्राम्हणांपेक्षां नानाना जास्त होता. तेव्हां पंक्तीमुळें होणारा संसर्ग मोठा किंवा पापाचरणानिमित्त केलेला संसर्ग मोठा हा प्रश्न धर्मशास्त्राचा आहे. येथें त्याचें प्रयोजन नाही. तरी कनोजा ब्राम्हणाच्या पंक्तीला जेवल्यामुळें सरकारी ताकीद-पत्रातील प्रायश्चित्तें दिलीं गेलीं, ही गोष्ट मात्र धर्मशास्त्राला व रूढीला धरून नाहीं. तोतया कनोजा ब्राम्हण असल्यामुळें तो पतित नव्हता, तर तो अन्य कमी जातीचा होता म्हणूनच तो पतित मानला गेला, हीच गोष्ट खरी ठरते.

१०२. या बाबतींत खरेशास्त्र्यांनीं आपल्या अधिकारयोग पुस्तकांत शंका प्रदर्शित केली आहे. ' तोतया जातीनें कनोजा ब्राम्हण असून त्याचें नांव सुखनिधान असें होतें. वर सांगितलेलीं प्रायश्चित्तें कनोजाच्या संसर्गा-बद्दल झालेलीं नव्हत, तर ' सुखनिधान तोतया पतित ' याच्या संसर्गाबद्दल होत. पण तोतया कोणत्या पातकानुळें ' पतित ' ठरला ? राजद्रोहामुळें[1] ? '

१०३. पेशवाईंत जसे रामशास्त्री मोठे पंडीत होते तसेंच सध्यांच्या काळीं खरेशास्त्री हे खरेच विद्वान् पंडीत होते. काळाच्या फरकामुळें अधिकारात व परिस्थितींत फरक पडला एवढेंच. या उभय शास्त्रयांच्या विद्वत्तेंत व कर्तबगारींत पूर्ण साम्य होतें, यात कोणाचे दुमत होणार नाहीं. अशा विद्वान् शास्त्रयानीं ' तो जर कनोजा ब्राह्मण होता, तर प्रायश्चित्तें कां ? ' अशी शंका प्रदर्शित केली. कनोजा ब्राह्मण तो होता तर त्याच्या पंक्तीला जेवल्यामुळें प्रायश्चित्ताला ब्राह्मण पात्र ठरत नाहींत ही गोष्ट खरेशास्त्रयांना मान्य आहे. मग ज्याअर्थीं प्रायश्चित्तें दिलीं गेलीं त्याअर्थीं तीं दुसऱ्या कोणत्या तरी गुन्ह्याकरतां असावी. तो गुन्हा कोणता ? तर खरेशास्त्रयाच्या समजुतीप्रमाणें तो राजद्रोहाचा असेल अशी फक्त शंका काढून ते स्वस्थ

---

१. अधिकारयोग पान ४९.

बसलें. अर्थात् या बाबतींत निर्णय देण्याला त्यांना ऐतिहासिक साधनसामुग्री पुरेशी मिळाली नाहीं.

१०४. राजद्रोहामुळें तोतया पतित झाला ही शास्त्रीबुवांची शंका तोतयाचे संसर्गी जे केवळ ब्राह्मण त्यानाच प्रायश्चित्तें दिलीं या एका गोष्टीवरूनच खोटी ठरते. राजद्रोहाचा संसर्ग केवळ ब्राह्मण जातीलाच भोंवतो, तो इतर जातीला भोंवत नाहीं असे नाहीं. राजद्रोहाच्या संसर्गाला जात ना गोत. राजद्रोहाचा संसर्ग ह्मणजे काळभैरवाचा सोटा. पण तो ज्याअर्थी केवळ एकट्या ब्राह्मण जातीच्या पाठींत बसला त्याअर्थीं तो खास राजद्रोहाच्या गुन्ह्याकरतां नव्हता, हें निश्चित आहे. तेव्हां तोतया हा दुसऱ्याच कोणत्या तरी कारणाकरतां पतित असला पाहिजे हें निश्चित होतें. ऑनरेबल विष्णु रघुनाथ नातू वकील यांनीं जें महादजी शिंदे यांचें चरित्र लिहिलें आहे, त्यांत ते ह्मणतात[1] 'या तोतयाची चौकशी उघड रीतीनें पांच दिवसपर्यंत अप्तन साहेबाच्या समक्षच झाली. शेवटीं तो भाऊ नव्हे, केवळ तोतयाच असें ठरलें, व त्यास ता. १७ डिसेंबर १७७६ रोजीं देहांत शिक्षा दिली. याचें खरें नांव बाजी गोविंद असें होतें.' ऑनरेबल नातूसाहेबांनी दिलेल्या या माहितींत विशेष महत्व सांठविलेलें आहे. सुखनिधान हा कनोजा ब्राह्मण, परंतु चौकशीच्या वेळीं तो बाजी गोविंद निघाला. यावरून नाना फडनविसांच्या बुद्धिमत्तेची गुरुकिल्ली काय होती आणि शिक्षा देण्याच्या कामीं रामशास्त्रयांच्या धर्मभावनेचा तीव्रतरपणा कां झाला हें दिसून येणार आहे. बाजी गोविंद हा जातीनें सोनार होता. अर्थात् एका सोनारानें आपली जात लपवून आपण ब्राह्मण आहों असें लोकांना भासविलें व त्यांना फसविलें ह्मणून तो पतित, व सोनाराच्या पंक्तीला ब्राम्हण जेवले, त्याची ब्राम्हणांनीं श्रावणी केली, श्राद्धपक्षाचे क्षण घेतले, ह्मणून ते ब्राम्हण जातींतून धर्मशास्त्राप्रमाणें बहिष्कृत झाले. ह्मणून त्यांना प्रायश्चित्तें देण्यांत आलीं हाच त्याचा इत्यर्थ आहे.

---

१ पान १२७.

१०५. सुखनिधान कनोजा ब्राम्हण म्हणून पेशवे सरकारतर्फे गेलीं अकरा वर्षे व्यवहार चालू असतांना पंचकमिटीच्या ऐन चौकशीच्या वेळीं तो बाजी गोविंद सोनार निघाला या अद्भुतरम्य गोष्टीशीं नाना फडनविस यांचें गुप्त कारस्थान निगडित आहे.

१०६. पुरंदर किल्ल्यावर गंगाबाईंना गरोदरपणीं नेऊन ठेवल्यानंतर, तिच्या प्रसूतीच्या वेळी, तिला मुलगा न झाल्यास प्रसंगविशेषीं मुलाची अदलाबदल करतां यावी म्हणून, नानानी त्या सुमारास प्रसूत होणाऱ्या बऱ्याच स्त्रिया गुप्त रीतीनें तेथें नेऊन ठेवल्या होत्या. हें त्यांचें धोरण त्यांनीं तोतयाच्या चौकशीच्या वेळींहीं ठेवलें होतें. हरिपंत फडके यांचे बंधु पानिपतच्या लढाईंत पडले होते. परंतु त्याचाही एक तोतया निर्माण झाला होता. त्यालाही नानांनीं यावेळीं पुण्यास आणून ठेवलें होतें.[१] त्याला ता. १७ डिसेंबर सन १७७८ रोजीं पुण्यास हत्तीच्या पायाखाली देऊन मारलें. त्याचप्रमाणें इ. स. १७६९ सालीं कर्नाटकांत ज्या सदाशिवरावभाऊंच्या तोतयानें बंड केलें व ज्याला नानांनी देहान्त शिक्षा सांगितली असताही त्याला न मारतां नगरच्या किल्ल्यावर कैदेंत ठेवलें होतें, त्यालाही त्यांनी पुण्यास आणविलें. तो भाऊसाहेबांप्रमाणेंच दिसत होता. याचा नानांनीं फायदा घेऊन खऱ्या भाऊसाहेबांना कैद करून सिंहगड किल्ल्यावर पाठविलें व नगरच्या किल्ल्यांतील त्या तोतयाला भाऊसाहेबांच्या जागीं उभा केला. तो जातीचा सोनार होता. त्याचें नांव बाजी गोविंद असें होतें. मनुष्याची अदलाबदल करून या चौकशीच्या कामीं नानांनीं सर्वांवर मात केली व आपलें गुप्त कारस्थान यशस्वी केलें.

११७. खरे सदाशिवरावभाऊ असतां मध्यंतरी त्यांना माधवराव पेशवे व त्यांचे मुत्सद्दी यांनीं जे कनोजा ब्राह्मण ठरविलें त्याचीही उपपत्ति येथें देणें वाजवी आहे. काशीला एका तोतयानें बंड केलें होतें, हा इतिहास मागें आलाच आहे. त्याच्यावर शिंद्यांचा दिवाण जिवबादादा बक्षी यानें

१ ऐ. ले. सं. पत्र नं. १९४७.

स्वारी करून त्याचा मोड केला व त्याला पकडून चुनारगडच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. तो कैदेंत असतांच गोरखपूरच्या किल्ल्यांत मरण पावला. त्या तोतयाचें नांव सुखनिधान. तो छत्रपूरचा राहणारा होता त्या तोतयाची माहिती महाराष्ट्रांत फारशी नव्हती. महादजी शिंदे यांच्याकडून त्याच्या नांवाची व पत्त्याची माहिती फक्त माधवराव पेशवे व त्यांचे मुत्सद्दी यांनाच मिळाली असल्यानें, खऱ्या भाऊसाहेबाना तोतया ठरवितांना त्यांनीं त्या माहितीचा उपयोग करून घेतला. शिवाय तो गोरखपूरच्या किल्ल्यांत मेला असल्यामुळें त्याचे नांव खऱ्या भाऊसाहेबांना देण्यांत धोका नव्हता. त्यांना मयत तोतयाचें नांव देण्यांत इ. स. १७७६ मध्यें नानांनीं आपला दूरदर्शीपणा दाखविला होता; व त्याच्या जोरावर खऱ्या भाऊसाहेबाना त्यांनीं अकरा वर्षे तोतया ह्मणून झुलविले होतें.

१०८. 'तो (सदोबा) ब्राह्मण होता यास्तव तो हत्तीच्या पायीं दिला नाहीं, परंतु त्या अन्यायाची शिक्षा लोकांत दाखवायासाठीं अहमदनगरच्या किल्ल्यांत त्यास पाठवून उपोषणादि दुःख देऊन मारिला, आणि तेथें कोणी एक सोनार महाअपराधी होता. त्यास जिवे मारावे अशी आज्ञा झाली होती, तो त्या सदोबाबद्दल मारिला.' असें डफसाहेबाचें ह्मणणें आहे. खऱ्या सदोबाला पुण्याला न मारता त्याच्या जागीं नगरच्या किल्ल्यांतील एक महाअपराधी सोनार आणला व त्याला पुण्याला मारला. ह्मणजे फक्त मारण्याच्या वेळी अदलाबदल केली एवढेंच विधान त्यांनीं केलें आहे. परंतु तें चुकीचें आहे. कारण मारण्यापुरतीच जर अदलाबदल झाली असती तर रामशास्त्रयांनीं जें सरकारतर्फे प्रायश्चित्ताचे फर्मान काढलें ते काढलें नसतें. चौकशींत तो सोनार जातीचा निघाला ह्मणूनच त्यांना दहा अकरा वर्षे संसर्ग झालेल्या सर्व ब्राह्मणांना प्रायश्चित्तें घ्यावीं लागलीं. अर्थात् केवळ मारण्यापुरती नगरच्या सोनार महाअपराध्याची अदलाबदल केली नाहीं, तर ती अदलाबदल पचकमिटीपुढें उभें करण्याच्या वेळेपासून केली हेच खरें ठरतें. या सोनार तोतयाला चौकशीकरतां उभें

करावयाचें होतें, ह्मणूनच त्याच्याकडून कनोजा ब्राह्मण असल्याबद्दल त्याचा स्वदस्तुरचा लेख लिहून घेणें, त्याच्याकडून छत्रपूरच्या सुखनिधान कनोजाची माहिती पाठ करून घेणें, त्याच्या बापाचें, आईचें, आजीचें नांव घोकविणें वगैरे जे रंगी तालमीचे प्रयोग होत होते, ते तेवढ्याकरतांच होते. कर्नाटकांतला सोनार भाऊसाहेबांची भूमिका साधारणपणें पार पाडील, परंतु त्याच्यावर सक्तीनें जर एकाच वेळीं करण्याची कनोजा ब्राम्हणाची उत्तरहिंदुस्थानी दुसरी भूमिका नानांनीं लादली तर ती थोडक्याच दिवसांत कशी तयार होणार ? चौकशी कमिटीपुढें होणारी प्रश्नोत्तरांची नक्कल पाठ होऊं शकेल, पण अभिनय व हिंदुस्थानी भाषा एकदम कशी अंगवळणी पडणार ! पचकमिटींतलि सत्तावीस इसमांच्या प्रश्नोत्तरांनीं तो गडबडला व शेवटीं आपल्या खऱ्या जातीवर गेला. तो बाजी गोविंद जातीचा सोनार ठरला ह्मणून तोतयाच्या बंडांतून प्रायश्चित्ताचें बंड उत्पन्न झालें.

१०९. एका मनुष्याची अदलाबदल करून नानांनी केवढी क्रांति घडवून आणली हें वरील हकीकतीवरून जरी लक्षात येण्यासारखें असलें, तरी ती अदलाबदल अत्यंत गुप्त स्वरूपाची व बुद्धिचातुर्याची होती व ती यशस्वी रीतीनें घडवून आणण्यांत नानांनीं जें आपलें अमर्याद कौशल्य व साहस दाखविलें त्याची येथें थोडी कल्पना देणें जरूरीचें आहे. सदाशिवरावभाऊ यांना खरे ह्मणण्यामध्यें अनुबाई व्यंकटराव घोरपडे, पार्वतीबाई, रामचंद्र नाईक, व त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाई, कोल्हटकर, हरबाणा पटवर्धन, शिवाजीपंत परांजपे, धोंडोपंत रत्नागिरीचे कारभारी, रामचद्र गणेश, नारो शंकर, हरिपंत फडक्यांचा पुतण्या वगैरे वगैरे जे बडे-बडे लोक होते त, व गेलीं दहा वर्षे जे शास्त्रीपंडीत व याज्ञिकी करणारे ब्राम्हण भाऊसाहेबांच्या श्रावणीकरतां किंवा श्राद्धपक्षाच्या अगर अन्यधर्म कृत्यांच्या निमित्तानें त्यांच्याशीं सहवास करीत होते ते तोतयाला खरे भाऊसाहेब असें ह्मणत होते आणि त्यामुळेंच तोतयाला सर्व महाराष्ट्रांत

खरे भाऊसाहेब असें प्रसिद्धीकरण मिळालें होतें, तें खोटें ठरवितील अशी एक जबाबदार पंच कमिटी नानांनीं नियोजित केली. त्या पंचकमिटींत आपल्या अर्ध्या वचनांत वावरणारे, रामशास्त्री, काशीनाथशास्त्री, कृष्णराव बल्लाळ, धोंडोबा पुरंदरे, हरिपंततात्या, गुरुजी वगैरे पंच ठेऊन बाकीचे यांची री ओढणारे असेच लोक नेमले. नानांवर विश्वास ठेवणारे असेच ते सर्व पंच होते. यांत पंचांचीं फसगत होईल असें कांहीं कारस्थान नाना करतील अशी कोणालाच शंका नव्हती. त्यामुळें प्रत्येक पंच आपण द्यावयाच्या न्यायाबद्दल आत्मविश्वास बाळगीत होता. मनुष्याची अदलाबदल करून पहिल्यानें नानांनी सर्व पंचांचीं चुटकीबरोबर फसगत केली. त्यामुळें अर्थात् न्यायाचा कांटा अन्यायाचा ठरला. परंतु पंच-कमिटींतील पंचांचा आजपर्यंचा नांवलौकिक व ॲप्टन साहेबासारखा त्रयस्थ मोठा इसम चौकशीचे काम बरोबर झालें कीं नाहीं हें पाहणारा, या सर्व गोष्टीमुळें तोतयाच्या चौकशींत तो खरा तोतया ठरला, यावरच लोकांचा विश्वास जास्त बसला. चौकशी कमिटी जास्त विश्वासार्ह, ह्मणून तिची चौकशी खरी व अनुबाई वगैरे मंडळी तेवढी मोठी व अधिकारी नाहींत ह्मणून त्यांची चौकशी खोटी, आपमतलबी, स्वार्थी किंवा बंडखोर अशी सहजच ठरली. ही जादू केवळ नानांनीं केलेल्या मनुष्याच्या अदलाबदलीनें झाली. नाना जादुगार होते ह्मणूनच ते मुत्सद्यांचे मेरुमणी बनले.

११०. नानांनीं सदाशिवरावभाऊ यांच्या जागीं सोनार तोतया आणून उभा करण्याचा जो एक मुत्सद्देगिरीचा पाताळयंत्री दगड फेकला त्यानें त्यांनीं अनंत फळें पाडलीं. त्यांतील कांहीं खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

१११. (१) तोतयाची पुण्यास चौकशी होण्यापूर्वी, ' सदोबांस आमच्या स्वाधीन करावें नाहीं तर आम्हीं तुमच्यावर स्वारी करूं ' अशी मुंबईचे गव्हर्नर हॉर्नबीसाहेब यानी आंग्रे यांना ज्याप्रमाणें तंबी दिली होती त्याचप्रमाणें त्यांनीं पुणें दरबाराला सदाशिवरावभाऊ खरे[1] असल्या-

---

१. नातूकृत महादजी शिंदे पान १२७.

बद्दल एक सडेतोड पत्र लिहिलें होतें. नानांनीं सदाशिवरावभाऊ यांना चौकशी कमिटीकडून तोतया ठरविल्यामुळें त्यांनीं मुंबईच्या गव्हर्नरावर जय मिळविला; त्यामुळें न्यायी म्हणून जी इंग्रजांची ख्याति होती त्याला हरताळ फांसला गेला. राघोबादादांना मदत केल्याबद्दल कलकत्ता सरकारकडे तक्रार करून जसे थोड्याच दिवसांपूर्वीं हॉर्नबीसाहेबांना त्यांनीं तोंडघशीं पाडलें होतें, तसेंच या वेळीं सदाशिवरावभाऊंना तोतया ठरवून नानांनीं त्यांचें चांगलेंच नाक कापलें. या तोतयाच्या प्रकरणामुळें मुंबई सरकारची नाचक्की झाली व आंग्र्यांवरील युद्धप्रसंग टळला. हा एक फारच मोठा फळाचा घोंस नानांनीं पाडला.

११२ (२) इ. स. १७६५ पासून १७७६ पर्यंत सदाशिवरावभाऊ कैदेंत होते. परंतु त्याची भेट पार्वतीबाई यांना घेऊं दिली नाहीं. शेवटीं पंचकमिटीच्या निर्णयानतर त्यांना तो तोतया दाखविण्यांत आला. अर्थात् पार्वतीबाईंनीं तो तोतया असल्याचें सांगितलें. या घडवून आणलेल्या गोष्टीमुळें ज्याअर्थी पार्वतीबाई तोतयाला नवरा नव्हे असे म्हणते, त्याअर्थी अनुबाई, रामचंद्र नाईक, पार्वतीबाईंचा भाऊ कोल्हटकर वगैरे भाऊसाहेबाचे आप्त व त्याच्या पक्षाचे सर्व लोक लबाड, स्वार्थी, बंडखोर आहेत असे जगाच्या निदर्शनाला नानांनीं आणून दिलें. पेशव्यांच्या आप्त मंडळींना तोंड दाखवायला जागा उरली नाहीं. नानांनीं सदाशिवरावभाऊंना तोतया ठरवून घरगुती आप्त मंडळींचा कलह—किल्ला पार जमीन दोस्त करून टाकला. हाही एक फार मोठा फळांचा घोंस नानांनी पाडला.

११३ (३) राघोबादादाप्रमाणें पेशव्यांच्या गादीवर कारभारीपणाचा वारसाहक्क सांगणारा एक राजपुरुष नाहीसा केला. त्यामुळे पेशवाईचा कारभार नानांच्या हातीं बिनबोभाट राहिला. त्यांचा पक्ष शिरसलामत वांचला. हा नानांचा जंगी विजय होता. हाही बराच मोठा फळांचा घोंस नानांनीं पाडला.

११४. (४) सदाशिवरावभाऊंना ज्या ज्या सरदारांनीं मदत केली होती, त्यांच्या त्यांच्या जहागिरी जप्त करून व त्यांचे खाजिने लुबाडून त्यांच्याकडून गुन्हेगाऱ्या घेऊन नानांनीं आपला खजिना भरला.

११५. (५) तोतयाच्या बंडामुळें बारभाईंच्या कारस्थानांतील मंडळींना आपलें अस्तित्व कायम राहतें किंवा नाहीं अशी जी भीति उत्पन्न झाली होती ती नानांच्या बुद्धिचातुर्यानें नाहींशी होऊन प्रत्येकाचें बूड स्थिरावलें. सखारामबापू वगैरे मुत्सद्यांवर या वेळीं नानांनीं मात केल्यामुळें नाना म्हणजे पेशवाई असें त्यांच्या पक्षांतील सर्व सरदारांना व सामान्य जनतेला वाटूं लागलें. नानांच्या पाताळयंत्री कारस्थानामुळें पेशवाईचे शत्रू, करवीरकर, हैदर, मुंबई सरकार, नागपूरकर भोंसल्यांपैकीं मुधोजीचा पक्ष, गायकवाडांपैकीं एक पक्ष, राघोबादादा व त्यांच्या पक्षांतील सर्व सरदार वगैरे शत्रुपक्षांतील लोकांना भयंकर दहशत बसली. नानांचा हाही फार मोठा विजय झाला.

११६. (६) तोतयाच्या बंडाच्या निमित्तानें आपल्या पेशवाईच्या मुलखांतील लोकांवर कायमची दहशत बसावी व त्यांनीं कित्येक पिढयापर्यंत वर डोकें करूं नये म्हणून सदाशिवरावभाऊंच्या पक्षाला गेलेल्या लोकांची व त्यांच्या बायका पोरांची कत्तल केली. या बाबतींत परशुरामभाऊ पटवर्धन यांना नाना लिहितात[1] "कोल्हापुराकडील घाटांनीं माणूस व राऊत तोतयाकडे जातात. त्यांची बातमी राखून कांहीं धरून डोकीं मारावीं म्हणजे दहशत पडेल. जाऊं पावणार नाहींत. आपण लौकर उतरोन ( घाटाखालीं ) तुडवीत महाडाकडे यावें. तोतयाकडे चाकरीस गेलेले मराठे यांचीं रांडापोरें, जमातदार जमातदार असे पाहून त्यांचीं धरावीं. बाकीच्यांचीं लुटून घरें जाळून टाकावीं. आम्ही शास्त्रार्थ मात्र लिहितों, परंतु सत्वेंच आम्हांकडील सरदारांची जात चालली यांस काय उपाय !" याप्रमाणें परशुरामभाऊसाहेबांसारख्या थोर व पराक्रमी सरदाराला नाना हुकूम देतात. व शेवटीं त्यांच्या कर्तबगारीवर 'आमच्या सरदारांचीं सत्वेंच जात चाललीं' असा शेरा मारून कलंक फांसतात. आपण जे हुकूम सोडतो ते अक्षरशः पाळले जात नाहींत

---

१. ऐ. ले. सं. पत्र नं. १९०६.

ह्याच त्याचा भावार्थ. तेव्हां या पत्रांतील हुकूम त्यांनीं नेहमींपेक्षां जास्त क्रूरता, निर्दयता ठेऊन पाळावा असा 'सत्वें जात चालली' या शब्दप्रयोगानें चांगला चिमटा घेऊन नानांनीं तो सोडला आहे. यावरून कोंकणांतील किती प्रदेश बेचिराख झाला असेल, किती लोकांच्या रांडापोरांची व लोकांची कत्तल झाली असेल, किती लोकांची लूटमार होऊन त्यांचीं घरेंदारें जळून राखरांगोळी झाली असेल, किती लोक अन्नवस्त्राला पारखे होऊन देशोधडीला लागले असतील, याची गणती कल्पनेनेंच केलेली बरी. याप्रमाणें नानांना आपल्या राज्यांतील लोकांवर आपली कायमची दहशत बसविली हा त्यांचा मोठा विजयच आहे.

११७. (७) तोतयाच्या बंडात सदाशिवरावभाऊंना ज्या ज्या सरदारांनीं मदत केली त्यांना त्यांना कैद करून डोंगरी किल्ल्यावर नेऊन ठेविलें. हे राजकैदी होते. यांना नानांनीं अत्यंत क्रूरतेनें वागविलें. त्यांचे नाना प्रकारें हाल केले. कोणाला अन्नपाण्यावांचून कोंडून मारलें, तर कोणाला नाजुक स्थानीं चाप लावून हाल हाल केले. पूर्वीच्या त्यांच्या कर्तबगारीचा, स्वामिनिष्ठेचा, किंवा स्वार्थत्यागाचा विचार न करतां राजकैद्यांना नानांकडून कसा पाहुणचार मिळाला हें तोतयाचें बंड उभारण्याला कारणीभूत झालेले रामचंद्र नाईक यांच्यासंबधींच फक्त माहिती दिल्यावरून कल्पना येईल. रामचंद्र नाईक हे थोड्याच वर्षांपूर्वी नानांचे अर्ध्या वचनांत असलेले पेशव्यांचे सावकार व सरदार. माधवराव पेशव्यांना त्यांचे मरणकाली त्यांच्या गळ्याला कर्जाचा फास लागल्यामुळें त्यांचा जीव जातां जाईना. आतल्या आत प्राण घुटमळू लागले अशा स्थितींत रामचंद्र नाईकांनीं माधवराव पेशव्यांच्या कर्जाचा बोजा आपल्या शिरावर घेतला. या उपकाराची फेड अंशतः तरी व्हावी म्हणून त्यांना माधवरावांनीं पालखीचा मान दिला. अशा थोर व पेशव्यांच्या निकटच्या आप्त सरदारांना नानांनी राजकैदी म्हणून कसा पाहुणचार दिला याची कल्पना पुढील उताऱ्यावरून येईल. 'राजश्री'[1] रामचंद्र नाईक होळकराजवळ

---

१ ऐ. ले. स. पत्र नं. १९१०.

चौकींत आहेत. किल्ल्याखालीं एक वेळ पाठविलें होतें, परंतु कांहीं जाहलें नाहीं. बेडी मशारनिल्हेस घालणार आहेत. चाप लाविले. बाकी राहिली नाहीं. तोतयाचे प्रकरणांत होते. त्यांची अवस्था याजप्रमाणें होणार. '

११८. रामचंद्र नाईकासारख्या पालखीपदस्थ सरदाराला गुप्तस्थानीं चाप लावून त्यांचे हाल हाल करणें ही आसुरी वृत्तीची कमाल तर खरीच, पण त्याही पलीकडे नानांची मजल गेली होती. कुलशीलवान स्त्रियांच्या बाबतींतही त्यांनीं आपली निर्दय निंद्य वृत्ति सोडली नाहीं. 'सौ. अन्नपूर्णाबाई[१] (रामचंद्र नाईकांची पत्नी) रत्नागिरीसच होती. तीस कैद करून पुण्यास आणविली आहे. अर्धवाटेस आली. पायानें चालवीत आणितात. 'आप्पा भटास मार तेथें दिला. तीन लाख रुपये मागतात! अन्नपूर्णाबाई येथें आल्यानंतर तिची अप्रतिष्ठा बहुतां प्रकारें करावी, ह्मणोन नाना स्वमुखें बोलतात!' तिनें कांहीं आपल्या स्वबुद्धीनें केलें नाहीं. आणि ईश्वरानें तिजवर कहर केला आहे! ती कांहीं याउपर जीव ठेवणार नाहीं. फार वाईट गोष्ट आहे. ईश्वरी सत्ता कळत नाहीं. सर्वस्वें नाईकाचा घात जाहला.' हें पत्र पुरंदराहून बळवंतराव कृष्ण मंगळवेढेकर यांनीं मिरजेस गंगाधर गोविंद पटवर्धन यांस लिहिलें आहे. ही नानांच्याच पक्षांतील मंडळी असल्यामुळें त्यांत विपर्यस्त मजकूर असण्याचें कारण नाहीं. सौ. अन्नपूर्णाबाईसारखी थोर, घरंदाज, पेशव्यांच्या आप्त अशा कुलीन स्त्रीला डोंबाऱ्याच्या किंवा बेरडांच्या स्त्रियांप्रमाणें डोंगरी मुलखांतून दोनशें मैल चालत पुण्यास आणविणें हें मानवी अंतःकरणाचें लक्षण नाहीं खास. त्याचप्रमाणें तिची अप्रतिष्ठा नाना स्वमुखानें करीत होते, हें त्याहीपेक्षां निंद्य आहे. यावरून नानांचें अंतःकरण हिंस्र पशूपेक्षां निराळें होतें असें कोणासही म्हणतां येणार नाहीं. वाघाचा अशाच प्रकारचा स्वभावधर्म आहे. ह्मणून लोक त्याला घाबरतात. खुनी दरवडेखोर यांचीही वृत्ति अशीच असते. ह्मणून त्यांना लोक भितात.

---

१. ऐ. ले. सं. पत्र नं. १९५७.

त्यांच्या नांवाचा उच्चार कानीं पडतांच झोंपेतूनही लोक घाबरून उठतात, असा त्यांच्या नांवाचाही दरारा आहे. नानांनींही या तोतयाच्या बंडाच्या वेळीं अशी आसुरी वृत्ति धारण केली. त्यामुळे सर्व पेशव्यांच्या राज्यांत त्यांच्या नांवाचाही लोकांना दरारा बसला. तो इतका की नानांच्या विरुद्ध कोणतीहि गोष्ट बोलणें म्हणजे स्वतःच्या सर्वस्वाचा नाश करून घेणें होय, असें लोकांना वाटूं लागलें होतें. नानांनीं या प्रसंगीं हा एक आपला दरारा बसविण्याचा विजय संपादन केला. या दराऱ्यामुळें नाना जिवंत असेपर्यंत तर राहोच, पण मेल्यापासून आज तागाईतपर्यंत त्याच्याविरुद्ध बोलण्याची व लिहिण्याची कोणाची छाती झाली नाहीं. हें या दराऱ्याचेच एक प्रतीक आहे.

११९. (८) तोतयाच्या बंडात नानाच्या पक्षातील सरदारांचे आप्त सांपडले होते. परशुरामभाऊ पटवर्धनाच्या घराण्यापैकीं हरबाणा पटवर्धन, व त्यांचे यजमान, व्यंकटराव घोरपडे हे होते. त्याचप्रमाणें हरिपंततात्या फडके यांचा पुतण्याही गुन्हेगार होता. पार्वतीबाईंचा भाऊ कोल्हटकर हाही होता. प्रत्यक्ष सवाईमाधवराव पेशव्याची मातोश्री गंगाबाई यांचा मामा नारो शंकर—हे लढाईंत मेले म्हणून सुटले—याच्या कुटुंबातली मंडळी आणि रामचंद्र नाईक व त्यांच्या कुटुंबांतली मडळी व गंगाबाईंची आप्त व प्रेमांतलीं मंडळी, हीं सर्व गुन्हेगार ठरली होती. बंडात सामील झाल्यामुळें गुन्हेगारीच्या पारिपत्याचा त्यांच्यावर नानांचा जो वरवंटा फिरला, त्यांत याही मंडळीचें सर्वस्व जाऊन फक्त प्राण तेवढे शिल्लक राहिले होते. अशा स्थितींत परशुरामभाऊ, हरिपंततात्या, पार्वतीबाइ व गंगाबाई यानीं आपापल्या माणसाचे प्राण वांचविण्याबद्दल नानाची करुणा भाकली. आजपर्यंतची सर्व पुण्याई त्यांनीं नानांजवळ खर्च केली. नानांचीं आर्जवें केलीं. त्यांचे पाय धरले. त्या वेळीं नानांनीं मोठ्या औदार्यानें त्या गुन्हेगार लोकांकडून जबरदस्त गुन्हेगारी घेऊन व इतःपर कोणत्याही राजद्रोहाच्या कटात ( नानाविरुद्ध ) सामील न होण्याबद्दलचे जामीन घेऊन त्यांना प्राणदान दिलें. या नानांच्या पर्वतप्राय उपकाराबद्दल ही सर्व

मंडळी त्यांच्या ताटाखालील कायमचीं मांजरें होऊन बसलीं. हाही नानांचा मोठा विजयच झाला.

१२०. (९) राज्यकर्ते ब्राम्हण पेशवे. अर्थात् त्यांच्या राज्यांत ब्राह्मणांचें प्रस्थ विशेष होतें. ब्राह्मण हे धर्माचे मुख्य अधिकारी. तेव्हां धर्मगुरु, शास्त्री, पंडीत, भिक्षुक, याज्ञिक, वगैरे ब्राह्मणांचें विशेष प्राबल्य होतें. यांचें राज्यकारभारात जरी विशेष अंग नव्हतें तरी अधिकारी ब्राम्हण वर्गावर त्याचे धार्मिक दडपण होते. कोणत्या वेळीं हे शास्त्री, भट, भिक्षुक आपल्यावर अधर्माचरणाचा गुन्हा लादतील ही भीति सर्वांना होती. त्यामुळें पेशवाईंतील बारभाईंना ते डोईजड वाटत होते. तोत-याच्या बंडांतून नानांनीं प्रायश्चित्ताचें जें होमकुंड पेटविले त्यांत एकजात सर्व भटांभिक्षुकांना होरपळून काढलें. संसर्ग्यांचे संसर्गी, त्याचे संसर्गी, त्या सर्वांचे संसर्गी दोषी असल्याबद्दल फर्मानें काढून महाराष्ट्रातील जास्तींत जास्त ब्राह्मण, भट, भिक्षुक त्यात गोंवले जातील अशी त्यांनी योजना केली. नापित सर्वां-च्याच डोक्यावरून हात फिरवतो. त्याला कोणी वस्ताद भटत नाही. त्याच-प्रमाणें भट, भिक्षुक सर्वांनाच प्रायश्चित्तें देतात. त्यांना सहसा कोणी गुरु भेटत नाहीं. या वेळीं नानानीं त्यांचींच बोटें त्यांच्या डोळयांत घातलीं व त्याना त्राहि भगवन् करून सोडलें. प्रायश्चित्ताच्या कलमापैकीं एक कलम मागें दर्शविल्याप्रमाणें स्वतःच्या हातीं ठेऊन त्यांनीं ब्राम्हणांच्या नाकांत कायमच्या वेंसणीं अडकविल्या. त्याच्याकडून प्रायश्चित्ताचे मोठमोठे दंड घेतले. उपोषणें घालून त्यांचीं कंबरडीं मोडलीं. मुंडणपूर्वक प्रायश्चित्त देण्याचें संदिग्ध कलम घालून आपल्या स्त्रियाविषयीं त्यांच मनात भयंकर भीति उत्पन्न केली. अशा एक ना दोन, अनेक गोष्टींनीं ब्राम्हणांची चरबी नानानीं पातळ करून सोडली. यामुळें डोईजड वाटणारे भट, भिक्षुक पराप्रमाणें हलके झाले. त्यांच्यावर नानांचा एवढा मोठा दरारा बसला कीं, त्यांच्याविरुद्ध धर्माधर्माचा कोणताच विषय बोलावयाचा नाहीं, नाना म्हणजे धर्ममार्तंड, करतील ती पूर्व दिशा, असें झालें. नानांचा भट–भिक्षुक वर्गावरील हाही विजय मोठाच होता.

१२१. (१०) पेशवाईच्या अमदानीपासून खुद्द पेशवे हे चित्तपावन ब्राह्मण असल्यामुळें सर्व चित्तपावन जातीच्या पराक्रमाबद्दल व बुद्धिचातुर्याबद्दल सर्व हिंदुस्थानभर बोलबाला झाला होता. पहिले बाजीराव व त्यांचे बंधु चिमाजी आप्पा यांच्या प्रभावी शौर्याची व बुद्धिचातुर्याची स्मृति सर्व भारतवर्षाला

अद्यापि ताजाच वाटत होती. राघोबादादांनीं आपल्या शौर्याचा व पराक्रमाचा डंका मराठी साम्राज्याचा झेंडा अटकेला फडकवून आपल्या पूर्वजांच्या कीर्तीत विलक्षण भर टाकिली होती. सर्व हिंदुस्थानभर चित्तपावन सरदार त्या वेळीं पसरले असल्यामुळें त्यांचा दरारा हिंदी जनतेला ताजाच वाटत होता. मराठी-साम्राज्यांतील शिंदे, होळकर आदिकरून मोठमोठ्या मराठे सरदारांनाहि चित्तपावन मंडळींचा धाक वाटत होता. शौर्य व बुद्धिमत्ता यांची संमिश्रित खाण जर कोठें असेल तर ती चित्तपावन ज्ञातींत आहे असा भ्रम सर्व हिंदी जनतेंत त्या वेळीं झाला असल्यास नवल वाटण्यासारखें नव्हतें. कोणतेहि बुद्धिप्रधान राजकारण चित्तपावन लोकांनीच लढवावें व ते यशस्वी करावें असें सर्व हिंदुस्थानानें एकमुखानें ह्मणावें एवढी मजल त्या वेळीं चित्तपावन ज्ञातीनें गांठली होती, असें कोणी ह्मटल्यास तें अतिशयोक्तीचे आहे, असें कोणास वाटण्यासारखें नव्हतें. अशा बुद्धिवान् व कर्तृत्ववान चित्तपावन ज्ञातीचें माहेर घर ह्मणजे रत्नागिरी हें सुप्रसिद्ध स्थान होय. रत्नागिरीच्या चित्तपावनांना सहसा कोणी फसवूं शकणार नाही, अशी त्यांची ख्याती होती. पुण्याच्या भामट्यांनीं अगर दिल्लीच्या सोद्यांनींही त्यांच्या पुढें हात टेकले होते. कोणी कितीही धूर्त इसम आला तरी रत्नागिरीच्या चित्तपावनानें त्याचें कपट ओळखलें नाहीं असें कधींच झालें नाहीं. अशा चाणाक्ष व बुद्धिवान् चित्तपावन ज्ञातीच्या रत्नागिरी-सारख्या अव्वल दर्जाच्या नगरामध्यें बुंदेलखंडांतील एका सामान्य कनोजा ब्राह्मणानें येऊन आपण खरे भाऊसाहेब आहोंत ह्मणून सांगावें व रत्नागिरीच्या चित्तपावनांनीं त्याला खरा भाऊसाहेब ह्मणून मानावें ही गोष्ट अशक्य कोटीच्या पलीकडील होती. पंढरीच्या पांडुरंगानें विठूमहाराचा वेश घेऊन भक्त दामाजींचें जसे संकटविमोचन केले तसेंच संत सखूची तोतया सखू बनून कांही दिवसपर्यंत सर्वांना ज्या पांडुरंगानें फसविलें त्याच पांडुरंगानें पार्वतीबाईच्या उद्धाराकरतां सदाशिवरावभाऊचें रूप धारण केलें असतें व तो रत्नागिरीस आला असतां, तरी सुद्धां रत्नागिरीच्या चित्तपावनांनीं त्याला तोतया ह्मणून खास ओळखलें असतें. रत्नागिरीच्या किल्ल्यावर सदाशिवराव-भाऊंची रवानगी केली ती ते तोतया ह्मणून केली होती. गेलीं दहा वर्षे ते तोतया आहेत ह्मणून त्यांचा डांगोरा पिटत होता. त्यांच्या कित्येक वेळां परीक्षा झाल्या होत्या. अशा केवळ पेशवे सरकारतर्फेंच तोतया ठरलेल्या इसमाला नव्हे तर जो बेलभंडारा आणून ठेवतांच स्वमुखानें आपण सुखलाल

कनोजा ब्राह्मण ह्मणून सांगतो व आपल्या आईबापांची वंशावळ देतो त्या इसमाला रत्नागिरीचे चित्तपावन लोक खरा भाऊसाहेब ह्मणून परीक्षा करून ठरवितात. या रत्नागिरीच्या चित्तपावनांनीं भाऊंची केवळ परीक्षा करून त्याचा निर्णय प्रसिद्ध करण्यापुरतीच चळवळ केली असती तर त्यांत विशेष असें कांहीं घडलें नसतें. परंतु तेवढ्यावरच त्या चित्तपावन मंडळींची चळवळ न थांबतां सर्व चित्तपावन सरदार भाऊसाहेबांच्या जरिपटक्याखालीं गोळा झाले व त्यांनीं पुण्याच्या कारभारी लोकांना भामटे ठरवून त्यांच्या पारिपत्यां-करतां लढाई देण्याची कंमर बांधली. रत्नागिरीच्या चित्तपावनांना पेशवे सरकारच्या विशाल लष्करी सामर्थ्याची कल्पना पूर्ण होती. सूर्याच्या प्रकाशा-पुढें काजव्याच्या तेजाचें जें प्रमाण बसेल तवढेंच जवळ जवळ प्रमाण पेशवे सरकारचें सैन्य व रत्नागिरीच्या चित्तपावन मंडळीच्या सैन्याचें होतें. अशा स्थितींत आपण आत्मयज्ञाला प्रवृत्त होत आहोंत हें ती चित्तपावन मंडळी ओळखीत होती. एकंदरींत हें तोतयाचें बंड ह्मणजे एका बाजूला सर्व रत्नागिरीच्या चित्तपावन ज्ञातीची मंडळी व दुसऱ्या बाजूला नाना फडनविस असे युयुत्सव होते. अशा युद्धांत नानांनीं विजय मिळविला ह्मणजे तो विजय प्रत्यक्ष रत्नागिरीच्या चित्तपावन मंडळीवर मिळविल्यामुळें नानांना हा विजय ह्मणजे त्याच्या विजयमालिकेंतील 'मेरूमणी विजय' झाला यात संशय नाहीं. अशा प्रकारें अनेक लहान मोठे विजय, पण ते निरनिराळ्या स्वरूपाचे असे तोतयाच्या बंडामध्यें केवळ एका मनुष्याची अदलाबदल करून नानांनीं सपादन केले. नानाचें बुद्धिचातुर्य सर्व चित्तपावन ज्ञातीवर मात करणारें समुद्राप्रमाणें विशाल होतें, यांत कोणाचेच दुमत नाहीं. नानानी अंगिकारलेलें कोणतेंहि अन्यायाचें कार्य आपल्या इच्छेनुरूप यशस्वी करण्याकरतां न्याया-न्यायाचें औदासिन्य, पाषाणहृदयत्व, बेफाट चिकाटी, आसुरी महत्वाकांक्षा, सहज फसविता येण्यासारखी मधुरवाणी, निरालस श्रम करण्याची संवय हे जे गुणावगुण लागतात, ते नानांच्या ठिकाणीं विपुल पाणी भरीत होते. नानांच्या ठिकाणीं सामान्य मुत्सद्यांपेक्षां असेंच कांहींतरी विशेष होतें ह्मणूनच ते सर्व शहाण्यांचें गुरु बनले. नानाच्या बुद्धिचातुर्याच्या कापट्यपूर्ण लहानशा खेळामुळें तोतयाच्या बंडाच्या चित्तपावन संग्रामांत विजयाची माळ नानांच्या गळ्यांत शेवटीं पडून तोतयाच्या बंडाची परिसमाप्ति झाली.